# कौटिलीय अर्थशास्त्र

## सटीप मराठी भाषांतर

भाषांतरकार

प्रा. र. पं. कंगले, एम्. ए.



महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ

# कौटिलीयम् अर्थशास्त्रम्

## (सटीप मराठी भाषांतरासह)

भाषांतरकार

**प्रा. र. पं. कंगले**




**महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ**

# निवेदन

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाच्या वतीने प्रा. र. पं. कंगले यांनी अनुवादित केलेल्या " कौटिलीय अर्थशास्त्र " या पुस्तकाचे प्रकाशन करण्यास मंडळास आनंद होत आहे.

मुंबई :

दिनांक २२ ऑगस्ट १९८२
भाद्रपद ४, शके १९०४

सुरेंद्र बारलिंगे
*अध्यक्ष*
*महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ*

# अनुक्रमणिका

# उपोद्घात

## कौटिलीय अर्थशास्त्राचे प्रकाशन

राजनीतिशास्त्रावरील कौटिलीय अर्थशास्त्र हा ग्रंथ इसवी सन १९०९ मध्ये प्रथम प्रकाशात आला. त्या वर्षी म्हैसूरचे आर. शामशास्त्री यांनी ग्रंथ लिपीतील एका हस्तलिखिताच्या आधारे संपादित करून तो छापून प्रसिद्ध केला. तत्पूर्वी संस्कृत वाङमयाच्या अभ्यासकांना ह्या ग्रंथाची माहिती अन्यत्र आढळणाऱ्या त्याच्या उल्लेखांवरून आणि कोठेकोठे उद्धृत केलेल्या त्यातील वचनांवरून झालेली होती. परंतु प्रत्यक्ष तो ग्रंथ तोपर्यंत उपलब्ध झाला नव्हता. म्हणून ह्या ग्रंथाचे प्रकाशन ही संस्कृत वाङमयाच्या आधुनिक अभ्यासाच्या इतिहासात एक महत्त्वपूर्ण घटना ठरली. तो प्रसिद्ध झाल्यावर त्याचे वैशिष्टय व महत्त्व लक्षात येऊन अनेक मोठमोठे विद्वान त्याच्या अध्ययनाकडे आकर्षिले गेले. ह्या ग्रंथाच्याच अध्ययनाला वाहिलेले व त्याच्यापासून प्रेरणा मिळून प्राचीन भारतीय राजनीतिशास्त्राचे विस्तृत विवेचन करणारे अनेक ग्रंथ लिहिले गेले आहेत; आणि अद्यापही हे कार्य तसेच जोमाने सुरू आहे.

कौटिलीय अर्थशास्त्राला विशेष महत्त्व प्राप्त होण्याचे प्रधान कारण त्याचा विषय, राजनीतिशास्त्र. हा ग्रंथ प्रसिद्ध होईपर्यंतच्या काळात भारतातील प्रायः इतर सर्व विद्यांचे व शास्त्रांचे आधुनिक दृष्टीने संशोधनपूर्वक चिकित्सक अध्ययन होऊन असंख्य ग्रंथ लिहिले गेले होते. परंतु त्या काळात राजनीतिशास्त्राची जवळजवळ सर्वस्वी उपेक्षाच झाली होती. धर्मशास्त्रावरील ग्रंथांच्या व महाभारताच्या विवेचनाच्या ओघात क्वचित त्याच्या सिद्धांतांना स्पर्श केला जात असे इतकेच. ह्याचा एक परिणाम असा झाला की सर्वसाधारणपणे भारतातील लोक केवळ अध्यात्मवादी, फक्त धर्माच्या व पारलौकिक गोष्टींच्या विचारासच प्राधान्य देणारे आणि म्हणून ऐहिक, आधिभौतिक गोष्टींची सर्वथा उपेक्षा करणारे आहेत असा ग्रह होऊन बसला होता. वेदवेदांगे, धर्मशास्त्र, महाभारत, रामायण, भगवद्गीता, वेदांतादी दर्शने, बौद्ध वाङमय, जैन वाङमयं यांत अध्यात्म, मोक्ष, धर्म, तत्त्वज्ञान यांसारख्या गोष्टींनाच प्राधान्य दिलेले दिसत असल्यामुळे

असा ग्रह होणे स्वाभाविक होते. त्या ग्रहाला मोठा धक्का दिला तो कौटिलीय अर्थशास्त्राच्या प्रकाशनाने. त्याचा विषय असलेल्या राजनीतिशास्त्राचा वरीलपैकी कोणत्याही गोष्टीशी संबंध नाही. ते सर्वस्वी इहलोकीच्याच गोष्टींचा विचार करणारे आणि तो विचार सुद्धा धर्मनिरपेक्ष रीतीने करणारे असे शास्त्र आहे. ह्या ग्रंथाने असे दाखवून दिले की प्राचीन भारतीय धर्म, अध्यात्म यांसारख्या गोष्टींचा जितक्या सूक्ष्मपणे विचार करीत तितक्याच सूक्ष्मतेने ते ऐहिक गोष्टींचाही विचार करीत. हा ह्या शास्त्रावरील परिपूर्ण असा ग्रंथ आहे आणि त्यात त्या शास्त्राचा अत्यंत सूक्ष्म विचार केलेला आढळतो. ह्या शास्त्राच्या सर्व अंगोपांगांचे इतके विस्तृत व इतके सूक्ष्म विवेचन करणारा दुसरा ग्रंथ नाही. हेही त्याला विशेष महत्त्व प्राप्त होण्याचे कारण आहे.

ह्या ग्रंथाला महत्त्व प्राप्त होण्याचे आणखी एक कारण त्याची संभाव्य अतिप्राचीनता. परंपरागत मतानुसार हा ग्रंथ कौटिल्याने लिहिला आहे आणि ह्याच कौटिल्याने मगधातील नंदवंशाचा उच्छेद करून तेथील सिंहासनावर चंद्रगुप्त मौर्याला प्रतिष्ठापित केले होते. हे ग्राह्य मानले तर ह्या ग्रंथाचा लेखनकाल ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकाचा शेवटचा चरण असे ठरते. संस्कृत वाङ्मयात फार थोडे ग्रंथ असे आहेत की ज्यांचा काल याप्रमाणे निश्चित करता येतो आणि तोही इतका प्राचीन. हा ग्रंथ राज्यकारभाराविषयी असल्यामुळे वरील पारंपारिक मतावरून असा निष्कर्ष काढणे शक्य झाले आहे की त्यात मौर्यकालीन परिस्थितीचे चित्र उमटले आहे आणि त्यातील राज्यपद्धतीचे वर्णन हे मौर्यांच्या राजवटीचेच वर्णन आहे. ग्रंथाचा लेखनकाल व त्यावरून निघणारा हा निष्कर्ष हे दोन्ही विवादग्रस्त आहेत. ह्या दोन्ही प्रश्नांचे थोडे विवेचन पुढे येईलच. तथापि, एवढे येथे म्हणावयास हरकत नाही की ह्या ग्रंथाची अतिप्राचीनता सिद्ध न झाली तरी त्याचे महत्त्व कमी होते असे नाही. त्याचा विषय व त्या विषयाचे केलेले चतुरस्र विवेचन यांतच ह्या ग्रंथाच्या महत्त्वाचे रहस्य वस्तुतः साठवलेले आहे.

शामशास्त्रींची पहिली आवृत्ती (व पुढे दुसरी सुद्धा) एकाच हस्तलिखितावरून तयार करण्यात आली होती. पण नंतरच्या काळात मल्याळी लिपीत लिहिलेली तीन चार हस्तलिखिते उपलब्ध झाली. शिवाय ह्या ग्रंथावर लिहिलेल्या चार पाच निरनिराळ्या टीकांचे थोडथोडे अंशही उपलब्ध झाले. साहजिकच ह्या सर्वांचा शुद्ध पाठ ठरविण्याच्या कामी फार उपयोग झाला. शामशास्त्रींच्या तिसऱ्या आवृत्तीत (इ. स. १९२४) काही प्रमाणात असा उपयोग केला आहे. याच सुमारास ह्या ग्रंथाची आणखी दोन संस्करणे प्रसिद्ध झाली, एक जे. योली

व आर. श्मिट यांनी संपादित केलेले व लाहोर येथून दोन भागांत प्रसिद्ध केलेले व दुसरे पंडित टी. गणपती शास्त्री यांनी संपादित करून सबंध ग्रंथावर स्वत: लिहिलेल्या संस्कृत टीकेसह त्रिवेंद्रम येथून तीन खंडांत प्रसिद्ध केलेले. यानंतर बऱ्याच कालावधीने गुजरातेतील पाटण शहरात असलेल्या जैन भंडारात देवनागरी लिपीत लिहिलेला ह्या ग्रंथाचा प्रारंभीचा थोडा भाग व आणखी एका टीकेचा अल्पसा भाग उपलब्ध झाला. तो मुनी जिनविजयजी यांनी संपादन करून प्रसिद्ध केला. मूळ हस्तलिखिते व प्रसिद्ध झालेली ही संस्करणे यांच्या आधारे प्रस्तुत लेखकाने तयार केलेले चिकित्सक संस्करण मुंबई विद्यापीठाने प्रसिद्ध केले. त्याची द्वितीयावृत्ती थोड्याच वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाली.

ह्या ग्रंथाची अनेक भाषांत भाषांतरे प्रसिद्ध झाली आहेत. पहिले इंग्रजी भाषांतर शामशास्त्री यांचेच. त्याची पहिली आवृत्ती १९१५ त प्रसिद्ध झाली, १९६० मध्ये सहावी आवृत्ती प्रसिद्ध झाली. ह्या ग्रंथाच्या संबंधात शामशास्त्रींनी केलेले कार्य अतुलनीय आहे. चिकित्सक प्रतीला अनुसरून प्रस्तुत लेखकाने केलेले दुसरे सटीप इंग्रजी भाषांतर मुंबई विद्यापीठानेच प्रसिद्ध केले आहे. त्याचीही दुसरी आवृत्ती अलीकडेच प्रसिद्ध झाली आहे. अन्य युरोपीय भाषांपैकी जर्मन व रशियन या दोन भाषांत समग्र ग्रंथाची भाषांतरे झाली आहेत. जर्मन भाषांतर जे. जे. मेयर यांनी केले असून त्यावर अत्यंत विस्तृत अशा टीपा देऊन एक दीर्घ उपोद्घातही जोडला आहे. रशियन भाषांतराला दोन-तीन पंडितांचे हात लागले असून त्यावर शेवटचा हात व्ही. आय. काल्यानोव्ह यांनी फिरविला आहे. यातही अनेक टीपा असून शिवाय काल्यानोव्ह व आय. पी. वैकोव्ह यांचे विवेचनात्मक दोन लेखही सोबत जोडले आहेत.

भारतीय भाषांविषयी बोलावयाचे तर असे नि:शंकपणे म्हणता येईल की, बहुतेक सर्व भारतीय भाषांत ह्या ग्रंथाचे अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत. फक्त सिंधी व उर्दू या दोन भाषांत अनुवाद झाल्याचे प्रसिद्ध नाही. हिंदीमध्ये तर किमान सहा अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत. मराठी अनुवाद ज. स. करंदीकर आणि व. रा. हिवरगांवकर यांनी केला असून तो १९२७ व १९२९ या वर्षी दोन खंडांत कर्जत येथून प्रसिद्ध झाला. दुसऱ्या खंडाच्या प्रारंभी विवेचनात्मक दीर्घ प्रस्तावना असून शेवटी काही परिशिष्टे जोडली आहेत. प्रस्तुत दुसरे मराठी भाषांतर मुंबई विद्यापीठाने प्रसिद्ध केलेल्या चिकित्सक संस्करणाला अनुसरून केलेले आता प्रसिद्ध होत आहे.

ह्या ग्रंथाच्याच अध्ययनाला वाहिलेले अनेक ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. त्यांपैकी काही महत्त्वाच्या ग्रंथांचा निर्देश करण्यास हरकत नाही. ओ. स्टाइन

यांचा मेगॅस्थिनीस आणि कौटिल्य यांच्या विधानांची विस्तृत तुलना करून त्या दोहोंत मेळ नाही असे दाखविण्याचा प्रयत्न करणारा ग्रंथ (जर्मन भाषेत) १९२१ मध्ये प्रसिद्ध झाला. बी. ब्रेलोअर यांचे संशोधन तीन खंडांत प्रसिद्ध झाले आहे. पहिल्या खंडात जमिनीच्या मालकीचा प्रश्न विचारात घेतला आहे, दुसऱ्यात दोन पक्षांमध्ये होणाऱ्या करारांचा विचार आहे आणि तिसऱ्यात अर्थव्यवस्थेचे विस्तृत विवेचन आहे. तिसऱ्या खंडासाठी ब्रेलोअर पुण्यात पेशवे दप्तराचा अभ्यास करून गेले होते. हे खंडही जर्मन भाषेत आहेत. अलीकडे एच्. शार्फ यांनी ग्रंथ व ग्रंथकार यांच्या संबंधात उत्पन्न होणाऱ्या अनेक प्रश्नांचे विवेचन विस्तृतपणे करणारा ग्रंथ (जर्मन भाषेत) प्रसिद्ध केला आहे. स्टेन कोनौ यांचा १९४५ मध्ये प्रसिद्ध झालेला 'कौटिल्य स्टडीज' नावाचा ग्रंथ इंग्रजीत आहे. वस्तुतः कौटिलीय अर्थशास्त्राच्या अध्ययनाला सुरुवात पौर्वात्य विद्यांच्या अध्ययनाला वाहिलेल्या जर्नल्समध्ये प्रसिद्ध झालेल्या लेखांनी झाली होती. एच्. याकोबी, ए. बी. कीथ, जे. योली, एम्. विंटर्निट्झ यांसारख्यांचे अनेक महत्त्वपूर्ण लेख ह्या ग्रंथाच्या सखोल अध्ययनास चालना देण्यास कारणीभूत झाले. त्या सर्वांचा नामनिर्देश करण्याची आवश्यकता नाही. तेव्हापासून आतापर्यंत या ग्रंथावर असंख्य लेख लिहिले गेले आहेत. ते लिहिणाऱ्यांमध्ये वरील पंडितांशिवाय ए. हिलेब्रांट, ओ. स्टाइन, एन. एन. लॉ, प्राणनाथ, ई. एच. जॉन्स्टन, बी. ब्रेलोअर, डी. आर. भांडारकर, के. ए. नीळकंठ शास्त्री, पी. व्ही. काणे, टी. बरो यांचा प्रामुख्याने निर्देश केला पाहिजे.

ह्या ग्रंथाच्या निमित्ताने प्राचीन भारतीय राजनीतिशास्त्रावरील लिखाणाला एकदम बहर आला. के. पी. जायस्वाल, एन. एन. लॉ, डी. आर. भांडारकर, यू. एन. घोषाल, बी. के. सरकार, बेनी प्रसाद, ए. एस. आळतेकर आदींच्या या विषयावरील ग्रंथांत साहजिकच कौटिलीय अर्थशास्त्राचा मोठ्या प्रमाणात उपयोग केला गेला आहे. याशिवाय हा ग्रंथ मौर्यकालीन आहे असे मानल्यामुळे तत्कालीन परिस्थितीचे विवेचन त्याच्या आधारे करण्यात आले आहे. एफ. डब्ल्यू. टॉमस यांनी "केंब्रिज हिस्टरी ऑफ इंडिया" च्या पहिल्या खंडात मौर्यांच्या राजवटीचे वर्णन करताना ह्या ग्रंथाचाही उपयोग केला आहे. तसेच के. ए. नीळकंठ शास्त्री यांनी 'एज आफ दी नंदाज अँड दी मौर्याज' ह्या ग्रंथात "अर्थशास्त्र" याप्रमाणेच आधारासाठी वापरले आहे. ह्या ग्रंथाच्या अध्ययनाला आणखी एक दिशा लाभली आहे. धर्मशास्त्र व अर्थशास्त्र यांत काही विषय – विशेषतः कायदा व न्यायदान – समान असल्यामुळे या दोन शास्त्रांचे तुलनात्मक अध्ययन होणे स्वाभाविक होते. जे. योलींच्या प्रारंभीच्या लेखांनंतर पी. व्ही. काणे यांच्या 'हिस्टरी ऑफ धर्मशास्त्र' ह्या ग्रंथाच्या तिसऱ्या खंडांत असे तुलनात्मक अध्ययन

अत्यंत विस्तृतपणे केले आहे. जे. जे. मेयर यांनी धर्मशास्त्रावरील ग्रंथांची परस्परात आणि अर्थशास्त्राशी तुलना करणारा एक मोठा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. जर्मन भाषेतील हा ग्रंथ अति महत्त्वपूर्ण आहे. पण त्याच्या काहीशा विस्कळित रचनेमुळे विद्वानांचे त्याच्याकडे जावे तसे लक्ष गेलेले नाही.

**ग्रंथाचा विषय व स्वरूप**

ग्रंथाचे अर्थशास्त्र हे नाव आधुनिक वाचकांना गोंधळात पाडणारे आहे. हल्ली हा शब्द ' इकॉनॉमिक्स ' या अर्थी उपयोगात आणला जातो. परंतु ह्या ग्रंथाचा विषय हा नाही. ग्रंथातच ह्या नावाची उपपत्ती दिली आहे. पंधराव्या अधिकरणात म्हटले आहे, " अर्थ म्हणजे मनुष्यांची उपजीविका, म्हणजेच मनुष्यांची वस्ती असलेली भूमी. त्या (भूमीचा म्हणजे) पृथ्वीचा लाभ आणि तिचे पालन यांचे उपाय सांगणारे शास्त्र ते अर्थशास्त्र (१५.१.१--२) ". पृथ्वीचे पालन अथवा रक्षण करणे हे राज्यसंस्थेचे कर्तव्य आहे. तसेच युद्धादी उपायांनी पृथ्वीचा लाभ अथवा प्राप्ती करून घेणे हे कार्य सुद्धा राज्यसंस्थाच करते. यावरून हे स्पष्ट आहे की अर्थशास्त्र हे राज्यकारभाराविषयीचे शास्त्र आहे. त्याचा विषय ' अॅडमिनिस्ट्रेशन ' अथवा ' रूलरशिप ' हा आहे आणि हा विषय ' पॉलिटिक्स ' अथवा ' पोलिटिकल सायन्स ' यात अंतर्भूत आहे.

' अर्थ ' शब्दाचा " मनुष्यवस्ती असलेली भूमी अथवा पृथ्वी " हा नेहमीचा अर्थ नाही. तथापि, हा अर्थ त्या शब्दाच्या मूळ अर्थातूनच निष्पन्न केला आहे. धर्म, अर्थ व काम ह्या त्रिवर्गापैकी अर्थ एक असल्याचे प्रसिद्ध आहे. त्या संदर्भात अर्थ म्हणजे इहलोकीच्या जीवनाची समृद्धता हा त्या शब्दाचा मूळ अर्थ. आणि ही समृद्धता संपत्तीमुळे प्राप्त होते. म्हणून संपत्ती असा ह्या शब्दाचा अर्थ होतो. सर्व प्रकारच्या संपत्तीच्या उत्पादनाला मनुष्याचे श्रम कारणीभूत होतात आणि हे उत्पादन अंततः भूमीतून – शेतांतून, खाणींतून – वगैरे प्राप्त होते. तेव्हा संपत्तिनिर्मितीच्या मनुष्य व भूमी ह्या दोन घटकांचा एकत्र निर्देश असलेला ' मनुष्यांची वस्ती असलेला भूप्रदेश ' असा ह्या शब्दाचा अर्थ सहज निष्पन्न होतो.

अर्थशास्त्र म्हणजे मनुष्यवती भूमीचे अथवा पृथ्वीचे शास्त्र असे ठरले तरी त्यामुळे ह्या शास्त्राच्या मर्यादा स्पष्ट होत नाहीत. मनुष्यांच्या संबंधी आणि पृथ्वीच्या संबंधी अनेक प्रकारची शास्त्रें संभवतात आणि तशी ती उदयास आलेलीही आहेत. अर्थशास्त्र हे पृथ्वीसंबंधीच्या एका विशिष्ट अंगाचाच विचार करणारे असे शास्त्र आहे. तिचे पालन कसे करावे व तिचा लाभ कसा करून घ्यावा ह्या दोन गोष्टींच्या विचारापुरतेच हे शास्त्र मर्यादित आहे. ह्या गोष्टी राज्याच्या कारभाराशी संबद्ध आहेत. राज्यकारभाराविषयीच्या शास्त्राला

वरील उपपत्तीच्या दृष्टीने अर्थशास्त्र हे नाव अन्वर्थक असले तरी विषयाचा बोध करून देण्याच्या दृष्टीने सुगम नाही. म्हणून या शास्त्राला दुसरीही काही नावे दिली गेली आहेत, राजशास्त्र, दंडनीतिशास्त्र, राजनीतिशास्त्र, नीतिशास्त्र इत्यादी. यांपैकी दंडनीति (व संक्षेपाने नीति) हे या शास्त्राचे सर्वात प्राचीन नाव आहेसे दिसते. महाभारतात (शांतिपर्व, अध्याय ५९) म्हटले आहे की लोकांनी सन्मार्गाने जावे म्हणून त्यांना मार्गदर्शन करण्यासाठी ब्रह्मदेवाने एक लक्ष अध्याय असलेल्या ग्रंथाची रचना केली. त्याचा दंडनीति व नीति या शब्दांनी निर्देश केला आहे. त्या ग्रंथात चर्चिले असलेल्या म्हणून ज्या विषयांची यादी दिली आहे ते कौटिलीय अर्थशास्त्रातील विषयांशी बहुतांशी जुळणारे असे आहेत. तेव्हा दंडनीति व अर्थशास्त्र एकच यात संशय नाही. अर्थशास्त्र हे नाव सुद्धा महाभारताला परिचित आहे. एके ठिकाणी (१२.१६१.९) पार्थाला म्हणजे अर्जुनाला अर्थशास्त्रविशारद म्हटले आहे.

पृथ्वीचा लाभ व पालन ही जी अर्थशास्त्राची दोन उद्दिष्टे त्यांपैकी लाभाचा विचार म्हणजे मुख्यत्वेकरून एका राष्ट्राच्या दुसऱ्या राष्ट्रावरील आक्रमणाचा विचार. त्या संदर्भात साहजिकच परराष्ट्रसबंधाचे विवेचन करणे क्रमप्राप्त होते. पालन करावयाचे ते पृथ्वीचे आणि तिच्यावरील माणसांचे. पृथ्वीचे पालन म्हणजे राष्ट्राचे रक्षण. ते रक्षण मुख्यतः शत्रूपासून करावयाचे असते. हा विषयही परराष्ट्रसंबंधात अंतर्भूत आहे. राज्यातील मनुष्यांचे पालन म्हणजे त्यांचे दैवी व मानुषी आपत्तीपासून रक्षण करणे एवढाच अर्थ नसून त्यांच्या योगक्षेमाची काळजी वाहणे हा अर्थ सुद्धा अभिप्रेत आहे. लोकांचे रक्षण करण्यासाठी आणि त्यांच्या योगक्षेमाची काळजी घेण्यासाठी कारभाराची मोठी यंत्रणा उभारणे आवश्यक असते. म्हणून अंतर्गत राज्यकारभाराचा विचार हे ह्या शास्त्राचे दुसरे अंग. ह्या दोन्ही अंगांचे – अंतर्गत राज्यकारभार आणि परराष्ट्रसंबंध यांचे – अत्यंत विस्तृत विवेचन कौटिलीय अर्थशास्त्रात केले आहे. ते अर्थशास्त्र शब्दाच्या व्याख्येला अनुसरूनच आहे.

स्वाभाविकपणेच ह्या ग्रंथाचे स्थूलमानाने दोन भाग पडतात, पहिल्या पाच अधिकरणांतील अंतर्गत राज्यकारभारविषयक एक आणि पुढील आठ अधिकरणांतील परराष्ट्रसंबंधाविषयीचा दुसरा. पहिल्या भागातील विषयाला तंत्र ही संज्ञा आहे, दुसऱ्या भागातील विषयाला आवाप ही. ह्या दोन प्रधान विषयांचा लावलेला हा क्रम उचित असाच आहे. विशेष म्हणजे दोन्ही भागातील विषयांची मांडणी अगदी तर्कशुद्ध पद्धतीने केलेली दिसून येते. प्रथम राज्यकारभाराच्या मध्यवर्ती यंत्रणेचे निरूपण केले आहे – राजा, त्याचे शिक्षण, त्याचा राजवाडा,

त्याच्या सुरक्षिततेची व्यवस्था, त्याचा वारसदार, मंत्री, पुरोहित यांची नेमणूक, इतर अधिकाऱ्यांच्या नेमणुका, हेरांचे जाळे, परराष्ट्रात पाठवावयाचा दूत इत्यादींचे. त्यानंतरच्या सर्वात मोठ्या दुसऱ्या अधिकरणात विविध खाती, त्यांवरील अध्यक्ष व त्यांचे कामकाज यांचे विस्तृत विवरण आहे. त्या निमित्ताने नवीन वसाहतीची स्थापना, दुर्गरचना, नगररचना, कोठारे, खजिना, कर-आकारणी, अंदाजपत्रक, हिशोबतपासणी, खाणी, कारखाने, शेती, व्यापार, जकात व दस्तुरी, राजधानीतील व्यवस्था इत्यादी अनेक गोष्टींच्या संबंधात अगदी बारीकसारीक तपशील दिला आहे. त्यापुढील अधिकरणात न्याय-दानाच्या कार्याचा विचार आहे. प्रजाजनांत उत्पन्न होणाऱ्या तंटयांच्या अनुरोधाने विवाह, वारसाहक्क, कर्ज, ठेवी, मालकी हक्क, दास व कामगार, चोरी व बळजबरी, शिवीगाळ, मारामारी, जुगार या व इतर विषयांवरील संपूर्ण प्राचीन कायदा उद्धृत केला आहे. चौथ्या अधिकरणाचा कंटकांचे निर्दालन हा विषय आहे. कंटकांमध्ये गिऱ्हाइकांना फसविणारे कारागीर व व्यापारी, लाचखाऊ अधिकारी, चोर व दरोडेखोर, खुनी, जारकर्म करणारे इत्यादींचा समावेश केला असून गुन्हे कसे शोधून काढावेत ते सविस्तर सांगितले आहे. प्रकीर्ण स्वरूपाच्या पाचव्या अधिकरणात राजद्रोह्यांचा बंदोबस्त, सरकारी नोकरांचे पगार, सरकारदरबारी नोकरी इत्यादींचे विवेचन आहे.

परराष्ट्रसंबंधाच्या विचारास प्रारंभ राज्याची स्वामी, अमात्य आदी सात अंगे (प्रकृती), आणि विजिगीषू, अरी, मित्र आदी बारा राजांचे राजमंडल यांच्या विवेचनाने केला आहे (सहावे अधिकरण). हे विवेचन परराष्ट्र-संबंधाच्या विचाराला पायाभूत आहे. तो विचार केला आहे षाड्गुण्याच्या सिद्धांताच्या आधारे. संधी (शांतता, सलोखा, तह) व विग्रह (वैर, युद्ध) ह्या मूलभूत दोन परराष्ट्रीय धोरणांची परिस्थितीप्रमाणे होणारी निरनिराळी स्वरूपे विचारात घेऊन हा सहा गुणांचा म्हणजे धोरणांचा सिद्धांत बनविला आहे. ह्या सिद्धांताचे अत्यंत सूक्ष्म विवेचन सातव्या अधिकरणात आहे. राष्ट्रा-राष्ट्रांमधील संभाव्य संबंधांचे अशा प्रकारचे विश्लेषण अन्यत्र कोठे आढळणार नाही. पृथ्वीचा लाभ कसा करून घ्यावा ते सांगणे हे ह्या शास्त्राचे एक उद्दिष्ट आहे. त्याला अनुसरून राजापुढे विजिगीषूचे ध्येय ठेवले आहे. आणि नंतरची अधिकरणे हे दिग्विजयाचे ध्येय लक्षात ठेवूनच रचली आहेत. विजयाच्या मोहिमेवर निघण्यापूर्वी आपले स्वतःचे राज्य सर्व प्रकारच्या आपत्तींपासून मुक्त असणे आवश्यक असल्यामुळे आठव्या अधिकरणात त्यांचा विचार केला आहे. नवव्या अधिकरणात मोहिमेच्या पूर्वतयारीचे वर्णन आहे. दहाव्यात युद्धाविषयी विचार केला आहे. अकराव्यात संघराज्यांना कसे जिंकावे ते

सांगितले आहे. विजिगीषू दुर्बल झाला असता त्याने आत्मसंरक्षण कसे करावे व बलाढ्य शत्रूलाही कसे नामोहरम करावे याचे विवेचन बाराव्या अधिकरणात केले आहे. तेराव्या अधिकरणात शत्रूची राजधानी असलेला किल्ला कसा काबीज करावा ते सांगून जिंकून घेतलेल्या देशात कशा प्रकारची वागणूक तेथील प्रजेला संतुष्ट ठेवील त्याचे दिग्दर्शन केले आहे.

शेवटच्या दोन अधिकरणांपैकी चौदावे अधिकरण ग्रंथाच्या विषयाशी साक्षात संबद्ध नाही. त्यात जारणमारण, जादूटोणा, मंत्रसिद्धी इत्यादी गूढ गोष्टींचे विवरण आहे. हा भाग ह्या ग्रंथाला नंतरच्या काळी जोडण्यात आला असण्याची शंका प्रकट करण्यात आली आहे. परंतु ग्रंथात अनेक ठिकाणी गूढ प्रयोगांचा अवलंब करण्याची शिफारस केली आहे, तेव्हा त्यांचे वर्णन अगदीच अप्रस्तुत वाटण्याचे कारण नाही. शिवाय, राज्ययंत्रणेत पुरोहिताला फार मानाचे स्थान आहे. ह्या शास्त्राचे मूळ प्रवर्तक, शुक्र आणि बृहस्पती, दोघेही मूलतः पुरोहित असल्याचे प्रसिद्ध आहे. आणि पुरोहित अथर्ववेद व तत्संबद्ध गूढ विद्या यांत पारंगत असल्यामुळे ह्या शास्त्रात त्या विद्यांचा समावेश अगदी आकस्मिक म्हणता येणार नाही.

शेवटचे पंधरावे अधिकरण लेखनपद्धतीविषयी आहे. शास्त्रीय ग्रंथ लिहिताना विषयाची मांडणी मुद्देसूद व्हावी यासाठी ज्या युक्त्यांचा अवलंब सामान्यपणे केला जातो त्या युक्त्यांचा येथे निर्देश केला आहे. ह्या युक्त्यांचे असेच निर्देश थोड्याफार फरकाने अन्यत्रही आढळतात. लेखनपद्धतीचे हे असे विश्लेषण ह्याच ग्रंथात प्रथम केले गेले असणे शक्य आहे. तथापि ते अगोदरच झालेले असल्याची व तेथून ते निरनिराळ्या ग्रंथांत उद्धृत केले असल्याची शक्यता नाकारता येणार नाही. अर्थात येथील उदाहरणे ह्या ग्रंथातीलच आहेत आणि ती ग्रंथकारानेच दिली आहेत याविषयी संशय घेण्याचे कारण नाही.

येथवर निर्दिष्ट झाल्याप्रमाणे ह्या ग्रंथात एकूण पंधरा अधिकरणे आहेत. प्रारंभीच्या अनुक्रमणिकेवजा असलेल्या अध्यायात ह्या पंधरा अधिकरणांचा त्या प्रत्येकात समाविष्ट असलेल्या प्रकरणांसह क्रमशः नामनिर्देश केला आहे. ह्या सूचीला प्रकरणाधिकरणसमुद्देश असे नाव दिले आहे. ह्या अध्यायाच्या शेवटी असे म्हटले आहे की शास्त्रात पंधरा अधिकरणे, एकशेऐंशी प्रकरणे, दीडशे अध्याय आणि सहा हजार श्लोक आहेत. ह्या विधानामुळे काही प्रश्न उपस्थित होतात. अधिकरणातील विषयाची विभागणी प्रकरण व अध्याय ह्या दोन्ही प्रकारांनी का केली आहे ? त्यांपैकी एक प्रकार मूळचा व दुसऱ्याची रचना नंतरची असे म्हणता येईल काय ? आणि हा ग्रंथ बहुतांशी गद्यात असता

त्यात सहा हजार श्लोक असल्याचे म्हटले आहे ते कसे काय ? हे समग्र विधानच मूळचे नसण्याची शक्यता आहे काय ? इत्यादी.

दीडशे अध्यायात (वस्तुतः एकशे एकूणपन्नास अध्यायांतच, कारण पहिल्या अनुक्रमणिकेच्या अध्यायात कोणतेही प्रकरण नाही) एकशेऐंशी प्रकरणे समाविष्ट आहेत. अर्थातच काही अध्यायात एकाहून अधिक प्रकरणे आहेत, उदाहरणार्थ, अध्याय २.३३, ७.४, ९.२ इत्यादी. परंतु याउलट असेही आढळते की एका प्रकरणाचे विवेचन एकाहून अधिक अध्यायांत केले आहे. प्रकरणे लहानमोठी असल्यामुळे असे केलेले दिसून येते. सर्वात लहान प्रकरणे एका सूत्रातच आटोपती घेतलेली दिसतात (प्रकरण १०४, १०६, १३१ व १३२). एक प्रकरण (१६७) तर एका सूत्राच्या फक्त अर्ध्या भागात समाविष्ट झालेले दिसते. दोन, तीन, चार इतकीच सूत्रे असलेली अशीही प्रकरणे आहेत (५०, ५१, ५२, १११, १२५ इत्यादी). यांपैकी काही प्रकरणांच्या बाबतीत (१०४, १०६, १११ व १६७) त्यांना स्वतंत्र प्रकरण मानण्याची आवश्यकता मुळीच दिसत नाही. सर्वात मोठी प्रकरणे १७८ (४५ + ८८ सूत्रे) व २९ (११७ सूत्रे) ही आहेत. त्यांपैकी पहिले दोन अध्यायांत विभागले आहे. प्रकरण म्हणजे अधिकरणाचा पोटविभाग असे असल्यामुळे आणि सर्व पोटविभागांतील विषयाच्या विवेचनासाठी सारखाच मजकूर अपेक्षित करणे शक्य नसल्यामुळे प्रकरणे लहानमोठी व्हावीत हे स्वाभाविक आहे. तथापि, काही ठिकाणी (उदा० अध्याय ५.६, ९.३, १२.५) एक प्रकरण कोठे संपते व दुसरे कोठे सुरू होते हेच सांगता येण्यासारखे नाही. ही गोष्ट व एखाददुसऱ्या सूत्रातच स्वतंत्र म्हणून मानलेली प्रकरणे विचारात घेतली की असा ग्रह झाल्याशिवाय रहात नाही की प्रकरणांची एकूण एकशेऐंशी ही संख्या साध्य करण्यासाठी काहीशी ओढाताण करावी लागली आहे. तेव्हा प्रत्येक अधिकरणातील विवेचन ग्रंथकारकृतच असले तरी त्यातील प्रकरणांची विभागणी व त्यांना दिलेली नावे सर्व मूळ ग्रंथकारकृतच आहेत असे निश्चितपणे म्हणता येत नाही. त्यावर मागाहून दुसऱ्या कोणाचा हात फिरला असण्याची शक्यता नाकारता येणार नाही.

विषयाच्या अनुरोधाने ग्रंथाची प्रकरणांत विभागणी स्वाभाविक असली तरी अध्ययनाच्या दृष्टीने अध्यायात विभागणी सोयीची असते. सामान्यतः ग्रंथकार स्वतःच तसे विभाग करतो. आपल्या ग्रंथाचे अध्ययन व्हावे असा मानस शास्त्रीय ग्रंथ लिहिणाऱ्याचा असणारच. परंतु प्रस्तुत ग्रंथातील अध्यायांची विभागणी सर्वत्र स्वाभाविक अशीच झाली असल्याचे प्रत्ययास येत नाही. उदा० अध्याय १.८ चा विषय 'अमात्योत्पत्ति' हा आणि १.९ चा 'मन्त्रिपुरोहितोत्पत्ति' हा आहे. परंतु अमात्यांचा विषय अध्याय १.८ मध्ये संपला नसून

त्याची समाप्ती पुढील अध्यायाच्या आठव्या सूत्रात होते. त्या सूत्रानंतरच्या 'इत्यमात्यकर्म' ह्या शब्दावरून हे स्पष्ट आहे. विशेष म्हणजे नंतरच्या अध्यायात मंत्र्यांविषयी काहीही सांगितलेले नाही. हे दोन्ही अध्याय एक करून त्यात एकच प्रकरण आहे असे मानणे समुचित झाले असते. तसेच अध्याय १.१२ मधील प्रारंभीचा गूढपुरुषोत्पत्तीविषयीचा भाग मागच्या त्या प्रकरणासंबंधीच्या अध्यायात समाविष्ट करून स्वतंत्र मानलेल्या गूढपुरुषप्रणिधि ह्या नंतरच्या प्रकरणासाठी अध्याय १.१२ चा उपयोग करता आला असता. खरोखर पाहता ही दोन प्रकरणे भिन्न नाहीत आणि हे दोन्ही अध्याय एक करणेच अधिक समुचित झाले असते. त्याचप्रमाणे अध्याय १२.२ मधील पहिली सात सूत्रे मागच्या अध्यायातील 'दूतकर्म' ह्या प्रकरणाचा भाग आहेत व त्यांचा त्या अध्यायातच समावेश करणे उचित झाले असते. अध्याय १२.२ चा अवशिष्ट भाग व अध्याय १२.३ ह्यांचा विषय एकच आहे व तो एकाच अध्यायात समाविष्ट करणे योग्य ठरले असते. काही अध्यायांत थोडी घालमेलही झालेली दिसते. अध्याय ७.८ मधील ५–१० ही सूत्रे त्यातील दोन प्रकरणांपैकी एकाशीही संबद्ध नसून अगोदरच्या ७.७ ह्या अध्यायातील विषयाशी निगडित आहेत. सरकारी नोकरांच्या पगाराविषयीच्या ५.३ ह्या अध्यायातील शेवटची बारा सूत्रे त्या विषयाशी मुळीच संबद्ध नाहीत.

सर्व अध्यायांचे वैशिष्टच हे की ते गद्यात असून त्यांचा शेवट एक अथवा अधिक श्लोकांनी केला आहे. बहुतांश श्लोक त्या त्या अध्यायातील विषयाशी संबद्ध, प्रायः समारोपाच्या स्वरूपाचे आहेत. पण यालाही अपवाद आहेत. उदा० अध्याय १.७ च्या शेवटी असलेल्या श्लोकाचा 'इन्द्रियजय' ह्या त्यातील विषयाशी संबंध नसून तो पुढील अध्यायातील 'अमात्योत्पत्ति' ह्या विषयाचा उपन्यास करणारा आहे. त्या अध्यायाच्या प्रारंभीच त्याचा समावेश उचित ठरला असता. पण तसे केले असते तर अगोदरच्या अध्यायाच्या अंती श्लोक न राहिल्यामुळे नियमभंग झाला असता. तसेच अध्याय ८.२ च्या शेवटी असलेला श्लोक वस्तुतः मागच्या ८.१ ह्या अध्यायाच्या विषयाचा समारोप करणारा आहे व त्याचा त्याच अध्यायात समावेश सयुक्तिक ठरला असता. पण तसे केल्याने ८.२ अंतिम श्लोकाशिवाय राहून नियमभंग झाला असता. दोन ठिकाणी (अध्याय ७.३ व ८.५) शेवटच्या श्लोकांत स्वतंत्र प्रकरणेच (प्रकरण १०२ 'हीनसन्धयः' व १३४ 'मित्रव्यसनवर्गः') अंतर्भूत केली आहेत. ह्या प्रकरणांचे स्वतंत्र अध्याय होऊ शकले असते.

तेव्हा अध्यायांत झालेली ही विभागणीही काहीशी कृत्रिम वाटते आणि असा ग्रह होतो की ह्या विभागणीच्या बाबतीत सुद्धा मागाहून दुसऱ्या कोणाचा

हात फिरला असावा. परंतु याचा अर्थ असा नाही की (काही पंडित मानतात त्याप्रमाणे) प्रकरणांत केलेली विभागणी मूळ ग्रंथकारकृत व अध्यायांत केलेली विभागणी ग्रंथावर मागाहून लादण्यात आली आहे. वर सूचित केल्याप्रमाणे मूळ ग्रंथकारालाच अध्यायातील विभागणी अभिप्रेत असल्याचा दाट संभव आहे. मागाहून जर कोणी काही केले असेल तर थोडे इकडचे तिकडे करून काही बदल करणे इतकेच. पण त्यामुळे ग्रंथात सुधारणा झाली आहे असे नसून उलट काहीशी विसंगती अथवा असंबद्धता उत्पन्न झाली आहे. कालाच्या ओघात हे घडून आले असावे.

प्राधान्येकरून गद्यमय असलेल्या ह्या ग्रंथात सहा हजार श्लोक असल्याविषयीचे विधान बुचकळ्यात पाडणारे आहे. प्रत्यक्ष श्लोक असे यात फक्त तीनशे-ऐंशीच्या आसपासच आहेत. बाकी सर्व भाग गद्यात आहे. ह्या विधानाची अशी एक उपपत्ती लावणे शक्य आहे की श्लोक म्हणजे बत्तीस अक्षरांचा गट याप्रमाणे मोजण्याची एक जुनी पद्धत आहे तिला अनुसरून हा हिशोब केला आहे. परंतु त्या पद्धतीने मोजून सुद्धा ह्या ग्रंथातील श्लोकसंख्या चार हजार आठशेच्या आसपासच भरते. शिवाय, ग्रंथकार स्वतः याप्रमाणे हिशोब करून आपल्या ग्रंथाचा विस्तार किती ते सांगेल – विशेषतः त्यात पुष्कळच प्रत्यक्ष श्लोक विद्यमान असता – अशी शक्यता फार कमी. त्यामुळे हे विधान मूळ ग्रंथकाराने केलेले नसण्याचा फार संभव आहे. यासंबंधात हे लक्षात घेतले पाहिजे की मल्याळी भाषेतील ह्या ग्रंथावरील प्राचीन टीकेत हे विधान असलेले सूत्र (१.१.१८) व त्याच्यानंतरच्या कौटिल्याने हे शास्त्र केले असे सांगणारा श्लोक ह्या दोहोंचा निर्देश नाही. त्यामुळे हे दोन्ही मूळ ग्रंथकारकृत नसावेत ही शंका बळावते.

यासंबंधात असा एक विचार मांडण्यात आला आहे की हा ग्रंथ मूलतः पद्यात होता आणि नंतर त्याचे गद्यात रूपांतर करण्यात आले. पण प्रश्न असा उपस्थित होतो की हे रूपांतर कोणी केले असावे आणि ते करण्यात त्याचा उद्देश काय असावा ? मूळ ग्रंथकारानेच आपल्या पद्यमय ग्रंथाचे गद्यात रूपांतर केले असे समजणे सयुक्तिक होणार नाही. पद्यमय ग्रंथच ग्रहण करण्यास आणि पाठांतर करण्यास अधिक सुलभ असतो. तेव्हा तो बदलून त्याला गद्यमय स्वरूप देण्याचे सहसा कोणाच्या मनात येणार नाही, मूळ ग्रंथकाराच्या तर मुळीच नाही. असे करण्यात एकच उद्देश असण्याचा संभव आहे, मूळ ग्रंथाचा संक्षेप करणे हा. परंतु प्रस्तुत ग्रंथ संक्षेपाच्या स्वरूपाचा आहे असे समजणे सर्वथा अशक्य आहे. यातील प्रत्येक विषयाचे विवेचन इतक्या विस्तृतपणे केलेले आढळते की त्या बाबतीत आणखी काही सांगायचे राहिले असेल अशी कल्पना करणे सुद्धा कठीण

आहे. आणि जर सबंध ग्रंथाचे गद्यात रूपांतर करायचे ठरविले असेल तर मुळातील जवळजवळ पावणेचारशे श्लोक – ज्यांत दोन संपूर्ण प्रकरणांचाही समावेश आहे – तसेच का राहू दिले आहेत ? तेव्हा हा विचार पटण्यासारखा नाही.

तथापि, हाच ग्रंथ मूळ पद्यात होता हे मत स्वीकारता येण्यासारखे नसले तरी ज्या प्राचीन ग्रंथांच्या आधारे ह्या ग्रंथाची रचना करण्यात आली आहे ते पद्यमय असण्याचा दाट संभव आहे. हा ग्रंथ मौलिक असल्याचा म्हणजे अगदी स्वतंत्रपणे निर्मिला गेला असल्याचा त्याचा दावा नाही. प्रारंभीच असे म्हटले आहे की पूर्वीच्या आचार्यांनी जेवढी अर्थशास्त्रे प्रस्थापित केली होती त्या बहुतेकांचा संग्रह करून अर्थशास्त्रविषयक हा एक ग्रंथ रचण्यात आला आहे. (१.१.१). तेव्हा ह्या ग्रंथाला आधारभूत असलेल्या ग्रंथांच्या विद्यमानतेविषयी संशय घेण्याचे कारण नाही. हे ग्रंथ प्रधानतया श्लोकबद्ध असावेत असे मानण्यास हरकत नाही. धर्मशास्त्र व अर्थशास्त्र यांतील अगदी प्राचीन नियम, मुखोद्गत करण्यास व स्मरणात ठेवण्यास सुलभ म्हणून, श्लोकबद्ध केलेले असावेत हे सामान्यत: मान्य झाले आहे. आपस्तम्बबौधायनादींच्या धर्मसूत्र ग्रंथांत त्यांच्याहून प्राचीन आचार्यांचे अनेक श्लोक उद्धृत झालेले आढळतात. अर्थशास्त्राच्या अथवा दंडनीतीच्या संबंधात महाभारतात बृहस्पती व उशनस ह्या दोन शास्त्रप्रवर्तकांच्या ग्रंथांतून उद्धृत झालेले काही श्लोक अथवा गाथा आढळतात. तेव्हा प्रस्तुत ग्रंथाच्या रचनेला सहाय्यभूत झालेले अर्थशास्त्रावरील प्राचीन ग्रंथ पद्यात असण्याची शक्यता नाकारता येणार नाही. आणि त्या ग्रंथांतील पद्याचे गद्यात रूपांतर करून रचलेला असा हा ग्रंथ असावा हे मान्य करण्यास प्रत्यवाय असू नये.

ह्या निष्कर्षाला पोषक अशी काही चिन्हे ह्या ग्रंथात आहेत. अध्याय ४.१२ मधील शेवटच्या दोन गद्य सूत्रांत (३६–३७) संकटातून सोडविलेल्या स्त्रीचा उपभोग घेण्याविषयी नियम दिला आहे. त्यानंतर अध्यायाचा शेवट करणाऱ्या ३८–४० ह्या तीन श्लोकांत ह्याच नियमाची थोड्याफार फरकाने पुनरुक्ती झालेली आढळते. यात संदेह नाही की ह्या दोन अंशांपैकी एक दुसऱ्याचे रूपांतर करून तयार केला आहे. आणि पद्यातील अंशांचे गद्यात रूपांतर झाले आहे हा पर्यायच अधिक संभाव्य आहे. रूपांतरित झाल्यावरही हा पद्यमय अंश अध्यायाचा अंत दर्शविण्यासाठी आवश्यक म्हणून राहू दिला आहे. जर गद्य मूळचे असे मानले तर त्याचे पद्यात रूपांतर झाल्यानंतर तो अंश का राहू दिला आहे याची नीट उपपत्ती लागणार नाही. असाच प्रकार १४.२.२७ हे गद्य सूत्र व त्यानंतरचे २८–२९ ह्या श्लोकांच्या बाबतीतही आढळतो. वर म्हटल्याप्रमाणे

१०२ व १३४ ही दोन प्रकरणे संपूर्णपणे पद्यात आहेत. ती आधारभूत ग्रंथात जशी आढळली तशीच उद्धृत केली आहेत असे समजले पाहिजे. अन्यथा ते पद्यात का असावेत याचे समाधानकारक उत्तर देता येणार नाही. अध्यायाच्या मध्येच असलेले श्लोक (उदाहरणार्थ, प्रजाजनांच्या अपरक्ततेची कारणे सांगणारे ७.५.१९–२७ हे श्लोक) मुळातून तसेच उद्धृत केले आहेत यात शंका नाही. ७.१३.२४–२५, ३७–४२; ७.१८.३१–४२ इत्यादी इतर श्लोकांबद्दलही तसेच म्हणता येईल.

ग्रंथात सहा हजार श्लोक आहेत ह्या विधानाची दुसऱ्या एका प्रकारे उपपत्ती लावण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे. बत्तीस अक्षरे म्हणजे एक श्लोक ह्या हिशोबाने विद्यमान ग्रंथात अठेचाळीसशे श्लोक भरतात, त्यावरून असे अनुमान केले आहे की प्रस्तुत विस्ताराच्या एकचतुर्थांशाइतका (बाराशे श्लोक भरतील एवढा) ग्रंथ कालाच्या ओघात गहाळ झाला आहे. त्या अंशातील शिकवण नंतरच्या परिस्थितीत गैरलागू झाल्याकारणाने हे घडले असे याचे कारण देण्यात आले आहे. परंतु हे मत स्वीकार्य मानणे सर्वथा अशक्य आहे. हा ग्रंथ आहे त्याच स्थितीत परिपूर्ण असल्याचा इतका दृढ प्रत्यय येतो की त्यातून इतक्या मोठ्या प्रमाणात गळती झाली असेल अशी कल्पनासुद्धा करणे शक्य नाही. तेव्हा सहा हजार श्लोकांविषयीच्या विधानाची नीट उपपत्ती लागत नाही हे मान्य केलेच पाहिजे.

वर सूचित झाले आहे त्याप्रमाणे पहिल्या अध्यायातील शेवटचा अंश मूळ ग्रंथकारकृत नसावा. त्यासारखे इतरत्रही काही अंश प्रक्षिप्त आहेत असे मानता येण्यासारखे आहे. उदाहरणार्थ ३.७.२९, ३८; ३.१९.८–१०; ४.८.२७–२८; १०.३.२७–३२; ७.६.१४–१५; ७.९.३७–४९ इत्यादी. ह्या व इतर ठिकाणी टीपांमध्ये प्रक्षेपाविषयीची शंका प्रकट केली आहे. पुष्कळदा असे होते की हस्तलिखिताचे अध्ययन करणाऱ्या पंडिताला ग्रंथातील विधानाला एखादी पुस्ती जोडावीशी वाटते. ती तो मार्जिनमध्ये किंवा दोन ओळींमधील जागेत लिहितो. कित्येकदा अशी पुस्ती दुसऱ्या एखाद्या ग्रंथावरून सुचलेली असते. नंतर त्या हस्तलिखितावरून दुसरे हस्तलिखित तयार करताना ह्या पुस्तीवजा असलेल्या टीपा मूळ ग्रंथाचाच भाग असे समजून त्यात समाविष्ट केल्या जातात. प्रस्तुत ग्रंथात असे प्रक्षिप्त अंश आहेत यात शंका नाही. परंतु ग्रंथाच्या एकूण विस्ताराच्या मानाने हे प्रक्षेप अगदी अल्प आहेत, आणि त्यांमुळे ग्रंथाच्या एकंदर स्वरूपाला काही हानी पोचत नाही.

शेवटच्या पंधराव्या अधिकरणाच्या समाप्तीनंतर आर्यावृत्तात असलेला एक श्लोक आढळतो. त्यात असे म्हटले आहे की सूत्रांवर भाष्य करताना

भाष्यकारांमध्ये बराच परस्परविरोध होत असल्याचे पाहून विष्णुगुप्ताने स्वतःच सूत्र व भाष्य यांची रचना केली. परंतु प्रस्तुत ग्रंथात सूत्र व त्यावरील भाष्य दोन्ही अंतर्भूत आहेत हा विचार यथार्थ मानणे मुळीच शक्य नाही. सर्व टीकाकार असे मानीत आले आहेत की अध्यायात ज्या विषयांचे विवेचन आहे त्याचा निर्देश करणारे वचन म्हणजे सूत्र आणि अध्यायातील मजकूर म्हणजे त्या सूत्रावरील भाष्य. परंतु ही कल्पना सर्वस्वी अग्राह्य आहे. विषयाचा निर्देश करणारे वचन म्हणजे केवळ प्रकरणाचे नाव होय. तेव्हा ही एकशेऐंशी प्रकरणांची नावे एवढाच ह्या ग्रंथातील सूत्ररूप भाग आणि बाकी सर्व त्या एकशेऐंशी सूत्रावरील भाष्य असे केव्हाही समजता येण्यासारखे नाही. वस्तुस्थिती अशी आहे की समग्र ग्रंथ फक्त सूत्रमय शैलीत लिहिला आहे. त्यात भाष्य कोठेच नाही. त्या श्लोकावर विश्वसून या ग्रंथातील सूत्रभाग भाष्यापासून अलग करण्याचे प्रयत्न सर्व व्यर्थ होत. यातील सूत्रे भाष्याशिवाय ज्यांचा अर्थबोध होणे कठीण अथवा अशक्यप्राय असते अशा पाणिनीच्या किंवा दर्शनकारांच्या ग्रंथांतील सूत्रांसारखी नसून प्राचीन श्रौतसूत्रे व धर्मसूत्रे यातील सूत्रांसारखी आहेत. ती संपूर्ण वाक्यांच्या स्वरूपाची असून अन्वयास सुगम आहेत. काटकसर करण्यासाठी शब्द गाळलेले नसल्यामुळे ते अध्याहृत धरण्याचा क्वचितच प्रसंग येतो. काही ठिकाणी जी दुर्बोधता वाटते ती सूत्रशैलीच्या कठिणतेमुळे नसून पाठाची अशुद्धता, अनेक पारिभाषिक व अपरिचित शब्दांचा उपयोग, विषयाची अपूर्वता इत्यादी कारणांमुळे उत्पन्न झालेली अशा स्वरूपाची आहे.

ह्या ग्रंथात भिन्न भिन्न लेखनशैली आढळतात आणि म्हणून तो एकाच ग्रंथकाराने रचलेला नाही हे दाखविण्याचे अनेक प्रयत्न झाले आहेत. ह्यातील श्लोकांची भाषा साधी व रचना सोपी आणि त्या मानाने गद्याची भाषा प्रौढ व रचना काहीशी क्लिष्ट असे सांगण्यात येते. पण यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही. अनुष्टुभ श्लोकाचे स्वरूपच असे आहे की त्यातील रचना सुटसुटीत व सोपी अशी वाटावी. विषयाच्या अनुरोधाने गद्यात दीर्घ समास व मोठी वाक्ये यांची योजना करणाऱ्या लेखकाला अनुष्टुभ छंदात सोपी रचना करताच येणार नाही असे समजण्याचे कारण नाही. शिवाय, यांपैकी पुष्कळसे श्लोक प्राचीन ग्रंथांतून जसेच्या तसेच उद्धृत केले असण्याचा संभव आहे. अलीकडे कॉम्प्युटरच्या साहाय्याने ग्रंथात भिन्न भिन्न शैली व तदनुसार भिन्न भिन्न लेखकांच्या कृती आहेत असे दाखविण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे (ट्राउटमन). परंतु तो यशस्वी झाला आहे असे म्हणता येण्यासारखे नाही. काही वाक्प्रचारांचा कमी-अधिक उपयोग व समासांची कमीअधिक लांबी ह्या कसोट्यांचा ह्या कामी विशेष उपयोग होत नाही हे मान्य करून अंततः 'एव', 'च' आणि 'वा' ह्या

तीन अव्ययांच्या कमीअधिक वापरावर सर्व भिस्त ठेवली आहे असे दिसते. परंतु ह्या अव्ययांचा वापर विवेचन करावयाच्या विषयाशी इतका निगडित आहे की त्यावरून लेखनशैलीच्या भिन्नतेचे अनुमान करणे सयुक्तिक ठरणार नाही. ह्या संबंधात हे लक्षात घेतले पाहिजे की प्रस्तुत ग्रंथात मागे विवेचन होऊन गेलेल्या व पुढे विवेचन होणार असलेल्या विषयांचे निर्देश 'मागे अमुक ठिकाणी सांगितले आहे अथवा सांगितल्याप्रमाणे', 'पुढे आम्ही अमुक ठिकाणी सांगणार आहोत किंवा पुढे सांगणार आहोत त्याप्रमाणे' अशा स्वरूपात आढळतात. प्राय: सर्व अधिकरणांत असे निर्देश आढळतात. आणि पुढचे व मागचे हे सर्व निर्देश विनचूक केलेले आहेत असे दिसून येते. यावरून असे अनुमान करावयास काहीच हरकत नाही की आहे या स्वरूपात हा ग्रंथ एकाच लेखकाच्या हातून तयार झाला आहे.

ह्या ग्रंथाच्या भाषेत काही आर्ष प्रयोग आहेत. एक पुष्कळ ठिकाणी आढळणारा प्रयोग म्हणजे उपसर्ग असलेल्या क्रियापदाचे त्वा प्रत्यय लावून केलेले ल्यवन्त रूप, अपकारयित्वा (१३.३.१६), आदीपयित्वा (५.१.४५), प्रलोभयित्वा (१५.२.५९), इत्यादी. 'रज्ज्वा' ऐवजी 'रज्जुना' (४.७.२६), 'वर्षारात्रिम्' ऐवजी 'वर्षारात्रम्' (४.३.६), 'उद्वेजनीय' (१.४.८), 'उद्धर्षणीय' (१०.३.४७) ही कर्तरी अर्थी वापरलेली विशेषणे असे आणखी थोडे प्रयोग आहेत. परंतु यातील भाषेची विशेष लक्षात येण्यासारखी गोष्ट म्हणजे त्यातील अनुपम शब्दभांडार. साहजिकच यात असंख्य पारिभाषिक शब्दांचा उपयोग आवश्यक झाला आहे. परंतु त्याव्यतिरिक्त दुसरे पुष्कळ असे शब्द वापरले आहेत की जे दुसरीकडे आढळत नाहीत अथवा येथे, ज्या अर्थात त्यांचा उपयोग केला आहे त्या अर्थात ते अन्यत्र अपरिचित आहेत. उदाहरणादाखल अशा काही शब्दांचा येथे निर्देश करावयास हरकत नाही. 'अनर्थ्य' अनर्थकारक मनुष्य, 'अपरुद्ध' राजाची गैरमर्जी झालेला राजपुत्र, 'अपसार' निर्दोषीपणा सिद्ध करण्यास साधनीभूत होणारा मनुष्य, किंवा संकटसमयी जेथे आश्रय घेता येईल असे ठिकाण, 'अय' सुदैव, 'अनय' दुर्दैव, 'अवस्था' जामिनकी, हमी, 'आटविक' रानटी टोळीचा मुख्य, 'आवन्ध्य' अलंकार, दागदागीने, 'उपलिङ्गन' चिन्ह, खूण, 'चक्रयुक्त' खटारा, गाडी, 'तत्कुलीन' गादीवर हक्क सांगणारा राजकुलातील पुरुष, 'दुर्भगा' नावडती पत्नी, 'प्रकर्म' कुमारीला भ्रष्ट करणे, 'प्रहवण' उत्सव, समारंभ, 'भर्मण्या' स्वतंत्र रहाणाऱ्या पत्नीला द्यावयाची पोटगी, 'माणव' दरोडेखोर, गुन्हेगार, 'रूपाजीवा' वेश्या, 'विवीत' कुरण, गायरान, 'वीवध' सैन्याला पोचवावयाची रसद, 'संयान' समुद्रातील वाहतूक, 'संवदन' ('संवनन') वशीकरण,

'स्थाप्या' विवाहसमयी स्त्रीच्या नावे बाजूस काढून ठेवलेली रक्कम, इत्यादी. पुढील धातूंचे अर्थही फारसे उपलब्ध नाहीत. 'अत्याहारय्' पैसे उकळणे, लुबाडणे, 'उत्कोटय्' व्यंग उत्पन्न करणे, 'निष्कस्' घरातून बाहेर पडणे, घर सोडून निघून जाणे, 'निष्पत्' पळून जाणे, बेपत्ता होणे, 'प्रत्यादिश्' कळविणे, माहिती देणे, 'श्रु' साक्षिदार होणे, इत्यादी. काही शब्दांची रूपे प्राकृत भाषेवरून आलेली दिसतात : 'तुट' सर्वात लहान कालविभाग, 'पष्ठौही' प्रथमच गाभण राहिलेली गाय, 'समिद्धयोग' समृद्धी मिळविण्याचे गूढ प्रयोग, 'मक्कुण' सुळे नसलेला हत्ती. काही देशी शब्दही आढळतात. 'चेल्ल' वस्त्र, 'लेण्ड' ('लण्ड') विष्ठा, 'कण्डोलिका' करंडी, 'विक्क' हत्तीचे पिल्लू, 'पोट्टलिक' पिशवी, इत्यादी.

हे खरे आहे की काही शब्दांच्या व वाक्प्रचारांच्या निश्चित अर्थाविषयी खात्री देता येत नाही. आणि अनेक पंडितांनी केलेल्या प्रयासानंतरही पुष्कळ ठिकाणी ग्रंथ अगदी अचूक समजला आहे असे म्हणता येण्यासारखे नाही. पण हे मान्य करूनही ग्रंथाची लेखनशैली क्लिष्ट नाही असे म्हणावयास हरकत नाही. ग्रंथ कठीण वाटतो तो लेखनशैलीच्या क्लिष्टतेमुळे नसून त्यातील विषयाच्या अपरिचिततेमुळे आणि काही शब्द व त्यांचे अर्थ प्रचारातून गेल्यामुळे. हे लक्षात ठेवल्यास लेखसंपद् म्हणून या ग्रंथातच ज्या अर्थक्रम, संबंध, परिपूर्णता, माधुर्य, औदार्य व स्पष्टत्व ह्या गुणांचा निर्देश केला आहे (२.१०.६–१२) ते लेखनाचे गुण प्रस्तुत ग्रंथातही विद्यमान आहेत हे मान्य करण्यास अडचण पडू नये. तसेच तो व्याघात, पुनरुक्त, अपशब्द या निर्दिष्ट केलेल्या (२.१० ५९–६१) लेखदोषांपासून मुक्त आहे हे सुद्धा पटावे.

**ग्रंथाचे मूलस्रोत**

ह्या ग्रंथाच्या प्रारंभीच त्याची रचना मुख्यत्वेकरून प्राचीन आचार्यांच्या ग्रंथांच्या आधारे केली असल्याचे म्हटले आहे (१.१.१). हे विधान वस्तुस्थितीचे निदर्शक आहे असे समजण्यास काही हरकत नाही. ग्रंथात जागजागी प्राचीन आचार्यांच्या मतांचा उल्लेख केला आहे. ह्या आचार्यांचा निर्देश तीन प्रकारे केला आहे. काही ठिकाणी बार्हस्पत्य, औशनस, मानव, पाराशर व आम्भीय ह्या अर्थशास्त्रीय शाखांत प्रचलित असलेली मते उद्धृत केली आहेत. इतर काही ठिकाणी भारद्वाज, विशालाक्ष, पिशुन, कौणपदन्त, बाहुदन्तीपुत्र व वातव्याधि ह्या आचार्यांचा नामनिर्देश करून त्यांच्या मतांचा उल्लेख केला आहे. परंतु बहुसंख्य ठिकाणीं 'आचार्याः' असा सामान्य स्वरूपातच निर्देश केलेला आढळतो.

अर्थशास्त्राच्या अध्ययनाला वाहिलेल्या बार्हस्पत्यादी शाखा प्राचीन काळी अस्तित्वात होत्या व त्या त्या शाखांची निरनिराळी शास्त्रे होती याविषयी शंका घेण्याचे कारण नाही. महाभारतात बार्हस्पत्य, औशनस व मानव यांच्या शास्त्रांचा निर्देश आहे इतकेच नाही तर त्यांतून उद्धृत केलेले श्लोक अथवा गाथाही आढळतात. याव्यतिरिक्त महाभारतात वैशालाक्ष (विशालाक्षाने रचलेले) आणि बाहुदन्तक (बाहुदन्तीपुत्राने म्हणजे इंद्राने रचलेले) ह्या इतर दोन शास्त्रांचाही निर्देश आहे. दुसऱ्या एके ठिकाणी महाभारतात राजशास्त्राचे प्रणेते म्हणून बृहस्पति, विशालाक्ष (म्हणजे शिव), काव्य (म्हणजे उशनस्), महेन्द्र (इंद्र), प्राचेतस मनु, भरद्वाज (भारद्वाज) आणि गौरशिरस् ह्या सात-जणांचा निर्देश केला आहे. तेव्हा प्राचीन काळी ह्या शास्त्रावर बरेच विचार-मंथन झाले होते व त्यावर अनेकांनी ग्रंथरचना केली होती हे मान्य केले पाहिजे. आणि ह्या ग्रंथांचे अस्तित्व मान्य केले म्हणजे प्रस्तुत ग्रंथातील नामनिर्देशपूर्वक उद्धृत केलेली मते त्या त्या प्राचीन ग्रंथांतून घेतली आहेत असे समजण्यास काही हरकत नाही.

ह्या प्राचीन शास्त्रकारांची काही बाबतीत भिन्न भिन्न मते असावीत हे स्वाभाविक होते. त्या मतभिन्नतेचे पडसाद प्रस्तुत ग्रंथात उमटले आहेत असा निष्कर्ष काढणे अयोग्य होणार नाही. त्या प्राचीन ग्रंथांपैकी सध्या एकही उपलब्ध नाही. तेव्हा त्यात खरोखरच ही मते मांडली गेली होती की नाही हे पडताळून पाहूता येण्यासारखे नाही. परंतु ही मते त्यात मांडली गेली नव्हती असे समजले तर प्रस्तुत ग्रंथकाराने ती स्वतःच कल्पून त्या प्राचीन आचार्यांच्या तोंडी घातली आहेत असे मानावे लागेल. असे त्याने का करावे याचे संभाव्य कारण विषयाचा रुक्षपणा घालवून त्यात थोडी मनोरंजकता आणणे हे सांगता येण्यासारखे आहे. परंतु अनेक ठिकाणी हे किंवा दुसरे एखादे कारण समर्पक वाटेलच असे नाही. शिवाय, प्रस्तुत ग्रंथात इतरत्र क्वचित परस्परांशी सुसंगत नसलेले विचारही मांडलेले आढळतात. उदाहरणार्थ अध्याय ३.१ च्या शेवटी असलेल्या श्लोकां-मध्ये दोन भिन्न परिभाषांचा उपयोग झालेला दिसतो. श्लोक ३९–४० मध्ये धर्म, व्यवहार, चरित्र व राजशासन ह्या संज्ञा वापरल्या आहेत, तर ४३–४५ मध्ये चरित्र ऐवजी संस्था आणि राजशासन ऐवजी न्याय हे शब्द वापरले आहेत आणि धर्म शब्दही भिन्न अर्थाने वापरला आहे. ह्याची उपपत्ती हे दोन श्लोकसमूह दोन भिन्न भिन्न ग्रंथांवर आधारित आहेत असे समजण्याने सहजगत्या लागू शकते. विशेषतः ह्या दोन गटांच्या मध्ये असलेले ४१–४२ हे दोन श्लोक, तेथील संदर्भात सर्वथैव असंबद्ध असल्यामुळे हे सर्व श्लोक निरनिराळ्या ठिकाणांवरून घेण्यात आले असावेत हा संशय दृढ होतो. असेच संज्ञाभिन्नतेचे

उदाहरण सूत्र १.१२.६ मधील तीर्थांची (म्हणजे राज्यातील मोठमोठ्या अधिकाऱ्यांची) यादी, आणि ५.३.३–७ ह्या सूत्रात पगारांच्या संबंधात त्यांचा केलेला निर्देश हे दाखवता येईल. अगोदरच्या यादीतील दण्डपाल व दुर्गपाल यांचा पगारांच्या संबंधात उल्लेख नाही, तर ज्याच्या पगाराची सोय केली आहे त्या राष्ट्रपालाचा तीर्थांच्यां यादीत समावेश नाही. विशेष म्हणजे ह्या दोन ठिकाणी अशा काही अधिकाऱ्यांची नावे – पौरव्यावहारिक, कार्मान्तिक, दण्डपाल – आहेत की ज्यांचा निर्देश ग्रंथात अन्यत्र कोठे नाही. याउलट ग्रंथात ज्यांच्या कार्याचे सविस्तर विवेचन केले आहे त्या धर्मस्थ व नागरिक ह्या दोन अधिकाऱ्यांचा या दोन्ही ठिकाणी नामनिर्देश नाही. आहे ह्या स्थितीत धर्मस्थ व नागरिक यांच्या पगारांचीं काहीच सोय नाही. पौरव्यावहारिक म्हणजेच नागरिक व अंशतः धर्मस्थ सुद्धा असे समजता येईल कदाचित. पण येथे भिन्न भिन्न, संज्ञा वापरण्यात आल्या आहेत हे स्पष्ट आहे. आणि ह्या भिन्नतेचा उगम आधारभूत ग्रंथांच्या भिन्नतेत आहे असे समजणे चुकीचे होणार नाही.

तेव्हा प्रस्तुत ग्रंथ निरनिराळ्या प्राचीन ग्रंथांच्या आधारे रचण्यात आला आहे हे निःसंशय. म्हणून भारद्वाज, विशालाक्ष आदींची मते जेथे (उदाहरणार्थ अध्याय १.८, १.१७, इत्यादी ठिकाणी) थोड्या विस्ताराने निर्दिष्ट केली आहेत तेथे ती त्यांच्या नावे प्रसिद्ध असलेल्या ग्रंथांतून उद्धृत केली आहेत असे समजण्यास हरकत नाही. ह्या मतांचा उल्लेख करण्याची एक पद्धत अशी की अगोदर ज्या आचार्याच्या मताचा उल्लेख केलेला असतो त्याचे खंडन करून नंतरचा आचार्य आपले स्वतःचे मत प्रस्तुत करतो. अध्याय १.८, १.१५ व १.१७ मध्ये ह्या पद्धतीचा अवलंब केला आहे. ह्या सर्व ठिकाणी सरतेशेवटी कौटिल्याने आपले स्वतःचे मत मांडले आहे. अध्याय ८.१ व ८.३ ह्यांमध्ये थोडी निराळी पद्धत अवलंबिली आहे. ह्या ठिकाणी प्रत्येक आचार्याचे मत उद्धृत केल्यावर कौटिल्याच्या शब्दांत त्या प्रत्येक मताचे खंडन केले आहे. ह्या सर्व अध्यायांत ह्या आचार्यांचा भारद्वाज, विशालाक्ष, पाराशर, पिशुन, कौणपदन्त, वातव्याधि, बाहुदन्तीपुत्र असाच क्रम आढळतो. आणि ज्याअर्थी नंतरचा आचार्य त्याच्या अगोदरच्या आचार्याच्या मताचे खंडन करीत असलेला दिसतो त्याअर्थी हा क्रम कालक्रमाने लावलेला आहे असे अनुमान होते. तथापि, हे अनुमान स्वीकारले तर अध्याय ८.१ व ८.३ यांतील विवेचनात थोडी कृत्रिमता भासल्याशिवाय रहात नाही. ८.१ मध्ये सात प्रकृतींवरील संकटांचा तुलनात्मक दृष्टीने विचार केला आहे. त्यात वातव्याधिपर्यंतच्या सहा आचार्यांनी क्रमशः नंतरच्या प्रकृतीचे संकट तत्पूर्वीच्या प्रकृतीवरील संकटापेक्षा अधिक गंभीर मानले असल्याचे म्हटले आहे.त्याचप्रमाणे अध्याय ८.३ मध्ये व्यसनांच्या

गांभीर्याचा तौलनिक विचार करताना ह्याच आचार्यांची मते ह्याच क्रमाने मांडली आहेत. आचार्यांचा कालक्रम आणि प्रकृती व व्यसने यांच्या गंभीरते-बाबतच्या आक्षेपांचा क्रम एकच असावा ही थोडी आश्चर्य करण्यासारखीच गोष्ट म्हणावी लागेल.

याहून अधिक आश्चर्यकारक गोष्ट अध्याय ५.६ मध्ये आढळते. तेथे पहिल्या बावीस सूत्रांत राजा मरणोन्मुख झाला असता मुख्य अमात्याने काय काय खबरदारी घ्यावी ते सविस्तर सांगून तेविसाव्या सूत्रात 'याप्रमाणे अमात्याने राजकुलातील सत्तेचे सातत्य टिकवून ठेवावे' हा विचार कौटिल्याचा म्हणून मांडला आहे. त्यावर भारद्वाजाने आक्षेप घेतलेला दाखवून त्याच्या अशा मताचा उल्लेख केला आहे की अमात्याने स्वतःच राज्य बळकावावे, आलेली ही संधी हातची जाऊ देऊ नये (सूत्रे २४–३१). त्यानंतरच्या बत्तिसाव्या सूत्रात कौटिल्याच्या शब्दांत ह्या मतावर आक्षेप घेऊन असे म्हटले आहे की हे धर्माला सोडून होईल, त्याने प्रजाजनांत क्षोभ उत्पन्न होईल आणि राज्य बळकावण्यात यश हमखास मिळेलच याची खात्री नाही. येथे प्रश्न असा उपस्थित होतो की, भारद्वाज हा आचार्य कौटिल्याच्या बऱ्याच पूर्वी होऊन गेला असता त्याने कौटिल्याच्या विधानावर आक्षेप घेतलेला दाखविला आहे हे कसे? ते कौटिल्याचे विधान 'एवम्' ने सुरू होते, त्यावर भारद्वाजाने 'नैवम्' ह्या शब्दांत घेतलेला आक्षेप स्पष्ट आहे. ह्या विसंगतीची उपपत्ती अशी लावणे शक्य आहे की पहिल्या बावीस सूत्रांत सविस्तर मांडलेले मत इतर प्राचीन आचार्यांचे असून भारद्वाजाने आक्षेप घेतला आहे तो त्या प्राचीन मतावर घेतला आहे. कौटिल्य त्या मताशी सहमत असून त्याने ते विस्तृतपणे उद्धृत केले असले तरी त्याचे स्वतःचे असे वचन फक्त तेविसाव्या सूत्रात आहे. 'नैवम्' ने 'एवम्' वर प्रत्यक्ष आक्षेप घेतल्या-सारखा दिसत असला तरी भारद्वाजाचे वचन पूर्वीच्या सूत्रांत अभिव्यक्त झालेल्या मताला अनुलक्षून आहे असे समजणे शक्य आहे.

बहुसंख्य ठिकाणी प्राचीन आचार्यांची मते उद्धृत करताना त्यांचा निर्देश केवळ 'आचार्याः' ह्या सर्वसाधारण अभिधानाने केला आहे. त्यांपैकी दोनतीन अपवाद वगळता आचार्यांच्या मतांचा उल्लेख ती खोडून काढण्याच्या उद्देशानेच केलेला आढळतो. अध्याय ८.१ मध्ये सात प्रकृतींवरील संकटांच्या तारतम्यते-विषयीचे आचार्यांचे मत कौटिल्याला मान्य आहे इतकेच नाही तर त्या मतावर भारद्वाजादी आचार्यांनी व्यक्तिशः घेतलेल्या आक्षेपांचे खंडन करून कौटिल्याने सर्वसाधारण आचार्यांच्या मतांचे समर्थन केले आहे. तसेच ७.१.२–५ मध्ये षाड्‌गुण्याविषयीच्या आचार्यांच्या मतांचा उल्लेख केल्यावर वातव्याधि ह्या

आचार्याचे भिन्न मत निर्दिष्ट केले आहे, त्या मताचा स्वीकार न करता कौटिल्याने सर्वसाधारण आचार्यांच्या मताचे समर्थन केले आहे. ३.१७.६–१० मध्ये विविध प्रकारच्या साहसाच्या अपराधांबद्दल दंड आचार्यांच्या शब्दांत सांगितले आहेत. त्यावर कौटिल्याची काही प्रतिक्रिया नाही यावरून त्याला ते मान्य आहेत हे उघड आहे. इतकेच काय, ह्या ठिकाणी सांगितलेल्या प्रथम, मध्यम व उत्तम साहसदंडांचा ग्रंथात सर्वत्र उपयोग केला आहे. हे अपवाद सोडले तर इतर सर्व ठिकाणी कौटिल्य आचार्यांच्या मताचे खंडन करीत असलेला दिसतो. ही सर्व मते खरोखरच प्राचीन आचार्यांच्या ग्रंथांतून उद्धृत केली आहेत याविषयी संशय उत्पन्न होणे साहजिक आहे. विशेषत: अध्याय ७.९, ७.११ व ८.४ यांमधील आचार्यांची मते मुख्यत: खंडन करण्याच्या उद्देशानेच प्रस्तुत केली आहेत असा ग्रह होतो. परंतु ह्या व इतर काही ठिकाणची कृत्रिमता मान्य करूनही ही सर्व प्राचीन मते कौटिल्यानेच स्वत:च्या कल्पनेने निर्माण केली आहेत हा विचार ग्राह्य मानणे कठीण आहे. ह्या ग्रंथाचे परावलंबित्व इतके उघड आहे की ह्या शास्त्रावरील प्राचीन ग्रंथांचे अस्तित्व नाकारणे शक्य नाही; आणि त्यांचे अस्तित्व मान्य केले म्हणजे येथील उतारे त्या ग्रंथातून घेतले आहेत असे समजण्याच्या मार्गात विशेष अडचण येणार नाही. फार तर असे समजता येईल की यांपैकी काही उतारे मूळ ग्रंथातून शब्दश: उद्धृत केलेले नसून ग्रंथकाराने त्यांतील मते स्वत:च्या शब्दांत प्रस्तुत केली आहेत.

वर एके ठिकाणी असा विचार मांडला आहे की ज्या प्राचीन ग्रंथांवरून प्रस्तुत ग्रंथाची रचना करण्यात आली ते मूळ ग्रंथ पद्यात असावेत. त्यासंबंधात पुढील गोष्टीचाही निर्देश करता येईल. प्राचीन आचार्यांची जी मते उद्धृत केली आहेत त्यांत चार ठिकाणी (१.८.९ पाराशर, १.१५.१७ भारद्वाज, १.१५.२२ विशालाक्ष आणि ५.६.३१ भारद्वाज) श्लोक समाविष्ट आहेत. हे मूळ ग्रंथात होते तसेच उतरून घेतले असणार. त्यांच्या पुढचा व मागचा भागही पद्यात होता असे समजले तर त्याचे गद्यात रूपांतर प्रस्तुत ग्रंथकाराने केले आहे असा निष्कर्ष काढता येईल. गद्यात रूपांतर करून सारांश देण्याच्या प्रक्रियेने काही ठिकाणी भासमान होणाऱ्या कृत्रिमतेची थोडी उपपत्ती लागण्याची शक्यता आहे.

प्राचीन आचार्यांच्या मतांचा खंडनमंडनासाठी निर्देश केला नसताही काही ठिकाणी कौटिल्याने स्वत:चे म्हणून मांडलेले विचार आढळतात. शासनाधिकार-विषयक अध्याय २.१० मधील शेवटच्या श्लोकात हा शासनाचा विधि कौटिल्याने केला असल्याचे म्हटले आहे. १.७.६–७ ह्या सूत्रांत त्रिवर्गात अर्थ हाच प्रधान,

धर्म व काम त्याच्यावर अवलंबून असतात हे मत कौटिल्याचे म्हणून मांडले आहे. अध्याय ३.६ मध्ये कुमारी असलेल्या पत्नीने परगावी गेलेल्या पतीची अमुक एक कालपर्यंत वाट पाहून दुसरा विवाह करण्यास हरकत नाही ह्या मताचे समर्थन करण्यासाठी ऋतुकाल वाया जाऊ देणे म्हणजे धर्माचा घात करण्यासारखे आहे हे मत कौटिल्याचे म्हणून निर्दिष्ट केले आहे (३.६.३६). दुर्बल राजाला दुर्गात आश्रय घेणे आवश्यक झाल्यास त्यात धान्यादीचे भरपूर साठे, खूप माणसे व आसऱ्याची सोय आहे याची खात्री करून घ्यावी असे कौटिल्याचे मत असल्याचे ७.१५.११ येथे म्हटले आहे. तसेच १३.४.५ मध्ये मनुष्यवस्ती नसेल तर जनपद होणार नाही आणि जनपद नसेल तर राज्यच अस्तित्वात येणार नाही असे मत कौटिल्याचे म्हणून मांडले आहे. ही मते त्याची म्हणून खास निर्देश केला आहे त्यावरून आणि इतरत्र प्राचीन आचार्यांची मते खोडून काढण्यात त्याची तत्परता दिसून येते त्यावरून असा निष्कर्ष काढला की, जेथे त्याचा प्राचीन आचार्यांच्या मतांशी विरोध प्रकट झालेला नाही तेथे तो त्यांच्याशी सहमत आहे तर तो चूक ठरू नये. हे मान्य केले म्हणजे हा ग्रंथ मुख्यतः प्राचीन ग्रंथांवर आधारित आहे हे त्यातील विधान सहज पटावे.

कौटिलीय अर्थशास्त्र व मनुस्मृति आदी धर्मशास्त्रावरील ग्रंथ यांत बरेच विषय समान आहेत. विशेषतः प्राचीन कायद्याचे विवरण दोन्हीकडे त्याच स्वरूपात केलेले आढळते. तेव्हा या बाबतीत एक शास्त्र दुसऱ्याचे ऋणी असले पाहिजे असा निष्कर्ष संभवतो. तदनुसार अनेक पंडितांनी असे मत व्यक्त केले आहे की धर्मशास्त्रावरील ग्रंथ हे मूळ आणि अर्थशास्त्र, विशेषतः कौटिलीय अर्थशास्त्र, धर्मशास्त्रावर आधारित आहे. परंतु ह्या प्रश्नाचा अधिक खोल विचार केल्यास हे मत ग्राह्य नाही असे दिसून येईल. ह्या दोन शास्त्रांची उत्पत्ती स्वतंत्रपणे झाली आहे. धर्मशास्त्रावरील सर्वात प्राचीन ग्रंथ आपस्तम्ब, बौधायन आदींची धर्मसूत्रे. ही सहा वेदाङ्गांपैकी एक जे कल्प त्याचा एक भाग म्हणून त्यात अंतर्भूत आहेत. म्हणजे हे ग्रंथ मूळ त्या त्या वैदिक शाखांतील सदस्यांना मार्गदर्शन करण्यासाठी रचलेले आहेत. त्यांचा मुख्य उद्देश आहे सामयाचारिक धर्माचे म्हणजे परंपरागत वर्णधर्मांचे व आश्रमधर्मांचे विवरण करणे हा. हे ग्रंथ व्यक्तीला उद्देशून रचण्यात आले असून त्याने आपल्या स्वधर्मानुसार आयुष्यातील निरनिराळ्या प्रसंगी कसे वागावे याचा त्यांत ऊहापोह केला आहे. राज्यकारभार कसा करावा ते सांगणे हा त्यांचा प्रधान उद्देश नाही. उत्तरकालीन मनु, याज्ञवल्क्य आदींचे धर्मशास्त्रविषयक स्मृतिग्रंथ ह्या प्राचीन धर्मसूत्रांवरच आधारित आहेत हे सर्वमान्य आहे. तेव्हा त्यांचाही उद्देश व त्यांचेही स्वरूप धर्मसूत्रांप्रमाणेच आहेत याविषयी शंका घेता येण्यासारखी नाही. याउलट

अर्थशास्त्राचा वैदिक शाखांशी कोणत्याही प्रकारचा संबंध प्रस्थापित करणे शक्य नाही. यासंबंधात प्राचीन परंपरा अशी की बृहस्पति व शुक्र हे ह्या शास्त्राचे मूळ प्रवर्तक. हे दोघे अनुक्रमे देव व असुर यांचे गुरू अथवा पुरोहित होते अशी सर्वसाधारण मान्यता आहे. तेव्हा ह्या शास्त्राच्या उत्पत्तीचे श्रेय प्राचीन पुरोहितांना आहे असे समजण्यास हरकत नाही. पुरोहित ह्या शास्त्राचे आद्य प्रवर्तक असावेत हे स्वाभाविकच होते. प्राचीन वैदिक वाङ्मयात राजाला पुरोहित आवश्यक असल्याचे प्रतिपादन केलेले आढळते. आणि मंत्री वगैरे इतर अधिकारिपदांची निर्मिती होण्यापूर्वीपासून पुरोहित नेहमी – युद्धासारख्या प्रसंगीही – राजाच्या संनिध राहून त्याला साह्य करीत हे ऋग्वेदादी ग्रंथांवरून स्पष्ट आहे. तेव्हा त्यांना राज्यकारभाराची प्रत्यक्ष अनुभवाने माहिती व्हावी हे स्वाभाविक होते. मग त्यांच्यापैकी काहींनी त्यासंबंधी आडाखे बांधून त्यांना नियमांचे स्वरूप द्यावे हे सहज समजण्यासारखे आहे. हाच या शास्त्राचा प्रारंभ आणि त्याच्या उत्पत्तीचा प्रकार. ह्या शास्त्रातील विवरण राजाला उद्देशून केलेले असून ते उपदेशपर अथवा राजाला मार्गदर्शन करणारे आहे. तसा अधिकार प्राचीनकाली पुरोहितालाच असण्याची संभाव्यता आहे.

याप्रमाणे ही दोन शास्त्रे स्वतंत्रपणे उदयास आली असल्यामुळे त्यांच्या प्रधान विषयाच्या संबंधात त्यांच्यापैकी एक दुसऱ्याचे ऋणी आहे असे समजणे बरोबर होणार नाही. परंतु जो एखाद्या शास्त्राचा मूलभूत विषय नाही त्याचेही विवरण त्या शास्त्रात केलेले असले तर ते विवरण दुसऱ्या शास्त्राच्या आधारे केले असण्याची संभाव्यता मान्य करणे प्राप्त होते. तदनुसार अर्थशास्त्रात आढळणारे वर्णाश्रमधर्माचे व स्वधर्मपालनाच्या आवश्यकतेचे विवरण धर्मशास्त्रावरून घेतले आहे हे उघडच आहे. तद्वतच धर्मशास्त्रावरील ग्रंथांत आढळणारा त्या शास्त्राचा मूलभूत विषय नसलेला राज्यकारभारविषयक अंश राजनीतीवरील ग्रंथांतून घेतला आहे हे मान्य करण्यास हरकत असू नये. अर्थशास्त्रातील काही विषयांचा धर्मशास्त्रातही अंतर्भाव स्वाभाविक वाटण्यासारखा आहे. उदाहरणार्थ, राजाची कर्तव्ये म्हणजे त्याचा स्वधर्म असे असल्यामुळे त्यांचा धर्मशास्त्रात निर्देश असणे स्वाभाविक मानता येईल. तथापि, ही राजाची कर्तव्ये अथवा त्याचा स्वधर्म वैदिक शाखांमध्ये निर्धारित करण्यात आला असे समजणे शक्य नाही. त्यासाठी ते राजनीतीशास्त्राचे ऋणी आहेत असे समजणेच सयुक्तिक होईल. आणि यासंबंधात धर्मशास्त्रावरील ग्रंथांचा विचार केला तर असे दिसून येते की त्यात राज्यकारभार व कायदा ह्या विषयांवरील अंशाची उत्तरोत्तर वाढ होत आली आहे. आपस्तम्ब धर्मसूत्रात १,३७२ सूत्रांपैकी १३९ सूत्रेच (म्हणजे एकदशांश) ह्या विषयांसंबंधी आहेत, बौधायनधर्मसूत्रात

१,२४८ पैकी १४७ (एकअष्टमांशपेक्षा किंचित कमी), वसिष्ठधर्मशास्त्रात १,०३९ पैकी १८९ (एकषष्ठांशपेक्षा थोडी जास्त), गौतमधर्मशास्त्रात १,००० पैकी २६१ (एकचतुर्थांशाहून अधिक) ह्या विषयांना वाहिलेली आहेत, तर उत्तरकालीन मनु व याज्ञवल्क्य यांच्या स्मृतींमध्ये हे प्रमाण एकतृतीयांशापर्यंत आढळते. ह्या शास्त्रांवरील ग्रंथकारांना ह्या विषयांचे महत्त्व अधिकाधिक वाटू लागले होते हे उघड आहे. स्मृतींचा वैदिक शाखांशी काही संबंध असलेला दिसत नाही. त्यांच्यातील शिकवण सर्वांसाठी अभिप्रेत आहे. म्हणून मनुस्मृतीत राज्यकारभाराचे बरेच विस्तृत विवेचन केलेले आढळते. शिवाय, तिच्यात प्रथमच प्राचीन कायद्याची सविस्तर व काहीशी शास्त्रशुद्ध मांडणी केली आहे. परंतु ह्या स्मृतींतील सर्व शिकवण प्राचीन ग्रंथांवर आधारलेली आहे यात शंका नाही. उपनयनादी संस्कार, श्राद्ध, प्रायश्चित्त इत्यादींच्या संबंधात त्या प्राचीन धर्मसूत्रांना अनुसरूनच विवेचन करतात. तेव्हा राज्यकारभार व कायदा ह्या विषयांचे विवेचनसुद्धा त्यांनी काही प्राचीन ग्रंथांच्या आधारेच केले असणार. फक्त ह्या बाबतीतच त्यांची रचना मौलिक समजणे समंजसपणाचे होणार नाही.

असा एक दृढ समज आहे की कायदा हा स्मृतींचाच खास विषय. विशेषतः मनु हा आद्य धर्मशास्त्रकार असे मानले गेले असल्याकारणाने त्याच्या नावाने प्रसिद्ध असलेल्या स्मृतीतील कायदा त्यानेच निर्माण केला आहे, तो दुसरीकडून कोठून घेतलेला नाही असे समजण्यात येते. परंतु धर्मशास्त्राच्या विकासाचा विचार करता मनुस्मृतीला त्यात आद्यस्थान देणे शक्य नाही. दुसरे असे की कायद्याच्या व्यवस्थित मांडणीची कोणाला खास आवश्यकता असेल तर न्यायदान करणे हे जिचे कर्तव्य त्या राज्यसंस्थेला. आणि जर राजाची कर्तव्ये कोणती ते सांगणारे शास्त्र अस्तित्वात आले असेल तर कायद्याचे विवेचन हा त्या शास्त्राचाच खास विषय असे समजले पाहिजे. कौटिलीय अर्थशास्त्रावरून असे स्पष्ट दिसून येते की ह्या शास्त्रावरील प्राचीन ग्रंथांत कायद्याचे विवेचन केलेले असे. धर्मस्थीय नावाच्या तिसऱ्या अधिकरणात अनेक ठिकाणी (उदाहरणार्थ, ३.११.४४–४६, ३.१७.३–१४, ३.६.१–५, ३.४.९, ३.१४.६ इत्यादी) ह्या शास्त्रातील प्राचीन आचार्यांच्या भिन्न भिन्न मतांचा निर्देश केला आहे. ही सर्व मतभिन्नता कायद्यांच्या संबंधात आहे. तेव्हा कायदा हा स्मृतींचा खास विषय नसून त्याच्या अगोदरच्या दंडनीतीविषयक ग्रंथात तो मांडण्यात आला होता असेच समजले पाहिजे.

कौटिलीय अर्थशास्त्र प्रकाशित झाल्यानंतर तो ग्रंथ मनुयाज्ञवल्क्यादींच्या स्मृतीचा ऋणी आहे हे दाखविण्याचे जोरदार प्रयत्न झाले. आणि अद्यापही अनेक

पंडित त्या स्मृती अगोदरच्या व हा ग्रंथ नंतरचा असे गृहीत धरून चालतात. परंतु हे मत मुळीच ग्राह्य मानता येत नाही. उलट असे दाखविणे शक्य आहे की ह्या स्मृती प्रस्तुत ग्रंथाशी परिचित आहेत. स्मृतींपैकी याज्ञवल्क्यस्मृतीचे कौटिलीय अर्थशास्त्राशी सर्वात अधिक साम्य आहे. अनेक ठिकाणी दोन्हीकडे तेच नियम आढळतात आणि पुष्कळदा त्याच शब्दांत. आणि त्या ठिकाणी याज्ञवल्क्यानेच उसनवारी केली आहे असा प्रत्यय आल्याशिवाय रहात नाही. याचे एक ढळढळीत उदाहरण असे : स्मृतीत अर्थशास्त्रातील कंटकशोधनासारखे स्वतंत्र प्रकरण नाही. तथापि, त्या अधिकरणातील अनेक नियमांचा आपल्या व्यवहारविषयक अध्यायात समावेश करणे याज्ञवल्क्याला आवश्यक वाटले. तेव्हा त्याने संदर्भाचा विचार न करताच त्यांना आपल्या प्रकरणात कसे तरी सामावून घेतले आहे. उदाहरणार्थ, धोब्याने गिऱ्हाइकांचे कपडे वापरणे, व्यापाऱ्यांनी वजनामापांत फसवणूक करणे या अपराधांचाच नाही तर व्यापाऱ्यांनी शेकडा किती नफा घ्यावा ह्या नियमाचाही अंतर्भाव साहस (बळाचा वापर हे वैशिष्टच असलेल्या) प्रकरणात केला आहे. तसेच चोरीसंबंधीच्या स्तेय प्रकरणात खुनाचा तपास, शस्त्राने प्रहार करणे, गर्भपात घडवून आणणे, पत्नीने नवऱ्याचा खून करणे इत्यादी सर्वस्वी असंबद्ध बाबींचा समावेश केला आहे. काही ठिकाणी याज्ञवल्क्याच्या वचनांचा नीट अर्थ लावणे प्रस्तुत ग्रंथामुळेच शक्य होते. उदाहरणार्थ, या० २.१९७ मधील 'व्यङ्ग' चा 'वामहस्तद्विपाद' हा अर्थ अर्थशास्त्रातील ४.१०.१४ मुळेच व्यवस्थित लावता येतो. या० २.२१८ मधील 'काष्ठादिभिः' हा अर्थशास्त्र ३.१९.१२ मधील 'काष्ठ-लोष्टपाषाणलोहदण्डरज्जुद्रव्याणामन्यतमेन' ह्या वचनांचा संक्षेप आहे. एके ठिकाणी ('अयोग्यो योग्यकर्मकृत्' २.२३५) तर 'युक्तकर्म चायुक्तस्य' या अर्थशास्त्र ३.२०.१७ मधील 'युक्त' शब्दाचा 'कामगिरीवर नेमलेला सरकारी अधिकारी' हा अर्थ याज्ञवल्क्याच्या लक्षात आलेला दिसत नाही. 'योग्य' शब्दाचा तसा अर्थ समजणे शक्य नाही. तेव्हा याज्ञवल्क्यस्मृति पूर्व-कालीन व कौटिलीय अर्थशास्त्राला आधारभूत हे मत चुकीचे असेच समजले पाहिजे. उलट ही स्मृतीच काही बाबतीत अर्थशास्त्राची ऋणी आहे असे मानणेच सयुक्तिक होईल.

मनुस्मृतीच्या संबंधात प्रथम एका गोष्टीचा निर्देश केला पाहिजे. प्रस्तुत ग्रंथात पाच ठिकाणी मानवांची मते उद्धृत केली आहेत. त्यांपैकी तीन ठिकाणी (२.७.११, ३.११.४५ आणि ३.१७.३) मानवांची म्हणून ज्या मतांचा उल्लेख केला आहे त्यांचा मनुस्मृतीत कोठेच मागमूस नाही. १.२.२–३ ह्या सूत्रात मानवांचे असे मत असल्याचे म्हटले आहे की आन्वीक्षिकीचा त्रयीविद्येत

अंतर्भाव होत असल्यामुळे विद्या तीनच, चार नाहीत. परंतु मनुस्मृति ७.४३ मध्ये आन्वीक्षिकी धरून चारही विद्यांच्या अध्ययनाच्या आवश्यकतेचे प्रतिपादन केले आहे. शेवटी, १.१५.४७ मध्ये मंत्रिपरिषदेत बारा अमात्य असावेत हे मानवांचे मत उद्धृत केले आहे. मनुस्मृतीत मंत्रिपरिषदेचा उल्लेख नाही. ७.५४ ह्या श्लोकात फक्त एवढेच म्हटले आहे की राजाने सात अथवा आठ सचिव नेमावेत. ह्या सर्वांचा निष्कर्ष असा की प्रस्तुत ग्रंथातील मानवांचे निर्देश मनुस्मृतिविषयक आहेत आणि म्हणून हा ग्रंथ मनुस्मृतीवर आधारित आहे हे मत ग्राह्य मानणे मुळीच शक्य नाही. यात शंका नाही की बार्हस्पत्य व औशनस ह्या दोन शाखांप्रमाणे मानव ही सुद्धा अर्थशास्त्राच्याच अध्ययनाला वाहिलेली शाखा होय. ह्या तीन शाखांचा प्रायः एकत्रच निर्देश केलेला आढळतो. ह्या संबंधात ही गोष्टही लक्षात घेतली पाहिजे की महाभारतात राजशास्त्रप्रणेता म्हणून प्राचेतस मनूचा निर्देश आहे, तर मनुस्मृतीतील धर्म स्वायंभुव मनूने सांगितले असल्याचे त्या ग्रंथात (१.१०२) म्हटले आहे.

मनुस्मृतीचे कौटिलीय अर्थशास्त्राशी साम्य याज्ञवल्क्यस्मृतीप्रमाणे ठळकपणे नजरेत भरण्यासारखे नाही. काही ठिकाणी अर्थशास्त्रातील विवेचनाचा संक्षिप्त गोषवारा दिल्यासारखा वाटतो. उदाहरणार्थ, मनुस्मृति ९.२५२–२९२ ह्या श्लोकांत कंटकांचे निर्मूलन करावयास सांगितले आहे. कंटकांमध्ये अर्थशास्त्राच्या कंटकशोधन नावाच्या अधिकरणातील काही गुन्हेगारांचाच समावेश केला आहे. श्लोक ७.२०१–२०३ मध्ये अर्थशास्त्राच्या अध्याय १३.५ मधील लब्धप्रशमन नावाच्या प्रकरणाचे थोडक्यात सार दिले आहे. काही ठिकाणी दोन्ही ग्रंथांत शाब्दिक साम्य असल्याचे दिसून येते. स्तेय व साहस यांच्या व्याख्या (८.३३२ आणि ३.१७.१–२) शब्दशः एकच आहेत. दैवी कृती व मानवी कृती यासंबंधीचे विवेचन (७.२०५ व ६.२.७–१२) एकसारखेच आहे. या व इतर अनेक ठिकाणांवरून हे स्पष्ट होते की मनुस्मृतिकाराला अर्थशास्त्र अवगत होते. तथापि, हे अर्थशास्त्र म्हणजे प्रस्तुतचे कौटिलीय अर्थशास्त्रच असे समजण्याचे कारण नाही हे मान्य केलेच पाहिजे. ज्या प्राचीन अर्थशास्त्रविषयक ग्रंथांवर हा ग्रंथ आधारित आहे तेच ग्रंथ मनुस्मृतिकाराला अवगत होते असे समजण्यास काही हरकत नाही. ह्या दोन ग्रंथांत काही बाबतीत मतभिन्नता आढळून येत असल्यामुळे ह्या अनुमानाला दुजोरा मिळतो. मनुस्मृति, ७.१८७–८८ मध्ये निर्देशिलेल्या वराह, गरूड व पद्म ह्या व्यूहांचा प्रस्तुत ग्रंथात उल्लेख नाही. ७.७०–७२ मध्ये निर्देशिलेले दुर्गाचे सहा प्रकार कौटिलीय अर्थशास्त्रातील दुर्गप्रकारांहून भिन्न आहेत. परराष्ट्रसंबंधविषयक, संधी, विग्रह आदी सहा धोरणांचे प्रत्येकी दोन प्रकार (७.१६२–६८) प्रस्तुत ग्रंथात

आढळत नाहीत. तेव्हा मनुस्मृतीच्या रचनेच्या काळी इतर अर्थशास्त्रीय ग्रंथ अस्तित्वात होते असा निष्कर्ष निघतो. मनुस्मृतिकारानेच हे भिन्न विचार स्वतः मांडले असल्याची शक्यता, इतर विषयांच्या संबंधात तिची कार्यपद्धती लक्षात घेता, फार कमी आहे. याप्रमाणे मनुस्मृती प्रस्तुत कौटिलीय अर्थशास्त्राची ऋणी आहे असे निश्चितपणे म्हणता येत नाही. पण याउलट प्रस्तुत ग्रंथ मनुस्मृतीचा ऋणी आहे असे समजणे मुळीच शक्य नाही.

वर निर्दिष्ट केल्याप्रमाणे न्यायदानाचा म्हणजेच कायद्याचा विषय राज्यसंस्थेच्या अखत्यारातील आहे, तेव्हा त्याचे विवेचन प्राधान्येकरून राजनीतिशास्त्रावरील ग्रंथांत केलेले असावे असे अपेक्षित आहे. आणि तदनुसार कौटिलीय अर्थशास्त्रात धर्मस्थीय व कंटकशोधन ह्या दोन अधिकरणांत मिळून प्रजाजनांच्या आपसातील तंट्यांसंबंधीचा आणि विविध प्रकारच्या गुन्ह्यांविषयीचा संपूर्ण कायदा व्यवस्थित रीतीने मांडलेला आढळून येतो. वस्तुतः नंतरच्या काळी हाच कायदा मूलभूत मानणे उचित झाले असते. परंतु प्रारंभीच्या धर्मसूत्रांत तुटपुंजा असलेला, मनुस्मृतीत बराचसा विस्कळीत असलेला, याज्ञवल्क्याच्या कालानंतरच काहीशा व्यवस्थित स्वरूपात आढळणारा आणि तरीही परिपूर्ण नसलेला धर्मशास्त्रग्रंथांतील कायदाच प्रमाण मानण्यात आला. असे होण्याचे कारण अर्थशास्त्राच्या अध्ययनाची सर्वस्वी उपेक्षा होऊन धर्मशास्त्राच्याच अध्ययनाला प्राप्त झालेले प्राधान्य. अर्थशास्त्रापेक्षा धर्मशास्त्र बलवत्तर (अर्थशास्त्रात्तु बलवद्धर्मशास्त्रमिति स्थितिः) ह्या याज्ञवल्क्यकृत दंडकात ह्या वस्तुस्थितीचे दर्शन घडते. परंतु ते काहीही असले तरी कायद्याच्या संबंधात सुद्धा स्मृतींची प्रस्तुत ग्रंथाच्या मूलस्रोतात गणना करणे शक्य नाही हे निश्चित.

प्रस्तुत ग्रंथात काही ठिकाणी महाभारतातील कथांचे निर्देश आढळतात. चार ठिकाणी थोडी भिन्नता आढळते. द्वैपायनाची खोडी केल्यामुळे वृष्णिसंघ नाश पावला असे १.६.१० मध्ये म्हटले आहे. महाभारतानुसार विश्वामित्र, कण्व व नारद हे वृष्णींच्या नाशास कारणीभूत झाले होते. जामदग्न्याने म्हणजे परशुरामाने पृथ्वीच्या राज्याचा चिरकाल उपभोग घेतला होता असे विधान १.६.१२ ह्या श्लोकात आहे. महाभारतात किंवा अन्यत्र परशुरामाने राज्य केले असल्याचे कोठे म्हटलेले नाही. नलाच्या भावाचे नाव येथे जयत्सेन असे आहे (८.३.४१), तर महाभारतानुसार त्याचे नाव पुष्कर होते. प्रस्तुत ग्रंथात आपला छळ होईल या भीतीने अणिमांडव्याने चोर नसताही चोर असल्याचे कबूल केले असे म्हटले आहे (४.८.१२). महाभारतात त्याचे मौनव्रत असल्यामुळे तो काही बोलला नाही, पण चोरीच्या वस्तू त्याच्या

संनिध सापडल्या म्हणून त्याला पकडले अशी कथा आहे. या कथांची भिन्न संस्करणे प्रस्तुत ग्रंथकाराला (अथवा त्याच्या मूलस्रोताला) अवगत होती अशी शक्यता आहे.

दुसऱ्या अधिकरणातील कित्येक अध्यायांत अशा काही विषयांचे विवेचन आहे की त्यांचा राज्यकारभाराशी साक्षात संबंध नाही. उदाहरणार्थ, खाणी व त्यांतील धातूंचे उत्पादन, सोन्यारुप्याचे दागिने व इतर पदार्थ बनविण्याचे कारखाने, शेतीविषयक तपशील, गुरांची राखण वगैरे येथील अनेक तांत्रिक विषयांचे विवरण बार्हस्पत्यऔशनसप्रभृतींच्या मूळ ग्रंथांत केलेले असल्याची शक्यता फार कमी आहे. हे सर्व तांत्रिक विषय असून त्यांचे ज्ञान त्या त्या शास्त्रात पारंगत असलेल्यांनाच असण्याची शक्यता आहे. प्रस्तुत ग्रंथकाराने हे ज्ञान कसे प्राप्त करून घेतले असावे ते निश्चितपणे सांगता येणार नाही. हे सर्व विषय अर्थशास्त्रात अंतर्भूत आहेत असे समजले तर ग्रंथाच्या पहिल्या सूत्रात सूचित झाले आहे त्याप्रमाणे ह्या विषयांवरही ग्रंथरचना झालेली असावी व तेथून हे ज्ञान मिळविले असावे असे मानता येईल. अर्थात त्यावेळचे असे ग्रंथ सध्या उपलब्ध नाहीत. परंतु त्यावरून ते अस्तित्वात असणे शक्य नाही असे समजण्याचे कारण नाही. प्रस्तुत ग्रंथातच कृषितंत्र, वृक्षायुर्वेद ह्या शास्त्रांचा निर्देश आहे (२.२४.१). असे ग्रंथ नव्हतेच हा विचार ग्राह्य मानला तर ग्रंथकाराने हे ज्ञान त्या त्या व्यवसायातील निष्णात तज्ज्ञांकडून मिळविले असावे असे समजता येईल. अशा तज्ज्ञांना प्रस्तुत ग्रंथात काही ठिकाणी 'तज्जात' (त्या व्यवसायात जन्मलेला, जन्म गेलेला) ही संज्ञा लावली आहे.

**ग्रंथकर्ता व त्याचा काल**

ग्रंथाच्या कर्त्याविषयी त्यातच प्रारंभी व अंती निर्देश आहेत. पहिल्या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकात 'हे शास्त्र कौटिल्याने केले आहे (कौटिल्येन कृतं शास्त्रम्, १.१.१९)' असे म्हटले आहे. तसेच ग्रंथातील शेवटच्या श्लोकात 'ज्याने शास्त्र, शस्त्र व नंद राजाच्या अंमलाखाली असलेली भूमी यांचा अमर्षाने झटकन उद्धार केला त्याने हे शास्त्र केले (१५.१.७३)' असे म्हटले आहे. यात कौटिल्याचाच निर्देश अभिप्रेत आहे. शिवाय, ग्रंथाचे नाव कौटिलीय अर्थशास्त्र म्हणजे कौटिल्याने रचलेले अर्थशास्त्र असे प्रत्येक अध्यायाच्या अंतानंतरच्या समाप्तिदर्शक वचनात निर्दिष्ट झाले आहे. ग्रंथात अनेक ठिकाणी कौटिल्याच्या नामनिर्देशाने त्याची म्हणून काही मते उद्धृत झाली आहेत. ही प्रायः इतर आचार्यांच्या मतांचे खंडन करण्याच्या उद्देशाने मांडलेली आहेत. तेव्हा ग्रंथातील पुराव्यावरून हा ग्रंथ कौटिल्यकृत आहे असा निष्कर्ष काढणे शक्य आहे.

हा कौटिल्य विष्णुगुप्त व चाणक्य ह्या इतर दोन नावांनीही प्रसिद्ध आहे. वर निर्दिष्ट केलेल्या ग्रंथाच्या समाप्तीनंतरच्या श्लोकात विष्णुगुप्ताने स्वतःच सूत्र व भाष्य रचले असल्याचे म्हटले आहे. प्राधान्येकरून प्रस्तुत ग्रंथाच्या आधारे लिहिण्यात आलेल्या कामन्दकीय नीतीसारात प्रारंभी 'ज्याने नंदाचा उच्छेद करून चंद्रगुप्ताला पृथ्वीचे राज्य मिळवून दिले आणि ज्याने अर्थशास्त्ररूपी महासागरातून नीतीशास्त्ररूपी अमृत वर काढले त्या विद्वान विष्णुगुप्ताला' अभिवादन केले आहे (१.४–६). दंडीच्या दशकुमारचरिताच्या आठव्या प्रपाठकात ही दंडनीती 'आचार्य विष्णुगुप्ताने मौर्यांसाठी सहा हजार श्लोकांत संक्षिप्त केली' असे म्हटले असून पुढे तिच्यातील शिकवणुकीचा दोन ठिकाणी प्रमुखतया निर्देश केला आहे: (१) 'चाणक्याने बरोबरच म्हटले आहे की राजाच्या मनाप्रमाणे वागणारे लोक अनर्थकारक असले तरी त्याला प्रिय होतात आणि त्याची गैरमर्जी झालेले कामात दक्ष असले तरी अप्रिय होतात.' दंडीने उद्धृत केलेला हा श्लोक प्रस्तुत ग्रंथात ५.४.१३-१४ येथे आढळतो. (२) 'चाणक्याने सांगितलेले अपहार करण्याचे चाळीस प्रकार आहेत.' ह्या चाळीस प्रकारांची सविस्तर यादी प्रस्तुत ग्रंथात २.८.२०-२१ या ठिकाणी दिली आहे. मुद्राराक्षस नाटकात चाणक्य हे मुख्य पात्र आहे आणि त्याचाच कौटिल्य व विष्णुगुप्त या नावांनी त्यात निर्देश केला आहे. तो ग्रंथकार असल्याचे त्या नाटकात म्हटलेले नाही. परंतु प्रस्तुत ग्रंथातील शिकवणुकीची त्या नाटकावर दाट छाया पडली आहे हे निःसंशय. इतकेच नाही तर यातील शिकवणुकीचा काही ठिकाणी साक्षात निर्देशही केला आहे. उदाहरणार्थ, चौथ्या अंकात येथील ५.४.१ हे सूत्र कर्मणी प्रयोगात उद्धृत केलेले आढळते – 'विजिगीषुरात्मगुणसंपन्नः प्रियहितद्वारेणाश्रयणीय इति'.

यावरून प्राचीन पारंपरिक मत मगधातील नंद वंशाचा निःपात करून तेथे चंद्रगुप्त मौर्यास राज्यारूढ होण्यास साहाय्य करणारा कौटिल्य अथवा चाणक्य अथवा विष्णुगुप्त हाच ह्या ग्रंथाचा रचयिता असे असल्याचे दिसून येते. हे मत ग्राह्य मानले तर ह्या ग्रंथाच्या रचनेचा काल इसवीसनपूर्व चौथ्या शतकाची शेवटची वर्षे असे ठरते. कारण, इ. स. पूर्व ३२१ मध्ये अथवा दोनचार वर्षे पुढेमागे चंद्रगुप्त मौर्याने मौर्य वंशाचे राज्य प्रतिष्ठापित केले होते. परंतु हे पारंपरिक मत ग्राह्य नसल्याचे व हा ग्रंथ इतका प्राचीन नसल्याचे अनेक पंडित मानतात. त्याचा विचार करणे अवश्य आहे. परंतु यासंबंधात जो महान वाद निर्माण झाला आहे त्यातील काही थोड्या मुद्द्यांचाच या ठिकाणी निर्देश करणे शक्य आहे.

कौटिल्य म्हणजेच चाणक्य हे खरे नाही असे मत मांडण्यात आले आहे. कौटिल्य हे गोत्रनाम, चाणक्य हे पित्याच्या नावावरून आलेले नाव आणि

विष्णुगुप्त हे त्याचे जन्मकाली ठेवलेले नाव अशी ह्या तीन नावांची पारंपरिक उपपत्ती. परंतु चाणक्य हे सुद्धा गोत्रनाम आहे असा त्यावर आक्षेप घेतला आहे. चणक शब्द गर्गादि गणात समाविष्ट असून पाणिनीच्या 'गर्गादिभ्यो यञ्' (४.१.१०५) ह्या सूत्रानुसार त्या शब्दापासून चाणक्य हे गोत्रनाम असल्याचे सिद्ध होते. आणि एकाच व्यक्तीची दोन गोत्रे असण्याची संभाव्यता नाही असा हा आक्षेप आहे. याला असे उत्तर देता येण्यासारखे आहे की दत्तक वगैरे पुत्रांच्या संबंधात काही प्रसंगी ते द्विगोत्र होतात. प्रस्तुत ग्रंथात सुद्धा असे म्हटले आहे की क्षेत्रज पुत्र उत्पन्न केल्यावर जर त्याच्या जन्मदात्या पित्याला दुसरा पुत्र नसेल तर त्या पुत्राला दोन पिते व दोन गोत्रे होतात आणि तो दोघांना पिंड देतो व दोघांचा वारसदार होतो (३.७.६–७). अशा पुत्राला 'द्व्यामुष्यायण' अशी संज्ञा नंतरच्या काळी लावण्यात आली. अर्थात प्रस्तुत ग्रंथकार अशा प्रकारचा पुत्र होता याचा काही पुरावा नाही हे मान्य केले पाहिजे.

कौटिल्य अथवा चाणक्य याच्याविषयीच्या कथा अनेक ठिकाणी आढळतात. त्यात एक लक्षणीय गोष्ट अशी की बौद्ध व जैन कथा चाणक्यासबंधीच आहेत, त्यांत कौटिल्य हे नाव कोठेच आढळत नाही. याउलट विष्णुपुराणादी ग्रंथांत कौटिल्याचा निर्देश आहे, चाणक्याचा नाही. यावरूनही असा तर्क करण्यात आला आहे की ह्या दोन भिन्न व्यक्ती असाव्यात. परंतु हा तर्क सयुक्तिक वाटत नाही. ह्या सर्व कथा नंदवंशाच्या विनाशाशी व चंद्रगुप्त मौर्याच्या राज्यप्राप्तीशी निगडित आहेत. त्या घडामोडीत प्रमुख भाग घेतलेली व्यक्ती एकच असणार आणि ती व्यक्ती जर दोन नावांनी परिचित असेल तर काही ठिकाणी तिच्या एका नावाचा निर्देश केला जावा व इतरत्र दुसऱ्या नावाचा यात अस्वाभाविक असे काही नाही. तन्त्राख्यायिक (पंचतंत्र) ग्रंथात प्रारंभीच्या द्वितीय श्लोकात नृपशास्त्र करणाऱ्यांना अभिवादन केले आहे, त्यात महान चाणक्याचा निर्देश आहे (मनवे वाचस्पतये शुक्राय पराशराय च ससुताय । चाणक्याय च महते नमोऽस्तु नृपशास्त्रकर्तृभ्यः ।।). यात प्रस्तुत ग्रंथाचा व त्याच्या कर्त्याचा निर्देश अभिप्रेत आहे हे उघड आहे. कारण चाणक्यकृत असा राजशास्त्रावर दुसरा ग्रंथ असल्याचे प्रसिद्ध नाही. तेव्हा तन्त्राख्यायिक, मुद्राराक्षस आदी ग्रंथांच्या पूर्वीपासून कौटिल्य व चाणक्य एकच अशी धारणा होती यात संशय नाही.

चंद्रगुप्ताचा सहायक कौटिल्य अथवा चाणक्य ह्या ग्रंथाचा कर्ता असणे संभाव्य नाही याचे एक कारण असे सांगण्यात येते की त्यात चंद्रगुप्ताचा, मौर्य साम्राज्याचा अथवा पाटलीपुत्राचा कोठेच निर्देश नाही. इतकेच नाही तर ज्या राज्याच्या कारभाराविषयी प्रस्तुत ग्रंथात विवरण आहे ते साम्राज्याच्या मानाने बऱ्याच

लहान आकाराचे असल्याचे प्रतीत होते. असाही आक्षेप घेण्यात आला आहे की हा ग्रंथ मंत्रिपदाचा उपभोग घेतलेल्या व्यक्तीने लिहिला असल्याचा प्रत्यय येत नसून एखाद्या पंडितानेच तो लिहिला असणे शक्य आहे. विषयाचे वर्गीकरण करण्याची व व्याख्या देण्याची हाव हे पांडित्याचे लक्षण आहे. ही सर्व विचारसरणी ग्रंथाच्या स्वरूपाविषयीच्या गैरसमजावर आधारलेली आहे. ह्या ग्रंथाचा उद्देश तत्कालीन राजकीय परिस्थितीचे चित्रण करणे असा मुळीच नाही. प्राचीन कालापासून राजाने राज्य कसे करावे ते सांगणारे शास्त्र उदयास येऊन त्यावर विविध ग्रंथ लिहिण्यात आले होते. प्रस्तुत ग्रंथ त्यांपैकीच एक, सर्वसंग्राहक असल्याकारणाने कदाचित त्यांच्यातील शेवटचा. त्यात प्राचीन कालापासून प्रचलित असलेल्या शास्त्रीय पद्धतीचाच अवलंब केलेला असावा हे स्वाभाविक समजले पाहिजे. भारतात सर्व शास्त्रांच्या संबंधात वर्गीकरण व व्याख्या (उद्देश, लक्षण व परीक्षा) हीच विवेचनाची पद्धती अवलंबिण्यात आली आहे. हे सर्व कार्य पंडितांचेच यात शंका नाही. परंतु सर्व पंडित राज्यकारभारापासून सर्वस्वी अलिप्त असत असे समजण्याचे कारण नाही. किंबहुना अनेक राज्यांत मंत्रिपदी विद्वान ब्राह्मणांची नियुक्ती केली जात असे अशी इतिहासाची साक्ष आहे. त्या मंत्र्यांनी शास्त्रीय विषयावर लिहावयाचे ठरविल्यास त्यांनी समकालीन घटनांकडे दुर्लक्ष करून प्राचीन विवेचनपद्धतीचेच अनुकरण केले तर त्यात अस्वाभाविक असे काही नाही. तेव्हा प्रस्तुत ग्रंथ मंत्रिपद उपभोगिलेल्या पंडिताने लिहिलेला असणे अशक्य नाही. दुसरी गोष्ट अशी की कौटिल्य अथवा चाणक्य याने मंत्री म्हणून राज्यकारभाराकडे लक्ष दिले होते हे निश्चित नाही. मुद्राराक्षस नाटकावरून असे दिसते की चंद्रगुप्ताला राज्य मिळवून दिल्यानंतर त्याला उत्कृष्ट मंत्री मिळावा व आपण स्वतः निवृत्त व्हावे याविषयीच तो प्रयत्नशील होता. निवृत्त झाल्यानंतर त्याला प्रस्तुत ग्रंथाची रचना करण्याची स्फूर्ती झाली असणे संभाव्य आहे. परंतु तो प्राचीन परंपरेला अनुसरूनच लिहिला आहे, आयुष्यातील आठवणींच्या स्वरूपाचा तो नाही. तेव्हा त्यात चंद्रगुप्ताचा अथवा पाटलीपुत्राचा निर्देश नाही याबद्दल आश्चर्य वाटायला नको. ह्या ग्रंथात ज्या राज्याचा विचार करण्यात आला आहे ते विस्ताराने लहान आहे हे खरे आहे. पण याचे कारण पूर्वापार चालत आलेल्या शास्त्रात त्याच प्रकारच्या राज्याचा विचार झाला होता. शिवाय, साम्राज्याची कल्पना प्रस्तुत ग्रंथाला अपरिचित आहे अशातली गोष्ट नाही. विजिगीषू राजाने सर्व पृथ्वी जिंकून घेऊन तेथे आपले राज्य प्रस्थापित करावे असा आदर्श त्याच्यापुढे ठेवला आहे.

प्रस्तुत ग्रंथ चंद्रगुप्त मौर्याचा समकालीन नाही हे दाखविण्यासाठी मुख्यतः मेगॅस्थिनीसने केलेल्या वर्णनाशी असलेल्या तफावतीचा उपयोग केला जातो.

मेगॅस्थिनीस हा चंद्रगुप्ताच्या दरबारी ग्रीक राजा सेल्युकस ह्याचा वकील म्हणून राहिला होता आणि भारतात त्याने जे पाहिले त्याचे वर्णन 'इंडिका' नावाच्या आपल्या ग्रंथात त्याने केले होते. त्याचा तो ग्रंथ सध्या उपलब्ध नाही. परंतु स्ट्राबो, आरियन, डिओडोरस प्रभृती ग्रीक व रोमन लेखकांनी आपल्या ग्रंथांत इंडिकामधून घेतलेले बरेच उतारे आढळतात. त्या उताऱ्यांत चंद्रगुप्ताच्या राजवटीचे व तत्कालीन परिस्थितीचे प्रत्यक्ष पाहून केलेले वर्णन आहे. ते वर्णन व प्रस्तुत ग्रंथातील तद्विषयक निर्देश यांत पुष्कळच तफावत आहे. उदाहरणार्थ, मेगॅस्थिनीसने म्हटले आहे की शेतांचे मोजमाप करणे, कालव्यांवर देखरेख करणे, शिकारीवर नियंत्रण ठेवणे, कर गोळा करून आणणे इत्यादी कामांसाठी अधिकाऱ्यांचे एक मंडळ नेमलेले होते. अशा मंडळाचा प्रस्तुत ग्रंथात मागमूसही नाही. मेगॅस्थिनीसच्या वर्णनानुसार पालिबोथ्रा (पाटलीपुत्र) ह्या राजधानीचा कारभार प्रत्येकी पाच पाच सदस्य असलेली सहा मंडळे (१) कामगार व कारागीर, (२) परदेशीय लोक, (३) जन्ममृत्यूची नोंद, (४) व्यापार, (५) उद्योगधंदे आणि (६) विकलेल्या वस्तूंच्या किमतीच्या एकदशांश रकमेची वसुली ह्या बाबींची व्यवस्था पाहून चालवीत असत. अर्थशास्त्रात याहून सर्वस्वी भिन्न व्यवस्थेचे वर्णन अध्याय २.३६ मध्ये आहे. त्याचप्रमाणे लष्करी अधिकाऱ्यांच्या संबंधात (१) नौसेना, (२) लष्करी वाहतूक, (३) पायदळ, (४) घोडदळ, (५) रथ आणि (६) हत्ती यांची व्यवस्था पाच पाच सदस्यांची सहा मंडळे पहात असे मेगॅस्थिनीसने म्हटले आहे. ह्या मंडळांचाही अर्थशास्त्रात मागमूस नाही. ह्या व इतरही काही बाबतीत आढळून येणाऱ्या भिन्नतेवरून असा निष्कर्ष काढण्यात आला आहे की प्रस्तुत ग्रंथ चंद्रगुप्त मौर्याचा समकालीन मानणे अशक्य आहे.

ह्या सर्व युक्तिवादात हे गृहीत धरले आहे की प्रस्तुत ग्रंथ चंद्रगुप्ताच्या राजवटीचे वर्णन करण्याच्या उद्देशाने लिहिला आहे, त्यात दुर्गाच्या बांधकामाचे जे वर्णन (२.३) आहे ते पाटलिपुत्राच्या सभोवतालच्या कोटाचे असे समजले पाहिजे, त्यातील राजाच्या दिनचर्येचे वर्णन चंद्रगुप्ताच्या दरबाराचे वर्णन करणारे आहे, दुसऱ्या अधिकरणातील राज्यकारभाराचे प्रदीर्घ वर्णन हे चंद्रगुप्ताच्याच कारभाराचे वर्णन समजले पाहिजे, इत्यादी. परंतु हे गृहीतकृत्य सर्वस्वी निर्मूल आहे. प्रस्तुत ग्रंथ राजनीतीवरील शास्त्रीय स्वरूपाचा ग्रंथ आहे. जगातील कोणत्याही देशात व कोणत्याही काळी राज्यधुरा वाहणाऱ्याने कारभार उत्तम रीतीने कसा करावा, येणाऱ्या विविध संकटातून मार्ग काढून आपले व आपल्या प्रजेचे रक्षण कसे करावे आणि आपल्या राज्याची भरभराट व वाढ कशी घडवून आणावी ते सांगणे हे या शास्त्राचे उद्दिष्ट आहे. प्रस्तुत

ग्रंथाची रचनाही त्याच उद्देशाने करण्यात आली आहे. समकालीन घटनांचे अथवा परिस्थितीचे वर्णन करणे असा त्याचा मुळीच उद्देश नाही. वर्णन केलेली कारभाराची यंत्रणा कोठेही उभारता येईल, वर्णन केल्याप्रमाणे दुर्ग कोठेही बांधता येईल, कोणत्याही राजाला यातील दिनचर्येनुसार वागता येईल असेच अभिप्रेत आहे. राज्यकर्त्यांना केलेले हे मार्गदर्शन अर्थातच भारतातील सर्व-सामान्य परिस्थितीच्या अनुरोधाने केले आहे. शास्त्रात ह्या सर्वसामान्य परिस्थितीचेच चित्र उमटले आहे. तेव्हा प्रस्तुत ग्रंथात एका विशिष्ट राज्याचे व तेथील राजवटीचे वर्णन आहे असे समजणे बरोबर नाही हे उघड आहे.

विशेष आश्चर्याची गोष्ट अशी की ज्या स्टाइन प्रभृतींनी हा युक्तिवाद लढविला आहे त्यांनीच मेगॅस्थिनीसच्या विश्वसनीयतेबद्दल अनेक ठिकाणी शंका प्रदर्शित केली आहे. उदाहरणार्थ, मेगॅस्थिनीसची पुढील विधाने चूक असल्याचे मान्य करण्यात आले आहे : (१) पालिबोथ्राभोवतालचा खंदक सहा प्लेथ्रा (१७७.६० मीटर) इतका रुंद होता. (२) हत्ती व घोडे फक्त राजालाच बाळगता येत असत. (३) हिंदुस्थानातील लोकांना लिहिण्याची कला अवगत नाही. (४) देशातील सर्व जमीन राजाच्या मालकीची, त्याला जे मिळते ते तिचे भाडे. (५) राजा न्यायासनावर बसला असता त्याचे अंगमर्दन केले जात असे. (६) न्यायदान करण्यासाठी व यज्ञ करण्यासाठी राजा राजवाडा सोडून बाहेर जात असे. (७) दारूड्या राजाला ठार मारणाऱ्या त्याच्या राणीला नंतर गादीवर येणाऱ्याबरोबर राहण्याचा 'मान' मिळावा अशी प्रथा होती. काही विधानांच्या संबंधात (उदाहरणार्थ, पश्चिमेकडून पूर्वेकडे जाणारा १०,००० स्टाडिया अथवा १,००० मैल लांबीचा राजमार्ग व रस्त्यावरील मैलाचे दगड यांचे निर्देश) ती पर्शिया, ईजिप्त या इतर देशांसंबंधीची असून हिंदु-स्थानासंबंधी चुकीने केली असावीत असा खुलासा करण्यात आला आहे. मेगॅस्थिनीसची इतर काही विधाने त्याच्या आदर्श शोधण्याच्या प्रवृत्तीची निदर्शक आहेत व त्याच्यावर प्लेटोच्या लॉज् ह्या ग्रंथाच्या पडलेल्या प्रभावामुळे केली असावीत असेही सुचविण्यात आले आहे. तेव्हा ज्या ग्रंथकाराच्या विश्वसनीयते-बद्दल स्वतःला खात्री नाही त्याच्या ग्रंथातून इतरांनी उद्धृत केलेल्या थोड्या अवतरणांतील विधानांच्या आधारे दुसऱ्या ग्रंथाच्या प्रामाण्याविषयी शंका उपस्थित करणे हे थोडे धाष्टर्याचेच म्हटले पाहिजे.

शिवाय, मेगॅस्थिनीसने चन्द्रगुप्तकालीन म्हणून ज्या कारभाराच्या पद्धतीचा निर्देश केला आहे ती खरोखरच तशी अंमलात आली होती असे मानणे सुद्धा कठीण आहे. राजधानीचा कारभार पाहण्यासाठी व लष्कराची व्यवस्था

पाहण्यासाठी पाच पाच जणांची सहा मंडळे असावीत ही कल्पनाच थोडी विचित्र आहे. अशा मंडळांचा भारतात कोठेही निर्देश नाही. तेव्हा ही विधाने सुद्धा प्रत्यक्ष वस्तुस्थितीवर आधारलेली नसावीत असाच दाट संभव आहे.

प्रस्तुत ग्रंथात अनेक ठिकाणी ' इति कौटिल्यः ' किंवा ' नेति कौटिल्यः ' असे म्हणून त्याची मते उद्धृत केली आहेत. त्या सर्व ठिकाणी त्याचा निर्देश तृतीय पुरुषात केला आहे. सामान्यतः ग्रंथकार आपला स्वतःचा निर्देश ' मी ' ' आम्ही ' यासारख्या प्रथमपुरुषी सर्वनामांनी करतात. तेव्हा कौटिल्याचा तृतीय पुरुषात केलेला उल्लेख त्याने स्वतः केला असणे संभाव्य नाही असा एक आक्षेप घेण्यात आला आहे. त्याचबरोबर असाही विचार मांडण्यात आला आहे की कौटिल्य हा या शास्त्रावरील एक प्रधान आचार्य – कदाचित प्राचीन परंपरेतील शेवटचा – हे मान्य करता येईल, परंतु त्याने स्वतःच हा ग्रंथ लिहिला आहे असे समजण्याचे कारण नाही. त्याच्यापासून सुरू होणाऱ्या ह्या शास्त्राच्या अध्ययनास वाहिलेल्या गुरुशिष्यपरंपरारूप शाखेत या ग्रंथाची निर्मिती झाली असणे अधिक संभवनीय आहे. त्यायोगे कौटिल्याचा तृतीय पुरुषात केलेल्या निर्देशाची समुचित उपपत्ती लागते. त्याच्या शाखेतील सदस्यांनी त्याच्या खास खंडनमंडनात्मक मतांचा प्रामुख्याने करावयाचा निर्देश त्याच्या नावासह याप्रमाणे करावा हे स्वाभाविक आहे. विशेषतः असे समजल्यास अध्याय ५.६ मधील कौटिल्य-भारद्वाज-कौटिल्य या परस्परसंबंधाविषयीचे कोडे उलगडण्यासही मदत होते. कौटिल्याच्या परंपरेतील शिष्यप्रशिष्यांनी अशाप्रमाणे दोघांच्या मतांची मांडणी केलेली असावी हेच संभवनीय आहे.

ही विचारसरणी आकर्षक वाटण्यासारखी आहे यात संशय नाही. परंतु या बाबतीत एक गोष्ट लक्षात ठेवणे आवश्यक आहे. प्राचीन काळी एखाद्या विषयाच्या खास अध्ययनासाठी गुरुशिष्यपरंपरारूप शाखा प्रस्थापित झाली तर त्या अध्ययनाला मूलभूत ग्रंथाची आवश्यकता असे, आणि असा ग्रंथ त्या शाखेच्या प्रवर्तकानेच रचलेला असे. त्याच्या अभावी अशी परंपरा प्रस्थापित होणेच संभवनीय नसे. तेव्हा कौटिल्यापासून एक गुरुशिष्यपरंपरा सुरू झाली असे मानले तर त्या परंपरेत अध्ययनासाठी उपलब्ध असणारा मूलग्रंथ कौटिल्यरचितच होता असे समजले पाहिजे. त्या परंपरेत नंतरच्या काली असा ग्रंथ रचला जाण्याची शक्यता फार कमी. आणि ग्रंथकाराने स्वतःचा निर्देश तृतीय पुरुषात करावा ही गोष्ट अगदी अशक्य समजण्याचे कारण नाही. निरनिराळ्या ग्रंथकारांचे निरनिराळे प्रकृतिविशेष असतात, लेखनाच्या निरनिराळ्या शैली असतात. ज्या रीतीने प्रस्तुत ग्रंथात प्राचीन आचार्यांची मते ' नेति कौटिल्यः ' या शब्दांत

खंडन करण्यासाठी उद्धृत केली आहेत त्यावरून असा ग्रह होतो की अमर्ष हा ह्या ग्रंथकाराच्या स्वभावाचा स्थायिभाव असावा. आणि कौटिल्याविषयीच्या कथेत त्याच्या अमर्षयुक्त स्वभावाचेच दर्शन मुख्यतः घडते. ग्रंथातील शेवटच्या श्लोकात ग्रंथकर्त्याच्या अमर्षाचाच उल्लेख आहे, आणि त्या अमर्षाचा उपयोग त्याने शास्त्राचा 'उद्धार' करण्यासाठीही केला होता असे तेथे म्हटले आहे. तेव्हा असा विशिष्ट स्वभाव असलेल्या पंडिताने आपल्या मताचे वैशिष्टय प्रस्थापित करण्यासाठी स्वतःचा आपल्या नावाने निर्देश केला तर त्यात अस्वाभाविक असे काही नाही.

हा ग्रंथ इ. स. पूर्व चौथे शतक इतका प्राचीन असणे शक्य नाही हे दाखविण्या-साठी अनेक प्रकारचा पुरावा प्रस्तुत केला गेला आहे. विशेषतः त्यात ज्या देशांचे अथवा प्रदेशांचे निर्देश केलेले आढळतात त्यांचे ज्ञान भारतीयांना त्याकाळी झालेले असणे असंभवनीय आहे असे अनेकांनी प्रतिपादन केले आहे. त्यांपैकी मुख्य निर्देश सूत्र २.११.११४ मधील चीनभूमी व तेथे उत्पन्न होणाऱ्या चीन-पट्टाचा (रेशमी वस्त्राचा). असे मानण्यात येते की इ. स. पूर्व तिसऱ्या शतकाच्या उत्तरार्धात चीन नावाच्या वंशाचे आधिपत्य सुरू झाले तेव्हापासूनच त्या देशाला चीन हे नाव प्राप्त झाले. तेव्हा त्या नावाचा निर्देश करणारा ग्रंथ त्यापूर्वी लिहिला गेला असण्याची शक्यता मुळीच नाही. पण चीन नावाची ही उपपत्ती सर्वमान्य झालेली नाही. चीन वंश हा उपटसुंभ मानला जात होता आणि त्याचे लवकरच उच्चाटन होऊन हान वंशाचे साम्राज्य प्रतिष्ठापित झाले होते. तेव्हा चीन हे नाव इ. स. पूर्व तिसऱ्या शतकातच अस्तित्वात आले असे समजण्याचे कारण नाही ह्या मताचेही पुरस्कर्ते आहेत. असाही युक्तिवाद करण्यात आला आहे की चीन भूमीने चीन देशाचा निर्देश अभिप्रेत नसून भारताच्या वायव्येकडे असलेल्या 'शिन' नावाच्या जमातीच्या प्रदेशाचा तो निर्देश आहे. असेही सुचविण्यात आले आहे की चीन भूमीचा निर्देश असलेले हे सूत्र मूळ नसून प्रक्षिप्त असावे.

दुसरा एक निर्देश महत्त्वाचा मानला जातो. सूत्र २.११.४२ मध्ये आल-कन्दक प्रवाळाचा उल्लेख आहे. हस्तलिखितांत 'आलकन्दकम्' असाच पाठ आहे. पण प्राचीन मल्याळी टीकेत 'आलसान्द्रकम्' व भिक्षु प्रभमतीच्या चाणक्यटीकेत 'आलत्सान्द्रकम्' असे पाठ आहेत. मल्याळी टीकेत आलसान्द्र म्हणजे पप्पर (बर्बर) देशाच्या किनाऱ्याजवळ समुद्रात असलेला देश असा अर्थ दिला आहे. भट्टस्वामी ह्या दुसऱ्या टीकाकाराने आलकन्दक ह्या पाठाचाही तसाच अर्थ केला आहे. तेव्हा या ठिकाणी अलेक्झांड्रियाचा निर्देश आहे असे मानले गेले आहे. आणि त्या बंदरातून निर्यात होणाऱ्या प्रवाळांचा उल्लेख करणारा ग्रंथ इ. स.

पूर्व चौथ्या शतकात लिहिला गेला असणे अशक्य असे प्रतिपादन केले आहे. यासंबंधात एवढेच म्हणता येण्यासारखे आहे की तेथील पाठ व त्याचा केलेला अर्थ दोन्हीही निःसंदिग्ध नाहीत. तेव्हा त्यांच्या आधारे केलेले अनुमान ग्राह्य वाटलेच पाहिजे असे नाही. प्रस्तुत सूत्राच्या बाबतीत ते प्रक्षिप्त असावे अशी शंका मात्र संभवनीय नाही.

प्रस्तुत ग्रंथात 'सुरुङ्गा' (जमिनीच्या आतून गेलेला मार्ग, भुयार) ह्या शब्दाचा अनेक ठिकाणी उपयोग केला आहे. हा शब्द ग्रीक भाषेतील सीरिग्क्स् (Syrigx) ह्या शब्दावरून घेतला आहे असे प्रतिपादन करण्यात आले आहे. ह्या शब्दाचा प्रथम उपयोग पोलीबियस ह्या ग्रीक लेखकाने इ. स. पूर्व १८० मध्ये लिहिलेल्या ग्रंथात केलेला आढळतो. तेव्हा त्या शब्दावरून घेतलेला सुरुङ्गा शब्द इ. स. पूर्व दुसऱ्या शतकाच्या अगोदर लिहिला गेला असणे शक्य नाही. या संबंधात असे दाखवून देण्यात आले आहे की पोलीबियसने सिरिंक्स (Sirynx) हा शब्द वापरला असून त्याने त्याचा एका शहराला टोपणनाव देण्यासाठी म्हणून उपयोग केला आहे. त्यात त्याचा उद्देश त्या शहराचे सिरिंक्सशी साम्य असल्याचे सुचविणे हा होता (सिरिंक्स म्हणजे तटबंदीवर हल्ला करण्यासाठी तयार केलेला बोगद्यासारखा वरून झाकलेला मार्ग). तेव्हा तो शब्द त्याच्या कालाच्या अगोदरपासून अस्तित्वात असला पाहिजे हे उघड आहे. शिवाय सुरुङ्गा शब्द त्या ग्रीक शब्दापासून निष्पन्न झाला आहे हे निश्चित नाही. त्या शब्दाच्या अन्य व्युत्पत्तीही (ख्मेर 'रुङ' भोक, संताळी 'सुरुङ' भोक) सुचविण्यात आल्या आहेत.

याउलट प्रस्तुत ग्रंथात असे काही उल्लेख आहेत की ज्यायोगे त्याच्या प्राचीनत्वाला दुजोरा मिळावा. सूत्र ३.२०.१६ मध्ये देवकार्य व पितृकार्य या प्रसंगी शाक्य, आजीवक आदी पाखंडी भिक्षूंना भोजन घालणाऱ्याला दंड करावयास सांगितले आहे. यातील आजीवकांचा निर्देश आणि निर्ग्रंथ अथवा जैन साधूंच्या निर्देशाचा अभाव लक्षात येण्यासारखे आहेत. आजीवक पंथाची स्थापना गोसाल मक्खलिपुत्त ह्या वर्धमान महावीराच्या समकालीनाने केली होती आणि स्थापनेपासूनची चारपाच शतके तो भरभराटीत होता असे दिसते. गयेजवळील बराबर टेकडीवरील गुहांतील लेखांत त्या गुहा राजा पियदसीने म्हणजे अशोकाने आजीवकांना दान केल्या असल्याचा उल्लेख आहे. तसेच जवळच्या नागार्जुनी टेकडीवरील तीन गुंफा अशोकाचा नातू दशरथ याने आजीवकांना दान केल्या असल्याचा उल्लेख आहे. अशोकाच्या शिलालेखांतही आजीवकांचा निर्देश निर्ग्रंथांच्या अगोदर केलेला आढळतो. मौर्यकालानंतर

ह्या पंथाला उतरती कळा लागून इसवी सनाच्या प्रारंभाच्या सुमारास तो जवळजवळ नामशेष झाला. यावरून असा निष्कर्ष काढला की आजीवकांचा उल्लेख करणारा व निर्ग्रंथांचा निर्देश न करणारा ग्रंथ मौर्यकालापेक्षा नंतरचा असण्याचा संभव कमी तर तो चूक ठरू नये.

अकराव्या अधिकरणात (११.१.४–५) काही संघांचा नामनिर्देश केला आहे. काम्बोज, सुराष्ट्र आदी वार्त्ताशस्त्रोपजीवी आणि लिच्छिवि, वृजि, मल्ल, मद्र आदी राजशब्दोपजीवी अशा दोन प्रकारच्या संघांचा निर्देश आहे. यांपैकी बहुतेक संघ मौर्यकालानंतर नामशेष झाले होते. फक्त लिच्छिवि संघ गुप्तांच्या कालापर्यंत टिकून होता. नंतरच्या कालात भिन्न संघांचे निर्देश आढळतात – यौधेय, आर्जुनायन, उदुम्वर, आभीर, सनकानीक इत्यादींचे. तेव्हा संघांचा ग्रंथातील निर्देश प्राचीन कालाचा निदर्शक आहे असे मानावयास हरकत असू नये.

प्रस्तुत ग्रंथात आन्वीक्षिकी विद्येचा जो अर्थ केला आहे तोही प्राचीनतेचा निदर्शक समजता येईल. सांख्य, योग आणि लोकायत ही तीन दर्शने म्हणजे आन्वीक्षिकी असें त्यात म्हटले आहे (१.२.१०). ह्या तीन दर्शनांना दिलेले महत्त्व मनुस्मृतिकाराला मान्य होण्यासारखे नव्हते म्हणून त्याने आन्वीक्षिकीचे आत्मविद्येशी ऐक्य प्रस्थापित केले (७.४३). हा अर्थ वराहमिहिराच्या बृहत्संहितेत (१९.११) व कामन्दकाच्या नीतिसारात (२.११) स्वीकृत झाला आहे. परंतु नंतरच्या काली आन्वीक्षिकी म्हणजे तर्कविद्या असा अर्थ केला जाऊन त्या विद्येचे गौतमाच्या न्यायशास्त्राशी ऐक्य प्रस्थापित करण्यात आले. प्रस्तुत ग्रंथात त्या विद्येच्या महतीचे जे वर्णन आहे (१.२.११–१२) ते पहाता तर्कविद्या असा अर्थ स्वीकारता येण्यासारखा नाही. तत्त्वज्ञानविषयक दर्शन असाच अर्थ अभिप्रेत आहे. आणि हा येथील अर्थ सर्वात प्राचीन याविषयी शंका घेण्याचे कारण नाही.

ह्या व इतरही काही प्राचीनतेच्या खुणा ग्रंथात सापडण्यासारख्या आहेत. परंतु यावर असा आक्षेप घेता येईल की ज्या प्राचीन ग्रंथांच्या आधारे प्रस्तुत ग्रंथाची रचना करण्यात आल्याचे म्हटले आहे त्या ग्रंथांतूनच ही प्राचीनतेची निदर्शक चिन्हे उद्धृत झाली असणे संभाव्य आहे, प्रस्तुत ग्रंथाची प्राचीनता त्यामुळे सिद्ध होणार नाही. या आक्षेपात बरेच तथ्य आहे हे मान्य केलेच पाहिजे. आणि हे सुद्धा मान्य केले पाहिजे की ह्या ग्रंथाची रचना कौटिल्याने केली असे मानले तरी त्याने जसा लिहिला तसाच तो सध्या उपलब्ध आहे असे निश्चितपणे म्हणता येण्यासारखे नाही. त्यावर नंतरच्या काली दुसऱ्या कोणाचा हात फिरला असल्याची शक्यता मागे सूचित केली आहे. असे दिसते की ह्या ग्रंथाच्या अध्ययनाची परंपरा लवकरच खंडित झाली. त्यामुळे नंतर त्यात फेरफार

करण्यास अवकाश प्राप्त झाला. तथापि, असा काही थोडा फेरफार झालेला असला तरी त्यामुळे हा ग्रंथ मुळात कौटिल्याने रचला असल्याच्या शक्यतेला बाध येत नाही. निदान कौटिल्याला मान्य असलेली अशीच ह्या शास्त्राची शिकवण ह्या ग्रंथात प्रस्तुत झाली आहे असे समजण्यास काही हरकत नाही.

तथापि, कौटिल्याने निर्धारित केलेले ह्या शास्त्राचे स्वरूप ह्या ग्रंथात पहावयास मिळते हे जरी खरे असले तरी त्यावरून समकालीन परिस्थितीविषयी म्हणजे मौर्यकालाविषयी निष्कर्ष काढणे बरोबर नाही असे वाटते. हे लक्षात ठेवले पाहिजे की हा ग्रंथ कोणत्याही एका राज्यातील परिस्थितीचे वर्णन करण्याच्या उद्देशाने लिहिलेला नाही. कोणत्याही काळच्या लहानमोठ्या सर्व राज्यकर्त्यांना त्यांच्या कारभारासंबंधी मार्गदर्शन करावे असाच त्याचा उद्देश आहे. आणि हे मार्गदर्शन ह्या ग्रंथात राजनीतिशास्त्राच्या प्राचीन परंपरेला अनुसरूनच केले आहे. तेव्हा त्यात जर कोणत्या राजकीय परिस्थितीचे चित्र उमटलेले दिसण्याचा संभव असेल तर तो ह्या शास्त्राच्या प्रस्थापनेच्या काळी अस्तित्वात असलेल्या परिस्थितीचा. कारण, तत्कालीन परिस्थितीचा सर्वांगीण अभ्यास करूनच राजमंडल, सात प्रकृती, अठरा तीर्थे व त्यांचे कामकाज इत्यादीविषयीचे सिद्धांत प्रस्थापित झाले असणार. मौर्य साम्राज्याच्या तुलनेने लहान असलेली त्यावेळची राज्ये विचारात घेऊनच राजमंडलाचा सिद्धांत मांडण्यात आला. त्याचाच अनुवाद प्रस्तुत ग्रंथात केला आहे. ग्रंथाचे हे स्वरूप लक्षात घेतले म्हणजे त्यात मौर्यकालीन राजकारभाराचे चित्रण शोधण्याच्या प्रयत्नांची अनुपपन्नता स्पष्ट होईल. त्या कारभाराचे जे काही थोडे अंश ह्या ग्रंथात असल्याचे प्रतीत झाले आहेत ते अंश पूर्वापार चालत आलेल्या राज्यपद्धतीत अंतर्भूत असलेले असेच आहेत. मौर्यांच्या पद्धतीच्या वैशिष्ट्यांचा त्यात आढळ होत नाही. एका महत्त्वाच्या कालखंडात लिहिलेला म्हणून प्रसिद्ध असलेल्या ग्रंथात त्या कालाचे चित्र उमटू नये याचे आज आपल्याला आश्चर्य वाटणे साहजिक आहे. पण हा शास्त्रग्रंथ आहे. आणि शास्त्र स्थलकालातीत असते अशीच धारणा होती.

कौटिल्य ह्या नावाच्या स्वरूपाविषयीही मतभेद उत्पन्न झाले आहेत. ग्रंथाच्या काही हस्तलिखितांत कौटल्य असे ट–घटित रूप आढळते. तसेच काही टीकाकारांनीही त्याच रूपाचा उपयोग केला आहे. त्यामुळे अनेक पंडितांनी कौटल्य असेच नामाभिधान स्वीकृत केले आहे. परंतु कौटिल्य हे गोत्राचे नाव आहे असे मान्य केले तर त्याच्या स्वरूपाविषयी मतभेदाला अवकाश असू नये. पुरुषोत्तमपंडितकृत गोत्रप्रवरमंजरीत टि–घटित रूपाचाच तीन चार ठिकाणी निर्देश केला आहे. तसेच मुद्राराक्षसातील 'कौटिल्यः कुटिलमतिः' आणि बाणाच्या कादम्बरीतील 'किं वा तेषां सांप्रतं येषाम् . . . कौटिल्यशास्त्रं प्रमाणम्' यात अभिप्रेत

असलेल्या श्लेषावरून टि–घटित रूपच त्यांना परिचित होते हे स्पष्ट आहे. शिवाय महाराष्ट्रातील शुक्ल यजुर्वेदीय माध्यंदिन ब्राह्मणांमध्ये कौटिल्य गोत्र असलेल्या एका कुळकर्णी कुटुंबाची नोंद आहे. मूळ गोत्रनाम कौटल्य असते तर ते बदलून त्याऐवजी कौटिल्य हे थोडेसे निन्दागर्भ नाव कोणी स्वीकारले असल्याची शक्यता नाही. असे दिसते की कौटिल्य नावाने सूचित होणारी कुटिलता दूर करण्याच्या उद्देशाने त्याचे कौटल्य असे रूप बनविले आहे. त्याउलट मूळच्या कौटल्याचे कौटिल्य हे रूप कोणी केले असल्याची शक्यता फार कमी आहे. कुटल शब्दाची व्युत्पत्ती 'कुटं घटं धान्यपूर्णं लान्ति गृह्णाति ते कुटलाः (ज्यांच्याकडे धान्याने भरलेला घडा आहे ते कुटल)' अशी टीकाकारांनी दिली आहे. ती कृत्रिम आहे. त्या अर्थी सुद्धा अन्ती 'ला' धातूऐवजी 'इलं (इलच्)' प्रत्यय असलेले कुटिल हेच रूप अधिक संभाव्य आहे.

ग्रंथातील काही निर्देशांवरून हा ग्रंथकार दक्षिण भारतातील रहिवाशी असावा असे अनुमान करण्यात आले आहे. सूत्र ७.१२.२२–२४ मध्ये दक्षिणा-पथापेक्षा हैमवत पथ (हिमालयाकडे जाणारा व्यापारी मार्ग) अधिक लाभदायक ह्या प्राचीन आचार्यांच्या मताचा प्रतिषेध करून कौटिल्याने स्वतःच्या शब्दांत दक्षिणापथाबद्दल आपली पसंती अभिव्यक्त केली आहे हा त्यापैकी मुख्य निर्देश परंतु दक्षिणापथ म्हणजे दक्षिणेकडील प्रदेश असा अर्थ नसून दक्षिणेकडे जाणारा व तिकडून येणारा व्यापारी मार्ग असा अर्थ आहे. आणि व्यापारी मार्गाचा या शब्दांत निर्देश करणारा मनुष्य स्वतः दक्षिणेत रहाणारा असण्याची शक्यता कमी आहे. उत्तरेकडे व दक्षिणेकडे जाणाऱ्या मार्गांखेरीज पूर्वेकडे व पश्चिमेकडे जाणाऱ्या व्यापारी मार्गांचाही त्या ठिकाणी निर्देश आहे. आणि ह्या सर्व मार्गांचा निर्देश भारतातील मध्यवर्ती ठिकाणाहून केला गेला असणेच अधिक संभाव्य आहे. प्राचीन आचार्य व कौटिल्य यांच्यातील मतभिन्नतेविषयी असे म्हणता येईल की प्राचीन आचार्यांच्या काळापेक्षा कौटिल्याच्या काळी दक्षिणेकडील व्यापारी वाहतूक अधिक भरभराटीस आली होती. त्यावरून कौटिल्याच्या मूळ निवास-स्थानाचे अनुमान करणे उचित नाही. एका प्राचीन कथेनुसार चाणक्य (कौटिल्य) वायव्येकडील प्रदेशातील तक्षशिला नगराचा रहिवाशी होता (बौद्ध ग्रंथ महावंसवरील टीका). ते असंभाव्य नाही.

## प्राचीन राजनीतिशास्त्र

कौटिलीय अर्थशास्त्र हा प्रस्तुत ग्रंथ भारतातील प्राचीन राजनीतिशास्त्रावरील सर्वात जुना आणि परिपूर्ण असा ग्रंथ आहे. त्या शास्त्राच्या स्वरूपाची यथार्थ कल्पना जशी ह्या ग्रंथावरून येऊ शकते तशी अन्य कोणत्याही ग्रंथावरून येण्यासारखी

नाही. हेच त्याला अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त होण्याचे प्रधान कारण. हा ग्रंथ चंद्रगुप्तसमकालीन कौटिल्यानेच लिहिला आहे असे निर्विवादपणे सिद्ध झाले आणि विशेषत: त्यात मौर्यकालीन परिस्थितीचे चित्रण आहे असे दाखविता आले तर त्याच्या महत्त्वात मोलाची भर पडेल यात संशय नाही. वरील विवेचनात कौटिल्याची शिकवण ह्या ग्रंथात प्रस्तुत करण्यात आली आहे असे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे, पण त्याचबरोबर यात मौर्यकालीन स्थितीचे विस्तृत दर्शन घडते असे समजणे योग्य नाही असा विचार मांडला आहे. पण यामुळे इतिहास-दृष्टया ह्या ग्रंथाचे महत्त्व कमी झाल्यासारखे वाटले, तरी राजनीतिशास्त्राच्या दृष्टीने त्याच्या महत्त्वाला मुळीच बाध येत नाही.

ह्या शास्त्राचा बोध प्रस्तुत ग्रंथाच्या वाचनाने होईलच. त्यावरून एक गोष्ट चटकन लक्षात येते ती ही की ह्या शास्त्रात राज्यकारभाराच्या तपशिलावरच सर्वस्वी भर दिला आहे. राज्यसंस्थेचे उद्दिष्ट काय, विविध प्रकारच्या राज्य-पद्धती व त्यांचे गुणावगुण, प्रजेचे राज्यातील स्थान इत्यादी तात्त्विक विषयांची चर्चा अशी केलेली त्यात आढळत नाही. पाश्चात्य देशांत प्लेटो-ॲरिस्टॉटलच्या वेळेपासून राज्यशास्त्राचा जो विकास झाला आहे तो पाहिला की ही उणीव लक्षात आल्याशिवाय रहात नाही. याचे कारण (मागे एके ठिकाणी सूचित केल्याप्रमाणे) ह्या शास्त्राचे मूळ प्रवर्तक जे पुरोहित त्यांना राजेशाहीच परिचित होती. व तीच पद्धती स्वाभाविक असे त्यांना वाटत होते हे असावे. संघराज्याचे अस्तित्व त्यांना अवगत होते पण त्यांना सार्वभौम राजाने आपल्या अंकित करून घ्यावे हा विचार त्यांनी मांडलेला दिसतो. त्या दोन राज्यपद्धतींची तात्त्विक चर्चा करण्याची आवश्यकता त्यांना वाटली नाही.

व्यक्ती व राज्यसंस्था यांच्या परस्परसंबंधाची चर्चाही या शास्त्रात केलेली नाही. त्याचे कारण उघड आहे. उभयतांची कर्तव्ये पुरातन कालापासून ठरून गेलेली आहेत. वर्णाश्रमधर्मानुसार प्रत्येक व्यक्तीचा स्वधर्म निर्धारित झालेला असल्यामुळे त्याचा राज्यसंस्थेशी संबंध त्या स्वधर्माच्या संदर्भातच येणे संभाव्य होते. त्याचप्रमाणे राजाचे कर्तव्य अथवा त्याचा स्वधर्म हाही ठरून गेला होता. तेव्हा तात्त्विक चर्चेला फारसा अवकाशच नव्हता.

प्रस्तुत ग्रंथात राज्यसंस्थेच्या उत्पत्तीविषयीचे काही विचार एके ठिकाणी आढळतात. मात्स्यन्यायाने त्रस्त झालेल्या लोकांनी वैवस्वत मनूला राजा केले आणि रक्षणाच्या मोबदल्यात त्याला धान्याचा सहावा भाग, इतर पदार्थांचा दहावा भाग आणि द्रव्य देण्याचे ठरवून दिले (१.१३.५–६) असे तेथे म्हटले आहे. राज्यसंस्थेची उत्पत्ती बळी तो कान पिळी ह्या अराजकाच्या परिस्थितीतून मार्ग काढण्यासाठी म्हणून करण्यात आली आणि तसे करताना रक्षणकर्ता राजा

नि (वाय) ३१७-४ अ

व त्याच्या रक्षणाखाली असलेली प्रजा यांच्यात एक प्रकारचा करार झाला होता असा हा विचार आहे. परंतु ह्या विचाराचा परिपोष करून तद्विषयक सिद्धांत प्रस्थापित करण्याचा प्रयत्न या ग्रंथात केलेला नाही. विशेष म्हणजे हा विचार एका गुप्त हेराच्या भाषणात प्रकट करण्यात आला आहे. लोक राजनिष्ठ आहेत की नाहीत हे पहाण्याच्या उद्देशाने लोकसमुदायात एका हेराने राजा अन्यायी असल्याचे म्हटले असता दुसऱ्या हेराने त्याचे म्हणणे खोडून काढण्याच्या उद्देशाने करावयाच्या भाषणात ह्या विचारसरणीचा ओझरता उल्लेख केला आहे इतकेच. त्याच भाषणात त्या हेराने पुढे असे म्हणावयाचे आहे की राजे हे पृथ्वीवर इंद्र व यम यांच्या स्थानी असून त्यांचा अवमान केल्यास मनुष्याला दैवी शासनही मिळते (१.१३.१०–११) हा सुद्धा राजात दैवी अंश असल्याविषयीचा अथवा तो देवतेचा अवतार असल्याविषयीचा सिद्धात असा मांडलेला नाही. लोकानी राजनिष्ठ रहावे म्हणून अवलंबिलेला तो एक युक्तिवाद आहे.

परंतु या व इतर तात्त्विक प्रश्नांची चर्चा ह्या शास्त्रात विस्तृतपणे केलेली आढळत नाही म्हणून त्याचे महत्त्व कमी होते अशातला भाग नाही. त्याचे उद्दिष्टच निराळे आहे. राज्यकारभार कशा रीतीने केला असता तो यशस्वी होईल व तो राजा व प्रजा ह्या उभयतांना सुखप्रद व हितकारक ठरेल याचे सविस्तर विवेचन करणे हेच या शास्त्राचे उद्दिष्ट. हे उद्दिष्ट तात्त्विक चर्चेपेक्षा कमी महत्त्वाचे आहे असे समजण्याचे कारण नाही. व्यावहारिकदृष्टया ते अधिक उपयुक्त ठरावे असेच आहे.

प्रस्तुत ग्रंथाच्या – आणि पर्यायाने ह्या शास्त्राच्या – शिकवणीवर एक मोठा आक्षेप नेहमी घेण्यात येतो तो असा की तिच्यात अनेक प्रसंगी अनीतिमय उपायाची योजना करण्याची शिफारस केली आहे. गुप्त रीतीने कोणाची हत्या घडवून आणणे, त्यासाठी शस्त्राचा उपयोग करण्यात तत्पर असे तीक्ष्ण आणि विषप्रयोग करण्यात हुशार असे रसद ह्या गूढ पुरुषांना पदरी बाळगणे, कलागती लावून दोन पक्षात भेद घडवून आणणे आणि त्यांच्यात फूट पडली की दोघाचाही नाश करणे, सर्वत्र गुप्त हेराचे जाळे पसरवून सर्व लहानथोर प्रजाजनांच्या हालचालींवर नजर ठेवणे, लोकांच्या अंधश्रद्धेचा फायदा घेऊन पैसे उकळणे इत्यादी सुचविलेले अनेक उपाय असे आहेत की ज्यांचे नीतिनियमांच्या आधारे समर्थन करता येणार नाही. अन्यत्र स्वधर्माचे पालन करण्याविषयी आग्रह धरणाऱ्या आणि धर्मानुसार आचरण ठेवावे असा उपदेश करणाऱ्या कौटिल्याने ह्या अनीतिमय मार्गांचा अवलंब करण्याची शिफारस करावी याबद्दल आश्चर्य व्यक्त करण्यात आले आहे, इतकेच नाही तर 'भारद्वाजाने केलेला राज्य बळकावण्याविषयीचा उपदेश अधर्मिष्ठ आहे (५.६.३२)' किंवा 'सत्यवचन

अथवा शपथ इहलोकी तसेच परलोकी स्थैर्य उत्पन्न करतात (७.१७.४–५)' असे जे कौटिल्याच्या स्वत:च्या शब्दांत मतप्रदर्शन करण्यात आले आहे ते सर्व केवळ दिखाऊ आहे, ती मते कौटिल्याने प्रामाणिकपणे मनापासून स्वीकारलेली अशी नाहीत, त्याच्यात खऱ्या धार्मिकतेचा लवलेशही नाही असे सुद्धा म्हटले गेले आहे. ह्या आक्षेपांचा विचार करणे आवश्यक आहे.

पहिली गोष्ट अशी की एक व्यक्ती म्हणून राजाने आचरणात आणावयाची नीती आणि राज्यकर्ता म्हणून त्याने अवलंब करावयाची नीती यात भेद करणे आवश्यक आहे. जी गोष्ट व्यक्तीने केली असता निन्द्य, अनीतिमय ठरेल ती गोष्ट राज्याच्या सुरक्षिततेच्या अथवा हिताच्या दृष्टीने अनेकदा आवश्यक म्हणून अनिंदनीय ठरते. कोणालाही फसविणे वाईट, परंतु शत्रूला फसवून त्याच्यावर मात करणे यात काही दोष नाही. कोणाचाही प्राण घेणे हे व्यक्तिदृष्टचा मोठे पाप, परंतु ज्याने मोठा गुन्हा केला असेल त्याला देहान्त शासन करणे राजाचे कर्तव्य ठरते. तेव्हा व्यक्तीच्या संबंधातील नीतिमत्तेचे निकष राज्यकारभारा-विषयीच्या व्यवहाराला लागू करू पहाणे योग्य नाही. नीतिशास्त्र व राजनीति-शास्त्र यांत फरक आहे. हे खरे आहे की प्लेटोपासून स्फूर्ती घेऊन अनेक पाश्चात्य चिंतकांनी त्या दोहोंत भेद मानलेला नाही. त्याचे कारण असे दिसते की त्यांनी आपले लक्ष तात्त्विक विवेचनावरच केंद्रित केले होते, राज्यकारभाराच्या तपशिलाची त्यांनी उपेक्षाच केली. दुसरे असे की गर्हणीय वाटणाऱ्या ह्या उपायांची योजना जे राजद्रोही असतील व धर्मबाह्य आचरण करीत असतील त्यांच्या बाबतीतच करावयास सांगितले आहे (एवं दूष्येष्वधार्मिकेषु च वर्तेत, नेतरेषु, ५.२.६९). तेव्हा ह्या शास्त्रात राज्यकर्त्याला मनास येईल त्याप्रमाणे प्रजाजनांवर अत्याचार करण्याची व त्यांना हवे तसे लुबाडण्याची मुभा दिली आहे असे समजणे बरोबर नाही. आणखी एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. हे जे अनीतिमय वाटणारे उपाय शास्त्रात निर्दिष्ट झाले आहेत त्यांचा प्रत्यक्ष व्यवहारात सर्व देशात व सर्व काळी अवलंब करण्यात आला आहे. आज सुद्धा राष्ट्राच्या सुरक्षिततेसाठी म्हणून अथवा हितासाठी म्हणून अनैतिक वाटणाऱ्या उपायांचा उपयोग करण्यास कोणी मागेपुढे पहात नाही.

यासंबंधात कौटिल्याची मॅकिआव्हेली ह्या इटालियन राजनीतिज्ञ पंडिताशी तुलना करण्यात आली आहे. ह्या उभयतांच्या विचारसरणीत साम्य आहे यात शंका नाही. मॅकिआव्हेलीच्या विवेचनाचे सार पुढीलप्रमाणे सांगता येईल : (१) ज्याच्याशी शत्रुत्व असेल त्याचा नि:पात केलाच पाहिजे, मग त्यासाठी कोणत्याही सुष्टदुष्ट उपायाचा अवलंब केला तरी हरकत नाही. (२) एखाद्या समूहाचा, पक्षाचा अथवा राष्ट्राचा घटक म्हणून व्यक्तीकडून

अपेक्षित असलेले आचरण आणि व्यक्तीव्यक्तीमधील परस्पर आचरण हे भिन्नभिन्न आहेत. कौटिल्याच्या (आणि ह्या शास्त्राच्या) विवेचनात हे दोन्ही मुद्दे गृहीत धरले आहेत हे उघड आहे. या मतांचा पुरस्कार केल्याबद्दल मॅकिआव्हेलीवर गहजब झाला. जेसुइट लोकांनी त्याची प्रतिमा करून तिचे दहन केले, त्याच्या ग्रंथांवर बहिष्कार घालण्याचे आदेश काढण्यात आले, त्याच्या मतांचे खंडन करण्याच्या उद्देशाने अनेक ग्रंथ लिहिण्यात आले आणि अद्यापपावेतो त्याच्या नावाला चिकटलेला कलंक दूर झालेला नाही. परंतु ज्यांनी मॅकिआव्हेलीच्या ग्रंथांचा नीट अभ्यास केला आहे त्यांना आता हे पटले आहे की त्याने प्रत्यक्ष राजकीय व्यवहाराचे सूक्ष्म निरीक्षण करूनच आपली मते बनविली आहेत आणि मॅकिआव्हेली म्हणतो त्याप्रमाणेच राजकीय व्यवहार सतत चालत आले आहेत.

कौटिल्यावर अशा प्रकारचा गहजब झाला नाही. तथापि, अलीकडे असा एक दावा करण्यात आला आहे की अर्थशास्त्रातील क्रूरतेला आणि अधार्मिकतेला बौद्धांनी व जैनांनी कडाडून विरोध केला, ब्राह्मणांनी सुद्धा आपल्या ग्रंथांत नीतिमूल्यांची जोपासना केल्यामुळे धर्मशास्त्राच्याद्वारा अर्थशास्त्राचे उच्चाटण झाले आणि हिंदूंनी त्याच्या शिकवणीचा त्याग करून अशोकाने घालून दिलेल्या आचारसंहितेचाच स्वीकार केला आहे. यांपैकी कोणतेही विधान वास्तवावर आधारलेले नाही.

अश्वघोष ह्या बौद्ध ग्रंथकाराने बुद्धचरितात 'राजधर्म' दंडप्रधान असल्यामुळे तो बुद्धाच्या दृष्टीने अस्वीकार्य म्हटले आहे त्याचे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. परंतु त्यात प्रस्तुत शास्त्राला केलेला विरोध नसून गौतमबुद्धासारख्याला राजेपदाचा उपभोग घेण्याचे आकर्षण का वाटत नाही त्याचे कारण सांगितले आहे. नन्दिसूत्र ह्या जैनांच्या धर्मग्रंथात 'कोडिल्लय (कौटिलीय)' ह्याचा समावेश मिथ्याशास्त्रांच्या यादीत केला आहे हे खरे आहे. परंतु ती यादी जैन धर्मतत्त्वांच्या दृष्टीने अस्वीकार्य अशा ग्रंथांची आहे आणि तिच्यात वेदासारख्या ग्रंथाचाही समावेश आहे. विशेष म्हणजे लंकावतारसूत्र ह्या बौद्ध ग्रंथात कौटिल्याला 'ऋषि' म्हणून संबोधण्यात आले आहे. तसेच सोमदेव ह्या जैन आचार्याने नीतिवाक्यामृत नावाचा ग्रंथ ह्याच शास्त्रावर लिहिला आहे. तो बहुतांशी कौटिलीय अर्थशास्त्रावर आधारलेला असून त्यात प्रस्तुत ग्रंथकाराचा 'नयविद्‌भिः' ह्या शब्दात गौरवपूर्ण निर्देश केला आहे. तेव्हा बौद्धांनी व जैनांनी ह्या शास्त्राचे खंडन केले हे खरे नाही.

ब्राह्मण ग्रंथकारांनी ह्या शास्त्राची शिकवण त्याज्य ठरविली हे सुद्धा खरे नाही. मुद्राराक्षसकार विशाखदत्तावर ह्या शिकवणीचा फार प्रभाव पडला होता

आणि त्याला कौटिल्य अथवा चाणक्य ह्याच्या व्यक्तिमत्त्वाचे विशेष आकर्षण वाटत होते हे स्पष्ट आहे. दंडीच्या दशकुमारचरितात ह्या शास्त्राच्या शिकवणुकीचा उपहास करण्यात आला आहे असे प्रथमदर्शनी वाटते. परंतु खरी गोष्ट अशी आहे की हा उपहास एका राजाच्या एका दुष्ट सेवकाच्या तोंडी घातला आहे. तसे करण्यात त्या सेवकाचा उद्देश त्या राजाने शास्त्राप्रमाणे वागण्याचे सोडून देऊन व्यसनांच्या आहारी जावे आणि आपला नाश ओढवून घ्यावा असा आहे. त्या सेवकाचा तो बेत सिद्धीस जातो आणि त्या राजाचा शत्रूकडून नाश होतो. यावरून ह्या शास्त्राच्या शिकवणुकीचा त्याग केल्यास नाश होतो असेच दंडीला म्हणावयाचे आहे हे स्पष्ट आहे. बाणाच्या कादंबरीत अतिक्रूर उपायांचा उपदेश करणारे म्हणून कौटिल्यशास्त्र निंदनीय मानले आहे हे खरे आहे. परंतु शुकनास ह्या सर्व दृष्टींनी आदर्श असलेल्या अमात्याच्या वचनातील अशा प्रकारचा निर्देश अपवादात्मक स्वरूपाचाच समजला पाहिजे.

धर्मशास्त्राने अर्थशास्त्राचे उच्चाटण केले हे अंशतःच खरे आहे. न्यायदान व कायदा यांच्या बाबतीतच फक्त हे घडले. बाकीचे या शास्त्राचे मुख्य विषय– राज्यकारभाराची पद्धती व परराष्ट्रसंबंध – यांची उत्तरकालीन धर्मशास्त्र-विषयक ग्रंथांनी उपेक्षाच केली आहे. तथापि, त्यामुळे ह्या शास्त्राचे अस्तित्वच नष्ट झाले होते असे समजण्याचे मुळीच कारण नाही. ह्या शास्त्राचे व त्यावरील कौटिल्याच्या ग्रंथाचे सतत अध्ययन होत राहिले हे कामन्दकाचा नीतिसार आणि सोमदेवाचा नीतिवाक्यामृत ह्या ग्रंथांच्या निर्मितीवरून स्पष्ट आहे. आणि भास, कालिदास, विशाखदत्त, दण्डी, बाण यांना हे शास्त्र व त्यावरील हा ग्रंथ हे परिचित होते याविषयी शंका घेण्यास जागा नाही. तसेच मल्लिनाथ, चारित्रवर्धन प्रभृती चौदाव्या-पंधराव्या शतकांतील टीकाकारांनी ह्या ग्रंथातील वचने आधारासाठी उद्धृत केली आहेत त्यावरून हा ग्रंथ सतत अध्ययनाचा विषय होता असाच निष्कर्ष निघतो.

वरील विवेचनावरून हे सुद्धा स्पष्ट होईल की हिंदूंनी ह्या शास्त्राची शिकवण झिडकारून टाकली असे म्हणणे बरोबर नाही. असा समज पुष्कळांचा झालेला दिसतो की कौटिल्य धर्म वगैरे काही जाणत नव्हता, तो जर धर्माचा व धर्माचरणाचा पुरस्कार करताना कोठे दिसला तर तो सर्व बाह्यात्कारी देखावा आहे. अशी समजूत करून घेण्याचे खरोखर काही कारण नाही. ज्या ग्रंथकाराने धर्मशास्त्राप्रमाणेच वर्णाश्रमधर्माचे वर्णन करून त्याचे पालन करणे हे राजाचे कर्तव्य असल्याचे म्हटले आहे (अध्याय १.३) आणि ज्याने विजिगीषूला दुसरे राज्य जिंकून घेतल्यावर तेथे वर्णाश्रमधर्माला अनुसरून व्यवस्था प्रस्थापित करण्याचा उपदेश केला आहे (१३.४.६२) त्या ग्रंथकाराला धर्माची काही

चाड नव्हती व तो जेव्हा अमूक गोष्ट धर्माला सोडून होईल असे म्हणतो तेव्हा ते सर्व त्याचे ढोंग आहे असे समजणे म्हणजे त्याच्यावर मोठाच अन्याय करण्यासारखे आहे.

आणि हिंदूंनी कोटिल्याला झिडकारून अशोकाचा मार्ग चोखाळला आहे ह्याचा अर्थ जर असा असेल की अशोकाचा 'धम्म' हा तत्पूर्वी भारतात सर्वस्वी अपरिचित होता, निदान अर्थशास्त्रात त्याचा मागमूस आढळणार नाही तर तोही बरोबर नाही. धर्मशास्त्राला अनुसरून प्रस्तुत ग्रंथात सुद्धा 'सर्व मनुष्यांचा – मग ते कोणत्याही वर्णाचे असोत अथवा कोणत्याही आश्रमात असोत – अहिंसा, सत्य, शौच, अनसूया, आनृशंस्य आणि क्षमा हा धर्म होय (१.३.१३)' असे म्हटले आहे. अशोकाचा धम्म याहून भिन्न नाही. भारतातील लोक अशोकाच्या धर्माचे पालन करीत आले आहेत असा जर म्हणण्याचा उद्देश असेल तर ते अर्थशास्त्रात उद्धृत केलेल्या वरील धर्माचेही पालन करीत आले आहेत हे मान्य करावयास हरकत असू नये.

अशोकाचा मार्ग चोखाळला याचा जर असा अर्थ असेल की त्यानंतरच्या भारतातील राज्यकर्त्यांनी राजनीतिशास्त्राची शिकवण झुगारून देऊन धर्मप्रसार करण्यावरच भर दिला तर तोही स्वीकारता येण्यासारखा नाही. खरी गोष्ट अशी आहे, की अति मोठ्या प्रमाणावर मनुष्यसंहार झालेल्या कलिंगयुद्धात विजय मिळवून सर्व विरोध मोडून काढला आणि मौर्य साम्राज्य सुस्थिर झाले तेव्हाच धर्मप्रसार करण्याचे अशोकाच्या मनात आले व ते करणे त्याला शक्य झाले. तथापि, त्या वर्तनाशी सुसंगतता राखण्यासाठी म्हणून त्याने सैन्याचे विसर्जन करून राज्यरक्षणाच्या कार्यात शिथिलता आणली असल्याची शक्यता नाही. त्याने खरोखरच तसे केले असते तर त्याच्या साम्राज्यात कोठे ना कोठे बंडाळी अवश्य उद्भवली असती आणि मग त्याला अर्थशास्त्रविहित उपायांचाच अवलंब करणे भाग पडले असते. आणि मौर्यांचे सैन्य विसर्जित झाले नव्हते ही गोष्ट शेवटच्या मौर्य सम्राटाचा खून, सैन्याची कवायत चालू असता त्याच्या सेनापतीने केला यावरून स्पष्ट आहे. वस्तुतः अशोकाचा धर्म व्यक्तीसाठी आहे आणि क्वचित काही थोड्या व्यक्ती तो प्रत्यक्ष आचरणात आणू शकतात. परंतु व्यक्तिशः धर्मनिष्ठ असणाऱ्या राज्यकर्त्याला सुद्धा प्रसंगविशेषी व्यक्तिविशिष्ट धर्माशी विरुद्ध असलेला व्यवहार करावा लागतो आणि राज्यकर्ता या नात्याने तोच त्याचा धर्म ठरतो.

धर्मनिष्ठ राजे भारतात व अन्यत्रही अशोकाच्या पूर्वी आणि त्याच्या नंतर होऊन गेले यात शंका नाही. आणि नंतरच्या काही राजांनी आपल्यापुढे अशोकाचा

आदर्श ठेवला असण्याची शक्यता आहे. परंतु कोणीही राजा कितीही धर्मपरायण व ध्येयवादी असला तरी राज्यकारभार करताना त्याला प्रमुखतया ह्या शास्त्रानुसारच वागावे लागते. ते अपरिहार्य आहे. मोठे साम्राज्य असले तर कोठे बंड होऊ नये व कोणताही प्रांत फुटून स्वतंत्र होऊ नये याची काळजी घेणे आवश्यक होते. राज्य लहान असले तर आजूबाजूची राज्ये आपल्याला उपद्रव देणार नाहीत किंवा आपले राज्य गिळंकृत करणार नाहीत यविषयी सावधगिरी बाळगावी लागते. आणि हे सर्व साध्य करण्यासाठी ह्या शास्त्रात वर्णिलेल्या साम, दान, भेद व दंड ह्याच उपायांचा परिस्थिती असेल त्याप्रमाणे वापर करणे भाग पडते. तेव्हा अशोकाचे अनुकरण करून नंतरच्या राजांनी ह्या शास्त्राचा अव्हेर केला होता असे समजणेही बरोबर नाही. कारण, ह्या शास्त्राशी परिचय नसला तरी प्रत्यक्ष राज्यधुरा वहावयाची असता जे जे उपाय योजणे आवश्यक होते ते सर्व यात निर्दिष्ट झालेले आढळतील. याचे कारण उघड आहे. हे शास्त्र प्राधान्येकरून वास्तवावर आधारलेले असून प्रत्यक्षात आढळून येणाऱ्या परिस्थितीच्या अनुरोधाने रचण्यात आले आहे.

उदाहरणार्थ, यातील राजमंडलाच्या सिद्धांताची उभारणी दोन गृहीतकृत्यांच्या आधारे करण्यात आली आहे. एक, शेजारीशेजारी असलेल्या दोन राज्यांमध्ये शत्रुत्व उत्पन्न होते हे, आणि दुसरे, एकच शत्रुराज्य असलेली दोन राज्ये परस्पर मैत्रीने बांधली जातात हे. ह्या गृहीत कृत्यांना वास्तवाचा, प्रत्यक्ष अनुभवाचा आधार आहे. भारतातच नव्हे तर सर्वत्र आणि सर्व काळी ह्या अनुभवाचे प्रत्यंतर आले आहे. तेव्हा राजमंडलाच्या सिद्धांताच्या अनुरोधाने केलेले परराष्ट्रसंबंधाचे विवेचन प्रत्यक्ष व्यवहारात उपयुक्त ठरावे यात आश्चर्य नाही.

तसेच अंतर्गत कारभारासंबंधीचे ह्या शास्त्रातील विवेचनही वास्तवावर आधारलेले आहे. मंत्री अथवा अमात्य नेमणे प्रत्येक राज्यात आवश्यकच असे. पुरोहित नेमण्याची पुरातन प्रथा सुद्धा पुढे अनेक राज्यांनी चालू ठेवली होती. समाहर्ता (राज्यातील उत्पन्नाच्या वसुलीची व्यवस्था पहाणारा) आणि संनिधाता (जमा झालेल्या राज्याच्या उत्पन्नाची कोठारे सांभाळणारा) हे दोन ह्या शास्त्रात निर्दिष्ट झालेले मुख्य अधिकारी भारताच्या परिस्थितीत सर्वत्र आवश्यक ठरले आहेत. कदाचित त्यांना कोठे भिन्न नावे दिली असतील इतकेच. या ग्रंथात ज्या खात्यांचा निर्देश आहे त्यांपैकी बहुतेक आवश्यक अशीच आहेत. राज्याच्या विस्ताराच्या अनुरोधाने काही कमीजास्त होतील तेवढेच. ह्या ग्रंथातील कायदा धर्मशास्त्रातील कायद्याहून मूलत: भिन्न नाही आणि निरनिराळ्या काळी व निरनिराळ्या राज्यांत थोड्याफार फरकाने ह्याच कायद्याची अंमलबजावणी होत आली आहे. समाजकंटकांचा बंदोबस्त, गुन्ह्यांचा तपास

इत्यादीविषयींचे ह्या शास्त्रातील विवेचन इतके वास्तवावर आधारलेले आहे की ते कोठेही व केव्हाही लागू पडावे. विविध प्रकारचे गूढ पुरुष अथवा हेर आणि त्यांच्यावर सोपविलेली अनेकविध कामगिरी यांचे जे या शास्त्रात विस्तृत वर्णन आहे त्यासंबंधात असे म्हणावयास हरकत नाही की यातसुद्धा प्रत्यक्ष वस्तुस्थितीचेच चित्रण आहे. अशाप्रकारच्या गुप्त पोलिसांची स्वतःच्या राज्यात योजना आणि गुप्त हेरांची योजना सर्वच राज्ये नेहमी करीत आली आहेत. तेव्हा ह्या ग्रंथाचे अध्ययन करणाऱ्या राज्यकर्त्यांना त्यापासून मार्गदर्शनाचा लाभ झाला असेल यात शंका नाही.

आता सध्याच्या परिस्थितीत हे शास्त्र कितपत उपयुक्त ठरेल असा प्रश्न विचारता येण्यासारखा आहे. ज्या राजकीय परिस्थितीचे चित्र ह्या शास्त्रात उमटले आहे ती आता अस्तित्वात राहिलेली नाही हे उघड आहे. भारतात एकतंत्री राज्यपद्धती नामशेष होऊन तिची जागा संसदीय लोकशाही पद्धतीने घेतली आहे. राज्यकारभाराच्या व्यवस्थेतही पुष्कळच बदल झाला आहे. त्यावेळी अस्तित्वात असलेली अर्थव्यवस्था व आज घडविली जात असलेली अर्थव्यवस्था यात काही साम्य नाही असे वाटण्यासारखे आहे. आणि वर्णाश्रमधर्माचे संरक्षण करणे हे आता राज्यसंस्थेचे कर्तव्य मानले जात नाही, इतकेच नाही तर सर्व नागरिकांना समानतेने वागविणे हेच तिचे उद्दिष्ट ठरले आहे पण हे सर्व असे असले तरी आज ह्या शास्त्राची शिकवण अगदी गैरलागू झाली आहे अशातला प्रकार नाही. राजाने विद्यांचे अध्ययन करून विनयसंपन्न व्हावे, त्याने आपली इंद्रिये ताब्यात ठेवली पाहिजेत आणि विद्यावृद्ध लोकांशी सतत संपर्क ठेवला पाहिजे असे जे ह्या शास्त्रात प्रतिपादन केले आहे ते मंत्रिपदी असणाऱ्या आजच्या राज्यकर्त्यांनाही उपयुक्त ठरावे. प्रजेच्या योगक्षेमाची काळजी वहाणे हे या शास्त्रातील राजाचे कर्तव्य आज सुद्धा पार पाडण्याचे प्रयत्न होत आहेतच. प्रजेच्या सुखातच राजाचे सुख आणि प्रजेचे हित तेच राजाचे हित हा या शास्त्रातील सिद्धांत आजही निरर्थक नाही. अमात्यांच्या अंगी जे गुण असणे ह्या शास्त्रात आवश्यक मानले आहेत ते गुण अल्पांशानेही आजच्या सरकारी अधिकाऱ्यांच्या अंगी असतील तर ते निःसंशय लोकादरास पात्र होतील. सरकारी नोकरांच्या संभाव्य भ्रष्टाचाराचे व लाचलुचपतीच्या प्रकारांचे वर्णन इतके यथातथ्य आहे की आजही ते सर्वत्र तसेच अनुभवास येतात आणि त्यावर सांगितलेली उपाययोजना प्रायः त्याच पद्धतीने अंमलात आणली जात आहे. कारागिरांवर व व्यापाऱ्यांवर ठेवावयास सांगितलेले नियंत्रण थोडयाफार फरकाने आजही आवश्यक मानले जात आहे. गुन्ह्यांचा तपास करण्यासंबंधीचा या शास्त्रातील तपशील तर अगदी आधुनिक वाटण्यासारखा

आहे. यातील कायदा आता कालवाह्य होऊन त्याची जागा हिंदू कोडने घेतली आहे. परंतु धर्मशास्त्रान्तर्गत कायद्याच्या बावतीतही तेच घडले आहे. आधुनिक काळी घडून आलेल्या सामाजिक परिवर्तनाचा तो परिणाम आहे. सारांश, राज्यकारभाराच्या बावतीत ह्या शास्त्रापासून काहीच शिकण्यासारखे नाही असा समज करून घेण्याचे कारण नाही.

सध्याच्या परिस्थितीत परराष्ट्रसंबंधाच्या बावतीत ह्या शास्त्रातील विवेचन लागू पडण्यासारखे नाही असे वाटण्याचा संभव आहे. कारण भारतात आता राजमंडलाच्या सिद्धांतात अभिप्रेत असलेली परिस्थिती राहिलेली नाही. परंतु ह्या सिद्धांताचा पडताळा आज आंतरराष्ट्रीय स्तरावर येतो असे म्हणणे चूक नाही. शेजारीशेजारी असलेल्या दोन राष्ट्रांत संघर्ष उत्पन्न होणे, समान शत्रू असलेल्या दोन राष्ट्रांत मैत्री घडून येणे, अशा रीतीने राष्ट्रांचे दोन परस्परविरुद्ध गट बनणे व त्यांचे एकमेकांवर मात करण्याचे प्रयत्न होत रहाणे ह्या राज-मंडलाच्या सिद्धांताला अनुसरून होणाऱ्या गोष्टी आज पृथ्वीच्या पाठीवर घडत असलेल्या दिसतातच. आणि ह्या शास्त्रात ज्या सन्धिविग्रहादी धोरणांचे विस्तृत विवेचन आहे त्यांचाच प्रसंगानुरूप अवलंब आजची राष्ट्रे करीत आहेत. आज सुद्धा राष्ट्राराष्ट्रामधील व्यवहारात साम, दान, भेद व दंड ह्याच उपायांची योजना करणे प्राप्त होते. ह्या उपायांच्या सिद्धीसाठी सर्व राष्ट्रे परकी राष्ट्रांत हेरांचे जाळे निर्माण करतात तसे ते निर्माण करण्यास ह्या शास्त्रात सांगितलेलेच आहे. राज्याने आपले स्वतःचे हित साधण्याकडेच लक्ष दिले पाहिजे, त्यासाठी भल्याबुऱ्या कोणत्याही मार्गाचा अवलंब करावयास हरकत नाही अशी जी ह्या शास्त्राची शिकवण आहे तिचेच पालन आजची राष्ट्रे उघडपणे अथवा प्रच्छन्नपणे करीत असलेली दिसतात. ह्या शास्त्राने विजिगीषूपुढे इतर सर्व राज्यांवर आपले वर्चस्व प्रस्थापित करण्याचा जो आदर्श ठेवला आहे त्याप्रमाणे वागण्याचे वड्या राष्ट्रांचे सतत प्रयत्न चालू आहेत. तेव्हा आजच्या परिस्थितीत हे शास्त्र गैरलागू झाले आहे असे समजण्याचे कारण नाही. जर कधी काळी जगातील सर्व राष्ट्रांवर समर्थपणे नियंत्रण ठेवू शकणारी एकमेव अशी सत्ता प्रस्थापित झाली तरच ह्या शास्त्रातील सिद्धांतांना अवकाश न राहिल्यामुळे ते कालवाह्य ठरेल. परंतु तसे घडून येईपर्यंत ह्या शास्त्राची ओळख नसलेली अशी राष्ट्रे सुद्धा प्रायः यातील शिकवणूकच अंमलात आणीत असलेली दृष्टीस पडतील यात संशय नाही.

**प्रस्तुत भाषांतर व टीपा**

प्रस्तुत भाषांतरासाठी मुंबई विद्यापीठाने प्रसिद्ध केलेल्या प्रतीचा उपयोग केला आहे. तेथे असंख्य पाठभेदांचा निर्देश आहे. पण प्रस्तुत ठिकाणी अनावश्यक

म्हणून ते उद्धृत केले नाहीत. फक्त टीपांमध्ये काही महत्त्वाच्या पाठभेदांचा विचार केला आहे. मूळ प्रतीतील मुद्रणदोष दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. येथे नवीन मुद्रणदोष उद्भवणार नाहीत अशी आशा आहे.

भाषांतर शब्दश: केले असले तरी ते सुबोध करण्याचा शक्य तितका प्रयत्न केला आहे. प्रस्तुत ग्रंथात अशी अनेक स्थळे आहेत की त्यांचा निश्चित अर्थ लावणे कठीण आहे. तशांपैकी बऱ्याच ठिकाणी प्राचीन टीकाकारांनी व आधुनिक अभ्यासकांनी निरनिराळे अर्थ केले आहेत. त्या सर्वांचा येथे विचार करणे शक्य नव्हते. तथापि ते विचारात घेऊनच योग्य असा वाटणारा अर्थ प्रस्तुत केला आहे. काही ठिकाणी – विशेषत: चौदाव्या अधिकरणात – भाषांतरापासून निश्चित अर्थबोध होईलच अशी खात्री देता येण्यासारखी नाही. तथापि, एकंदरीत हे भाषांतर ग्रंथाच्या अभ्यासकांना उपयुक्त होईल अशी आशा आहे.

टीपा अतिविस्तृत करण्याचे टाळले आहे. फक्त काही महत्त्वाच्या मुद्द्यांचेच स्पष्टीकरण करण्याचा यत्न केला आहे. अनेक ठिकाणी प्राचीन टीकाकारांनी केलेले शब्दांचे अर्थ समर्थनासाठी निर्दिष्ट केले आहेत. तसाच लाभ गणपतीशास्त्री व मेयर यांच्या कार्यापासूनही करून घेतला आहे. यासंबंधात टीपांमध्ये पुढील संक्षिप्त चिन्हांचा उपयोग केला आहे :—

भा – भाषाकौटलीय, प्राचीन मल्याळी टीका, अधिकरण १ ते ७ वर (२.२८ आणि ७.७ ते ७.१३ या अध्यायांवरील टीका उपलब्ध नाही).

ज – जयमङ्गला, शंकरकृत संस्कृत टीका, फक्त अधिकरण १ वर.

चा – चाणक्यटीका, भिक्षु प्रभमतिकृत, अधिकरण २ व अध्याय ३.१ वर.

प्र – प्रतिपदपञ्चिका, भट्टस्वामीकृत, फक्त २.८.५ ते २.३६.४७ ह्या अंशावर.

न – नयचन्द्रिका, माधव यज्वकृत, ७.७.१ ते १२.४.११ ह्या अंशावर.

नी – नीतिनिर्णीति, योग्घमकृत, अधिकरण १ (टिप्पणी) व २ १.१ ते २.४.१ (टीका).

श्री – श्रीमूल, पंडित गणपतिशास्त्रीकृत, संपूर्ण ग्रंथावर.

मे – मेयरकृत जर्मन भाषांतर व टीपा, संपूर्ण ग्रंथावर.

ब्रे – ब्रेलोअरकृत तीन खंडांतील विवेचन.

'टी – टीकाकार, उपलब्ध असतील त्याप्रमाणे एकाहून अधिक.

# कौटिलीयम् अर्थशास्त्रम्

## विनयाधिकारिकम् – प्रथममधिकरणम्

१

### [प्रकरणाधिकरणसमुद्देशः]

ॐ नमः शुक्रबृहस्पतिभ्याम् ।

**पृथिव्या लाभे पालने च यावन्त्यर्थशास्त्राणि पूर्वाचार्यैः प्रस्थापितानि प्रायशस्तानि संहृत्यैकमिदमर्थशास्त्रं कृतम् । १ ।**

**तस्यायं प्रकरणाधिकरणसमुद्देशः । २ ।**

**विद्यासमुद्देशः, वृद्धसंयोगः, इन्द्रियजयः, अमात्योत्पत्तिः, मन्त्रिपुरोहितोत्पत्तिः, उपधाभिः शौचाशौचज्ञानममात्यानाम्, गूढपुरुषोत्पत्तिः, गूढपुरुषप्रणिधिः, स्वविषये कृताकृत्यपक्षरक्षणम्, परविषये कृत्याकृत्यपक्षोपग्रहः, मन्त्राधिकारः,**

## अधिकरण पहिले – विनयग्रहणाविषयी

### पहिला अध्याय

### प्रकरणे व अधिकरणे यांची क्रमवार गणना

ॐ शुक्र आणि बृहस्पती यांना नमस्कार असो.

१ पृथ्वीच्या लाभाच्या आणि पालनाच्या विषयासंबंधी जेवढी अर्थशास्त्रे पूर्वीच्या आचार्यांनी प्रस्थापित केली आहेत ती बहुतेक सर्व एकत्रित करून हे एक अर्थशास्त्र रचले आहे.

२ त्यातील प्रकरणे व अधिकरणे यांची क्रमवार गणना पुढीलप्रमाणे :

३ (१) विद्यांचा क्रमवार निर्देश, (२) वृद्धांचा सहवास, (३) इंद्रियांचा निग्रह, (४) अमात्यांची नेमणूक, (५) मंत्री आणि पुरोहित यांची नेमणूक, (६) गुप्त कसोटयांच्या द्वारा अमात्यांच्या शुद्धाशुद्ध वर्तनाची परीक्षा, (७) गुप्त हेरांची नेमणूक, (८) गुप्त हेरांची कामावर योजना, (९) स्वतःच्या राज्यातील फितूर होण्याचा संभव असलेले व फितूर होण्याचा संभव नसलेले यांच्या संबंधात घ्यावयाची खबरदारी, (१०) शत्रूच्या राज्यातील फितुरीचा संभव असलेल्या व फितुरीचा संभव नसलेल्या लोकांना आपल्या बाजूस वळवून घेणे,

**दूतप्रणिधिः, राजपुत्ररक्षणम्, अपरुद्धवृत्तम्, अपरुद्धे वृत्तिः, राजप्रणिधिः, निशान्तप्रणिधिः, आत्मरक्षितकम् – इति विनयाधिकारिकं प्रथममधिकरणम् । ३ ।**

**जनपदनिवेशः, भूमिच्छिद्रापिधानम्, दुर्गविधानम्, दुर्गनिवेशः, संनिधातृनिचयकर्म, समाहर्तृसमुदयप्रस्थापनम्, अक्षपटले गाणनिक्याधिकारः, समुदयस्य युक्तापहृतस्य प्रत्यानयनम्, उपयुक्तपरीक्षा, शासनाधिकारः, कोशप्रवेश्यरत्नपरीक्षा, आकरकर्मान्तप्रवर्तनम्, अक्षशालायां सुवर्णाध्यक्षः, विशिखायां सौवर्णिकप्रचारः, कोष्ठागाराध्यक्षः, पण्याध्यक्षः, कुप्याध्यक्षः, आयुधागाराध्यक्षः, तुलामानपौतवम्, देशकालमानम्, शुल्काध्यक्षः, सूत्राध्यक्षः, सीताध्यक्षः, सुराध्यक्षः, सूनाध्यक्षः, गणिकाध्यक्षः, नावध्यक्षः, गोऽध्यक्षः, अश्वाध्यक्षः,**

(११) सल्लामसलतीचा विषय, (१२) दूताची कामगिरीवर योजना, (१३) राजपुत्रांच्या संबंधात घ्यावयाची खबरदारी, (१४) राजाच्या मर्जीतून उतरलेल्या राजपुत्राची वागणूक, (१५) मर्जीतून उतरलेल्या राजपुत्राच्या संबंधात राजाची वागणूक, (१६) राजाचे दैनंदिन व्यवहार, (१७) राजवाड्यासंबंधी नियम, (१८) राजाच्या स्वतःच्या संरक्षणासंबंधी – असे 'विनयग्रहणाविषयी' नावाचे पहिले अधिकरण.

४ (१९) जनपदाची वसाहत, (२०) लागवडीस योग्य नसलेल्या जमिनीचा वापर, (२१) किल्ल्याची बांधणी, (२२) किल्ल्यातील नगराची रचना, (२३) संनिधात्याचे साठे करावयाचे कार्य, (२४) समाहर्त्याने ठरवावयाचे एकूण उत्पन्न, (२५) हिशोबतपासनीसाच्या कार्यालयातील हिशोबतपासणी, (२६) सरकारी नोकरांनी अपहार केलेल्या उत्पन्नाची त्यांच्याकडून वसुली, (२७) सरकारी नोकरांवर ठेवावयाची नजर, (२८) आज्ञापत्रांविषयी, (२९) कोशात स्वीकारावयाच्या रत्नांची पारख, (३०) खाणी आणि कारखाने सुरू करणे, (३१) सुवर्णावर प्रक्रिया करण्याच्या कारखान्यात सुवर्णाध्यक्ष, (३२) सराफकट्ट्यातील सुवर्णकाराचे कार्य, (३३) कोठारांवरील मुख्य अधिकारी, (३४) व्यापारावरील मुख्य अधिकारी, (३५) जंगलांतील उत्पादनावरील मुख्य अधिकारी, (३६) शस्त्रागारावरील मुख्य अधिकारी, (३७) वजने आणि मापे यांची प्रमाणे, (३८) देश व काल यांची मोजणी, (३९) जकातीवरील मुख्य अधिकारी, (४०) सूत व कापड यांच्या उत्पादनावरील मुख्य अधिकारी, (४१) शेतकामावरील मुख्य अधिकारी, (४२) मद्याच्या उत्पादनावरील व विक्रीवरील मुख्य अधिकारी, (४३) प्राण्यांच्या कत्तलीवरील मुख्य अधिकारी, (४४) गणिकांवरील मुख्य अधिकारी,

हस्त्यध्यक्षः, रथाध्यक्षः, पत्त्यध्यक्षः, सेनापतिप्रचारः, मुद्राध्यक्षः, विवीताध्यक्षः, समाहर्तृप्रचारः, गृहपतिकवैदेहकतापसव्यञ्जनाः प्रणिधयः, नागरिकप्रणिधिः – इत्यध्यक्षप्रचारो द्वितीयमधिकरणम् । ४ ।

व्यवहारस्थापना, विवादपदनिबन्धः, विवाहसंयुक्तम्, दायविभागः, वास्तुकम्, समयस्यानपाकर्म, ऋणादानम्, औपनिधिकम्, दासकर्मकरकल्पः, संभूय-समुत्थानम्, विक्रीतक्रीतानुशयः, दत्तस्यानपाकर्म, अस्वामिविक्रयः, स्वस्वामि-संबन्धः, साहसम्, वाक्पारुष्यम्, दण्डपारुष्यम्, द्यूतसमाह्वयम्, प्रकीर्णकम् – इति धर्मस्थीयं तृतीयमधिकरणम् । ५ ।

कारुकरक्षणम्, वैदेहकरक्षणम्, उपनिपातप्रतीकारः, गूढाजीविनां रक्षा, सिद्धव्यञ्जनैर्माणवप्रकाशनम्, शङ्कारूपकर्माभिग्रहः, आशुमृतकपरीक्षा, वाक्य-

(४५) नौकांवरील मुख्य अधिकारी, (४६) गुरांवरील मुख्य अधिकारी, (४७) अश्वशाळेचा मुख्य, (४८) हत्तींच्या पागांवरील मुख्य, (४९) रथांवरील मुख्य अधिकारी, (५०) पायदळाचा मुख्य, (५१) सेनापतीचे काम, (५२) मुद्रांवरील अधिकारी, (५३) कुरणांवरील अधिकारी, (५४) समाहर्त्याचे कार्य, (५५) गृहपतिक, वैदेहक आणि तापस यांच्या वेषातील गुप्त हेरांची कामगिरी, (५६) नगराध्यक्षाचे कार्य – असे 'अध्यक्षांचे कार्य' नावाचे दुसरे अधिकरण.

५ (५७) व्यवहारांचे प्रामाण्य ठरविणे, (५८) मुकदम्यातील बाबींची नोंदणी, (५९) विवाहाशी संबद्ध विषय, (६०) वडिलोपार्जित संपत्तीची वाटणी, (६१) स्थावर मालमत्तेविषयी, (६२) रूढ आचारांचे पालन न करणे, (६३) कर्जफेड, (६४) ठेवीसंबंधी, (६५) दास व कामगार यांच्याविषयीचा कायदा, (६६) एकत्र येऊन काम करण्याविषयी, (६७) केलेली विक्री व खरेदी नाकारणे, (६८) देऊ केलेल्या देणग्या न देणे, (६९) मालकी हक्का-शिवाय केलेली विक्री, (७०) मालकी हक्क, (७१) बळजबरीची कृत्ये, (७२) वाणीने होणारे गुन्हे, (७३) बळाच्या वापराने होणारे गुन्हे, (७४) जुगार आणि पैज, (७५) विविध स्वरूपाचे गुन्हे – असे 'न्यायाधिशांविषयी' नावाचे तिसरे अधिकरण.

६ (७६) कारागिरांवर देखरेख, (७७) व्यापाऱ्यांवर देखरेख, (७८) आकस्मिक आपत्तींचे निवारण, (७९) गूढ रीतीने उपजीविका करणाऱ्यांचा बंदोबस्त, (८०) साधूंच्या वेषातील हेरांच्या द्वारा गुन्हेगार उघडकीस आणणे, (८१) संशयावरून, जवळ माल सापडल्यावरून आणि गुन्ह्याच्या खाणाखुणां-

कर्मानुयोगः, सर्वाधिकरणरक्षणम्, एकाङ्गवधनिष्क्रयः, शुद्धश्चित्रश्च दण्डकल्पः, कन्याप्रकर्म, अतिचारदण्डाः – इति कण्टकशोधनं चतुर्थमधिकरणम् । ६ ।

दाण्डकर्मिकम्, कोशाभिसंहरणम्, भृत्यभरणीयम्, अनुजीविवृत्तम्, समयाचारिकम्, राज्यप्रतिसंधानम्, एकैश्वर्यम् – इति योगवृत्तं पञ्चममधिकरणम् । ७ ।

प्रकृतिसंपदः, शमव्यायामिकम् – इति मण्डलयोनिः षष्ठमधिकरणम् । ८ ।

षाड्गुण्यसमुद्देशः, क्षयस्थानवृद्धिनिश्चयः, संश्रयवृत्तिः, समहीनज्यायसां गुणाभिनिवेशः, हीनसंधयः, विगृह्यासनम्, संधायासनम्, विगृह्य यानम्, संधाय यानम्, संभूय प्रयाणम्, यातव्यामित्रयोरभिग्रहचिन्ता, क्षयलोभविरागहेतवः

वरून करावयाची अटक, (८२) अकस्मात मेलेल्या मनुष्याची चौकशी, (८३) तोंडी जबानी घेऊन व छळणूक करून करावयाचा तपास, (८४) सर्व खात्यांतील अधिकाऱ्यांवर देखरेख, (८५) एखादा अवयव तोडण्याच्या शिक्षेतून दंड भरून सुटका, (८६) साध्या वधाची आणि हाल करून वधाची शिक्षा, (८७) कुमारिकेला भ्रष्ट करणे, (८८) अत्याचारांबद्दल शिक्षा – असे 'कंटकांचे निर्मूलन' नावाचे चौथे अधिकरण.

७ (८९) गुप्त रीतीने शिक्षा करण्याविषयी, (९०) रिकामा खजिना भरून काढणे, (९१) नोकर लोकांच्या पगारांविषयी, (९२) नोकराने करावयाचे वर्तन, (९३) राजदरबारी पाळावयाच्या आचारांविषयी, (९४) राज्याचे सातत्य टिकविणे, (९५) ऐश्वर्याचे सातत्य – असे 'गुप्त व्यवहार' नावाचे पाचवे अधिकरण.

८ (९६) राज्याच्या प्रकृतींचे उत्कृष्ट गुण, (९७) शांततापालन व उद्यमशीलता यांविषयी – असे 'राजमंडलाचे मूळ' नावाचे सहावे अधिकरण,

९ (९८) परराष्ट्रविषयक धोरणाच्या सहा अंगांचा निर्देश, (९९) ऱ्हास, स्थिरता आणि वृद्धी यांच्या प्रसंगी घ्यावयाचे निर्णय, (१००) आश्रयास जाताना वागणूक, (१०१) तुल्यबल, हीनबल व बलवत्तर राजांनी करावयाचा धोरणांचा अवलंब, (१०२) हीनबल राजाने करावयाचे संधी, (१०३) विग्रह करून स्वस्थ रहाणे, (१०४) संधी करून स्वस्थ रहाणे, (१०५) विग्रह करून चाल करून जाणे, (१०६) संधी करून चाल करून जाणे, (१०७) एकजूट करून स्वारी करणे, (१०८) यातव्य शत्रू व स्वाभाविक शत्रू यांच्यावरील हल्ल्यासंबंधी विचार, (१०९) प्रजाजनांचा क्षय, लोभ व अपरक्तता यांची कारणे, (११०) एकत्रित होणाऱ्या दोस्तांविषयी विचार, (१११) संधी केलेल्या राजांच्या

प्रकृतीनाम्, सामवायिकविपरिमर्शः, संहितप्रयाणिकम्, परिपणितापरिपणितापसृताः संधयः, द्वैधीभाविकाः संधिविक्रमाः, यातव्यवृत्तिः, अनुग्राह्यमित्रविशेषाः, मित्रहिरण्यभूमिकर्मसंधयः, पार्ष्णिग्राहचिन्ता, हीनशक्तिपूरणम्, बलवता विगृह्योपरोधहेतवः, दण्डोपनतवृत्तम्, दण्डोपनायिवृत्तम्, संधिकर्म, समाधिमोक्षः, मध्यमचरितम्, उदासीनचरितम्, मण्डलचरितम् – इति षाड्गुण्यं सप्तममधिकरणम् । ९ ।

प्रकृतिव्यसनवर्गः, राजराज्ययोर्व्यसनचिन्ता, पुरुषव्यसनवर्गः, पीडनवर्गः, स्तम्भवर्गः, कोशसङ्गवर्गः, बलव्यसनवर्गः, मित्रव्यसनवर्गः – इति व्यसनाधिकारिकमष्टममधिकरणम् । १० ।

शक्तिदेशकालबलाबलज्ञानम्, यात्राकालाः, बलोपादानकालाः, संनाहगुणाः, प्रतिबलकर्म, पश्चात्कोपचिन्ता, बाह्याभ्यन्तरप्रकृतिकोपप्रतीकाराः, क्षयव्यय-

प्रयाणाविषयी, (११२) अटी घालून, अटी न घालता व सोडून गेलेल्यांशी करावयाचे संधी, (११३) द्वैधीभावाच्या अवलंबनातील संधी व युद्ध, (११४) ज्याच्यावर स्वारी होणार असेल त्याचे वागणे, (११५) मदत करावयास योग्य असे मित्र राजांचे प्रकार, (११६) मित्रलाभ, द्रव्यलाभ, भूमिलाभ आणि कार्यसिद्धी यांसाठी संधी, (११७) पिछाडीवर हल्ला करण्यासंबंधी विचार, (११८) क्षीण झालेल्या शक्तींचे संवर्धन, (११९) बलवान राजाशी विग्रह करून किल्ल्याचा आश्रय घेण्याचे उद्देश, (१२०) सैन्य देऊन शरण गेलेल्या राजाची वागणूक, (१२१) बलाने शरण यावयास लावणाऱ्या राजाची वागणूक, (१२२) संधी करण्याचे कार्य, (१२३) ओलीस ठेवलेल्याची सुटका, (१२४) मध्यस्थ राजाशी वागणूक, (१२५) उदासीन राजाशी वागणूक, (१२६) राजमंडलाशी वागणूक – असे परराष्ट्रसंबंधविषयक 'सहा प्रकारची धोरणे' नावाचे सातवे अधिकरण.

१० (१२७) राज्याच्या सात प्रकृतींवरील संकटे, (१२८) राजा व राज्य यांवरील संकटांचा विचार, (१२९) मनुष्याची व्यसनें, (१३०) पीडादायक गोष्टी, (१३१) अडथळे, (१३२) कोशाला अटकाव, (१३३) सैन्याच्या संबंधातील संकटे, (१३४) मित्राच्या संबंधातील संकटे – असे 'संकटाविषयी' नावाचे आठवे अधिकरण.

११ (१३५) शक्ती, देश व काल यांच्या बलाबलाचे ज्ञान, (१३६) मोहिमेवर निघण्यासाठी योग्य काल, (१३७) विविध प्रकारचे सैन्य उभारण्यास योग्य काल, (१३८) सैन्याच्या सज्जीकरणाची श्रेष्ठाश्रेष्ठता, (१३९) शत्रु-

**लाभविपरिमर्शः, बाह्याभ्यन्तराश्चापदः, दूष्यशत्रुसंयुक्ताः, अर्थानर्थसंशययुक्ताः, तासामुपायविकल्पजाः सिद्धयः – इत्यभियास्यत्कर्म नवममधिकरणम् । ११ ।**

**स्कन्धावारनिवेशः, स्कन्धावारप्रयाणम्, बलव्यसनावस्कन्दकालरक्षणम्, कूटयुद्धविकल्पाः, स्वसैन्योत्साहनम्, स्वबलान्यबलव्यायोगः, युद्धभूमयः, पत्त्यश्वरथहस्तिकर्माणि, पक्षकक्षोरस्यानां बलाग्रतो व्यूहविभागः, सारफल्गुबलविभागः, पत्त्यश्वरथहस्तियुद्धानि, दण्डभोगमण्डलासंहतव्यूहव्यूहनम्, तस्य प्रतिव्यूहस्थापनम् – इति सांग्रामिकं दशममधिकरणम् । १२ ।**

**भेदोपादानानि, उपांशुदण्डाः – इति संघवृत्तमेकादशमधिकरणम् । १३ ।**

**दूतकर्म, मन्त्रयुद्धम्, सेनामुख्यवधः, मण्डलप्रोत्साहनम्, शस्त्राग्निरसप्रणिधयः,**

सैन्याला यथोचित मुकाबला, (१४०) पिछाडीच्या संभाव्य बंडाचा विचार, (१४१) बाह्य आणि आभ्यंतर प्रकृतींच्या बंडावर उपाययोजना, (१४२) क्षय, व्यय, आणि लाभ यांसंबंधी विचार, (१४३) बाह्य व आभ्यंतर आपत्ती, (१४४) राजद्रोही व शत्रू यांच्याशी संबद्ध आपत्ती, (१४५) अर्थ, अनर्थ व संशय यांनी युक्त अशा आपत्ती, (१४६) (चार) उपायांच्या वैकल्पिक योजनेने त्या आपत्तींचे निवारण – असे 'मोहिमेवर जाण्याची तयारी' नावाचे नववे अधिकरण.

१२ (१४७) सैन्याची छावणी, (१४८) सैन्याचे कूच, (१४९) संकटाच्या व हल्ल्याच्या वेळी सैन्याचे रक्षण, (१५०) कूटयुद्धाचे विविध प्रकार, (१५१) आपल्या सैन्याचे प्रोत्साहन, (१५२) आपले सैन्य आणि शत्रुसैन्य यांचा मुकाबला, (१५३) युद्धास योग्य भूमी, (१५४) पदाती, घोडे, रथ आणि हत्ती यांचे कार्य, (१५५) सैन्याच्या संख्येच्या अनुरोधाने त्याची पक्ष, कक्ष व उरस्य ह्या व्यूहविभागांत रचना, (१५६) श्रेष्ठ व कनिष्ठ सैन्याची यथोचित योजना, (१५७) पदाती, घोडे, रथ व हत्ती यांचे युद्धाचे प्रकार, (१५८) दंड, भोग, मंडल व असंहत ह्या व्यूहांची रचना, (१५९) त्यांना शह देणाऱ्या प्रतिव्यूहांची योजना – असे 'संग्रामाविषयी' नावाचे दहावे अधिकरण.

१३ (१६०) फूट पाडण्याचे प्रकार, (१६१) गुप्त वधाचे प्रकार – असे 'संघांच्या बाबतीत धोरण' नावाचे अकरावे अधिकरण.

१४ (१६२) दूताची कामगिरी, (१६३) मंत्रयुद्ध, (१६४) शत्रुसेनेतील मुख्य अधिकाऱ्यांचा वध, (१६५) शत्रूविरुद्ध राजमंडलाचे प्रोत्साहन, (१६६)

वीवधासारप्रसारवधः, योगातिसंधानम्, दण्डातिसंधानम्, एकविजयः – इत्याबलीयसं द्वादशमधिकरणम् । १४ ।

उपजापः, योगवामनम्, अपसर्पप्रणिधिः, पर्युपासनकर्म, अवमर्दः, लब्धप्रशमनम् – इति दुर्गलम्भोपायस्त्रयोदशमधिकरणम् । १५ ।

परबलघातप्रयोगः, प्रलम्भनम्, स्वबलोपघातप्रतीकारः – इत्यौपनिषदिकं चतुर्दशमधिकरणम् । १६ ।

तन्त्रयुक्तयः – इति तन्त्रयुक्तिः पञ्चदशमधिकरणम् । १७ ।

शास्त्रसमुद्देशः पञ्चदशाधिकरणानि साशीति प्रकरणशतं सपञ्चाशदध्यायशतं षट् श्लोकसहस्राणीति । १८ ।

सुखग्रहणविज्ञेयं तत्त्वार्थपदनिश्चितम् ।
कौटिल्येन कृतं शास्त्रं विमुक्तग्रन्थविस्तरम् ।। १९ ।।

इति कौटिलीयेऽर्थशास्त्रे विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे प्रकरणाधिकरणसमुद्देशः प्रथमोऽध्यायः ।

शस्त्र, अग्नी व विष यांचा गुप्त प्रयोग, (१६७) रसद, कुमक व खाद्यान्वेषण करणाऱ्या तुकड्या यांचा नाश, (१६८) गुप्त उपायांनी शत्रूवर मात करणे, (१६९) बळाने शत्रूवर मात करणे, (१७०) एकट्या राजाचे विजयसंपादन – असे 'बलहीन राजाविषयी' नावाचे बारावे अधिकरण.

१५ (१७१) राजद्रोहास प्रोत्साहन, (१७२) गूढ उपायांनी शत्रूस दुर्गाबाहेर येण्यास प्रवृत्त करणे, (१७३) गुप्त हेरांची योजना, (१७४) वेढा देण्याचे कार्य, (१७५) हल्ला करून दुर्ग काबीज करणे, (१७६) जिंकलेल्या मुलुखाचे प्रशमन – असे 'दुर्ग काबीज करण्याचे उपाय' नावाचे तेरावे अधिकरण.

१६ (१७७) शत्रुसेनेचा नाश करण्याचे प्रयोग, (१७८) गूढ प्रयोगांनी भुरळ पाडणे, (१७९) आपल्या सैन्याच्या नाशाचा प्रतिकार – असे 'गूढ प्रयोगांविषयी' नावाचे चौदावे अधिकरण.

१७ (१८०) शास्त्राच्या विवेचनाच्या पद्धती – असे 'शास्त्रीय विवेचनाची पद्धत' नावाचे पंधरावे अधिकरण.

१८ शास्त्राचा विस्तार पंधरा अधिकरणे, एकशे ऐंशी प्रकरणे, एकशे पन्नास अध्याय, सहा हजार श्लोक इतका आहे.

१९ ग्रहण करण्यास आणि समजण्यास सोपे, तत्त्व, अर्थ आणि शब्द नि:संदिग्ध असलेले हे शास्त्र ग्रंथविस्ताररहित असे कौटिल्याने रचिले आहे.

२

[ प्रथमं प्रकरणम् – विद्यासमुद्देशः, तत्र आन्वीक्षिकीस्थापना ]

आन्वीक्षिकी त्रयी वार्त्ता दण्डनीतिश्चेति विद्याः । १ ।

त्रयी वार्त्ता दण्डनीतिश्चेति मानवाः । २ । त्रयीविशेषो ह्यान्वीक्षिकीति । ३ । वार्त्ता दण्डनीतिश्चेति बार्हस्पत्याः । ४ । संवरणमात्रं हि त्रयी लोकयात्राविद इति । ५ ।

दण्डनीतिरेका विद्येत्यौशनसाः । ६ । तस्यां हि सर्वविद्यारम्भाः प्रतिबद्धा इति । ७ ।

चतस्र एव विद्या इति कौटिल्यः । ८ । ताभिर्धर्मार्थौ यद् विद्यात्तद् विद्यानां विद्यात्वम् । ९ ।

सांख्यं योगो लोकायतं चेत्यान्वीक्षिकी । १० । धर्माधर्मौ त्रय्यामर्थानर्थौ वार्त्तायां नयापनयौ दण्डनीत्यां बलाबले चैतासां हेतुभिरन्वीक्षमाणा लोकस्यो-

## दुसरा अध्याय

### प्रकरण १ : विद्यांचा क्रमवार निर्देश ; आन्वीक्षिकीच्या अध्ययनाच्या आवश्यकतेचे प्रतिपादन

१ आन्वीक्षिकी, त्रयी, वार्त्ता आणि दण्डनीति अशा चार विद्या आहेत.

२ " त्रयी, वार्त्ता आणि दण्डनीति ह्या तीनच विद्या आहेत " असे मानवांचे मत आहे. ३ " कारण, आन्वीक्षिकी त्रयीविद्येचाच विशिष्ट अंश आहे. "

४ " वार्त्ता आणि दण्डनीति अशा दोनच विद्या होत " असे बार्हस्पत्यांचे मत आहे. ५ " कारण, जो लोकव्यवहार जाणतो त्याला त्रयी ही केवळ (त्याच्या कृत्यांच्या समर्थनास उपयुक्त असे ) एक आवरण आहे. "

६ "दंडनीति ही एकच विद्या होय" असे औशनसांचे मत आहे. ७ "कारण, सर्व विद्यांचे अनुष्ठान त्या विद्येशी निगडित आहे. "

८ " विद्या चार आहेतच " असे कौटिल्याचे मत आहे. ९ त्यांच्यामुळे मनुष्य धर्म काय व अर्थ काय हे जाणू शकतो म्हणून त्यांना (विद्—जाणणे ह्या धातूपासून निष्पन्न झालेली ) विद्या ही संज्ञा आहे.

१० सांख्य, योग आणि लोकायत ही (तीन दर्शने म्हणजे) आन्वीक्षिकी. ११ ती, त्रयीच्या संबंधात धर्म काय व अधर्म काय, वार्त्ताव्यवहाराच्या

**पकरोति व्यसनेऽभ्युदये च बुद्धिमवस्थापयति प्रज्ञावाक्यक्रियावैशारद्यं च करोति। ११।**

**प्रदीपः सर्वविद्यानामुपायः सर्वकर्मणाम्।**
**आश्रयः सर्वधर्माणां शश्वदान्वीक्षिकी मता।। १२।।**

**इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे विद्यासमुद्देशे आन्वीक्षिकीस्थापना द्वितीयोऽध्यायः।**

## ३

## [प्रथमं प्रकरणम् – विद्यासमुद्देशः, तत्र त्रयीस्थापना]

**सामर्ग्यजुर्वेदास्त्रयस्त्रयी। १। अथर्ववेदेतिहासवेदौ च वेदाः। २।**

**शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दोविचितिर्ज्योतिषमिति चाङ्गानि। ३।**

**एष त्रयीधर्मश्चतुर्णां वर्णानामाश्रमाणां च स्वधर्मस्थापनादौपकारिकः। ४।**

संबंधात अर्थ काय व अनर्थ काय, दंडनीतीच्या संबंधात योग्य धोरण कोणते व चुकीचे धोरण कोणते, तसेच या तीन विद्यांचे परस्पर बलाबल, ह्या गोष्टींची कारणमीमांसेच्या द्वारा परीक्षा करते म्हणून लोकांना उपकारक होते, संकटकाली व अभ्युदयाच्या समयी बुद्धीला स्थैर्य प्राप्त करून देते आणि विचार, उच्चार व आचार यांत विशारदता आणून देते.

१२ आन्वीक्षिकी सर्व विद्यांना प्रकाशित करणारा दीप, सर्व कार्ये सिद्धीस नेणारा उपाय आणि सर्व धर्मांना प्राप्त होणारा आश्रय होय असे सदा मानण्यात आले आहे.

## तिसरा अध्याय

### प्रकरण १ (पुढे चालू) : त्रयीच्या अध्ययनाच्या आवश्यकतेचे प्रतिपादन

१ सामवेद, ऋग्वेद आणि यजुर्वेद हे तीन म्हणजे त्रयी. २ (हे तीन) आणि अथर्ववेद व इतिहासवेद हे वेद होत.

३ (वर्णोच्चारविषयक) शिक्षा, (यज्ञादिक्रियाविषयक) कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद:शास्त्र आणि ज्योतिष ही सहा वेदांगे होत.

४ ह्या त्रयीमध्ये निरूपिलेला धर्म, चार वर्ण आणि चार आश्रम यांचे आपापले विशिष्ट धर्म निश्चित करतो म्हणून तो उपकारक आहे.

**स्वधर्मो ब्राह्मणस्याध्ययनमध्यापनं यजनं याजनं दानं प्रतिग्रहश्च । ५ । क्षत्रियस्याध्ययनं यजनं दानं शस्त्राजीवो भूतरक्षणं च । ६ । वैश्यस्याध्ययनं यजनं दानं कृषिपाशुपाल्ये वणिज्या च । ७ । शूद्रस्य द्विजातिशुश्रूषा वार्त्ता कारुकुशीलवकर्म च । ८ ।**

**गृहस्थस्य स्वधर्माजीवस्तुल्यैरसमानर्षिभिर्वैवाह्यमृतुगामित्वं देवपित्रतिथिपूजा भृत्येषु त्यागः शेषभोजनं च । ९ । ब्रह्मचारिणः स्वाध्यायोऽग्निकार्याभिषेकौ भैक्षव्रतित्वमाचार्ये प्राणान्तिकी वृत्तिस्तदभावे गुरुपुत्रे सब्रह्मचारिणि वा । १० । वानप्रस्थस्य ब्रह्मचर्यं भूमौ शय्या जटाजिनधारणमग्निहोत्राभिषेकौ देवतापित्रतिथिपूजा वन्यश्चाहारः । ११ । परिव्राजकस्य जितेन्द्रियत्वमनारम्भो निष्किंचनत्वं सङ्गत्यागो भैक्षव्रतमनेकत्रारण्ये च वासो बाह्याभ्यन्तरं च शौचम् । १२ ।**

**सर्वेषामहिंसा सत्यं शौचमनसूयानृशंस्यं क्षमा च । १३ ।**

५ अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान आणि प्रतिग्रह हा ब्राह्मणाचा स्वधर्म. ६ अध्ययन, यजन, दान, शस्त्रद्वारा उपजीविका आणि प्राणिमात्रांचे रक्षण हा क्षत्रियाचा स्वधर्म. ७ अध्ययन, यजन, दान, कृषिकर्म, पशुपालन आणि व्यापार हा वैश्याचा स्वधर्म. ८ द्विजातीची सेवा, वार्त्ता (म्हणजे कृषि, पशुपालन व व्यापार), कारागिरीचें काम आणि (नटनर्तकादी) कुशीलवांचा व्यवसाय हा शूद्राचा स्वधर्म.

९ आपापल्या स्वधर्माला अनुसरून उपजीविकेचा व्यवसाय, समान वर्णाच्या परंतु सगोत्र नसलेल्यांशी विवाहसंबंध, पत्नीशी ऋतुसमयी समागम, देव, पितर आणि अतिथी यांचे पूजन, नोकरचाकरांना दान आणि अवशिष्ट राहिलेल्याचे स्वतः भोजन हा गृहस्थाचा स्वधर्म. १० वेदाचे अध्ययन, होमाग्नींची परिचर्या, स्नान, भिक्षाव्रताचा अवलंव, आमरण आचार्याकडे व त्याच्या अभावी गुरुपुत्राकडे अथवा बरोबरच्या ब्रह्मचाऱ्याकडे निवास हा (नैष्ठिक) ब्रह्मचाऱ्याचा स्वधर्म. ११ ब्रह्मचर्याचे पालन, भूमीवर शयन, जटा आणि अजिन यांचे धारण, होमहवन व स्नान, देवता, पितर आणि अतिथी यांचे पूजन, आणि वनात उत्पन्न होणाऱ्या पदार्थांचा आहार हा वानप्रस्थाचा स्वधर्म. १२ इंद्रियांवर संपूर्ण तावा, नैष्कर्म्य, अकिंचनत्व, आसक्तीचा त्याग, भिक्षाव्रत, अरण्यात स्थान बदलीत जाऊन निवास आणि अंतर्बाह्य शुचिता हा संन्याशाचा स्वधर्म.

१३ सर्व वर्ण आणि आश्रम यांचा अहिंसा, सत्य, शुचिता, निर्मत्सरता, अनिष्ठुरता व क्षमा यांचे पालन हा समान धर्म.

**स्वधर्मः स्वर्गायानन्त्याय च । १४ । तस्यातिक्रमे लोकः संकरादुच्छिद्येत । १५ ।**

**तस्मात्स्वधर्मं भूतानां राजा न व्यभिचारयेत् ।**
**स्वधर्मं संदधानो हि प्रेत्य चेह च नन्दति ।। १६ ।।**

**व्यवस्थितार्यमर्यादः कृतवर्णाश्रमस्थितिः ।**
**त्रय्याभिरक्षितो लोकः प्रसीदति न सीदति ।। १७ ।।**

**इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे विद्यासमुद्देशे त्रयीस्थापना तृतीयोऽध्यायः ।**

४

## [ प्रथमं प्रकरणम् – विद्यासमुद्देशः, तत्र वार्त्तास्थापना दण्डनीतिस्थापना च ]

**कृषिपाशुपाल्ये वणिज्या च वार्त्ता, धान्यपशुहिरण्यकुप्यविष्टिप्रदानादौपकारिकी । १ । तया स्वपक्षं परपक्षं च वशीकरोति कोशदण्डाभ्याम् । २ ।**

१४ आपापल्या स्वधर्माचे पालन केल्याने स्वर्ग आणि मोक्ष यांची प्राप्ती होते. १५ त्याचे अतिक्रमण केल्यास संकर होऊन लोकांचा नाश होईल.

१६ म्हणून राजाने आपल्या प्रजेला स्वधर्मापासून च्युत होऊ देऊ नये. कारण, स्वधर्माचे पालन करावयास लावणारा राजा इहलोकी आणि परलोकी आनंद पावतो.

१७ ज्या लोकांमध्ये आर्यांच्या वागणुकीच्या मर्यादा राखल्या जातात, ज्यांच्यात वर्ण आणि आश्रम दृढपणे प्रस्थापित झाले आहेत आणि त्रयी विद्येच्या रक्षणाखाली जे आहेत त्यांची भरभराट होते, ते कधीही विनाशाप्रत जात नाहीत.

## चौथा अध्याय

### प्रकरण १ (पुढे चालू) : वार्त्ता आणि दंडनीति यांच्या अध्ययनाच्या आवश्यकतेचे प्रतिपादन

१ शेती, पशुपालन आणि व्यापार ह्या व्यवसायांना वार्त्ता म्हणतात; ती धान्य, पशू, धन, जंगलांतील उत्पन्न आणि कामगार यांचा लाभ करून देते म्हणून ती उपकारक आहे. २ तिच्यामुळे कोश (खजिना) आणि सैन्य यांच्या साहाय्याने राजा आपल्या लोकांना व शत्रूच्या लोकांना वश करू शकतो.

आन्वीक्षिकीत्रयीवार्त्तानां योगक्षेमसाधनो दण्डः, तस्य नीतिर्दण्डनीतिः अलब्धलाभार्था लब्धपरिरक्षणी रक्षितविवर्धनी वृद्धस्य तीर्थे प्रतिपादनी च । ३ । तस्यामायत्ता लोकयात्रा । ४ ।

'तस्माल्लोकयात्रार्थी नित्यमुद्यतदण्डः स्यात् । ५ । न ह्येवंविधं वशोपनयनमस्ति भूतानां यथा दण्डः ।' इत्याचार्याः । ६ । नेति कौटिल्यः । ७ । तीक्ष्णदण्डो हि भूतानामुद्वेजनीयो भवति । ८ । मृदुदण्डः परिभूयते । ९ । यथार्हदण्डः पूज्यते । १० । सुविज्ञातप्रणीतो हि दण्डः प्रजा धर्मार्थकामैर्योजयति । ११ । दुष्प्रणीतः कामक्रोधाभ्यामवज्ञानाद्वा वानप्रस्थपरिव्राजकानपि कोपयति, किमङ्ग पुनर्गृहस्थान् । १२ । अप्रणीतस्तु मात्स्यन्यायमुद्भावयति । १३ । बलीयानबलं हि ग्रसते दण्डधराभावे । १४ । स तेन गुप्तः प्रभवतीति । १५ ।

३ आन्वीक्षिकी, त्रयी आणि वार्त्ता ह्यांची जोपासना करण्याचे जे साधन तो दंड, त्याचा यथायोग्य वापर करण्याची पद्धती म्हणजे दंडनीति; ती अप्राप्त वस्तूची प्राप्ती करून देणारी, प्राप्त वस्तूचे संरक्षण करणारी, संरक्षिताची वाढ करणारी आणि वृद्धिगत झालेल्या द्रव्याचे सुपात्री दान करणारी (म्हणून उपकारक) आहे. ४ तिच्यावर लोकांचे व्यवहार अवलंबून आहेत.

५ "म्हणून लोकव्यवहार सुरळीत चालू रहावेत अशी इच्छा असणाऱ्या राजाने नेहमी दंडा उगारलेला असू द्यावा (व कडक शासन करण्याची तयारी ठेवावी). ६ कारण, दंडासारखे प्राणिमात्रांना आपल्या हुकमतीत ठेवण्याचे दुसरे साधन नाही." असे आचार्यांचे मत आहे. ७ "हे बरोबर नाही" असे कौटिल्याचे मत आहे. ८ कारण कडक शासन करणारा राजा प्राणिमात्रांना भीतिग्रस्त करतो. ९ सौम्य शासन करणाऱ्या राजाची अवमानना होते. १० यथायोग्य शासन करणारा पूजेस प्राप्त होतो. ११ याचे कारण असे की पूर्ण चौकशी करून केलेला दंडाचा उपयोग प्रजेला धर्म, अर्थ व काम यांची प्राप्ती करून देतो. १२ कामवश अथवा क्रोधवश होऊन किंवा अवमान करून चुकीने उपयोगात आणलेला दंड वानप्रस्थ आणि संन्यासी यांना सुद्धा कोपाविष्ट करतो, मग गृहस्थांना कोपाविष्ट करील यात काय संशय? १३ परंतु दंड जर उपयोगातच आणला नाही तर (मोठा मासा लहान माशाला खाऊन टाकतो अशा स्वरूपाचा) मात्स्यन्याय प्रवर्तित होतो. १४ कारण, दंड धारण करणारा कोणी नसल्यास बलवान मनुष्य दुर्बलाला गिळून टाकतो. १५ त्या दंडधाऱ्याने संरक्षण केले म्हणजे तो (दुर्बल) प्रभावी होतो.

चतुर्वर्णाश्रमो लोको राज्ञा दण्डेन पालितः ।
स्वधर्मकर्माभिरतो वर्तते स्वेषु वर्त्मसु ॥ १६ ॥

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे विद्यासमुद्देशे वार्त्तास्थापना दण्डनीतिस्थापना च चतुर्थोऽध्यायः । विद्यासमुद्देशः समाप्तः ।

## ५

## [ द्वितीयं प्रकरणम् – वृद्धसंयोगः ]

तस्माद्दण्डमूलास्तिस्रो विद्याः । १ । विनयमूलो दण्डः प्राणभृतां योगक्षेमावहः । २ ।

कृतकः स्वाभाविकश्च विनयः । ३ । क्रिया हि द्रव्यं विनयति नाद्रव्यम् । ४ । शुश्रूषाश्रवणग्रहणधारणविज्ञानोहापोहतत्त्वाभिनिविष्टबुद्धिं विद्या विनयति नेतरम् । ५ । विद्यानां तु यथास्वमाचार्यप्रामाण्याद्विनयो नियमश्च । ६ ।

१६ राजाने दंडाच्या साहाय्याने पालन केलेले चार वर्णांचे आणि चार आश्रमांतील प्रजाजन आपापल्या धर्मानुरूप असलेल्या कार्यात व्यापृत राहून आपापल्या मार्गानेच जात रहातात.

## पाचवा अध्याय

## प्रकरण २ : वृद्धांचा सहवास

१ म्हणून (इतर) तीन विद्या दंडधारणाच्या नीतीवर अवलंबून आहेत. २ (राजाच्या) विनयावर आधारलेले दंडधारण प्रजेला योगक्षेम साध्य करून देते.

३ विनय दोन प्रकारचा आहे, एक कृत्रिम आणि दुसरा स्वाभाविक. ४ (बाह्य) क्रियेने योग्य मनुष्याच्याच अंगी विनय येतो, अयोग्य मनुष्याच्या नाही. ५ श्रवण करण्याची (प्रबल) इच्छा, श्रवण करणे, ग्रहण करणे, धारण करणे, समजून घेणे, (सारासार विचाराने) ग्राह्य व अग्राह्य ठरविणे आणि तत्त्वासंबंधी अभिनिवेश ह्या गुणांनी युक्त अशी ज्याची प्रज्ञा आहे त्यालाच विद्या विनीत करते, इतराला नाही. ६ परंतु त्या त्या विद्यांत पारंगत असलेल्या आचार्यांचे प्रामाण्य स्वीकारल्याने त्यांचे ज्ञान प्राप्त होते व ते दृढ होते.

वृत्तचौलकर्मा लिपिं संख्यानं चोपयुञ्जीत । ७ । वृत्तोपनयनस्त्रयीमान्वीक्षिकीं च शिष्टेभ्यो वार्त्तामध्यक्षेभ्यो दण्डनीतिं वक्तृप्रयोक्तृभ्यः । ८ । ब्रह्मचर्यं चा षोडशाद्वर्षात् । ९। अतो गोदानं दारकर्म चास्य । १० । नित्यश्च विद्यावृद्धसंयोगो विनयवृद्ध्यर्थम्, तन्मूलत्वाद्विनयस्य । ११ ।

पूर्वमहर्भागं हस्त्यश्वरथप्रहरणविद्यासु विनयं गच्छेत् । १२ । पश्चिममितिहास-श्रवणे । १३ । पुराणमितिवृत्तमाख्यायिकोदाहरणं धर्मशास्त्रमर्थशास्त्रं चेतीतिहासः । १४ । शेषमहोरात्रभागमपूर्वग्रहणं गृहीतपरिचयं च कुर्यात्, अगृहीतानामाभीक्ष्ण्यश्रवणं च । १५ । श्रुताद्धि प्रज्ञोपजायते प्रज्ञाया योगो योगादात्मवत्तेति विद्यानां सामर्थ्यम् । १६ ।

विद्याविनीतो राजा हि प्रजानां विनये रतः ।
अनन्यां पृथिवीं भुङ्क्ते सर्वभूतहिते रतः ॥ १७ ॥

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे वृद्धसंयोगः पञ्चमोऽध्यायः ।

७ (जन्मानंतर पहिल्या किंवा तिसऱ्या वर्षी) चौलकर्म झाले म्हणजे राजपुत्राने लेखन व संख्या (अंकगणित) शिकण्यास प्रारंभ करावा. ८ उपनयन झाल्यानंतर त्याने त्रयी व आन्वीक्षिकी ह्या विद्यांचे अध्ययन विद्वान आचार्यांजवळ करावे, वार्त्ताशास्त्राचे ज्ञान अध्यक्षांकडून प्राप्त करून घ्यावे आणि दंडनीतीचे ज्ञान तिचे शास्त्र जाणणारे व तिचा प्रत्यक्ष प्रयोग करणारे यांच्याकडून. ९ आणि सोळाव्या वर्षापर्यंत त्याने ब्रह्मचर्य पाळावे. १० त्यानंतर त्याचा गोदानसंस्कार आणि विवाहविधी. ११ आणि विनयाची वृद्धी व्हावी या हेतूने त्याने नेहमी विद्यावृद्ध माणसांशी संपर्क ठेवावा, कारण तेच विनयाचे मूळ आहे.

१२ दिवसाच्या पूर्वभागात हत्ती, घोडे, रथ आणि शस्त्रे यांच्याविषयीच्या विद्यांचा अभ्यास करावा. १३ दिवसाचा उत्तरभाग इतिहासाच्या अध्ययनात घालवावा. १४ पुराणे, बखरी, आख्यायिका, दाखलेवजा गोष्टी, धर्मशास्त्र आणि अर्थशास्त्र ह्यांचा इतिहासात अंतर्भाव होतो. १५ बाकी राहिलेल्या अहोरात्राच्या भागात नवीन विषयांचे ग्रहण आणि ग्रहण केलेल्याची उजळणी करावी, तसेच ज्या विषयांचे ग्रहण झालेले नाही त्यांचे पुन्हा पुन्हा श्रवण करावे. १६ कारण, सतत अध्ययनाने बुद्धी परिपक्व होते, बुद्धी परिपक्व झाली म्हणजे कार्य करण्याची क्षमता उत्पन्न होते आणि अशी क्षमता आली म्हणजे आत्मप्रत्यय वाढतो, असे हे विद्यांचे सामर्थ्य आहे.

१७ विद्यांच्या अध्ययनाने विनयसंपन्न झालेला राजा प्रजाननांना विनीत करण्यात तत्पर आणि सर्व प्राणिमात्रांच्या कल्याणाविषयी दक्ष असतो, म्हणून सर्व पृथ्वीवरील एकछत्री राज्याचा उपभोग घेतो.

## ६

## [ तृतीयं प्रकरणम् – इन्द्रियजयः, तत्र अरिषड्वर्गत्यागः ]

**विद्याविनयहेतुरिन्द्रियजयः कामक्रोधलोभमानमदहर्षत्यागात्कार्यः । १ । कर्णत्वगक्षिजिह्वाघ्राणेन्द्रियाणां शब्दस्पर्शरूपरसगन्धेष्वविप्रतिपत्तिरिन्द्रियजयः, शास्त्रानुष्ठानं वा । २ । कृत्स्नं हि शास्त्रमिदमिन्द्रियजयः । ३ ।**

**तद्विरुद्धवृत्तिरवश्येन्द्रियश्चातुरन्तोऽपि राजा सद्यो विनश्यति । ४ । यथा दाण्डक्यो नाम भोजः कामाद् ब्राह्मणकन्यामभिमन्यमानः सबन्धुराष्ट्रो विननाश, करालश्च वैदेहः । ५ । कोपाज्जनमेजयो ब्राह्मणेषु विक्रान्तः, तालजङ्घश्च भृगुषु । ६ । लोभादैलश्चातुर्वर्ण्यमत्याहारयमाणः, सौवीरश्चाजबिन्दुः । ७ । मानाद्रावणः परदारानप्रयच्छन्, दुर्योधनो राज्यादंशं च । ८ । मदाद्दम्भोद्भवो**

## सहावा अध्याय

## प्रकरण ३ : इंद्रियांचा निग्रह; षड्रिपूंचे दमन

१ विद्यांच्या उपासनेने प्राप्त होणारा विनय ज्याला कारणीभूत होतो तो इंद्रियांचा निग्रह काम, क्रोध, लोभ, मान, मद आणि हर्ष यांच्या त्यागाने संपादन करावा. २ श्रवणेंद्रिय, त्वगिंद्रिय, चक्षुरिंद्रिय, रसनेंद्रिय आणि घ्राणेंद्रिय यांचा (अनुक्रमे) शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध ह्या विषयांच्या संबंधात अयोग्य आचरणांचा अभाव म्हणजे इंद्रियजय, अथवा ह्या शास्त्राच्या शिकवणुकी-प्रमाणे वागणे म्हणजे इंद्रियजय. ३ कारण, हे संपूर्ण शास्त्र म्हणजे इंद्रिय-निग्रहच होय.

४ ह्याच्या विरुद्ध वर्तन करणारा व इंद्रियांवर ताबा नसलेला राजा पृथ्वीच्या चारही दिशांवर राज्य करीत असला तरी लवकरच नाश पावतो. ५ उदा-हरणार्थ, भोजकुलातील दांडक्य नावाचा राजा कामवश होऊन एका ब्राह्मण कन्येची अभिलाषा करू लागला म्हणून बांधव व राष्ट्र यांसह त्याचा विनाश झाला, तसेच विदेहाच्या कराल नावाच्या राजाचाही (त्याच कारणास्तव) नाश झाला. ६ क्रोधवश होऊन जनमेजयाने ब्राह्मणांवर हल्ला केला (म्हणून तो विनाश पावला); तसेच भृगुकुलावर हल्ला करणारा तालजंघ राजाही (नाश पावला). ७ इलापुत्र पुरूरवा लोभामुळे चारही वर्णांच्या प्रजेला लुबाडू लागला म्हणून नाश पावला, त्याचप्रमाणे सौवीरराजा अजबिंदू सुद्धा. ८ दुसऱ्याची पत्नी अहंकारामुळे परत केली नाही म्हणून रावणाचा नाश झाला,

भूतावमानी, हैहयश्चार्जुनः । ९ । हर्षाद्वातापिरगस्त्यमत्यासादयन्, वृष्णिसंघश्च द्वैपायनमिति । १० ।

एते चान्ये च बहवः शत्रुषड्वर्गमाश्रिताः ।
सबन्धुराष्ट्रा राजानो विनेशुरजितेन्द्रियाः ।। ११ ।।
शत्रुषड्वर्गमुत्सृज्य जामदग्न्यो जितेन्द्रियः ।
अम्बरीषश्च नाभागो बुभुजाते चिरं महीम् ।। १२ ।।

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे इन्द्रियजये अरिषड्वर्गत्यागः षष्ठोऽध्यायः ।

७

## [ तृतीयं प्रकरणम् – इन्द्रियजयः, तत्र राजर्षिवृत्तम् ]

तस्मादरिषड्वर्गत्यागेनेन्द्रियजयं कुर्वीत, वृद्धसंयोगेन प्रज्ञाम्, चारेण चक्षुः, उत्थानेन योगक्षेमसाधनम्, कार्यानुशासनेन स्वधर्मस्थापनम्, विनयं विद्योपदेशेन, लोकप्रियत्वमर्थसंयोगेन, हितेन वृत्तिम् । १ । एवं वश्येन्द्रियः परस्त्रीद्रव्यहिंसाश्च

तसेच राज्याचा हिस्सा दिला नाही म्हणून दुर्योधनाचा. ९ मदोन्मत्त होऊन प्राण्यांना तुच्छतेने वागविणारा दंभोद्भव नाश पावला, तसाच हैहय कुलातील अर्जुन (कार्तवीर्य सहस्रार्जुन) सुद्धा. १० खोडकर वृत्तीने अगस्ति ऋषीवर आक्रमण करू पहाणारा वातापि नाश पावला, तसाच कृष्ण द्वैपायनाला फसवू पहाणारा वृष्णींचा संघ सुद्धा.

११ हे तसेच इतर अनेक राजे षड्रिपूंच्या अधीन झाल्याने इंद्रियांचा निग्रह करू न शकल्याकारणाने बांधव व राष्ट्र यांसह विनाश पावले.

१२ षड्रिपूंचे दमन केल्याने जितेंद्रिय होऊन जमदग्निपुत्र परशुराम आणि नभागाचा पुत्र अंबरीष यांनी चिरकाल पृथ्वीचा उपभोग घेतला.

## सातवा अध्याय

### प्रकरण ३ (पुढे चालू) : राजर्षीला योग्य अशी वर्तणूक

१ म्हणून राजाने षड्रिपूंचे दमन करून इंद्रियांवर जय मिळवावा, विद्यावृद्ध लोकांशी संपर्क ठेवून बुद्धी समृद्ध करावी, गुप्त चरांच्या स्वरूपात दृष्टीचे कार्य सिद्ध करावे, उद्यमशीलतेने योगक्षेम साधावा, कार्याच्या यथोचित अंमलबजावणीने (प्रजेच्या) स्वधर्मपालनाची सिद्धी करावी, विद्यांच्या उपासनेने विनयाची जोपासना करावी, हितकर गोष्टींशी संबंध ठेवून लोकप्रियता संपादन करावी आणि हितकारक असेच आपले वर्तन ठेवावे. २ याप्रमाणे इंद्रिये

वर्जयेत्, स्वप्नं लौल्यमनृतमुद्धतवेषत्वमनर्थ्यसंयोगमधर्मसंयुक्तमनर्थसंयुक्तं च व्यवहारम् । २ ।

धर्मार्थाविरोधेन कामं सेवेत, न निःसुखः स्यात् । ३ । समं वा त्रिवर्गमन्योन्यानुबद्धम् । ४ । एको ह्यत्यासेवितो धर्मार्थकामानामात्मानमितरौ च पीडयति । ५ । अर्थ एव प्रधान इति कौटिल्यः । ६ । अर्थमूलौ हि धर्मकामाविति । ७ ।

मर्यादां स्थापयेदाचार्यानमात्यान्वा, य एनमपायस्थानेभ्यो वारयेयुः, छायानालिकाप्रतोदेन वा रहसि प्रमाद्यन्तमभितुदेयुः । ८ ।

सहायसाध्यं राजत्वं चक्रमेकं न वर्तते ।
कुर्वीत सचिवांस्तस्मात्तेषां च शृणुयान्मतम् ।। ९ ।।

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे इन्द्रियजये राजर्षिवृत्तं सप्तमोऽध्यायः ।
इन्द्रियजयः समाप्तः ।

आपल्या ताब्यात ठेवून परस्त्री, परद्रव्य आणि हिंसा ही वर्ज्य करावीत, तसेच झोपाळूपणा, अस्थिरचित्तता, असत्याचा अवलंब, भडक वेष धारण करणे, (नटनर्तकादी) अहितकर लोकांशी संबंध, आणि अधर्मयुक्त व अनर्थयुक्त व्यवहार ह्या गोष्टीही टाळाव्यात.

३ धर्म व अर्थ यांना बाध न येईल अशा रीतीने कामाचा उपभोग घ्यावा, सर्वस्वी सुखविरहित राहू नये. ४ अथवा एकमेकांशी संबद्ध असलेल्या (धर्म, अर्थ आणि काम ह्या) त्रिवर्गाचे सारखेच सेवन करावे. ५ कारण, धर्म, अर्थ व काम यांपैकी एकाचे अतिरिक्त प्रमाणात सेवन केले असता तो स्वतःची व इतर दोहोंची हानी करतो. ६ (ह्या तिहींत) अर्थ हाच प्रधान होय असे कौटिल्याचे मत आहे. ७ कारण, धर्म आणि काम अर्थावर अवलंबून आहेत.

८ राजाने आपल्या स्वतःच्या वागणुकीवर लक्ष ठेवण्याच्या कामी आचार्य अथवा अमात्य यांची योजना करावी; त्यांनी अपायकारक गोष्टींपासून त्याला परावृत्त करावे आणि त्याच्या हातून एकांतात प्रमाद घडत असता (विशिष्ट कार्याची वेळ सूचित करणाऱ्या) छाया अथवा नालिका यांच्या स्वरूपातील अंकुशाच्या द्वारा सावध रहाण्याची त्याला सूचना द्यावी.

९ राजेपण मदतनिसांच्या साह्यानेच सिद्ध होऊ शकते. (शकटाचे) एकच चाक फिरत नाही. म्हणून राजाने सचिवांची नेमणूक करावी आणि त्यांचे मत विचारात घ्यावे.

८

[ चतुर्थं प्रकरणम् – अमात्योत्पत्तिः ]

'सहाध्यायिनोऽमात्यान्कुर्वीत, दृष्टशौचसामर्थ्यत्वात्' इति भारद्वाजः । १ । 'ते ह्यस्य विश्वास्या भवन्ति' इति । २ ।

नेति विशालाक्षः । ३ । 'सहक्रीडितत्वात् परिभवन्त्येनम् । ४ । ये ह्यस्य गुह्यसधर्माणस्तानमात्यान्कुर्वीत, समानशीलव्यसनत्वात् । ५ । ते ह्यस्य मर्मज्ञभयान्नापराध्यन्ति' इति । ६ ।

'साधारण एष दोषः' इति पाराशराः । ७ । 'तेषामपि मर्मज्ञभयात्कृताकृतान्यनुवर्तेत । ८ ।

यावद्भ्यो गुह्यमाचष्टे जनेभ्यः पुरुषाधिपः ।
अवशः कर्मणा तेन वश्यो भवति तावताम् ॥ ९ ॥

## आठवा अध्याय

### प्रकरण ४ : अमात्यांची नेमणूक

१ "राजाने आपल्या सहाध्यायांना अमात्य नेमावे, कारण त्यांची शुद्ध वर्तणूक व त्यांचे सामर्थ्य ह्या गोष्टी त्याने प्रत्यक्ष पाहिलेल्या असतात" असे भारद्वाजाचे मत आहे. २ "कारण, त्याला त्यांच्यावर विश्वास ठेवता येतो."

३ "हे बरोबर नाही" असे विशालाक्षाचे मत आहे. ४ "राजाबरोबर ते एकत्र खेळलेले असल्यामुळे ते त्याची अवज्ञा करण्याचा संभव असतो. ५ जे गुप्त गोष्टींच्या बाबतीत राजाशी समानधर्म असतील त्यांना अमात्य नेमावे, कारण त्यांचे शील व व्यसने त्याच्यासारखीच असतात. ६ राजाला आपले गुपित माहीत आहे ह्या भीतीने ते त्याच्या विरुद्ध वागणार नाहीत."

७ "हा दोष उभय पक्षांना लागू आहे" असे पाराशरांचे मत आहे. ८ "त्यांना सुद्धा आपले गुपित माहीत आहे ह्या भीतीने राजाला त्यांच्या बऱ्यावाईट सर्व कृत्यांना संमती द्यावी लागेल.

९ राजा जितक्या लोकांना आपले गुपित सांगतो तितक्या लोकांवर त्याच्या त्या कृत्यामुळे तो पराधीन होतो.

य एनमापत्सु प्राणाबाधयुक्तास्वनुगृह्णीयुस्तानमात्यान्कुर्वीत, दृष्टानुरागत्वात्' इति । १० ।

नेति पिशुनः । ११ । 'भक्तिरेषा न बुद्धिगुणः । १२ । संख्यातार्थेषु कर्मसु नियुक्ता ये यथादिष्टमर्थं सविशेषं वा कुर्युस्तानमात्यान्कुर्वीत, दृष्टगुणत्वात्' इति । १३ ।

नेति कौणपदन्तः । १४ । 'अन्यैरमात्यगुणैरयुक्ता ह्येते । १५ । पितृपैतामहानमात्यान्कुर्वीत, दृष्टावदानत्वात् । १६ । ते ह्येनमपचरन्तमपि न त्यजन्ति, सगन्धत्वात् । १७ । अमानुषेष्वपि चैतद् दृश्यते । १८ । गावो ह्यसगन्धं गोगणमतिक्रम्य सगन्धेष्वेवावतिष्ठन्ते' इति । १९ ।

१० प्राणावर संकट आणणाऱ्या आपत्तींच्या समयी जे त्याच्या उपयोगी पडले असतील त्यांना अमात्य करावे, कारण (त्यामुळे) त्यांच्या राजावरील भक्तीचे दर्शन झालेले असते."

११ "हे बरोबर नाही" असे पिशुनाचे मत आहे. १२ "ही राजावरील भक्तीची कसोटी झाली, बुद्धिमत्तेचा त्यात प्रभाव दिसून येत नाही. १३ ज्यांच्यापासून प्राप्त होणाऱ्या उत्पन्नाचा अगोदर हिशोब करून ठेवला आहे अशा कामांवर नेमणूक झाली असता जे सांगितल्याप्रमाणे अथवा त्याहून अधिक उत्पन्न काढून दाखवितील त्यांना अमात्य करावे, कारण त्यांच्या (कार्यक्षमतेचा) गुण दिसून आलेला असतो."

१४ "हे बरोबर नाही" असे कौणपदंताचे मत आहे. १५ "कारण, अमात्यांना आवश्यक असे इतर गुण त्यांच्या ठिकाणी नसतात. १६ पितामह, पिता, यांच्या वेळेपासून जे नोकरीत असतील त्यांना अमात्य करावे, कारण त्यांच्या शुद्ध आचरणाविषयी खात्री झालेली असते. १७ त्याने काही अनुचित वर्तन केले तरी समानजातीयतेमुळे ते त्याला सोडून जात नाहीत. १८ मनुष्येतर प्राण्यांत सुद्धा हे दिसून येते. १९ कारण गाई-बैल परक्या गुरांच्या कळपात न जाता आपल्याच कळपात रहातात."

नेति वातव्याधिः । २० । 'ते ह्यस्य सर्वमवगृह्य स्वामिवत्प्रचरन्ति । २१ । तस्मान्नीतिविदो नवानमात्यान्कुर्वीत । २२ । नवास्तु यमस्थाने दण्डधरं मन्यमाना नापराध्यन्ति ' इति । २३ ।

नेति बाहुदन्तीपुत्रः । २४ । 'शास्त्रविददृष्टकर्मा कर्मसु विषादं गच्छेत् । २५ । तस्मादभिजनप्रज्ञाशौचशौर्यानुरागयुक्तानमात्यान्कुर्वीत, गुणप्राधान्यात्' इति । २६ ।

सर्वमुपपन्नमिति कौटिल्यः । २७ । कार्यसामर्थ्याद्धि पुरुषसामर्थ्यं कल्प्यते । २८ । सामर्थ्यतश्च —

विभज्यामात्यविभवं देशकालौ च कर्म च ।
अमात्याः सर्व एवैते कार्याः स्युर्न तु मन्त्रिणः ।। २९ ।।

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे अमात्योत्पत्तिः अष्टमोऽध्यायः ।

२० "हे बरोबर नाही" असे वातव्याधीचे मत आहे. २१ "कारण, ते त्याचे असलेले सर्व काही बळकावून स्वतःच मालक असल्यासारखे वागतात. २२ यास्तव राजनीतिशास्त्रात पारंगत अशा नवीन मनुष्यांस अमात्य करावे. २३ नवीन माणसे दंडधारी राजाला यमासारखा मानतात, त्यामुळे त्यांच्या हातून अपराध होत नाही."

२४ "हे बरोबर नाही" असे बाहुदंतीपुत्राचे मत आहे. २५ "शास्त्र जाणणारा परंतु प्रत्यक्ष कामाचा अनुभव नसलेला मनुष्य कामे करताना गांगरून जाण्याचा संभव आहे. २६ यास्तव चांगल्या कुलात जन्म, बुद्धिमत्ता, शुद्ध वर्तणूक, शौर्य आणि स्वामिभक्ती यांनी युक्त असलेल्यांना अमात्य करावे, कारण यासंबंधात ह्या गुणांना प्राधान्य आहे."

२७ हे सर्व काही उपपन्न आहे असे कौटिल्याचे मत आहे. २८ कारण, कार्य तडीस नेण्याच्या सामर्थ्यावरून मनुष्याच्या सामर्थ्याची कल्पना करता येते. २९ आणि प्रत्येकाच्या सामर्थ्यानुसार अमात्यांच्या दर्जाची आणि देश, काल व करावयाचे कार्य यांची विभागणी करून ह्या सर्व प्रकारच्या माणसांना अमात्य म्हणून नेमावे, पण त्यांना मंत्री म्हणून नेमू नये.

९

## [ पञ्चमं प्रकरणम् – मन्त्रिपुरोहितोत्पत्तिः ]

जानपदोऽभिजातः स्ववग्रहः कृतशिल्पश्चक्षुष्मान्प्राज्ञो धारयिष्णुर्दक्षो वाग्मी प्रगल्भः प्रतिपत्तिमानुत्साहप्रभावयुक्तः क्लेशसहः शुचिर्मैत्रो दृढभक्तिः शील-बलारोग्यसत्त्वयुक्तः स्तम्भचापलहीनः संप्रियो वैराणामकर्तेत्यमात्यसंपत् । १ । अतः पादार्धगुणहीनौ मध्यमावरौ । २ ।

तेषां जनपदमभिजनमवग्रहं चाप्ततः परीक्षेत, समानविद्येभ्यः शिल्पं शास्त्र-चक्षुष्मत्तां च, कर्मारम्भेषु प्रज्ञां धारयिष्णुतां दाक्ष्यं च, कथायोगेषु वाग्मित्वं प्रागल्भ्यं प्रतिभानवत्त्वं च, आपद्युत्साहप्रभावौ क्लेशसहत्वं च, संव्यवहाराच्छौचं मैत्रतां दृढभक्तित्वं च, संवासिभ्यः शीलबलारोग्यसत्त्वयोगमस्तम्भमचापलं च, प्रत्यक्षतः संप्रियत्वमवैरत्वं च । ३ ।

## नववा अध्याय

### प्रकरण ५ : मंत्री आणि पुरोहित यांची नेमणूक

१ आपल्या राज्याचा नागरिक, चांगल्या कुळात जन्मलेला, ताब्यात ठेवण्यास सुलभ, कलांमध्ये प्रवीण, शास्त्ररूप नेत्र असलेला, बुद्धिमान, स्मरण-शक्ती असलेला, कुशल, बोलण्यात वाकबगार, धीट, समयसूचकता असलेला, उत्साह व सामर्थ्य यांनी युक्त, क्लेश सहन करणारा, शुद्ध आचरणाचा, मैत्री करू शकणारा, दृढ स्वामिभक्त, शील, बल, आरोग्य आणि सत्त्व यांनी युक्त, ताठा व चंचलता यांनी रहित, कोणालाही प्रिय होणारा आणि कोणाशीही वैर न करणारा – ही सर्वगुणसंपन्न अमात्याची लक्षणे. २ यांपैकी एकचतुर्थांश गुण कमी असतील तो मध्यम आणि अर्धे गुण कमी असतील तो कनिष्ठ.

३ त्या गुणांपैकी नागरिकत्व, कुलीनत्व आणि वशवर्तित्व यांचा तपास त्याच्या आप्तांच्या मार्फत करावा, कलांतील प्रावीण्य व शास्त्ररूप चक्षुष्मत्ता यांचा तपास त्याच्याइतकेच विद्यासंपन्न असलेल्या लोकांमार्फत करावा, बुद्धिमत्ता, स्मरणशक्ती व कुशलता यांची परीक्षा तो करीत असलेल्या कामांवरून करावी, बोलण्यातील हुशारी, धीटपणा व समयसूचकता यांची परीक्षा संभाषणांच्या प्रसंगी करावी, उत्साह, सामर्थ्य व क्लेशसहिष्णुता यांची परीक्षा संकटकाली करावी, शुचिता, मैत्रीचा स्वभाव व दृढ भक्ती यांची परीक्षा त्याच्या एकंदर व्यवहारावरून करावी, शील, बल, आरोग्य व सत्त्व यांची विद्यमानता

**प्रत्यक्षपरोक्षानुमेया हि राजवृत्तिः । ४ । स्वयंदृष्टं प्रत्यक्षम् । ५ । परोपदिष्टं परोक्षम् । ६ । कर्मसु कृतेनाकृतावेक्षणमनुमेयम् । ७ । यौगपद्यात्तु कर्मणामनेकत्वादनेकस्थत्वाच्च देशकालात्ययो मा भूदिति परोक्षममात्यैः कारयेत् । ८ । इत्यमात्यकर्म ।**

**पुरोहितमुदितोदितकुलशीलं साङ्गे वेदे दैवे निमित्ते दण्डनीत्यां चाभिविनीतमापदां दैवमानुषीणामथर्वभिरुपायैश्च प्रतिकर्तारं कुर्वीत । ९ । तमाचार्यं शिष्यः पितरं पुत्रो भृत्यः स्वामिनमिव चानुवर्तेत । १० ।**

**ब्राह्मणेनैधितं क्षत्रं मन्त्रिमन्त्राभिमन्त्रितम् ।**
**जयत्यजितमत्यन्तं शास्त्रानुगमशस्त्रितम् ।। ११ ।।**

**इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे मन्त्रिपुरोहितोत्पत्तिः नवमोऽध्यायः ।**

आणि ताठा व चंचलता यांचा अभाव हे गुण त्याच्याबरोबर रहात असलेल्या लोकांकडून जाणून घ्यावेत, आणि प्रिय होण्याचा गुण व वैर न करण्याचा गुण ह्यांची परीक्षा स्वतःच्या प्रत्यक्ष अनुभवावरून करावी.

४ राजाचे व्यवहार प्रत्यक्ष, परोक्ष आणि अनुमेय असे तीन प्रकारचे असतात. ५ राजाच्या स्वतःच्या देखत होणारा तो प्रत्यक्ष व्यवहार. ६ दुसऱ्याने पाहून सांगितलेला तो परोक्ष व्यवहार. ७ कामांच्या संबंधात जे केलेले असेल त्यावरून न केलेल्याचा तर्क करणे म्हणजे अनुमेय व्यवहार. ८ परंतु राज्याची कामे अनेक असून ती एकाच वेळी व अनेक निरनिराळ्या ठिकाणी करावयाची असल्याकारणाने वेळ आणि स्थळ यांचे उल्लंघन होऊ नये म्हणून ती अमात्यांच्या मार्फत परोक्ष करावीत. असे हे अमात्यांच्या नेमणुकीचे कार्य.

९ अत्यंत उन्नत कुलात जन्मलेला व अति उन्नत चारित्र्यसंपन्न, सर्व अंगांसहित वेद, दैवशास्त्र, निमित्तशास्त्र आणि दंडनीति यांत पारंगत, दैवी तसेच मनुष्यकृत आपत्तींचे निवारण अथर्ववेदातील उपायांनी करण्यास समर्थ असा पुरोहित नेमावा. १० शिष्य ज्याप्रमाणे आचार्याच्या वचनात रहातो, पुत्र पित्याच्या वचनात आणि नोकर धन्याच्या वचनात, त्याप्रमाणे राजाने त्या पुरोहिताच्या वचनात रहावे.

११ ब्राह्मणाने संवर्धित केलेली, मंत्र्यांच्या (सल्लामसलतरूपी) मंत्रांनी मंत्रित झालेली आणि शास्त्राचे अनुसरणरूप शस्त्राने सज्ज झालेली क्षात्रशक्ती कधीही पराभूत न होता सतत विजयी होत रहाते.

१०

[ षष्ठं प्रकरणम् – उपधाभिः शौचाशौचज्ञानममात्यानाम् ]

मन्त्रिपुरोहितसखः सामान्येष्वधिकरणेषु स्थापयित्वामात्यानुपधाभिः शोधयेत् । १ ।

पुरोहितमयाज्ययाजनाध्यापने नियुक्तममृष्यमाणं राजावक्षिपेत् । २ । स सत्त्रिभिः शपथपूर्वमेकैकममात्यमुपजापयेत् – 'अधार्मिकोऽयं राजा, साधु धार्मिकमन्यमस्य तत्कुलीनमपरुद्धं कुल्यमेकप्रग्रहं सामन्तमाटविकमौपपादिकं वा प्रतिपादयामः, सर्वेषामेतद्रोचते, कथं वा तव' इति । ३ । प्रत्याख्याने शुचिः । इति धर्मोपधा । ४ ।

सेनापतिरसत्प्रग्रहेणावक्षिप्तः सत्त्रिभिरेकैकममात्यमुपजापयेत् लोभनीयेनार्थेन

## दहावा अध्याय

### प्रकरण ६ : गुप्त कसोटयांच्या द्वारा अमात्यांच्या शुद्धाशुद्ध वर्तनाची परीक्षा

१ मंत्री आणि पुरोहित यांचे साहाय्य घेऊन (जबाबदारीचे नसलेल्या) सामान्य अधिकाराच्या कामावर अमात्यांची नेमणूक करून गुप्त कसोटयांच्या द्वारा त्यांच्या शुद्धतेची परीक्षा करावी.

२ ज्याला यज्ञाचा अधिकार नाही त्याचा यज्ञ करण्यास अथवा (अधिकार नसलेल्यास) वेद शिकविण्यास राजाने सांगतिले असता ते सहन न होऊन तसे करण्याचे नाकारले म्हणून पुरोहिताला कामावरून दूर करावे. ३ त्याने गुप्त हेरांच्या द्वारा एकेका अमात्याला प्रथम शपथ घालून फितुरीस प्रवृत्त करावे. (त्यांनी म्हणावे), "हा राजा अधार्मिक आहे. तेव्हा आता आपण दुसरा धार्मिक राजा – ह्याच्याच कुलातील राज्यावर हक्क सांगणारा कोणी, ह्याच्या मर्जीतून उतरलेला राजपुत्र, ह्याच्या कुलातील दुसरा कोणी, राज्याचा एक आधार असलेला कोणी (मंत्री), शेजारच्या राजांपैकी कोणी, अटवी-मुख्यांपैकी कोणी किंवा सहसा बलाढच बनलेला कोणी याप्रमाणे – स्वीकारू या. इतर सर्वांना हे पसंत आहे. तुझे काय मत आहे ?" ४ ही सूचना धुडकावून लावल्यास तो शुद्ध आहे असे समजावे. ही झाली धर्माची गुप्त कसोटी.

५ वाईट वर्तनाच्या माणसांची बाजू घेतली ह्या निमित्ताने कामावरून दूर केलेल्या सेनापतीने गुप्त हेरांच्या द्वारा एकेका अमात्याला द्रव्याची लालूच

राजविनाशाय, 'सर्वेषामेतद्रोचते, कथं वा तव' इति । ५ । प्रत्याख्याने शुचिः । इत्यर्थोपधा । ६ ।

परिव्राजिका लब्धविश्वासान्तःपुरे कृतसत्कारा महामात्रमेकैकमुपजपेत् – 'राजमहिषी त्वां कामयते कृतसमागमोपाया, महानर्थश्च ते भविष्यति' इति । ७ । प्रत्याख्याने शुचिः । इति कामोपधा । ८ ।

प्रहवणनिमित्तमेकोऽमात्यः सर्वानमात्यानावाहयेत् । ९ । तेनोद्वेगेन राजा तानवरुन्ध्यात् । १० । कापटिकश्चात्र पूर्वावरुद्धस्तेषामर्थमानावक्षिप्तमेकैकम-मात्यमुपजपेत् – 'असत्प्रवृत्तोऽयं राजा, साधु एनं हत्वान्यं प्रतिपादयामः, सर्वेषामेतद्रोचते, कथं वा तव' इति । ११ । प्रत्याख्याने शुचिः । इति भयोपधा । १२ ।

तत्र धर्मोपधाशुद्धान् धर्मस्थीयकण्टकशोधनेषु कर्मसु स्थापयेत्, अर्थोपधा-शुद्धान् समाहर्तृसंनिधातृनिचयकर्मसु, कामोपधाशुद्धान् बाह्याभ्यन्तरविहार-

दाखवून राजाचा नाश करावयास प्रोत्साहित करावे व म्हणावे, "इतर सर्वांना हे पसंत आहे. तुझे काय मत आहे ?" ६ ही सूचना धुडकावल्यास तो शुद्ध आहे असे समजावे. ही झाली द्रव्याची गुप्त कसोटी.

७ राजाच्या अंतःपुरात जिचा मानमरातब केला जातो अशा परिव्राजिकेने विश्वास संपादन करून एकेका अधिकाऱ्याला गुप्तपणे सुचवावे, "राजाच्या पट्टराणीचे तुझ्यावर प्रेम जडले आहे आणि तिने तुझ्या समागमासाठी उपाययोजना केली आहे. शिवाय, तुला खूप द्रव्यप्राप्तीही होईल." ८ ही सूचना धुडकावून लावल्यास तो शुद्ध आहे असे समजावे. ही झाली कामाची गुप्त कसोटी.

९ एखाद्या समारंभाच्या निमित्ताने एका अमात्याने सर्व अमात्यांना आमंत्रण द्यावे. १० ते एकत्र जमले म्हणजे कट चालला आहे अशी भीती प्रकट करून राजाने त्यांना तुरुंगात टाकावे. ११ तेथे अगोदरच बंदीत ठेवलेल्या कापटिक हेराने त्यांच्यापैकी ज्यांचे धन आणि मानमरातब हिरावून घेतले आहेत अशांना एकेकट्याला गुप्तपणे सूचित करावे, "हा राजा अन्याय्य वर्तनाचा आहे. तेव्हा आपण ह्याचा वध करून दुसऱ्या कोणाला तरी राजा करू या. इतर सर्वांना हे पसंत आहे. तुझे मत काय आहे ?" १२ ही सूचना धुडकावल्यास तो शुद्ध आहे असे समजावे. ही झाली भयाची गुप्त कसोटी.

१३ त्यांच्यापैकी जे धर्माच्या कसोटीला उतरले असतील त्यांना न्यायदानाच्या व समाजकंटकांचा बंदोबस्त करण्याच्या कामावर नेमावे, जे द्रव्याच्या कसोटीला उतरले असतील त्यांना समाहर्त्याच्या उत्पन्न गोळा करण्याच्या कामावर व

**रक्षासु, भयोपधाशुद्धान् आसन्नकार्येषु राज्ञः । १३ । सर्वोपधाशुद्धान् मन्त्रिणः कुर्यात् । १४ । सर्वत्राशुचीन् खनिद्रव्यहस्तिवनकर्मान्तेषूपयोजयेत् । १५ ।**

**त्रिवर्गभयसंशुद्धानमात्यान्स्वेषु कर्मसु ।**
**अधिकुर्याद्यथाशौचमित्याचार्या व्यवस्थिताः ॥ १६ ॥**
**न त्वेव कुर्यादात्मानं देवीं वा लक्ष्यमीश्वरः ।**
**शौचहेतोरमात्यानामेतत्कौटिल्यदर्शनम् ॥ १७ ॥**
**न दूषणमदुष्टस्य विषेणेवाम्भसश्चरेत् ।**
**कदाचिद्धि प्रदुष्टस्य नाधिगम्येत भेषजम् ॥ १८ ॥**
**कृता च कलुषा बुद्धिरुपधाभिश्चतुर्विधा ।**
**नागत्वान्तं निवर्तेत स्थिता सत्त्ववतां धृतौ ॥ १९ ॥**
**तस्माद्बाह्यमधिष्ठानं कृत्वा कार्ये चतुर्विधे ।**
**शौचाशौचममात्यानां राजा मार्गेत सत्त्रिभिः ॥ २० ॥**

**इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे उपधाभिः शौचाशौचज्ञानममात्यानाम् दशमोऽध्यायः ।**

संनिधात्याच्या ते साठविण्याच्या कामावर नेमावे, कामाच्या कसोटीला उतरतील त्यांना राजवाडयाच्या आतील व बाहेरील क्रीडास्थानांच्या रक्षणाच्या कामावर नेमावे आणि भयाच्या कसोटीला उतरलेल्यांची राजाच्या संनिध होणाऱ्या कार्यांवर नेमणूक करावी. १४ सर्व कसोटयांना उतरलेल्यांना मंत्रिपदी नेमावे. १५ सर्व कसोटयांत अशुद्ध ठरलेल्यांचा खाणी, द्रव्योत्पादक जंगले, हत्तींची जंगले, कारखाने यांत उपयोग करावा.

१६ धर्म, अर्थ व काम आणि भय यांच्या कसोटीला उतरलेल्या अमात्यांची त्यांच्या शुद्धतेनुसार यथोचित कामांवर नेमणूक करावी असे आचार्यांनी ठरविले आहे.

१७ परंतु अमात्यांच्या शुद्धतेची परीक्षा पहाण्याच्या उद्देशाने राजाने त्यात कधीही स्वतःचा अथवा राणीचा प्रयोगसाधन म्हणून उपयोग होऊ देऊ नये असे कौटिल्याचे मत आहे.

१८ विषाने पाणी दूषित करण्याप्रमाणे दुष्ट नसलेल्या माणसाचे मन (वरील प्रकारच्या सूचनांनी) दूषित करू नये. कारण, कदाचित तो दूषितपणा घालविणारे औषध उपलब्ध होणार नाही.

१९ आणि चार प्रकारच्या कसोटयांनी कलुषित झालेली बुद्धी सत्त्वयुक्त मनुष्यांच्या अंतःकरणात दृढ होऊन शेवटपर्यंत गेल्याशिवाय परत फिरणार नाही.

२० यास्तव ह्या चार प्रकारच्या कसोटीच्या कार्यात दुसऱ्या कोणाला तरी प्रयोगाचे अधिष्ठान बनवून राजाने गुप्त हेरांच्या द्वारा अमात्यांच्या शुद्धाशुद्धतेची परीक्षा करावी.

## ११

## [ सप्तमं प्रकरणम् – गूढपुरुषोत्पत्तिः, तत्र संस्थोत्पत्तिः ]

**उपधाभिः शुद्धामात्यवर्गो गूढपुरुषानुत्पादयेत् कापटिकोदास्थितगृहपतिकवैदेहकतापसव्यञ्जनान् सत्त्रितीक्ष्णरसदभिक्षुकीश्च । १ ।**

**परमर्मज्ञः प्रगल्भश्छात्रः कापटिकः । २ । तमर्थमानाभ्यां प्रोत्साह्य मन्त्री ब्रूयात् – 'राजानं मां च प्रमाणं कृत्वा यस्य यदकुशलं पश्यसि तत्तदानीमेव प्रत्यादिश ' इति । ३ ।**

**प्रव्रज्याप्रत्यवसितः प्रज्ञाशौचयुक्त उदास्थितः । ४ । स वार्त्ताकर्मप्रदिष्टायां भूमौ प्रभूतहिरण्यान्तेवासी कर्म कारयेत् । ५ । कर्मफलाच्च सर्वप्रव्रजितानां ग्रासाच्छादनावसथान् प्रतिविदध्यात् । ६ । वृत्तिकामांश्चोपजपेत् – 'एतेनैव वेषेण राजार्थश्चरितव्यो भक्तवेतनकाले चोपस्थातव्यम् ' इति । ७ । सर्वप्रव्रजिताश्च स्वं स्वं वर्गमेवमुपजपेयुः । ८ ।**

### अकरावा अध्याय

### प्रकरण ७ : गुप्त हेरांची नेमणूक; स्थायिक हेरांची नेमणूक

१ गुप्त कसोटयांनी अमात्यांची परीक्षा केल्यानंतर कापटिक, उदास्थित गृहपतिकव्यंजन, वैदेहकव्यंजन व तापसव्यंजन, तसेच सत्री, तीक्ष्ण, रसद आणि भिक्षुकी असे (स्थायी व फिरते मिळून नऊ प्रकारचे) गुप्त हेर नेमावेत.

२ दुसऱ्यांची रहस्ये जाणून घेण्यात कुशल, धीट असा छात्र तो कापटिक (कपटाच्या आचरणाचा). ३ मंत्र्याने द्रव्य आणि सन्मान यांनी त्याला प्रोत्साहित करून म्हणावे, " राजाला आणि मला प्रमाण मानून तुला ज्या कोणाचा जो काही दोष दिसून येईल तो तावडतोब आम्हाला कळवीत जा. "

४ संन्यास घेऊन त्यापासून च्युत झालेला आणि बुद्धी व शुद्ध आचार यांनी युक्त तो उदास्थित. ५ त्याने (शेती, पशुपालन व व्यापार ह्यांपैकी एखाद्या) वार्त्ताव्यवहारासाठी नेमून दिलेल्या ठिकाणी पुष्कळ द्रव्य व पुष्कळ माणसे घेऊन तो व्यवहार चालवावा. ६ आणि त्या व्यवहारापासून जो नफा होईल त्यातून (येंतील त्या) सर्व परिव्राजकांच्या अन्नवस्त्राची व रहाण्याची सोय करावी. ७ आणि त्यांच्यापैकी ज्यांना कायमची उपजीविका पाहिजे असेल त्यांना गुप्तपणे म्हणावे, " ह्याच वेषात राहून राजाच्या हितासाठी तुम्ही काम करीत जावे आणि भोजनसमयी व पगाराच्या वेळी येथे उपस्थित होत जावे. " ८ आणि सर्व पंथांतील संन्याशांनी आपापल्या पंथातील अशा परिव्राजकांना याचप्रमाणे गुप्त सूचना कराव्यात.

**कर्षको वृत्तिक्षीणः प्रज्ञाशौचयुक्तो गृहपतिकव्यञ्जनः । ९ । स कृषिकर्मप्रदिष्टायां भूमौ – इति समानं पूर्वेण । १० ।**

**वाणिजको वृत्तिक्षीणः प्रज्ञाशौचयुक्तो वैदेहकव्यञ्जन : । ११ । स वणिक्कर्मप्रदिष्टायां भूमौ – इति समानं पूर्वेण । १२ ।**

**मुण्डो जटिलो वा वृत्तिकामस्तापसव्यञ्जनः । १३ । स नगराभ्याशे प्रभूतमुण्डजटिलान्तेवासी शाकं यवमुष्टिं वा मासद्विमासान्तरं प्रकाशमश्नीयात्, गूढमिष्टमाहारम् । १४ । वैदेहकान्तेवासिनश्चैनं समिद्धयोगैरर्चयेयुः । १५ । शिष्याश्चास्यावेदयेयुः – 'असौ सिद्धः सामेधिक :' इति । १६ । समेधाशास्तिभिश्चाभिगतानामङ्गविद्यया शिष्यसंज्ञाभिश्च कर्माण्यभिजनेऽवसितान्यादिशेत् – अल्पलाभम् अग्निदाहं चोरभयं दूष्यवधं तुष्टिदानं विदेशप्रवृत्तिज्ञानम्, 'इदमद्य श्वो वा भविष्यति, इदं वा राजा करिष्यति' इति । १७ । तदस्य गूढाः**

९ उपजीविकेचे साधन नसलेला परंतु बुद्धिमान व शुद्ध आचरणाचा शेतकरी म्हणजे गृहपतिकव्यंजन ( गृहस्थाच्या वेषात असणारा हेर). १० त्याने शेतीच्या कामासाठी नेमून दिलेल्या ठिकाणी – इत्यादी सर्व वरीलप्रमाणे.

११ उपजीविकेचे साधन नसलेला परंतु बुद्धीने व शुद्ध आचरणाने युक्त असा व्यापारी म्हणजे वैदेहकव्यंजन (व्यापाऱ्याच्या वेषातील हेर). १२ त्याने व्यापारासाठी नेमून दिलेल्या ठिकाणी – इत्यादी सर्व वरीलप्रमाणे.

१३ उपजीविकेची अभिलाषा असणारा, मुंडन करणारा अथवा जटाधारी तपस्वी म्हणजे तापसव्यंजन (तपस्व्याच्या वेषातील हेर). १४ त्याने नगरापासून जवळ मुंडन करणाऱ्या अथवा जटाधारी पुष्कळ शिष्यांसह वास करावा आणि महिना – दोन महिन्यांच्या अंतराने भाजीपाला किंवा मूठभर जव असा आहार उघडपणे घ्यावा व गुप्तपणे यथेच्छ भोजन करावे. १५ आणि वैदेहकव्यंजनाच्या शिष्यांनी समृद्धिप्राप्तीसाठी करावयाच्या विधींच्या द्वारा त्याची पूजा करावी. १६ आणि त्याच्या शिष्यांनी सर्वांना सांगावे की हा सिद्ध पुरुष असून तो कोणालाही समृद्ध करू शकतो. १७ आणि समृद्धीच्या आशेने जे आलेले असतील त्यांना अंगविद्येच्या साह्याने आणि शिष्यांनी केलेल्या खुणांच्या द्वारा त्यांच्या कुलात घडलेल्या घटनांविषयी सांगावे, (उदाहरणार्थ) अल्पसा झालेला लाभ, लागलेली आग, चोरीची भीती, द्रोह करणाऱ्याचा राजाने केलेला वध, संतुष्ट होऊन राजाने दिलेले बक्षीस, परदेशातील घडामोडींची बातमी, तसेच " हे आज किंवा उद्या घडून येईल " किंवा " राजा अमुक अमुक करील " असे सांगावे. १८ ते त्याचे भविष्य खरे ठरेल अशी उपाययोजना

सत्रिणश्च संपादयेयुः । १८ । सत्त्वप्रज्ञावाक्यशक्तिसंपन्नानां राजभाग्यमनुव्याहरेत्, मन्त्रिसंयोगं च ब्रूयात् । १९ । मन्त्री चैषां वृत्तिकर्मभ्यां वियतेत । २० ।

ये च कारणादभिक्रुद्धास्तानर्थमानाभ्यां शमयेत्, अकारणक्रुद्धांस्तूष्णींदण्डेन, राजद्विष्टकारिणश्च । २१ ।

पूजिताश्चार्थमानाभ्यां राज्ञा राजोपजीविनाम् ।
जानीयुः शौचमित्येताः पञ्च संस्थाः प्रकीर्तिताः ॥ २२ ॥

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे गूढपुरुषोत्पत्तौ संस्थोत्पत्तिः एकादशोऽध्यायः ।

## १२

### [ सप्तमं प्रकरणम् – गूढपुरुषोत्पत्तिः, तत्र संचारोत्पत्तिः ]

### [ अष्टमं प्रकरणम् – गूढपुरुषप्रणिधिः ]

ये चाप्यसंबन्धिनोऽवश्यभर्तव्यास्ते लक्षणमङ्गविद्यां जम्भकविद्यां मायागतमाश्रमधर्मं निमित्तमन्तरचक्रमित्यधीयानाः सत्रिणः, संसर्गविद्यां वा । १ ।

गूढ पुरुष व सत्री हेर यांनी करावी. १९ जे सत्त्व, प्रज्ञा आणि वक्तृत्व यांनी संपन्न असतील त्यांना राजाकडून त्यांचा भाग्योदय होईल असे सांगावे आणि लवकरच मंत्र्याची भेट होईल असे म्हणावे. २० आणि तदनुसार मंत्र्याने त्यांच्या उपजीविकेची आणि कामाची व्यवस्था करावी.

२१ जे योग्य कारणास्तव रागावले असतील त्यांना द्रव्य व सन्मान यांनी शांत करावे, जे कारणाशिवाय रागावले असतील त्यांचे गुप्त वधाच्या योगे दमन करावे आणि राजाचा द्वेष करणाऱ्यांचेही तसेच दमन करावे.

२२ आणि राजाने द्रव्य व सन्मान यांच्या साह्याने सत्कार केला असता ह्या गूढ पुरुषांनी राजाच्या सेवकांची शुद्धाशुद्धता शोधून काढावी. असे हे पाच प्रकारचे स्थायी हेर सांगितले आहेत.

## बारावा अध्याय

### प्रकरण ७ (पुढे चालू) : फिरत्या हेरांची नेमणूक

### प्रकरण ८ : गुप्त हेरांची कामावर योजना

१ आणि जे (राजाचे) आप्त व संबंधी आहेत आणि ज्यांचे पालनपोषण करणे आवश्यक आहे त्यांनी सामुद्रिक, अंगविद्या, जादूटोणा, इंद्रजाल, आश्रमधर्म, निमित्तशास्त्र, अंतरचक्राची विद्या यांचे अध्ययन केल्यास अथवा संसर्गविद्येचे अध्ययन केल्यास त्यांना सत्री करावे.

**ये जनपदे शूरास्त्यक्तात्मानो हस्तिनं व्यालं वा द्रव्यहेतोः प्रतियोधयेयुस्ते तीक्ष्णाः । २ ।**

**ये बन्धुषु निःस्नेहाः क्रूरा अलसाश्च ते रसदाः । ३ ।**

**परिव्राजिका वृत्तिकामा दरिद्रा विधवा प्रगल्भा ब्राह्मण्यन्तःपुरे कृतसत्कारा महामात्रकुलान्यभिगच्छेत् । ४ । एतया मुण्डा वृषल्यो व्याख्याताः । ५ । इति संचाराः ।**

**तान् राजा स्वविषये मन्त्रिपुरोहितसेनापतियुवराजदौवारिकान्तर्वंशिक-प्रशास्तृसमाहर्तृसंनिधातृप्रदेष्टृनायकपौरव्यावहारिककार्मान्तिकमन्त्रिपरिषदध्यक्ष-दण्डदुर्गान्तपालाटविकेषु श्रद्धेयदेशवेषशिल्पभाषाभिजनापदेशान् भक्तितः सामर्थ्ययोगाच्चापसर्पयेत् । ६ ।**

**तेषां बाह्यं चारं छत्रभृङ्गारव्यजनपादुकासनयानवाहनोपग्राहिणस्तीक्ष्णा विद्युः । ७ । तं सत्त्रिणः संस्थास्वर्पयेयुः । ८ ।**

२ देशात जे शूर, प्राणाची पर्वा न करणारे, द्रव्यासाठी हत्तीशी अथवा इतर जंगली प्राण्याशी झुंज करण्यास सिद्ध असतील अशा हेरांना तीक्ष्ण ही संज्ञा आहे.

३ ज्यांना आपल्या बांधवांविषयी प्रेम नाही, जे क्रूर वृत्तीचे आणि आळशी स्वभावाचे असतील ते रसद (विष देणारे) हेर.

४ परिव्राजिका झालेली परंतु उपजीविकेची कामना करणारी, दरिद्री, धीट, ब्राह्मण विधवा म्हणजे भिक्षुकी हेर; अंतःपुरात तिला सन्मानाने वागविण्यात आले म्हणजे तिने मोठ्या अधिकाऱ्यांच्या घरी येणेजाणे सुरू करावे. ५ हेच पाखंडी पंथांतील मुंडन करणाऱ्या भिक्षुणींनाही लागू आहे. हे चार फिरते हेर.

६ ह्या हेरांना राजाने आपल्या देशातील मंत्री, पुरोहित, सेनापती, युवराज, दौवारिक (राजवाड्यातील द्वारपालांचा मुख्य), आंतर्वंशिक (राजवाड्यातील रक्षकांचा मुख्य), प्रशास्ता, समाहर्ता, संनिधाता, प्रदेष्टा, नायक, पौर-व्यावहारिक (शहरातील न्यायाधीश), कार्मांतिक (कारखान्यांचा संचालक), मंत्रिपरिषद, अध्यक्ष, दंडपाल, दुर्गपाल, अंतपाल आणि अटवीमुख्य यांच्यावर हेरगिरी करण्यासाठी त्यांचा देश, वेष, कारागिरी, भाषा आणि कुल हे विश्वासार्ह होतील (संशय उत्पन्न करणार नाहीत) अशा रीतीच्या कपटवेषात त्यांच्या भक्तीच्या व सामर्थ्याच्या अनुरोधाने नेमावे.

७ छत्र, भृङ्गार (पाण्याचा कलश), पंखा, पादत्राणे, आसन, गाडी, घोडे आदी वाहने यांच्या द्वारा सेवा करणाऱ्या तीक्ष्ण हेरांनी त्या मंत्री आदींच्या गुप्त अशा बाह्य हालचालींची माहिती मिळवावी. ८ ती माहिती सत्री हेरांनी स्थायी हेरसंस्थांकडे पोचवावी.

सूदारालिकस्नापकसंवाहकास्तरककल्पकप्रसाधकोदकपरिचारका रसदाः कुब्जवामनकिरातमूकबधिरजडान्धच्छद्मानो नटनर्तकगायनवादकवाग्जीवनकुशीलवाः स्त्रियश्चाभ्यन्तरं चारं विद्युः । ९ । तं भिक्षुक्यः संस्थास्वर्पयेयुः । १० ।

संस्थानामन्तेवासिनः संज्ञालिपिभिश्चारसंचारं कुर्युः । ११ । न चान्योन्यं संस्थास्ते वा विद्युः । १२ ।

भिक्षुकीप्रतिषेधे द्वाःस्थपरंपरा मातापितृव्यञ्जनाः शिल्पकारिकाः कुशीलवा दास्यो वा गीतपाठ्यवाद्यभाण्डगूढलेख्यसंज्ञाभिर्वा चारं निर्हरेयुः । १३ । दीर्घरोगोन्मादाग्निरसविसर्गेण वा गूढनिर्गमनम् । १४ ।

त्रयाणामेकवाक्ये संप्रत्ययः । १५ । तेषामभीक्ष्णविनिपाते तूष्णींदण्डः प्रतिषेधः । १६ ।

९ आचारी, वाढप्ये, स्नानगृहातील परिचारक, संवाहक, शय्यागृहातील परिचारक, केशकर्तक, प्रसाधन करणारे आणि पाणी देणारे – अशा नोकरीवर असणारे रसद हेर, तसेच कुबडे, खुजे, किरात,.मुके, बहिरे, वेडसर आणि आंधळे यांच्या रूपात वावरणारे हेर आणि नट, नर्तक, गायक, वादक, कथाकार व भाट (कुशीलव) आणि स्त्रिया यांनी त्यांच्या घरातील गुप्त हालचालींची माहिती मिळवावी. १० ती माहिती भिक्षुकी हेरांनी स्थायी हेरसंस्थांकडे पोचती करावी.

११ संस्थांमधील शिष्यांनी मिळालेली गुप्त बातमी संज्ञारूपी लिपीच्या द्वारा (सांकेतिक भाषेत) योग्य अधिकाऱ्याला कळवावी. १२ आणि त्या हेरसंस्था व त्यांचे ते शिष्य यांची परस्परांना (ते हेर असल्याची) माहिती नसावी.

१३ भिक्षुकींना आत येण्यास मज्जाव केलेला असल्यास दाराशी एकामागून एक उपस्थित होणारे (भिकारी वगैरेच्या वेषातील हेर), (घरातील नोकरांचे) आईबाप असल्याच्या मिषाने येणारे, कलाकुसर जाणणाऱ्या स्त्रिया, कुशीलव अथवा दासी (यांच्या रूपातील हेर) यांनी ती आतील गुप्त माहिती, गाणे पठन करावयाचा श्लोक, एखाद्या वाद्यात लपविलेला लेख किंवा संज्ञा ह्यांच्या साह्याने बाहेर न्यावी. १४ किंवा (आत नोकरीस असलेल्या) हेरांनी दीर्घकालीन रोग, उन्माद, आग, विषप्रयोग यांसारखे निमित्त उभे करून गुप्तपणे बाहेर पडावे.

१५ तीन हेरांनी आणलेल्या बातमीत एकवाक्यता असल्यास तिच्यावर विश्वास ठेवावा. १६ त्यांच्याकडून वारंवार चुका होत असल्यास गुप्त रीतीने शासन करून त्यांना कामावरून दूर करावे.

**कण्टकशोधनोक्ताश्चापसर्पाः परेषु कृतवेतना वसेयुरसंपातिनश्चारार्थम् ।१७। त उभयवेतनाः । १८ ।**

**गृहीतपुत्रदारांश्च कुर्यादुभयवेतनान् ।**
**तांश्चारिप्रहितान्विद्यात्तेषां शौचं च तद्विधैः ॥ १९ ॥**
**एवं शत्रौ च मित्रे च मध्यमे चावपेच्चरान् ।**
**उदासीने च तेषां च तीर्थेष्वष्टादशस्वपि ॥ २० ॥**
**अन्तर्गृहचरास्तेषां कुब्जवामनपण्डकाः ।**
**शिल्पवत्यः स्त्रियो मूकाश्चित्राश्च म्लेच्छजातयः ॥ २१ ॥**
**दुर्गेषु वणिजः संस्था दुर्गान्ते सिद्धतापसाः ।**
**कर्षकोदास्थिता राष्ट्रे राष्ट्रान्ते व्रजवासिनः ॥ २२ ॥**
**वने वनचराः कार्याः श्रमणाटविकादयः ।**
**परप्रवृत्तिज्ञानार्थाः शीघ्राश्चारपरंपराः ॥ २३ ॥**

१७ कंटकशोधन अधिकरणात (४.४.३ ह्या सूत्रात) निर्देशिलेल्या गुप्त हेरांनी शत्रूंच्या राज्यांत पगारावर नोकरी मिळवून गुप्त बातम्या काढण्यासाठी परस्परांशी ओळख न ठेवता रहावे. १८ ते उभयवेतन (दोन्ही राज्यांकडून पगार मिळविणारे) हेर होत.

१९ त्यांची मुले आणि बायका यांना (ओलीस म्हणून) आपल्या ताब्यात घेऊन उभयवेतन हेर नेमावेत. तसे हेर शत्रूने आपल्या राज्यात पाठविले असल्यास त्यांना शोधून काढावे. आणि त्यांच्याच वेषातील इतर हेरांमार्फत (आपल्या उभयवेतनांच्या) शुद्धतेची खात्री करून घ्यावी.

२० याप्रमाणे शत्रु, मित्र, मध्यम आणि उदासीन ह्या राजांवर व त्यांच्या अठराही वड्या अधिकाऱ्यांवर गुप्त हेरांची पेरणी करावी.

२१ त्यांच्या घरात कुबडे, खुजे, षण्ढ, कलाकुसर जाणणाऱ्या स्त्रिया, मुके आणि (किरातादी) निरनिराळ्या म्लेच्छ जातींचे लोक यांना हेरगिरीसाठी ठेवावे.

२२ दुर्गांत वैदेहकव्यंजन हेरांच्या संस्था, दुर्गाच्या आसपास सिद्ध तापसव्यजनांच्या संस्था, दुर्गाव्यतिरिक्त जनपदात गृहपतिकव्यंजन आणि उदास्थित यांच्या संस्था आणि जनपदाच्या सरहद्दीवर गुरांचे कळप पाळणाऱ्या हेरांची वस्ती (अशी योजना करावी).

२३ अरण्यांत श्रमण भिक्षू, जंगलात रहाणारे इत्यादी वनचरांची योजना करावी. गुप्त हेरांचे हे जाळे शत्रूंच्या हालचालीची बातमी तावडतोब मिळावी ह्या उद्देशाने पसरावे.

परस्य चैते बोद्धव्यास्तादृशैरेव तादृशाः ।
चारसंचारिणः संस्था गूढाश्चागूढसंज्ञिताः ।। २४ ।।
अकृत्यान्कृत्यपक्षीयैर्दर्शितान्कार्यहेतुभिः ।
परापसर्पज्ञानार्थं मुख्यानन्तेषु वासयेत् ।। २५ ।।

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे गूढपुरुषोत्पत्तौ संचारोत्पत्तिः, गूढपुरुषप्रणिधिः द्वादशोऽध्यायः ।

## १३

## [ नवमं प्रकरणम् – स्वविषये कृत्याकृत्यपक्षरक्षणम् ]

कृतमहामात्रापसर्पः पौरजानपदानपसर्पयेत् । १ ।

सत्त्रिणो द्वन्द्विनस्तीर्थसभापूगजनसमवायेषु विवादं कुर्युः । २ । 'सर्वगुणसंपन्नश्चायं राजा श्रूयते, न चास्य कश्चिद्गुणो दृश्यते यः पौरजानपदान् दण्डकराभ्यां पीडयति ' इति । ३ । तत्र येऽनुप्रशंसेयुस्तानितरस्तं च प्रतिषेधयेत् । ४ । 'मात्स्य-

२४ आणि शत्रूने योजिलेले हेर, ते ज्या प्रकारचे असतील त्याच प्रकारच्या आपल्या हेरांच्या द्वारा शोधून काढावेत – मग ते संचार करणारे हेर असोत किंवा गुप्त न भासणाऱ्या गुप्त संस्था असोत.

२५ फितूर होण्याची संभाव्यता नसलेले, परंतु फितूर व्हावयास निमित्त होणाऱ्या (क्रोध, लोभ, भय व मान ह्या) गोष्टी त्यांच्या ठिकाणी दाखवून दिलेले, असे जे मोठे अधिकारी असतील त्यांना शत्रूच्या हेरगिरीची माहिती मिळविण्याच्या उद्देशाने सरहद्दीवर रहावयास सांगावे.

## तेरावा अध्याय

## प्रकरण ९ : स्वतःच्या राज्यातील फितूर होण्याचा संभव असलेले व फितूर होण्याचा संभव नसलेले यांच्या संबंधात घ्यावयाची खबरदारी

१ मोठ्या अधिकाऱ्यांवर हेरांची योजना केल्यानंतर नगरवासी आणि जनपदनिवासी यांच्यावर हेरांमार्फत लक्ष ठेवावे.

२ सत्री हेरांनी दोन परस्परविरुद्ध बाजू घेऊन तीर्थ, सभा, श्रेणींच्या बैठकी, लोकांचे मेळावे या ठिकाणी वाद करावा. ३ एकाने म्हणावे, "हा राजा सर्वगुणसंपन्न आहे असे म्हणतात. परंतु ह्याच्या अंगी कोणताही गुण दिसत नाही, कारण हा नगरवासी व जनपदनिवासी प्रजेला दंड आणि कर ह्यांनी छळतो."

न्यायाभिभूताः प्रजा मनुं वैवस्वतं राजानं चक्रिरे । ५ । धान्यषड्भागं पण्यदशभागं हिरण्यं चास्य भागधेयं प्रकल्पयामासुः । ६ । तेन भृता राजानः प्रजानां योगक्षेमावहाः । ७ । तेषां किल्बिषमदण्डकरा हरन्त्ययोगक्षेमावहाश्च प्रजानाम् । ८ । तस्मादुञ्छषड्भागमारण्यका अपि निर्वपन्ति –" तस्यैतद्भागधेयं योऽस्मान्गोपायति " इति । ९ । इन्द्रयमस्थानमेतद्राजानः प्रत्यक्षहेडप्रसादाः । १० । तानवमन्यमानान् दैवोऽपि दण्डः स्पृशति । ११ । तस्माद्राजानो नावमन्तव्याः । १२ ।' इत्येवं क्षुद्रकान् प्रतिषेधयेत् । १३ । किंवदन्तीं च विद्युः । १४ ।

ये चास्य धान्यपशुहिरण्यान्याजीवन्ति, तैरुपकुर्वन्ति व्यसनेऽभ्युदये वा, कुपितं बन्धुं राष्ट्रं वा व्यावर्तयन्ति, अमित्रमाटविकं वा प्रतिषेधयन्ति, तेषां मुण्डजटिलव्यञ्जनास्तुष्टातुष्टत्वं विद्युः । १५ । तुष्टान् भूयोऽर्थमानाभ्यां

४ तेथे असलेले जे कोणी ह्या विचाराला अनुमोदन देतील त्यांचा व त्या सत्र्याचा दुसऱ्या सत्र्याने निषेध करावा. ५ त्याने म्हणावे, " मात्स्यन्यायाने पीडित झालेल्या प्रजेने वैवस्वत मनूला राजा केले. ६ धान्याचा सहावा भाग, विक्रेय वस्तूंचा दहावा भाग आणि द्रव्य हा त्याचा वाटा असे ठरवून दिले. ७ त्याने आपला चरितार्थ चालवून राजेलोक प्रजेच्या योगक्षेमाची काळजी वाहतात. ८ जे (प्रजाजन) दंड आणि कर भरीत नाहीत ते त्यांचे (राजांचे) पाप आपल्या माथी ओढून घेतात आणि जे राजे प्रजेच्या योगक्षेमाची काळजी वाहात नाहीत ते प्रजेचे पाप आपल्यावर ओढून घेतात. ९ म्हणून अरण्यवासी लोक सुद्धा वेचून जमविलेल्या धान्याचा सहावा भाग '.जो आमचे रक्षण करतो त्याचा हा हिस्सा ' असे म्हणून राजाला अर्पण करतात. १० राजे पृथ्वीवर इंद्र व यम यांच्या स्थानी आहेत, कारण त्यांचा राग व प्रसाद यांचा प्रत्यक्ष प्रत्यय येतो. ११ त्यांचा जे अवमान करतात त्यांना दैवी दंडही सोसावा लागतो. १२ म्हणून राजांचा अवमान करू नये. " १३ याप्रमाणे राज्यातील सामान्य लोकांना राजद्वेषापासून परावृत्त करावे. १४ आणि त्या हेरांनी लोकांत प्रसृत होणाऱ्या अफवांचा शोध घ्यावा.

१५ आणि जे (मोठे अधिकारी) राजाचे धान्य, पशू व द्रव्य यांवर उपजीविका करतात, संकटकाली अथवा इतर वेळीही हे (धान्य वगैरे) देऊन राजाच्या उपयोगी पडतात, बंड करून उठलेल्या राजाच्या आप्ताला अथवा एखाद्या प्रदेशाला बंडापासून परावृत्त करतात, शत्रू किंवा अटवीमुख्य यांचा प्रतिकार करतात, ते संतुष्ट आहेत की असंतुष्ट आहेत याचा शोध मुंडन करणाऱ्या व जटाधारी तापसवेषातील हेरांनी घ्यावा. १६ जे संतुष्ट असतील

पूजयेत् । १६ । अतुष्टांस्तुष्टिहेतोस्त्यागेन साम्ना च प्रसादयेत् । १७ । परस्पराद्वा भेदयेदेनान्, सामन्ताटविकतत्कुलीनापरुद्धेभ्यश्च । १८ । तथाप्यतुष्यतो दण्डकरसाधनाधिकारेण जनपदविद्वेषं ग्राहयेत् । १९ । विद्विष्टानुपांशुदण्डेन जनपदकोपेन वा साधयेत् । २० । गुप्तपुत्रदारानाकरकर्मान्तेषु वा वासयेत् परेषामास्पदभयात् । २१ ।

क्रुद्धलुब्धभीतमानिनस्तु परेषां कृत्याः । २२ । तेषां कार्तान्तिकनैमित्तिकमौहूर्तिकव्यञ्जनाः परस्पराभिसंबन्धममित्राटविकसंबन्धं वा विद्युः । २३ । तुष्टानर्थमानाभ्यां पूजयेत् । २४ । अतुष्टान् सामदानभेददण्डैः साधयेत् । २५ ।

एवं स्वविषये कृत्यानकृत्यांश्च विचक्षणः ।
परोपजापात्संरक्षेत्प्रधानान् क्षुद्रकानपि ॥ २६ ॥

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे स्वविषये कृत्याकृत्यपक्षरक्षणं त्रयोदशोऽध्यायः ।

त्यांचा आणखी द्रव्य व मानसन्मान यांनी सत्कार करावा. १७ जे असंतुष्ट असतील त्यांना संतुष्ट करण्याच्या हेतूने द्रव्यदानाने व सामोपचाराने खूष करावे. १८ किंवा भेदनीतीने त्यांना एकमेकापासून फोडावे, तसेच शेजारचा दुसरा राजा, अटवीपति, राजकुलातील गादीवर हक्क सांगणारा आणि राजाच्या मर्जीतून उतरलेला राजपुत्र यांपासूनही त्यांना फोडावे. १९ तरीही ते असंतुष्ट राहिले तर त्यांना दंड व कर वसूल करण्याच्या कामगिरीवर नेमून ते जनतेत अप्रिय होतील असे करावे. २० अप्रिय झाले म्हणजे गुप्त रीतीने शासन करून किंवा जनतेच्या उठावाने त्यांचा काटा काढावा. २१ अथवा त्यांची बायकामुले आपल्या संरक्षणाखाली घेऊन त्यांना खाणी व कारखाने यांतील कामावर ठेवावे, अन्यथा ते शत्रूंच्या कारवायांना बळी पडण्याची भीती असते.

२२ क्रोध आलेले, लोभी, भ्यालेले आणि मानी (असे चार प्रकारचे अधिकारी) शत्रूंना फितूर होण्याचा संभव असतो. २३ त्यांचे परस्परांशी असलेले संबंध तसेच शत्रूंशी अथवा अटवीपतीशी असलेले संबंध यांचा शोध भविष्यवेत्ते, निमित्त जाणणारे आणि मुहूर्त सांगणारे ज्योतिषी यांच्या वेषातील हेरांनी घ्यावा. २४ जे संतुष्ट असतील त्यांचा द्रव्य आणि सन्मान यांनी सत्कार करावा. २५ असंतुष्ट असतील त्यांना साम, दान, भेद व दंड ह्या उपायांनी वठणीवर आणावे.

२६ याप्रमाणे दूरदृष्टी असलेल्या राजाने आपल्या देशातील फितूर होण्यासारखे व फितूर न होण्यासारखे असे मोठे अधिकारी व सामान्यजन यांचे शत्रूंच्या कारस्थानांपासून रक्षण करावे.

## १४

### [ दशमं प्रकरणम् – परविषये कृत्याकृत्यपक्षोपग्रहः ]

**कृत्याकृत्यपक्षोपग्रहः स्वविषये व्याख्यातः, परविषये वाच्यः । १ ।**

**संश्रुत्यार्थान् विप्रलब्धः, तुल्यकारिणोः शिल्पे वोपकारे वा विमानितः, वल्लभापरुद्धः, समाहूय पराजितः, प्रवासोपतप्तः, कृत्वा व्ययमलब्धकार्यः, स्वधर्माद्दायाद्याद्वोपरुद्धः, मानाधिकाराभ्यां भ्रष्टः, कुल्यैरन्तर्हितः, प्रसभाभिमृष्टस्त्रीकः, काराभिन्यस्तः, परोक्तदण्डितः, मिथ्याचारवारितः, सर्वस्वमाहारितः, बन्धनपरिक्लिष्टः, प्रवासितबन्धुः – इति क्रुद्धवर्गः । २ ।**

**स्वयमुपहतः, विप्रकृतः, पापकर्माभिख्यातः, तुल्यदोषदण्डेनोद्विग्नः, पर्यात्तभूमिः, दण्डेनोपनतः, सर्वाधिकरणस्थः सहसोपचितार्थः, तत्कुलीनोपाशंसुः, प्रद्विष्टो राज्ञा, राजद्वेषी च – इति भीतवर्गः । ३ ।**

### चौदावा अध्याय

### प्रकरण १० : शत्रूच्या राज्यातील फितुरीचा संभव असलेल्या व फितुरीचा संभव नसलेल्या लोकांना आपल्या बाजूस वळवून घेणे

१ आपल्या राज्यातील संभाव्य फितूर व तसे नसलेल्या लोकांना कसे स्वाधीन ठेवावे ते सांगितले; आता परराज्यातील तशा लोकांना कसे वश करावे ते सांगावयाचे आहे.

२ काही गोष्टी देण्याचे वचन दिल्यावर फसविलेला, एखादी कला अथवा उपकारक कार्य यात सारखेच निष्णात असलेल्या दोघांपैकी विमानना झालेला, राजवल्लभामुळे राजाच्या मर्जीतून उतरलेला, आव्हान देऊन त्यात हरलेला, हद्दपारीने संत्रस्त झालेला, खर्च करून कार्यसिद्धी न झालेला, त्याच्या स्वधर्माच्या आचरणाला अथवा वारसा हक्काला प्रतिबंध झालेला, मानमरातब किंवा अधिकार यापासून भ्रष्ट झालेला, स्वकुलातील माणसांनी पुढे येऊ न दिलेला ज्याच्या स्त्रीवर जबरीने अतिप्रसंग केला आहे असा, तुरुंगात टाकलेला, कज्जा हरल्यामुळे दंड झालेला, चुकीच्या आचरणापासून परावृत्त केलेला, ज्याचे सर्वस्व हिरावून घेतले आहे असा, बंधनाने छळ झालेला, बांधव हद्दपार केले गेले आहेत असा – हा क्रुद्ध लोकांचा वर्ग.

३ स्वतः पीडित झालेला, अपकार केलेला, पापकर्म उघडकीस आलेला, आपल्या सारख्याच अपराधाबद्दल झालेल्या शासनाने भ्यालेला, ज्याची जमीन

परिक्षीण:, अन्यात्तस्व:, कदर्य:, व्यसनी, अत्याहितव्यवहारश्च – इति लुब्धवर्ग: । ४ ।

आत्मसंभावित:, मानकाम:, शत्रुपूजामर्षित:, नीचैरुपहित:, तीक्ष्ण:, साहसिक:, भोगेनासंतुष्ट: – इति मानिवर्ग: । ५ ।

तेषां मुण्डजटिलव्यञ्जनैर्यो यद्भक्तिः कृत्यपक्षीयस्तं तेनोपजापयेत् । ६ ।

'यथा मदान्धो हस्ती मत्तेनाधिष्ठितो यद्यदासादयति तत्सर्वं प्रमृद्नाति, एवमयमशास्त्रचक्षुरन्धो राजा पौरजानपदवधायाभ्युत्थित:, शक्यमस्य प्रतिहस्तिप्रोत्साहनेनापकर्तुम्, अमर्ष: क्रियताम्' इति क्रुद्धवर्गमुपजापयेत् । ७ ।

'यथा लीन: सर्पो यस्माद्भयं पश्यति तत्र विषमुत्सृजति, एवमयं राजा जातदोषाशङ्कस्त्वयि पुरा क्रोधविषमुत्सृजति, अन्यत्र गम्यताम्' इति भीतवर्गमुपजापयेत् । ८ ।

बळकावली गेली आहे असा, बळजबरीने वश केला गेलेला, कोणत्याही खात्यातील एकदम धनसंचय करणारा अधिकारी, गादीवर हक्क सांगणाऱ्या राजकुलातील व्यक्तीची (तो राजा होईल अशी) आशा करणारा, राजाच्या द्वेषास पात्र झालेला आणि राजाचा द्वेष करणारा – हा भयभीत लोकांचा वर्ग.

४ दरिद्री झालेला, ज्याचे सर्व धन दुसऱ्याने बळकावले आहे असा, कृपण, व्यसनी आणि धाडसी व्यवहार करणारा – हा लोभी लोकांचा वर्ग.

५ स्वत:बद्दल मोठ्या कल्पना असणारा, मानाची हाव असणारा, प्रतिपक्षाच्या सत्काराने अमर्षयुक्त झालेला, खालचा दर्जा दिला गेलेला, तीक्ष्ण वृत्तीचा, साहसी, प्राप्त भोगाने असंतुष्ट असणारा – हा मानी लोकांचा वर्ग.

६ ह्या संभाव्य फितुरांतून ज्याची ज्या मुंडन करणाऱ्या अथवा जटाधारी तापस हेरावर भक्ती जडली असेल त्याच्यामार्फत त्याला फितूर करण्याचा प्रयत्न करावा.

७ "ज्याप्रमाणे मत्त माहूत स्वार झालेला मदांध हत्ती वाटेत जे जे सापडेल ते सर्व चिरडून टाकतो त्याप्रमाणे शास्त्ररूपी नेत्र नसलेला हा अंध राजा पौर आणि जानपद यांच्या नाशास उद्युक्त झाला आहे. याच्या विरुद्ध प्रतिस्पर्धी हत्तीला प्रोत्साहित करून याला इजा करणे शक्य आहे. क्रोधाविष्ट व्हा." – याप्रमाणे क्रुद्धवर्गाला फितुरीस प्रवृत्त करावे.

८ "ज्याप्रमाणे दडून असलेला साप जेथून त्याला भीती वाटते तेथे विषारी दंश करतो त्याप्रमाणे हा राजा तुझ्याकडून संकट येईल ह्या भीतीने तुझ्यावर

यथा श्वगणिनां धेनुः श्वभ्यो दुह्यते न ब्राह्मणेभ्यः, एवमयं राजा सत्त्वप्रज्ञावाक्यशक्तिहीनेभ्यो दुह्यते नात्मगुणसंपन्नेभ्यः, असौ राजा पुरुषविशेषज्ञः तत्र गम्यताम्' इति लुब्धवर्गमुपजापयेत् । ९ ।

'यथा चण्डालोदपानश्चण्डालानामेवोपभोग्यो नान्येषाम्, एवमयं राजा नीचो नीचानामेवोपभाग्यो न त्वद्विधानामार्याणाम्, असौ राजा पुरुषविशेषज्ञः, तत्र गम्यताम्' इति मानिवर्गमुपजापयेत् । १० ।

तथेति प्रतिपन्नांस्तान् संहितान्पणकर्मणा ।
योजयेत यथाशक्ति सापसर्पान्स्वकर्मसु ॥ ११ ॥

लभेत सामदानाभ्यां कृत्यांश्च परभूमिषु ।
अकृत्यान्भेददण्डाभ्यां परदोषांश्च दर्शयन् ॥ १२ ॥

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे परविषये कृत्याकृत्यपक्षोपग्रहः चतुर्दशोऽध्यायः ।

लवकरच क्रोधरूपी विषारी दंश करील. येथून दुसरीकडे जावे."– याप्रमाणे भीतवर्गाला फितुरीस प्रवृत्त करावे.

९ "ज्याप्रमाणे कुत्र्यांच्या साह्याने शिकार करणाऱ्यांच्या गाईचे दोहन कुत्र्यांसाठी केले जाते, ब्राह्मणांसाठी नाही, त्याप्रमाणे ह्या राजापासून लाभ, ज्यांच्या अंगी सत्त्व, प्रज्ञा व वक्तृत्व हे गुण नाहीत अशांनाच होतो, जे आत्मगुणांनी संपन्न आहेत त्यांना नाही. तो (दुसरा) राजा मनुष्यांच्या विशिष्ट गुणांची कदर करणारा आहे, त्याच्याकडे चरितार्थासाठी जावे."– याप्रमाणे लोभी वर्गाला फितुरीस प्रवृत्त करावे.

१० "ज्याप्रमाणे चांडाळांच्या विहिरीचे पाणी चांडाळांच्याच उपयोगाचे असते, इतरांच्या उपयोगाचे नसते, त्याप्रमाणे हा क्षुद्र वृत्तीचा राजा हलक्या लोकांच्याच उपयोगी पडणारा आहे, तुझ्यासारख्या आर्यांच्या नाही. तो (दुसरा) राजा पुरुषांच्या विशिष्ट गुणांची कदर करणारा आहे, त्याच्याकडे जावे."– याप्रमाणे मानी लोकांना फितुरीला प्रवृत्त करावे.

११ "बरे आहे" असे म्हणून जे फितुरीस कबूल होतील त्यांच्याशी अटी घालून करार करून त्यांच्या शक्तीप्रमाणे त्यांची आपल्या कामांवर, हेरांच्या नजरेखाली, योजना करावी.

१२ शत्रूंच्या प्रदेशात जे संभाव्य फितूर असतील त्यांना साम व दान ह्या उपायांनी वश करून घ्यावे, जे तसे नसतील त्यांना भेद व दंड ह्या उपायांनी, तसेच शत्रूंचे दोष दाखवून (आपल्या बाजूस वळवून घ्यावे).

१५

## [ एकादशं प्रकरणम् – मन्त्राधिकारः ]

कृतस्वपक्षपरपक्षोपग्रहः कार्यारम्भांश्चिन्तयेत् । १ ।

मन्त्रपूर्वाः सर्वारम्भाः । २ । तदुद्देशः संवृतः कथानामनिःश्रावी पक्षिभिरप्यनालोक्यः स्यात् । ३ । श्रूयते हि शुकसारिकाभिर्मन्त्रो भिन्नः, श्वभिरप्यन्यैश्च तिर्यग्योनिभिरिति । ४ । तस्मान्मन्त्रोद्देशमनायुक्तो नोपगच्छेत् । ५ । उच्छिद्येत मन्त्रभेदी । ६ ।

मन्त्रभेदो हि दूतामात्यस्वामिनामिङ्गिताकाराभ्याम् । ७ । इङ्गितमन्यथावृत्तिः । ८ । आकृतिग्रहणमाकारः । ९ । तस्य संवरणमायुक्तपुरुषरक्षणम् आकार्यकालादिति । १० । तेषां हि प्रमादमदसुप्तप्रलापाः, कामादिरुत्सेकः, प्रच्छन्नोऽवमतो वा मन्त्रं भिनत्ति । ११ । तस्माद्रक्षेन्मन्त्रम् । १२ ।

## पंधरावा अध्याय

### प्रकरण ११ : सल्लामसलतीचा विषय

१ आपल्या राज्यातील आणि परराज्यातील माणसांना स्वाधीन करून घेतल्यानंतर कार्याच्या अनुष्ठानाविषयी विचार करावा.

२ सर्व कार्यांच्या अनुष्ठानाच्या मुळाशी मंत्र (मंत्र्यांशी केलेली मसलत) आहे. ३ मसलतीचे ठिकाण एकांतात, बोलणे बाहेर ऐकू जाणार नाही असे व पक्षी सुद्धा ज्यात डोकावू शकणार नाहीत असे असावे. ४ कारण, पोपट, मैना, कुत्रे तसेच दुसरेही प्राणी यांनी मंत्र बाहेर फोडल्याची उदाहरणे आहेत. ५ म्हणून अनधिकृत माणसाला मसलतीच्या ठिकाणी मज्जाव असावा. ६ जो गुप्त सल्लामसलत बाहेर फोडील त्याचा वध करावा.

७ दूत, अमात्य आणि राजा यांचे इंगित व आकार यांवरून मसलत फुटण्याचा संभव असतो. ८ इंगित म्हणजे नेहमीच्यापेक्षा निराळे वर्तन. ९ चेहऱ्यावरील भावात घडून येणारा वदल म्हणजे आकार. १० कार्यास प्रारंभ होईपर्यंत त्या दोहोंचे संवरण (गोपन) आणि मसलतीतील माणसांबद्दल खबरदारी आवश्यक आहे. ११ कारण, त्या माणसांच्या प्रमादामुळे निघालेले उद्गार, मदावस्थेत अथवा झोपेत होणारी बडबड, काम आदीच्या स्वरूपाचा उद्दामपणा यांच्यामुळे अथवा जो लपून बसला असेल किंवा ज्याची अवमानना झाली असेल त्याच्यामुळे मंत्र फुटतो. १२ म्हणून मंत्र गुप्त राहील याची खबरदारी घ्यावी.

'मन्त्रभेदो ह्ययोगक्षेमकरो राज्ञस्तदायुक्तपुरुषाणां च । १३ । तस्माद् गुह्यमेको मन्त्रयेत ' इति भारद्वाजः । १४ । ' मन्त्रिणामपि हि मन्त्रिणो भवन्ति, तेषामप्यन्ये । १५ । सैषा मन्त्रिपरंपरा मन्त्रं भिनत्ति । १६ ।

' तस्मान्नास्य परे विद्युः कर्म किंचिच्चिकीर्षितम् ।
आरब्धारस्तु जानीयुरारब्धं कृतमेव वा ।। १७ ।। '

' नैकस्य मन्त्रसिद्धिरस्ति ' इति विशालाक्षः । १८ । ' प्रत्यक्षपरोक्षानुमेया हि राजवृत्तिः । १९ । अनुपलब्धस्य ज्ञानमुपलब्धस्य निश्चितबलाधानमर्थद्वैधस्य संशयच्छेदनमेकदेशदृष्टस्य शेषोपलब्धिरिति मन्त्रिसाध्यमेतत् । २० । तस्माद् बुद्धिवृद्धैः सार्धमध्यासीत मन्त्रम् । २१ ।

' न कंचिदवमन्येत सर्वस्य शृणुयान्मतम् ।
बालस्याप्यर्थवद्वाक्यमुपयुञ्जीत पण्डितः ।। २२ ।। '

१३ " मंत्रभेद राजाच्या आणि त्याने नेमलेल्या मनुष्यांच्या योगक्षेमाला विघातक होतो. १४ म्हणून राजाने एखाद्या गुप्त कार्याचा विचार स्वतः एकट्यानेच करावा, " असे भारद्वाजाचे मत आहे. १५ " कारण सल्लागारांचेही दुसरे सल्लागार असतात आणि त्यांचेही अन्य सल्लागार. १६ सल्लागारांच्या ह्या परंपरेमुळे मसलत बाहेर फुटते.

१७ म्हणून करावयाचे मनात आणलेले कोणतेही कार्य दुसऱ्या कोणालाही कळता कामा नये. परंतु ते कार्य जे करणार असतील त्यांनाच ते सुरू झाल्यावर, इतकेच काय, ते पार पडल्यावरच कळून यावे. "

१८ " एकाच माणसाच्या हातून मसलतीची परिपूर्णता होऊ शकत नाही, " असे विशालाक्षाचे मत आहे. १९ " कारण, राजाचे व्यवहार प्रत्यक्ष, परोक्ष व अनुमेय असे तीन प्रकारचे असतात. २० जे माहीत झालेले नाही त्याचे ज्ञान करून घेणे, जे माहीत झालेले आहे त्याला निश्चितीने बळकटी आणणे, एखाद्या गोष्टीसंबंधी दोन पर्याय संभाव्य असता संशयाचे निराकरण करणे, ज्याच्या एकाच अंशाचे ज्ञान झाले आहे त्याच्या अवशिष्ट अंशाची माहिती काढणे, ह्या सर्व गोष्टी मंत्र्यांच्या द्वाराच साध्य होतात. २१ म्हणून ज्यांची बुद्धी परिणत असेल त्यांच्यावरोबर मसलत करावी.

२२ त्यांच्यापैकी कोणाचीही अवहेलना करू नये. सर्वांचे मत ऐकून घ्यावे. शहाण्या माणसाने लहान मुलाच्याही समंजस बोलण्याचा उपयोग करून घ्यावा. "

**'एतन्मन्त्रज्ञानम्, नैतन्मन्त्ररक्षणम्' इति पाराशराः । २३ । 'यदस्य कार्यमभिप्रेतं तत्प्रतिरूपकं मन्त्रिणः पृच्छेत्– "कार्यमिदमेवमासीत्, एवं वा यदि भवेत्, तत्कथं कर्तव्यम्" इति । २४ । ते यथा ब्रूयुस्तत्कुर्यात् । २५ । एवं मन्त्रोपलब्धिः संवृतिश्च भवति' इति । २६ ।**

**नेति पिशुनः । २७ । 'मन्त्रिणो हि व्यवहितमर्थं वृत्तमवृत्तं वा पृष्टा अनादरेण ब्रुवन्ति प्रकाशयन्ति वा । २८ । स दोषः । २९ । तस्मात्कर्मसु ये येष्वभिप्रेतास्तैः सह मन्त्रयेत । ३० । तैर्मन्त्रयमाणो हि मन्त्रसिद्धिं गुप्तिं च लभते' इति । ३१ ।**

**नेति कौटिल्यः । ३२ । अनवस्था ह्येषा । ३३ । मन्त्रिभिस्त्रिभिश्चतुर्भिर्वा सह मन्त्रयेत । ३४ । मन्त्रयमाणो ह्येकेनार्थकृच्छ्रेषु निश्चयं नाधिगच्छेत् । ३५ । एकश्च मन्त्री यथेष्टमनवग्रहश्चरति । ३६ । द्वाभ्यां मन्त्रयमाणो द्वाभ्यां संहताभ्यामवगृह्यते, विगृहीताभ्यां विनाश्यते । ३७ । तत्त्रिषु चतुर्षु वा कृच्छ्रेणोपपद्यते । ३८ ।**

२३ "ह्याने मसलतीचे ज्ञान होऊ शकेल, पण तिची गुप्तता राखली जाणार नाही," असे पाराशरांचे मत आहे. २४ "जे कार्य करावयाचे राजाला अभिप्रेत असेल त्याच्यासारख्याच दुसऱ्या कार्याविषयी मंत्र्यांना विचारावे, 'हे कार्य अशा प्रकारचे होते, किंवा ह्याचे जर असे असे झाले, तर आता काय करणे योग्य होईल ?' २५ ते जसे सांगतील तसे करावे. २६ अशा रीतीने मंत्रज्ञान व मंत्रगोपन दोन्ही साध्य होतात."

२७ "हे बरोबर नाही," असे पिशुनाचे मत आहे. २८ "कारण, दूरच्या एखाद्या गोष्टीविषयी – मग ती घडलेली असो किंवा नसो – मोघम विचारले असता मंत्री अगत्य न दाखविता सल्ला देतात अथवा अभिप्रेत कार्य उघड करतात. २९ ते दोषावह आहे. ३० यास्तव ज्या कार्यांवर ज्यांची नेमणूक करणे अभिप्रेत असेल त्यांच्याबरोबर मसलत करावी. ३१ कारण, त्यांच्याबरोबर मसलत केल्यास सल्लाही मिळतो व मसलत गुप्तही रहाते."

३२ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ३३ कारण, ह्यामुळे अनिश्चितता उत्पन्न होईल. ३४ तीन किंवा चार मंत्र्यांबरोबर मसलत करावी. ३५ एकाच मंत्र्याबरोबर मसलत केल्यास कठीण गोष्टींच्या संबंधात निश्चय होत नाही. ३६ शिवाय, मंत्री एकच असल्यास तो मन मानेल तसा अनिर्बंधपणे वागतो. ३७ दोन मंत्र्यांशी मसलत केली तर ते दोघे एक झाल्यास राजावर त्यांचा दबाव रहातो, ते आपसात भांडल्यास राजा विनाशाप्रत जातो. ३८ तीन किंवा चार मंत्री असले तर असे घडून येण्याचा क्वचितच

**महादोषमुपपन्नं तु भवति । ३९ । ततः परेषु कृच्छ्रेणार्थनिश्चयो गम्यते, मन्त्रो वा रक्ष्यते । ४० । देशकालकार्यवशेन त्वेकेन सह द्वाभ्यामेको वा यथासामर्थ्यं मन्त्रयेत । ४१ ।**

**कर्मणामारम्भोपायः पुरुषद्रव्यसंपद् देशकालविभागो विनिपातप्रतीकारः कार्यसिद्धिरिति पञ्चाङ्गो मन्त्रः । ४२ ।**

**तानेकैकशः पृच्छेत् समस्तांश्च । ४३ । हेतुभिश्चैषां मतिप्रविवेकान् विद्यात् । ४४ । अवाप्तार्थः कालं नातिक्रामयेत् । ४५ । न दीर्घकालं मन्त्रयेत, न तेषां पक्षीयैर्येषामपकुर्यात् । ४६ ।**

**'मन्त्रिपरिषदं द्वादशामात्यान्कुर्वीत' इति मानवाः । ४७ । 'षोडश' इति बार्हस्पत्याः । ४८ । 'विंशतिम्' इत्यौशनसाः । ४९ । यथासामर्थ्यमिति कौटिल्यः । ५० । ते ह्यस्य स्वपक्षं परपक्षं च चिन्तयेयुः । ५१ । अकृतारम्भमारब्धानुष्ठानमनुष्ठितविशेषं नियोगसंपदं च कर्मणां कुर्युः । ५२ ।**

संभव असतो. ३९ पण कदाचित तसे घडलेच तर मोठा अनर्थ होईल. ४० ह्यापेक्षा अधिक मंत्री असल्यास निर्णय घेणे अथवा मसलत गुप्त राखणे कठीण जाते. ४१ परंतु, देश, काल व करावयाचे कार्य यांच्या अनुरोधाने एका मंत्र्याबरोबर, दोघाबरोबर किंवा स्वतः एकट्यानेच सामर्थ्य असेल त्याप्रमाणे मंत्रणा करावी.

४२ कार्यांच्या अनुष्ठानासाठी करावयाची उपाययोजना, मनुष्यबळ व द्रव्यबळ, देश आणि काल यांची समुचित योजना, संभाव्य अडचणींचा परिहार आणि कार्याची सिद्धी अशी ही मसलतीची पाच अंगे आहेत.

४३ त्या मंत्र्यांना एकेकट्याला विचारावे, तसेच सर्वांना मिळून एकत्र. ४४ आणि त्यांच्यातील मतभेद मतभिन्नतेच्या कारणांसह विचारात घ्यावेत. ४५ (मसलतीचा) कार्यभाग साधल्यावर वेळ वाया जाऊ देऊ नये. ४६ दीर्घकाळपर्यंत मसलत करीत बसू नये, तसेच ज्यांच्याविरुद्ध कारवाई करण्याचे मनात असेल त्यांच्या पक्षातील माणसांशी मसलत करू नये.

४७ "मंत्रिपरिषदेत बारा अमात्य असावेत," असे मानवांचे मत आहे. ४८ "सोळा असावेत" असे बार्हस्पत्यांचे मत आहे. ४९ "वीस असावेत" असे औशनसांचे मत आहे. ५० (आवश्यकतेच्या व) सामर्थ्याच्या अनुरोधाने (अमात्यांची संख्या असावी) असे कौटिल्याचे मत आहे. ५१ त्यांनी राजाच्या स्वतःच्या पक्षाशी व शत्रूच्या पक्षाशी संबद्ध असलेल्या बाबींचा विचार

**आसन्नैः सह कार्याणि पश्येत् । ५३ । अनासन्नैः सह पत्रसंप्रेषणेन मन्त्रयेत । ५४ ।**

**इन्द्रस्य हि मन्त्रिपरिषदृषीणां सहस्रम् । ५५ । स तच्चक्षुः । ५६ । तस्मादिमं द्वचक्षं सहस्राक्षमाहुः । ५७ ।**

**अत्ययिके कार्ये मन्त्रिणो मन्त्रिपरिषदं चाहूय ब्रूयात् । ५८ । तत्र यद्भूयिष्ठा ब्रूयुः कार्यसिद्धिकरं वा तत्कुर्यात् । ५९ ।**

**कुर्वतश्च –**

**नास्य गुह्यं परे विद्युश्छिद्रं विद्यात्परस्य च ।**
**गूहेत्कूर्म इवाङ्गानि यत्स्याद्विवृतमात्मनः ॥ ६० ॥**
**यथा ह्यश्रोत्रियः श्राद्धं न सतां भोक्तुमर्हति ।**
**एवमश्रुतशास्त्रार्थो न मन्त्रं श्रोतुमर्हति ॥ ६१ ॥**

**इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे मन्त्राधिकारः पञ्चदशोऽध्यायः ।**

करावा. ५२ तसेच त्यांनी कार्याच्या बाबतीत जे केलेले नसेल त्याची सुरुवात करणे, सुरू झालेले पार पाडणे, पूर्ण झालेल्यात विशेष बदल घडवून आणणे आणि राजाज्ञा उत्तम रीतीने कार्यवाहीत आणणे या गोष्टी अंमलात आणाव्यात.

५३ जे (मंत्रिपरिषदेतील अमात्य) जवळ उपस्थित असतील त्यांच्याबरोबर कार्यासंबंधी विचार करावा. ५४ जे जवळ नसतील त्यांना पत्र पाठवून त्यांचा सल्ला घ्यावा.

५५ इंद्राच्या मंत्रिपरिषदेत एक हजार ऋषी आहेत. ५६ तेच त्याचे नेत्र. ५७ म्हणूनच त्याला दोनच नेत्र असताही सहस्राक्ष म्हणतात.

५८ जरूरीचे कार्य उद्‌भवले असता मंत्री आणि मंत्रिपरिषद यांना एकत्र बोलावून त्यांना त्यासंबंधी विचारावे. ५९ त्यांच्यापैकी बहुसंख्य व्यक्ती जो सल्ला देतील त्याप्रमाणे अथवा ज्यायोगे कार्य सिद्धीस जाईल तसे करावे.

६० आणि ते कार्य करीत असता– त्याचे गुह्य शत्रूंना कळता कामा नये, त्याचबरोबर शत्रूच्या मर्मस्थानाचा त्याने शोध घ्यावा. जे त्याचे अंग उघडे पडले असेल ते, कासव जसा आपले अवयव झाकून घेतो तसें, झाकून घ्यावे.

६१ ज्याप्रमाणे वेदविद्येत पारंगत नसलेला मनुष्य सज्जनांच्या घरी श्राद्धाचे भोजन करण्यास अपात्र असतो, त्याप्रमाणे राजनीतिशास्त्राचे अध्ययन न केलेला मनुष्य सल्लामसलतीत भाग घेण्यास लायक नाही.

१६

## [ द्वादशं प्रकरणम् – दूतप्रणिधिः ]

**उद्वृतमन्त्रो दूतप्रणिधिः । १ ।**

**अमात्यसंपदोपेतो निसृष्टार्थः । २ । पादगुणहीनः परिमितार्थः । ३ । अर्धगुणहीनः शासनहरः । ४ ।**

**सुप्रतिविहितयानवाहनपुरुषपरिवापः प्रतिष्ठेत । ५ । शासनमेवं वाच्यः परः, स वक्ष्यत्येवम्, तस्येदं प्रतिवाक्यम्, एवमतिसंधातव्यम्, इत्यधीयानो गच्छेत् । ६ । अटव्यन्तपालपुरराष्ट्रमुख्यैश्च प्रतिसंसर्गं गच्छेत् । ७ । अनीकस्थानयुद्धप्रतिग्रहापसारभूमीरात्मनः परस्य चावेक्षेत । ८ । दुर्गराष्ट्रप्रमाणं सारवृत्तिगुप्तिच्छिद्राणि चोपलभेत । ९ ।**

### सोळावा अध्याय

### प्रकरण १२ : दूताची कामगिरीवर योजना

१ सल्लामसलतीने निर्णय घेतल्यानंतर दूताची कामगिरीवर योजना करावी.

२ अमात्यांच्या ठिकाणी आवश्यक असलेल्या सर्व गुणांनी संपन्न तो निसृष्टार्थ (ज्याच्यावर कार्याची जबाबदारी पूर्णपणे टाकली आहे असा) दूत. ३ त्यांपैकी एकचतुर्थांश गुण ज्याच्या अंगी नसतील तो परिमितार्थ (ठराविक मर्यादेपर्यंतच अधिकार असलेला) दूत. ४ ज्याच्या ठिकाणी त्यांपैकी अर्धे गुण नसतील तो शासनहर (निरोप घेऊन जाणारा).

५ गाडी, घोडे, नोकरचाकर इत्यादी लवाजमा बरोबर घेण्याची नीट व्यवस्था करून दूताने कामगिरीवर निघावे. ६ "राजाचा निरोप शत्रूला याप्रमाणे कळवायचा, तो (प्रायः) याप्रमाणे उत्तर देईल, त्याला द्यावयाचे हे प्रत्युत्तर, शत्रूवर अशा अशा रीतीने मात करावयाची," याप्रमाणे मनाशी ठरवीत वाटचाल करावी. ७ अटवीतील मुख्य, सरहद्दीवरचे दुर्गपाल, नगर आणि जनपद यांवरील मुख्य अधिकारी यांच्याशी संपर्क साधावा. ८ आपल्या राज्यातील व शत्रूच्या राज्यातील सैन्याच्या छावणीस, युद्ध करण्यास, राखीव सैन्य ठेवण्यास आणि अपसरण करण्यास (माघार घेण्यास अथवा पळून जाण्यास) योग्य अशा सर्व जागांची टेहळणी करून ठेवावी. ९ तसेच शत्रूच्या राज्यातील दुर्गांचे आकार, जनपदाचा विस्तार, मजबूत ठिकाणे, उपजीविकेची साधने, संरक्षणाची व्यवस्था आणि तिच्यातील कच्चे दुवे यांचीही माहिती मिळवावी.

**पराधिष्ठानमनुज्ञातः प्रविशेत् । १० । शासनं च यथोक्तं ब्रूयात्, प्राणाबाधेऽपि दृष्टे । ११ ।**

**परस्य वाचि वक्त्रे दृष्ट्यां च प्रसादं वाक्यपूजनमिष्टपरिप्रश्नं गुणकथासङ्गमासन्नमासनं सत्कारमिष्टेषु स्मरणं विश्वासगमनं च लक्षयेत्तुष्टस्य, विपरीतमतुष्टस्य । १२ । तं ब्रूयात् – ' दूतमुखा हि राजानः, त्वं चान्ये च । १३ । तस्मादुद्यतेष्वपि शस्त्रेषु यथोक्तं वक्तारो दूताः । १४ । तेषामन्तावसायिनोऽप्यवध्याः, किमङ्ग पुनर्ब्राह्मणाः । १५ । परस्यैतद् वाक्यम् । १६ । एष दूतधर्मः ' इति । १७ ।**

**वसेदविसृष्टः पूजया नोत्सिक्तः । १८ । परेषु बलित्वं न मन्येत । १९ । वाक्यमनिष्टं सहेत । २० । स्त्रियः पानं च वर्जयेत् । २१ । एकः शयीत । २२ । सुप्तमत्तयोर्हि भावज्ञानं दृष्टम् । २३ ।**

१० परवानगी मिळाल्यावर शत्रूच्या निवासस्थानी प्रवेश करावा. ११ आणि ज्या शब्दांत सांगितला असेल त्याच शब्दांत (आपल्या राजाचा) निरोप कळवावा, जरी त्यामुळे आपल्या प्राणाला धोका आहे असे दिसले तरीही.

१२ शत्रूच्या बोलण्यात, मुखावर व दृष्टीत प्रसन्नता, (दूताच्या) वचनाचे आदरपूर्वक श्रवण, त्याला काय पाहिजे याविषयी विचारणा, (दूताच्या स्वामीच्या) गुणांविषयीच्या गोष्टींत घेतलेला रस, (दूताला) जवळच दिलेले आसन, त्याचा केलेला सत्कार, आवडीच्या घटनाप्रसंगी त्याचे केलेले स्मरण, त्याच्यावर टाकलेला विश्वास – ही शत्रू संतुष्ट असल्याची लक्षणे लक्षात घ्यावीत, यांच्या उलट ती तो असंतुष्ट असल्याची लक्षणे. १३ अशा (असंतुष्ट) राजाला म्हणावे, " तू काय आणि दुसरे काय, सर्व राजांचे दूत हे मुख होत. १४ म्हणून शस्त्रे उगारली गेली तरी दूत सांगितल्याप्रमाणेच बोलणार. १५ त्यांच्यामध्ये जे अन्त्यज असतील ते सुद्धा अवध्य होत, मग ब्राह्मणांची गोष्ट कशाला ? १६ हे शब्द दुसऱ्याचे आहेत (माझे स्वतःचे नाहीत). १७ दूताचा हा धर्म आहे. "

१८ परत जायला परवानगी न मिळाल्यास तेथेच रहावे, झालेल्या सत्कारामुळे गर्व वाटू देऊ नये. १९ शत्रूच्या मध्ये आपण बलवान आहोत असे मानून चालू नये. २० (शत्रूचे) अप्रिय वचन सहन करावे. २१ स्त्रीसंग व मद्यपान वर्ज्य करावीत. २२ एकट्यानेच झोपावे. २३ कारण, झोपलेल्या व मदावस्थेत असलेल्या माणसाच्या मनातील विचार इतरांना कळून येत असल्याचे दिसून येते.

कृत्यपक्षोपजापमकृत्यपक्षे गूढप्रणिधानं रागापरागौ भर्तरि रन्ध्रं च प्रकृतीनां तापसवैदेहकव्यञ्जनाभ्यामुपलभेत, तयोरन्तेवासिभिश्चिकित्सकपाषण्डव्यञ्जनोभयवेतनैर्वा । २४ । तेषामसंभाषायां याचकमत्तोन्मत्तसुप्तप्रलापैः पुण्यस्थानदेवगृहचित्रलेख्यसंज्ञाभिर्वा चारमुपलभेत । २५ । उपलब्धस्योपजापमुपेयात् । २६ ।

परेण चोक्तः स्वासां प्रकृतीनां प्रमाणं नाचक्षीत । २७ । 'सर्वं वेद भवान्' इति ब्रूयात्, कार्यसिद्धिकरं वा । २८ ।

कार्यस्यासिद्धावुपरुध्यमानस्तर्कयेत् – 'किं भर्तुर्मे व्यसनमासन्नं पश्यन्, स्वं वा व्यसनं प्रतिकर्तुकामः, पार्ष्णिग्राहमासारमन्तःकोपमाटविकं वा समुत्थापयितुकामः, मित्रमाक्रन्दं वा व्याघातयितुकामः, स्वं वा परतो विग्रहमन्तःकोपमाटविकं वा प्रतिकर्तुकामः, संसिद्धं वा मे भर्तुर्यात्राकालमभिहन्तुकामः, सस्यपण्यकुप्यसंग्रहं

२४ दूताने तापस आणि वैदेहक यांच्या वेषातील हेरांच्या द्वारा (आपल्या राज्यातील) संभाव्य फितुरांना वश करून घेण्याचे चाललेले प्रयत्न, फितूर होण्याचा संभव नसलेल्यांवर होणारी हेरांची योजना, प्रजाजनांना त्यांच्या स्वामीविषयी वाटणारे प्रेम अथवा द्वेष व त्यांची मर्मस्थाने यांची माहिती मिळवावी; किंवा त्या दोन प्रकारच्या हेरांचे शिष्य, वैद्य किंवा पाखंडी साधूंच्या वेषातील हेर अथवा उभयवेतन हेर यांच्यामार्फत (ही माहिती मिळवावी). २५ त्यांच्याशी संभाषण करण्यास प्रतिबंध असल्यास भिक्षेकरी, मद्याने झिंगलेले, वेडे व झोपेत असलेल्या लोकांच्या बडबडीवरून अथवा पवित्र ठिकाणे व देवळे यांतील चित्रे, लेख व खुणा यांच्या द्वारा गुप्त माहिती काढावी. २६ माहिती मिळाल्यावर तिचा फितुरीसाठी उपयोग करावा.

२७ आणि शत्रूने विचारले असता आपल्या राज्याच्या (स्वामी, अमात्य आदी सप्त) प्रकृतींचे (बलाबल व) परिमाण सांगू नये. २८ "आपण सर्व जाणतच आहा" असे म्हणावे अथवा ज्याने कार्यसिद्धी होईल असे उत्तर द्यावे.

२९ कार्याची सिद्धी न होता त्याला तेथेच अडकवून ठेवण्यात आले तर त्याने पुढीलप्रमाणे तर्क करावेत – "माझ्या स्वामीवर लवकरच संकट येणार आहे हे ह्या शत्रूने जाणले आहे म्हणून; किंवा स्वतःवरील संकटाचा परिहार करण्याची उपाययोजना करता यावी म्हणून; किंवा माझ्या स्वामीचा पिछाडीचा शत्रू व त्याचा मित्र, आमच्या राज्यातील अंतर्गत बंड व अरण्यातील अधिपती यांचा उठाव घडवून आणण्याचा त्याचा बेत आहे म्हणून; अथवा स्वामीचा पुढील अंगाचा मित्र व पिछाडीचा मित्र यांच्या (मदतीच्या) कार्यात विघ्ने उत्पन्न करण्याचा त्याचा बेत आहे म्हणून; किंवा त्याचा दुसऱ्या शत्रूशी असणारा विग्रह, अंतर्गत बंडाळी अथवा अरण्यमुख्य यांचा प्रतिकार करता यावा म्हणून;

दुर्गकर्म बलसमुद्दानं वा कर्तुकामः, स्वसैन्यानां वा व्यायामस्य देशकालावाकाङक्षमाणः, परिभवप्रमादाभ्यां वा, संसर्गानुबन्धार्थी वा, मामुपरुणद्धि ' इति । २९ । ज्ञात्वा वसेदपसरेद्वा । ३० । प्रयोजनमिष्टमवेक्षेत वा । ३१ ।

शासनमनिष्टमुक्त्वा बन्धवधभयादविसृष्टोऽप्यपगच्छेत्, अन्यथा नियम्येत । ३२ ।

प्रेषणं सन्धिपालत्वं प्रतापो मित्रसंग्रहः ।
उपजापः सुहृद्भेदो गूढदण्डातिसारणम् ।। ३३ ।।
बन्धुरत्नापहरणं चारज्ञानं पराक्रमः ।
समाधिमोक्षो दूतस्य कर्म योगस्य चाश्रयः ।। ३४ ।।
स्वदूतैः कारयेदेतत्परदूतांश्च रक्षयेत् ।
प्रतिदूतापसर्पाभ्यां दृश्यादृश्यैश्च रक्षिभिः ।। ३५ ।।

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे दूतप्रणिधिः षोडशोऽध्यायः ।

अथवा माझ्या स्वामीची स्वारी करण्याची जय्यत तयारी झाली असता स्वारीला अनुकूल असलेली वेळ टळावी ह्या उद्देशाने; किंवा धान्य, विक्रेय वस्तू, जंगलातील उत्पादन यांचा संग्रह, किल्ल्याचे काम अथवा सैन्याची जमवाजमव हे करता यावे ह्या उद्देशाने; किंवा त्याच्या सैन्याच्या हालचालींना अनुकूल भूमी व काल यांची तो वाट पहात आहे म्हणून; किंवा अवमान करावा म्हणून अथवा प्रमादामुळे; किंवा माझ्या स्वामीशी असलेले त्याचे संबंध तसेच चालू रहावेत ह्या इच्छेने, त्याने मला अडकवून ठेवले आहे? " ३० कारण समजून आल्यावर योग्य असेल त्याप्रमाणे तेथेच रहावे किंवा गुप्तपणे निसटून जावे. ३१ किंवा इष्ट असेल त्या प्रयोजनाची सिद्धी विचारात घ्यावी.

३२ अनिष्ट असा निरोप सांगितल्यावर वधाची अथवा बंधनाची भीती असल्यास परत जाण्याची परवानगी न मिळाली तरी निसटून जावे, अन्यथा त्याच्यावर नियंत्रण येईल.

३३ पत्रे पाठविणे, तहाच्या अटींचे पालन करणे, प्रताप दाखविणे, मित्र मिळविणे, फितुरीस प्रोत्साहन देणे, दोन मित्र राष्ट्रांत भेद उत्पन्न करणे, शत्रूच्या दुर्गात आपल्या सैन्याला गूढपणे प्रवेश मिळवून देणे,

३४ शत्रूचे बांधव आणि मौल्यवान वस्तू यांचे अपहरण करणे, गुप्त माहिती मिळविणे, पराक्रम करणे, ओलीस ठेवलेल्या आपल्या माणसांची सुटका करणे आणि गुप्त उपायांची योजना करणे ही दूतांनी करावयाची कामे होत.

३५ आपल्या दूतांकडून ही कामे करवून घ्यावीत आणि शत्रूच्या दूतांवर प्रतिदूत व गुप्त हेर, तसेच उघड व गुप्त रक्षक यांच्या मार्फत नीट लक्ष ठेवावे.

## १७

## [ त्रयोदशं प्रकरणम् – राजपुत्ररक्षणम् ]

रक्षितो राजा राज्यं रक्षत्यासन्नेभ्यः परेभ्यश्च, पूर्वं दारेभ्यः पुत्रेभ्यश्च । १ । दाररक्षणं निशान्तप्रणिधौ वक्ष्यामः । २ । पुत्ररक्षणं तु । ३ । –

'जन्मप्रभृति राजपुत्रान् रक्षेत् । ४ । कर्कटकसधर्माणो हि जनकभक्षा राजपुत्राः । ५ । तेषामजातस्नेहे पितर्युपांशुदण्डः श्रेयान्' इति भारद्वाजः । ६ ।

'नृशंसमदुष्टवधः क्षत्रबीजविनाशश्च' इति विशालाक्षः । ७ । 'तस्मादेकस्थानावरोधः श्रेयान्' इति । ८ ।

'अहिभयमेतद्' इति पाराशराः । ९ । 'कुमारो हि "विक्रमभयान्मां पितावरुणद्धि" इति ज्ञात्वा तमेवाङ्के कुर्यात् । १० । तस्मादन्तपालदुर्गे वासः श्रेयान्' इति । ११ ।

## सतरावा अध्याय

### प्रकरण १३ : राजपुत्रांच्या संबंधात घ्यावयाची खबरदारी

१ जवळच्या माणसांपासून व शत्रूंपासून सुरक्षित असलेला राजाच राज्याचे संरक्षण करू शकतो, प्रथम त्याच्या भार्यांपासून व पुत्रांपासून सुरक्षित असला तरच. २ भार्यांपासूनच्या सुरक्षिततेविषयी आम्ही निशान्तप्रणिधी प्रकरणात (अध्याय १.२०) विवेचन करणार आहोत. ३ पुत्रांपासूनच्या सुरक्षिततेविषयी आता विचार करतो.

४ "राजपुत्रांच्या जन्मापासून त्यांच्याविषयी सावधगिरी बाळगावी. ५ कारण, राजपुत्र हे खेकड्यांप्रमाणे आपल्या जन्मदात्या पित्यालाच खाऊन टाकतात. ६ पित्याला त्यांच्याविषयी स्नेह उत्पन्न झाला नाही तोवरच त्यांचा गुप्त रीतीने वध करणे श्रेयस्कर आहे," असे भारद्वाजाचे मत आहे.

७ "ज्याने काही अपराध केला नाही त्याचा वध करणे हे निर्घृण कृत्य होय; शिवाय, त्यामुळे क्षत्रियबीजही नष्ट होईल," असे विशालाक्षाचे मत आहे. ८ "म्हणून त्याला (राजवाड्यातच) एके ठिकाणी बंदिस्त करून ठेवणे श्रेयस्कर आहे."

९ "यात सापापासून धोका असतो तसा धोका आहे," असे पाराशरांचे मत आहे. १० "कारण, 'माझ्या पराक्रमाच्या भीतीने पित्याने मला बंदिस्त केले आहे,' हे ओळखून राजकुमार पित्यालाच स्वतःच्या अंकित करील. ११ म्हणून त्याला सरहद्दीवरील दुर्गात दुर्गपालाकडे ठेवणे श्रेयस्कर आहे"

'औरभ्रं भयमेतद्' इति पिशुनः । १२ । 'प्रत्यापत्तेर्हि तदेव कारणं ज्ञात्वान्तपालसखः स्यात् । १३ । तस्मात्स्वविषयादपकृष्टे सामन्तदुर्गे वासः श्रेयान्' इति । १४ ।

'वत्सस्थानमेतद्' इति कौणपदन्तः । १५ । 'वत्सेनेव हि धेनुं पितरमस्य सामन्तो दुह्यात् । १६ । तस्मान्मातृबन्धुषु वासः श्रेयान्' इति । १७ ।

'ध्वजस्थानमेतद्' इति वातव्याधिः । १८ । 'तेन हि ध्वजेनादितिकौशिकवदस्य मातृबान्धवा भिक्षेरन् । १९ । तस्माद् ग्राम्यसुखेष्वेनमवसृजेत् । २० । सुखोपरुद्धा हि पुत्राः पितरं नाभिद्रुह्यन्ति' इति । २१ ।

जीवन्मरणमेतदिति कौटिल्यः । २२ । काष्ठमिव हि घुणजग्धं राजकुलमविनीतपुत्रमभियुक्तमात्रं भज्येत । २३ । तस्मादृतुमत्यां महिष्यामृत्विजश्चरुमैन्द्राबार्हस्पत्यं निर्वपेयुः । २४ । आपन्नसत्त्वायाः कौमारभृत्यो गर्भभर्मणि प्रसवे च

१२ "यात टकरीच्या एडक्यापासून जसा धोका असतो तसा धोका आहे," असे पिशुनाचे मत आहे. १३ "कारण, (राजधानीला) परत येण्याचा तोच एक उपाय असे जाणून तो त्या दुर्गपालाशी संगनमत करील (व राजधानीवर चालून येईल). १४ म्हणून आपल्या देशापासून दूर अशा सामंतदुर्गात ठेवणे श्रेयस्कर."

१५ "हे राजपुत्राला वासरासारखे करण्यासारखे आहे," असे कौणपदंताचे मत आहे. १६ "ज्याप्रमाणे वासराला पुढे ठेवून गाईची धार काढतात त्याप्रमाणे तो सामंत राजपुत्राच्या नावावर त्याच्या पित्याला पिळून काढील. १७ म्हणून त्याला त्याच्या आईच्या बांधवांकडे ठेवणे श्रेयस्कर."

१८ "त्याला भिक्षेकऱ्याची पताका करण्यासारखे हे आहे," असे वातव्याधीचे मत आहे. १९ "ज्याप्रमाणे एखाद्या देवतेची पताका दाखवून अदितिकौशिक भिक्षेकरी लोकांकडे मागणे करतात त्याप्रमाणे त्याच्या आईचे बांधव त्याच्यासाठी म्हणून मागणे करीत रहातील. २० म्हणून ग्राम्य सुखोपभोगात त्याला गुंतवून ठेवावे. २१ कारण, सुखोपभोगात निमग्न असलेले पुत्र पित्याचा द्रोह करीत नाहीत."

२२ हे म्हणजे जिवंत मरणच, असे कौटिल्याचे मत आहे. २३ कारण, भुंग्यांनी पोखरलेल्या लाकडाप्रमाणे विनयसंपन्न पुत्र नसलेले राजकुल त्याच्यावर हल्ला झाल्यास तात्काल मोडून पडेल. २४ यास्तव पट्टराणी ऋतुमती झाली म्हणजे ऋत्विजांनी इंद्र व बृहस्पती ह्या देवतांच्या नावाने चरू (हवि) अग्नीत

वियतेत । २५ । प्रजातायाः पुत्रसंस्कारं पुरोहितः कुर्यात् । २६ । समर्थं तद्विदो विनयेयुः । २७ ।

'सत्रिणामेकश्चैनं मृगयाद्यूतमद्यस्त्रीभिः प्रलोभयेत् "पितरि विक्रम्य राज्यं गृहाण" इति । २८ । तमन्यः सत्री प्रतिषेधयेत्' इत्याम्भीयाः । २९ ।

महादोषमबुद्धबोधनमिति कौटिल्यः । ३० । नवं हि द्रव्यं येन येनार्थजातेनोपदिह्यते तत्तदाचूषति । ३१ । एवमयं नवबुद्धिर्यद्यदुच्यते तत्तच्छास्त्रोपदेशमिवाभिजानाति । ३२ । तस्माद्धर्म्यमर्थ्यं चास्योपदिशेन्नाधर्म्यमनर्थ्यं च । ३३ ।

सत्रिणस्त्वेनं 'तव स्मः' इति वदन्तः पालयेयुः । ३४ । यौवनोत्सेकात्परस्त्रीषु मनः कुर्वाणमार्याव्यञ्जनाभिः स्त्रीभिरमेध्याभिः शून्यागारेषु रात्रावुद्वेजयेयुः । ३५ । मद्यकामं योगपानेनोद्वेजयेयुः । ३६ । द्यूतकामं कापटिकैरुद्वेजयेयुः । ३७ । मृगयाकामं प्रतिरोधकव्यञ्जनैस्त्रासयेयुः । ३८ । पितरि विक्रमबुद्धिं

अर्पण करावा. २५ ती गरोदर झाली म्हणजे मुलांसाठी असणाऱ्या खास वैद्याने गर्भपोषण व सुखप्रसूती यांची काळजी घ्यावी. २६ ती प्रसूत झाल्यावर पुत्राचे सर्व संस्कार पुरोहिताने करावेत. २७ तो विद्याग्रहणास योग्य झाला म्हणजे तज्ज्ञ आचार्यांनी त्याला विद्याविनीत करावे.

२८ "सत्री हेरांपैकी एकाने त्याला मृगया, द्यूत, मद्य व स्त्रिया यांच्या नादी लावून म्हणावे, 'पित्यावर हल्ला करून तू राज्य बळकाव'. २९ दुसऱ्या हेराने त्याला त्यापासून परावृत्त करावे," असे आंभीयांचे मत आहे.

३० जाण नसणाऱ्याला जाण करून देणे यात फार मोठा दोष आहे, असे कौटिल्याचे मत आहे. ३१ कारण, नवीन पदार्थ, त्याच्यावर ज्या कोणत्या वस्तूचा लेप केला असेल, ती वस्तू शोषून घेतो. ३२ तद्वत हा अपरिपक्व बुद्धीचा राजपुत्र जे जे त्याला सांगितले जाते ते शास्त्रातच सांगितलेले आहे असे समजून चालतो. ३३ म्हणून जे धर्माला अनुसरून व अर्थसाधक असेल तेंच त्याला सांगावे, अधर्मसंयुक्त व अनर्थकारक असे सांगू नये.

३४ उलट "आम्ही तुझेच सेवक आहोत" असे म्हणणाऱ्या सत्री हेरांनी त्याचे संगोपन करावे. ३५ यौवनमदाने तो परस्त्रियांची अभिलाषा करीत असेल तर बाह्यतः आर्यस्त्रियांसारख्या दिसणाऱ्या अशुचि स्त्रियांच्या द्वारा रात्री एकांतस्थळी त्याच्यात उद्वेग उत्पन्न करावा. ३६ मद्याची तो इच्छा करीत असेल तर औषधी द्रव्याने मिश्रित मद्य पाजवून त्याच्यात घृणा उत्पन्न करावी. ३७ द्यूताची इच्छा करीत असेल तर कपटाने खेळणाऱ्या जुगाऱ्यांकडून त्याला फसवून तिटकारा उत्पन्न करावा. ३८ मृगयेची त्याला इच्छा असेल

'तथा' इत्यनुप्रविश्य भेदयेयुः – 'अप्रार्थनीयो राजा, विपन्ने घातः, संपन्ने नरकपातः, संक्रोशः, प्रजाभिरेकलोष्टवधश्च' इति । ३९ ।

विरागं वेदयेयुः । ४० । प्रियमेकपुत्रं बध्नीयात् । ४१ । बहुपुत्रः प्रत्यन्तमन्य-विषयं वा प्रेषयेद् यत्र गर्भः पण्यं डिम्बो वा न भवेत् । ४२ ।

आत्मसंपन्नं सैनापत्ये यौवराज्ये वा स्थापयेत् । ४३ ।

बुद्धिमानाहार्यबुद्धिर्दुर्बुद्धिरिति पुत्रविशेषाः । ४४ । शिष्यमाणो धर्मार्थावुपलभते चानुतिष्ठति च बुद्धिमान् । ४५ । उपलभमानो नानुतिष्ठत्याहार्यबुद्धिः । ४६ । अपायनित्यो धर्मार्थद्वेषी चेति दुर्बुद्धिः । ४७ । स यद्येकपुत्रः पुत्रोत्पत्तावस्य प्रयतेत । ४८ । पुत्रिकापुत्रानुत्पादयेद्वा । ४९ । वृद्धस्तु व्याधितो वा राजा

तर दरोडेखोरांच्या वेषातील गूढ पुरुषांच्या द्वारा त्याच्या मनात भीती उत्पन्न करावी. ३९ पित्यावर हल्ला करण्याचे त्याच्या मनात आले असेल तर "ठीक आहे" असे म्हणून त्याचा विश्वास संपादन करावा व मग त्याला त्यापासून परावृत्त करावे. त्यांनी म्हणावे, "राजावर हल्ला करणे बरोबर नाही. जर बेत सिद्धीस गेला नाही तर तुझा घात होईल; सिद्धीस गेला तर तू नरकात जाशील, हलकल्लोळ माजेल आणि प्रजाजन तुझा एका ढेकळाचा करतात तसा नाश करतील."

४० त्याच्या मनात राजाविषयी अप्रीती उत्पन्न झाली असेल तर (हेरांनी) ते राजाला कळवावे. ४१ तो जर आवडता, एकटाच पुत्र असेल तर त्याला बंधनात ठेवावे. ४२ जर अनेक पुत्र असतील तर अशा पुत्राला शेजारच्या किंवा दुसऱ्या एका देशात पाठवावे, जेथे तो तेथील लोकांना पुत्रासारखा, विक्रेय वस्तूसारखा अथवा संक्षोभास कारणीभूत होणार नाही.

४३ आत्मगुणसंपन्न पुत्राला सेनापतीच्या अथवा युवराजाच्या पदावर नेमावे.

४४ बुद्धिमान, आहार्यबुद्धी आणि दुर्बुद्धी असे तीन प्रकारचे पुत्र असतात. ४५ शिकविले असता जो धर्म व अर्थ समजून घेतो व तदनुसार आचरण करतो तो बुद्धिमान. ४६ जो ते समजून घेतले तरी आचरणात आणीत नाही तो आहार्यबुद्धी (ज्याच्या बुद्धीला सतत टोचणी लावावी लागते असा). ४७ नेहमी अपाय करणारा आणि धर्म व अर्थ यांचा तिटकारा असणारा तो दुर्बुद्धी. ४८ असा (दुर्बुद्धी) जर राजाचा एकुलता एक पुत्र असेल तर त्याला पुत्र (म्हणजे राजाला नातू) होईल असा यत्न करावा. ४९ किंवा पुत्राच्या जागी स्थापना केलेल्या मुलीच्या पुत्रांना जन्मास घालवावे. ५० परंतु राजा

मातृबन्धुकुल्यगुणवत्सामन्तानामन्यतमेन क्षेत्रे बीजमुत्पादयेत् । ५० । न चैक-पुत्रमविनीतं राज्ये स्थापयेत् । ५१ ।

बहूनामेकसंरोधः पिता पुत्रहितो भवेत् ।
अन्यत्रापद ऐश्वर्यं ज्येष्ठभागि तु पूज्यते ॥ ५२ ॥

कुलस्य वा भवेद्राज्यं कुलसंघो हि दुर्जयः ।
अराजव्यसनाबाधः शश्वदावसति क्षितिम् ॥ ५३ ॥

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे राजपुत्ररक्षणं सप्तदशोऽध्यायः ।

१८

## [ चतुर्दशं प्रकरणम् – अपरुद्धवृत्तम्; पञ्चदशं प्रकरणम् – अपरुद्धे वृत्तिः]

विनीतो राजपुत्रः कृच्छ्रवृत्तिरसदृशे कर्मणि नियुक्तः पितरमनुवर्तेत, अन्यत्र प्राणाबाधकप्रकृतिकोपकपातकेभ्यः । १ । पुण्ये कर्मणि नियुक्तः पुरुषमधिष्ठातारं

जर वृद्ध अथवा व्याधिग्रस्त झाला असेल तर मातृकुलातील बांधव, आपल्याच कुलातील आप्त आणि गुणसंपन्न सामंत राजे यांच्यापैकी एकाच्या द्वारा आपल्या पत्नीच्या ठिकाणी नियोगाने पुत्रोत्पत्ती करून घ्यावी. ५१ परंतु अविनीत अशा एकुलत्या एक पुत्राला राज्यावर बसवू नये.

५२ (अविनीत असे) अनेक पुत्र असतील तर त्यांना एकत्र बंदीत ठेवावे. पित्याने पुत्रांना हितकर असे वर्तन ठेवावे. विशेष आपत्ती न उद्भवल्यास राज-पदाचे ऐश्वर्य ज्येष्ठ पुत्राच्या वाटचास जावे हे प्रशंसनीय आहे.

५३ किंवा राजकुलातील सर्वांनी मिळून राज्य करावे. कारण, कुलसंघावर जय मिळविणे अत्यंत कठिण आहे. एकटचा राजावर येणाऱ्या संकटाचा धोका त्यात नसल्यामुळे कुलसंघ पृथ्वीवर कायमचा राहू शकतो.

### अठरावा अध्याय

## प्रकरण १४ : राजाच्या मर्जीतून उतरलेल्या राजपुत्राची वागणूक
## प्रकरण १५ : मर्जीतून उतरलेल्या राजपुत्राच्या संबंधात राजाची वागणूक

१ विनयसंपन्न (तरीही मर्जीतून उतरलेला) राजपुत्र, अन्यथा जीवन कंठणे कठीण म्हणून, त्याला अनुरूप नसलेल्या कामावर नेमला गेला असता त्याने पित्याने सांगितल्याप्रमाणे वागावे, फक्त ते काम त्याच्या प्राणाला धोकादायक,

**याचेत ।२। पुरुषाधिष्ठितश्च सविशेषमादेशमनुतिष्ठेत् ।३। अभिरूपं च कर्मफलमौपायनिकं च लाभं पितुरुपनाययेत् ।४। तथाप्यतुष्यन्तमन्यस्मिन्पुत्रे दारेषु वा स्निह्यन्तमरण्यायापृच्छेत ।५। बन्धवधभयाद्वा यः सामन्तो न्यायवृत्तिर्धार्मिकः सत्यवागविसंवादकः प्रतिग्रहीता मानयिता चाभिपन्नानां तमाश्रयेत ।६। तत्रस्थः कोशदण्डसंपन्नः प्रवीरपुरुषकन्यासंबन्धमटवीसंबन्धं कृत्यपक्षोपग्रहं च कुर्यात् ।७।**

**एकचरः सुवर्णपाकमणिरागहेमरूप्यपण्याकरकर्मान्तानाजीवेत् ।८। पाषण्डसंघद्रव्यमश्रोत्रियोपभोग्यं वा देवद्रव्यमाढ्यविधवाद्रव्यं वा गूढमनुप्रविश्य सार्थयानपात्राणि च मदनरसयोगेनातिसंधायापहरेत् ।९। पारग्रामिकं वा योगमातिष्ठेत् ।१०। मातुः परिजनोपग्रहेण वा चेष्टेत ।११। कारुशिल्पिकुशील-**

प्रजाजनांचा रोष ओढवून घेणारे किंवा पापकर्मरूप असे नसावे. २ चांगल्या कामावर त्याची नेमणूक झाली तर त्याने आपल्या कामावर देखरेख करण्यासाठी एक अधिकारी मागून घ्यावा. ३ आणि त्या अधिकाऱ्याच्या दखरेखीखाली नेमून दिलेले काम विशेष चांगल्या प्रकारे पार पाडावे. ४ आणि त्या कामाचे जे उचित उत्पन्न असेल ते, तसेच नजराणा म्हणून होणारा लाभ पित्याकडे पोचते करावेत. ५ तरीही पिता संतुष्ट होत नसेल आणि दुसऱ्या पुत्रावर अथवा (त्याच्या मातेव्यतिरिक्त अन्य) पत्नीवर प्रेम करीत असेल तर वनवासात जाण्यासाठी परवानगी मागावी. ६ अथवा वध किंवा बंधन यांची भीती वाटत असल्यास जो सामंत राजा न्यायाने वागणारा, धार्मिक, सत्यवादी, वचन पाळणारा, आश्रयार्थ आलेल्यांचे सत्कारपूर्वक स्वागत करणारा व त्यांना मान देणारा असा असेल त्याच्याकडे आश्रय घ्यावा. ७ तेथे राहून कोश व सैन्य यांत समृद्ध होऊन विशेष वीर पुरुषांशी विवाहाने नाते जुळवावे, (आपल्या राज्यातील) अटवीच्या मुख्यांशी संबंध प्रस्थापित करावा आणि संभाव्य फितुरांना आपल्या बाजूस वळवून घ्यावे.

८ जर त्याला एकटेच पडावे लागले तर त्याने सोने गाळणे, रत्नांना रंग चढविणे, सोने व रुपे यांचे पदार्थ बनविणे यांच्या खाणी व कारखाने यांनी उपजीविका करावी. ९ पाखंडी संघांचे द्रव्य, अथवा श्रुतिसंपन्न ब्राह्मणांव्यतिरिक्त इतरांनी उपभोग घ्यावयाचे असलेले देवतांचे द्रव्य किंवा श्रीमंत विधवेचे द्रव्य, त्यांचा गुप्तपणे विश्वास संपादन करून, हरण करावे, तसेच व्यापाऱ्यांचे तांडे किंवा गलबते, त्यांतील मनुष्यांना गुंगीच्या औषधाने युक्त पेय देऊन, लुटावे. १० किंवा शत्रूचे नगर काबीज करण्यासाठी सांगितलेल्या

वचिकित्सकवाग्जीवनपाषण्डच्छद्मभिर्वा नष्टरूपस्तद्व्यञ्जनसखश्छिद्रेषु प्रविश्य राज्ञः शस्त्ररसाभ्यां प्रहृत्य ब्रूयात् – ' अहमसौ कुमारः, सहभोग्यमिदं राज्यम्, एको नार्हति भोक्तुम्, ये कामयन्ते मां भर्तुं तानहं द्विगुणेन भक्तवेतनेनोपस्थास्यामि ' इति । १२ । इत्यपरुद्धवृत्तम् ।

अपरुद्धं तु मुख्यपुत्रापसर्पाः प्रतिपाद्यानयेयुः, माता वा प्रतिगृहीता । १३ । त्यक्तं गूढपुरुषाः शस्त्ररसाभ्यां हन्युः । १४ । अत्यक्तं तुल्यशीलाभिः स्त्रीभिः पानेन मृगयया वा प्रसञ्जयित्वा रात्रावुपगृह्यानयेयुः । १५ ।

उपस्थितं च राज्येन मदूर्ध्वमिति सान्त्वयेत् ।
एकस्थमथ संरुन्ध्यात् पुत्रवांस्तु प्रवासयेत् ॥ १६ ॥

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे अपरुद्धवृत्तम् अपरुद्धे च वृत्तिः अष्टादशोऽध्यायः ।

प्रयोगांचा (अध्याय १३.१) अवलंब करावा. ११ किंवा आपल्या मातेकडील माणसांचे साहाय्य संपादन करून कार्यास लागावे. १२ कारागीर, कलाकार, कुशीलव, वैद्य, कथाकार किंवा पाखंडी यांचा वेष घेऊन आपले रूप पालटून टाकावे आणि त्याच वेषातील सहकारी बरोबर घेऊन गफलतीच्या प्रसंगी राजवाड्यात प्रवेश करावा आणि शस्त्र किंवा विष यांनी राजाचा घात करून (तेथील सेवकांना) म्हणावे, " मी तो राजकुमार. हे राज्य सर्वांनी मिळून उपभोगावयाचे आहे. एकट्यानेच त्याचा उपभोग घेणे योग्य नाही. ज्यांची माझ्या सेवेत रहाण्याची इच्छा असेल त्यांना मी दुप्पट अन्न व पगार देऊन कामावर ठेवीन. " हे झाले मर्जीतून उतरलेल्या राजपुत्राचे वर्तन.

१३ परंतु मर्जीतून उतरलेल्या राजपुत्राला मुख्य अधिकाऱ्यांच्या पुत्रांनी, गुप्तपणे त्याची संमती मिळवून, राजाकडे आणावे, किंवा मर्जीत असलेल्या राणीने तसे करावे. १४ ( सुधारणे अशक्य म्हणून ) सर्वस्वी परित्याग केलेल्या राजपुत्राचा गूढ पुरुषांनी शस्त्र किंवा विष यांनी घात करावा. १५ ज्याला सर्वस्वी टाकलेले नाही अशा राजपुत्राला त्याच्यासारख्याच शीलाच्या स्त्रियांच्या अथवा मद्यपानाच्या अथवा मृगयेच्या नादी लावून रात्री पकडून आणावे.

१६ आणि तो आला म्हणजे " माझ्यानंतर हे राज्य तुझेच आहे " असे म्हणून त्याचे सांत्वन करावे, किंवा त्याला एके ठिकाणी बंधनात ठेवावे. पण इतर पुत्र असतील तर त्या पुत्राचा वध करावा.

१९

[ षोडशं प्रकरणम् – राजप्रणिधिः ]

राजानमुत्थितमनूत्तिष्ठन्ते भृत्याः । १ । प्रमाद्यन्तमनुप्रमाद्यन्ति । २ । कर्माणि चास्य भक्षयन्ति । ३ । द्विषद्भिश्चातिसंधीयते । ४ । तस्मादुत्थानमात्मनः कुर्वीत । ५ ।

नालिकाभिरहरष्टधा रात्रिं च विभजेत्, छायाप्रमाणेन वा । ६ । त्रिपौरुषी पौरुषी चतुरङ्गुला नष्टच्छायो मध्याह्न इति चत्वारः पूर्वे दिवसस्याष्टभागाः । ७ । तैः पश्चिमा व्याख्याताः । ८ ।

तत्र पूर्वे दिवसस्याष्टभागे रक्षाविधानमायव्ययौ च शृणुयात् । ९ । द्वितीये पौरजानपदानां कार्याणि पश्येत् । १० । तृतीये स्नानभोजनं सेवेत, स्वाध्यायं च कुर्वीत । ११ । चतुर्थे हिरण्यप्रतिग्रहमध्यक्षांश्च कुर्वीत । १२ । पञ्चमे मन्त्रिपरिषदा पत्रसंप्रेषणेन मन्त्रयेत, चारगुह्यबोधनीयानि च बुध्येत । १३ । षष्ठे

## एकोणिसावा अध्याय

## प्रकरण १६ : राजाचे दैनंदिन व्यवहार

१ राजा उद्यमशील असला म्हणजे त्याच्यामागोमाग सेवकही उद्यमशील होतात. २ तो निष्काळजी झाला म्हणजे तेही मागोमाग निष्काळजी होतात. ३ आणि ते त्याची कार्ये स्वतःच्याच उपयोगात आणतात. ४ शिवाय, शत्रूंकडून राजावर मात केली जाते. ५ म्हणून राजाने सतत उद्यमशील असावे.

६ नालिकांच्या साह्याने अथवा सावलीच्या प्रमाणाने दिवस व रात्र यांचे प्रत्येकी आठ भाग करावेत. ७ तीन पौरुष, एक पौरुष, चार अंगुले इतक्या लांबीची (सावली) आणि मुळीच सावली नसणारा मध्यान्ह याप्रमाणे दिवसाचे प्रारंभीचे चार आठवे भाग होत. ८ त्यांच्यावरून (उलट क्रमाने) उत्तरार्धातील चार भाग समजावेत.

९ त्यांपैकी दिवसाच्या पहिल्या आठव्या भागात संरक्षणाची केलेली व्यवस्था आणि उत्पन्न व खर्च यांचे तपशील ऐकून घ्यावेत. १० दुसऱ्या भागात पुरवासी आणि जनपदनिवासी यांच्या तक्रारी ऐकाव्यात. ११ तिसऱ्या भागात स्नान व भोजन करावे आणि अध्ययन करावे. १२ चौथ्या भागात (वसूल झालेल्या) द्रव्याचा स्वीकार करावा आणि अध्यक्षांना कामे नेमून द्यावीत. १३ पाचव्या भागात मंत्रिपरिषदेबरोबर पत्रे पाठवून मंत्रणा करावी आणि हेरांनी आणलेल्या गुप्त बातम्या ऐकाव्यात. १४ सहाव्या भागात स्वैर

स्वैरविहारं मन्त्रं वा सेवेत । १४ । सप्तमे हस्त्यश्वरथायुधीयान् पश्येत् । १५ । अष्टमे सेनापतिसखो विक्रमं चिन्तयेत् । १६ । प्रतिष्ठितेऽहनि सन्ध्यामुपासीत । १७ ।

प्रथमे रात्रिभागे गूढपुरुषान् पश्येत् । १८ । द्वितीये स्नानभोजनं कुर्वीत, स्वाध्यायं च । १९ । तृतीये तूर्यघोषेण संविष्टश्चतुर्थपञ्चमौ शयीत । २० । षष्ठे तूर्यघोषेण प्रतिबुद्धः शास्त्रमितिकर्तव्यतां च चिन्तयेत् । २१ । सप्तमे मन्त्रमध्यासीत, गूढपुरुषांश्च प्रेषयेत् । २२ । अष्टमे ऋत्विगाचार्यपुरोहितस्वस्त्ययनानि प्रतिगृह्णीयात्, चिकित्सकमाहानसिकमौहूर्तिकांश्च पश्येत् । २३ । सवत्सां धेनुं वृषभं च प्रदक्षिणीकृत्योपस्थानं गच्छेत् । २४ ।

आत्मबलानुकूल्येन वा निशाहर्भागान् प्रविभज्य कार्याणि सेवेत । २५ ।

उपस्थानगतः कार्यार्थिनामद्वारासङ्गं कारयेत् । २६ । दुर्दर्शो हि राजा कार्याकार्यविपर्यासमासन्नैः कार्यते । २७ । तेन प्रकृतिकोपमरिवशं वा गच्छेत् । २८ ।

विहार करावा अथवा मंत्र्यांशी मसलत करावी. १५ सातव्या भागात हत्ती, घोडे, रथ आणि सैनिक यांची पहाणी करावी. १६ आठव्या भागात सेनापतीबरोबर युद्धाविषयी विचारविनिमय करावा. १७ दिवस संपला म्हणजे संध्योपासना करावी.

१८ रात्रीच्या पहिल्या भागात गुप्त हेरांची भेट घ्यावी. १९ दुसऱ्या भागात स्नान व भोजन करावे आणि अध्ययन करावे. २० तिसऱ्या भागात संगीत श्रवण करीत बिछान्यावर पडावे आणि चौथ्या व पाचव्या भागात झोप घ्यावी. २१ सहाव्या भागात वाद्याच्या आवाजाने जागे होऊन शास्त्र व इतिकर्तव्यता यांचे चिंतन करावे. २२ सातव्या भागात सल्लामसलत करावी आणि गुप्त हेरांची त्यांच्या कामगिरीवर रवानगी करावी. २३ आठव्या भागात ऋत्विग, आचार्य आणि पुरोहित यांच्याकडून स्वस्तिवाचन करून घ्यावे आणि वैद्य, मुदपाकखान्याचा मुख्य व मुहूर्त पहाणारे (ज्योतिषी) यांची भेट घ्यावी. २४ नंतर सवत्सधेनूला आणि बैलाला प्रदक्षिणा करून दरबारात जावे.

२५ किंवा आपल्या शक्तीची अनुकूलता असेल त्याप्रमाणे दिवस व रात्र यांचे भाग पाडून आपली विविध कार्ये पार पाडावीत.

२६ दरबारात गेल्यावर कार्य करून घेण्याच्या इच्छेने जे आले असतील त्यांना दरवाजाजवळ (आत येण्यास) प्रतिबंध करू देऊ नये. २७ कारण, ज्या राजाची भेट होणे कठीण असते त्याच्याकडून जवळ असलेले लोक कार्य व अकार्य यांची उलटापालट करवून घेतात. २८ त्यामुळे तो प्रजाजनांच्या कोपास पात्र होण्याचा अथवा शत्रूच्या स्वाधीन होण्याचा संभव असतो. २९ यास्तव

**तस्माद्देवताश्रमपाषण्डश्रोत्रियपशुपुण्यस्थानानां बालवृद्धव्याधितव्यसन्यनाथानां स्त्रीणां च क्रमेण कार्याणि पश्येत्, कार्यगौरवाद् आत्ययिकवशेन वा । २९ ।**

**सर्वमात्ययिकं कार्यं शृणुयान्नातिपातयेत् ।**
**कृच्छ्रसाध्यमतिक्रान्तमसाध्यं वाऽपि जायते ।। ३० ।।**
**अग्न्यगारगतः कार्यं पश्येद्वैद्यतपस्विनाम् ।**
**पुरोहिताचार्यसखः प्रत्युत्थायाभिवाद्य च ।। ३१ ।।**
**तपस्विनां तु कार्याणि त्रैविद्यैः सह कारयेत् ।**
**मायायोगविदां चैव न स्वयं कोपकारणात् ।। ३२ ।।**
**राज्ञो हि व्रतमुत्थानं यज्ञः कार्यानुशासनम् ।**
**दक्षिणा वृत्तिसाम्यं तु दीक्षा तस्याभिषेचनम् ।। ३३ ।।**
**प्रजासुखे सुखं राज्ञः प्रजानां च हिते हितम् ।**
**नात्मप्रियं हितं राज्ञः प्रजानां तु प्रियं हितम् ।। ३४ ।।**

देवस्थाने, आश्रम, पाखंडी, श्रुतिसंपन्न ब्राह्मण, पशू व पुण्यस्थान, तसेच बाल, वृद्ध, व्याधिग्रस्त, संकटात सापडलेले, अनाथ आणि स्त्रिया यांची कामे ह्या क्रमाने पहावीत, किंवा कार्याच्या महत्त्वाच्या अनुरोधाने अथवा तातडीच्या अनुरोधाने (ती पहावीत).

३० तातडीची सर्व कामे ताबडतोब ऐकून घ्यावीत, लांबणीवर टाकू नयेत. लांबणीवर टाकलेले कार्य करावयास कठीण होते किंवा वेळप्रसंगी असाध्य सुद्धा बनते.

३१ वेदविद्येत पारंगत असलेले व तपस्वी यांची कामे, अग्निगृहात जाऊन पुरोहित आणि आचार्य यांच्या संनिधीत, आसनावरून उठून व (कार्यार्थींना) अभिवादन करून मग पहावीत.

३२ परंतु तपस्वी आणि इंद्रजालाचा प्रयोग करणारे यांची कामे तिन्ही वेदांत पारंगत असलेल्या विद्वानांच्या संनिधीत पहावीत, एकटयाने पाहू नयेत; कारण त्यांचा रोष होण्याचा संभव असतो म्हणून.

३३ उद्यमशीलता हेच राजाचे व्रत, कार्याचे अनुष्ठान हाच त्याचा यज्ञ, (सर्व प्रजाजनांशी) समान वागणूक ही त्यांना द्यावयाची दक्षिणा आणि त्याला झालेला अभिषेक ही त्या यज्ञाची दीक्षा.

३४ प्रजेच्या सुखातच राजाचे सुख आहे, प्रजेच्या हितातच त्याचे हित. राजाला स्वतःला जे प्रिय त्यात त्याचे हित नाही, तर प्रजेला जे प्रिय त्यात त्याचे हित आहे.

तस्मान्नित्योत्थितो राजा कुर्यादर्थानुशासनम् ।
अर्थस्य मूलमुत्थानमनर्थस्य विपर्ययः ॥ ३५ ॥

अनुत्थाने ध्रुवो नाशः प्राप्तस्यानागतस्य च ।
प्राप्यते फलमुत्थानाल्लभते चार्थसंपदम् ॥ ३६ ॥

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे राजप्रणिधिः एकोनविंशोऽध्यायः ।

## २०

## [ सप्तदशं प्रकरणम् – निशान्तप्रणिधिः ]

वास्तुकप्रशस्ते देशे सप्राकारपरिखाद्वारमनेककक्ष्यापरिगतमन्तःपुरं कारयेत् । १ ।

कोशगृहविधानेन मध्ये वासगृहम्, गूढभित्तिसंचारं मोहनगृहं तन्मध्ये वा वासगृहम्, भूमिगृहं वासन्नचैत्यकाष्ठदेवतापिधानद्वारमनेकसुरुङ्गासंचारं तस्योपरि प्रासादं गूढभित्तिसोपानं सुषिरस्तम्भप्रवेशापसारं वा वासगृहं यन्त्रबद्धतलावपातं

३५ म्हणून राजाने सतत उद्यमशील राहून अर्थ साध्य करून घ्यावा. उद्यमशीलता हे अर्थाचे मूळ आहे, त्याच्या विपरीत (जे आलस्य) ते अनर्थाचे मूळ.

३६ उद्यमशीलतेच्या अभावी जे मिळालेले आहे व जे पुढे मिळणार असेल त्या दोहोंचा नाश निश्चित होतो. उद्यमशीलतेमुळे फलप्राप्ती होते आणि अर्थसंपन्नतेचा लाभ होतो.

### विसावा अध्याय

### प्रकरण १७ : राजवाड्यासंबंधी नियम

१ वास्तुशास्त्रात तज्ज्ञ असणाऱ्यांनी पसंत केलेल्या जागी तट, खंदक व दरवाजे यांनी युक्त आणि अनेक महाल सभोवती असलेले असे अंतःपुर बांधून घ्यावे.

२ त्याच्यामध्ये राजाच्या निवासाची जागा कोशगृह बांधावयाच्या पद्धतीप्रमाणे, किंवा गुप्त भिंती व वाटा असलेली भूलभुलय्याची रचना व त्यांच्या मध्ये निवासस्थान याप्रमाणे; अथवा ज्याचे बाहेर पडण्याचे दार जवळच्या चैत्यगृहातील देवतेच्या लाकडी मूर्तीने झाकले आहे असे आणि ज्यापासून अनेक भुयारी वाटा आहेत असे तळघर व त्याच्यावर भिंतीत गुप्त जिने असलेल्या

**कारयेत्, आपत्प्रतीकारार्थमापदि वा । २ । अतोऽन्यथा वा विकल्पयेत्, सहाध्यायिभयात् । ३ ।**

**मानुषेणाग्निना त्रिरपसव्यं परिगतमन्तःपुरमग्निरन्यो न दहति, न चात्रान्योऽग्निर्ज्वलति, वैद्युतेन भस्मना मृत्संयुक्तेन करकवारिणावलिप्तं च । ४ ।**

**जीवन्तीश्वेतामुष्ककपुष्पवन्दाकाभिरक्षीवे जातस्याश्वत्थस्य प्रतानेन गुप्तं सर्पा विषाणि वा न प्रभवन्ति । ५ । मयूरनकुलपृषतोत्सर्गः सर्पान् भक्षयति । ६ । शुकः सारिका भृङ्गराजो वा सर्पविषशङ्कायां क्रोशति । ७ । क्रौञ्चो विषाभ्याशे माद्यति, ग्लायति जीवंजीवकः, म्रियते मत्तकोकिलः, चकोरस्याक्षिणी विरज्येते । ८ ।**

**इत्येवमग्निविषसर्पेभ्यः प्रतिकुर्वीत । ९ ।**

किंवा पोकळ खांबांमधून आत जाण्याचे व बाहेर पडण्याचे मार्ग असलेल्या अशा प्रासादाच्या स्वरूपाचे निवासस्थान, ज्या प्रासादातील जमीन तिच्यात बसविलेल्या यंत्रामुळे खाली पाडता येईल असे; संकटाचा प्रतिकार करण्याच्या उद्देशाने अथवा संकट आले असता, बांधून घ्यावे. ३ किंवा सहाध्यायींना या पद्धती माहीत असण्याचा संभव व त्यात धोका असल्यामुळे याहून निराळ्या पद्धतीने निवासस्थान बांधून घ्यावे.

४ मनुष्यप्रेताच्या हाडांतून काढलेल्या अग्नीने अंतःपुराला तीन वेळा डावीकडून फेऱ्या घातल्या असता ते दुसऱ्या अग्नीने जळून जात नाही व तेथे दुसरा अग्नी प्रज्वलित होत नाही. तसेच, वीज पडलेल्या वृक्षाच्या राखेने व गारांच्या पाण्यात कालवलेल्या मातीने लेप केलेले (अंतःपुर अग्नीपासून सुरक्षित रहाते).

५ जीवंती, श्वेता, मुष्कक आणि पुष्पवंदाका यांच्या सह असलेल्या, क्षार जमिनीत उगवलेल्या अश्वत्थाच्या डहाळीने संरक्षित केलेल्या वास्तूत साप आणि विष यांचा प्रभाव पडत नाही. ६ मोर, मुंगूस आणि ठिपके असलेले हरीण त्या जागी सोडले असता ते सापांचा फडशा पाडतात. ७ साप किंवा विष यांची शंका आल्यास पोपट, मैना व भृंगराज हे पक्षी ओरडतात. ८ विष जवळपास असल्यास क्रौंच पक्ष्याला मद येतो, जीवंजीवक पक्ष्याला ग्लानी येते, मत्त कोकिलाला मृत्यू येतो, चकोराच्या (रक्तवर्ण) नेत्रांचा रंग वदलतो (पांढरा होतो).

९ याप्रमाणे अग्नी, विष आणि सर्प यांपासून संरक्षणाची तजवीज करावी.

पृष्ठतः कक्ष्याविभागे स्त्रीनिवेशो गर्भव्याधिसंस्था वृक्षोदकस्थानं च । १० । बहिः कन्याकुमारपुरम् । ११ । पुरस्तादलङ्कारभूमिर्मन्त्रभूमिरुपस्थानं कुमाराध्यक्षस्थानं च । १२ । कक्ष्यान्तरेष्वन्तर्वंशिकसैन्यं तिष्ठेत् । १३ ।

अन्तर्गृहगतः स्थविरस्त्रीपरिशुद्धां देवीं पश्येत् । १४ । देवीगृहे लीनो हि भ्राता भद्रसेनं जघान, मातुः शय्यान्तर्गतश्च पुत्रः कारूषम् । १५ । लाजान्मधुनेति विषेण पर्यस्य देवी काशिराजम्, विषदिग्धेन नूपुरेण वैरन्त्यम्, मेखलामणिना सौवीरम्, जालूथमादर्शेन, वेण्यां गूढं शस्त्रं कृत्वा देवी विदूरथं जघान । १६ । तस्मादेतान्यास्पदानि परिहरेत् । १७ ।

मुण्डजटिलकुहकप्रतिसंसर्गं बाह्याभिश्च दासीभिः प्रतिषेधयेत् । १८ । न चैनाः कुल्याः पश्येयुः अन्यत्र गर्भव्याधिसंस्थाभ्यः । १९ । रूपाजीवाः स्नानप्रघर्षशुद्ध-

१० (राजाच्या निवासस्थानाच्या) पाठीमागे स्वतंत्र महालात स्त्रियांचे निवासस्थान, प्रसूतिगृह व आजाऱ्यांसाठी खोल्या, तसेच झाडे आणि पुष्करिणी यांसाठी जागा ठेवावी. ११ त्याच्या पलीकडे राजकन्या व राजकुमार यांची निवासस्थाने असावीत. १२ (राजाच्या निवासस्थानाच्या) पुढच्या बाजूस वस्त्रालंकार धारण करण्याची खोली, सल्लामसलतीची खोली, दिवाणखाना आणि राजपुत्रांच्या तैनातीतील अध्यक्षांसाठी जागा असावी. १३ महालांच्या बाजूच्या मोकळ्या जागांत प्रासादाच्या रक्षणार्थ पहारेकरी ठेवलेले असावेत.

१४ राण्यांच्या महालांत गेल्यावर वृद्ध स्त्रियांनी जिच्या शुद्धतेची खात्री पटविली आहे अशा राणीच्या भेटीस जावे. १५ कारण, देवीच्या महालात लपून बसलेल्या त्याच्या भावाने भद्रसेन राजाचा खून केला, तसेच आईच्या शय्येत लपलेल्या पुत्राने कारूष राजाचा खून केला. १६ मध म्हणून लाह्यांना विष लावून त्याच्या राणीने काशीच्या राजाचा खून केला, विष चोपडलेल्या नूपुराने वैरंत्याचा खून त्याच्या राणीने केला, कमरपट्ट्यातील (विषदिग्ध) मण्याने सौवीर राजाचा राणीने खून केला, जालूथाचा खून (विष माखलेल्या) आरशाने त्याच्या राणीने केला आणि आपल्या वेणीत शस्त्र लपवून राणीने विदूरथाला ठार केले. १७ म्हणून हे सर्व प्रसंग राजाने टाळावेत.

१८ मुंडन करणारे अथवा जटाधारी तापस, इंद्रजाल करणारे, यांच्याशी राण्यांच्या संपर्कास, तसेच बाहेरच्या दासींशी संपर्कास प्रतिबंध करावा. १९ आणि त्यांच्या कुलातील स्त्रियांनी प्रसूतिगृह व रुग्णगृह यांखेरीज दुसरीकडे त्यांची भेट घेऊ नये. २० स्नान करून व घासून पुसून शरीर शुद्ध केलेल्या

शरीराः परिवर्तितवस्त्रालङ्काराः पश्येयुः । २० । अशीतिकाः पुरुषाः पञ्चाशत्काः स्त्रियो वा मातापितृव्यञ्जनाः स्थविरवर्षधराभ्यागारिकाश्चावरोधानां शौचाशौचं विद्युः, स्थापयेयुश्च स्वामिहिते । २१ ।

स्वभूमौ च वसेत्सर्वः परभूमौ न संचरेत् ।
न च बाह्येन संसर्गं कश्चिदाभ्यन्तरो व्रजेत् ।। २२ ।।
सर्वं चावेक्षितं द्रव्यं निबद्धागमनिर्गमम् ।
निर्गच्छेदभिगच्छेद्वा मुद्रासंक्रान्तभूमिकम् ।। २३ ।।

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे निशान्तप्रणिधिः विंशोऽध्यायः ।

## २१

## [ अष्टादशं प्रकरणम् – आत्मरक्षितकम् ]

शयनादुत्थितः स्त्रीगणैर्धन्विभिः परिगृह्येत, द्वितीयस्यां कक्ष्यायां कञ्चुकोष्णीषिभिर्वर्षधराभ्यागारिकैः, तृतीयस्यां कुब्जवामनकिरातैः, चतुर्थ्यां मन्त्रिभिः संबन्धिभिर्दौवारिकैश्च प्रासपाणिभिः । १ ।

आणि वस्त्र व अलंकार बदलून धारण केलेल्या वेश्यांनी त्यांची (राण्यांची) भेट घ्यावी. २१ मातापित्यासमान भासणारे ऐंशी वर्षे वयाचे पुरुष आणि पन्नास वर्षे वयाच्या स्त्रिया, तसेच वृद्ध आणि नपुंसक सेवक यांनी अंतःपुरातील स्त्रियांच्या शुद्धाशुद्धतेचा शोध घ्यावा आणि त्यांना राजाचे हित साधण्यात तत्पर करावे.

२२ आणि सर्वांनी आपापल्या जागेतच रहावे. कोणीही दुसऱ्याच्या जागेत संचार करू नये. आणि राजवाड्यात रहाणाऱ्या कोणत्याही व्यक्तीने बाहेरच्या मनुष्याशी संबंध ठेवू नये.

२३ आणि कोणताही पदार्थ, त्याची पहाणी केल्यावर, त्याचा आत प्रवेश अथवा बाहेर जाणे ह्याची नोंद केल्यावर आणि जाण्याच्या ठिकाणापर्यंत मोहोरबंद असलेला असाच बाहेर जाऊ द्यावा किंवा आत येऊ द्यावा.

## एकविसावा अध्याय

## प्रकरण १८ : राजाच्या स्वतःच्या रक्षणासंबंधी

१ शयनावरून राजा उठला म्हणजे धनुर्धारी स्त्रियांनी त्याच्या सेवेस उपस्थित व्हावे, त्यापुढच्या दुसऱ्या दालनात झगा व पागोटे धारण करणाऱ्या नपुंसक सेवकांनी (वस्त्रालंकार चढविण्यासाठी) सिद्ध असावे, तिसऱ्यात (मंत्रभूमीत) कुबडे, खुजे व किरात सेवेसाठी असावेत, आणि चौथ्यात (दिवाणखान्यात) मंत्री, आप्त आणि भाला हातात घेतलेले द्वारपाळ यांना त्याने भेटावे.

पितृपैतामहं संबन्धानुबद्धं शिक्षितमनुरक्तं कृतकर्माणं च जनमासन्नं कुर्वीत, नान्यतोदेशीयमकृतार्थमानं स्वदेशीयं वाप्यपकृत्योपगृहीतम् । २ । अन्तर्वंशिकसैन्यं राजानमन्तःपुरं च रक्षेत् । ३ ।

गुप्ते देशे माहानसिकः सर्वमास्वादबाहुल्येन कर्म कारयेत् । ४ । तद्राजा तथैव प्रतिभुञ्जीत पूर्वमग्नये वयोभ्यश्च बलिं कृत्वा । ५ ।

अग्नेर्ज्वालाधूमनीलता शब्दस्फोटनं च विषयुक्तस्य, वयसां विपत्तिश्च । ६ । अन्नस्य ऊष्मा मयूरग्रीवाभः शैत्यम् आशु क्लिष्टस्येव वैवर्ण्यं सोदकत्वमक्लिन्नत्वं च, व्यञ्जनानाम् आशु शुष्कत्वं च क्वाथध्यामफेनपटलविच्छिन्नभावो गन्धस्पर्श-रसवधश्च, द्रवेषु हीनातिरिक्तच्छायादर्शनं फेनपटलसीमन्तोर्ध्वराजीदर्शनं च, रसस्य मध्ये नीला राजी, पयसस्ताम्रा, मद्यतोययोः काली, दध्नः श्यामा, मधुनः

२ पिता व पितामह यांच्या काळापासून वंशपरंपरेने आलेले, नात्याने जोडलेले, सुशिक्षित, अनुरक्त आणि कर्तृत्ववान अशा माणसांनाच राजाने जवळ करावे, ज्याचा द्रव्य व मान यांनी सत्कार केला नाही अशा परक्या देशातील रहिवाशाला जवळ करू नये, किंवा आपल्या देशातील रहिवाशाला सुद्धा, जर त्याचा अपकार करून नंतर त्याच्यावर मेहरबानी केली असेल तर. ३ राज-वाड्यातील पहाऱ्यावरील सैनिकांनी राजाचे व अंतःपुराचे रक्षण करावे.

४ मुदपाकखान्यावरील अधिकाऱ्याने सुरक्षित अशा ठिकाणी पुष्कळ प्रकारचा आस्वाद असलेला असा स्वयंपाक सिद्ध करून घ्यावा. ५ राजाने प्रथम अग्नीत वैश्वदेव करून व पक्ष्यांना बली अर्पण करून नंतर ते अन्न त्याच स्थितीत असलेले खावे.

६ अग्नीच्या ज्वाला व धूर निळ्या रंगाचे होणे व आवाजाचा स्फोट होणे हे अन्न विषयुक्त असल्याचे लक्षण, तसेच पक्ष्यांचा मृत्यू हे सुद्धा. ७ अन्नाची वाफ मोराच्या मानेच्या रंगाची निघणे, ते एकदम थंड होणे, विघाड झाल्याप्रमाणे त्याच्या रंगात एकदम बदल होणे, पाणी शोषले न जाता तसेच रहाणे आणि पाण्यात न भिजणे ही ते अन्न विषयुक्त असल्याची लक्षणे. भाज्यांच्या बाबतीत एकदम कोरडी पडणे, खदखदणे, मलिन होणे, फेस येणे व तुटक तुटक होणे, तसेच वास, स्पर्श आणि चव यांच्यात बदल ही विषयुक्ततेची अधिक लक्षणे. द्रव-पदार्थांच्या संबंधात त्यांचा रंग कमी किंवा अधिक गडद झालेला दिसणे आणि वरील फेसाच्या कडेला वर वर जाणाऱ्या रेषा दिसणे – रसाच्या बाबतीत मध्ये निळी रेषा, दुधाच्या मध्ये तांबडी, मद्य आणि पाणी यांच्या मध्ये काळी,

श्वेता, द्रव्याणामार्द्राणाम् आशु प्रम्लानत्वमुत्पक्वभावः क्वाथनीलश्यावता च, शुष्काणाम् आशु शातनं वैवर्ण्यं च, कठिनानां मृदुत्वं मृदूनां च कठिनत्वम्, तदभ्याशे क्षुद्रसत्त्ववधश्च, आस्तरणप्रावरणानां ध्याममण्डलता तन्तुरोमपक्ष्मशातनं च, लोहमणिमयानां पङ्कमलोपदेहता स्नेहरागगौरवप्रभाववर्णस्पर्शवधश्च – इति विषयुक्तस्य लिङ्गानि । ७ ।

विषप्रदस्य तु शुष्कश्यावववक्त्रता वाक्सङ्गः स्वेदो विजृम्भणं चातिमात्रं वेपथुः प्रस्खलनं वाक्यविप्रेक्षणम् आवेगः कर्मणि स्वभूमौ चानवस्थानम् इति । ८ ।

तस्मादस्य जाङ्गुलीविदो भिषजश्चासन्नाः स्युः । ९ । भिषग्भैषज्यागारादास्वादविशुद्धमौषधं गृहीत्वा पाचकपेषकाभ्यामात्मना च प्रतिस्वाद्य राज्ञे प्रयच्छेत् । १० । पानं पानीयं चौषधेन व्याख्यातम् । ११ ।

दह्याच्या मध्ये काळसर आणि मधाच्या मध्ये पांढरी – ही विषयुक्ततेची लक्षणे. ओल्या पदार्थांच्या संबंधात लवकर सुकून जाणे, कुजणे आणि कढताना निळेकाळे पडणे ही विषयुक्ततेची लक्षणे. कोरड्या पदार्थांच्या संबंधात लवकर तुकडे पडणे आणि रंग बदलणे ही विषयुक्ततेची लक्षणे. कठीण पदार्थ मऊ होणे आणि मऊ पदार्थ कटीण होणे, तसेच त्यांच्या सांनिध्यात क्षुद्र प्राणी मरून जाणे ही विषयुक्ततेची लक्षणे. आंथरूणपांघरुणांच्या संबंधात गोल, मलिन डाग पडणे, आणि (कापसाचे, लोकरीचे वगैरे) तंतू, धागे व केस गळून पडणे ही विषयुक्ततेची लक्षणे. धातू व रत्ने यांनी बनविलेल्या पदार्थांच्या संबंधात चिखलासारख्या मळाचा थर बसणे आणि त्यांचा गुळगुळीतपणा, रंग, वजन, प्रभाव, जात व स्पर्श यांचा नाश होणे ही विषयुक्ततेची लक्षणे.

८ परंतु विषप्रयोग करणाऱ्याची लक्षणे तोंड सुकणे व काळे पडणे, बोलताना अडखळणे, खूप घाम सुटणे व सारख्या जांभया देणे, कंप सुटणे, चालताना अडखळणे, बोलणे चालू असता इकडे तिकडे नजर टाकणे, काम करताना चलबिचल होणे आणि आपल्या जागी स्थिर न रहाणे ही होत.

९ म्हणून विष उतरविण्याची विद्या (जाङगुली) जाणणारे व इतर वैद्य राजाच्या संनिध असावेत. १० वैद्यांनी औषधागारातून विशुद्ध चव असलेले औषध घेऊन काढा करणारे व कुटणारे यांना चाखवून व आपण स्वतः चाखून पाहून राजाला द्यावे. ११ पेये आणि पाणी यांच्या बाबतीतही औषधाप्रमाणेच अशी खबरदारी घ्यावी.

कल्पकप्रसाधकाः स्नानशुद्धवस्त्रहस्ताः समुद्रमुपकरणमन्तर्वंशिकहस्तादादाय परिचरेयुः । १२ । स्नापकसंवाहकास्तरकरजकमालाकारकर्म दास्यः प्रसिद्धशौचाः कुर्युः, ताभिरधिष्ठिता वा शिल्पिनः । १३ । आत्मचक्षुषि निवेश्य वस्त्रमाल्यं दद्युः, स्नानानुलेपनप्रघर्षचूर्णवासस्नानीयानि च स्ववक्षोबाहुषु च । १४ । एतेन परस्मादागतकं व्याख्यातम् । १५ ।

कुशीलवाः शस्त्राग्निरसक्रीडावर्जं नर्मयेयुः । १६ । आतोद्यानि चैषामन्तस्तिष्ठेयुः, अश्वरथद्विपालङ्काराश्च । १७ ।

आप्तपुरुषाधिष्ठितं यानवाहनमारोहेत्, नावं चाप्तनाविकाधिष्ठिताम् । १८ । अन्यनौप्रतिबद्धां वातवेगवशां च नोपेयात् । १९ । उदकान्ते सैन्यमासीत । २० ।

मत्स्यग्राहविशुद्धमुदकमवगाहेत । २१ । व्यालग्राहविशुद्धमुद्यानं गच्छेत् । २२ ।

१२ न्हावी आणि पोषाख चढविणारे यांनी स्नान करून आणि शुद्ध वस्त्रे परिधान करून स्वच्छ धुतलेल्या हातात राजवाड्यातील रक्षकांकडून मोहरबंद उपकरणे घेऊन आपले सेवेचे काम करावे. १३ स्नान घालणे, संवाहन करणे, बिछाना करणे, कपडे धुणे व माळा गुंफणे ही कामे ज्यांच्या शुचितेची खात्री आहे अशा दासींनी करावीत अथवा त्यांच्या देखरेखीखालील कारागिरांनी करावीत. १४ वस्त्रे व माळा त्यांनी प्रथम आपल्या डोळ्यांवर ठेवून मग द्याव्या, स्नानोत्तर लावावयाचे उटणे, स्नानाच्या वेळी घासावयाचे चूर्ण, सुवासिक द्रव्ये व स्नानोपयोगी पदार्थ हे सर्व त्यांनी प्रथम आपल्या वक्षस्थळावर व बाहूंवर ठेवून मग द्यावे. १५ दुसऱ्या कोणाकडून आलेल्या पदार्थांच्या बाबतीतही हीच खबरदारी घ्यावी.

१६ कुशीलवांनी (नट, नर्तक, आदींनी) शस्त्र, अग्नि व विष यांचा उपयोग असलेले खेळ वर्ज्य करून इतर खेळांनी राजाचे मनोविनोदन करावे. १७ आणि त्यांची वाद्ये, तसेच घोडे, रथ व हत्ती यांचे अलंकार राजवाड्यातच ठेवावेत.

१८ विश्वासू सेवकांच्या ताब्यात असलेल्या यानवाहनांवरच राजाने आरूढ व्हावे, तसेच विश्वासू नावाड्याने चालविलेल्या नावेतच बसावे. १९ दुसऱ्या नावेला बांधलेल्या व वाऱ्याच्या जोराने हेलकावे खाणाऱ्या नावेत बसू नये. २० पाण्याच्या काठावरच सैन्य सज्ज असावे.

२१ मासे पकडणाऱ्यांनी निर्भय केलेल्या जलात राजाने (विहारार्थ) उतरावे. २२ साप पकडणाऱ्यांनी निर्भय केलेल्या उद्यानात जावे. २३ पारधी

लुब्धकश्वगणिभिरपास्तस्तेनव्यालपराबाधभयं चललक्ष्यपरिचयार्थं मृगारण्यं गच्छेत् ।२३ ।

आप्तशस्त्रग्राहाधिष्ठितः सिद्धतापसं पश्येत्, मन्त्रिपरिषदा सह सामन्तदूतम् । २४ । संनद्धोऽश्वं हस्तिनं वारूढः संनद्धमनीकं पश्येत् । २५ ।

निर्याणेऽभियाने च राजमार्गमुभयतः कृतारक्षं शस्त्रिभिर्दण्डिभिश्चापास्तशस्त्रहस्तप्रव्रजितव्यङ्गं गच्छेत् । २६ । न पुरुषसंबाधमवगाहेत । २७ । यात्रासमाजोत्सवप्रहवणानि च दशवर्गिकाधिष्ठितानि गच्छेत् । २८ ।

यथा च योगपुरुषैरन्यान् राजाधितिष्ठति ।
तथायमन्याबाधेभ्यो रक्षेदात्मानमात्मवान् ।। २९ ।।

इति विनयाधिकारिके प्रथमेऽधिकरणे आत्मरक्षितकम् एकविंशोऽध्यायः ।

**एतावता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य विनयाधिकारिकम् प्रथममधिकरणं समाप्तम्।।**

आणि कुत्र्यांसह शिकार करणारे यांनी चोर, रानटी प्राणी आणि शत्रू यांच्यापासून धोक्याचे भय दूर केलेल्या मृगारण्यात चल लक्ष्याचा वेध करण्याच्या अभ्यासासाठी जावे.

२४ विश्वासू शस्त्रधारी रक्षक बरोबर असतील तेव्हा सिद्ध तापसाची भेट घ्यावी, मंत्रिपरिषदेच्या समवेत सामंत राजाच्या दूताची भेट घ्यावी. २५ शस्त्रसज्ज होऊन व घोड्यावर किंवा हत्तीवर आरूढ होऊन शस्त्रसज्ज सैन्याची पहाणी करावी.

२६ बाहेर जाताना आणि आत येताना राजमार्गाच्या दुतर्फा रक्षक ठेवून आणि शस्त्रधारी व दंडधारी सेवकांकडून त्यावरील सशस्त्र माणसे, संन्यासी व व्यंग असलेले ह्यांना दूर सारून मग जावे. २७ माणसांची गर्दी असेल तेथे आत शिरू नये. २८ आणि जत्रा, मेळावे, उत्सव आणि समारंभ यांसारख्या प्रसंगी दहा दहा सैनिकांवर असलेल्या अधिकाऱ्यांच्या देखरेखीची व्यवस्था करून मगच जावे.

२९ आणि ज्याप्रमाणे राजा गूढ पुरुषांच्या द्वारा दुसऱ्यांवर लक्ष ठेवतो त्याप्रमाणे ह्या आत्मगुणसंपन्न राजाने दुसऱ्यांच्या धोक्यांपासून आपले स्वतःचे रक्षण करावे.

**पहिले अधिकरण समाप्त**

# अध्यक्षप्रचारः -- द्वितीयमधिकरणम् ।

१

## [ एकोनविंशं प्रकरणम् — जनपदनिवेशः ]

भूतपूर्वमभूतपूर्वं वा जनपदं परदेशापवाहनेन स्वदेशाभिष्यन्दवमनेन वा निवेशयेत् । १ ।

शूद्रकर्षकप्रायं कुलशतावरं पञ्चकुलशतपरं ग्रामं क्रोशद्विक्रोशसीमानमन्योन्यारक्षं निवेशयेत् । २ । नदीशैलवनभृष्टिदरीसेतुबन्धशमीशाल्मलीक्षीरवृक्षानन्तेषु सीम्नां स्थापयेत् । ३ ।

अष्टशतग्राम्या मध्ये स्थानीयं, चतुःशतग्राम्या द्रोणमुखं, द्विशतग्राम्याः कार्वटिकं, दशग्रामीसंग्रहेण संग्रहणं स्थापयेत् । ४ ।

## अधिकरण दुसरे – अध्यक्षांचे कार्य

### पहिला अध्याय

### प्रकरण १९ : जनपदाची वसाहत

१ पूर्वी जेथे जनपद वसलेले असेल किंवा पूर्वी वसलेले नसेल, अशा ठिकाणी परदेशातून लोक आणून किंवा आपल्या देशातील दाट वस्तीच्या भागातील लोक हलवून जनपद वसवावे.

२ मुख्यतः शूर शेतकऱ्यांची वस्ती असलेली, कमीत कमी शंभर व जास्तीत जास्त पाचशे कुटुंबे असलेली, एक किंवा दोन कोसांवर हद्दी असलेली व एकमेकांचे संरक्षण करू शकतील अशा प्रकारे गावे वसवावीत. ३ गावांमधील हद्दींच्या खुणा म्हणून नदी, टेकडी, जंगल, सुकलेले ओढ्याचे पात्र, दरी, बांध, शमी, शाल्मली, वड, पिंपळ इत्यादी वृक्ष हे ठरवून द्यावेत.

४ आठशे गावांच्या मध्ये एक स्थानीय, चारशे गावांच्या मध्ये एक द्रोणमुख, दोनशे गावांच्या मध्ये एक कार्वटिक आणि दहा गावांना मिळून एक संग्रहण याप्रमाणे लहानमोठी शहरे वसवावीत.

**अन्तेष्वन्तपालदुर्गाणि जनपदद्वाराण्यन्तपालाधिष्ठितानि स्थापयेत् । ५ । तेषामन्तराणि वागुरिकशबरपुलिन्दचण्डालारण्यचरा रक्षेयुः । ६ ।**

**ऋत्विगाचार्यपुरोहितश्रोत्रियेभ्यो ब्रह्मदेयान्यदण्डकराण्यभिरूपदायादकानि प्रयच्छेत्, अध्यक्षसंख्यायकादिभ्यो गोपस्थानिकानीकस्थचिकित्सकाश्वदमकजङ्घाकारिकेभ्यश्च विक्रयाधानवर्जानि । ७ ।**

**करदेभ्यः कृतक्षेत्राण्यैकपुरुषिकाणि प्रयच्छेत् । ८ । अकृतानि कर्तृभ्यो नादेयानि । ९ । अकृषतामाच्छिद्यान्येभ्यः प्रयच्छेत् । १० । ग्रामभृतकवैदेहका वा कृषेयुः । ११ । अकृषन्तो वावहीनं दद्युः । १२ ।**

**धान्यपशुहिरण्यैश्चैताननुगृह्णीयात् । १३ । तान्यनु सुखेन दद्युः । १४ । अनुग्रहपरिहारौ चैतेभ्यः कोशवृद्धिकरौ दद्यात्, कोशोपघातकौ वर्जयेत् । १५ ।**

५ सरहद्दीवर जनपदात येजा करण्यासाठी दरवाजासारखे असलेले अंतपालांच्या आधिपत्याखाली किल्ले स्थापन करावेत. ६ दोन किल्ल्यांच्या मधील मोकळ्या जागांवर फासेपारधी, शबर, पुलिंद, चांडाल ह्या अरण्यवासीयांनी पहारा करावा.

७ ऋत्विग, आचार्य, पुरोहित व श्रोत्रिय यांना ब्राह्मणांना दान म्हणून जमिनी द्याव्यात, त्या जमिनी दंड व कर यांपासून मुक्त असाव्यात आणि त्यांच्याचसारख्या वारसांनाच मिळतील अशा तऱ्हेने द्याव्यात. तसेच अध्यक्ष, हिशोबनीस इत्यादींना आणि गोप, स्थानिक, हत्तींना शिकविणारे, वैद्य, घोडयांना काबूत आणणारे व जासूद यांना जमिनी द्याव्यात, पण त्या विकण्याचा किंवा गहाण टाकण्याचा त्यांना अधिकार असू नये.

८ कर देण्यास जे तयार असतील त्यांना लागवडीस तयार केलेल्या जमिनी त्यांच्या हयातीपर्यंत द्याव्यात. ९ लागवडीस योग्य नसलेल्या जमिनी जे लागवडीस आणीत असतील त्यांच्याकडून त्या काढून घेऊ नये. १० लागवडीखालील जमीन जे कशीत नाहीत त्यांच्याकडून ती घेऊन इतरांना द्यावी. ११ किंवा ग्रामसेवक अथवा व्यापारी यांनी ती कसावी. १२ किंवा जे कशीत नाहीत त्यांनी कोशाचे होणारे नुकसान भरून द्यावे.

१३ राजाने त्यांना धान्य, पशू व द्रव्य तगाईरूपाने द्यावे. १४ ते त्यांनी नंतर सवडीप्रमाणे परत करावे. १५ आणि ह्यांना मदत आणि करात सूट कोशाची वृद्धी होईल अशी द्यावी, कोशाला तूट येईल अशी टाळावी. १६ कारण

**अल्पकोशो हि राजा पौरजानपदानेव ग्रसते । १६ । निवेशसमकालं यथागतकं वा परिहारं दद्यात् । १७ । निवृत्तपरिहारान् पितेवानुगृह्णीयात् । १८ ।**

**आकरकर्मान्तद्रव्यहस्तिवनव्रजवणिक्पथप्रचारान् वारिस्थलपथपण्यपत्तनानि च निवेशयेत् । १९ ।**

**सहोदकमाहार्योदकं वा सेतुं बन्धयेत् । २० । अन्येषां वा बध्नतां भूमिमार्गवृक्षोपकरणानुग्रहं कुर्यात्, पुण्यस्थानारामाणां च । २१ । संभूयसेतुबन्धादपक्रामतः कर्मकरबलीवर्दाः कर्म कुर्युः । २२ । व्ययकर्मणि च भागी स्यात्, न चांशं लभेत । २३ । मत्स्यप्लवहरितपण्यानां सेतुषु राजा स्वाम्यं गच्छेत् । २४ ।**

**दासाहितकबन्धूनशृण्वतो राजा विनयं ग्राहयेत् । २५ ।**

**बालवृद्धव्यसन्यनाथांश्च राजा बिभृयात्, स्त्रियमप्रजातां प्रजातायाश्च पुत्रान् । २६ ।**

ज्याच्या कोशात शिल्लक थोडी असेल तो पुरवासी व जनपदनिवासी यांनाच पिळून काढतो. १७ जनपदाच्या निर्मितीच्या वेळेसच जे आले असतील त्यांना किंवा नंतरही जे येतील त्यांना करात सूट द्यावी. १८ ज्यांच्या करातील सूट बंद झाली असेल त्यांच्यावर पित्याप्रमाणे अनुग्रह करावा.

१९ वसविलेल्या जनपदात खाणी, कारखाने, द्रव्योपयोगी जंगले, हत्तींसाठी राखीव जंगले, गुरांचे कळप, व्यापाराचे मार्ग यांचे व्यवहार सुरू करावेत, तसेच जलमार्ग, खुष्कीचे मार्ग व बंदरे प्रस्थापित करावीत.

२० ज्यात (नदी, झरे वगैरे स्वरूपात) मूळचेच पाणी आहे असे किंवा ज्यात दुसरीकडून आलेले पाणी असते असे सेतू (बंधारे) बांधून घ्यावेत. २१ अथवा दुसरे जे कोणी बांधीत असतील त्यांना जमीन, रस्ते, झाडे व हत्यारे यांचे सहाय्य द्यावे, तसेच पुण्यस्थाने व उद्याने यांच्या निर्मितीसही साह्य करावे. २२ सर्वांनी मिळून बांधावयाच्या असलेल्या सेतूतून जो अंग काढून घेईल त्याची गडीमाणसे व बैल वेठीस धरावे. २३ आणि होणाऱ्या खर्चाचा त्याचा वाटा त्याच्याकडून वसूल करून घ्यावा, पण सेतूचा त्याच्या हिश्शाचा लाभ त्याला घेऊ देऊ नये. २४ सेतूंमधील (तलावांतील) मासे, बदक आणि हिरव्या वनस्पती वगैरे यांच्यावर मालकी राजाची राहील.

२५ दास, सावकाराकडे गहाण ठेवलेला मनुष्य आणि बांधव (आपल्या मालकांना वगैरे) जुमानीत नसतील तर राजाने त्यांना शिस्तीत वागावयास लावावे.

२६ अनाथ असलेली लहान मुले, वृद्ध माणसे आणि संकटग्रस्त यांचे पालन राजाने करावे, तसेच मुले नसलेल्या अनाथ स्त्रीचे व अनाथ स्त्रीला असलेल्या मुलांचे (पालनपोषण करावे).

**बालद्रव्यं ग्रामवृद्धा वर्धयेयुरा व्यवहारप्रापणात्, देवद्रव्यं च । २७ ।**

**अपत्यदारं मातापितरौ भ्रातृनप्राप्तव्यवहारान् भगिनीः कन्या विधवाश्चाबिभ्रतः शक्तिमतो द्वादशपणो दण्डः, अन्यत्र पतितेभ्यः, अन्यत्र मातुः । २८ । पुत्रदारमप्रतिविधाय प्रव्रजतः पूर्वः साहसदण्डः, स्त्रियं च प्रव्राजयतः । २९ । लुप्तव्यायामः प्रव्रजेदापृच्छ्य धर्मस्थान् । ३० । अन्यथा नियम्येत । ३१ ।**

**वानप्रस्थादन्यः प्रव्रजितभावः, सजातादन्यः संघः, सामुत्थायिकादन्यः समयानुबन्धो वा नास्य जनपदमुपनिविशेत । ३२ ।**

**न च तत्रारामा विहारार्था वा शालाः स्युः । ३३ । नटनर्तकगायनवादकवाग्जीवनकुशीलवा न कर्मविघ्नं कुर्युः । ३४ । निराश्रयत्वाद् ग्रामाणां क्षेत्राभिरतत्वाच्च पुरषाणां कोशविष्टिद्रव्यधान्यरसवृद्धिर्भवति । ३५ ।**

२७ लहान मुलांची संपत्ती ती वयात येईपावेतो गावातील ज्येष्ठ मनुष्यांनी सांभाळून तिची वाढ करावी, तसेच देवालयांच्या संपत्तीची सुद्धा वाढ करावी.

२८ जर एखादा मनुष्य समर्थ असूनही आपली बायकामुले, आईबाप, वयात न आलेले भाऊ, कुमारिका असलेल्या व विधवा झालेल्या वहिणी यांचे पालनपोषण करीत नसेल तर बारा पण दंड करावा. पण ते पतित असतील तर हा नियम लागू करू नये; याला अपवाद मातेचा (ती पतित असली तरी तिचे पालनपोषण केलेच पाहिजे). २९ बायकामुलांची सोय केल्याशिवाय जो संन्यास घेईल त्याला प्रथम साहसदंड (४८ ते ९६ पण) करावा; तसेच जो स्त्रीला संन्यास घ्यायला लावील त्यालाही तो दंड करावा. ३० ज्याची कामवासना लुप्त झाली असेल त्याने धर्मस्थांच्या (न्यायाधिशांच्या) परवानगीने संन्यास घ्यावा. ३१ तसे न केल्यास त्याच्यावर बंधन घालावे.

३२ राजाच्या जनपदात वानप्रस्थ खेरीज करून इतर संन्यासी पंथ, तेथेच जन्मलेल्या लोकांखेरीज इतर लोकांचे संघ आणि सहकारितेने एकत्र करावयाच्या कार्याखरीज इतर उद्देशाने करार करून स्थापलेल्या संस्था यांना वस्ती करू देऊ नये.

३३ आणि तेथे उद्याने व विहार करण्यासाठी जागा असू नयेत. ३४ नट, नर्तक, गायक, वादक, कथाकार आणि कुशीलव यांनी कामात विघ्न आणू नये. ३५ गावात (ह्या लोकांना मुक्कामासाठी) आश्रयस्थान नसले आणि तेथील माणसे शेतीच्या कामात गर्क होऊन राहिली म्हणजे कोश, मजूर, द्रव्य, धान्य आणि रस यांची वाढ होते.

परचक्राटवीग्रस्त व्याधिदुर्भिक्षपीडितम् ।
देशं परिहरेद्राजा व्ययक्रीडाश्च वारयेत् ॥ ३६ ॥
दण्डविष्टिकराबाधै रक्षेदुपहतां कृषिम् ।
स्तेनव्यालविषग्राहैर्व्याधिभिश्च पशुव्रजान् ॥ ३७ ॥
वल्लभैः कार्मिकः स्तेनैरन्तपालैश्च पीडितम् ।
शोधयेत्पशुसंघैश्च क्षीयमाणं वणिक्पथम् ॥ ३८ ॥
एवं द्रव्यद्विपवनं सेतुबन्धमथाकरान् ।
रक्षेत्पूर्वकृतान् राजा नवांश्चाभिप्रवर्तयेत् ॥ ३९ ॥

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे जनपदनिवेशः प्रथमोऽध्यायः । आदितो द्वाविंशः ।

२

## [ विंशं प्रकरणम् – भूमिच्छिद्रापिधानम् ]

**अकृष्यायां भूमौ पशुभ्यो विवीतानि प्रयच्छेत् । १ । प्रदिष्टाभयस्थावरजङ्गमानि च ब्रह्मसोमारण्यानि तपस्विभ्यो गोरुतपराणि प्रयच्छेत् । २ ।**

३६ परचक्राच्या किंवा जंगलांतील लोकांच्या हल्ल्याने बेजार झालेल्या व रोग आणि दुष्काळ यांनी गांजलेल्या प्रदेशाला राजाने करापासून सूट द्यावी आणि खर्चिक खेळांना प्रतिबंध करावा.

३७ दंड, मजूर आणि कर यांच्या संकटाने टेकीस आलेल्या शेतीचे रक्षण करावे. चोर, हिंस्र प्राणी, विष आणि सुसरी तसेच व्याधींनी त्रस्त झालेल्या गुरांच्या कळपांचे रक्षण करावे.

३८ राजवल्लभ, सरकारी कामावरील अधिकारी, दरोडेखोर आणि सरहद्दीवरील दुर्गातील अधिकारी यांनी पीडित झालेल्या, तसेच पशूंच्या कळपांच्या उपद्रवामुळे रहदारी कमी होत जाणाऱ्या व्यापारी मार्गावरील संकटे दूर करावीत.

३९ याप्रमाणे पूर्वी केलेली उपयुक्त द्रव्यांची वने, हत्तींची वने, पाटबंधारे आणि खाणी यांचे राजाने रक्षण करावे, तसेच ही सर्व कामे नव्याने प्रवर्तित करावीत.

### दुसरा अध्याय

### प्रकरण २० : लागवडीस योग्य नसलेल्या जमिनीचा वापर

१ लागवडीस योग्य नसलेल्या जमिनीवर जनावरांसाठी गुरचराईच्या जागा ठेवाव्यात. २ आणि तपस्वी लोकांसाठी वेदाध्ययन आणि यज्ञयाग करण्यासाठी, ज्यात स्थावर आणि जंगम यांना अभयाचे वचन दिले आहे असे आणि जास्तीत जास्त एक गोरुत (कोस) विस्तार असलेले असे वन नेमन द्यावे.

तावन्मात्रमेकद्वारं खातगुप्तं स्वादुफलगुल्मगुच्छमकण्टकिद्रुममुत्तानतोयाशयं दान्तमृगचतुष्पदं भग्ननखदंष्ट्रव्यालं मार्गयुकहस्तिहस्तिनीकलभं मृगवनं विहारार्थं राज्ञः कारयेत् । ३ । सर्वातिथिमृगं प्रत्यन्ते चान्यन्मृगवनं भूमिवशेन वा निवेशयेत् । ४ ।

कुप्यप्रदिष्टानां च द्रव्याणामेकैकशो वनानि निवेशयेत्, द्रव्यवनकर्मान्तानटवीश्च द्रव्यवनापाश्रयाः । ५ ।

प्रत्यन्ते हस्तिवनमटव्यारक्षं निवेशयेत् । ६ । नागवनाध्यक्षः पार्वतं नादेयं सारसमानूपं च नागवनं विदितपर्यन्तप्रवेशनिष्कासं नागवनपालैः पालयेत् । ७ । हस्तिघातिनं हन्युः । ८ । दन्तयुगं स्वयंमृतस्याहरतः सपादचतुष्पणो लाभः । ९ ।

नागवनपाला हस्तिपकपादपाशिकसैमिकवनचरकपारिकर्मिकसखा हस्तिमूत्रपुरीषच्छन्नगन्धा भल्लातकीशाखाप्रच्छन्नाः पञ्चभिः सप्तभिर्वा हस्तिबन्धकीभिः

३ तेवढेच क्षेत्रफळ असलेले, एकच प्रवेशद्वार असलेले, खंदकाने संरक्षित, स्वादिष्ट फळांची झाडेझुडपे असलेले. काटेरी झाडे नसलेले, उथळ पाण्याचे तलाव असलेले, माणसाळलेले मृग आणि इतर पशू असलेले, नखे व दात काढलेले हिंस्र पशू असलेले, आणि मृगयेस योग्य असे हत्ती, हत्तिणी व त्यांचे छावे असलेले एक मृगवन राजाच्या विहारासाठी तयार करून घ्यावे. ४ आणि त्याला लागूनच अथवा जशी जमीन असेल त्याप्रमाणे दुसरे एक मृगवन, ज्यात सर्व प्राण्यांना अतिथीप्रमाणे आसरा मिळेल असे, तयार करावे.

५ आणि जंगलात उत्पन्न होणाऱ्या व उपयोगी पडणाऱ्या म्हणून सांगितलेल्या पदार्थांसाठी, प्रत्येकासाठी एकेक याप्रमाणे, द्रव्यवने लावावीत, तसेच त्या पदार्थांपासून वस्तू निर्माण करण्याचे कारखाने स्थापावेत, आणि द्रव्यवनांच्या आश्रयाने जंगली लोकांना तेथे वसवावे.

६ सरहद्दीवर जंगली लोकांचे रक्षण असलेले एक हस्तिवन तयार करावे. ७ हस्तिवनावरील अध्यक्षाने पर्वतावरील, नदीकाठच्या, तलावाजवळच्या आणि दलदलीच्या जागी असलेल्या हस्तिवनाचे, त्याची हद्द, आत जाण्याचे व बाहेर पडण्याचे मार्ग यांवर नजर ठेवून, नागवनातील रक्षकांच्या द्वारा रक्षण करावे. ८ हत्तीला मारणाऱ्याचा वध करावा. ९ नैसर्गिकरीत्या मेलेल्या हत्तीचे दोन्ही दात आणून देणारास सव्वाचार पण बक्षीस द्यावे.

१० हस्तिवनातील रक्षकांनी माहूत, पायबंद लावणारे, सीमारक्षक, वनात रहाणारे आणि इतर परिचारक यांच्या समवेत हत्तीच्या मलमूत्राने आपला वास लोपवून आणि बिब्याच्या झाडाच्या फांद्यांनी आपली शरीरे झाकून घेऊन

सह चरन्तः शय्यास्थानपद्यालेण्डकूलघातोद्देशेन हस्तिकुलपर्यग्रं विद्युः । १० । यूथचरमेकचरं निर्यूथं यूथपतिं हस्तिनं व्यालं मत्तं पोतं बन्धमुक्तं च निबन्धेन विद्युः । ११ ।

अनीकस्थप्रमाणैः प्रशस्तव्यञ्जनाचारान् हस्तिनो गृह्णीयुः । १२ । हस्तिप्रधानो विजयो राज्ञः । १३ । परानीकव्यूहदुर्गस्कन्धावारप्रमर्दना ह्यतिप्रमाणशरीराः प्राणहरकर्माणो हस्तिनः । १४ ।

कालिङ्गाङ्गरजाः श्रेष्ठाः प्राच्याश्चेदिकरूषजाः ।
दाशार्णाश्चापरान्ताश्च द्विपानां मध्यमा मताः ॥ १५ ॥

सौराष्ट्रकाः पाञ्चनदास्तेषां प्रत्यवराः स्मृताः ।
सर्वेषां कर्मणा वीर्यं जवस्तेजश्च वर्धते ॥ १६ ॥

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे भूमिच्छिद्रापिधानम् द्वितीयोऽध्यायः । आदितस्त्रयोविंशः ।

पाच किंवा सात शिकविलेल्या हत्तिणी बरोबर घेऊन हिंडावे आणि हत्तींची निजण्याची जागा, त्यांची उमटलेली पावले, विष्ठा आणि धडक दिल्याने कोसळलेले नदीतीर ह्या खुणांच्या साह्याने कळपातील हत्तींच्या एकूण संख्येचा शोध घ्यावा. ११ आणि प्रत्येक हत्तीची तो कळपाबरोबरच आहे, एकटाच हिंडतो, कळपातून घालवून दिलेला आहे, कळपाचा पुढारी आहे, हिंसक झालेला आहे, मदावस्थेत आला आहे, लहान छावा आहे, बंधनातून सुटून आलेला आहे, याप्रमाणे लेखी नोंद ठेवावी.

१२ हत्तींना शिकविणाऱ्यांनी सांगितल्याप्रमाणे प्रशस्त लक्षणे व चालचलणूक असलेले असे हत्ती पकडावे. १३ कारण, राजाला विजय प्राप्त होणे मुख्यतः हत्तींवर अवलंबून असते. १४ कारण, अति धिप्पाड शरीराचे असल्यामुळे हत्ती शत्रुसैन्याचे व्यूह, दुर्ग आणि छावण्या उध्वस्त करतात आणि प्राणघातक कर्मे करतात.

१५ कलिंगवन आणि आंगरक वन यांतील हत्ती श्रेष्ठ. प्राच्यवन, चेदिकरूषवन, दशार्णवन आणि अपरांतवन यांतील हत्ती मध्यम प्रतीचे मानले आहेत.

१६ सौराष्ट्रवनातील आणि पांचनदवनातील हत्ती कनिष्ठ प्रतीचे समजले गेले आहेत. योग्य शिक्षणाने ह्या सर्वांचा पराक्रम, वेग आणि तेजस्विता वृद्धिगत होतात.

३

## [ एकविंशं प्रकरणम् – दुर्गविधानम् ]

**चतुर्दिशं जनपदान्ते सांपरायिकं दैवकृतं दुर्गं कारयेत्, अन्तर्द्वीपं स्थलं वा निम्नावरुद्धमौदकम्, प्रास्तरं गुहां वा पार्वतम्, निरुदकस्तम्बमिरिणं वा धान्वनम्, खञ्जनोदकं स्तम्बगहनं वा वनदुर्गम् । १ । तेषां नदीपर्वतदुर्गं जनपदारक्षस्थानम्, धान्वनवनदुर्गमटवीस्थानम् आपद्यपसारो वा । २ ।**

**जनपदमध्ये समुदयस्थानं स्थानीयं निवेशयेत्, वास्तुकप्रशस्ते देशे नदीसङ्गमे ह्रदस्याविशोषस्याङ्के सरसस्तटाकस्य वा, वृत्तं दीर्घं चतुरश्रं वा वास्तुवशेन वा प्रदक्षिणोदकं पण्यपुटभेदनमंसपथवारिपथाभ्यामुपेतम् । ३ ।**

## तिसरा अध्याय

## प्रकरण २१ : किल्ल्याची बांधणी

१ जनपदाच्या सरहद्दीवर चारी दिशांना निसर्गाने बनविलेले, युद्धासाठी सज्ज असे दुर्ग स्थापन करावेत – बेटावर असलेला किंवा पाण्याने वेढलेला भूभाग असे (दोन प्रकारचे) जलदुर्ग, खडकांनी बनलेला किंवा गुहेच्या स्वरूपाचा असे (दोन प्रकारचे) पर्वतदुर्ग, जल व झुडपे यांनी विरहित असलेला किंवा क्षारयुक्त जमिनीच्या स्वरूपाचा असे (दोन प्रकारचे) धन्वदुर्ग, अथवा दलदल व पाणी असलेला किंवा दाट झुडपांनी वेष्टिलेला असे (दोन प्रकारचे) वनदुर्ग याप्रमाणे (स्थापन करावेत). २ त्यांपैकी नदीदुर्ग (जलदुर्ग) आणि पर्वतदुर्ग ही जनपदाच्या रक्षणार्थ असलेली ठिकाणे आणि धन्वदुर्ग व वनदुर्ग ही अरण्यवासींनी रहावयाची ठिकाणे किंवा संकटसमयी आश्रयार्थ येण्याची ठिकाणे.

३ जनपदाच्या मध्यभागी राज्यातील उत्पन्न जमा होण्याचे ठिकाण म्हणून स्थानीय वसवावे – वास्तुशास्त्रविशारदांनी पसंत केलेल्या जागी, नद्यांच्या संगमावर अथवा कधीही कोरडे न पडणाऱ्या जलाशयाच्या – नैसर्गिक सरोवराच्या अथवा कृत्रिम तलावाच्या – काठी, वर्तुळाकार, लंबचौरस अथवा चौरस आकाराचे, किंवा शहर वसवावयाच्या जागेच्या अनुरोधाने आकार असलेले असे; नदीचे पाणी प्रदक्षिण (डावीकडून उजवीकडे) वाहणारे असावे; त्यात निरनिराळ्या मालांच्या बाजारपेठा असाव्यात आणि ते खुष्कीचे मार्ग व जलमार्ग यांनी इतर प्रदेशांशी जोडलेले असावे.

तस्य परिखास्तिस्रो दण्डान्तराः कारयेत् चतुर्दश द्वादश दशेति दण्डान् विस्तीर्णाः, विस्तारादवगाढाः पादोनमर्धं वा, त्रिभागमूलाः मूलचतुरश्रा वा, पाषाणोपहिताः पाषाणेष्टकाबद्धपार्श्वा वा, तोयान्तिकीरागन्तुतोयपूर्णा वा सपरिवाहाः पद्मग्राहवतीश्च । ४ ।

चतुर्दण्डापकृष्टं परिखायाः षड्दण्डोच्छ्रितमवरुद्धं तद्द्विगुणविष्कम्भं खाताद्वप्रं कारयेद् ऊर्ध्वचयं मञ्चपृष्ठं कुम्भकुक्षिकं वा हस्तिभिर्गोभिश्च क्षुण्णं कण्टकिगुल्मविषवल्लीप्रतानवन्तम् । ५ । पांसुशेषेण वास्तुच्छिद्रं राजभवनं वा पूरयेत् । ६ ।

वप्रस्योपरि प्राकारं विष्कम्भद्विगुणोत्सेधमैष्टकं द्वादशहस्तादूर्ध्वम् ओजं युग्मं वा आ चतुर्विंशतिहस्तादिति कारयेत्, रथचर्यासंचारं तालमूलं मुरजकैः कपिशीर्षकैश्चाचिताग्रम् । ७ । पृथुशिलासंहतं वा शैलं कारयेत्, न त्वेव काष्ठमयम् । ८ । अग्निरवहितो हि तस्मिन्वसति । ९ ।

४ त्याच्या भोवती एक एक दंडाच्या अंतरावर तीन खंदक चौदा, बारा आणि दहा दंड रुंदीचे खणावेत; त्यांची खोली रुंदीच्या पाऊणपट अथवा अर्धी असावी; त्यांचे तळ रुंदीच्या एकतृतीयांशाइतके रुंद किंवा वरील रुंदीइतकेच रुंद असावेत; ते दगडांनी बांधलेले असावेत किंवा फक्त त्यांच्या बाजू दगड अथवा विटा यांनी बांधलेल्या असाव्यात; त्यांना जिवंत पाण्याचे झरे लागलेले असावेत किंवा दुसरीकडून पाणी सोडून ते भरलेले असावेत; अधिक पाणी वाहून जाण्यासाठी त्यांत मार्ग असावेत आणि त्यांत कमळे व मगरी असाव्यात.

५ सर्वात आतल्या बाजूच्या खंदकापासून चार दंड अंतरावर सहा दंड उंच व त्याच्या दुप्पट रुंद असा पक्का तट (खंदकांसाठी) खणलेल्या मातीने बांधून घ्यावा; तो वर निमुळता होत जाणारा आणि वर मंचासारखा सपाट पृष्ठभाग असलेला अथवा घड्यासारखा मध्ये फुगीर असावा; हत्ती व बैल यांनी तुडवून तो घट्ट केलेला असावा; बाहेरच्या बाजूवर काटेरी झुडपे, विषारी वेली ही लावलेली असावीत. ६ बाकी उरलेल्या मातीची शहराच्या सखल भागात अथवा राजप्रासाद उभारावयाच्या जागी भर घालावी. ७ तटाच्या वर रुंदीच्या दुप्पट उंची असलेली बारा हातांपासून पुढे चोवीस हातांपर्यंत कोणत्याही विषम अथवा सम संख्या असलेल्या हातांइतक्या उंचीची विटांची भिंत (वप्र) बांधून घ्यावी; तिच्यावर रथांची हालचाल होण्यासारखी असावी; ती मुळाशी तालवृक्षासारखी असावी आणि तिच्या वरच्या टोकाला मृदंग आणि माकडांची डोकी यांचे आकार ठिकठिकाणी बनलेले असावेत. ८ किंवा (विटांच्या ऐवजी) मोठमोठ्या दगडांनी रचलेली दगडी भिंत बांधून घ्यावी, पण लाकडांची भिंत कधीही करू नये. ९ कारण, त्यात अग्नी दडून राहिलेला असतो.

विष्कम्भचतुरश्रमट्टालकमुत्सेधसमावक्षेपसोपानं कारयेत् त्रिंशद्दण्डान्तरंच ।१०। द्वयोरट्टालकयोर्मध्ये सहर्म्यद्वितलामध्यर्धायामां प्रतोलीं कारयेत् ।११। अट्टालकप्रतोलीमध्ये त्रिधानुष्काधिष्ठानं सापिधानच्छिद्रफलकसंहतमिन्द्रकोशं कारयेत् ।१२। अन्तरेषु द्विहस्तविष्कम्भं पार्श्वे चतुर्गुणायामं देवपथं कारयेत् ।१३। दण्डान्तरा द्विदण्डान्तरा वा चर्याः कारयेत्, अग्राह्ये देशे प्रधावनिकां निष्किरद्वारं च ।१४।

बहिर्जानुभञ्जनीशूलप्रकरकूपकूटावपातकण्टकप्रतिसराहिपृष्ठतालपत्रशृङ्गाटकश्वदंष्ट्रार्गलोपस्कन्दनपादुकाम्बरीषोदपानकैः प्रतिच्छन्नं छन्नपथं कारयेत् ।१५।

प्राकारमुभयतो मेण्ढकमध्यर्धदण्डं कृत्वा प्रतोलीषट्तुलान्तरं द्वारं निवेशयेत् पञ्चदण्डादेकोत्तरमाष्टदण्डादिति चतुरश्रं षड्भागमायामादधिकमष्टभागंवा।१६।

१० वप्राच्या रुंदीइतकीच लांबीरुंदी असलेले बुरूज (अट्टालक) उंचीइतकेच खाली जाण्यासाठी जिने असलेले, एकमेकांपासून तीस दंड अंतरावर बांधून घ्यावेत. ११ दोन बुरुजांच्या मधोमध रुंदीच्या दीडपट लांबी असलेली, खोलीने युक्त अशी दुमजली देवडी (प्रतोली) बांधून घ्यावी. १२ प्रत्येक अट्टालक व प्रतोली यांच्या मधोमध झाकता येण्यासारखी (झडपा असलेली) छिद्रे असलेल्या लाकडी फळ्यांनी पक्के केलेले असे इंद्रकोश नावाचे तीन धनुर्धाऱ्यांसाठी लढण्याचे ठिकाण तयार करून घ्यावे. १३ मधल्या जागांवर दोन हात रुंद आणि बाजूला चौपट लांब असलेला 'देवपथ' करून घ्यावा. १४ एक दंड रुंदीच्या किंवा दोन दंड रुंदीच्या चर्या (वरखाली जाण्याचे मार्ग) कराव्यात आणि शत्रू हल्ला करून घेऊ शकणार नाही अशा ठिकाणी प्रधावनिका (तटाच्या बाहेरच्या बाजूस सैनिकांसाठी सुरक्षित मार्ग) आणि निष्किरद्वार (आतून प्रधावनिकेत येण्यासाठी भक्कम दरवाजा) ही तयार करून घ्यावीत.

१५ किल्ल्याच्या बाहेर जानुभंजनी (गुडघे फोडणारी), पुष्कळसे सूळ, खड्ड्यात पाडणारे सापळे, काटे असलेल्या तारा, अहिपृष्ठ, तालपत्र, शृंगाटक, श्वदंष्ट्र (ह्या आकारांचे लोखंडी पदार्थ), अडसर, उडी मारावयास लावणाऱ्या पादुका, तळण्याचे तवे आणि पाण्याची डबकी ही विखुरलेली आहेत असा वरून झाकलेला मार्ग तयार करून घ्यावा.

१६ भिंतीच्या दोन्ही बाजूस दीड दंड विस्ताराची, मेंढ्याच्या शृंगयुक्त डोक्याच्या आकाराची रचना करून द्वाराची योजना करावी; तेथील प्रतोलीच्या छतासाठी सहा तुळया वापरलेल्या असाव्यात; द्वारासाठी जागा पाच दंडापासून पुढे एक एक दंडाने वाढवीत आठ दंडांपर्यंत विस्ताराची चौरस अथवा लांबीच्या एकषष्ठांश भाग किंवा एकअष्टमांश भाग अधिक असलेली अशी असावी.

**पञ्चदशहस्तादेकोत्तरमाष्टादशहस्तादिति तलोत्सेधः । १७ । स्तम्भस्य परिक्षेपः षडायामो, द्विगुणो निखातः, चूलिकायाश्चतुर्भागः । १८ ।**

**आदितलस्य पञ्चभागाः शाला वापी सीमागृहं च । १९ । दशभागिकौ द्वौ प्रतिमञ्चौ, अन्तरमाणी हर्म्यं च । २० । समुच्छ्रयादर्धतले स्थूणाबन्धश्च । २१ । अर्धवास्तुकमुत्तमागारं, त्रिभागान्तरं वा, इष्टकावबद्धपार्श्वं, वामतः प्रदक्षिणसोपानं गूढभित्तिसोपानमितरतः । २२ । द्विहस्तं तोरणशिरः । २३ । त्रिपञ्चभागिकौ द्वौ कपाटयोगौ । २४ । द्वौ परिघौ । २५ । अरत्निरिन्द्रकीलः । २६ । पञ्चहस्तमाणिद्वारम् । २७ । चत्वारो हस्तिपरिघाः । २८ । निवेशार्धं हस्तिनखम् । २९ । मुखसमः संक्रमः संहार्यो भूमिमयो वा निरुदके । ३० ।**

१७ पंधरा हातापासून पुढे एक एक हाताने वाढवीत अठरा हातापर्यंत इतकी मजल्याची उंची असावी. १८ खांबाचा घेर लांबीच्या (म्हणजे त्याच्या उंचीच्या) एकषष्ठांश असावा, जमिनीत पुरलेला भाग ह्याच्या दुप्पट असावा, आणि खांबाच्या वरील टोकाचा घेर लांबीच्या एकचतुर्थांश इतका असावा.

१९ तळमजल्याच्या एकपंचमांश भागात एक दालन, एक वापी आणि एक सीमागृह असावेत. २० एकदशांश भागात समोरासमोर दोन ओटे आणि मधल्या जागेत दोन दरवाजे आणि एक खोली. २१ मजल्याच्या उंचीच्या अर्ध्या भागात खांब उभारलेले असावेत. २२ वरचा मजला वास्तूच्या प्रमाणाच्या अर्ध्याइतका किंवा एकतृतीयांश भागाइतका असून त्याच्या भिंती विटांनी बांधलेल्या असाव्यात; त्याच्यावर जाण्यासाठी डाव्या बाजूला प्रदक्षिण वळणारा जिना आणि दुसऱ्या बाजूला भिंतीत गुप्त असलेला जिना अशी व्यवस्था असावी. २३ तोरणाचे शिखर दोन हात उंचीचे असावे. २४ दरवाज्याच्या दोन कवाडांना उघडझाक करण्यासाठी जागेचा तीनपंचमांश भाग असावा. २५ दरवाज्याला दोन अडसर असावेत. २६ इंद्रकील (नावाचा, बंद केलेल्या दरवाज्यात आत जमिनीत अडकवावयाचा खिळा) एक हात उंचीचा असावा. २७ (एका कवाडात आतबाहेर जाण्यासाठी) पाच हात उंचीचे लहान दार ठेवावे. २८ (दरवाज्यावर बाहेरच्या बाजूस) हत्तींची धडक मोडून काढण्यासाठी चार (लोखंडी व अणकुचीदार) अडसर बसवावेत. २९ गड उतरून जाण्यासाठी दरवाज्याजवळील जागेच्या अर्ध्या रुंदीचा हस्तिनख नावाचा मार्ग असावा. ३० दरवाज्याइतकाच रुंद खंदकावर काढून घेता येण्यासारखा पूल असावा किंवा तेवढ्या भागात (न खणता व) पाणी न येऊ देता मातीचाच येण्याजाण्याचा मार्ग करावा.

प्राकारसमं मुखमवस्थाप्य त्रिभागगोधामुखं गोपुरं कारयेत् । ३१ । प्राकारमध्ये वापीं कृत्वा पुष्करिणीद्वारम्, चतुःशालमध्यर्धान्तरं साणिकं कुमारीपुरम्, मुण्डहर्म्यद्वितलं मुण्डकद्वारम्, भूमिद्रव्यवशेन वा निवेशयेत् । ३२ ।

त्रिभागाधिकायामा भाण्डवाहिनीः कुल्याः कारयेत् । ३३ ।

तासु पाषाणकुद्दालाः कुठारीकाण्डकल्पनाः ।
मुषुण्ढीमुद्गरा दण्डाश्चक्रयन्त्रशतघ्नयः ।। ३४ ।।
कार्याः कार्मारिकाः शूला वेधनाग्राश्च वेणवः ।
उष्ट्रग्रीव्योऽग्निसंयोगाः कुप्यकल्पे च यो विधिः ।। ३५ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे दुर्गविधानं तृतीयोऽध्यायः । आदितश्चतुर्विंशः ।

४

[द्वाविंशं प्रकरणम् – दुर्गनिवेशः]

त्रयः प्राचीना राजमार्गास्त्रय उदीचीना इति वास्तुविभागः । १ । स द्वादशद्वारो युक्तोदकभ्रमच्छन्नपथः । २ ।

३१ प्राकाराच्या रुंदीइतकीच दरवाज्याची जागा ठेवून वरील एकतृतीयांश भाग नक्राच्या मुखाच्या आकाराचे असा एक गोपुर नावाचा दरवाजा करावा. ३२ प्राकाराच्या मध्यभागी एक विहीर करून तेथे पुष्करिणीद्वार नावाचा दरवाजा करावा; चारी बाजूला खोल्या असलेले (भिंतीत शरसंधानासाठी) छिद्रे असलेले दीड दंड चौरस मधील अंगण, त्याने युक्त कुमारीपुर दरवाजा करावा; वर काही शोभा वगैरे नसलेला, केवळ दुमजली खोली असलेला मुंडकद्वार दरवाजा करावा; अथवा जमीन व द्रव्य यांच्या उपलब्धतेच्या अनुरोधाने हे सर्व करावे.

३३ रुंदीपेक्षा एकतृतीयांश अधिक लांब असलेल्या शस्त्रसामुग्री ठेवण्यासाठी चऱ्या कराव्यात.

३४-३५ त्यांमध्ये धोंडे, कुदळी, कुऱ्हाडी, बाण, कोयते, गदा, हातोडे, दंडे, चाके, यंत्र, शतघ्नी, लोहाराने बनविलेले सूळ, अणकुचीदार टोके असलेले बांबू, उंटाच्या मानेच्या आकाराची भांडी, आग लावणारे पदार्थ आणि जंगलात उत्पन्न होणाऱ्या म्हणून ज्या वस्तू सांगितल्या आहेत त्या – हे सर्व साठवून ठेवावे.

## चौथा अध्याय

### प्रकरण २२ : किल्ल्यातील नगराची रचना

१ तीन पश्चिमेकडून पूर्वेकडे जाणारे राजमार्ग आणि तीन दक्षिणेकडून उत्तरकडे जाणारे याप्रमाणे दुर्गातील नगराच्या वस्तीची विभागणी करावी.

चतुर्दण्डान्तरा रथ्याः । ३ । राजमार्गद्रोणमुखस्थानीयराष्ट्रविवीतपथाः संयानीयव्यूहश्मशानग्रामपथाश्चाष्टदण्डाः । ४ । चतुर्दण्डः सेतुवनपथः, द्विदण्डो हस्तिक्षेत्रपथः, पञ्चारत्नयो रथपथः, चत्वारः पशुपथः, द्वौ क्षुद्रपशुमनुष्यपथः । ५ ।

प्रवीरे वास्तुनि राजनिवेशश्चातुर्वर्ण्यसमाजीवे । ६ । वास्तुहृदयादुत्तरे नवभागे यथोक्तविधानमन्तःपुरं प्राङ्मुखमुदङ्मुखं वा कारयेत् । ७ ।

तस्य पूर्वोत्तरं भागमाचार्यपुरोहितेज्यातोयस्थानं मन्त्रिणश्चावसेयुः, पूर्वदक्षिणं भागं महानसं हस्तिशाला कोष्ठागारं च । ८ । ततः परं गन्धमाल्यरसपण्याः प्रसाधनकारवः क्षत्रियाश्च पूर्वां दिशमधिवसेयुः । ९ ।

दक्षिणपूर्वं भागं भाण्डागारमक्षपटलं कर्मनिषद्याश्च, दक्षिणपश्चिमं भागं कुप्यगृहमायुधागारं च । १० । ततः परं नगरधान्यव्यावहारिककार्मान्तिक-

२ त्या नगराला बारा दरवाजे असावेत आणि त्यात चांगले पिण्याचे पाणी, पाणी बाहेर वाहून नेण्यासाठी पाट आणि छुपे रस्ते असावेत.

३ सामान्य रस्ते चार दंड रुंद असावेत. ४ राजमार्ग, तसेच द्रोणमुख, स्थानीय, ग्रामीण प्रदेश आणि गुरचराईच्या जागा यांना जाणारे मार्ग, आणि बंदरे, व्यूह, स्मशान व गाव यांना जाणारे मार्ग आठ दंड रुंद असावेत. ५ सेतूवरील आणि वनातील मार्ग चार दंड रुंद, हत्तींसाठी असलेले आणि शेतांच्या बाजूचे मार्ग दोन दंड रुंद, रथासाठी मार्ग पाच हात रुंद, गुरांसाठी मार्ग चार हात रुंद आणि लहान जनावरे व मनुष्ये यांच्यासाठी मार्ग दोन हात रुंद याप्रमाणे असावेत.

६ जेथे चारी वर्णांचे लोक रहाणे शक्य आहे अशा सर्वोत्कृष्ट जागी राजाचे निवासस्थान बांधावे. ७ नगरातील वस्तीच्या मध्यभागाच्या उत्तरेकडील एक-नवमांश भागात मागे (अध्याय १.२० मध्ये) सांगितलेल्या पद्धतीने पूर्वाभिमुख अथवा उत्तराभिमुख असा राजवाडा बांधावा.

८ राजवाड्याच्या पूर्वेस उत्तरेच्या बाजूला आचार्य आणि पुरोहित यांचे निवासस्थान, यज्ञशाला व जलागार, आणि मंत्र्यांचे निवासस्थान ही असावीत; पूर्वेस दक्षिणेच्या बाजूला पाकशाळा, हस्तिशाळा आणि कोठार ही असावीत. ९ त्याच्या पलीकडे सुगंधी द्रव्ये, फुले आणि रस यांचे व्यापारी, प्रसाधने तयार करणारे कारागीर आणि क्षत्रिय यांची वस्ती पूर्व दिशेला असावी.

१० राजवाड्याच्या दक्षिणेस पूर्वेकडील भागात भांडार, हिशोबतपासनिसाचे कार्यालय आणि सेवकांच्या रहाण्याच्या जागा ही असावीत; दक्षिणेच्या पश्चिम

**बलाध्यक्षाः पक्वान्नसुरामांसपण्या रूपाजीवास्तालावचरा वैश्याश्च दक्षिणां दिशमधिवसेयुः । ११ ।**

**पश्चिमदक्षिणं भागं खरोष्ट्रगुप्तिस्थानं कर्मगृहं च, पश्चिमोत्तरं भागं यानरथशालाः । १२ । ततः परम् ऊर्णासूत्रवेणुचर्मवर्मशस्त्रावरणकारवः शूद्राश्च पश्चिमां दिशमधिवसेयुः । १३ ।**

**उत्तरपश्चिमं भागं पण्यभैषज्यगृहम्, उत्तरपूर्वं भागं कोशो गवाश्वं च । १४ । ततः परं नगरराजदेवतालोहमणिकारवो ब्राह्मणाश्चोत्तरां दिशमधिवसेयुः । १५ ।**

**वास्तुच्छिद्रानुसालेषु श्रेणीप्रपणिनिकाया आवसेयुः । १६ ।**

**अपराजिताप्रतिहतजयन्तवैजयन्तकोष्ठान् शिववैश्रवणाश्विश्रीमदिरागृहाणि च पुरमध्ये कारयेत् । १७ । यथोद्देशं वास्तुदेवताः स्थापयेत् । १८ । ब्राह्मैन्द्रयाम्य-**

भागात जंगलांतील उत्पन्नासाठी कोठार व आयुधागार ही असावीत. ११ त्याच्या पलीकडे शहरातील धान्याचे व्यापारी, कारखान्यांवरील अधिकारी, सेनेतील अधिकारी, तयार अन्न, मद्य व मांस विकणारे, वेश्या आणि नर्तक, तसेच वैश्य यांची वस्ती दक्षिण दिशेला असावी.

१२ राजवाड्याच्या पश्चिमेस दक्षिणेकडील भागात गाढव व उंट यांचे गोठे आणि कारखाना ही असावीत; पश्चिमेच्या उत्तर भागात गाड्या व रथ यांसाठी तबेले असावेत. १३ त्याच्या पलिकडे लोकर व सूत तयार करून विणणारे, बुरूड, चामड्याचे काम करणारे, चिलखते, शस्त्रे आणि शिरस्त्राणादी आवरणे तयार करणारे कारागीर, तसेच शूद्र यांची वस्ती पश्चिम दिशेला असावी.

१४ राजवाड्याच्या उत्तरेस पश्चिमेकडील भागात पण्यगृह आणि औषधागार असावेत; उत्तरेच्या पूर्वेकडील भागात कोशगृह, गोशाळा व अश्वशाळा ही असावीत. १५ त्याच्या पलीकडे नगरदेवता, राजाची कुलदेवता यांची मंदिरे, धातू व रत्ने यांच्यापासून वस्तू बनविणारे कारागीर, तसेच ब्राह्मण यांची वस्ती उत्तर दिशेला असावी.

१६ वस्ती नसलेल्या भागात तटाच्या बाजूला श्रेणी आणि परदेशी व्यापारी यांचे संघ रहावेत.

१७ नगराच्या मध्यभागी अपराजित, अप्रतिहत, जयंत आणि वैजयंत यांच्या कोठ्या तसेच शिव, वैश्रवण (कुबेर), अश्विनीकुमार, श्री (लक्ष्मी) आणि मदिरा (दुर्गा) यांची मंदिरे बांधावीत. १८ वास्तुदेवतांची त्यांच्या त्यांच्या जागी स्थापना करावी. १९ चार मुख्य दरवाज्यांवर ब्रह्मा, इंद्र, यम आणि

सैनापत्यानि द्वाराणि । १९ । बहिः परिखाया धनुःशतापकृष्टाश्चैत्यपुण्यस्थानवनसेतुबन्धाः कार्याः, यथादिशं च दिग्देवताः । २० ।

उत्तरः पूर्वो वा श्मशानभागो वर्णोत्तमानाम्, दक्षिणेन श्मशानं वर्णावराणाम् । २१ । तस्यातिक्रमे पूर्वः साहसदण्डः । २२ ।

पाषण्डचण्डालानां श्मशानान्ते वासः । २३ ।

कर्मान्तक्षेत्रवशेन कुटुम्बिनां सीमानं स्थापयेत् । २४ । तेषु पुष्पफलवाटान् धान्यपण्यनिचयांश्चानुज्ञाताः कुर्युः । २५ । दशकुलीवाटं कूपस्थानम् । २६ ।

सर्वस्नेहधान्यक्षारलवणगन्धभैषज्यशुष्कशाकयवसवल्लूरतृणकाष्ठलोहचर्माङ्गारस्नायुविषविषाणवेणवल्कलसारदारुप्रहरणावरणाश्मनिचयाननेकवर्षोपभोगसहान् कारयेत् । २७ । नवेनानवं शोधयेत् । २८ ।

हस्त्यश्वरथपादातमनेकमुख्यमवस्थापयेत् । २९ । अनेकमुख्यं हि परस्परभयात्परोपजापं नोपैति । ३० ।

सेनापति (स्कंद) यांची स्थापना करावी. २० शहराच्या बाहेर खंदकापासून शंभर दंड दूर अंतरावर चैत्यगृह, पुण्यस्थान, उपवन, सेतुबंध (तलाव) करावेत आणि दिशांच्या देवतांची मंदिरे त्या त्या दिशांना करावीत.

२१ स्मशानाचा उत्तरेकडील किंवा पूर्वेकडील भाग ब्राह्मणांसाठी असावा; खालच्या वर्णांसाठी स्मशान दक्षिणेला असावे. २२ त्याचे अतिक्रमण केल्यास प्रथम साहसदंड (४८ ते ९६ पण) करावा.

२३ पाखंडी आणि चांडाल यांची वस्ती स्मशानाच्या बाजूला असावी.

२४ व्यवसायाला आवश्यक असलेल्या जागेच्या अनुरोधाने कुटुंबांना जागेच्या हद्दी ठरवून द्याव्यात. २५ त्यात त्यांनी परवानगी घेऊन फुलबागा व फळबागा तसेच धान्य व इतर उपयुक्त वस्तू यांचा साठा करावा. २६ दहा दहा कुटुंबांच्या समूहासाठी एकेक विहीर असावी.

२७ सर्व तऱ्हेचे (तेल, तूप वगैरे) स्निग्ध पदार्थ, धान्य, (गूळ, साखर वगैरे) क्षार, मीठ, सुगंधी द्रव्ये, औषधे, सुकविलेल्या भाज्या, जनावरांचे खाद्य सुकविलेले मांस, गवत, लाकडे, धातू, कातडी, कोळसे, (प्राण्यांचे) स्नायू, विष, शिंगे, बांबू, वल्कले, इमारती लाकूड, शस्त्रे व चिलखते आणि पाषाण यांचे अनेक वर्षे पुरतील असे साठे करून ठेवावेत. २८ नवीन माल जसजसा हाती येईल तसतसा जुना माल काढून टाकावा.

२९ हत्ती, घोडे, रथ आणि पायदळ एकाहून अधिक अधिकाऱ्यांच्या अमलाखाली नगरात ठेवावेत. ३० कारण, अनेक अधिकारी असले म्हणजे ते एकमेकाच्या भीतीने शत्रूमार्फत केलेल्या फितुरीच्या प्रोत्साहनाला बळी पडत नाहीत.

एतेनान्तपालदुर्गसंस्कारा व्याख्याता. । ३१ ।

न च बाहिरिकान्कुर्यात् पुरे राष्ट्रोपघातकान् ।
क्षिपेज्जनपदे चैतान् सर्वान्वा दापयेत्करान् ।। ३२ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे दुर्गनिवेशश्चतुर्थोऽध्यायः । आदितः पञ्चविंशः ।

५

## [ त्रयोविंशं प्रकरणम् – संनिधातृनिचयकर्म ]

संनिधाता कोशगृहं पण्यगृहं कोष्ठागारं कुप्यगृहमायुधागारं बन्धनागारं च कारयेत् । १ ।

चतुरश्रां वापीमनुदकोपस्नेहां खानयित्वा पृथुशिलाभिरुभयतः पार्श्वं मूलं च प्रचित्य सारदारुपञ्जरं भूमिसमं त्रितलमनेकविधानं कुट्टिमदेशस्थानतलमेकद्वारं यन्त्रयुक्तसोपानं भूमिगृहं कारयेत् । २ । तस्योपर्युभयतोनिषेधं सप्रग्रीवमैष्टकं

३१ याचप्रमाणे सरहद्दीवरील दुर्गांची रचना, दुरुस्ती वगैरे करावी.

३२ आणि राष्ट्राचा घात करणाऱ्या बाहेरच्या टोळयांना नगरात वास करू देऊ नये. त्यांना जनपदात हुसकून लावावे अथवा इतरांप्रमाणे सर्व प्रकारचे कर देण्यास भाग पाडावे.

### पाचवा अध्याय

### प्रकरण २३ : संनिधात्याचे साठे करावयाचे कार्य

१ संनिधात्याने कोशगृह (खजिना), पण्यगृह (विक्रेय वस्तूंचे भांडार), कोष्ठागार (धान्यादीचे कोठार), कुप्यगृह (जंगलातील मालाचे कोठार), शस्त्रागार आणि बंधनागार ही बांधून घ्यावीत.

२ जिच्यात पाणी किंवा ओल लागणार नाही अशी एक चौकोनी विहीर खोदून घ्यावी, तिच्या बाजू आणि तळ दोन्ही मोठ्या फरशांनी बांधून घ्याव्यात, तिच्यात जमिनीच्या सपाटीपर्यंत भक्कम लाकडांच्या पिंजऱ्याप्रमाणे असलेले एक तीन मजली तळघर बांधून घ्यावे, त्यात अनेक प्रकारची व्यवस्था असावी, त्याच्या तिन्ही मजल्यांवर फरशी बसविलेली असावी, त्यात प्रवेशासाठी एकच दार असावे आणि आतील जिना यंत्राने सोडघाल करता येण्यासारखा असावा. ३ त्या तळघराच्या वर दोन बाजूनी प्रवेश निषिद्ध असलेले, सभोवार लाकडी कुंपण असलेले, सभोवती हत्यारे ठेवण्यासाठी चऱ्या असलेले असे कोशगृह

भाण्डवाहिनीपरिक्षिप्तं कोशगृहं कारयेत. प्रासादं वा । ३ । जनपदान्ते ध्रुवनिधिमापदर्थमभित्यक्तैः कारयेत् । ४ ।

पक्वेष्टकास्तम्भं चतुःशालमेकद्वारमनेकस्थानतलं विवृतस्तम्भापसारमुभयतः पण्यगृहं कोष्ठागारं च, दीर्घबहुशालं कक्ष्यावृतकुडयम् अन्तः कुप्यगृहम्, तदेव भूमिगृहयुक्तमायुधागारम्, पृथग्धर्मस्थीयं महामात्रीयं विभक्तस्त्रीपुरुषस्थानमपसारतः सुगुप्तकक्ष्यं बन्धनागारं कारयेत् । ५ ।

सर्वेषां शालाः खातोदपानवर्चस्नानगृहाग्निविषत्राणमार्जारनकुलारक्षास्वदैवतपूजनयुक्ताः कारयेत् । ६ ।

कोष्ठागारे वर्षमानमरत्निमुखं कुण्डं स्थापयेत् । ७ ।

विटांनी बांधून घ्यावे, किंवा (तळघराशिवायच) कोशगृह म्हणून एक प्रासाद बांधून घ्यावा. ४ जनपदाच्या सरहद्दीवर संकटकाळी उपयोगी पडावा म्हणून एक कायमचा निधी वधाची शिक्षा झालेल्या गुन्हेगारांकडून गुप्त जागी ठेवून घ्यावा.

५ पक्क्या विटांचे खांब असलेले, चारी बाजूला खोल्या व मध्ये अंगण असलेले, एकच प्रवेशद्वार असलेले, अनेक मजले असलेले, पोकळ खांबातून पळून जाण्याची सोय असलेले, एका बाजूला पण्यगृह आणि दुसऱ्या बाजूला कोष्ठागार, व त्या दोहोंच्या मध्ये लांब व पुष्कळ मोठी दालने असलेले व त्या दालनांच्या भिंतींना लागून लहान खोल्या असलेले कुप्यगृह बांधून घ्यावे. त्या कुप्यगृहासारखे, परंतु तळघराने युक्त आयुधागार बांधून घ्यावे. न्यायाधिशांनी शिक्षा केलेल्यांसाठी आणि मोठ्या अधिकाऱ्यांनी शिक्षा केलेल्यांसाठी वेगवेगळी बंधनागारे, स्त्रिया व पुरुष यांच्या स्वतंत्र जागा असलेली आणि ज्यातून पळून जाता येणार नाही अशा खोल्या असलेली अशी बांधून घ्यावीत.

६ ह्या सर्व आगारांत (भोवती) गटारे, (आत) पिण्याचे पाणी, शौचकूप, स्नानगृह, अग्नि व विष यांपासून रक्षणाची व्यवस्था, मांजरे आणि मुंगूस यांनी केलेले रक्षण यांनी युक्त, तसेच त्या त्या आगाराच्या विशिष्ट देवतेच्या (कोशगृहाची वैश्रवण, कोष्ठागाराची सीता, पण्यगृहाची श्री, कुप्यगृहाची ईशान, आयुधागाराची स्कंद, बंधनागारांच्या यम व वरुण) पूजनाची व्यवस्था असलेल्या खोल्या असाव्यात.

७ कोष्ठागारात एक हात चौरस तोंड असलेले पाऊस मोजण्याचे कुंड ठेवावे.

तज्जातकरणाधिष्ठितः पुराणं नवं च रत्नं सारं फल्गु कुप्यं वा प्रतिगृह्णीयात् । ८ । तत्र रत्नोपधावुत्तमो दण्डः कर्तुः कारयितुश्च, सारोपधौ मध्यमः फल्गुकुप्योपधौ तच्च तावच्च दण्डः । ९ ।

रूपदर्शकविशुद्धं हिरण्यं प्रतिगृह्णीयात् । १० । अशुद्धं छेदयेत् । ११ । आहर्तुः पूर्वः साहसदण्डः । १२ ।

शुद्धं पूर्णमभिनवं च धान्यं प्रतिगृह्णीयात् । १३ । विपर्यये मूल्यद्विगुणो दण्डः । १४ ।

तेन पण्यं कुप्यमायुधं च व्याख्यातम् । १५ ।

सर्वाधिकरणेषु युक्तोपयुक्ततत्पुरुषाणां पणद्विपणचतुष्पणपरमापहारेषु पूर्वमध्यमोत्तमवधा दण्डाः । १६ । कोशाधिष्ठितस्य कोशावच्छेदे घातः । १७ । तद्वैयावृत्यकराणामर्धदण्डाः । १८ । परिभाषणमविज्ञाते । १९ ।

८ निरनिराळ्या वस्तूंच्या संबंधात तज्ज्ञ असलेल्या मनुष्यांच्या साह्याने संनिधात्याने जुनी व नवी रत्ने, भारी मौल्यवान पदार्थ, कमी मौल्यवान पदार्थ आणि जंगलातील माल ही (त्या त्या आगारात संग्रह करण्यासाठी) घ्यावीत. ९ त्यांपैकी रत्नांच्या बाबतीत फसवणूक झाल्यास ती करणाऱ्याला व करविणाऱ्याला उत्तम साहसदंड (५०० ते १,००० पण) करावा, भारी किमतीच्या पदार्थांच्या बाबतीत मध्यम साहसदंड (२०० ते ५०० पण) करावा, कमी किमतीचे पदार्थ व जंगलांतील माल यांच्या बाबतीत त्या पदार्थाची किंमत अधिक तितकेच पण इतका दंड करावा.

१० नाणी पारखणाऱ्या अधिकाऱ्याने शुद्ध ठरविलेले द्रव्यच स्वीकारावे. ११ खोटे नाणे तोडून टाकावे. १२ ते आणणाऱ्यास प्रथम साहसदंड (४८ ते ९६ पण) दंड करावा.

१३ स्वच्छ केलेले, बरोबर माप असलेले आणि नवीन असेच धान्य स्वीकारावे. १४ ह्याच्या उलट असलेले धान्य आणल्यास त्याच्या किमतीच्या दुप्पट दंड करावा.

१५ पण्य, कुप्य आणि आयुधे यांच्या बाबतीतही हाच न्याय लावावा.

१६ सर्व संग्रहस्थानांमध्ये मोठे अधिकारी, दुय्यम अधिकारी आणि खालचे नोकर यांनी एक पण, दोन पण, चार पण आणि त्यावरील किमतीच्या वस्तूचा अपहार केल्यास अनुक्रमे पूर्व साहसदंड, मध्यम साहसदंड, उत्तम साहसदंड आणि वध अशा शिक्षा कराव्यात. १७ कोशगृहातील अधिकाऱ्याने कोशातून अपहार केल्यास वधाची शिक्षा करावी. १८ त्याच्या मदतनिसांना अर्धे दंड करावेत. १९ जर त्यांना त्याविषयी काही माहीत नसेल तर फक्त ताकीद द्यावी.

**चोराणामभिप्रधर्षणे चित्रो घातः । २० ।**

**तस्मादाप्तपुरुषाधिष्ठितः संनिधाता निचयाननुतिष्ठेत् । २१ ।**

**बाह्यमाभ्यन्तरं चायं विद्याद्वर्षशतादपि ।**
**यथा पृष्टो न सज्जेत व्यये शेषे च संचये ।। २२ ।।**

**इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे संनिधातृनिचयकर्म पञ्चमोऽध्यायः । आदितः षड्विंशः ।**

## ६

## [ चतुर्विंशं प्रकरणम् – समाहर्तृसमुदयप्रस्थापनम् ]

**समाहर्ता दुर्गं राष्ट्रं खनिं सेतुं वनं व्रजं वणिक्पथं चावेक्षेत । १ ।**

**शुल्कं दण्डः पौतवं नागरिको लक्षणाध्यक्षो मुद्राध्यक्षः सुरा सूना सूत्रं तैलं घृतं क्षारः सौवर्णिकः पण्यसंस्था वेश्या द्यूतं वास्तुकं कारुशिल्पिगणो देवताध्यक्षो द्वारबाहिरिकादेयं च दुर्गम् । २ ।**

२० कोशगृह फोडून चोरी करणाऱ्यांना हाल करून वधाची शिक्षा द्यावी.

२१ म्हणून संनिधात्याने विश्वासू माणसे हाताखाली घेऊन हे सर्व साठे करावेत.

२२ त्याला बाहेरून (जनपदातून) येणाऱ्या आणि (नगराच्या) आतून प्राप्त होणाऱ्या उत्पन्नाची शंभर वर्षांपासूनची पूर्ण माहिती असली पाहिजे, ज्यायोगे खर्च, शिल्लक व साठा याबद्दल विचारले असता तो अडखळणार नाही.

## सहावा अध्याय

## प्रकरण २४ : समाहर्त्याने ठरवावयाचे एकूण उत्पन्न

१ समाहर्त्याने दुर्ग, राष्ट्र, खाणी, सेतू, जंगले, जनावरांचे कळप आणि व्यापारी मार्ग यांपासून मिळणारे उत्पन्न विचारात घ्यावे.

२ जकात, दंड, वजने व मापे (यांच्यापासूनचे उत्पन्न), नागरिक (याच्या दंडांच्या द्वारा मिळणारे उत्पन्न), नाणी पाडणारा अध्यक्ष, मुद्रा देणारा अध्यक्ष, सुराध्यक्ष, सूनाध्यक्ष आणि सूत्राध्यक्ष (यांच्या उद्योगाचे फलरूप उत्पन्न), तेल, तूप व गुळादी क्षार (यांच्या विक्रीचे उत्पन्न), (सरकारी) सुवर्णकार, बाजारपेठा, वेश्या, जुगार, गृहादी वास्तू, विविध प्रकारचे कारागीर आणि कलाकार, देवताध्यक्ष आणि दरवाज्यावर व बाहेरच्या लोकांपासून घ्यावयाचा कर – ह्या सर्व उत्पन्नाच्या बाबी 'दुर्ग' ह्या सदरात मोडतात.

**सीता भागो बलिः करो वणिक् नदीपालस्तरो नावः पत्तनं विवीतं वर्तनी रज्जुश्चोररज्जुश्च राष्ट्रम् । ३ ।**

**सुवर्णरजतवज्रमणिमुक्ताप्रवालशङ्खलोहलवणभूमिप्रस्तररसधातवः खनिः । ४ ।**

**पुष्पफलवाटषण्डकेदारमूलवापाः सेतुः । ५ ।**

**पशुमृगद्रव्यहस्तिवनपरिग्रहो वनम् । ६ ।**

**गोमहिषमजाविकं खरोष्ट्रमश्वाश्वतरं च व्रजः । ७ ।**

**स्थलपथो वारिपथश्च वणिक्पथः । ८ । इत्यायशरीरम् । ९ ।**

**मूल्यं भागो व्याजी परिघः क्लृप्तं रूपिकमत्ययश्चायमुखम् । १० ।**

३ सरकारी शेतीचे उत्पन्न, खाजगी शेतीच्या उत्पन्नाचा हिस्सा, खंडणी, कर, व्यापाऱ्यांवरील कर, नदीरक्षक, तरी (यांच्यापासून मिळणारे उत्पन्न), नावा (त्यांचे भाडे), बंदरे, कुरणे (यांपासून उत्पन्न), वर्तनी (तांडयांच्या सुरक्षिततेबद्दल आकारणी), रज्जु (जमिनीच्या मोजमापासाठी आकारणी) आणि चोररज्जु (चोरीचा तपास लावल्याबद्दल बिदागी) – ह्या उत्पन्नाच्या बाबी 'राष्ट्र' ह्या सदरात मोडतात.

४ सोने, रुपे, हिरे, रत्ने, मोती, पोवळे, शंख, (इतर) धातू, लवण आणि भूमीत, दगडात व प्रवाही पदार्थांत आढळणारे धातू 'खनि' ह्या सदरात मोडतात.

५ फुलबागा, फळबागा, भाज्यांचे मळे, पानथळ जमिनीतील लागवड आणि मूळ लावून केलेली लागवड – हे उत्पन्न 'सेतु' ह्या सदरात मोडते.

६ पशूसाठी अरण्य, मृगारण्य, द्रव्यवन व हस्तिवन (अध्याय २.२) हे 'वन' ह्या सदरात मोडतात.

७ गाई-म्हशी, शेळ्या-मेंढ्या, गाढव-उंट, घोडे-खेचरे हे 'व्रज' ह्या सदरात मोडतात.

८ खुष्कीचा मार्ग व जलमार्ग हे 'वणिक्पथ' होत. ९ ह्या सर्व बाबी मिळून उत्पन्नाचे शरीर बनते.

१० मालाची किंमत, उत्पादनातील हिस्सा, पूरक आकारणी, एकाधिकारामुळे बसविलेला कर, ठरवून दिलेली आकारणी, घडणावळ आणि अपराधाबद्दल दंड ही उत्पन्नाची मुख्य सदरे होत.

**देवपितृपूजादानार्थं, स्वस्तिवाचनम्, अन्तःपुरं, महानसं, दूतप्रावर्तिमं, कोष्ठागारम्, आयुधागारं, पण्यगृहं, कुप्यगृहं, कर्मान्तो, विष्टिः, पत्त्यश्वरथद्विपपरिग्रहो, गोमण्डलं, पशुमृगपक्षिव्यालवाटाः, काष्ठतृणवाटाश्चेति व्ययशरीरम् । ११ ।**

**राजवर्षं मासः पक्षो दिवसश्च व्युष्टं, वर्षाहेमन्तग्रीष्माणां तृतीयसप्तमा दिवसोनाः पक्षाः शेषाः पूर्णाः, पृथगधिमासकः, इति कालः । १२ ।**

**करणीयं सिद्धं शेषमायव्ययौ नीवी च । १३ ।**

**संस्थानं प्रचारः शरीरावस्थापनम् आदानं सर्वसमुदयपिण्डः संजातम् – एतत्करणीयम् । १४ ।**

**कोशार्पितं राजहारः पुरव्ययश्च प्रविष्टं परमसंवत्सरानुवृत्तं शासनमुक्तं मुखाज्ञप्तं चापातनीयम् – एतत्सिद्धम् । १५ ।**

११ देवपूजा, पितृपूजा आणि दानधर्म यांसाठी होणारा, स्वस्तिवाचन, राजवाडा, पाकशाळा यांवर होणारा, दूताची पाठवणी, कोठार, शस्त्रागार, पण्यगृह, कुप्यगृह, कारखाने, मजूर यांवर होणारा, पायदळ, घोडे, रथ आणि हत्ती यांचे संगोपन, जनावरांचे कळप, पशू, मृग, पक्षी आणि जंगली जनावरे यांच्या राखीव जागा यांवर होणारा, आणि लाकडे व गवत यांचे साठे यांवर होणारा खर्च – हे सर्व खर्च मिळून खर्चाचे शरीर बनते.

१२ राजाच्या राज्याचे चालू वर्ष, महिना, पक्ष आणि दिवस याप्रमाणे तारखेची नोंद; वर्षा, हेमन्त आणि ग्रीष्म ह्या ऋतूंतील तिसरे व सातवे पक्ष एक दिवसाने कमी, बाकीचे पूर्ण पंधरा दिवसांचे; अधिक मास स्वतंत्र – याप्रमाणे हिशोब ठेवण्यासाठी काळ समजावा.

१३ करणीय (उत्पन्नाचा अंदाज), सिद्ध (वसूल झालेले उत्पन्न), शेष (वसूल व्हावयाचे असलेले उत्पन्न), जमा, खर्च आणि शिल्लक (ह्या हिशोबाच्या बाबी होत.)

१४ (कामाचे) ठिकाण, खाते, उत्पन्नाचे शरीर ठरविणे, अपेक्षित (असलेला) भरणा, सर्व उत्पन्नांची (दुर्ग, राष्ट्र इत्यादी अथवा मूल्य, भाग इत्यादी सदरांखाली) बेरीज आणि सर्व मिळून एकूण उत्पन्न – हे करणीय.

१५ कोशात भरणा केलेले, राजाने परस्पर उचललेले आणि अंतःपुरावरील खर्च हे सर्व वसूल झालेले उत्पन्न; मागच्या सालावरून पुढे ओढलेले – लेखी शासनाने तशी सूट दिलेले अथवा तोंडी तशी आज्ञा दिलेले – परंतु सोडावयाचे नसलेले – हे सिद्ध उत्पन्न.

सिद्धिकर्मयोगः दण्डशेषमाहरणीयं बलात्कृतप्रतिष्टब्धमवमृष्टं च प्रशोध्यम् – एतच्छेषम्, असारमल्पसारं च । १६ ।

वर्तमानः पर्युषितोऽन्यजातश्चायः । १७ । दिवसानुवृत्तो वर्तमानः । १८ । परमसांवत्सरिकः परप्रचारसंक्रान्तो वा पर्युषितः । १९ । नष्टप्रस्मृतम् आयुक्तदण्डः पार्श्वं पारिहीणिकम् औपायनिकं डमरगतकस्वम् अपुत्रकं निधिश्चान्यजातः । २० । विक्षेपव्याधितान्तरारम्भशेषं च व्ययप्रत्यायः । २१ । विक्रये पण्यानामर्घवृद्धिरुपजा, मानोन्मानविशेषो व्याजी, क्रयसंघर्षे वार्धवृद्धिः – इत्यायः । २२ ।

नित्यो नित्योत्पादिको लाभो लाभोत्पादिक इति व्ययः । २३ । दिवसानुवृत्तो नित्यः । २४ । पक्षमाससंवत्सरलाभो लाभः । २५ । तयोरुत्पन्नो नित्योत्पादिको लाभोत्पादिक इति व्ययः । २६ ।

१६ पूर्ण झालेल्या कामाचे यावयाचे असलेले उत्पन्न, दंडाची राहिलेली बाकी – हे वसूल व्हावयाचे असलेले, आणि बळजबरीने रोखून ठेवलेले व गडप केलेले – हे शोध घ्यावयाचे असलेले – याप्रमाणे दोन प्रकारचे अवशिष्ट असलेले, मौल्यवान नसलेले आणि कमी मूल्याचे.

१७ चालू, मागील शिलकी आणि आकस्मिक होणारी अशी तीन प्रकारची जमा. १८ दिवसानुदिवस होणारी म्हणजे चालू जमा. १९ मागील वर्षाची येणे असलेली अथवा दुसऱ्या खात्यातून बदलून आलेली ती शिलकी जमा. २० हरवलेल्या आणि विस्मरणाने राहिलेल्या (प्रजेच्या) वस्तू, सरकारी नोकरांना केलेला दंड, अधिक आलेले उत्पन्न, नुकसानीची भरपाई, नजराणे, बंडात सामील झालेल्यांची मालमत्ता, वारसा नसलेल्याची मालमत्ता आणि जमिनीत पुरलेले धन – ही सर्व आकस्मिक रीत्या होणारी जमा. २१ सैन्याचे विसर्जन आणि आजारीपणामुळे काम अर्धवट होणे अशी (दोन प्रकारे) खर्चात होणारी बचत. २२ विक्रीच्या वेळेस मालाच्या किमतीत होणारी वाढ ही उपजा, वजने व मापे यांतील वाढ ही व्याजी, अथवा लिलावात चढाओढीमुळे होणारी किमतीत वाढ – हे सर्व जमेचे प्रकार.

२३ नित्य, नित्यातून उत्पन्न होणारा, लाभ आणि लाभातून उत्पन्न होणारा असा चार प्रकारचा खर्च. २४ दिवसानुदिवस होणारा तो नित्य खर्च. २५ पंधरवडा, महिना किंवा वर्ष यानंतर करावयाचा असलेला खर्च तो लाभ. २६ त्या दोहोंच्या अनुषंगाने होणारे खर्च नित्योत्पादिक आणि लाभोत्पादिक खर्च – हे खर्चाचे प्रकार.

**संजातादायव्ययविशुद्धा नीवी, प्राप्ता चानुवृत्ता च । २७ ।**

**एवं कुर्यात्समुदयं वृद्धिं चायस्य दर्शयेत् ।**

**ह्रासं व्ययस्य च प्राज्ञः साधयेच्च विपर्ययम् ।। २८ ।।**

**इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे समाहर्तृसमुदयप्रस्थापनं षष्ठोऽध्यायः । आदितः सप्तविंशः ।**

**७**

## [ पञ्चविंशं प्रकरणम् – अक्षपटले गाणनिक्याधिकारः ]

**अक्षपटलमध्यक्षः प्राङ्मुखमुदङ्मुखं वा विभक्तोपस्थानं निबन्धपुस्तकस्थानं कारयेत् । १ ।**

**तत्राधिकरणानां संख्याप्रचारसंजाताग्रं, कर्मान्तानां द्रव्यप्रयोगवृद्धिक्षयव्ययप्रयामव्याजीयोगस्थानवेतनविष्टिप्रमाणं, रत्नसारफल्गुकुप्यानामर्घप्रतिवर्णकमानप्रतिमानोन्मानावमानभाण्डं, देशग्रामजातिकुलसंघानां धर्मव्यवहारचरित्र-**

२७ उत्पन्नातून जमा व खर्च यांचा हिशोब करून शिल्लक राहिलेली ती नीवी – वसूल झालेली आणि पुढे नेलेली (वसूल व्हावयाची असलेली) अशी दोन प्रकारची.

२८ याप्रमाणे बुद्धिमान समाहर्त्याने एकंदर उत्पन्न ठरवावे; त्याने जमेत वाढ होत असलेली दाखवावी व खर्च कमी होत असलेला दाखवावा. याच्या उलट होत असेल तर त्यावर त्याने समुचित उपाययोजना करावी.

## सातवा अध्याय

### प्रकरण २५ : हिशोबतपासनीसाच्या कार्यालयातील हिशोबतपासणी

१ अक्षपटलावरील मुख्य अधिकाऱ्याने निरनिराळी स्वतंत्र दालने असलेले पूर्वाभिमुख अथवा उत्तराभिमुख असे सरकारी कागदपत्रांचा संग्रह करण्याचे स्थान म्हणून अक्षपटल (तपासनीसाचे दप्तर) करून घ्यावे.

२ त्या ठिकाणी निरनिराळ्या खात्यांच्या संबंधात त्यांची संख्या, कामकाज आणि एकूण उत्पन्न; कारखान्यांच्या कच्च्या मालात उत्पादनाच्या वेळी होणारी वाढ अथवा ऱ्हास, खर्च, कारखान्याची वाढ, अधिक आकारणी, उत्पादनासाठी द्रव्यांचे मिश्रण, ठिकाण, वेतन व मजूर यांचे प्रमाण; रत्ने, भारी किमतीचे पदार्थ, अल्प किमतीचे पदार्थ आणि जंगलांतील उत्पन्न यांच्या संबंधात त्यांची किमत, प्रत, वजन, माप, उंची, खोली आणि त्यांपासून बनलेले पदार्थ; देश, गाव, जात, कुटुंब आणि संघ यांच्या संबंधात त्यांचे धर्म, आपसातील व्यवहार, परंपरागत आचार आणि सरकारी नियम; राजाच्या नोकरांच्या संबंधात त्यांना मिळालेली

संस्थानं, राजोपजीविनां प्रग्रहप्रदेशभोगपरिहारभक्तवेतनलाभं, राज्ञश्च पत्नीपुत्राणां रत्नभूमिलाभं निर्देशौत्पातिकप्रतीकारलाभं, मित्रामित्राणां च संधिविग्रहप्रदानादानं निबन्धपुस्तकस्थं कारयेत् । २ ।

ततः सर्वाधिकरणानां करणीयं सिद्धं शेषमायव्ययौ नीवीमुपस्थानं प्रचारं चरित्रं संस्थानं च निबन्धेन प्रयच्छेत् । ३ ।

उत्तममध्यमावरेषु च कर्मसु तज्जातिकमध्यक्षं कुर्यात्, सामुदयिकेष्ववक्लृप्तिकं यमुपहत्य राजा नानुतप्येत । ४ । सहग्राहिणः प्रतिभुवः कर्मोपजीविनः पुत्रा भ्रातरो भार्या दुहितरो भृत्याश्चास्य कर्मच्छेदं वहेयुः । ५ ।

त्रिशतं चतुःपञ्चाशच्चाहोरात्राणां कर्मसंवत्सरः । ६ । तमाषाढीपर्यवसानमूनं पूर्णं वा दद्यात् । ७ । करणाधिष्ठितमधिमासकं कुर्यात् । ८ ।

मदत, प्रदेश, भोग्य वस्तू, सूट, शिक्षा आणि वेतन; राजाच्या पत्नी आणि पुत्र यांच्या संबंधात त्यांना मिळालेली रत्ने आणि जमिनी, राजाच्या सांगण्यावरून आणि सहसा आलेल्या आपत्तींचा परिहार करण्यासाठी केलेली मदत; आणि मित्रराजे व शत्रुराजे यांच्या संबंधात विग्रहाच्या व तहाच्या समयी केलेली देवाणघेवाण – ह्या सर्व गोष्टी पुस्तकात लिहून नोंदून ठेवाव्यात.

३ त्यावरून त्याने सर्व खात्यांना उत्पन्नाचा अंदाज, वसूल झालेले उत्पन्न, वसूल व्हावयाचे उत्पन्न, जमा, खर्च, शिल्लक, तपासणीसाठी हजर रहाण्याची वेळ, कामकाज, नेहमीची करण्याची पद्धती आणि सरकारी नियम हे सर्व लेखी द्यावे.

४ उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ प्रतीच्या कामांवर त्या त्या (उत्तम, मध्यम व कनिष्ठ) जातीचे अध्यक्ष नेमावेत. उत्पन्न वसूल करण्याच्या कामावर योग्य ठरलेला अध्यक्ष नेमावा, ज्याला अपराधाबद्दल शासन करणे आवश्यक झाल्यास राजाला पश्चात्ताप होणार नाही असा. ५ (त्याच्या चुकीमुळे उत्पन्नात खोट आल्यास) त्याचे सहकारी, जामीनदार, त्याच्या कामावर चरितार्थ चालविणारे, त्याचे पुत्र, भाऊ, भार्या, कन्या आणि नोकर यांनी (या क्रमाने) कामातील खोट भरून द्यावी.

६ तीनशे चोपन अहोरात्र हे कामाचे वर्ष. ७ आषाढी पौर्णिमेला संपणारे असे ते वर्ष ठरवून द्यावे, मग ते काम पूर्ण वर्षभर चालणारे असो किंवा कमी दिवस चालणारे असो. ८ अधिक मासासाठी निराळी कचेरीची व्यवस्था करावी.

अपसर्पाधिष्ठितं च प्रचारम् । ९ । प्रचारचरित्रसंस्थानान्यनुपलभमानो हि प्रकृतः समुदयमज्ञानेन परिहापयति, उत्थानक्लेशासहत्वादालस्येन, शब्दादिष्विन्द्रियार्थेषु प्रसक्तः प्रमादेन, संक्रोशाधर्मानर्थभीरुर्भयेन, कार्यार्थिष्वनुग्रहबुद्धिः कामेन, हिंसाबुद्धिः कोपेन, विद्याद्रव्यवल्लभापाश्रयाद् दर्पेण, तुलामानतर्कगणितान्तरोपधानाल्लोभेन । १० ।

' तेषामानुपूर्व्या यावानर्थोपघातस्तावानेकोत्तरो दण्डः ' इति मानवाः । ११ । ' सर्वत्राष्टगुणः ' इति पाराशराः । १२ । ' दशगुणः ' इति बार्हस्पत्याः । १३ । ' विंशतिगुणः ' इत्यौशनसाः । १४ । यथापराधमिति कौटिल्यः । १५ ।

गाणनिक्यान्याषाढीमागच्छेयुः । १६ । आगतानां समुद्रपुस्तकभाण्डनीवीकानामेकत्रासंभाषावरोधं कारयेत् । १७ । आयव्ययनीवीनामग्राणि श्रुत्वा नीवी-

९ सर्व खात्यांच्या कामकाजावर हेरांना नजर ठेवावयास लावावे. १० कारण, कामकाजाचे स्वरूप, ते करण्याची नेहमीची पद्धती, सरकारी नियम हे माहीत नसणारा अधिकारी अज्ञानामुळे उत्पन्नात खोट आणतो, मेहनतीने होणारा त्रास सहन न करणारा आळसामुळे, शब्द आदी इंद्रियविषयांत आसक्त असणारा प्रमादामुळे (कामाकडे दुर्लक्ष केल्याने), प्रजेची ओरड, अधर्म व अनर्थ यांना भिणारा भीतीमुळे, कार्यार्थी लोकांवर उपकार करण्याची इच्छा असणारा, प्रेमामुळे, हिंसक वृत्ती असलेला क्रोधामुळे, विद्या, संपत्ती व राजवल्लभ यांचा जोर असणारा दर्पामुळे आणि वजन, माप, अंदाज आणि गणीत करताना फसविणारा लोभामुळे (खोट आणतो).

११ " (अज्ञानादी) ह्या आठ कारणांपैकी ज्यामुळे उत्पन्नात खोट आली असेल त्याबद्दल अनुक्रमाने खोटीइतकाच, दुप्पट, तिप्पट याप्रमाणे चढता दंड करावा," असे मानवांचे मत आहे. १२ " सर्व कारणांबद्दल आठपट दंड करावा," असे पाराशरांचे मत आहे. १३ " दसपट करावा," असे बार्हस्पत्यांचे मत आहे. १४ " वीसपट करावा," असे औशनसांचे मत आहे. १५ अपराधाला अनुरूप असा दंड करावा, असे कौटिल्याचे मत आहे.

१६ आषाढी पौर्णिमेला हिशोब घेऊन अधिकाऱ्यांनी अक्षपटलात यावे. १७ सीलबंद हिशोबाची पुस्तके आणि मोहोरबंद शिलकीच्या पेट्या घेऊन ते आले म्हणजे ते (दोन प्रकारचे अधिकारी) आपसात बोलणार नाहीत असे त्यांच्यावर बंधन घालून एके ठिकाणी बसवावे. १८ जमा, खर्च व शिल्लक यांच्या बेरजांचे आकडे विचारून घेऊन शिल्लक प्रत्यक्ष मोजून घ्यावी. १९ आणि प्रत्यक्ष शिलकीपेक्षा हिशोबाच्या वहीतील पानावर शिलकीचा आकडा

**मवहारयेत् । १८ । यच्चाग्रादायस्यान्तरपर्णे नीव्यां वर्धेत व्ययस्य वा यत्परिहापयेत्, तदष्टगुणमध्यक्षं दापयेत् । १९ । विपर्यये तमेव प्रति स्यात् । २० ।**

**यथाकालमनागतानामपुस्तकभाण्डनीवीकानां वा देयदशबन्धो दण्डः । २१ । कार्मिके चोपस्थिते कारणिकस्याप्रतिबध्नतः पूर्वः साहसदण्डः । २२ । विपर्यये कार्मिकस्य द्विगुणः । २३ ।**

**प्रचारसमं महामात्राः समग्राः श्रावयेयुरविषममन्त्राः । २४ । पृथग्भूतो मिथ्यावादी चैषामुत्तमं दण्डं दद्यात् । २५ ।**

**अकृताहोरूपहरं मासमाकाङ्क्षेत । २६ । मासादूर्ध्वं मासद्विशतोत्तरं दण्डं दद्यात् । २७ । अल्पशेषलेख्यनीवीकं पञ्चरात्रमाकाङ्क्षेत । २८ । ततः परं कोशपूर्वमहोरूपहरं धर्मव्यवहारचरित्रसंस्थानसंकलननिर्वर्तनानुमानचारप्रयोगैरवेक्षेत । २९ ।**

जितक्या रकमेने अधिक असेल किंवा जितक्या रकमेने खर्च कमी दाखविला असेल त्या रकमेच्या आठपट रक्कम अध्यक्षाकडून वसूल करून घ्यावी. २० याच्या उलट स्थिती असल्यास (प्रत्यक्ष शिलकीतील वाढ) त्या अधिकाऱ्यालाच ती मिळावी.

२१ ठरलेल्या वेळी जे अधिकारी येणार नाहीत किंवा जे हिशोबाची पुस्तके आणि शिलकीच्या पेटचा बरोबर आणणार नाहीत त्यांना यावयाच्या रकमेच्या एकदशांश दंड करावा. २२ आणि काम पार पाडणारा अधिकारी (शिल्लक घेऊन) आला असता हिशोब ठेवणारा अधिकारी तपासणीसाठी तयार नसेल तर त्याला प्रथम साहस दंड (४८ ते ९६ पण) करावा. २३ याउलट कार्मिक अधिकारी तयार नसल्यास त्याला दुप्पट दंड करावा.

२४ सर्व मोठ्या अधिकाऱ्यांनी कार्यक्षेत्राला अनुसरून आपसात मतभिन्नता न होऊ देता माहिती द्यावी. २५ त्यांच्यापैकी जो भिन्न निवेदन करील अथवा खोटे बोलेल त्याला उत्तम साहसदंड करावा.

२६ ज्याने रोजचे हिशोब आणले नसतील त्याची त्यासाठी एक महिना वाट पहावी. २७ एक महिन्यानंतर दर महिन्याला दोनशे पणांनी वाढत जाणारा दंड करावा. २८ लिहिलेल्या शिलकीपैकी थोडी आणावयाची बाकी राहिली असल्यास पाच दिवस वाट पहावी. २९ त्यानंतर कोशात प्रथम भरणा करून रोजचे हिशोब आणणाऱ्याच्या संबंधात धर्म, व्यवहार, ठरीव आचार, सरकारी नियम, ताळेबंद, झालेले काम, अनुमान आणि हेरांचा अहवाल हे विचारात घ्यावेत.

**दिवसपञ्चरात्रपक्षमासचातुर्मास्यसंवत्सरैश्च प्रतिसमानयेत् । ३० । व्युष्टदेशकालमुखोत्पत्त्यनुवृत्तिप्रमाणदायकदापकनिबन्धकप्रतिग्राहकैश्चायं समानयेत् । ३१ । व्युष्टदेशकालमुखलाभकारणदेययोगप्रमाणाज्ञापकोद्धारकविधातृकप्रतिग्राहकैश्च व्ययं समानयेत् । ३२ । व्युष्टदेशकालमुखानुवर्तनरूपलक्षणप्रमाणनिक्षेपभाजनगोपायकैश्च नीवीं समानयेत् । ३३ ।**

**राजार्थे कारणिकस्याप्रतिबध्नतः प्रतिषेधयतो वा आज्ञां निबन्धादायव्ययमन्यथा वा विकल्पयतः पूर्वः साहसदण्डः । ३४ ।**

**क्रमावहीनमुत्क्रममविज्ञातं पुनरुक्तं वा वस्तुकमवलिखतो द्वादशपणो दण्डः । ३५ । नीवीमवलिखतो द्विगुणः । ३६ । भक्षयतोऽष्टगुणः । ३७ । नाशयतः पञ्चबन्धः प्रतिदानं च । ३८ । मिथ्यावादे स्तेयदण्डः । ३९ । पश्चात्प्रतिज्ञाते द्विगुणः प्रस्मृतोत्पन्ने च । ४० ।**

३० दर दिवसाचा, पाच दिवसांचा, पंधरवडचाचा, महिन्याचा, चार महिन्यांचा आणि वर्षाचा — याप्रमाणे हिशोबाचा ताळेबंद तपासावा. ३१ तारखांच्या नोंदी, देश, काल, उत्पन्नाचे मुख्य सदर, उत्पन्नाचे उद्गमस्थान, पुढे आणलेले उत्पन्न, उत्पन्नाचे प्रमाण, ते देणारा, देवविणारा, नोंद करणारा आणि ताब्यात घेणारा यांच्या संबंधात जमेचा मेळ पहावा. ३२ तारीख, देश, काल, खर्चाचे मुख्य सदर, (सेवकादींना वेतनाचा) लाभ, खर्चाचे कारण, द्यावयाची असलेली वस्तू, तिचा उपयोग, खर्चाचे प्रमाण, खर्चाची आज्ञा देणारा, खर्च काढून ठेवणारा, तो पोचविणारा आणि तो प्राप्त करणारा यांच्या संबंधात खर्चाचा मेळ पहावा. ३३ तारीख, देश, काल, मुख्य सदर, पुढे आणलेली (शिलकीच्या स्वरूपातील) वस्तू, तिची लक्षणे, प्रमाण, ती ठेवण्याची पेटी वगैरे आणि रखवालदार यांच्या संबंधात शिलकीचा मेळ पहावा.

३४ राजकार्यांच्या बाबतीत जो हिशोबतपासणीसाठी तयार असणार नाही किंवा जो आज्ञेकडे दुर्लक्ष करील किंवा जो लेखी दिलेल्या पद्धतीहून निराळ्या रीतीने जमा व खर्च मांडील त्याला प्रथम साहसदंड करावा.

३५ जो क्रम न लावताच किंवा चुकीच्या क्रमाने हिशोब मांडतो किंवा एखादी गोष्ट न समजण्यासारखी अशी किंवा दोनदा लिहितो त्याला बारा पण दंड करावा. ३६ शिलकीच्या संबंधात असे लिहिल्यास दुप्पट दंड करावा. ३७ ती गडप करणारास आठपट दंड करावा. ३८ तिचा नाश केल्यास तिच्या किमतीच्या एकपंचमांशाइतका दंड करून नुकसान भरून घ्यावे. ३९ खोटे बोलणारास चोरासारखी शिक्षा करावी. ४० मागाहून खरे कबूल केल्यास दुप्पट दंड, तसेच विसरलेली बाब मागाहून दाखविल्यास (दुप्पट दंड करावा).

अपराधं सहेताल्पं तुष्येदल्पेऽपि चोदये ।
महोपकारं चाध्यक्षं प्रग्रहेणाभिपूजयेत् ।। ४१ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे अक्षपटले गाणनिक्याधिकारः सप्तमोऽध्यायः ।
आदितोऽष्टाविंशः ।

। ८

## [ षड्विंशं प्रकरणम् -- समुदयस्य युक्तापहृतस्य प्रत्यानयनम् ]

कोशपूर्वाः सर्वारम्भाः । १ । तस्मात्पूर्वं कोशमवेक्षेत । २ ।

प्रचारसमृद्धिश्चरित्रानुग्रहश्चोरनिग्रहो युक्तप्रतिषेधः सस्यसंपत्पण्यबाहुल्यमुपसर्गप्रमोक्षः परिहारक्षयो हिरण्योपायनमिति कोशवृद्धिः । ३ ।

प्रतिबन्धः प्रयोगो व्यवहारोऽवस्तारः परिहापणमुपभोगः परिवर्तनमपहारश्चेति कोशक्षयः । ४ ।

सिद्धीनामसाधनमनवतारणमप्रवेशनं वा प्रतिबन्धः । ५ । तत्र दशबन्धो दण्डः । ६ ।

४१ राजाने अधिकाऱ्याच्या क्षुल्लक अपराधाकडे दुर्लक्ष करावे आणि उत्पन्न कमी आले तरी समाधान मानावे. आणि जो अध्यक्ष मोठा लाभ करून देईल त्याचा अनुग्रहपूर्वक सन्मान करावा.

### आठवा अध्याय

### प्रकरण २६ : सरकारी नोकरांनी अपहार केलेल्या उत्पन्नाची त्यांच्याकडून वसुली

१ राज्यातील सर्व कामे कोश असेल तरच होतात. २ म्हणून प्रथम कोशाची काळजी घ्यावी.

३ खात्यांच्या उद्योगांची भरभराट, परंपरांचे पालन, चोरांचा बंदोबस्त, अधिकाऱ्यांवर देखरेख, धान्यांची सुबत्ता, व्यापारी मालाची विपुलता, संकटापासून मुक्तता, सुटीत ऱ्हास होणे, द्रव्यरूपात भेट ही कोशवृद्धीची साधने होत.

४ प्रतिबंध, व्याजी देणे, व्यापार करणे, लपवून ठेवणे, नुकसान करणे, वापरणे, अदलाबदल करणे, आणि अपहार करणे ही कोशाच्या ऱ्हासाची कारणे होत.

५ करावयाचे असलेले काम न करणे, त्याचे उत्पन्न वसूल न करणे, उत्पन्नाचा तिजोरीत भरणा न करणे याला प्रतिबंध (अडथळा) म्हणतात. ६ त्यासाठी (रकमेच्या) एकदशांश दंड.

**कोशद्रव्याणां वृद्धिप्रयोगाः प्रयोगः । ७ । पण्यव्यवहारो व्यवहारः । ८ । तत्र फलद्विगुणो दण्डः । ९ ।**

**सिद्धं कालमप्राप्तं करोत्यप्राप्तं प्राप्तं वेत्यवस्तारः । १० । तत्र पञ्चबन्धो दण्डः । ११ ।**

**क्लृप्तमायं परिहापयति व्ययं वा विवर्धयतीति परिहापणम् । १२ । तत्र हीनचतुर्गुणो दण्डः । १३ ।**

**स्वयमन्यैर्वा राजद्रव्याणामुपभोजनमुपभोगः । १४ । तत्र रत्नोपभोगे घातः सारोपभोगे मध्यमः साहसदण्डः, फल्गुकुप्योपभोगे तच्च तावच्च दण्डः । १५ ।**

**राजद्रव्याणामन्यद्रव्येणादानं परिवर्तनम् । १६ । तदुपभोगेन व्याख्यातम् । १७ ।**

**सिद्धमायं न प्रवेशयति, निबद्धं व्ययं न प्रयच्छति, प्राप्तां नीवीं विप्रतिजानीत इत्यपहारः । १८ । तत्र द्वादशगुणो दण्डः । १९ ।**

७ कोशातील द्रव्ये व्याजाने देणे याला प्रयोग म्हणतात. ८ कोशातील मालाची विक्री करणे याला व्यवहार म्हणतात. ९ दोन्ही बाबतीत होणाऱ्या लाभाच्या दुप्पट दंड.

१० वसुलीची तारीख आली असता ती आली नाही असे दाखविणे किंवा आली नसता आली असे दाखविणे याला अवस्तार (प्रच्छादन) म्हणतात. ११ त्यासाठी एकपंचमांश दंड.

१२ ठरवून दिलेल्या उत्पन्नात घट आणणे किंवा खर्चात वाढ करणे याला परिहापण म्हणतात. १३ त्यासाठी जेवढे नुकसान झाले असेल त्याच्या चौपट दंड करावा.

१४ सरकारी द्रव्यांचा स्वतः वापर करणे किंवा दुसऱ्यांना वापर करू देणे याला उपभोग म्हणतात. १५ त्यात रत्नांचा उपभोग घेतल्यास वधाची शिक्षा, मौल्यवान वस्तूंच्या उपभोगासाठी मध्यम साहसदंड आणि हलक्या किमतीच्या वस्तूंचा व जंगलातील उत्पन्नाचा उपभोग घेतल्यास त्याची किंमत वसूल करून तितकाच दंड करावा.

१६ दुसरी वस्तू त्या जागी ठेवून सरकारी वस्तू घेणे याला परिवर्तन म्हणतात. १७ उपभोगाप्रमाणेच याही बाबतीत शिक्षा कराव्यात.

१८ वसूल झालेल्या उत्पन्नाचा तिजोरीत भरणा न करणे, हिशोबात दाखविलेली खर्चाची रक्कम न देणे, मिळालेली शिल्लक कबूल न करणे याला अपहार म्हणतात. १९ त्याबद्दल बारापट दंड करावा.

**तेषां हरणोपायाश्चत्वारिंशत् ।२०। पूर्वं सिद्धं पश्चादवतारितं, पश्चात्सिद्धं पूर्वमवतारितं, साध्यं न सिद्धम्, असाध्यं सिद्धं, सिद्धमसिद्धं कृतम्, असिद्धं सिद्धं कृतम्, अल्पसिद्धं बहु कृतं, बहुसिद्धमल्पं कृतम्, अन्यत्सिद्धमन्यत्कृतम्, अन्यतः सिद्धमन्यतः कृतं, देयं न दत्तम्, अदेयं दत्तं, काले न दत्तम्, अकाले दत्तम्, अल्पं दत्तं बहु कृतं, बहु दत्तमल्पं कृतम्, अन्यद्दत्तमन्यत्कृतम्, अन्यतो दत्तमन्यतः कृतं, प्रविष्टमप्रविष्टं कृतम, अप्रविष्टं प्रविष्टं कृतं, कुप्यमदत्तमूल्यं प्रविष्टं, दत्तमूल्यं न प्रविष्टं, संक्षेपो विक्षेपः कृतः, विक्षेपः संक्षेपो वा, महार्घमल्पार्घेण परिवर्तितम्, अल्पार्घं महार्घेण वा, समारोपितोऽर्घः, प्रत्यवरोपितो वा, संवत्सरो**

२० त्या अधिकाऱ्यांचे अपहार करावयाचे चाळीस मार्ग आहेत. २१ अगोदर तयार झालेले उत्पन्न कालावधीने वसूल केले (१), नंतर सिद्ध व्हावयाचे असलेले उत्पन्न अगोदरच वसूल केले (२), जे करावयाचे ते केले नाही (३), जे करावयाचे नाही ते केले (४), जे तयार झाले आहे ते तयार झाले नाही असे दाखविले (५), जे तयार झाले नाही ते तयार झाले आहे असे दाखविले (६), थोडे सिद्ध झाले असता पुष्कळ झाले आहे असे दाखविले (७), पुष्कळ सिद्ध झाले असता थोडे दाखविले (८), एक सिद्ध केले असता दुसरे दाखविले (९), एका उत्पन्नाच्या सदरात सिद्ध झाले असता दुसऱ्या सदरात दाखविले (१०), जे द्यावयाचे होते ते दिले नाही (११), जे द्यावयाचे नव्हते ते दिले (१२), योग्य वेळी दिले नाही (१३), भलत्याच वेळी दिले (१४), थोडे दिले असता पुष्कळ दिले असे दाखविले (१५), पुष्कळ दिले असता थोडे दाखविले (१६), एक दिले असता दुसरे दिले असे दाखविले (१७), एकास दिले असता दुसऱ्यास दिले असे दाखविले (१८), भरणा केला असता भरणा केला नाही असे दाखविले (१९), भरणा न करता तो केला असे दाखविले (२०), ज्याची किंमत दिली नाही असा जंगली माल आणून ठेवला (२१), ज्याची किंमत दिली तो आणून ठेवला नाही (२२), विक्रीचा माल एकेच ठिकाणी ठेवला असता तो अनेक जागी ठेवला आहे असे दाखविले (२३), किंवा अनेक जागी ठेवलेला माल एकत्र आणला आहे असे दाखविले (२४), भारी किमतीच्या वस्तूच्या जागी कमी किमतीची वस्तू ठेवली (२५), किंवा कमी किमतीच्या वस्तूच्या जागी भारी वस्तू ठेवली (२६), मालाची किंमत वाढविली (२७), अथवा किंमत उतरवली (२८), वर्षातील महिन्यांच्या बाबतीत विषमता (बारा असता तेरा इत्यादी) दाखविली (२९), महिन्यातील दिवसांच्या बाबतीत विषमता दाखविली (३०), उत्पन्नाच्या उद्गमस्थानाच्या बाबतीत विषमता (३१), उत्पन्नाच्या सदराच्या बाबतीत विषमता (३२), कामगारांच्या बाबतीत विषमता

मासविषमः कृतः, मासो दिवसविषमो वा, समागमविषमः, मुखविषमः, कार्मिकविषमः, निर्वर्तनविषमः, पिण्डविषमः, वर्णविषमः, अर्घविषमः, मानविषमः, मापनविषमः, भाजनविषमः – इति हरणोपायाः । २१ ।

तत्रोपयुक्तनिधायकनिबन्धकप्रतिग्राहकदायकदापकमन्त्रिवैयावृत्यकरानेकैकशोऽनुयुञ्जीत । २२ । मिथ्यावादे चैषां युक्तसमो दण्डः । २३ । प्रचारे चावघोषयेत् 'अमुना प्रकृतेनोपहताः प्रज्ञापयन्तु' इति । २४ । प्रज्ञापयतो यथोपघातं दापयेत् । २५ ।

अनेकेषु चाभियोगेष्वपव्ययमानः सकृदेव परोक्तः सर्वं भजेत । २६ । वैषम्ये सर्वत्रानुयोगं दद्यात् । २७ । महत्यर्थापहारे चाल्पेनापि सिद्धः सर्वं भजेत । २८ ।

कृतप्रतिघातावस्थः सूचको निष्पन्नार्थः षष्ठमंशं लभेत, द्वादशमंशं भृतकः

(३३), काम पार पाडण्याच्या बाबतीत विषमता (३४), एकूण बेरजेच्या बाबतीत विषमता (३५), मालाच्या प्रतीच्या बाबतीत विषमता (३६) किमतीच्या बाबतीत विषमता, (३७) वजनात विषमता (३८), मोजण्यात विषमता (३९), माल ठेवण्याच्या भाजनाच्या बाबतीत विषमता (४०) – असे हे अपहार करण्याचे मार्ग आहेत.

२२ त्यासंबंधात (राजाने) त्याच्या हाताखालचे अधिकारी, माल ठेवणारे लिहून ठेवणारे, ताब्यात घेणारे, देणारे, देवविणारे, त्यांचे सल्लागार आणि सहायक यांची वेगवेगळी जबानी घ्यावी. २३ आणि त्यांच्यापैकी जो खोटी जबानी देईल त्याला त्या (अपहारकर्त्या) अधिकाऱ्याइतकाच दंड करावा. २४ आणि त्याच्या कार्यक्षेत्रात दवंडी पिटवावी की ज्या कोणाचे ह्या अधिकाऱ्यामुळे नुकसान झाले असेल त्याने ते कळवावे. २५ जो कळवील त्याचे नुकसान भरून देण्यास लावावे.

२६ आणि त्याच्यावर अनेक आरोप केले असता ते सर्व नाकबूल केल्यास एका बाबतीतही गुन्हा शाबीत झाला तर त्याला सर्वांबद्दल जबाबदार धरावे. २७ जर काही अपराधच नाकबूल केले तर सर्व आरोपांबाबत तपास करावा. २८ आणि फार मोठ्या रकमेचा अपहार झाला असल्यास थोड्या रकमेचा अपहार सिद्ध झाला तर सर्व रकमेबद्दल त्याला जबाबदार धरावे.

२९ (अधिकारी) त्याला प्रत्यपकार करणार नाही अशी हमी मिळालेल्या सूचकाला (अपहाराची बातमी गुप्तपणे देणाऱ्याला), त्याचे म्हणणे खरे ठरले

। २९ । प्रभूताभियोगादल्पनिष्पत्तौ निष्पन्नस्यांशं लभेत । ३० । अनिष्पन्ने शारीरं हैरण्यं वा दण्डं लभेत, न चानुग्राह्यः । ३१ ।

निष्पत्तौ निक्षिपेद्वादमात्मानं वापवाहयेत् ।
अभियुक्तोपजापात्तु सूचको वधमाप्नुयात् ।। ३२ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे समुदयस्य युक्तापहृतस्य प्रत्यानयनम् अष्टमोऽध्यायः ।
आदित एकोनत्रिंशः ।

९

## [ सप्तविंशं प्रकरणम् – उपयुक्तपरीक्षा ]

अमात्यसंपदोपेताः सर्वाध्यक्षाः शक्तितः कर्मसु नियोज्याः । १ । कर्मसु चैषां नित्यं परीक्षां कारयेत्, चित्तानित्यत्वान्मनुष्याणाम् । २ । अश्वसधर्माणो हि मनुष्या नियुक्ताः कर्मसु विकुर्वते । ३ । तस्मात्कर्तारं करणं देशं कालं कार्यं प्रक्षेपमुदयं चैषु विद्यात् । ४ ।

तर, रकमेच्या एकषष्ठांश भाग मिळावा; जर तो सरकारी नोकर असेल तर त्याला बारावा भाग मिळावा. ३० पुष्कळ मोठ्या रकमेविषयी आरोप केला असता त्यापैकी थोडीच सिद्ध झाली तर सिद्ध झालेल्या रकमेचाच भाग त्याला मिळावा. ३१ जर काहीच सिद्ध झाले नाही तर त्याला देहदंड अथवा द्रव्यदंड करावा, आणि त्याला क्षमा करू नये.

३२ परंतु आरोप सिद्ध झाला असता जर आरोपीच्या गुप्त प्रेरणेमुळे सूचक आपला दावा काढून घेईल किंवा दुसरीकडे निघून जाईल तर त्याला वधाची शिक्षा करावी.

### नववा अध्याय

### प्रकरण २७ : सरकारी नोकरांवर ठेवावयाची नजर

१ अमात्यांच्या ठिकाणी आवश्यक असलेल्या गुणांनी संपन्न अशा सर्व अध्यक्षांची त्यांच्या शक्त्यनुसार कामावर नियुक्ती करावी. २ आणि त्यांच्या कामाची नित्य पहाणी करीत जावी, कारण मनुष्याचे मन चंचल आहे. ३ कारण, मनुष्याचा स्वभाव घोड्यासारखा आहे, त्यांना काम सांगितले की ते बदलतात. ४ म्हणून ह्या कामांच्या संबंधात काम करणारा, त्याची साधने, देश, काल, कार्य, गुंतविलेली रक्कम आणि होणारा नफा यांची माहिती असू द्यावी.

ते यथासंदेशमसंहता अविगृहीताः कर्माणि कुर्युः ।५। संहता भक्षयेयुः, विगृहीता विनाशयेयुः ।६। न चानिवेद्य भर्तुः कंचिदारम्भं कुर्युः, अन्यत्रापत्प्रतीकारेभ्यः ।७।

प्रमादस्थानेषु चैषामत्ययं स्थापयेद्दिवसवेतनव्ययद्विगुणम् ।८। यश्चैषां यथादिष्टमर्थं सविशेषं वा करोति स स्थानमानौ लभेत ।९।

'अल्पायतिश्चेन्महाव्ययो भक्षयति ।१०। विपर्यये यथायतिव्ययश्च न भक्षयति' इत्याचार्याः ।११। अपसर्पेणैवोपलभ्येतेति कौटिल्यः ।१२।

यः समुदयं परिहापयति स राजार्थं भक्षयति ।१३। स चेदज्ञानादिभिः परिहापयति तदेनं यथागुणं दापयेत् ।१४। यः समुदयं द्विगुणमुद्भावयति स जनपदं भक्षयति ।१५। स चेद्राजार्थमुपनयत्यल्पापराधे वारयितव्यः, महति यथापराधं दण्डयितव्यः ।१६। यः समुदयं व्ययमुपनयति स पुरुषकर्माणि

५ त्यांनी हुकुमाप्रमाणे आपली कामे आपसात संगनमत न करता किंवा भांडण न करता पार पाडावीत. ६ संगनमत केले तर ते पैसे खाऊन टाकतील, भांडले तर कामाचा नाश करतील. ७ आणि राजाला कळविल्याशिवाय कोणतेही कार्य हाती घेऊ नये; फक्त संकटाचे निवारण करण्यासाठी करावयाच्या उपाययोजनेचा याला अपवाद आहे.

८ आणि त्यांच्या हातून प्रमाद घडला तर दिवसाचा पगार व खर्च याच्या दुप्पट दंड करावा. ९ आणि त्यांच्यापैकी जो कार्य सांगितल्यावरहुकुम किंवा त्याहून चांगल्या रीतीने पार पाडील त्याला वरचे स्थान व मानसन्मान द्यावा.

१० "ज्याचे उत्पन्न थोडे आणि खर्च जास्त तो (सरकारचे उत्पन्न) गिळंकृत करतो. ११ याच्या उलट (उत्पन्न जास्त व खर्च थोडा असणारा) आणि उत्पन्नानुरूप खर्च करणारा हे पैसे खात नाहीत," असे आचार्यांचे मत आहे. १२ गुप्त हेरांच्या द्वाराच हे कळून येऊ शकेल, असे कौटिल्याचे मत आहे.

१३ जो सरकारी उत्पन्नात तूट आणतो तो सरकारचे पैसे बुडवितो. १४ ती तूट जर त्याने अज्ञानादी (आठ) दोषांमुळे आणली असेल तर ती त्याच्याकडून दोषसंख्येइतक्या पटीने वसूल करून घ्यावी. १५ जो उत्पन्न दुप्पट काढतो तो प्रजेला लुबाडतो. १६ जर त्याने सगळ्या उत्पन्नाचा तिजोरीत भरणा केला असला तर अपराध क्षुल्लक असल्यास त्याला ताकीद द्यावी, अपराध मोठा असल्यास अपराधानुरूप दंड करावा. १७ जो आलेले उत्पन्न खर्च करून टाकतो तो कामावरील माणसांचे श्रम वाया घालवितो. १८ कामाचे दिवस, वस्तूंची

भक्षयति ।१७। स कर्मदिवसद्रव्यमूल्यपुरुषवेतनापहारेषु यथापराधं दण्डयितव्यः । १८ । तस्मादस्य यो यस्मिन्नधिकरणे शासनस्थः स तस्य कर्मणो याथातथ्यमायव्ययौ च व्याससमासाभ्यामाचक्षीत । १९ ।

मूलहरतादात्विककदर्यांश्च प्रतिषेधयेत् । २० । यः पितृपैतामहमर्थमन्यायेन भक्षयति स मूलहरः । २१ । यो यद्यदुत्पद्यते तत्तद्भक्षयति स तादात्विकः । २२ । यो भृत्यात्मपीडाभ्यामुपचिनोत्यर्थं स कदर्यः । २३ । स पक्षवांश्चेदनादेयः, विपर्यये पर्यादातव्यः । २४ ।

यो महत्यर्थसमुदये स्थितः कदर्यः संनिधत्तेऽवनिधत्तेऽवस्रावयति वा – संनिधत्ते स्ववेश्मनि, अवनिधत्ते पौरजानपदेषु, अवस्रावयति परविषये – तस्य सत्री मन्त्रिमित्रभृत्यबन्धुपक्षमागतिं गतिं च द्रव्याणामुपलभेत ।२५। यश्चास्य परविषये संचारं कुर्यात्तमनुप्रविश्य मन्त्रं विद्यात् । २६ । सुविदिते शत्रुशासनापदेशेनैनं घातयेत् । २७ ।

किंमत आणि मनुष्यांचे पगार यांचा अपहार केला असल्यास त्याला अपराधानुरूप शासन करावे. १९ म्हणून राजाने आज्ञापत्र काढून ज्याची ज्या खात्यावर नेमणूक केली असेल त्याने कामाचे यथार्थ स्वरूप आणि त्याचे उत्पन्न व खर्च तपशीलवार आणि एकूण असा राजास कळवावा.

२० मूलहर, तादात्विक आणि कदर्य अशा अधिकाऱ्यांचा प्रतिषेध करावा. २१ वाडवडिलांनी ठेवलेली संपत्ती जो अन्याय्य मार्गाने फस्त करतो तो मूलहर. २२ जे जे मिळते ते ते तात्काळ जो उडवून टाकतो तो तादात्विक. २३ जो स्वतःचे आणि नोकरांचे हाल करून धनसंचय करतो तो कदर्य (कंजूस). २४ जर त्याच्या बाजूला पुष्कळ लोक असतील तर त्याचे (कदर्याचे) धन घेऊ नये, जर नसतील तर त्याची सर्व मालमत्ता जप्त करावी.

२५ जो कदर्य अधिकारी, फार मोठ्या उत्पन्नाच्या कामावर नेमिले असता धन साठवून ठेवतो किंवा ठेवरूपाने ठेवतो अथवा बाहेर पाठवून देतो – साठा स्वतःच्या घरात करतो, ठेव नागरिक किंवा जनपदनिवासी यांच्याजवळ ठेवतो, बाहेर परदेशात पाठवून देतो – त्याच्या संबंधात सत्री हेराने त्याचे सल्लागार, मित्र, नोकर आणि बंधुजन, तसेच पदार्थांची येजा यांच्याविषयी माहिती काढावी, २६ आणि जो त्याच्यासाठी परदेशात येजा करीत असेल त्याच्या पोटात शिरून गुह्य माहीत करून घ्यावे. २७ पूर्ण माहिती मिळाल्यावर शत्रूकडून त्याला पत्र आल्याचा बनाव करून त्याचा घात करावा.

तस्मादस्याध्यक्षाः संख्यायकलेखकरूपदर्शकनीवीग्राहकोत्तराध्यक्षसखाः कर्माणि कुर्युः । २८ । उत्तराध्यक्षा हस्त्यश्वरथारोहाः । २९ । तेषामन्तेवासिनः शिल्पशौचयुक्ताः संख्यायकादीनामपसर्पाः । ३० ।

बहुमुख्यमनित्यं चाधिकरणं स्थापयेत् । ३१ ।

यथा ह्यनास्वादयितुं न शक्यं
जिह्वातलस्थं मधु वा विषं वा ।
अर्थस्तथा ह्यर्थचरेण राज्ञः
स्वल्पोऽप्यनास्वादयितुं न शक्यः ।। ३२ ।।
मत्स्या यथान्तःसलिले चरन्तो
ज्ञातुं न शक्याः सलिलं पिबन्तः ।
युक्तास्तथा कार्यविधौ नियुक्ता
ज्ञातुं न शक्या धनमाददानाः ।। ३३ ।।
अपि शक्या गतिर्ज्ञातुं पततां खे पतत्रिणाम् ।
न तु प्रच्छन्नभावानां युक्तानां चरतां गतिः ।। ३४ ।।

२८ म्हणून अध्यक्षांनी हिशोबनीस, लेखक, नाणी तपासणारा, शिल्लक ताब्यात घेणारा आणि रक्षक अधिकारी (उत्तराध्यक्ष) यांच्या देखत राजाची कामे करावीत. २९ हत्ती, घोडे व रथ यांवर आरूढ होणारे ते उत्तराध्यक्ष. ३० त्यांचे कलाकुशल आणि प्रामाणिक शिष्य हे हिशोबनीस आदींवर नजर ठेवणारे हेर.

३१ एका खात्यात अनेक मोठे अधिकारी असावेत आणि त्यांच्या खात्यात सतत बदल करीत जावा.

३२ ज्याप्रमाणे जिभेवर असलेल्या मधाचा किंवा विषाचा स्वाद न घेणे शक्य नाही त्याप्रमाणेच राजाचे द्रव्य हाताळणारा अधिकारी त्यातील थोडे तरी द्रव्य चाखल्यावाचून राहणे शक्य नाही.

३३ ज्याप्रमाणे पाण्याच्या आतच इकडेतिकडे फिरणारे मासे पाणी पिताना समजून येऊ शकत नाही, त्याप्रमाणे कार्य पार पाडण्यासाठी नेमलेले अधिकारी धनाचा अपहार करताना समजून येऊ शकत नाहीत.

३४ आकाशात उडत असलेल्या पक्ष्यांची गती एक वेळ जाणता येईल, परंतु आपल्या मनातील भाव गुप्त ठेवून वावरणाऱ्या अधिकाऱ्यांचे मार्ग जाणणे शक्य होणार नाही.

आस्रावयेच्चोपचितान् विपर्यस्येच्च कर्मसु ।
यथा न भक्षयन्त्यर्थं भक्षितं निर्वमन्ति वा ।। ३५ ।।
न भक्षयन्ति ये त्वर्थान् न्यायतो वर्धयन्ति च ।
नित्याधिकाराः कार्यास्ते राज्ञः प्रियहिते रताः ।। ३६ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे उपयुक्तपरीक्षा नवमोऽध्यायः । आदितस्त्रिंशः ।

१०

## [ अष्टाविंशं प्रकरणम् – शासनाधिकारः ]

शासने शासनमित्याचक्षते । १ । शासनप्रधाना हि राजानः तन्मूलत्वात्संधिविग्रहयोः । २ ।

तस्मादमात्यसंपदोपेतः सर्वसमयविदाशुग्रन्थश्चार्वक्षरो लेखनवाचनसमर्थो लेखकः स्यात् । ३ ।

सोऽव्यग्रमना राज्ञः संदेशं श्रुत्वा निश्चितार्थं लेखं विदध्यात् देशैश्वर्यवंशनामधेयोपचारमीश्वरस्य, देशनामधेयोपचारमनीश्वरस्य । ४ ।

३५ जे धनसंचयाने गबर झाले असतील त्यांना ते द्यावयास लावावे, आणि त्यांच्या कामांत बदल करीत जावा; त्यायोगे ते पैसे खाणार नाहीत आणि खाल्लेले ओकून टाकतील.

३६ परंतु जे पैसे खात नाहीत आणि न्याय्य मार्गाने सरकारी उत्पन्नात वाढ करतात ते राजाचे प्रिय व हित साधण्यात तत्पर म्हणून त्यांची कायमच्या अधिकारावर नेमणूक करावी.

## दहावा अध्याय
### प्रकरण २८ : आज्ञापत्रांविषयी

१ आज्ञापत्राला शासन असे म्हणतात. २ कारण, राजे शासनावरच मुख्यतः अवलंबून असतात, संधि व विग्रह यांचे मूळ शासनात आहे या कारणास्तव.

३ म्हणून लेखक अमात्यांना आवश्यक अशा सर्व गुणांनी संपन्न, सर्व संकेत जाणणारा, लवकर वाक्यरचना करणारा, सुंदर अक्षर असणारा आणि लिहिलेले वाचण्यात वाकबगार असा असावा.

४ त्याने एकाग्र मनाने राजाची आज्ञा ऐकून सुस्पष्ट अर्थ असलेला असा लेख तयार करावा; त्यात राजाचा उल्लेख देश, पदवी, वंश आणि नाव यांच्या निर्देशाने केलेला असावा, इतरांचा उल्लेख फक्त देश व नाव यांच्या निर्देशाने.

**जातिं कुलं स्थानवयःश्रुतानि**
**कर्मर्द्धिशीलान्यथ देशकालौ ।**
**यौनानुबन्धं च समीक्ष्य कार्ये**
**लेखं विदध्यात्पुरुषानुरूपम् ।। ५ ।।**

**अर्थक्रमः संबन्धः परिपूर्णता माधुर्यमौदार्यं स्पष्टत्वमिति लेखसंपत् । ६ । तत्र यथावदनुपूर्वक्रिया प्रधानस्यार्थस्य पूर्वमभिनिवेश इत्यर्थक्रमः । ७ । प्रस्तुतस्यार्थस्यानुपरोधादुत्तरस्य विधानमा समाप्तेरिति संबन्धः । ८ । अर्थपदाक्षराणामन्यूनातिरिक्तता हेतूदाहरणदृष्टान्तैरर्थोपवर्णनाश्रान्तपदतेति परिपूर्णता । ९ । सुखोपनीतचार्वर्थशब्दाभिधानं माधुर्यम् । १० । अग्राम्यशब्दाभिधानमौदार्यम् । ११ । प्रतीतशब्दप्रयोगः स्पष्टत्वमिति । १२ ।**

**अकारादयो वर्णास्त्रिषष्टिः । १३ । वर्णसंघातः पदम् । १४ । तच्चतुर्विधं नामाख्यातोपसर्गनिपाताश्चेति । १५ । तत्र नाम सत्त्वाभिधायि । १६ । अविशिष्टलिङ्गमाख्यातं क्रियावाचि । १७ । क्रियाविशेषकाः प्रादय उपसर्गाः**

५ (ज्याला लिहावयाचे त्याची) जात, कूळ, दर्जा, वय, विद्वत्ता, व्यवसाय, सांपत्तिक स्थिती, चारित्र्य, आणि वैवाहिक संबंध, तसेच देश व काल हे सर्व विचारात घेऊन त्या मनुष्याच्या संबंधात अनुरूप असा लेख कोणत्याही कार्याच्या बाबतीत तयार करावा.

६ अर्थाचा क्रम, संगतवारपणा, परिपूर्णता, माधुर्य, औदार्य आणि स्पष्टता हे लेखाचे गुण होत. ७ त्यांत उचित असा क्रम लावणे, मुख्य गोष्टीचा प्रथम निर्देश करणे म्हणजे अर्थक्रम होय. ८ प्रारंभी निर्दिष्ट केलेल्या अर्थाशी विसंगती न आणता नंतरच्या गोष्टींचा लेखसमाप्तीपर्यंत निर्देश म्हणजे संबंध होय. ९ अर्थ, पदे व अक्षरे ही कमी किंवा अधिक नसणे, कारणे, उदाहरणे आणि दृष्टांत यांच्या साह्याने अभिप्रेत आशयाचे स्पष्टीकरण करताना शब्द उणे पडू न देणे ह्याला परिपूर्णता म्हणतात. १० सहज प्रतीत होणारा सुंदर अर्थ असलेल्या शब्दांची योजना म्हणजे माधुर्य. ११ ग्राम्य शब्दांची योजना न करणे म्हणजे औदार्य. १२ सर्वांना परिचित असलेल्या शब्दांचा वापर म्हणजे स्पष्टत्व.

१३ अकारादी वर्ण त्रेसष्ट आहेत. १४ वर्णांचा समूह म्हणजे पद (शब्द). १५ ते चार प्रकारचे – नाम, आख्यात, उपसर्ग आणि निपात याप्रमाणे. १६ त्यांपैकी नाम हे सत्त्वाचे (अस्तित्व असणाऱ्या पदार्थाचे) वाचक. १७ लिंगभेदरहित आख्यात क्रियेचे वाचक. १८ क्रियेची विशेषता दाखविणारे 'प्र'

। १८ । अव्ययाश्चादयो निपाताः । १९ । पदसमूहो वाक्यमर्थपरिसमाप्तौ । २० । एकपदावरस्त्रिपदपरः परपदार्थानुपरोधेन वर्गः कार्यः । २१ ।

लेखपरिसंहरणार्थ इतिशब्दो वाचिकमस्येति च । २२ ।

निन्दा प्रशंसा पृच्छा च तथाख्यानमथार्थना ।
प्रत्याख्यानमुपालम्भः प्रतिषेधोऽथ चोदना ॥ २३ ॥
सान्त्वमभ्युपपत्तिश्च भर्त्सनानुनयौ तथा ।
एतेष्वर्थाः प्रवर्तन्ते त्रयोदशसु लेखजाः ॥ २४ ॥

तत्राभिजनशरीरकर्मणां दोषवचनं निन्दा । २५ । गुणवचनमेतेषामेव प्रशंसा । २६ । 'कथमेतद्' इति पृच्छा । २७ । 'एवम्' इत्याख्यानम् । २८ । 'देहि' इत्यर्थना । २९ । 'न प्रयच्छामि' इति प्रत्याख्यानम् । ३० । 'अननुरूपं भवतः' इत्युपालम्भः । ३१ । 'मा कार्षीः' इति प्रतिषेधः । ३२ । 'इदं क्रियताम्' इति चोदना । ३३ । 'योऽहं स भवान्, यन्मम द्रव्यं तद्भवतः' इत्युपग्रहः सान्त्वम् । ३४ । व्यसनसाहाय्यमभ्युपपत्तिः । ३५ । सदोषमायति-

आदी हे उपसर्ग होत. १९ 'च' आदी अव्यय निपात होत. २० ज्यात अर्थाची परिसमाप्ती होते अशा पदसमूहाला वाक्य म्हणतात. २१ इतर शब्दांच्या अर्थाला बाध येणार नाही अशा रीतीने कमीत कमी एक शब्दाचा आणि जास्तीत जास्त तीन शब्दांचा 'वर्ग' करावा.

२२ लेखाची समाप्ती दाखविण्यासाठी 'इति' शब्द आणि 'अमक्याचे हे वचन' असे लिहावे.

२३–२४ निंदा, प्रशंसा, पृच्छा, आख्यान, अर्थना, प्रत्याख्यान, उपालंभ, प्रतिषेध, चोदना, सांत्व, अभ्युपपत्ती, भर्त्सन आणि अनुनय – अशा ह्या तेरा बाबतींसाठी लेखातून निष्पन्न होणारे अर्थ उपयोजिले जातात.

२५ यांपैकी कोणाचे कूळ, शरीर व काम यांच्या दोषांचा निर्देश करणे म्हणजे निंदा. २६ ह्या तिहींच्याच गुणांचा निर्देश करणे म्हणजे प्रशंसा. २७ 'हे कसे?' ही पृच्छा (विचारणे). २८ 'याप्रमाणे' हे आख्यान (कथन करणे). २९ 'द्या' ही अर्थना (मागणी). ३० 'देत नाही' हे प्रत्याख्यान (नकार). ३१ 'आपल्याला हे शोभत नाही' हा उपालंभ (टोमणा). ३२ 'करू नकोस' हा प्रतिषेध. ३३ 'हे कर' ही चोदना (प्रवृत्त करणारे वचन). ३४ 'तुम्ही व मी एकच आहोत, जे माझे द्रव्य ते तुमचेच आहे' असा अनुग्रह दाखविणे हे सांत्व (सांत्वन). ३५ संकटसमयी साह्य करणे म्हणजे अभ्युपपत्ती (मदत करणे). ३६ भविष्यकालीन दोषाचा निर्देश करून 'पुढे तुम्हाला हे

प्रदर्शनमभिभर्त्सनम् । ३६ । अनुनयस्त्रिविधोऽर्थकृतावतिक्रमे पुरुषादिव्यसने चेति । ३७ ।

प्रज्ञापनाज्ञापरिदानलेखा-
स्तथा परीहारनिसृष्टिलेखौ ।
प्रावृत्तिकश्च प्रतिलेख एव
सर्वत्रगश्चेति हि शासनानि ।। ३८ ।।

अनेन विज्ञापितमेवमाह
तद्दीयतां चेद्यदि तत्त्वमस्ति ।
राज्ञः समीपे वरकारमाह
प्रज्ञापनैषा विविधोपदिष्टा ।। ३९ ।।

भर्तुराज्ञा भवेद्यत्र निग्रहानुग्रहौ प्रति ।
विशेषेण तु भृत्येषु तदाज्ञालेखलक्षणम् ।। ४० ।।

यथार्हगुणसंयुक्ता पूजा यत्रोपलक्ष्यते ।
अप्याधौ परिदाने वा भवतस्तावुपग्रहौ ।। ४१ ।।

जड जाईल' असे म्हणणे म्हणजे अभिभर्त्सन (धमकी). ३७ अनुनय तीन प्रकारचा – कार्यसिद्धी करून घेण्यासाठी, स्वतःच्या अतिक्रमणाबद्दल क्षमेसाठी आणि मनुष्य आदीवरील संकटाच्या निवारणासाठी.

३८ प्रज्ञापना (कळविणे), आज्ञा, परिदान (दान करणे), परिहार (सूट देणे), निसृष्टि (अधिकार देणे) यांसंबंधी लेख, प्रावृत्तिक (घटनेची बातमी देणारा) लेख, प्रतिलेख (प्रत्युत्तर) आणि सर्वत्रग (सर्वत्र लागू होणारा) लेख, असे हे शासनांचे प्रकार आहेत.

३९ 'अमक्याने असे कळविले आहे, अमका असे म्हणतो, तेव्हा जर त्यात तथ्य असेल तर (ठरल्याप्रमाणे) देऊन टाका.' 'राजाकडे तुम्ही चांगली गोष्ट केल्याचे सांगितले आहे.' इत्यादी विविध प्रकारचे प्रज्ञापनालेख होत.

४० ज्यात नियमन अथवा अनुग्रह यांविषयी – विशेषतः भृत्यांच्या संबंधात – राजाची आज्ञा असेल त्याला आज्ञालेख म्हणतात.

४१ ज्यांत कोणाच्या अंगच्या गुणांच्या अनुरोधाने त्याचा सत्कार केलेला दिसून येतो – त्याच्या मानसिक त्रासाच्या समयी आणि त्याला बक्षीस देताना – ते दोन उपग्रहलेख होत.

वि (वाय)— ३१७-११-अ

जातेर्विशेषेषु पुरेषु चैव
ग्रामेषु देशेषु च तेषु तेषु ।
अनुग्रहो यो नृपतेर्निदेशा-
त्तज्ज्ञः परीहार इति व्यवस्येत् ।। ४२ ।।

निसृष्टिस्थापना कार्यकरणे वचने तथा ।
एष वाचिकलेखः स्याद् भवेन्नैसृष्टिकोऽपि वा ।। ४३ ।।

विविधां दैवसंयुक्तां तत्त्वजां चैव मानुषीम् ।
द्विविधां तां व्यवस्यन्ति प्रवृत्तिं शासनं प्रति ।। ४४ ।।

दृष्ट्वा लेखं यथातत्त्वं ततः प्रत्यनुभाष्य च ।
प्रतिलेखो भवेत्कार्यो यथा राजवचस्तथा ।। ४५ ।।

यत्रेश्वरांश्चाधिकृतांश्च राजा
रक्षोपकारौ पथिकार्थमाह ।
सर्वत्रगो नाम भवेत्स मार्गे
देशे च सर्वत्र च वेदितव्यः ।। ४६ ।।

४२ राजाच्या आज्ञेवरून विशिष्ट जातींवर आणि शहरांवर, तसेच निर-निराळ्या गावांवर व प्रदेशांवर जो अनुग्रह केला जातो त्याला तज्ज्ञ लोकांनी परिहार असे समजावे.

४३ कार्य करण्याच्या संबंधात आणि हुकूम देण्याच्या संबंधात अधिकार देणे याप्रमाणे दोन प्रकारचे निसृष्टिलेख – एक वाचिक (तोंडी हुकूम देण्याचा अधिकार असलेला) व दुसरा नैसृष्टिक (कार्य करण्याचा अधिकार देणारा).

४४ विविध प्रकारच्या दैवी घटनांविषयी आणि मनुष्यांनी केलेल्या खऱ्या घटनांविषयी, याप्रमाणे लेखाच्या संबंधात वातमी दोन प्रकारची असल्याचे समजतात.

४५ जसा असेल तसा लेख पाहून आणि तसाच (राजाला) वाचून दाखवून उत्तरादाखल राजाचे वचन जसे असेल तसे लिहिलेला असा प्रतिलेख तयार करावा.

४६ ज्यात वाटसरूंच्या संरक्षणासाठी आणि मदतीसाठी राजाने राज-कुलीनांना व अधिकाऱ्यांना नियम घालून दिलेले असतात तो सर्वत्रग लेख, मार्गात व देशात सर्वत्र जाहीर केलेला असा जाणावा.

उपायाः सामोपप्रदानभेददण्डाः । ४७ । तत्र साम पञ्चविधम् – गुणसंकीर्तनं, संबन्धोपाख्यानं, परस्परोपकारसंदर्शनम्, आयतिप्रदर्शनम्, आत्मोपनिधानमिति । ४८ । तत्राभिजनशरीरकर्मप्रकृतिश्रुतद्रव्यादीनां गुणग्रहणं प्रशंसा स्तुतिर्गुणसंकीर्तनम् । ४९ । ज्ञातियौनमौखस्रौवकुलहृदयमित्रसंकीर्तनं संबन्धोपाख्यानम् । ५० । स्वपक्षपरपक्षयोरन्योन्योपकारसंकीर्तनं परस्परोपकारसंदर्शनम् । ५१ । अस्मिन्नेवं कृत इदमावयोर्भवति' इत्याशाजननमायतिप्रदर्शनम् । ५२ । 'योऽहं स भवान्, यन्मम द्रव्यं तद्भवता स्वकृत्येषु प्रयोज्यताम्' इत्यात्मोपनिधानम् । इति । ५३ । उपप्रदानमर्थोपकारः । ५४ । शङ्काजननं निर्भर्त्सनं च भेदः । ५५ । वधः परिक्लेशोऽर्थहरणं दण्डः । इति । ५६ ।

अकान्तिर्व्याघातः पुनरुक्तमपशब्दः संप्लव इति लेखदोषाः । ५७ । तत्र कालपत्रकमचारुविषमविरागाक्षरत्वम् अकान्तिः । ५८ । पूर्वेण पश्चिमस्यानुपपत्तिर्व्याघातः । ५९ । उक्तस्याविशेषेण द्वितीयमुच्चारणं पुनरुक्तम् । ६० ।

४७ साम, उपप्रदान, भेद आणि दंड हे चार उपाय होत. ४८ त्यांपैकी सामोपचार पाच प्रकारचा आहे – गुणांची स्तुती, परस्परातील संबंधाचे कथन, परस्परांनी केलेल्या उपकाराचा निर्देश, भविष्यकालीन लाभाची आशा दाखविणे आणि स्वसमर्पण याप्रमाणे. ४९ त्यातील गुणसंकीर्तन म्हणजे कुल, शरीर, काम, स्वभाव, विद्वत्ता, संपत्ती इत्यादींच्या उत्कृष्टतेची तारीफ, प्रशंसा व स्तुती. ५० संबंधकथन म्हणजे जात, विवाहसंबंध, गुरुबंधुत्व, यज्ञांतील सहकार्य, कुलसंबंध, प्रेमसंबंध आणि मित्रसंबंध यांची आठवण करून देणे. ५१ उभय पक्षांनी एकमेकांवर केलेल्या उपकाराचे स्मरण करून देणे म्हणजे परस्परोपकारसंदर्शन. ५२ 'हे असे केले असता आपणा दोघांना अमुक मिळेल' याप्रमाणे आशा दाखविणे म्हणजे आयतिप्रदर्शन. ५३ 'मी आणि तुम्ही एकच आहोत, जे माझे द्रव्य ते तुमच्या कार्यासाठी खुशाल वापरावे' हे आत्मोपनिधान (स्वसमर्पण). ५४ उपप्रदान म्हणजे द्रव्याची केलेली मदत. ५५ आशंका उत्पन्न करणे व धमकी देणे म्हणजे भेद. ५६ वध, छळ आणि द्रव्यहरण म्हणजे दंड.

५७ अकान्ति (रमणीयतेचा अभाव), व्याघात (अंतर्विरोध), पुनरुक्त, अपशब्द आणि संप्लव (गोंधळ) हे पाच लेखाच्या संबंधातील दोष होत. ५८ लिहिलेले पान काळे असणे, सुंदर नसलेली, लहानमोठी व पुसट अक्षरे असणे म्हणजे अकान्ति. ५९ पुढच्याची मागच्याशी संगती नसणे म्हणजे व्याघात. ६० एकदा म्हटलेले काही फरक न करता पुन्हा उच्चारणे म्हणजे

लिङ्गवचनकालकारकाणामन्यथाप्रयोगोऽपशब्दः । ६१ । अवर्गे वर्गकरणं वर्गे चावर्गक्रिया गुणविपर्यासः संप्लवः । इति । ६२ ।

सर्वशास्त्राण्यनुक्रम्य प्रयोगमुपलभ्य च ।
कौटिल्येन नरेन्द्रार्थे शासनस्य विधिः कृतः ।। ६३ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे शासनाधिकारः दशमोध्यायः । आदित एकत्रिंशः ।

११

[ एकोनत्रिंशं प्रकरणम् – कोशप्रवेश्यरत्नपरीक्षा ]

कोशाध्यक्षः कोशप्रवेश्यं रत्नं सारं फल्गु कुप्यं वा तज्जातकरणाधिष्ठितः प्रतिगृह्णीयात् । १ ।

ताम्रपर्णिकं पाण्ड्यकवाटकं पाशिक्यं कौलेयं चौर्णेयं माहेन्द्रं कार्दमिकं स्रौतसीयं ह्रादीयं हैमवतं च मौक्तिकम् । २ । शुक्तिः शङ्खः प्रकीर्णकं च योनयः । ३ ।

पुनरुक्त. ६१ लिंग, वचन, काळ आणि विभक्ती यांचा चुकीचा उपयोग म्हणजे अपशब्द. ६२ जेथे वर्ग करावयास नको तेथे तो करणे आणि वर्ग करणे आवश्यक तेथे तो न करणे, अशी विपर्यस्तता म्हणजे संप्लव.

६३ सर्व शास्त्रांचे आलोडन करून आणि प्रत्यक्ष प्रयोगांची माहिती करून घेऊन कौटिल्याने राजांसाठी आज्ञापत्राविषयीचे हे नियम तयार केले आहेत.

अकरावा अध्याय

प्रकरण २९ : कोशात स्वीकारावयाच्या रत्नांची पारख

१ कोशाध्यक्षाने कोशात स्वीकारावयाची रत्ने, भारी किमतीचे पदार्थ, कमी किमतीचे पदार्थ आणि जंगलांतील उत्पादने ही हाताखाली त्या त्या वस्तूंचे तज्ज्ञ घेऊन स्वीकारावीत.

२ ताम्रपर्णी नदीत उत्पन्न झालेले, पांड्यक-वाट प्रदेशात उत्पन्न झालेले, पाशिका नदीत उत्पन्न झालेले, कुला नदीत उत्पन्न झालेले, चूर्णी नदीत उत्पन्न झालेले, महेंद्र पर्वतावरील, कर्दमा नदीतील, स्रोतसी नदीतील, सरोवरातील आणि हिमवत् पर्वतावरील – असे मोत्यांचे प्रकार आहेत. ३ शिपले, शंख आणि इतर किरकोळ ही त्यांची उद्‌गमस्थाने.

**मसूरकं त्रिपुटकं कूर्मकमर्धचन्द्रकं कञ्चुकितं यमकं कर्तकं खरकं सिक्तकं कामण्डलुकं श्यावं नीलं दुर्विद्धं चाप्रशस्तम् । ४ । स्थूलं वृत्तं निस्तलं भ्राजिष्णु श्वेतं गुरु स्निग्धं देशविद्धं च प्रशस्तम् । ५ ।**

**शीर्षकमुपशीर्षकं प्रकाण्डकमवघाटकं तरलप्रतिबद्धं चेति यष्टिप्रभेदाः । ६ । यष्टीनामष्टसहस्रमिन्द्रच्छन्दः । ७ । ततोऽर्धं विजयच्छन्दः । ८ । चतुष्षष्टिरर्धहारः । ९ । चतुष्पञ्चाशद्रश्मिकलापः । १० । द्वात्रिंशद् गुच्छः । ११ । सप्तविंशतिर्नक्षत्रमाला । १२ । चतुर्विंशतिरर्धगुच्छः । १३ । विंशतिर्माणवकः । १४ । ततोऽर्धमर्धमाणवकः । १५ । एत एव मणिमध्यास्तन्माणवका भवन्ति । १६ ।**

**एकशीर्षकः शुद्धो हारः । १७ । तद्वच्छेषाः । १८ । मणिमध्योऽर्धमाणवकः । १९ । त्रिफलकः फलकहारः, पञ्चफलको वा । २० ।**

४ मसुरीच्या आकाराचे, तीन पुटे असलेले, कासवाच्या आकाराचे, अर्धचंद्राकृती, वर थर असलेले, जुळे, कातरल्यासारखे, खडबडीत, ठिपके असलेले, कमंडलूच्या आकाराचे, काळसर वर्णाचे, निळसर वर्णाचे आणि चुकीचे भोक पाडलेले असे मोती अप्रशस्त होय. ५ मोठ्या आकाराचे, वाटोळे, बूड नसलेले, पाणीदार, पांढऱ्या रंगाचे, वजनदार, मऊ आणि योग्य ठिकाणी भोक पाडलेले असे मोती प्रशस्त.

६ शीर्षक, उपशीर्षक, प्रकांडक, अवघाटक आणि तरलप्रतिबद्ध असे (लहान मोठे मोती गुंफण्याच्या विविध पद्धतींना अनुसरून होणारे) मोत्यांच्या सरांचे प्रकार. ७ एक हजार आणि आठ सरांचा इंद्रच्छंद नावाचा हार होतो. ८ त्याच्या अर्ध्याइतक्या सरांचा विजयच्छंद होतो. ९ चौसष्ट सरांचा अर्धहार होतो. १० चोपन सरांचा रश्मिकलाप. ११ बत्तीस सरांचा गुच्छ १२ सत्तावीस सरांची नक्षत्रमाला होते. १३ चोवीस सरांचा अर्धगुच्छ. १४ वीस सरांचा माणवक होतो. १५ त्याच्या निम्म्या सरांचा अर्धमाणवक होतो. १६ हेच (इंद्रच्छंदादी) हार, सरांच्या मध्यभागी एक रत्न असल्यास, त्या त्या हारांचे माणवक (इंद्रच्छंदमाणवक इत्यादी) होतात.

१७ फक्त शीर्षक प्रकारचे सर असलेला हार शुद्ध होय. १८ त्याप्रमाणेच इतर सरांच्या बाबतीत समजावे. १९ जर मध्यभागी रत्न असेल तर तो अर्धमाणवक हार. २० (सोन्याच्या) तीन पट्ट्यांवर किंवा पाच पट्ट्यांवर (मध्ये रत्न बसविलेले) असलेला तो फलकहार.

सूत्रमेकावली शुद्धा । २१ । सैव मणिमध्या यष्टिः । २२ । हेममणिचित्रा रत्नावली । २३ । हेममणिमुक्तान्तरोऽपवर्तकः । २४ । सुवर्णसूत्रान्तरं सोपानकम् । २५ । मणिमध्यं वा मणिसोपानकम् । २६ ।

तेन शिरोहस्तपादकटीकलापजालकविकल्पा व्याख्याताः । २७ ।

मणिः कौटो मालेयकः पारसमुद्रकश्च । २८ ।

सौगन्धिकः पद्मरागोऽनवद्यरागः पारिजातपुष्पको बालसूर्यकः । २९ । वैडूर्य उत्पलवर्णः शिरीषपुष्पक उदकवर्णो वंशरागः शुकपत्रवर्णः पुष्यरागो गोमूत्रको गोमेदकः । ३० । इन्द्रनीलो नीलावलीयः कलायपुष्पको महानीलो जम्ब्वाभो जीमूतप्रभो नन्दकः स्रवन्मध्यः । ३१ । शुद्धस्फटिको मूलाटवर्णः शीतवृष्टिः सूर्यकान्तश्च । इति मणयः । ३२ ।

२१ मोत्यांचा एकच सर म्हणजे शुद्ध एकावली. २२ तिच्याच मध्यभागी रत्न असल्यास तिला यष्टि म्हणतात. २३ सुवर्ण मण्यांनी शोभिवंत केलेली (मोत्यांची माळ) ती रत्नावली. २४ सुवर्णमणी आणि मोती एकामागोमाग ओवलेले असता अपवर्तक. २५ सोन्याच्या तारेत ओवलेला तो सोपानक. २६ त्याच्या मध्यभागी मणी असल्यास मणिसोपानक.

२७ यावरूनच मस्तकावर, हातात, पायात आणि कमरेवर वापरावयाच्या मोत्यांच्या हारांचे व जाळ्यांचे विविध प्रकार समजून घ्यावेत.

२८ कौट (कूट पर्वतावरील), मालेयक (माला प्रदेशातील) आणि पारसमुद्रक (समुद्रापलीकडची) अशी तीन उद्‌गमस्थाने असलेली रत्ने असतात

२९. सौगंधिक (माणिक) लाल कमळाच्या रंगाचे, केशराच्या रंगाचे, पारिजाताच्या फुलाच्या रंगाचे (अथवा) बालसूर्याच्या वर्णाचे असते. ३० वैडूर्य नीलकमलाच्या वर्णाचे, शिरीष पुष्पाच्या रंगाचे, पाण्याच्या रंगाचे, बांबूच्या वर्णाचे, पोपटाच्या पंखाच्या वर्णाचे, हळदीसारखे पिवळे, गोमूत्राच्या रंगाचे (किंवा) गोरोचनाच्या वर्णाचे असते. ३१ इंद्रनीलमणी निळचा रेषा असलेला, कलाय-पुष्पाच्या वर्णाचा, गर्द निळा, जांभळाच्या रंगाचा, मेघाच्या वर्णाचा, नंदक (आत पांढरा, बाहेर निळा), स्रवन्मध्य (मधून वाहणाऱ्या पाण्यासारखा भासमान होणारा) असा असतो. ३२ शुद्ध स्फटिक मूलाटी पुष्पाच्या वर्णाचे, थंड वर्षाव करणारे (चंद्रकांत) आणि सूर्यकांत याप्रमाणे असते. असे हे रत्नांचे भेद आहेत.

षडश्रश्चतुरश्रो वृत्तो वा तीव्ररागः संस्थानवानच्छः स्निग्धो गुरुरर्चिष्मानन्तर्गतप्रभः प्रभानुलेपी चेति मणिगुणाः । ३३ । मन्दरागप्रभः सशर्करः पुष्पच्छिद्रः खण्डो दुर्विद्धो लेखाकीर्ण इति दोषाः । ३४ ।

विमलकः सस्यकोऽञ्जनमूलकः पित्तकः सुलभको लोहिताक्षो मृगाश्मको ज्योतीरसको मालेयकोऽहिच्छत्रकः कूर्पः प्रतिकूर्पः सुगन्धिकूर्पः क्षीरवकः शुक्तिचूर्णकः शिलाप्रवालकः पुलकः शुक्लपुलक इत्यन्तरजातयः । ३५ । शेषाः काचमणयः । ३६ ।

सभाराष्ट्रकं तज्जमाराष्ट्रकं कास्तीरराष्ट्रकं श्रीकटनकं मणिमन्तकमिन्द्रवानकं च वज्रम् । ३७ । खनिः स्रोतः प्रकीर्णकं च योनयः । ३८ ।

मार्जाराक्षकं शिरीषपुष्पकं गोमूत्रकं गोमेदकं शुद्धस्फटिकं मूलाटीवर्णं मणिवर्णानामन्यतमवर्णमिति वज्रवर्णाः । ३९ । स्थूलं गुरु प्रहारसहं समकोटिकं

३३ षट्कोणी, चतुष्कोणी अथवा वाटोळे, गडद रंगाचे, सुंदर आकार असलेले, स्वच्छ, मऊ, वजनदार, तेजस्वी, अंतर्बाह्य प्रभायुक्त आणि प्रभेने इतर वस्तू व्यापणारे – असे हे रत्नांचे गुण समजावेत. ३४ रंग आणि प्रभा मंद असणारे, कण असलेले, आत ठिपका असलेले, खंडित झालेले, चुकीचे भोक पाडलेले, रेघारेघांनी व्याप्त – हे रत्नांचे दोष होत.

३५ विमलक (सफेत, लाल अथवा हिरवा), सस्यक (निळा), अंजनमूलक (गर्द निळा), पित्तक (गोरोचनावर्णाचा), सुलभक (पांढरा), लोहिताक्ष (मध्ये काळा आणि कडेला लाल), मृगाश्मक (सफेत-काळा), ज्योतीरसक (सफेत-लाल), मालेयक (सिंदूरवर्णाचा), अहिच्छत्रक (फिकट तांबडा), कूर्प (आत रेतीचे कण असलेला), प्रतिकूर्प (मेणाच्या रंगाचा), सुगंधिकूर्प (मुगाच्या रंगाचा), क्षीरवक (दुधाच्या रंगाचा), शुक्तिचूर्णक (अनेक रंग असलेला), शिलाप्रवालक (पोवळ्याच्या रंगाचा), पुलक (आत काळा) शुक्लपुलक (आत पांढरा) – अशा मण्यांच्या पोटजाती आहेत. ३६ बाकीचे काचेचे मणी होत.

३७ सभाराष्ट्र (विदर्भ), तज्जमाराष्ट्र (कलिंगदेशात), कास्तीरराष्ट्र (काशी), श्रीकटनक पर्वत (कांची देशात), मणिमंत पर्वत (उत्तरापथात) आणि इंद्रवान (कलिंगदेशात) ही, हिरे प्राप्त होण्याची ठिकाणे. ३८ खाणी, नद्या व इतर किरकोळ ही त्यांची उद्गमस्थाने.

३९ मांजरीच्या डोळ्यासारखा, शिरीषपुष्पासारखा, गोमूत्रासारखा, गोरोचनासारखा, शुद्ध स्फटिकासारखा, मूलाटीपुष्पासारखा आणि मण्यांपैकी कोणत्याही मण्यासारखा – हे हिऱ्यांचे वर्ण होत. ४० मोठ्या आकाराचा,

भाजनलेखि तर्कुभ्रामि भ्राजिष्णु च प्रशस्तम् । ४० । नष्टकोणं निरश्रि पार्श्वा-पवृत्तं चाप्रशस्तम् । ४१ ।

प्रवालकम् आलकन्दकं वैवर्णिकं च, रक्तं पद्मरागं च करटगर्भिणिकावर्जं-मिति । ४२ ।

चन्दनं सातनं रक्तं भूमिगन्धि । ४३ । गोशीर्षकं कालताम्रं मत्स्यगन्धि । ४४ । हरिचन्दनं शुकपत्रवर्णमाम्रगन्धि, तार्णसं च । ४५ । ग्रामेरुकं रक्तं रक्तकालं वा बस्तमूत्रगन्धि । ४६ । दैवसभेयं रक्तं पद्मगन्धि, जापकं च । ४७ । जोङ्गकं रक्तं रक्तकालं वा स्निग्धम्, तौरूपं च । ४८ । मालेयकं पाण्डुरक्तम् । ४९ । कुचन्दनं रूक्षमगुरुकालं रक्तं रक्तकालं वा । ५० । कालपर्वतकं रक्तकालमनवद्यवर्णं वा । ५१ । कोशागारपर्वतकं कालं कालचित्रं वा । ५२ । शीतोदकीयं पद्माभं कालस्निग्धं वा । ५३ । नागपर्वतकं रूक्षं शैवलवर्णं वा । ५४ । शाकलं कपिलम् । इति । ५५ ।

वजनदार, प्रहार सहन करू शकणारा, समप्रमाणात बाजू असलेला, भांड्यांवर ओरखडे काढू शकणारा, चातीप्रमाणे गोल फिरणारा आणि चकाकणारा असा हिरा प्रशस्त. ४१ टोके झिजून गेलेला, पैलूंच्या कडा नसलेला आणि एका बाजूला तिरकस असा हिरा अप्रशस्त.

४२ आलकंदक (बर्बर देशातील) आणि वैवर्णिक असे दोन प्रकारचे पोवळे, तांबडे किंवा रक्तकमलाच्या वर्णाचे असावे, कृमींनी पोखरलेले किंवा मध्ये फुगीर असे नसावे.

४३ सातन प्रदेशातील चंदन तांबडे व मातीचा वास असलेले असते. ४४ गोशीर्ष प्रदेशातील काळसर लाल असून त्याला माशाचा वास येतो. ४५ हरि-चंदन पोपटाच्या पंखाच्या वर्णाचे असून त्याला आंब्याचा वास येतो; तृणसा नदीकाठचे चंदनही तसेच असते. ४६ ग्रामेरु पर्वतावरचे तांबडे अथवा तांबूस-काळे व बकऱ्याच्या मुताचा वास असलेले असते. ४७ देवसभा प्रदेशातील तांबडे व कमळाचा वास असलेले; जाप येथील चंदनही तसेच. ४८ जोंग प्रदेशातील तांबडे अथवा तांबूस काळे आणि गुळगुळीत; तसेच तुरूप येथीलही. ४९ माला नदीकाठचे सफेत-लाल असते. ५० कुंचदन खडबडीत, अगुरूसारखे काळे-तांबडे अथवा तांबूस-काळे. ५१ कालपर्वतावरील तांबूस-काळे अथवा केशराच्या रंगाचे. ५२ कोशागारपर्वतावरील काळे अथवा काळे ठिपके असलेले असते. ५३ शीतोदकानदीकाठचे पद्मवर्ण अथवा काळे गुळगुळीत. ५४ नागपर्वता-वरील खडबडीत आणि शेवाळाच्या रंगाचे. ५५ शाकल प्रदेशातील चंदन कपिलवर्ण असते.

**लघु स्निग्धमश्यानं सर्पिःस्नेहलेपि गन्धसुखं त्वगनुसार्यनुल्बणमविराग्युष्णसहं दाहग्राहि सुखस्पर्शनमिति चन्दनगुणाः । ५६ ।**

**अगुरु जोङ्गकं कालं कालचित्रं मण्डलचित्रं वा । ५७ । श्यामं दोङ्गकम् । ५८ । पारसमुद्रकं चित्ररूपमुशीरगन्धि नवमालिकागन्धि वा । इति । ५९ ।**

**गुरु स्निग्धं पेशलगन्धि निर्हार्यग्निसहमसंप्लुतधूमं समगन्धं विमर्दसहमित्यगुरुगुणाः । ६० ।**

**तैलपर्णिकम् अशोकग्रामिकं मांसवर्णं पद्मगन्धि । ६१ । जोङ्गकं रक्तपीतकमुत्पलगन्धि गोमूत्रगन्धि वा । ६२ । ग्रामेरुकं स्निग्धं गोमूत्रगन्धि । ६३ । सौवर्णकुड्यकं रक्तपीतं मातुलुङ्गगन्धि । ६४ । पूर्णकद्वीपकं पद्मगन्धि नवनीतगन्धि वा । ६५ ।**

**भद्रश्रियं पारलौहित्यकं जातीवर्णम् । ६६ । आन्तरवत्यमुशीरवर्णम् । ६७ । उभयं कुष्ठगन्धि च । इति । ६८ ।**

५६ हलके, मऊ, कोरडे न पडणारे, तुपासारखा मऊ लेप करणारे, सुखकर गंध असणारे, त्वचेत भिनणारे, उठून न दिसणारे, रंग फिकट न होणारे, उष्णता सहन करणारे, दाह कमी करणारे आणि सुखकर स्पर्श असलेले – असे हे चंदनाचे गुण.

५७ जोंग प्रदेशातील अगुरु काळे, काळे ठिपके असलेले अथवा विविध रंगांची वर्तुळे असलेले असे असते. ५८ दोंग प्रदेशातील काळसर असते. ५९ समुद्राच्या पलीकडचे विविध रंगांचे असून त्याला वाळ्यासारखा अथवा नवमल्लिकेसारखा वास येतो.

६० जड, मऊ, सुंदर वास असलेले, दूरवर पसरणाऱ्या वासाचे, पुष्कळ वेळ जळत रहाणारे, दाट धूर न होणारे, एकसारखा वास असलेले आणि घासल्याने फार न झिजणारे – असे हे अगुरुचे गुण.

६१ अशोकग्रामातील तैलपर्णिक मांसाच्या रंगाचे आणि पद्माच्या गंधाचे असते. ६२ जोंग प्रदेशातील तांबडसर पिवळे, नीलकमलासारख्या अथवा गोमूत्रासारख्या वासाचे असते. ६३ ग्रामेरु पर्वतावरील मऊ आणि गोमूत्रासारख्या वासाचे असते. ६४ सुवर्णकुड्य प्रदेशातील तांबडसर पिवळे आणि महाळुंगासारख्या वासाचे असते. ६५ पूर्णकद्वीप येथील कमळासारख्या अथवा लोण्यासारख्या वासाचे असते.

६६ लौहित्य नदीच्या पलीकडचे भद्रश्रिय जाईच्या वर्णाचे असते. ६७ अंतरवती येथील वाळ्याच्या वर्णाचे. ६८ आणि त्या दोहोंना कुष्ठासारखा वास येतो.

कालेयकः स्वर्णभूमिजः स्निग्धपीतकः । ६९ । औत्तरपर्वतको रक्तपीतकः । ७० । इति साराः ।

पिण्डक्वाथधूमसहमविरागि योगानुविधायि च । ७१ । चन्दनागुरुवच्च तेषां गुणाः । ७२ ।

कान्तनावकं प्रैयकं चौत्तरपर्वतकं चर्म । ७३ । कान्तनावकं मयूरग्रीवाभम् । ७४ । प्रैयकं नीलपीतश्वेतलेखाबिन्दुचित्रम् । ७५ । तदुभयमष्टाङ्गुलायामम् । ७६ ।

बिसी महाबिसी च द्वादशग्रामीये । ७७ । अव्यक्तरूपा दुहिलितिका चित्रा वा बिसी । ७८ । परुषा श्वेतप्राया महाबिसी । ७९ । द्वादशाङ्गुलायाममुभयम् । ८० ।

श्यामिका कालिका कदली चन्द्रोत्तरा शाकुला चारोहजाः । ८१ । कपिला बिन्दुचित्रा वा श्यामिका । ८२ । कालिका कपिला कपोतवर्णा वा । ८३ । तदुभयमष्टाङ्गुलायामम् । ८४ । परुषा कदली हस्तायता । ८५ । सैव चन्द्रचित्रा

६९ सुवर्णभूमीत होणारे कालेयक मऊ आणि पिवळे असते. ७० उत्तर-पर्वतावरील तांबूस पिवळे असते. याप्रमाणे हे सार (मौल्यवान पदार्थ) होत.

७१ उगाळून गोळा केला असता, उकळले असता अथवा जाळून धूर केला असता वास नष्ट न होणारे, रंग फिकट न होणारे आणि इतर पदार्थांत सहज मिसळून जाणारे असे (तैलपर्णिकादी) असतात. ७२ आणि चंदन व अगुरु यांच्याप्रमाणे त्यांचे गुण असतात.

७३ उत्तर पर्वताकडील कांतनावक आणि प्रैयक असे दोन प्रकारचे कातडे असते. ७४ कांतनावक मोराच्या कंठाच्या वर्णाचे असते. ७५ प्रैयकावर निळे, पिवळे आणि पांढरे ठिपके आणि रेघा असतात. ७६ ती दोन्ही आठ अंगुळे लांब असतात.

७७ बिसी आणि महाबिसी ही चामडी द्वादशग्रामातील. ७८ बिसीचा रंग स्पष्ट नसतो आणि ते केसाळ अथवा विविधरंगी असते. ७९ महाबिसी खडबडीत व बहुतेक रंग पांढरा असलेला असे असते. ८० ती दोन्ही बारा अंगुळे लांब असतात.

८१ श्यामिका, कालिका, कदली, चंद्रोत्तरा आणि शाकुला ही चामडी आरोह प्रदेशातील. ८२ श्यामिका कपिल वर्णाची अथवा ठिपक्यांनी चित्रित झालेली असते. ८३ कालिका कपिल वर्णाची किंवा पारव्या रंगाची. ८४ ही दोन्ही चामडी आठ अंगुळे लांब असतात. ८५ कदली खडबडीत व एक हात लाब

चन्द्रोत्तरा । ८६ । कदलीत्रिभागा शाकुला कोठमण्डलचित्रा कृतकर्णिकाजिनचित्रा वा इति । ८७ ।

सामूरं चीनसी सामूली च बाह्लवेयाः । ८८ । षट्त्रिंशदङ्गुलमञ्जनवर्णं सामूरम् । ८९ । चीनसी रक्तकाली पाण्डुकाली वा । ९० । सामूली गोधूमवर्णा । इति । ९१ ।

सातिना नलतूला वृत्तपुच्छा चौद्राः । ९२ । सातिना कृष्णा । ९३ । नलतूला नलतूलवर्णा । ९४ । कपिला वृत्तपुच्छा च । ९५ । इति चर्मजातयः ।

चर्मणां मृदु स्निग्धं बहुलरोम च श्रेष्ठम् । ९६ ।

शुद्धं शुद्धरक्तं पक्षरक्तं चाविकम्, खचितं वानचित्रं खण्डसंघात्यं तन्तुविच्छिन्नं च । ९७ । कम्बलः कौचपकः कुलमितिका सौमितिका तुरगास्तरणं वर्णकं तलिच्छकं वारवाणः परिस्तोमः समन्तभद्रकं चाविकम् । ९८ । पिच्छिलमार्द्रमिव च सूक्ष्मं मृदु च श्रेष्ठम् । ९९ ।

असते. ८६ तशाच प्रकारची पण चंद्राकृतींनी चित्रित झालेली ती चंद्रोत्तरा. ८७ शाकुला कदलीच्या एकतृतीयांशाइतकी लांब आणि लालसर वर्तुळांनी चित्रित अथवा चामड्यातीलच स्वाभाविक गाठींनी चित्रित झालेली असते.

८८ सामूर, चीनसी आणि सामूली ही बाल्हव प्रदेशातील चामडी. ८९ सामूर हे छत्तीस अंगुळे लांब आणि काजळाच्या रंगाचे असते. ९० चीनसी लालसर काळे अथवा सफेत-काळे असते. ९१ सामूली गव्हाच्या रंगाचे असते.

९२ सातिना, नलतूला आणि वृत्तपुच्छा ही उद्र प्रदेशातील चामडी ९३ सातिना काळ्या रंगाचे असते. ९४ नलतूला नल गवताच्या तुऱ्याच्या रंगाचे असते. ९५ वृत्तपुच्छा कपिल रंगाचे असते – अशा ह्या चामड्यांच्या जाती होत.

९६ चामड्यांमध्ये मऊ, गुळगुळीत व केसाळ चामडे सर्वांत उत्तम.

९७ लोकरीचे कापड पांढऱ्या रंगाचे, शुद्ध तांबड्या रंगाचे आणि मिश्र रंगाचे असते; सुईने विणलेले, निरनिराळ्या रंगांत मागांवर विणलेले, तुकडे विणून जोडलेले व धागे तोडलेले असे ते चार प्रकारचे असते. ९८ कांबळे, कौचपक (शिरस्त्राण), कुलमितिका (हत्तीची झूल), सौमितिका (हत्तीची काळ्या रंगाची झूल), घोड्याचे जीन, वर्णक (रंगीत शाल), तलिच्छक (गालिचा), वारवाण (चिलखत), परिस्तोम (चादर) आणि समंतभद्रक (चिलखताला खाली जोडावयाचे पट्टे) – अशी ही लोकरीची वस्त्रे होत. ९९ गुळगुळीत आणि जणू काय ओले असे, बारीक व मऊ असे लोकरीचे कापड उत्कृष्ट.

अष्टप्रोतिसंघात्या कृष्णा भिङ्गिसी वर्षवारणमपसारक इति नैपालकम् ।१००।

संपुटिका चतुरश्रिका लम्बरा कटवानकं प्रावरकः सत्तलिकेति मृगरोम ।१०१।

वाङ्गकं श्वेतं स्निग्धं दुकूलम् ।१०२। पौण्ड्रकं श्यामं मणिस्निग्धम् ।१०३। सौवर्णकुडचकं सूर्यवर्णं मणिस्निग्धोदकवानं चतुरश्रवानं व्यामिश्रवानं च ।१०४। एतेषामेकांशुकमध्यर्धद्वित्रिचतुरंशुकमिति ।१०५। तेन काशिकं पौण्ड्रकं च क्षौमं व्याख्यातम् ।१०६।

मागधिका पौण्ड्रिका सौवर्णकुडचका च पत्रोर्णा ।१०७। नागवृक्षो लिकुचो बकुलो वटश्च योनयः ।१०८। पीतिका नागवृक्षिका ।१०९। गोधूमवर्णा लैकुची ।११०। श्वेता बाकुली ।१११। शेषा नवनीतवर्णा ।११२। तासां सौवर्णकुडचका श्रेष्ठा ।११३। तया कौशेयं चीनपट्टाश्च चीनभूमिजा व्याख्याताः ।११४।

१०० आठ धागे एकत्र करून विणलेली काळचा रंगाची भिंगिसी आणि पावसापासून रक्षण करणारे अपसारक – ही नेपाळातील लोकरीची वस्त्रे.

१०१ संपुटिका (पोटऱ्यांसाठी आवरण), चतुरश्रिका (चौकोनी आसन), लंबरा (पलंगपोस), कटवानक (पलंगपोसाचा भिन्न प्रकार), प्रावरक (पांघरूण) आणि सत्तलिका (आंथरूण) – हे पशूंच्या केसांपासून बनविलेले पदार्थ.

१०२ वंगदेशातील दुकूल (रेशमी) वस्त्र पांढरे आणि गुळगुळीत असते. १०३ पुंड्र देशातील काळसर व मण्यासारखे गुळगुळीत असते. १०४ सुवर्णकुडच प्रदेशातील (उगवत्या) सूर्याच्या वर्णाचे, पाण्यात भिजवून व मण्याने मऊ घोटून मग विणलेले, एकसारखे विणलेले आणि मिश्र करून विणलेले असे असते. १०५ ही सर्व वस्त्रे एक धागा, दीड धागा, दोन, तीन किंवा चार धागे एकत्र करून विणलेली असतात. १०६ काशी आणि पुंड्र देशांतील क्षौम (रेशमी) वस्त्र अशाच प्रकारचे समजावे.

१०७ पत्रोर्णा (रेशीम) मगध, पुंड्र आणि सुवर्णकुडच ह्या प्रदेशांत होते. १०८ नागवृक्ष, लिकुच, बकुल आणि वट ह्यांच्या पानांवरील रेशमाच्या किडचांपासून ते उत्पन्न होते. १०९ नागवृक्षावरील पिवळे असते. ११० लिकुच वृक्षावरील गव्हाच्या रंगाचे असते. १११ बकुलवृक्षावरील पांढरे असते. ११२ राहिलेले लोण्याच्या वर्णाचे असते. ११३ त्या तिहींमध्ये सुवर्णकुडच प्रदेशातील पत्रोर्णा श्रेष्ठ. ११४ हे वर्णन कौशेय (रेशीम) आणि चीनभूमीतील चीनपट्ट यांनाही लागू पडते.

माधुरमापरान्तकं कालिङ्गकं काशिकं वाङ्गकं वात्सकं माहिषकं च कार्पासिकं श्रेष्ठम् । इति । ११५ ।

अतः परेषां रत्नानां प्रमाणं मूल्यलक्षणम् ।
जातिं रूपं च जानीयान्निधानं नवकर्म च ।। ११६ ।।
पुराणप्रतिसंस्कारं कर्म गुह्यमुपस्करान् ।
देशकालपरीभोगं हिंस्राणां च प्रतिक्रियाम् ।। ११७ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे कोशप्रवेश्यरत्नपरीक्षा एकादशोऽध्यायः । आदितो द्वात्रिंशः ।

## १२

## [ त्रिंशं प्रकरणम् – आकरकर्मान्तप्रवर्तनम् ]

आकराध्यक्षः शुल्बधातुशास्त्ररसपाकमणिरागज्ञस्तज्ज्ञसखो वा तज्जातकर्मकरोपकरणसंपन्नः किट्टमूषाङ्गारभस्मलिङ्गं वाऽऽकरं भूतपूर्वमभूतपूर्वं वा भूमिप्रस्तररसधातुमत्यर्थवर्णगौरवमुग्रगन्धरसं परीक्षेत । १ ।

११५ मधुरा, अपरांत, कलिंग, काशी, वंग, वत्स आणि महिष ह्या प्रदेशांतील सुती कापड श्रेष्ठ होय.

११६–११७ (ह्या आणि) ह्याखेरीज इतरही मौल्यवान पदार्थांचे प्रमाण, मूल्य, त्यांची लक्षणे, जात, रूप, ठेवण्याची जागा, नवीन बनविणे, जुन्याची दुरुस्ती, गुप्तपणे करावयाचे संस्कार, हत्यारे, देश व काल यांच्या अनुरोधाने करावयाचा उपयोग आणि त्यांना हानी पोचविणाऱ्यांचा बंदोबस्त, ह्या सर्व गोष्टींची कोशाध्यक्षाला पूर्ण माहिती असणे आवश्यक आहे.

## बारावा अध्याय

## प्रकरण ३० : खाणी आणि कारखाने सुरू करणे

१ शुल्बशास्त्र (जमिनीतील शिरांचा अभ्यास करणारे शास्त्र), धातुशास्त्र, रसपाक (रसरूपातील धातू आटवून व शुद्ध करून घेण्याची प्रक्रिया), आणि मणिराग (विविध रंगांचे मणी) यांचे स्वतःला ज्ञान असणाऱ्या किंवा ह्या शास्त्रांत पारंगत असलेली माणसे मदतीस घेणाऱ्या आकराध्यक्षाने त्या कामात तरबेज असलेले कामगार आणि उपकरणे बरोबर घेऊन कीट, मुशी, कोळसे व राख ह्या चिन्हांच्या साह्याने जुन्या खाणीचा अथवा खूप दाट रंग व फार वजन असलेला, तसेच उग्र वास आणि चव असलेला भूमिधातू, प्रस्तरधातू, किंवा रसधातू जेथे असेल तेथे संभाव्य नवीन खाणीचा शोध घ्यावा.

पर्वतानामभिज्ञातोद्देशानां बिलगुहोपत्यकालयनगूढखातेष्वन्तः प्रस्यन्दिनो जम्बूचूततालफलपक्वहरिद्राभेदगुडहरितालमनःशिलाक्षौद्रहिङ्गुलुकपुण्डरीकशुक-मयूरपत्रवर्णाः सवर्णोदकौषधिपर्यन्ताश्चिक्कणा विशदा भारिकाश्च रसाः काञ्चनिकाः । २ । अप्सु निष्ठ्यूतास्तैलवद्विसर्पिणः पङ्कमलग्राहिणश्च ताम्ररूप्ययोः शतादुपरि वेद्धारः । ३ । तत्प्रतिरूपकमुग्रगन्धरसं शिलाजतु विद्यात् । ४ ।

पीतकास्ताम्रकास्ताम्रपीतका वा भूमिप्रस्तरधातवो भिन्ना नीलराजीवन्तो मुद्गमाषकृसरवर्णा वा दधिबिन्दुपिण्डचित्रा हरिद्राहरीतकीपद्मपत्रशैवलयकृत्प्लीहानवद्यवर्णा भिन्नाश्चुञ्चुवालुकालेखाबिन्दुस्वस्तिकवन्तः सगुलिका अर्चिष्मन्तस्ताप्यमाना न भिद्यन्ते बहुफेनधूमाश्च सुवर्णधातवः प्रतीवापार्थास्ताम्ररूप्यवेधनाः । ५ ।

२ ज्यांच्या परिसरांची माहिती आहे अशा पर्वतांवरील बिळें, गुहा, सपाट प्रदेश, कोरीव लेणे, गुप्त (झाकलेला) खड्डा, यांतून स्रवणारे जांभूळ, आंबा, ताडफळ, पिकलेल्या हळदीचा काप, गूळ, हरताळ, मनशीळ, मध, हिंगूळ, कमळ, पोपटाचा पंख व मोराचा पंख यांसारखे रंग असलेले, सभोवती त्याच रंगाचे पाणी व वनस्पती असलेले, चिक्कण, स्वच्छ आणि वजनदार असे प्रवाह हे कांचनाने युक्त असतात. ३ पाण्यात टाकले असता तेलाप्रमाणे पसरणारे आणि चिखल व मळ शोषून घेणारे असतील तर हे रस शंभराहून वर वजन असलेल्या तांब्याचा व रुप्याचा वेध करून त्यांचे सुवर्ण करतात. ४ वरून अगदी तसेच दिसणारे, परंतु (केवळ) उग्र वास व चव असलेले ते शिलाजित होय असे समजावे.

५ पिवळ्या रंगाचे, तांबड्या रंगाचे अथवा लालसर पिवळ्या रंगाचे असे जमिनीत आढळणारे किंवा खडकात आढळणारे धातू, जे फोडले असता आत निळ्या ओळींनी युक्त अथवा मूग, उडीद किंवा खिचडी यांच्या रंगाचे असतात, जे दह्यासारख्या ठिपक्यांनी अथवा गाठींनी चित्रित झालेले असतात, ज्यांचा वर्ण, हळद, हिरडा, कमलदल, शेवाळे, यकृत, प्लीहा अथवा केशर यांसारखा असतो, जे फोडले असता आत बारीक वाळूच्या रेषा, ठिपके किंवा स्वस्तिके यांनी युक्त असतात, ज्यांच्या आत गोळ्या असतात, जे देदीप्यमान असून तापविले असता फुटत नाहीत पण ज्यांतून पुष्कळ फेस आणि धूर निघतो – असे धातू सुवर्णधातू होत, (तांबे व रुपे यांत) मिसळण्याच्या उपयोगाचे, तांबे व रुपे यांचा वेध करणारे (व त्यांचे सोन्यात रूपांतर करणारे).

शङ्खकर्पूरस्फटिकनवनीतकपोतपारावतविमलकमयूरग्रीवावर्णाः सस्यकगोमेदकगुडमत्स्यण्डिकावर्णाः कोविदारपद्मपाटलीकलायक्षौमातसीपुष्पवर्णाः ससीसाः साञ्जना विस्रा भिन्नाः श्वेताभाः कृष्णाः कृष्णाभाः श्वेताः सर्वे वा लेखाबिन्दुचित्रा मृदवो ध्मायमाना न स्फुटन्ति बहुफेनधूमाश्च रूप्यधातवः । ६ ।

सर्वधातूनां गौरववृद्धौ सत्त्ववृद्धिः । ७ ।

तेषामशुद्धा मूढगर्भा वा तीक्ष्णमूत्रक्षारभाविता राजवृक्षवटपीलुगोपित्तरोचनामहिषखरकरभमूत्रलेण्डपिण्डबद्धास्तत्प्रतीवापास्तदवलेपा वा विशुद्धाः स्रवन्ति । ८ ।

यवमाषतिलपलाशपीलुक्षारैर्गोक्षीराजक्षीरैर्वा कदलीवज्रकन्दप्रतीवापो मार्दवकरः । ९ ।

मधुमधुकमजापयः सतैलं
घृतगुडकिण्वयुतं सकन्दलीकम् ।

६ ज्या धातूचा वर्ण, शंख, कापूर, स्फटिक, लोणी, कबूतर, पारवा, विमलक मणी किंवा मोराची मान यांसारखा असतो, अथवा सस्यकमणी, गोमेदकमणी, गूळ किंवा तांबूस साखर यांसारखा असतो, अथवा कोविदार, पद्म, पाटली, कलाय, क्षौम किंवा अतसी यांच्या फुलासारखा असतो, आणि जे धातू शिश्याने युक्त, अंजनाने युक्त, कच्च्या मांसाचा वास असलेले, फोडले असता पांढरी छटा असलेल्या काळ्या रंगाचे अथवा काळी छटा असलेल्या पांढऱ्या रंगाचे अथवा सर्व (धातू) रेघा आणि ठिपके यांनी युक्त, मऊ, तापविले असता फुटत नाहीत पण ज्यांतून पुष्कळ फेस आणि धूर निघतो – असे धातू रुप्याचे धातू होत.

७ सर्व धातूंच्या संबंधात ते वजनात जितके भारी तितका त्यांत शुद्ध धातूचा अंश अधिक असतो.

८ त्या धातूंपैकी जे अशुद्ध असतील अथवा आत अस्फुट असतील त्यांना तीक्ष्ण मूत्र व क्षार यांत भिजत ठेवून राजवृक्ष, वड, पीलु (यांची पाने अथवा साल), गोपित्त, गोरोचन आणि म्हैस, गाढव किंवा तरुण हत्ती यांचे मलमूत्र यांच्या लगद्यात मिसळलें असता – त्यात बुडविले असता किंवा त्याचा लेप केला असता – ते शुद्ध रूपात वाहतात.

९ जव, उडीद, तीळ, पलाश आणि पीलु यांचे क्षार यांच्या सहित अथवा गाईच्या आणि बकरीच्या दुधासहित कदली आणि वज्रकंद यांच्या मिश्रणात धातू बुडविला म्हणजे त्याला मऊपणा येतो.

यदपि शतसहस्रधा विभिन्नं
भवति मृदु त्रिभिरेव तन्निषेकैः ॥ १० ॥

गोदन्तशृङ्गप्रतीवापो मृदुस्तम्भनः । ११ ।

भारिकः स्निग्धो मृदुश्च प्रस्तरधातुर्भूमिभागो वा पिङ्गलो हरितः पाटलो लोहितो वा ताम्रधातुः । १२ ।

काकमेचकः कपोतरोचनावर्णः श्वेतराजिनद्धो वा विस्रः सीसधातुः । १३ ।

ऊषरकर्बुरः पक्वलोष्टवर्णो वा त्रपुधातुः । १४ ।

खुरुम्बः पाण्डुरोहितः सिन्दुवारपुष्पवर्णो वा तीक्ष्णधातुः । १५ ।

काकाण्डभुजपत्रवर्णो वा वैकृन्तकधातुः । १६ ।

अच्छः स्निग्धः सप्रभो घोषवान् शीतस्तीव्रस्तनुरागश्च मणिधातुः । १७ ।

धातुसमुत्थं तज्जातकर्मान्तेषु प्रयोजयेत् । १८ । कृतभाण्डव्यवहारमेकमुखम्, अत्ययं चान्यत्र कर्तृक्रेतृविक्रेतृणां स्थापयेत् । १९ ।

१० मध, ज्येष्ठीमध, बकरीचे दूध, तेल, तूप, गूळ, मद्यबीज, कदली – या सर्वांच्या मिश्रणात तीनच वेळा बुडवून काढल्यास शतसहस्र ठिकाणी तडे गेलेला सुद्धा धातू मऊ होतो.

११ गाईचे दात व शिंगे यांचे चूर्ण मिसळले असता धातूचा मऊपणा नाहीसा होतो.

१२ वजनात भारी, गुळगुळीत आणि मऊ असा खडकातील धातू अथवा जमिनीचा भाग, पिंगट, हिरवा, तांबूस अथवा लाल असला तर तो तांब्याचा धातू होय.

१३ कावळ्यासारखा काळा, कबूतर किंवा गोरोचना यांच्या वर्णाचा अथवा पांढऱ्या रेघांनी भरलेला आणि कच्च्या मांसाचा वास असलेला तो शिशाचा धातू.

१४ खार जमिनीसारखा कवऱ्या रंगाचा अथवा भाजलेल्या मातीच्या ढेकळाच्या रंगाचा तो जस्ताचा धातू.

१५ मुख्यतः मऊ दगड असलेला, सफेत-तांबूस अथवा निर्गुंडीच्या फुलाच्या रंगाचा तो लोखंडाचा धातू.

१६ कावळ्याच्या अंड्याच्या अथवा भूर्जपत्राच्या वर्णाचा तो वैकृंतकाचा धातू.

१७ स्वच्छ, मऊ, कांतिमान, नाद करणारा, थंड, कठीण आणि फिकट रंगाचा तो मण्यांचा धातू.

१८ अशोधित धातूंपासून निष्पन्न झालेले शुद्ध धातू त्यांच्या त्यांच्या कारखान्यांत उपयोगास आणावेत. १९ तेथे तयार केलेल्या वस्तूंचा व्यापार, त्याच

**आकरिकमपहरन्तमष्टगुणं दापयेद् अन्यत्र रत्नेभ्यः । २० । स्तेनमनिसृष्टोपजीविनं च बद्धं कर्म कारयेत्, दण्डोपकारिणं च । २१ ।**

**व्ययक्रियाभारिकमाकरं भागेन प्रक्रयेण वा दद्यात्, लाघविकमात्मना कारयेत् । २२ ।**

**लोहाध्यक्षस्ताम्रसीसत्रपुवैकृन्तकारकूटवृत्तकंसताललोहकर्मान्तान् कारयेत्, लोहभाण्डव्यवहारं च । २३ ।**

**लक्षणाध्यक्षश्चतुर्भागताम्रं रूप्यरूपं तीक्ष्णत्रपुसीसाञ्जनानामन्यतममाषबीजयुक्तं कारयेत् — पणम् अर्धपणं पादम् अष्टभागमिति, पादाजीवं ताम्ररूपं — माषकम् अर्धमाषकं काकणीम् अर्धकाकणीमिति । २४ ।**

**रूपदर्शकः पणयात्रां व्यावहारिकीं कोशप्रवेश्यां च स्थापयेत् । २५ ।**

एका ठिकाणी चालू करावा आणि जे त्या ठिकाणापासून दुसरीकडे तशा वस्तू करतील, करवितील अथवा विकतील त्यांना (यथोचित) दंड करावा.

२० अपहार करणाऱ्या खाण कामगाराकडून आठपट किंमत वसूल करावी; याला अपवाद रत्नांचा (रत्न चोरल्यास वधाची शिक्षा). २१ चोर, परवानगीशिवाय (खाणीचा) धंदा करणारा आणि शारीरिक मेहनतीच्या द्वारा दंड वसूल करून देणारा यांच्यावर बंधन घालून त्यांना खाणीत काम करावयास लावावे.

२२ ज्या खाणीला खर्च व मेहनत खूप लागत असतील ती खाण हिस्सेरसीने अथवा भाड्याने चालविण्यास द्यावी; कमी खर्चाची व मेहनतीची स्वतः चालवावी.

२३ लोहाध्यक्षाने तांबे, शिसे, जस्त, वैकृंतक, पितळ, पोलाद, कासे, ताल आणि लोखंड यांच्या मालाचे कारखाने स्थापावेत आणि त्या धातूंच्या वस्तूंच्या विक्रीची व्यवस्था करावी.

२४ लक्षणाध्यक्षाने (टाकसाळीवरील अधिकाऱ्याने) एकचतुर्थांश भाग तांबे आणि एक मासा लोखंड, जस्त, शिसे व अंजन यांपैकी एखादा धातू टणकपणासाठी असलेली अशी चांदीची नाणी पाडावीत — पण, अर्धापण, पावपण, अष्टमांशपण ह्या नावाची, तसेच एकचतुर्थांश भाग (हलक्या धातूचे) मिश्रण असलेली — माषक, अर्धमाषक, काकणी, अर्धकाकणी ह्या नावाची तांब्याची नाणी पाडावीत.

२५ नाणी पारखणाऱ्या अधिकाऱ्याने व्यापारात उपयोगी अशी आणि खजिन्यात भरणा करावयाची अशी पणांची चलनपद्धती स्थापन करावी.

रूपिकमष्टकं शतम्, पञ्चकं शतं व्याजीं, पारीक्षिकमष्टभागिकं शतं, पञ्चविंशतिपणमत्ययं च अन्यत्र कर्तृक्रेतृविक्रेतृपरीक्षितृभ्यः । २६ ।

खन्यध्यक्षः शङ्खवज्रमणिमुक्ताप्रवालक्षारकर्मान्तान् कारयेत्, पणनव्यवहारं च । २७ ।

लवणाध्यक्षः पाकमुक्तं लवणभागं प्रक्रयं च यथाकालं संगृह्णीयाद्, विक्रयाच्च मूल्यं रूपं व्याजीं च । २८ । आगन्तुलवणं षड्भागं दद्यात् । २९ । दत्तभागविभागस्य विक्रयः, पञ्चकं शतं व्याजीं रूपं रूपिकं च । ३० । क्रेता शुल्कं राजपण्यच्छेदानुरूपं च वैधरणं दद्यात्, अन्यत्र क्रेता षट्छतमत्ययं च । ३१ । विलवणमुत्तमं दण्डं दद्याद्, अनिसृष्टोपजीवी च अन्यत्र वानप्रस्थेभ्यः । ३२ । श्रोत्रियास्तपस्विनो विष्टयश्च भक्तलवणं हरेयुः । ३३ । अतोऽन्यो लवणक्षारवर्गः शुल्कं दद्यात् । ३४ ।

२६ नाणी पाडून देण्याबद्दल दस्तुरी शेकडा आठ, वजनामापांतील फरकाबद्दल आकारणी शेकडा पाच, पारखणाऱ्याचा मुशाहिरा शेकडा एकअष्टमांश आणि इतरत्र नाणी पाडणारे, विकत घेणारे, विकणारे आणि पारखणारे यांना पंचवीस पण दंड, हे ठरवून द्यावे.

२७ खाणींवरील अध्यक्षाने शंख, हिरे, रत्ने, मोती, पोवळी व क्षार यांच्या वस्तू तयार करण्याच्या जागा निश्चित कराव्यात आणि त्या वस्तूंच्या क्रयविक्रयाची व्यवस्था करावी.

२८ लवणाध्यक्षाने खाणीतून तयार झालेले मीठ बाहेर काढले म्हणजे मिठाचा ठरलेला हिस्सा व भाडे योग्य वेळी वसूल करावे, तसेच ते विकले म्हणजे त्याची किंमत, तपासणीची आकारणी आणि वजनामापांतील फरकाबद्दल आकारणी ही वसूल करावीत. २९ परदेशातून आयात झालेल्या मिठाचा सहावा भाग सरकारला मिळावा. ३० जेव्हा मिठाचा हिस्सा व वाटा दिले गेले असतील, तसेच शेकडा पाच व्याजी, तपासणीचा आकार आणि बनविण्याबद्दल आकारणी (ही सर्व दिली गेली असतील) तेव्हाच ते विकण्यास परवानगी द्यावी. ३१ (परदेशी मीठ) विकत घेणाऱ्याने जकात आणि सरकारी विक्रीतील तुटीला अनुरूप अशी नुकसानभरपाई द्यावी; (जकात नाक्याहून) दुसरीकडे ते विकत घेणाऱ्याने वर सहाशे पण दंड दिला पाहिजे. ३२ भेसळीच्या मिठाबद्दल उत्तम साहसदंड करावा, तसेच परवानगीशिवाय मिठाचे उत्पादन करणाऱ्यालाही तोच दंड करावा; याला वानप्रस्थांचा अपवाद (त्यांना दंड नाही). ३३ वेदविद्यासंपन्न ब्राह्मण, तपस्वी आणि मजूर यांनी आपल्या भोजनासाठी मीठ तयार करून घेण्यास हरकत नाही. ३४ याहून इतर लवणवर्गातील पदार्थ व (गुडादी) क्षारवर्गातील पदार्थ यांच्या आयातीवर फक्त जकात द्यावी.

एव मूल्यं च भागं च व्याजीं परिघमत्ययम् ।
शुल्कं वैधरणं दण्डं रूपं रूपिकमेव च ।। ३५ ।।
खनिभ्यो द्वादशविधं धातुं पण्यं च संहरेत् ।
एवं सर्वेषु पण्येषु स्थापयेन्मुखसंग्रहम् ।। ३६ ।।
आकरप्रभवः कोशः कोशाद्दण्डः प्रजायते ।
पृथिवी कोशदण्डाभ्यां प्राप्यते कोशभूषणा ।। ३७ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे आकरकर्मान्तप्रवर्तनम् द्वादशोऽध्यायः । आदितस्त्रयस्त्रिंशः ।

१३

[ एकत्रिंशं प्रकरणम् – अक्षशालायां सुवर्णाध्यक्षः ]

**सुवर्णाध्यक्षः सुवर्णरजतकर्मान्तानामसंबन्धावेशनचतुःशालामेकद्वारामक्षशालां कारयेत् । १ । विशिखामध्ये सौवर्णिकं शिल्पवन्तमभिजातं प्रात्ययिकं च स्थापयेत् । २ ।**

३५-३६ याप्रमाणे (आकराध्यक्षाने) खाणींपासून मूल्य, हिस्सा, कसर, परिघ (सरकारी एकाधिकारामुळे लादलेला कर), अत्यय (नियमभंगाबद्दल दंड) जकात, वैधरण (सरकारी मालाच्या विक्रीतील तुटीची भरपाई), दंड (अपराधाबद्दल), रूप (परीक्षकाची फी), रूपिक (बनविण्याबद्दल आकार), धातू आणि त्यांपासून तयार केलेले विक्रेय पदार्थ असे बारा प्रकारचे उत्पन्न गोळा करावे. याप्रमाणे सर्व विक्रेय पदार्थांच्या संबंधात उत्पन्नाच्या मुख्य बाबींचा संग्रह निश्चित करावा.

३७ खाणींपासून कोशाची उत्पत्ती होते, कोशामुळे सैन्य उभारले जाते. कोश आणि सैन्य यांच्या बळावर समृद्ध कोशच जिचे भूषण आहे अशा पृथ्वीचा लाभ होतो.

तेरावा अध्याय

प्रकरण ३१ : सुवर्णावर प्रक्रिया करण्याच्या कारखान्यात सुवर्णाध्यक्ष

१ सुवर्णाध्यक्षाने सोने व रुपे यांची कामे करून घेण्यासाठी एकमेकांपासून अलग अशा काम करण्याच्या चार सोप्यांनी युक्त असा चौक असलेली व प्रवेशासाठी एकच दार असलेली अक्षशाला बांधून घ्यावी. २ सराफकट्ट्यामध्ये कसबी, घरंदाज आणि विश्वासू अशा (सरकारी) सुवर्णकाराची स्थापना करावी.

**जाम्बूनदं शातकुम्भं हाटकं वैणवं शृङ्गशुक्तिजं जातरूपं रसविद्धमाकरोद्गतं च सुवर्णम् । ३ । किञ्जल्कवर्णं मृदु स्निग्धमनादि भ्राजिष्णु च श्रेष्ठम्, रक्त-पीतकं मध्यमम्, रक्तमवरम् । ४ ।**

**श्रेष्ठानां पाण्डु श्वेतं चाप्राप्तकम् । ५ । तद्येनाप्राप्तकं तच्चतुर्गुणेन सीसेन शोधयेत् । ६ । सीसान्वयेन भिद्यमानं शुष्कपटलैर्ध्मापयेत् । ७ । रूक्षत्वाद्भिद्यमानं तैलगोमये निषेचयेत् । ८ । आकरोद्गतं सीसान्वयेन भिद्यमानं पाकपत्राणि कृत्वा गण्डिकासु कुट्टयेत्, कदलीवज्रकन्दकल्के वा निषेचयेत् । ९ ।**

**तुत्थोद्गतं गौडिकं काम्बुकं चाक्रवालिकं च रूप्यम् । १० । श्वेतं स्निग्धं मृदु च श्रेष्ठम् । ११ । विपर्यये स्फोटनं च दुष्टम् । १२ । तत्सीसचतुर्भागेन शोधयेत् । १३ । उद्गतचूलिकमच्छं भ्राजिष्णु दधिवर्णं च शुद्धम् । १४ ।**

**शुद्धस्यैको हारिद्रस्य सुवर्णो वर्णकः । १५ । ततः शुल्बकाकण्युत्तरापसारिता**

३ जांबूनद (जंबूनदीतील), शातकुंभ (शतकुंभ पर्वतावरील), हाटक (हाट प्रदेशातील), वैणव (वेणु पर्वतावरील), शृङ्गशुक्तिज (सुवर्णभूमीतील शृंगशक्ति येथील), स्वाभाविक रूपाचे, रसधातूमुळे परिर्वातत झालेले आणि खाणीतून निघालेले – असे सोन्याचे प्रकार होत. ४ कमळाच्या तंतूंच्या रंगाचे, मऊ, गुळगुळीत, नादरहित आणि चकाकणारे सोने श्रेष्ठ, तांबूस पिवळे मध्यम, लाल कनिष्ठ होय.

५ श्रेष्ठ जातीच्या सोन्यात फिकट आणि पांढऱ्या रंगाचे अशुद्ध समजावे. ६ ज्यामुळे अशुद्धी आली असेल ते त्याच्या चौपट शिशात मिश्र करून दूर करावे. ७ शिशाशी मिश्रण केले असता त्याचे तुकडे पडत असल्यास रानशेणींनी त्याला आच द्यावी. ८ रूक्षपणामुळे तुकडे पडत असल्यास ते तेल आणि शेण यांत बुडवून ठेवावे. ९ खाणीतील सोन्याचे शिशाच्या मिश्रणाने तुकडे पडत असल्यास तापवून त्याचे पत्रे करावेत आणि ते लाकडी ऐरणीवर कुटावेत अथवा कदली आणि वज्रकंद यांच्या लगद्यात ते सोने घालून ठेवावे.

१० तुत्थ पर्वतावरील, गौड प्रदेशातील, कंबु पर्वतावरील आणि चक्रवाल पर्वतावरील असे रुप्याचे चार प्रकार (स्थानपरत्वे झालेले). ११ पांढरे, गुळगुळीत आणि मऊ रुपे श्रेष्ठ. १२ त्याच्या उलट प्रकारचे आणि तडे जाणारे ते वाईट. १३ एकचतुर्थांश भाग शिसे घालून ते शुद्ध करावे. १४ (तापविताना) वर बुडबुडे येणारे, स्वच्छ, चकाकणारे व दह्याच्या रंगाचे रुपे शुद्ध समजावे.

१५ शुद्ध, हळदीच्या रंगाचे, एक सुवर्ण वजनाचे सोने हा सर्वोत्कृष्ट कस. १६ त्या सुवर्ण वजनातून एक काकणी सोने काढून त्याऐवजी तितकेच तांबे

**आ चतुःसीमान्तादिति षोडश वर्णकाः । १६ । सुवर्णं पूर्वं निकष्य पश्चाद्वर्णिकां निकषयेत् । १७ । समरागलेखमनिम्नोन्नते देशे निकषितम्, परिमृदितं परिलीढं नखान्तराद्वा गैरिकेणावचूर्णितमुपधिं विद्यात् । १८ । जातिहिङ्गुलुकेन पुष्पकासीसेन वा गोमूत्रभावितेन दिग्धेनाग्रहस्तेन संस्पृष्टं सुवर्णं श्वेतीभवति । १९ । सकेसरः स्निग्धो मृदुर्भ्राजिष्णुश्च निकषरागः श्रेष्ठः । २० ।**

**कालिङ्गकस्तापीपाषाणो वा मुद्गवर्णो निकषः श्रेष्ठः । २१ । समरागी विक्रयक्रयहितः । २२ । हस्तिच्छविकः सहरितः प्रतिरागी विक्रयहितः । २३ । स्थिरः परुषो विषमवर्णश्चाप्रतिरागी क्रयहितः । २४ ।**

**छेदश्चिक्कणः समवर्णः श्लक्ष्णो मृदुर्भ्राजिष्णुश्च श्रेष्ठः । २५ । तापो बहिरन्तश्च समः किञ्जल्कवर्णः कुरण्डकपुष्पवर्णो वा श्रेष्ठः । २६ । श्यावो नीलश्चाप्राप्तकः । २७ ।**

घातले असता आणि याप्रमाणेच एक एक काकणी वाढवीत जाऊन चार माषकांपर्यंत वाढविले असता सोळा कस होतात. १७ (ज्याचा कस पहावयाचा त्या) सोन्याची कसोटीच्या दगडावर प्रथम रेघ ओढून नंतर (वरील सतरापैकी एका) कसाची रेघ ओढावी. १८ दगडाच्या उंचसखल नसलेल्या सपाट पृष्ठभागावर त्याच रंगाची रेघ उमटलेली असेल तर तोच कस असे समजावे; जर जोराने घासले असेल किंवा अगदी हळू रेघ ओढली असेल अथवा नखात दडविलेल्या गेरूच्या चूर्णाने ती मिश्रित केली असेल तर त्यात फसवणूक आहे असे जाणावे. १९ गोमूत्रात भिजविलेला जातिहिंगूळ अथवा पुष्पकासीस चोपडलेल्या हाताच्या अग्रभागाने सोन्याला स्पर्श केला असता ते पांढरे होते. २० (तंतुसदृश) केसरांनी युक्त, गुळगुळीत, मऊ आणि चकाकणारा असा कसासाठी काढलेल्या रेषेचा रंग श्रेष्ठ होय.

२१ कलिंग देशातील किंवा तापी नदीतील मुगाच्या वर्णाचा दगड कस काढण्यासाठी श्रेष्ठ. २२ रंग जसा असेल तसाच दाखविणारा दगड क्रय व विक्रय दोहोला हितकर. २३ हत्तीच्या रंगाचा, हिरवी झाक असलेला दगड रंगात उठावदारपणा दाखवितो, तो विक्री करण्याच्या कामी हितकर. २४ कठीण, खडबडीत, एकसारखा रंग नसलेला दगड सोन्याचा रंग आहे त्यापेक्षा फिकट दाखवितो, तो विकत घेण्याच्या कामी हितकर.

२५ (परीक्षेसाठी सोन्याचा तुकडा तोडल्यास) तोडलेली जागा चिक्कण, एकाच रंगाची, गुळगुळीत, मऊ आणि चमकदार असेल तर ते सोने श्रेष्ठ. २६ तापविले असता जे आतबाहेर सारखेच तापते, कमळाच्या केसरांच्या वर्णाचे

तुलाप्रतिमानं पौतवाध्यक्षे वक्ष्यामः । २८ । तेनोपदेशेन रूप्यसुवर्णं दद्यादाददीत च । २९ ।

अक्षशालामनायुक्तो नोपगच्छेत् । ३० । अभिगच्छन्नुच्छेद्यः । ३१ । आयुक्तो वा सरूप्यसुवर्णस्तेनैव जीयेत । ३२ ।

विचितवस्त्रहस्तगुह्याः काञ्चनपृषतत्वष्टृतपनीयकारवो ध्मायकचरकपांसुधावकाः प्रविशेयुर्निष्कसेयुश्च। ३३ । सर्वं चैषामुपकरणमनिष्ठिताश्च प्रयोगास्तत्रैवावतिष्ठेरन् । ३४ । गृहीतं सुवर्णं धृतं च प्रयोगं करणमध्ये दद्यात् । ३५ । सायं प्रातश्च लक्षितं कर्तृकारयितृमुद्राभ्यां निदध्यात् । ३६ ।

क्षेपणो गुणः क्षुद्रकमिति कर्माणि । ३७ । क्षेपणः काचार्पणादीनि । ३८ । गुणः सूत्रवानादीनि । ३९ । घनं सुषिरं पृषतादियुक्तं क्षुद्रकमिति । ४० ।

अथवा कोरांटीच्या फुलाच्या वर्णाचे होते ते सोने शुद्ध. २७ काळसर किंवा निळे पडल्यास ते अशुद्ध.

२८ पौतवाध्यक्षाविषयीच्या प्रकरणात (अध्याय २.१९) आम्ही वजने व मापे यांची माहिती देऊ. २९ तेथे सांगितल्याप्रमाणे सोने व रुपे द्यावे आणि घ्यावे.

३० ज्याला तेथे कामावर नेमलेले नाही अशा मनुष्याने सोनेरुप्याच्या कारखान्याकडे जाता कामा नये. ३१ जो जाईल त्याचा उच्छेद करावा. ३२ किंवा तेथे कामावर असलेला मनुष्य जर सोने व रुपे बरोबर आणील तर ते जप्त करून घ्यावे.

३३ जडावाचे काम करणारे, सोन्याचे मणी करणारे, मुलामा देणारे व पत्रा चढविणारे आणि दागिन्यांसाठी सोन्याचे प्रकार बनविणारे कारागीर, तसेच भाता फुंकणारे, धूळ धुणारे व इतर नोकर यांनी आपले हात, कपडे व गुह्य भाग यांची झडती देऊन मग आत जावे आणि बाहेर पडावे. ३४ आणि त्यांची सर्व उपकरणे आणि पुरी न झालेली कामे तेथल्या तेथेच राहू द्यावीत. ३५ घेतलेले सोने आणि चालू असलेले काम कचेरीमध्ये ताब्यात द्यावे. ३६ आणि संध्याकाळी व सकाळी करणारा (कारागीर) आणि करविणारा (अधिकारी) ह्या दोहोंची मुद्रा त्यावर अंकित करून ठेवून द्यावे.

३७ क्षेपण (जडाव), गुण (तार) आणि क्षुद्रक (किरकोळ) असे हे (दागिन्यांसाठी करावयाच्या) कामाचे तीन प्रकार आहेत. ३८ क्षेपण म्हणजे सोन्यात रत्न बसविणे इत्यादी. ३९ गुण म्हणजे तारांची साखळी करणे, गुंफण इत्यादी. ४० क्षुद्रक म्हणजे भरीव किंवा पोकळ सुवर्णमणी आदींनी युक्त दागिना बनविणे.

अर्पयेत्काचकर्मणः पञ्चभागं काञ्चनं दशभागं कटुमानम् ।४१। ताम्रपादयुक्तं रूप्यं रूप्यपादयुक्तं वा सुवर्णं संस्कृतकम्, तस्माद्रक्षेत् ।४२। पृषतकाचकर्मणः त्रयो हि भागाः परिभाण्डं द्वौ वास्तुकम्, चत्वारो वा वास्तुकं त्रयः परिभाण्डम् ।४३।

त्वष्टृकर्मणः शुल्बभाण्डं समसुवर्णेन संयूहयेत् ।४४। रूप्यभाण्डं घनं सुषिरं वा सुवर्णार्धेनावलेपयेत् ।४५। चतुर्भागसुवर्णं वा वालुकाहिङ्गुलुकस्य रसेन चूर्णेन वा वासयेत् ।४६।

तपनीयं ज्येष्ठं सुवर्णं सुरागं समसीसातिक्रान्तं पाकपत्रपक्वं सैन्धविकयोज्ज्वालितं नीलपीतश्वेतहरितशुकपत्रवर्णानां प्रकृतिर्भवति ।४७। तीक्ष्णं चास्य मयूरग्रीवाभं श्वेतभङ्गं चिमिचिमायितं पीतचूर्णितं काकणिकः सुवर्णरागः ।४८।

४१ जडावाच्या कामात सोन्याचा एकपंचमांश भाग रत्न बसविण्यासाठी बुडाशी तळ म्हणून वापरावा आणि एकदशांश भाग बाजूचे रत्न पक्के करण्यासाठी वापरावा (उरलेले सातदशांश सोने रत्नाशी असंबद्ध – उदाहरणार्थ आंगठीत – असावे). ४२ एकचतुर्थांश तांबे आत असलेले रुपे आणि एकचतुर्थांश रुपे आत असलेले सोने फसवणूक करते (कारण जडाव केल्यावर धातूत मिश्रण आहे हे कळून येत नाही) त्याबाबतीत खबरदारी घ्यावी. ४३ सोन्याचे मणी बसविण्याच्या संबंधात तीन भाग बाजूंसाठी आणि दोन भाग बुडासाठी, किंवा चार भाग बुडासाठी आणि तीन भाग बाजूसाठी असावेत.

४४ पत्रे चढविण्याच्या व मुलामा देण्याच्या कामाच्या संबंधात – तांब्याचे भांडे तितक्याच वजनाच्या सोन्याने मढवावे. ४५ भरीव किंवा पोकळ रुप्याच्या भांड्यावर त्याच्या अर्ध्या वजनाचे सोने चढवावे. ४६ किंवा त्याच्या एकचतुर्थांश वजनाच्या सोन्याच्या वालुकाहिंगुलकाच्या रसाने अथवा चूर्णाने त्याच्यावर मुलामा करावा.

४७ दागिन्यांसाठी वापरावयाचे श्रेष्ठ जातीचे, चांगल्या रंगाचे सोने तितक्याच वजनाच्या शिशात मिसळून, तापवून त्याचे पत्रे बनवून, सिंधु प्रदेशातील मातीने चकचकीत केले असता ते निळा, पिवळा, पांढरा, हिरवा आणि पोपटाच्या पंखाचा वर्ण इतक्या निरनिराळ्या रंगाचे बनू शकते. ४८ आणि मोराच्या मानेच्या वर्णाचे, कापलेल्या जागी पांढरे असणारे, चमचम करणारे असे लोखंड तापवून त्याचे चूर्ण केले असता एक काकणी वजनाचे ते चूर्ण वरील सोन्याच्या एक सुवर्ण वजनात मिसळल्यास सोने निराळ्या रंगाचे होते.

तारमुपशुद्धं वा – अस्थितुत्थे चतुः समसीसे चतुः शुष्कतुत्थे चतुः कपाले त्रिर्गोमये द्विरेवं सप्तदशतुत्थातिक्रान्तं सैन्धविकयोज्ज्वालितम् । ४९ । एतस्मात्काकण्युत्तरमाद्विमाषादिति सुवर्णे देयं, पश्चाद्रागयोगः, श्वेततारं भवति । ५० ।

त्रयोंऽशास्तपनीयस्य द्वात्रिंशद्भागश्वेततारमूर्च्छिताः तत् श्वेतलोहितकं भवति । ५१ । ताम्रं पीतकं करोति । ५२ । तपनीयमुज्ज्वाल्य रागत्रिभागं दद्यात्, पीतरागं भवति । ५३ । श्वेततारभागौ द्वावेकस्तपनीयस्य मुद्गवर्णं करोति । ५४ । कालायसस्यार्धभागाभ्यक्तं कृष्णं भवति । ५५ । प्रतिलेपिना रसेन द्विगुणाभ्यक्तं तपनीयं शुकपत्रवर्णं भवति । ५६ । तस्यारम्भे रागविशेषेषु प्रतिर्वाणिकां गृह्णीयात् । ५७ ।

तीक्ष्णताम्रसंस्कारं च बुध्येत । ५८ । तस्माद्वज्रमणिमुक्ताप्रवालरूपाणामपनेयिमानं च रूप्यसुवर्णभाण्डबन्धप्रमाणानि च । ५९ ।

४९ अथवा पुढीलप्रमाणे शुद्ध केलेले रुपे – चार वेळा हाडांची भुकटी मिसळलेल्या मातीच्या मुशीत, चार वेळा बरोबरीने शिसे असलेल्या मातीच्या मुशीत, चार वेळा रेती मिसळलेल्या मातीच्या मुशीत, तीनदा केवळ मातीच्या मुशीत आणि दोनदा शेणमिश्रित मातीच्या मुशीत, याप्रमाणे सतरा मुशींत तापविलेले – आणि सिंधु प्रदेशातील मातीने चकचकित केलेले रुपे सुद्धा (विविध रंगाचे बनू शकते). ५० ह्याच्या एक काकणी वजनापासून काकणीकाकणीने वाढवून दोन माषक वजनापर्यंतचे भाग एक सुवर्ण वजनाच्या साध्या रुप्यात मिसळावे; नंतर त्यात वरील (तीक्ष्ण लोखंड) रंग मिसळावा. ते सफेत रुपे बनते.

५१ तपनीय सोन्याचे तीन भाग एकबत्तिसांश श्वेततार रुप्याबरोबर मिसळले असता ते सोने पांढुरक्या लाल रंगाचे होते. ५२ (तीन भाग) तांब्याला (एकबत्तिसांश श्वेततार) पिवळे करते. ५३ तपनीय सोन्याला चकचकीत करून एकतृतीयांशाइतका वरील (तीक्ष्ण) रंग द्यावा, ते पिवळ्या रंगाचे होते. ५४ दोन भाग श्वेततार, एक भाग तपनीय, हे मिश्रण मुगाच्या वर्णाचे होते. ५५ (हे मिश्रण) लोखंडाच्या अर्ध्या भागाने लिंपिले असता काळे होते. ५६ तपनीय सोने लेप करणाऱ्या रसाने दोनदा लिंपिले असता पोपटाच्या पंखाच्या रंगाचे होते. ५७ हे काम करताना निरनिराळ्या रंगासाठी कस घ्यावा.

५८ आणि सुवर्णाध्यक्षाला लोखंड व तांबे यांच्यावर होणाऱ्या प्रक्रियांचे ज्ञान असले पाहिजे. ५९ म्हणून त्याला हिरे, रत्ने, मोती, प्रवाळ यांच्या दागिन्यांची

समरागं समद्वन्द्वमसक्तपृषतं स्थिरम् ।
सुप्रमृष्टमसंपीतं विभक्तं धारणे सुखम् ।। ६० ।।
अभिनीतं प्रभायुक्तं संस्थानमधुरं समम् ।
मनोनेत्राभिरामं च तपनीयगुणाः स्मृताः ।। ६१ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे अक्षशालायां सुवर्णाध्यक्षः त्रयोदशोऽध्यायः ।
आदितश्चतुस्त्रिंशः ।

१४

## [ द्वात्रिंशं प्रकरणम् – विशिखायां सौवर्णिकप्रचारः ]

सौवर्णिकः पौरजानपदानां रूप्यसुवर्णमावेशनिभिः कारयेत् । १ । निर्दिष्ट-कालकार्यं च कर्म कुर्युः, अनिर्दिष्टकालं कार्यापदेशम् । २ । कार्यस्यान्यथा-करणे वेतननाशः, तद्द्विगुणश्च दण्डः । ३ । कालातिपातने पादहीनं वेतनं तद्-द्विगुणश्च दण्डः । ४ ।

यथावर्णप्रमाणं निक्षेपं गृह्णीयुस्तथाविधमेवार्पयेयुः । ५ । कालान्तरादपि च तथाविधमेव प्रतिगृह्णीयुः, अन्यत्र क्षीणपरिशीर्णाभ्याम् । ६ ।

(करताना व नंतर वापराने) होणारी झीज आणि रुपे व सोने यांच्या दागिन्यांत बसविण्यासाठी त्या रत्नांचे प्रमाण यांचेही (ज्ञान असले पाहिजे).

६०–६१ एकसारखा रंग असलेला, दोन्हीकडे सम प्रमाण असलेला, मणी न चिकटलेला, स्थिर राहणारा, चांगला घासलेला, खोटे पाणी न दिलेला, सुटे भाग असलेला, वापरण्यास सुखकर, भपकेदार नसलेला, प्रभायुक्त, मधुर आकाराचा, एकसारखा आणि मन व नेत्र यांना आल्हाददायक असे हे दागिन्याचे गुण सांगितले गेले आहेत.

### चौदावा अध्याय

### प्रकरण ३२ : सराफकट्ट्यातील सुवर्णकाराचे कार्य

१ (सरकारी) सुवर्णकाराने पुरवासी व जनपदनिवासी यांची सोन्या-चांदीची कामे कारागिरांकडून करून घ्यावीत. २ आणि त्यांनी ठरलेल्या वेळात काम ठरले असेल त्याप्रमाणे करून द्यावे; पण कार्याच्या स्वरूपाच्या अनुरोधाने मुदत न ठरविताही ते करावे. ३ काम सांगितल्यापेक्षा निराळ्या प्रकारे केल्यास मजुरी न देता तिच्या दुप्पट दंड करावा. ४ काम वेळेवर पुरे केले नाही तर मजुरी तीनचतुर्थांश देऊन त्याच्या दुप्पट दंड करावा.

५ ज्या प्रतीचे व ज्या वजनाचे सोनेरुपे गिऱ्हाइकांकडून ठेवून घेतले असेल त्याच प्रतीचा व वजनाचा दागिना त्यांनी दिला पाहिजे. ६ आणि बराच काळ

आवेशनिभिः सुवर्णपुद्गललक्षणप्रयोगेषु तत्तज्जानीयात् । ७ ।

तप्तकलधौतकयोः काकणिकः सुवर्णे क्षयो देयः । ८ । तीक्ष्णकाकणी – रूप्यद्विगुणः – रागप्रक्षेपः, तस्य षड्भागः क्षयः । ९ ।

वर्णहीने माषावरे पूर्वः साहसदण्डः, प्रमाणहीने मध्यमः, तुलाप्रतिमानोपधावुत्तमः, कृतभाण्डोपधौ च । १० ।

सौवर्णिकेनादृष्टमन्यत्र वा प्रयोग कारयतो द्वादशपणो दण्डः । ११ । कर्तुद्विगुणः सापसारश्चेत् । १२ । अनपसारः कण्टकशोधनाय नीयेत । १३ । कर्तुश्च द्विशतो दण्डः पणच्छेदनं वा । १४ ।

तुलाप्रतिमानभाण्डं पौतवहस्तात्क्रीणीयुः । १५ । अन्यथा द्वादशपणो दण्डः । १६ ।

लोटल्यानंतरसुद्धा गिऱ्हाइकांना त्याच स्थितीत मिळाला पाहिजे, फक्त दागिना करताना होणारी झीज आणि कालांतराने होणारी पडझड ही विचारात घेऊन.

७ सोन्याच्या दागिन्यांची लक्षणे व कारागिरांकडून त्यांची होणारी घडण यासंबंधात प्रत्येक गोष्टीची (सुवर्णकाराला) माहिती असणे आवश्यक आहे.

८ (दागिना करताना) सोने व रुपे यांच्या संबंधात एक सुवर्ण वजनात एक काकणीची झीज न्याय्य मानावी. ९ (एक सुवर्ण वजनाच्या सोन्यात) तीक्ष्ण लोखंड एक काकणी – रुप्यात दुप्पट – रंगासाठी मिसळलेले असते, त्याची एकषष्ठांश झीज न्याय्य मानावी.

१० एका माषकापर्यंत सोन्याचा कस (दागिन्यात) कमी आला तर प्रथम साहसदंड करावा, एक माषकापर्यंत वजन कमी भरले तर मध्यम साहसदंड, वजने व मापे यातील फसवणुकीबद्दल आणि केलेल्या दागिन्यातील फसवणुकीबद्दल उत्तम साहसदंड करावा

११ सुवर्णकाराला माहीत पडणार नाही अशा रीतीने किंवा दुसऱ्याच ठिकाणी काम करून घेणाऱ्या गिऱ्हाइकास बारा पण दंड करावा. १२ ते करणाऱ्या कारागिराला दुप्पट दंड करावा जर त्याबद्दल त्याला योग्य सबब सांगता आली तर. १३ जर काही सबब नसेल तर त्याला अधिक चौकशीसाठी प्रदेष्टचांकड (अधिकरण ४) न्यावे. १४ आणि त्या कारागिराला दोनशे पण दंड करावा किंवा त्याच्या हाताची बोटे तोडावीत.

१५ कारागिरांनी वजने व मापे पौतवाध्यक्षाकडून विकत घ्यावीत. १६ नाही तर त्यांना बारा पण दंड करावा.

घनं सुषिरं संयूह्यमवलेप्यं संघात्यं वासितकं च कारुकर्म । १७ ।

तुलाविषममपसारणं विस्रावणं पेटकः पिङ्कश्चेति हरणोपायाः । १८ ।

संनामिन्युत्कीर्णिका भिन्नमस्तकोपकण्ठी कुशिक्या सकटुकक्ष्या परिवेल्यायस्कान्ता च दुष्टतुलाः । १९ ।

रूप्यस्य द्वौ भागावेकः शुल्बस्य त्रिपुटकम् । २० । तेनाकरोद्गतमपसार्यते तत्त्रिपुटकापसारितम् । २१ । शुल्बेन शुल्बापसारितम्, वेल्लकेन वेल्लकापसारितम्, शुल्बार्धसारेण हेम्ना हेमापसारितम् । २२ ।

मूकमूषा पूतिकिट्टः करटुकमुखं नाली संदंशो जोङ्गनी सुर्वाचकालवणं तदेव सुवर्णमित्यपसारणमार्गाः । २३ । पूर्वप्रणिहिता वा पिण्डवालुका मूषाभेदादग्निष्ठादुद्ध्रियन्ते । २४ ।

१७ भरीव नग बनविणे, पोकळ नग बनविणे, जाड पत्र्याने मढविणे, पातळ पत्र्याने मढविणे, जोड बसविणे आणि मुलामा चढविणे – हे कारागिरांच्या कामाचे प्रकार.

१८ वजनात लबाडी, सोने काढून घेणे, सोने काढून त्याऐवजी दुसरे काही घालणे, पत्र्यात बदल करणे, आत दुसरेच काही बसविणे – हे अपहार करण्याचे मार्ग होत.

१९ सहज एकीकडे कलणारी, दांडी कोरलेली (व एका बाजूस आत वजन घातलेली), माथा तुटलेली, दुसरा (खोटा) मध्य असलेली, शिक्याच्या दोऱ्या खराब असलेली, पारडी विषम असलेली, हेलखावे खाणारी आणि लोहचुंबक असलेली – ह्या खोट्या तराजू होत.

२० दोन भाग रुपे व एक भाग तांबे यांच्या मिश्रणाला त्रिपुटक म्हणतात. २१ ते मिश्रण घालून तेवढेच खाणीतील शुद्ध सोने काढून घेण्याच्या प्रकाराला त्रिपुटकापसारित म्हणतात. २२ तांबे घालून तेवढेच सोने काढून घेणे म्हणजे शुल्वापसारित, वेल्लक (रुपे व लोखंड यांचे समभाग मिश्रण) घालून तसे केल्यास वेल्लकापसारित आणि अर्धा भाग तांबे मिसळलेल्या सोन्याने तसे केल्यास हेमापसारित म्हणतात.

२३ चोरकप्पा असलेली मूस, घाण वासाचे कीट, चिमटा, नळी, सांडशी, पाण्याचे भांडे, सौर्वाचक आणि तेच सोने – हे सोने काढून घेण्याचे मार्ग आहेत. २४ किंवा शेगडीत अगोदरच घालून ठेवलेले वाळूचे गोळे मूस फुटल्यावर (सोन्याच्या जागी वापरण्यासाठी) शेगडीतून उचलले जातात.

पश्चाद्बन्धने आचितकपत्रपरीक्षायां वा रूप्यरूपेण परिवर्तनं विस्रावणम्, पिण्डवालुकानां लोहपिण्डवालुकाभिर्वा । २५ ।

गाढश्चाभ्युद्धार्यश्च पेटकः संयूह्यावलेप्यसंघात्येषु क्रियते । २६ । सीसरूपं सुवर्णपत्रेणावलिप्तमभ्यन्तरमष्टकेन बद्धं गाढपेटकः । २७ । स एव पटल-संपुटेष्वभ्युद्धार्यः । २८ । पत्रमाश्लिष्टं यमकपत्रं वाऽवलेप्येषु क्रियते । २९ । शुल्बं तारं वा गर्भः पत्राणां संघात्येषु क्रियते । ३० । शुल्बरूपं सुवर्णपत्रसंहतं प्रमृष्टं सुपार्श्वम्, तदेव यमकपत्रसंहतं प्रमृष्टम् ताम्रताररूपं च उत्तरवर्णकः । ३१ । तदुभयं तापनिकषाभ्यां निःशब्दोल्लेखनाभ्यां वा विद्यात् । ३२ । अभ्युद्धार्यं बदराम्ले लवणोदके वा सादयन्ति । इति पेटकः । ३३ ।

घने सुषिरे वा रूपे सुवर्णमृन्मालुकाहिङ्गुलुककल्को वा तप्तोऽवतिष्ठते । ३४ । दृढवास्तुके वा रूपे वालुकामिश्रं जतु गान्धारपङ्को वा तप्तोऽवतिष्ठते । ३५ ।

२५ (सुटे करून घेतलेले भाग) नंतर जोडताना किंवा मढविण्याचा पत्रा तपासताना सोन्याच्या भागाच्या जागी रुप्याचा भाग वापरणे याला विस्रावण म्हणतात, अथवा सोनें असलेल्या गोळ्यांच्या जागी मुलामा दिलेले लोखंडाचे गोळे वापरणे (म्हणजे विस्रावण).

२६ जाड पत्र्याने मढविणे, पातळ पत्र्याने मढविणे आणि जोडणी करणे ह्या क्रिया करताना पक्का आणि काढता येण्यासारखा असे दोन प्रकारचे पेटक करतात. २७ शिशाच्या तुकड्याला सोन्याच्या पत्र्याने लपेटले व आत लाखेने पक्के केले म्हणजे तो गाढ पेटक. २८ (लाख न भरल्यामुळे) भाग सुटे राहिल्यास तोच पेटक काढता येण्यासारखा होतो. २९ पातळ पत्रा मढविताना तो चिकटणारा एकच पत्रा किंवा दुहेरी पत्रा करतात. ३० जोडणीचे काम करताना पत्र्यांच्या आतील भाग तांब्याचा किंवा रुप्याचा करतात. ३१ सोन्याच्या पत्र्याने मढविलेली तांब्याची वस्तू घासून चकचकीत केली म्हणजे त्या प्रकाराला सुपार्श्व म्हणतात; तीच जोडपत्र्याने मढवून घासली व चकचकीत केली तर किंवा तांबेरुप्याच्या मिश्रणाने बनविलेल्या वस्तूच्या बाबतीत असेच केले तर ह्या प्रकाराला उत्तरवर्णक म्हणतात. ३२ ते दोन्ही प्रकारचे (गाढ व अभ्युद्धार्य) पेटक तापवून व कस लावून किंवा आवाजाचा अभाव व खरडून काढणे यांच्या साहाय्याने ओळखावेत. ३३ अभ्युद्धार्य पेटक बोराच्या आम्ल रसात किंवा मिठाच्या पाण्यात बुडवून ठेवतात (पेटक असेल तर वस्तू लाल होते), असा हा पेटकाचा प्रकार.

३४ भरीव किंवा पोकळ वस्तूत सोनेमिश्रित माती आणि मालुकाहिंगूळ यांचा लगदा तापविला असता आत चिकटून राहतो. ३५ किंवा रत्नासाठी घट्ट तळ

तयोस्तापनमवध्वंसनं वा शुद्धिः । ३६ । त्रपरिभाण्डे वा रूपे लवणमुल्कया कटुशर्करया तप्तमवतिष्ठते । ३७ । तस्य क्वाथनं शुद्धिः । ३८ । अभ्रपटलमष्टकेन द्विगुणवास्तुके वा रूपे बध्यते । ३९ । तस्यापिहितकाचकस्योदके निमज्जत एकदेशः सीदति, पटलान्तरेषु वा सूच्या भिद्यते । ४० । मणयो रूप्यं सुवर्ण वा घनसुषिराणां पिङ्कः । ४१ । तस्य तापनमवध्वंसनं वा शुद्धिः । इति पिङ्कः । ४२ ।

तस्माद्वज्रमणिमुक्ताप्रवालरूपाणां जातिरूपवर्णप्रमाणपुद्गललक्षणान्युपलभेत । ४३ ।

कृतभाण्डपरीक्षायां पुराणभाण्डप्रतिसंस्कारे वा चत्वारो हरणोपायाः – परिकुट्टनमवच्छेदनमुल्लेखनं परिमर्दनं वा । ४४ । पेटकापदेशेन पृषतं गुणं पिटकां वा यत्परिशातयन्ति तत्परिकुट्टनम् । ४५ । यद्द्विगुणवास्तुकानां वा रूपे सीसरूपं प्रक्षिप्याभ्यन्तरमवच्छिन्दन्ति तदवच्छेदनम् । ४६ । यद् घनानां तीक्ष्णेनोल्लिखन्ति

असलेल्या वस्तूत वाळूमिश्रित लाख किंवा गांधारदेशातील चिखलासारखी माती (शेंदूर) आत चिकटून राहते. ३६ त्या दोहोंच्या शुद्धतेची तापवून किंवा तोडून परीक्षा करावी. ३७ किंवा रत्नाच्या सभोवार त्याला घट्ट बसविणारे सोने असलेल्या वस्तूत कोलिताने वाळूच्या कणांसह तापविलेले मीठ आत चिकटून राहते. ३८ उकळून त्याच्या शुद्धतेची परीक्षा होते. ३९ किंवा दुहेरी तळ (मध्ये पोकळी) असलेल्या वस्तूत अभ्रकाचा थर लाखेने बसविला जातो. ४० आत दडविलेला हीन पदार्थ असलेली ती वस्तू पाण्यात बुडविली असता तिची एक बाजू खाली जाते, किंवा थरांच्या मध्ये सुईने टोचले जाते व अशा रीतीने शुद्धतेची परीक्षा होते ४१ मणी, रुपे अथवा सोने भरीव अथवा पोकळ वस्तूंत आत बसविले जातात (हलक्या प्रतीचे भारी प्रतीच्या वस्तूत – अशा प्रकारे). ४२ तापवून किंवा तोडून त्याच्या शुद्धतेची परीक्षा. असे हे पिंकाचे (हीन आत बसविण्याचे) प्रकार होत.

४३ म्हणून हिरे, रत्ने, मोती आणि पोवळे यांच्यापासून बनविलेल्या वस्तूंच्या संबंधात (सुवर्णकाराने) त्यांची जात, रूप, प्रत, प्रमाण आणि दागिन्याचे स्वरूप ही जाणून घ्यावीत.

४४ केलेल्या वस्तूची परीक्षा करताना किंवा जुन्या वस्तूची दुरुस्ती करताना अपहार करण्याचे चार मार्ग अवलंबिले जातात – परिकुट्टन, अवच्छेदन, उल्लेखन अथवा परिमर्दन. ४५ पेटक आहे ह्या सबबीखाली जेव्हा एखादा सुवर्णमणी अथवा तार अथवा आतील भाग कापला जातो तेव्हा त्याला परिकुट्टन म्हणतात. ४६ जेव्हा दुहेरी तळ असलेल्या वस्तूत शिशाचा तुकडा आत टाकून आतील भाग तोडून घेतात तेव्हा त्याला अवच्छेदन म्हणतात. ४७ जेव्हा भरीव वस्तूंना तीक्ष्ण

तदुल्लेखनम् ।४७। हरितालमनःशिलाहिङ्गुलुकचूर्णानामन्यतमेन कुरुविन्दचूर्णेन वा वस्त्रं संयूह्य यत्परिमृद्नन्ति तत्परिमर्दनम् ।४८। तेन सौवर्णराजतानि भाण्डानि क्षीयन्ते, न चैषां किञ्चिदवरुग्णं भवति ।४९।

भग्नखण्डघृष्टानां संयूह्यानां सदृशेनानुमानं कुर्यात् ।५०। अवलेप्यानां यावदुत्पाटितं तावदुत्पाटयानुमानं कुर्यात् ।५१। विरूपाणां वा तापनमुदकपेषणं च बहुशः कुर्यात् ।५२।

अवक्षेपः प्रतिमानमग्निर्गण्डिका भण्डिकाधिकरणी पिञ्छः सूत्रं चेल्लं बोल्लनं शिर उत्सङ्गो मक्षिका स्वकायेक्षा दृतिरुदकशरावमग्निष्ठमिति काचं विद्यात् ।५३।

राजतानां विस्रं मलग्राहि परुषं प्रस्तीनं विवर्णं वा दुष्टमिति विद्यात् ।५४।

एवं नवं च जीर्णं च विरूपं चापि भाण्डकम् ।
परीक्षेतात्ययं चैषां यथोद्दिष्टं प्रकल्पयेत् ।। ५५ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे विशिखायां सौवर्णिकप्रचारः चतुर्दशोऽध्यायः ।
आदितः पञ्चत्रिंशः ।

हत्याराने खरडतात तेव्हा त्याला उल्लेखन म्हणतात. ४८ जेव्हा हरताळ, मनशीळ अथवा हिंगूळ यांचे चूर्ण अथवा कुरुविंदाचे चूर्ण वस्त्राला चोपडून त्याने वस्तू घासतात तेव्हा त्याला परिमर्दन म्हणतात. ४९ त्यामुळे सोन्याच्या व रुप्याच्या वस्तूंचे वजन कमी होते, पण त्यांच्या कुठल्याही भागाची मोडतोड होत नाही.

५० जाड पत्र्यांनी मढविलेल्या वस्तूंच्या संबंधात मोडलेले, तोडलेले अथवा घासलेले किती असेल याविषयीचे अनुमान तिच्यासारख्याच दुसऱ्या वस्तूवरून करावे. ५१ पातळ पत्र्यांनी मढविलेल्यांच्या संबंधात जेवढे तोडले असेल तेवढे तोडून (हानीचे) अनुमान करावे. ५२ अथवा ज्यांचे रूप पालटले असेल त्यांना पुष्कळ वेळा तापवावे आणि (आम्ल) पाण्यात घासावे.

५३ हाताला झटका देणे, वजने, अग्नी, लाकडी ऐरण, हत्यारांची पेटी, धातूचा रस ओतून घेण्याचे भांडे, मोराचे पीस, दोरा, वस्त्र, बोलणे, मस्तक, मांडी, माशा वारणे, स्वतःच्या शरीराकडे लक्ष, भाता, पाण्याचे भांडे आणि शेगडी – यांच्या साह्याने चोरलेले सोने लपविता येते असे समजावे.

५४ रुप्याच्या वस्तूंना कच्च्या मांसाचा वास येत असेल, त्यांना मळ चिकटून राहत असेल, त्या खडबडीत, टणक अथवा वर्णहीन असतील तर त्यांचे रुपे खराब आहे असे समजावे.

५५ याप्रमाणे नव्या, जुन्या आणि रूप पालटलेल्या वस्तूंची परीक्षा करावी आणि दोषी कारागिरांवर सांगितल्याप्रमाणे दंड बसवावेत.

## १५

## [त्रयस्त्रिंशं प्रकरणम् – कोष्ठागाराध्यक्षः]

**कोष्ठागाराध्यक्षः सीताराष्ट्रक्रयिमपरिवर्तकप्रामित्यकापमित्यकसंहनिकान्यजातव्ययप्रत्यायोपस्थानान्युपलभेत । १ ।**

**सीताध्यक्षोपनीतः सस्यवर्णकः सीता । २ ।**

**पिण्डकरः षड्भागः सेनाभक्तं बलिः कर उत्सङ्गः पार्श्वं पारिहीणिकमौपायनिकं कौष्ठेयकं च राष्ट्रम् । ३ ।**

**धान्यमूल्यं कोशनिर्हारः प्रयोगप्रत्यादानं च क्रयिमम् । ४ ।**

**सस्यवर्णानामर्घान्तरेण विनिमयः परिवर्तकः । ५ ।**

**सस्ययाचनमन्यतः प्रामित्यकम् । ६ । तदेव प्रतिदानार्थमापमित्यकम् । ७ ।**

**कुट्टकरोचकसक्तुशुक्तपिष्टकर्म तज्जीवनेषु तैलपीडनमौद्रचाक्रिकेष्विक्षूणां च क्षारकर्म संहनिका । ८ ।**

## पंधरावा अध्याय

## प्रकरण ३३ : कोठारांवरील अध्यक्ष

१ कोठारांवरील अध्यक्षाला सीता, राष्ट्र, क्रयिम, परिवर्तक, प्रामित्यक, आपमित्यक, संहनिका, अन्यजात, व्ययप्रत्याय आणि उपस्थान या गोष्टींची माहिती असली पाहिजे.

२ सीताध्यक्षाने आणलेले विविध प्रकारचे धान्य म्हणजे सीता (सरकारी शेतीचे उत्पन्न).

३ (गावाने द्यावयाचा) ठोक कर, (खाजगी शेतीच्या उत्पन्नाचा) एकषष्ठांश, सैन्याच्या अन्नपाण्यासाठी वसुली, बलि, कर, 'मांडी', 'बाजू', नुकसानीची भरपाई, नजराणे, आणि कोठारांतून मिळणारे उत्पन्न म्हणजे राष्ट्र.

४ धान्याची किंमत, (धान्य विकत घेण्यासाठी) कोशातून खर्च करणे आणि व्याजाने दिलेले धान्य परत घेणे याला क्रयिम (खरेदी) म्हणतात.

५ निरनिराळ्या धान्यांची दुसऱ्या (जास्त) किंमतीला अदलाबदल म्हणजे परिवर्तक.

६ दुसरीकडून धान्य मागून आणणे म्हणजे प्रामित्यक (याचना). ७ तेच परत करण्याच्या बोलीने आणणे म्हणजे आपमित्यक (उसनवारी).

८ तो तो व्यवसाय करणाऱ्यांकडून सडणे, भरडणे, भाजणे, दारू गाळणे, दळणे ही कामे करून घेणे, हातयंत्राने आणि घाणीने तेल काढणाऱ्यांकडून तेल

नष्टप्रस्मृतादिरन्यजातः । ९ ।

विक्षेपव्याधितान्तरारम्भशेषं च व्ययप्रत्यायः । १० ।

तुलामानान्तरं हस्तपूरणमुत्करो व्याजी पर्युषितं प्रार्जितं चोपस्थानम् । इति । ११ ।

धान्यस्नेहक्षारलवणानां धान्यकल्पं सीताध्यक्षे वक्ष्यामः । १२ ।

सर्पिस्तैलवसामज्जानः स्नेहाः । १३ ।

फाणितगुडमत्स्यण्डिकाखण्डशर्कराः क्षारवर्गः । १४ ।

सैन्धवसामुद्रबिडयवक्षारसौवर्चलोद्भेदजा लवणवर्गः । १५ ।

क्षौद्रं मार्द्वीकं च मधु । १६ ।

इक्षुरसगुडमधुफाणितजाम्बवपनसानामन्यतमो मेषशृङ्गीपिप्पलीक्वाथाभिषुतो मासिकः षाण्मासिकः सांवत्सरिको वा चिर्भिटोर्वारुकेक्षुकाण्डाम्रफलामलकावसुतः शुद्धो वा शुक्तवर्गः । १७ ।

काढून घेणे आणि उसांचा रस काढून (गूळ आदी) क्षार वर्गाचे पदार्थ बनवून घेणे याला संहनिका (कराच्या ऐवजी श्रमदान ) म्हणतात.

९ हरवलेल्या, विसरलेल्या वस्तू इत्यादी म्हणजे अन्यजात (दुसऱ्या उद्गमातील उत्पन्न).

१० सैन्याचे विसर्जन आणि आजारामुळे अर्धवट राहिलेले काम ह्यांनी होणारी बचत म्हणजे व्ययप्रत्याय (खर्च परत येणे).

११ वजने आणि मापे यांतील फरक, हात वर धरून अधिक माप घेणे, मापणे संपल्यावर खाली उरलेले धान्य, वजनामापातील कसर, मागील सालचे यावयाचे असलेले उत्पन्न आणि (व्यापार करून) मिळविलेले उत्पन्न ह्यांना उपस्थान (अधिक कमाई) म्हणतात.

१२ धान्य, स्नेह, क्षार आणि लवण यांपैकी धान्यांविषयीचे विवेचन आम्ही सीताध्यक्षावरील प्रकरणात (अध्याय २.२४) करू.

१३ तूप, तेल, चरबी आणि मज्जा हे स्नेहाचे प्रकार (स्निग्ध पदार्थ) होत.

१४ काकवी, गूळ, साखर आणि खडीसाखर हे क्षारवर्गात मोडतात.

१५ खाणीतील मीठ, समुद्रातील मीठ, बिडलवण, जवखार, सौवर्चल आणि खाऱ्या जमिनीतील मीठ हा लवणवर्ग होय.

१६ मधमाशांनी केलेला व द्राक्षांपासून बनविलेला असा दोन प्रकारचा मध.

१७ उसाचा रस, गूळ, मध, काकवी, जांभळाचा रस किंवा फणसाचा रस यांपैकी कोणताही द्रव पदार्थ मेषशृंगी आणि पिंपळी यांच्या काढ्यात मुरविला

वृक्षाम्लकरमर्दाम्रविदलामलकमातुलुङ्गकोलबदरसौवीरकपरूषकादिः फलाम्लवर्गः । १८ ।

दधिधान्याम्लादिर्द्रवाम्लवर्गः । १९ ।

पिप्पलीमरिचशृङ्गिबेराजाजीकिराततिक्तगौरसर्षपकुस्तुम्बुरुचोरकदमनकमरुवकशिग्रुकाण्डादिः कटुकवर्गः । २० ।

शुष्कमत्स्यमांसकन्दमूलफलशाकादि च शाकवर्गः । २१ ।

ततोऽर्धमापदर्थं जानपदानां स्थापयेद्, अर्धमुपयुञ्जीत । २२ । नवेन चानवं शोधयेत् । २३ ।

क्षुण्णघृष्टपिष्टभृष्टानामार्द्रशुष्कसिद्धानां च धान्यानां वृद्धिक्षयप्रमाणानि प्रत्यक्षीकुर्वीत । २४ ।

कोद्रवव्रीहीणामर्धं सारः, शालीनामर्धभागोनः, त्रिभागोनो वरकाणाम् । २५ । प्रियङ्गूणामर्धं सारो नवभागवृद्धिश्च । २६ । उदारकस्तुल्यः, यवा गोधूमाश्च

आणि एक महिना, सहा महिने अथवा एक वर्ष उलटल्यावर चिबूड, काकडी, उसाचे कांडे, आंबा किंवा आवळा यांच्यापैकी एका रसात मिसळला अथवा कोणत्याच रसात मिसळला नाही म्हणजे शुक्त आसवांचा वर्ग तयार होतो.

१८ चिंच, करवंद, आंबा, डाळिंब, आवळा, महाळुंग, कोल, बोर, सौवीरक, परूषक इत्यादी हा फळांच्या आम्ल रसांचा वर्ग होय.

१९ दही, आंबविलेले धान्याचे द्रावण इत्यादी द्रव आम्लांचा वर्ग.

२० पिंपळी, मिरी, सुंठ, जिरे, कडू किराईत, पांढरी मोहरी, धणे, शोपा, दवणा, मरवा, शिग्रूचे कांडे इत्यादी मसाल्यांचा वर्ग.

२१ सुके मासे, सुके मांस, कंदमुळे, फळे, पालेभाज्या इत्यादी शाकवर्ग होय.

२२ ह्या सर्व संचयाचा अर्धा भाग आपत्काली प्रजाजनांच्या उपयोगासाठी राखून ठेवावा आणि अर्धा उपयोगात आणावा. २३ आणि नवीन माल आल्यावर जुना माल काढून टाकावा.

२४ आणि धान्य कुटले, भरडले, दळले व भाजले असता, तसेच ते भिजविले, सुकविले व शिजविले असता त्यात होणाऱ्या वाढीचे अथवा क्षयाचे प्रमाण प्रत्यक्ष पाहून घ्यावे.

२५ कोद्रव आणि व्रीहि-तांदूळ सडले असता निम्मे उतरतात, शालि-तांदूळ त्याहून अर्धा भाग कमी (म्हणजे एकचतुर्थांश) उतरतात, वऱ्याचे तांदूळ दोनतृतीयांश उतरतात. २६ प्रियंगू धान्य अर्धे अधिक एकनवमांश इतके उतरते. २७ उदारक धान्य तितकेच उतरते, तसेच जव आणि गहू कुटले असता

क्षुण्णाः, तिला यवा मुद्गमाषाश्च घृष्टाः । २७ । पञ्चभागवृद्धिर्गोधूमः, सक्तवश्च । २८ । पादोना कलायचमसी । २९ । मुद्गमाषाणामर्धपादोना । ३० । शैम्ब्यानामर्धं सारः, त्रिभागोनो मसूराणाम् । ३१ ।

पिष्टमामं कुल्माषाश्चाध्यर्धगुणाः । ३२ । द्विगुणो यावकः, पुलाकः, पिष्टं च सिद्धम् । ३३ ।

कोद्रववरकोदारकप्रियङ्गूणां त्रिगुणमन्नम्, चतुर्गुणं व्रीहीणाम्, पञ्चगुणं शालीनाम् । ३४ ।

तिमितमपरान्नं द्विगुणम्, अर्धाधिकं विरूढानाम् । ३५ ।

पञ्चभागवृद्धिर्भृष्टानाम् । ३६ । कलायो द्विगुणः, लाजा भरुजाश्च । ३७ ।

षट्कं तैलमतसीनाम् । ३८ । निम्बकुशाम्रकपित्थादीनां पञ्चभागः । ३९ । चतुर्भागिकास्तिलकुसुम्भमधूकेङ्गुदीस्नेहाः । ४० ।

कार्पासक्षौमाणां पञ्चपले पलं सूत्रम् । ४१ ।

आणि तीळ, जव, मूग व उडीद हे भरडले असता (तितकेच उतरतात). २८ गहू आणि सातू (भरडले असता) एकपंचमांशाने अधिक भरतात. २९ कलाय धान्याचे पीठ एकचतुर्थांशाने कमी भरते. ३० मूग आणि उडीद यांचे पीठ एकअष्टमांशाने कमी भरते. ३१ शेंगांतील धान्य अर्धे उतरते; मसूर दोन-तृतीयांश उतरते.

३२ कच्चे (न शिजलेले) पीठ आणि कुल्माष (दळले असता) दीडपट होतात. ३३ जवाचे पीठ दुप्पट होते, तसेच पुलाक आणि उकडलेले पीठ दुप्पट होतात.

३४ कोद्रव, वरी, उदारक आणि प्रियंगू शिजविले असता तिप्पट होतात, व्रीहि चौपट आणि शालि पाचपट होतात.

३५ (मूग वगैरे) नंतरची धान्ये भिजविली असता दुप्पट होतात, त्यांना मोड आले म्हणजे ती अडीचपट होतात.

३६ धान्ये भाजली असता त्यात एकपंचमांश वाढ होते. ३७ कलाय भाजले असता दुप्पट होते, तसेच तांदळाच्या आणि जवाच्या लाह्या दुप्पट होतात.

३८ अळशीचे तेल एकषष्ठांश उतरते. ३९ निंब, कुशाम्र, कवठ आदींचे एकपंचमांश उतरते. ४० तीळ, कुसुंभ, मधूक आणि इंगुदी यांचे तेल एक-चतुर्थांश उतरते.

४१ कापूस आणि क्षौम यांच्या पाच पल वजनातून एक पल वजनाचे सूत निघते.

**पञ्चद्रोणे शालीनां द्वादशाढकं तण्डुलानां कलभभोजनम्, एकादशकं व्यालानाम्, दशकमौपवाह्यानाम्, नवकं सांनाह्यानाम्, अष्टकं पत्तीनाम्, सप्तकं मुख्यानाम्, षट्कं देवीकुमाराणाम्, पञ्चकं राज्ञाम्, अखण्डपरिशुद्धानां वा तण्डुलानां प्रस्थः । ४२ ।**

**तण्डुलानां प्रस्थः चतुर्भागः सूपः सूपषोडशो लवणस्यांशः चतुर्भागः सर्पिषस्तैलस्य वा एकमार्यभक्तं पुंसः । ४३ । षड्भागः सूपः अर्धस्नेहमवराणाम् । ४४ । पादोनं स्त्रीणाम् । ४५ । अर्धं बालानाम् । ४६ ।**

**मांसपलविंशत्या स्नेहार्धकुडुबः पलिको लवणस्यांशः क्षारपलयोगो द्विधरणिकः कटुकयोगो दध्नश्चार्धप्रस्थः । ४७ । तेनोत्तरं व्याख्यातम् । ४८ । शाकानामध्यर्धगुणः, शुष्काणां द्विगुणः, स चैव योगः । ४९ ।**

**हस्त्यश्वयोस्तदध्यक्षे विधाप्रमाणं वक्ष्यामः । ५० ।**

४२ पाच द्रोण (वीस आढक) साळींतून बारा आढक उतरलेले तांदूळ हत्तीच्या छाव्याच्या भोजनाच्या उपयोगी, अकरा आढक उतरलेले माजलेल्या हत्तीच्या, दहा आढक उतरलेले स्वारीच्या हत्तीच्या, नऊ आढक उतरलेले लढाऊ हत्तीच्या, आठ आढक पायदळातील शिपायांच्या, सात आढक मुख्य अधिकाऱ्यांच्या, सहा आढक राण्या व राजकुमार यांच्या आणि पाच आढक उतरलेले तांदूळ राजाच्या भोजनाच्या उपयोगी, किंवा एक प्रस्थ, कण्या नसलेले आणि स्वच्छ, तांदूळ (राजाच्या भोजनात उपयोगी).

४३ एक प्रस्थ तांदूळ, त्याच्या एकचतुर्थांश आमटीसाठी डाळ वगैरे, डाळीच्या एकषोडशांश मीठ, डाळीच्या एकचतुर्थांश तूप अथवा तेल हा एका आर्य पुरुषासाठी द्यावयाचा दिवसाचा शिधा. ४४ खालच्या लोकांच्या शिध्यात डाळ वगैरे प्रस्थाच्या एकषष्ठांश, तूप अथवा तेल डाळीच्या एकअष्टमांश असावे. ४५ स्त्रियांसाठी शिधा पाऊणपट. ४६ लहान मुलांसाठी अर्धा.

४७ वीस पल मांसासाठी अर्धे कुडुब स्नेह (तेल अथवा तूप), एक पल मीठ, एक पल (गूळ आदी) क्षार, दोन धरण मसाला आणि अर्धा प्रस्थ दही द्यावे. ४८ अधिक मांस असल्यास ह्याच प्रमाणात हे जिन्नस द्यावेत. ४९ भाज्यांसाठी हे सर्व जिन्नस दीडपट द्यावेत, सुकविलेल्या भाज्यांसाठी दुप्पट; आणि भाजीत टाकावयाचे तेच जिन्नस.

५० हत्ती आणि घोडे यांच्या शिध्याचे प्रमाण आम्ही हस्त्यध्यक्ष आणि अश्वाध्यक्ष यांच्यावरील प्रकरणांत (अनुक्रमे अध्याय २.३१ आणि २.३० यांत) सांगू.

बलीवर्दानां माषद्रोणं यवानां वा पुलाकः, शेषमश्वविधानम् । ५१ । विशेषो घाणपिण्याकतुला, कणकुण्डकं दशाढकं वा । ५२ । द्विगुणं महिषोष्ट्राणाम् । ५३ । अर्धद्रोणं खरपृषतरोहितानाम् । ५४ । आढकमेणकुरङ्गाणाम् । ५५ । अर्धाढकमजैडकवराहाणाम्, द्विगुणं वा कणकुण्डकम् । ५६ । प्रस्थौदनः शुनाम् । ५७ । हंसक्रौञ्चमयूराणामर्धप्रस्थः । ५८ । शेषाणामतो मृगपशुपक्षिव्यालानामेकभक्तादनुमानं ग्राहयेत् । ५९ ।

अङ्गारांस्तुषान् लोहकर्मान्तभित्तिलेप्यानां हारयेत् । ६० । कणिका दासकर्मकरसूपकाराणाम्, अतोऽन्यदौदनिकापूपिकेभ्यः प्रयच्छेत् । ६१ ।

तुलामानभाण्डं रोचनीदृषन्मुसलोलूखलकुट्टकरोचकयन्त्रपत्रकशूर्पचालनिकाकण्डोलीपिटकसंमार्जन्यश्चोपकरणानि । ६२ ।

मार्जकरक्षकधरकमायकमापकदायकदापकशलाकाप्रतिग्राहकदासकर्मकरवर्गश्च विष्टिः । ६३ ।

५१ बैलांसाठीउडीद एक द्रोण अथवा जवांचा पुलाक (अर्धकच्चे शिजविलेले जव) हे अधिक. बाकी शिधा घोड्यांप्रमाणे द्यावा ५२ त्यांच्यासाठी विशेष – एक तुला घाणीतील पेंड अथवा दहा आढक कणीकोंडा. ५३ म्हैस व उंट यांच्यासाठी बैलांच्या दुप्पट शिधा. ५४ गाढव, ठिपक्याचे हरीण आणि रोहित हरीण यांच्यासाठी अर्धा द्रोण. ५५ एण व कुरंग हरिणांसाठी एक आढक. ५६ बकरी, एडका आणि डुक्कर यांच्यासाठी अर्धा आढक (उडीद वगैरे) अथवा दुप्पट कणीकोंडा. ५७ कुत्र्यांसाठी एक प्रस्थ भात. ५८ हंस, क्रौंच आणि मोर यांच्यासाठी अर्धा प्रस्थ. ५९ यांहून इतर मृग, पशू, पक्षी, जंगली जनावरे यांच्या एक वेळच्या आहारावरून त्यांच्यासाठी द्यावयाच्या शिध्याच्या प्रमाणाविषयी अनुमान करून घ्यावे.

६० कोळसे आणि तूस अनुक्रमे लोखंडाच्या कारखान्यांसाठी आणि भिंतींना गिलावा करण्यासाठी घेऊन जाण्यास सांगावे. ६१ कण्या दास, कामगार व स्वयंपाकी यांना द्याव्यात; याहून इतर शिल्लक पदार्थ भाताच्या व चपात्यांच्या दुकानदारांना द्यावेत.

६२ तराजू, वजने आणि मापे, जाते, मुसळ आणि उखळ, खलबत्ता, भरडण्याचे यंत्र, तबक, सूप, चाळणी, करंडी, पेटारा आणि केरसुणी ही अवजारे होत.

६३ झाडलोट करणारा, राखण करणारा, वजन करणारा, मापून देणारा व त्याच्यावर देखरेख करणारा, माल काढून देणारा व त्याच्यावर देखरेख करणारा, हिशोब ठेवणारा आणि दास व कामगार हे कोठारांतील मजूर.

उच्चैर्धान्यस्य निक्षेपो मूताः क्षारस्य संहताः ।
मृत्काष्ठकोष्ठाः स्नेहस्य पृथिवी लवणस्य च ॥ ६४ ॥

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे कोष्ठागाराध्यक्षः पञ्चदशोऽध्यायः । आदितः षट्त्रिंशः ।

१६

## [ चतुस्त्रिंशं प्रकरणम् – पण्याध्यक्षः ]

पण्याध्यक्षः स्थलजलजानां नानाविधानां पण्यानां स्थलपथवारिपथोपयातानां सारफल्ग्वर्घान्तरं प्रियाप्रियतां च विद्यात्, तथा विक्षेपसंक्षेपक्रयविक्रयप्रयोगकालान् ।१।

यच्च पण्यं प्रचुरं स्यात्तदेकीकृत्यार्घमारोपयेत् ।२। प्राप्तेऽर्घे वाऽर्घान्तरं कारयेत् ।३।

स्वभूमिजानां राजपण्यानामेकमुखं व्यवहारं स्थापयेत्, परभूमिजानामनेकमुखम् ।४। उभयं च प्रजानामनुग्रहेण विक्रापयेत् ।५। स्थूलमपि च लाभं

६४ धान्य साठवण्याची जागा जमिनीपासून उंचावर असावी. (गूळ आदी) क्षारांसाठी घट्ट विणलेल्या करंडचा असाव्यात. (तूप, तेल ह्या) स्नेहासाठी मातीच्या घागरी किंवा लाकडाची पिंपे असावीत. आणि मीठ जमिनीवरच साठवावे.

## सोळावा अध्याय

### प्रकरण ३४ : पण्याध्यक्ष (व्यापारावरील मुख्य अधिकारी)

१ (व्यापाराचे नियमन करणाऱ्या) पण्याध्यक्षाने जमिनीत व पाण्यात उत्पन्न होणाऱ्या विविध प्रकारच्या (स्वदेशीय) पदार्थांच्या, तसेच खुष्कीने व जलमार्गाने आलेल्या (परदेशी) पदार्थांच्या – भारी किमतीच्या व हलक्या किमतीच्या – वस्तूंच्या किमतीतील चढउतार आणि लोकांच्या आवडीनिवडी यांची पूर्ण माहिती करून घ्यावी, तसेच माल अनेक ठिकाणी विक्रीस केव्हा ठेवावा, फक्त एकेच ठिकाणी त्याची विक्री केव्हा करावी, खरेदी केव्हा करावी, विक्री केव्हा करावी या गोष्टीही त्याला समजणे आवश्यक आहे.

२ आणि जो माल भरपूर प्रमाणात उपलब्ध असेल तो सर्व एके ठिकाणी आणून त्याची किंमत वाढवावी. ३ किंवा त्याची मूळ किंमत वसूल झाल्यावर मालाची किंमत कमी करावी.

४ स्वदेशात उत्पन्न झालेल्या सरकारी मालाचा व्यापार एकाच मक्तेदाराकरवी करून घ्यावा, परदेशात उत्पन्न झालेल्या मालाचा अनेक व्यापाऱ्यांकरवी. ५ आणि ते दोन्ही प्रकारचे माल प्रजाजनांना फायदेशीर होतील अशा रीतीने

**प्रजानामौपघातिकं वारयेत् । ६ । अजस्रपण्यानां कालोपरोधं संकुलदोषं वा नोत्पादयेत् । ७ ।**

**बहुमुखं वा राजपण्यं वैदेहकाः कृतार्घं विक्रीणीरन् । ८ । छेदानुरूपं च वैधरणं दद्युः । ९ ।**

**षोडशभागो मानव्याजी, विंशतिभागस्तुलामानं, गण्यपण्यानामेकादशभागः । १० ।**

**परभूमिजं पण्यमनुग्रहेणावाहयेत् । ११ । नाविकसार्थवाहेभ्यश्च परिहारमायतिक्षमं दद्यात् । १२ । अनभियोगश्चार्थेष्वागन्तूनाम्, अन्यत्र सभ्योपकारिभ्यः । १३ ।**

**पण्याधिष्ठातारः पण्यमूल्यमेकमुखं काष्ठद्रोण्यामेकच्छिद्रापिधानायां निदध्युः । १४ । अह्नश्चाष्टमे भागे पण्याध्यक्षस्यार्पयेयुः– 'इदं विक्रीतम्, इदं शेषम्' इति । १५ । तुलामानभाण्डं चार्पयेयुः । १६ । इति स्वविषये व्याख्यातम् । १७ ।**

विकावयास लावावे. ६ आणि प्रजाजनांना हानिकारक होईल असा खूप मोठासुद्धा नफा टाळावा. ७ ज्या वस्तू नेहमी लागणाऱ्या आहेत त्यांच्याबाबतीत वेळ घालविल्यामुळे अडचण आणि रेलचेलीमुळे होणारा दोष उत्पन्न होऊ देऊ नये.

८ किंवा व्यापाऱ्यांनी सरकारी माल अनेक ठिकाणी ठरवून दिलेल्या किमतीने विकावा. ९ आणि सरकारच्या नफ्यात त्यांमुळे होणाऱ्या तुटीला अनुरूप अशी नुकसानभरपाई द्यावी.

१० मापाने केलेल्या विक्रीवर किमतीच्या सोळावा भाग व्याजी, वजनाने केलेल्या विक्रीवर एकविसांश भाग व्याजी आणि संख्येने मोजून केलेल्या विक्रीवर एकअकरांश भाग व्याजी आकारावी.

११ परदेशातील मालाला सवलती देऊन आणावयास उत्तेजन द्यावे. १२ नौकांतून माल आणणारे आणि तांड्यातील व्यापारी यांना नफा होईल अशा बेताने करांतून सूट द्यावी. १३ आणि परदेशी व्यापाऱ्यांवर पैशासंबंधी खटले होऊ देऊ नयेत; याला अपवाद जे स्वदेशी व्यापारीसंघाचे सभासद अथवा मदतनीस असतील त्यांचा.

१४ मालाची विक्री करणाऱ्यांनी मालाची आलेली किंमत एकेच ठिकाणी, झाकता येईल असे भोक असलेल्या लाकडी पेटीत टाकावी. १५ आणि दिवसाच्या आठव्या भागात ती पण्याध्यक्षाच्या स्वाधीन करून 'इतका माल विकला, इतका शिल्लक आहे,' असे सांगावे. १६ आणि तराजू, वजने व मापे त्याच्या ताब्यात द्यावीत. १७ हे स्वदेशात करावयाच्या विक्रीसंबंधी झाले.

**परविषये तु – पण्यप्रतिपण्ययोरर्घं मूल्यं चागमय्य शुल्कवर्तन्यातिवाहिकगुल्मतरदेयभक्तभागव्ययशुद्धमुदयं पश्येत् । १८ । असत्युदये भाण्डनिर्वहणेन पण्यप्रतिपण्यानयनेन वा लाभं पश्येत् । १९ । ततः सारपादेन स्थलव्यवहारमध्वना क्षेमेण प्रयोजयेत् । २० । अटव्यन्तपालपुरराष्ट्रमुख्यैश्च प्रतिसंसर्गं गच्छेदनुग्रहार्थम् । २१ । आपदि सारमात्मानं वा मोक्षयेत् । २२ । आत्मनो वा भूमिं प्राप्तः सर्वदेयविशुद्धं व्यवहरेत । २३ । वारिपथे वा यानभागकपथ्यदनपण्यप्रतिपण्यार्घप्रमाणयात्राकालभयप्रतीकारपण्यपत्तनचारित्राण्युपलभेत । २४ ।**

**नदीपथे च विज्ञाय व्यवहारं चरित्रतः ।**
**यतो लाभस्ततो गच्छेदलाभं परिवर्जयेत् ।। २५ ।।**

**इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे पण्याध्यक्षः षोडशोऽध्यायः । आदितः सप्तत्रिंशः ।**

१८ परंतु परदेशात विक्रीसाठी माल पाठविण्याच्या संबंधात – (पण्याध्यक्षाने) परदेशात न्यावयाचा माल व तेथून आणावयाचा माल यांची मूळ किंमत व विक्रीची किंमत यांची माहिती मिळवून जकात, रस्त्यावरील रक्षणासाठी कर, संरक्षणासाठी बरोबर दिलेल्या शिपायांवरील खर्च, चौक्या व तरी यांवरील खर्च, अन्नपाण्याचा खर्च आणि (परदेशातील सरकारचा) हिस्सा हा सर्व खर्च विचारात घेऊन नफा किती होईल ते पहावे. १९ जर नफा होत नसेल तर आपला माल त्या देशात नेण्याने अथवा आपला माल नेऊन व तेथील माल आणून दुसरा काही लाभ होतो की काय ते पहावे. २० नंतर ज्यात भारी किमतीचा माल एकचतुर्थांशाइतका आहे असा माल सुरक्षित रस्त्यावरून खुष्कीच्या मार्गाने घेऊन जावा. २१ जंगलांतील रहिवाशी, सरहद्दीवरील दुर्गपाल, शहरे आणि राष्ट्र यांतील मुख्य अधिकारी यांच्याशी त्यांची मर्जी राखण्यासाठी संपर्क साधावा. २२ वाटेत संकट आल्यास भारी किमतीच्या मालाला अथवा स्वतःला वाचवावे. २३ किंवा अभिप्रेत असलेल्या जागी जाऊन पोचल्यास सर्व देणी देऊन विक्रीचा व्यवहार करावा. २४ अथवा जलमार्गाने जावयाचे असल्यास नावांचे भाडे, प्रवासातील अन्नपाण्याचा खर्च, आपला माल व परदेशातून आणावयाचा माल यांची किंमत व प्रमाण, प्रवासाला योग्य वेळ, संकटांबद्दल करावयाची तरतूद आणि तेथील बंदरांत प्रचलित असलेले नियम यांविषयीची माहिती मिळवावी.

२५ आणि नदीमार्गाने जावयाचे असता बंदरांच्या नियमांवरून तेथील व्यापाराच्या परिस्थितीची माहिती करून घेऊन जिकडे लाभ होईल तिकडे जावे, जेथे लाभ होणार नाही असा प्रदेश वर्ज्य करावा.

१७

[ पञ्चत्रिंशं प्रकरणम् – कुप्याध्यक्षः ]

कुप्याध्यक्षो द्रव्यवनपालैः कुप्यमानाययेत् । १ । द्रव्यवनकर्मान्तांश्च प्रयोजयेत् । २ । द्रव्यवनच्छिदां च देयमत्ययं च स्थापयेदन्यत्रापद्भ्यः । ३ ।

कुप्यवर्गः – शाकतिनिशधन्वनार्जुनमधूकतिलकसालशिंशपारिमेदराजादनशिरीषखदिरसरलतालसर्जाश्वकर्णसोमवल्ककुशाम्रप्रियकधवादिः सारदारुवर्गः । ४ ।

उटजचिमियचापवेणुवंशसातिनकण्टकभाल्लूकादिर्वेणुवर्गः । ५ ।

वेत्रशीकवल्लीवाशीश्यामलतानागलतादिर्वल्लीवर्गः । ६ ।

## सतरावा अध्याय

## प्रकरण ३५ : कुप्याध्यक्ष (जंगलांतील उत्पादनावरील मुख्य अधिकारी)

१ (जंगलांतील उत्पादनावरील मुख्य अधिकारी) कुप्याध्यक्षाने द्रव्यवनांतील रक्षक अधिकाऱ्यांकडून तेथील माल आणवावा. २ आणि द्रव्यवनातील मालासाठी कारखाने उभारावेत. ३ आणि द्रव्यवनांतील झाडे तोडणारांनी त्याबद्दल किती रक्कम द्यावी व परवानगीशिवाय तोडल्यास – आपत्तीचा अपवाद वगळता – किती दंड द्यावा ते ठरवून द्यावे.

४ कुप्यामध्ये पुढील वस्तूंचा अंतर्भाव होतो–
साग, तिनिश, धन्वन, अर्जुन, मधूक (मोह), तिलक, साल, शिंशपा, अरिमेद, राजादन, शिरीष, खैर, सरल (देवदार), ताड, सर्ज, अश्वकर्ण, सोमवल्क, कुश, आम्र, प्रियक आणि धव हा भारी लाकडांचा वर्ग.

५ उटज (मोठी भोके, नाजूक काटे असलेला व खडबडीत), चिमिय (भोके नसलेला व वरून गुळगुळीत), चाप (लहान भोके असलेला व फार खडबडीत), वेणु (काटे नसलेला, धनुष्य करण्यास उपयोगी), वंश (भोके आणि लांब पेरे असलेला, बासरी करण्यास उपयोगी), सातिन (पुष्कळ लांब काटे असलेला), कंटक (गव्हासारखी फळे असलेला), भाल्लूक (लांब पेरे अथवा मोठा घेर असलेला) आणि इतर हा वेणूंचा (बांबूंचा) वर्ग.

६ वेत्र (वेत), शीकवल्ली, वाशी, श्यामलता, नागलता इत्यादी हा लतांचा वर्ग.

मालतीमूर्वार्कशणगवेधुकातस्यादिर्वल्कवर्गः । ७ ।

मुञ्जबल्बजादि रज्जुभाण्डम् । ८ ।

तालीतालभूर्जानां पत्रम् । ९ ।

किंशुककुसुम्भकुङ्कुमानां पुष्पम् । १० ।

कन्दमूलफलादिरौषधवर्गः । ११ ।

कालकूटवत्सनाभहालाहलमेषशृङ्गमुस्ताकुष्ठमहाविषवेल्लितकगौरार्द्रबालकमार्कटहैमवतकालिङ्गकदारदकाङ्कोलसारकोष्ट्रकादीनि विषाणि, सर्पाः कीटाश्च त एव कुम्भगताः विषवर्गः । १२ ।

गोधासेरकद्वीप्यृक्षशिशुमारसिंहव्याघ्रहस्तिमहिषचमरसृमरखड्गगोमृगगवयानां चर्मास्थिपित्तस्नाय्वक्षिदन्तशृङ्गखुरपुच्छानि, अन्येषां वापि मृगपशुपक्षिव्यालानाम् । १३ ।

कालायसताम्रवृत्तकंससीसत्रपुवैकृन्तकारकूटानि लोहानि । १४ ।

विदलमृत्तिकामयं भाण्डम् । १५ ।

७ मालती, मूर्वा, अर्क, शण (अंबाडी), गवेधुका, अतसी इत्यादी हा वल्कांचा वर्ग.

८ मुंज, बल्वज आदि दोर करण्याच्या कामी उपयोगी गवत.

९ ताली, ताड आणि भूर्ज यांची (लिहिण्याच्या कामी उपयोगी) पाने.

१० किंशुक, कुसुंभ आणि कुंकुम यांची (रंग देण्यास उपयोगी) फुले.

११ कंद, मुळे, फळे इत्यादी औषधांचा वर्ग.

१२ कालकूट, बचनाग, हालाहल, मेषशृंग, मुस्ता, कुष्ठ, महाविष, वेल्लितक, गौरार्द्र, बालक, मार्कट, हैमवत, कालिंगक, दारदक, अंकोलसारक, उष्ट्रक इत्यादी विषे आणि साप व किडे – तेच घडयात घालून ठेवलेले, हा विषांचा वर्ग.

१३ घोरपड, सेरक, चित्ता, अस्वल, शिशुमार, सिंह, वाघ, हत्ती, रेडा, चमर, सृमर, गेंडा, गाय, मृग आणि गवा यांची, तसेच इतरही हरीण, पशू, पक्षी आणि जंगली जनावरे यांची कातडी, हाडे, पित्त, स्नायू, डोळे, दात, शिंगे, खुरे व शेपटया.

१४ लोखंड, तांबे, पोलाद, कासे, शिसे, कथील, वैकृंतक आणि पितळ हे धातू.

१५ वेत आणि माती यांपासून बनविलेली भांडी.

अङ्गारतुषभस्मानि, मृगपशुपक्षिव्यालवाटाः काष्ठतृणवाटाश्च । इति । १६ ।

बहिरन्तश्च कर्मान्ता विभक्ताः सार्वभाण्डिकाः ।
आजीवपुररक्षार्थाः कार्याः कुप्योपजीविना ।। १७ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे कुप्याध्यक्षः सप्तदशोऽध्यायः । आदितोऽष्टात्रिंशः ।

## १८

## [ षट्त्रिंशं प्रकरणम् – आयुधागाराध्यक्षः ]

आयुधागाराध्यक्षः सांग्रामिकं दौर्गकर्मिकं परपुराभिघातिकं च यन्त्रमायुधमावरणमुपकरणं च तज्जातकारुशिल्पिभिः कृतकर्मप्रमाणकालवेतनफलनिष्पत्तिभिः कारयेत्, स्वभूमिषु च स्थापयेत् । १ । स्थानपरिवर्तनमातपप्रवातप्रदानं च बहुशः कुर्यात् । २ । ऊष्मोपस्नेहक्रिमिभिरुपहन्यमानमन्यथा स्थापयेत् । ३ । जातिरूपलक्षणप्रमाणागममूल्यनिक्षेपैश्चोपलभेत । ४ ।

१६ कोळसे, तूस आणि राख, हरीण, पशू, पक्षी आणि जंगली जनावरे यांची आवारे, आणि लाकडे व गवत यांचे संग्रह. इतक्या सर्व गोष्टींचा कुप्यवर्गात समावेश होतो.

१७ कुप्याध्यक्षाने शहराबाहेर आणि शहरात उपजीविकेची आणि नगररक्षणाची साधने तयार करण्यासाठी सर्व प्रकारचे पदार्थ बनविणारे निरनिराळे कारखाने उभारावेत.

## अठरावा अध्याय

## प्रकरण ३६ : आयुधागाराध्यक्ष (शस्त्रागारावरील मुख्य अधिकारी)

१ शस्त्रागारावरील अध्यक्षाने युद्धात उपयोगी पडणारी, दुर्गाच्या रक्षणासाठी आवश्यक असणारी आणि शत्रूंच्या शहरांचा नाश करण्यास समर्थ अशी यंत्रे, शस्त्रे, चिलखते आणि अवजारे, करावयाच्या कामाचे प्रमाण, ते संपविण्याची मुदत आणि वेतन यांसंबंधी करार करून माल निर्माण करणाऱ्या तज्ज्ञ कारागीर व कलाकार यांच्याकडून करवून घ्यावीत, आणि त्यांच्यासाठी योग्य असलेल्या जागी त्यांचा संग्रह करून ठेवावा. २ त्यांची जागा वरचेवर बदलावी आणि त्यांना वारंवार ऊन आणि हवा द्यावी. ३ उष्णता, ओलावा आणि किडे यांच्यामुळे हानी पोचत असल्यास दुसऱ्या रीतीने ती साठवावीत. ४ त्यांची जात, रूप, लक्षणे, प्रमाण, उद्‌गमस्थान, किंमत आणि साठविण्यांचे ठिकाण यांची माहिती आयुधागाराध्यक्षाला असणे आवश्यक आहे.

**सर्वतोभद्रजामदग्न्यबहुमुखविश्वासघातिसंघाटीयानकपर्जन्यकबाहूर्ध्वबाह्वर्ध-बाहूनि स्थितयन्त्राणि । ५ ।**

**पाञ्चालिकदेवदण्डसूकरिकामुसलयष्टिहस्तिवारकतालवृन्तमुद्‌गरगदास्पृक्त-लाकुद्दालास्फाटिमोत्पाटिमोद्धाटिमशतघ्निन्त्रिशूलचक्राणि चलयन्त्राणि । ६ ।**

५ सर्वतोभद्र (गाडीच्या चाकाएवढे, तीक्ष्ण कडा असलेले, भिंतीत गंधर्वाच्या हातात वसविलेले आणि फिरविले असता दगडांचा अथवा वाणांचा सभोवार वर्षाव करणारे यंत्र), जामदग्न्य (मधील भोकातून मोठमोठ्या वाणांचा वर्षाव करणारे यंत्र, किंवा विविध प्रकारच्या शस्त्रांचा मारा करणारे यंत्र), बहुमुख (बुरुजावर वाण सोडण्यासाठी अनेक छिद्रे असलेली धनुर्धरांसाठी जागा, किंवा चाकांवर हलविता येणारा चामडचाने आच्छादिलेला वाण सोडावयाचा बुरूज), विश्वासघाती (प्राकाराच्या भिंतीत बाहेरच्या वाजूस वसविलेली तुळई, जी यंत्राने खाली पाडली असता शत्रूचा नाश करते), संघाटी (बुरुजांना आग लावण्यासाठी लांब तुळयांचे आगीचे यंत्र), यानक (चाकांवर चालणारे, आत फळचा असलेले, एक दंड लांब यंत्र), पर्जन्यक (आग विझविण्यासाठी पाणी सोडणारे यंत्र), बाहू (समोरासमोर दोन उभे खांब, पाडले म्हणजे मारणारे), ऊर्ध्वबाहु (पन्नास हात लांबीचा एकच खांब, यंत्राने पाडता येणारा) आणि अर्धबाहू (त्याच्यापेक्षा अर्ध्या म्हणजे पंचवीस हात लांबीचा खांब) —ही एके जागी स्थिर केलेली यंत्रे.

६ पांचालिक (मोठे लोखंडी खिळे ठोकलेली लाकडी फळी, खंदकात शत्रूंना अडसर म्हणून ठेवलेली), देवदंड (खिळे नसलेली मोठी तुळई, भिंतीवर ठेवलेली, किंवा यंत्राने सोडावयाचे एक हात लांब लाकूड), सूकरिका (कापूस, लोकर इत्यादी भरलेली चामडचाची पिशवी, भिंतीचे दगडांच्या माऱ्यापासून रक्षण करण्यासाठी), मुसलयष्टि (खैराचा बनविलेला भाला), हस्तिवारक (हत्तींचे निवारण करणारा दोन किंवा तीन टोके असलेला दंड), तालवृन्त (वातचक्र, पंख्यासारखे) मुद्‌गर (हातोडा), गदा, स्पृक्तला (अणकुचीदार खिळे असलेली गदा), कुदळ, आस्फाटिम (चामडचाने मढविलेले चार खांब असलेले गोफणीसारखे हत्यार), उत्पाटिम (खांब उपटण्यासाठी हत्यार), उद्धाटिम (मुद्‌गराच्या आकाराचे यंत्र), शतघ्नि (मोठे लांब खिळे ठोकलेले असलेला, एका टोकाला चाक असलेला, भिंतीवर ठेवावयाचा खांब), त्रिशूळ आणि चक्र — ही चलयंत्रे.

**शक्तिप्रासकुन्तहाटकभिण्डिपालशूलतोमरवराहकर्णकणयकर्पणत्रासिकादीनि च हुलमुखानि । ७ ।**

**तालचापदारवशार्ङ्गाणि कार्मुककोदण्डद्रूणा धनूंषि । ८ । मूर्वार्कशणगवेधुवेणुस्नायूनि ज्याः । ९ । वेणुशरशलाकादण्डासननाराचाश्च इषवः । १० । तेषां मुखानि छेदनभेदनताडनानि आयसास्थिदारवाणि । ११ ।**

**निर्स्त्रिशमण्डलाग्रासियष्टयः खड्गाः । १२ । खड्गमहिषवारणविषाणदारुवेणुमूलानित्सरवः । १३ ।**

७ शक्ति (चार हात लांव, पूर्ण लोखंडी, करवीर-पत्रासारखे टोक व गाईच्या आचळाच्या आकाराची मूठ असलेले शस्त्र), प्रास (चोवीस अंगुळे लांव, लोखंडी, दोन बाजू असलेले), कुंत (सात, सहा किंवा पाच हात लांब, घोडेस्वारांच्या उपयोगी), हाटक (कुंतासारखेच पण तीन टोके असलेले), भिंडिपाल (कुंतासारखेच पण रुंद टोकाचे), सूळ, तोमर (चार, साडेचार किंवा पाच हात लांब व बाणाच्या आकाराचे टोक असलेले), वराहकर्ण (प्रासासारखे अथवा तोमरासारखे, डुकराच्या कानाच्या आकाराचे टोक असलेले), कणय (वीस, बावीस किंवा चोवीस अंगुळे लांब, संपूर्ण लोखंडी, दोन्ही टोकांस त्रिशूळ व मध्ये मूठ असलेले), कर्पण (तोमराच्या आकाराचा, सात, आठ किंवा नऊ कर्ष वजनाचा हाताने फेकावयाचा बाण), त्रासिका (प्रासाच्या आकाराची, संपूर्ण लोखंडी, एका टोकाला गुच्छ असलेली) आणि इतर—ही टोके असलेली शस्त्रे.

८ ताल (वृक्ष), चाप (वेणू), लाकूड आणि शिंगे यांपासून बनविलेले कार्मुक, कोदंड, द्रूणा आणि धनू (हे धनुष्याचे प्रकार). ९ मूर्वा, अर्क, शण, गवेधु, वेणू यांच्या दोऱ्यांपासून अथवा स्नायूंपासून बनविलेल्या धनुष्यांसाठी दोऱ्या. १० वेणू, शर, शलाका (लाकडापासून केलेला), दंडासन (अर्धा लोखंडी) आणि नाराच (पूर्ण लोखंडी) हे बाणांचे प्रकार. ११ तोडणे, आत घुसणे आणि मार बसविणे ह्या क्रिया करणारी त्यांची टोके लोखंड, हाड आणि लाकूड यांची बनविलेली असतात.

१२ निस्त्रिश (वाकडे टोक असलेले), मंडलाग्र (सरळ पण टोकाला गोल), असियष्टि (अरुंद आणि लांब) हे खड्गाचे प्रकार. १३ गेंडा आणि रेडा यांची शिंगे, हत्तीचे दात, लाकूड आणि वेणूचे मूळ यांपासून तलवारीच्या मुठी करतात.

परशुकुठारपट्टसखनित्रकुद्दालक्रकचकाण्डच्छेदनाः क्षुरकल्पाः । १४ ।

यन्त्रगोष्पणमुष्टिपाषाणरोचनीदृषदश्चाश्मायुधानि । १५ ।

लोहजालिकापट्टकवचसूत्रकङ्कटशिंशुमारकखड्गिधेनुकहस्तिगोचर्मखुरशृङ्गसंघातं वर्माणि । १६ । शिरस्त्राणकण्ठत्राणकूर्पासकञ्चुकवारवाणपट्टनागोदरिकाः पेटीचर्महस्तिकर्णतालमूलधमनिकाकपाटकिटिकाप्रतिहतबलाहकान्ताश्चावरणानि । १७ ।

हस्तिरथवाजिनां योग्याभाण्डमालंकारिकं संनाहकल्पनाश्चोपकरणानि । १८ ।

ऐन्द्रजालिकमौपनिषदिकं च कर्म । १९ ।

१४ परशु (पूर्ण लोखंडी, चोवीस अंगुळे लांब), कुऱ्हाड, पट्टस (एका बाजूला किंवा दोन्ही बाजूला त्रिशूळ असलेली कुऱ्हाड), खनित्र (टिकाव), कुदळ, करवत आणि कांडच्छेदन (मोठी कुऱ्हाड) – ही वस्तऱ्यासारखी हत्यारे.

१५ यंत्राने, गोफणीने व हाताने फेकावयाचे दगड आणि जात्याचे दगड ही दगडी हत्यारे.

१६ लोखंडाच्या जाळीने अथवा पट्ट्यांनी बनविलेले चिलखत, आत कापूस वगैरे भरलेले सुती कापडाचे कंकट म्हणून ओळखले जाणारे चिलखत आणि शिशुमार, गेंडा, धेनुक, हत्ती व बैल यांचे खूर व शिंगे यांसहित चामडे हे चिलखतांचे प्रकार होत. १७ शिरस्त्राण, कंठत्राण, कूर्पास (कोपरापर्यंत आवरण), कंचुक (गुडघ्यापर्यंत), वारवाण (घोटयापर्यंत), पट्ट (बाहीशिवाय असलेले व लोखंडी नसलेले आवरण), नागोदरिका (मांडयांचे आवरण, किंवा हाताच्या बोटांचे आवरण), तसेच पेटी, ढाल, हस्तिकर्ण (रक्षणासाठी वापरावयचा फळा), तालमूल (प्राकाराच्या वरच्या बाजूस ताडाच्या मुळाची आकृती), धमनिका (वारा भरलेली पिशवी), कवाड, किटिका (वेताने अथवा चामडयाने केलेले आवरण), अप्रतिहत (हत्तींना परतविणारे) आणि बलाहकान्त (अप्रतिहतासारखे पण शेवटी लोखंडी पट्ट्या असलेले) – ही आवरणे होत.

१८ हत्ती, रथ, घोडे यांना शिक्षण देण्यासाठी वापरावयाचे (अंकुशादी) पदार्थ, त्यांच्यावर चढविण्याचे (झूल आदी) अलंकारांचे पदार्थ आणि लढाईसाठी त्यांना सज्ज करण्याची साधने ही उपकरणे होत.

१९ इंद्रजालाचे प्रयोग आणि गुप्त प्रयोग हे गुप्त कामाचे प्रकार होत.

कर्मान्तानां च –

इच्छामारम्भनिष्पत्तिं प्रयोगं व्याजमुद्दयम् ।
क्षयव्ययौ च जानीयात्कुप्यानामायुधेश्वरः ।। २० ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे आयुधागाराध्यक्षः अष्टादशोऽध्यायः ।
आदित एकोनचत्वारिंशः ।

## १९

## [ सप्तत्रिंशं प्रकरणम् – तुलामानपौतवम् ]

पौतवाध्यक्षः पौतवकर्मान्तान् कारयेत् । १ ।

धान्यमाषा दश सुवर्णमाषकः, पञ्च वा गुञ्जाः । २ । ते षोडश सुवर्णः कर्षो वा । ३ । चतुष्कर्षं पलम् । ४ ।

अष्टाशीतिर्गौरसर्षपा रूप्यमाषकः । ५ । ते षोडश धरणम्, शैम्ब्यानि वा विंशतिः । ६ ।

विंशतितण्डुलं वज्रधरणम् । ७ ।

२० आणि कारखान्यांच्या संबंधात –

आयुधागाराध्यक्षाला (राजाची) इच्छा, कार्याची फलनिष्पत्ती, वनांतील वस्तूंचा उपयोग, त्यात केली असल्यास फसवणूक आणि त्यांपासून होणारा फायदा, घट आणि खर्च या गोष्टींचे ज्ञान असणे आवश्यक आहे.

### एकोणिसावा अध्याय

### प्रकरण ३७ : वजने आणि मापे यांची प्रमाणे

१ ठरीव प्रमाणात असलेली वजने आणि मापे तयार करणाऱ्या पौतवाध्यक्षाने त्यासाठी कारखाने स्थापावेत.

२ दहा उडीद किंवा पाच गुंजा म्हणजे एक सोने वजन करण्यासाठी माषक. ३ सोळा माषक म्हणजे एक सुवर्ण अथवा कर्ष. ४ चार कर्ष म्हणजे एक पल.

५ अठ्ठ्याऐशी पांढऱ्या मोहऱ्या म्हणजे एक रुपे वजन करण्यासाठी माषक. ६ सोळा रूप्य माषक अथवा वीस शिंवा (एक प्रकारचे कडधान्य) म्हणजे एक धरण.

७ तांदुळाचे वीस दाणे म्हणजे एक हिरा वजन करण्यासाठी धरण.

**अर्धमाषकः माषकः द्वौ चत्वारः अष्टौ माषकाः सुवर्णो द्वौ चत्वारः अष्टौ सुवर्णाः दश विंशतिः त्रिंशत् चत्वारिंशत् शतमिति ।८। तेन धरणानि व्याख्यातानि ।९।**

**प्रतिमानान्ययोमयानि मागधमेकलशैलमयानि यानि वा नोदकप्रदेहाभ्यां वृद्धिं गच्छेयुरुष्णेन वा ह्रासम् ।१०।**

**षडङ्गुलादूर्ध्वमष्टाङ्गुलोत्तरा दश तुलाः कारयेत् लोहपलादूर्ध्वमेकपलोत्तराः, यन्त्रम् उभयतःशिक्यं वा ।११।**

**पञ्चत्रिंशत्पललोहां द्विसप्तत्यङ्गुलायामां समवृत्तां कारयेत् ।१२। तस्याः पञ्चपलिकं मण्डलं बद्ध्वा समकरण कारयेत् ।१३। ततः कर्षोत्तरं पलं पलोत्तरं दशपलं द्वादश पञ्चदश विंशतिरिति पदानि कारयेत् ।१४। तत आशताद्दशोत्तरं कारयेत् ।१५। अक्षेषु नान्दीपिनद्धं कारयेत् ।१६।**

८ अर्धा माषक, एक माषक, दोन माषक, चार माषक, आठ माषक, एक सुवर्ण, दोन सुवर्ण, चार सुवर्ण, आठ सुवर्ण, दहा सुवर्ण, वीस सुवर्ण, तीस सुवर्ण, चाळीस सुवर्ण आणि शंभर सुवर्ण – इतकी वजने तयार करावीत. ९ तशीच धरणाची वजने करावीत.

१० वजने लोखंडाची करावीत अथवा मगध आणि मेकल देशातील दगडाची करावीत किंवा अशा प्रकारची की जी पाण्याने अथवा लिंपण्याने वाढणार नाहीत किंवा अग्नीने कमी होणार नाहीत.

११ सहा अंगुले लांब व पुढे आठ आठ अंगुले लांबीने वाढत जाणाऱ्या आणि एक पल लोखंडाची बनविलेली व पुढे एक एक पल वजनाने वाढत जाणाऱ्या अशा दांड्या असलेल्या दहा तराजू, यंत्र असलेल्या अथवा दोन्हीकडे पारडी असलेल्या, करून घ्याव्यात.

१२ पस्तीस पल लोखंडापासून बनविलेली व बहात्तर अंगुले लांब असलेली समवृत्ता नावाची तराजू करावी. १३ त्या दांडीला पाच पल वजनाचा एक गोळा बांधल्यावर दांडी समतोल राहील त्या ठिकाणी खूण करावी. १४ तेथून पुढे एक कर्ष, एक एक कर्षाने वाढवीत एक पल, पुढे एक एक पलाने वाढवीत दहा पल, मग बारा पल, पंधरा पल, वीस पल इतक्या वजनांची चिन्हे करावीत. १५ त्याच्या पुढे दहा दहांनी वाढवीत जाऊन शंभर पलपर्यंत चिन्हे करावीत. १६ पाचाने भाग जाणाऱ्या आकड्यांच्या जागी स्वस्तिकाचे चिन्ह करावे.

**द्विगुणलोहां तुलामतः षण्णवत्यङ्गुलायामां परिमाणीं कारयेत् । १७ । तस्याः शतपदादूर्ध्वं विंशतिः पञ्चाशत् शतमिति पदानि कारयेत् । १८ ।**

**विंशतितौलिको भारः । १९ । दशधरणिकं पलम् । २० । तत्पलशतमायमानी । २१ । पञ्चपलावरा व्यावहारिकी भाजन्यन्तःपुरभाजनी च । २२ । तासामर्धधरणावरं पलम्, द्विपलावरमुत्तरलोहम्, षडङ्गुलावराश्चायामाः । २३ ।**

**पूर्वयोः पञ्चपलिकः प्रयामो मांसलोहलवणमणिवर्जम् । २४ ।**

**काष्ठतुला अष्टहस्ता पदवती प्रतिमानवती मयूरपदाधिष्ठिता । २५ ।**

**काष्ठपञ्चविंशतिपलं तण्डुलप्रस्थसाधनम् । २६ । एष प्रदेशो बह्वल्पयोः । २७ । इति तुलाप्रतिमानं व्याख्यातम् । २८ ।**

१७ ह्या (समवृत्ता) तुलेच्या दुप्पट (७० पल) लोखंडाची बनविलेली आणि शहाण्णव अंगुळे लांब अशी परिमाणी नावाची तुला करावी. १८ तिच्यावर शंभर पलाच्या चिन्हानंतर वीस, पन्नास आणि शंभर (दोनशे दाखविणारे) अशी चिन्हे करावीत.

१९ वीस तुला म्हणजे एक भार. २० दहा धरण म्हणजे एक पल. २१ तसे शंभर पल म्हणजे एक आयमानी (वसूल मोजावयाची) तुला. २२ उत्तरोत्तर पाच पलांनी कमी होत जाणाऱ्या अशा व्यावहारिकी (व्यापारात वापरावयाची – ९५ पलांची), भाजनी (नोकरांना वगैरे देण्यासाठी वापरावयाची – ९० पलांची) आणि अंत:पुरभाजनी (राजवाड्यात देण्यासाठी वापरावयाची – ८५ पलांची) अशा आणखी तीन प्रकारच्या तुला आहेत. २३ त्यांचा पल अर्ध्या अर्ध्या धरणाने क्रमशः कमी होत जाणारा (९॥, ९ व ८॥), त्यांचे लोखंड दोन दोन पलांनी क्रमशः कमी होत जाणारे (३३, ३१ व २९) आणि त्यांची लांबी क्रमशः सहा सहा अंगुलांनी कमी होत जाणारी (६६, ६० व ५४) असते.

२४ पूर्वी वर्णन केलेल्या (समवृत्ता आणि परिमाणी ह्या) दोन तुलांच्या संबंधात पाच पलांची वाढ (व्याजी, सरकारला मिळावी); पण मांस, धातू, मीठ व रत्ने यांच्या बाबतीत अपवाद करावा.

२५ लाकडाची केलेली तुला आठ हात लांब, वर वजनाची चिन्हे असलेली अथवा वजन (व त्यासाठी पारडी) यांनी युक्त, मोरांच्या पायांच्या आकाराच्या तोरणावर बसविलेली असावी.

२६ पंचवीस पल वजनाची लाकडे एक प्रस्थ तांदूळ शिजविण्यास लागतात. २७ ह्यावरून कमी किंवा अधिक प्रमाणाची कल्पना करावी. २८ ही झाली तराजू आणि वजने यांची व्याख्या.

अथ धान्यमाषद्विपलशतं द्रोणमायमानम्, सप्ताशीतिपलशतमर्धपलं च व्यावहारिकम्, पञ्चसप्ततिपलशतं भाजनीयम्, द्विषष्टिपलशतमर्धपलं चान्तःपुरभाजनीयम् । २९ ।

तेषामाढकप्रस्थकुडुबाश्चतुर्भागावराः । ३० । षोडशद्रोणा खारी । ३१ । विंशतिद्रोणिकः कुम्भः । ३२ । कुम्भैर्दशभिर्वहः । ३३ ।

शुष्कसारदारुमयं समं चतुर्भागशिखं मानं कारयेद्, अन्तःशिखं वा । ३४ । रसस्य तु सुरायाः पुष्पफलयोस्तुषाङ्गाराणां सुधायाश्च शिखामानं द्विगुणोत्तरा वृद्धिः । ३५ ।

सपादपणो द्रोणमूल्यम्, आढकस्य पादोनः, षण्माषकाः प्रस्थस्य, माषकः कुडुबस्य । ३६ । द्विगुणं रसादीनां मानमूल्यम् । ३७ । विंशतिपणाः प्रतिमानस्य । ३८ । तुलामूल्यं त्रिभागः । ३९ ।

२९ आता (मापांची व्याख्या :) दोनशे पल वजनाचे उडीद भरतील तो एक द्रोण, वसुली मोजण्यासाठी वापरावयाचे माप, एकशे साडेसत्त्याऐंशी पल वजनाचे उडीद भरतील एवढा व्यावहारिक (व्यापारासाठी) द्रोण, एकशे पंचाहत्तर पल वजन मावणारा तो भाजनीय (देण्यासाठी) द्रोण आणि एकशे साडेबासष्ट पल मावणारा तो अंतःपुरभाजनीय (राजवाडचात देण्यासाठी) द्रोण.

३० द्रोणाच्या एकचतुर्थांश असलेले माप आढक, आढकाच्या पावपट प्रस्थ आणि प्रस्थाच्या पावपट कुडुब. ३१ सोळा द्रोण म्हणजे एक खारी. ३२ वीस द्रोण म्हणजे एक कुंभ. ३३ दहा कुंभ म्हणजे एक वह.

३४ मापे वाळलेल्या आणि टणक लाकडाची, धान्याचा एकचतुर्थांश भाग शिगेच्या वर राहील अशी किंवा संपूर्ण धान्य आत शिगेपर्यंत मावेल अशी करून घ्यावीत. ३५ परंतु द्रव पदार्थ, सुरा, फुले व फळे, तूस व कोळसे आणि चुना यांच्या बाबतीत शिगेवरील एकचतुर्थांश अंशाची दुप्पट वाढ व्हावी (म्हणजे माप सव्वापट असावे).

३६ द्रोण मापाची किंमत सव्वा पण, आढकाची पाऊण पण, प्रस्थाची सहा माषक, कुडुबाची एक माषक. ३७ द्रव पदार्थ आदींसाठी मापांची किंमत दुप्पट. ३८ (सर्व) वजनांची (मिळून) किंमत वीस पण. ३९ तराजूची (समवृत्ता तुलेची) किंमत ह्याच्या एकतृतीयांश (सहा पूर्णांक दोनतृतीयांश पण).

**चतुर्मासिकं प्रातिवेधनिकं कारयेत् । ४० । अप्रतिविद्धस्यात्ययः सपादः सप्तविंशतिपणः । ४१ । प्रातिवेधनिकं काकणीकमहरहः पौतवाध्यक्षाय दद्युः । ४२ ।**

**द्वात्रिंशद्भागस्तप्तव्याजी सर्पिषः, चतुःषष्टिभागस्तैलस्य । ४३ । पञ्चाशद्भागो मानस्रावो द्रवाणाम् । ४४ ।**

**कुडुबार्धचतुरष्टभागानि मानानि कारयेत् । ४५ ।**

**कुडुबाश्चतुरशीतिर्वारकः सर्पिषो मतः ।**
**चतुःषष्टिस्तु तैलस्य पादश्च घटिकानयोः ।। ४६ ।।**

**इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे तुलामानपौतवम् एकोनविंशोऽध्यायः ।**
**आदितश्चत्वारिंशः ।**

**२०**

## [ अष्टत्रिंशं प्रकरणम् – देशकालमानम् ]

**मानाध्यक्षो देशकालमानं विद्यात् । १ ।**

**अष्टौ परमाणवो रथचक्रविप्रुट् । २ । ता अष्टौ लिक्षा । ३ । ता अष्टौ**

४० दर चार महिन्यांनी वजनामापांची परीक्षा करून त्यांवर शिक्का मारावा. ४१ शिक्का नसलेल्या वजनामापांबद्दल सव्वासत्तावीस पण दंड करावा. ४२ तपासणी व शिक्का मारणे यांसाठी रोजची एक काकणी याप्रमाणे पौतवाध्यक्षास (व्यापाऱ्यांनी) द्यावी.

४३ तापविल्यावर कमी भरेल म्हणून तुपाच्या बाबतीत एकबत्तिसांश व्याजी घ्यावी, तेलाच्या बाबतीत एकचौसष्टांश. ४४ द्रव पदार्थांच्या बाबतीत एकपन्नासांश भाग, माप करताना सांडते त्याची भरपाई म्हणून घ्यावा.

४५ अर्धे कुडुब, पाव कुडुब आणि एकअष्टमांश कुडुब ही मापे सुद्धा करून घ्यावीत.

४६ चौऱ्यायशी कुडुब म्हणजे तुपाचा एक वारक मानला आहे. परंतु तेलाचा वारक चौसष्ट कुडुबांचा. आणि ह्या दोन्ही वारकांचा पाव भाग म्हणजे घटिका.

### विसावा अध्याय

### प्रकरण ३८ : देश व काल यांची मोजणी

१ (मोजणीवरील) मानाध्यक्षाला देशाचे भाग व कालाचे भाग यांचे ज्ञान असले पाहिजे.

२ आठ परमाणू म्हणजे एक रथचक्रविप्रुष् (रथाच्या चाकाने उडालेल्या धुळीचा कण). ३ ते आठ कण म्हणजे एक लीख. ४ आठ लिखा म्हणजे एक ऊ.

**यूका । ४ । ता अष्टौ यवमध्यः । ५ । अष्टौ यवमध्या अङ्गुलम् । ६ । मध्यमस्य पुरुषस्य मध्यमाया अङ्गुल्या मध्यप्रकर्षो वाऽङ्गुलम् । ७ ।**

**चतुरङ्गुलो धनुर्ग्रहः । ८ । अष्टाङ्गुला धनुर्मुष्टिः । ९ । द्वादशाङ्गुला वितस्तिः, छायापौरुषं च । १० । चतुर्दशाङ्गुलं शमः शलः परिरयः पदं च । ११ ।**

**द्विवितस्तिररत्निः प्राजापत्यो हस्तः । १२ । सधनुर्ग्रहः पौतवविवीतमानम् । १३ । सधनुर्मुष्टिः किष्कुः कंसो वा । १४ । द्विचत्वारिंशदङ्गुलस्तक्षणः क्राकचिककिष्कुः स्कन्धावारदुर्गराजपरिग्रहमानम् । १५ । चतुष्पञ्चाशदङ्गुलः कुप्यवनहस्तः । १६ ।**

**चतुरशीत्यङ्गुलो व्यामो रज्जुमानं खातपौरुषं च । १७ ।**

**चतुररत्निर्दण्डो धनुर्नालिका पौरुषं च गार्हपत्यम् । १८ । अष्टशताङ्गुलं धनुः पथिप्राकारमानं पौरुषं चाग्निचित्यानाम् । १९ । षट्कंसो दण्डो ब्रह्मदेयातिथ्यमानम् । २० ।**

५ आठ उवा म्हणजे एक यवमध्य (जवाच्या मध्यभागाची रुंदी). ६ आठ यवमध्य म्हणजे एक अंगुल. ७ अथवा मध्यम बांध्याच्या पुरुषाच्या मधल्या बोटाच्या मधल्या पेराची जास्तीत जास्त रुंदी म्हणजे एक अंगुल.

८ चार अंगुले म्हणजे एक धनुर्ग्रह. ९ आठ अंगुले म्हणजे एक धनुर्मुष्टि. १० बारा अंगुले म्हणजे एक वितस्ति (वीत), आणि छायापौरुष (सूर्यघटीवरील शंकूची उंची). ११ चौदा अंगुले म्हणजे एक शम, शल, परिरय आणि पद (पाऊल).

१२ दोन वितस्ति म्हणजे एक अरत्नि अथवा प्रजापतीचा हात. १३ धनुर्ग्रहासह हा हात (म्हणजे अठ्ठावीस अंगुले) वजनेमापे व कुरणे मोजण्याच्या कामाचा. १४ धनुर्मुष्टीने युक्त हात (बत्तीस अंगुले) म्हणजे एक किष्कु अथवा कंस. १५ बेचाळीस अंगुलांचा सुताराच्या करवतीचा किष्कु, सैन्याची छावणी, दुर्ग आणि राजाच्या मालमत्तेची मोजणी करण्याच्या कामाचा. १६ चोपन अंगुलांचा जंगलातील उत्पादनाची मोजणी करण्यासाठी हात.

१७ चौऱ्यायशी अंगुलांचा एक व्याम (वाव), दोर मोजण्याच्या कामाचा आणि खणलेल्याची खोली मोजण्याच्या कामाचा.

१८ चार अरत्नी (हात) म्हणजे एक दंड, एक धनू, एक नालिका आणि गृहपतीची एक पुरुष उंची. १९ एकशेआठ अंगुलांचा धनू रस्ते व तट मोजण्याच्या कामाचा आणि यज्ञवेदीच्या रचनेची उंची मोजण्याचे प्रमाण. २० सहा कंसांचा दंड ब्राह्मणांना व अतिथींना द्यावयाचे दान मोजण्याच्या कामाचा.

दशदण्डो रज्जुः । २१ । द्विरज्जुकः परिदेशः । २२ । त्रिरज्जुकं निवर्तन-मेकतः । २३ । द्विदण्डाधिको बाहुः । २४ ।

द्विधनुःसहस्रं गोरुतम् । २५ । चतुर्गोरुतं योजनम् । २६ । इति देश-मानम् । २७ ।

कालमानमत ऊर्ध्वम् । २८ । तुटो लवो निमेषः काष्ठा कला नालिका मुहूर्तः पूर्वापरभागौ दिवसो रात्रिः पक्षो मास ऋतुरयनं संवत्सरो युगमिति कालाः । २९ । द्वौ तुटौ लवः । ३० । द्वौ लवौ निमेषः । ३१ । पञ्च निमेषाः काष्ठा । ३२ । त्रिंशत्काष्ठाः कला । ३३ । चत्वारिंशत्कलाः नालिका । ३४ । सुवर्णमाष-काश्चत्वारश्चतुरङ्गुलायामाः कुम्भच्छिद्रमाढकमम्भसो वा नालिका । ३५ । द्विनालिको मुहूर्तः । ३६ ।

पञ्चदशमुहूर्तो दिवसो रात्रिश्च चैत्रे चाश्वयुजे च मासि भवतः । ३७ । ततः परं त्रिभिर्मुहूर्तैरन्यतरः षण्मासं वर्धते ह्रसते चेति । ३८ ।

२१ दहा दंड म्हणजे एक रज्जु. २२ दोन रज्जू म्हणजे एक परिदेश २३ तीन रज्जू म्हणजे (चौरस) निवर्तनाच्या बाजूची लांबी. २४ (ती लांबी) दोन दंड अधिक असल्यास बाहु होतो.

२५ दोन हजार धनू म्हणजे एक गोरुत. २६ चार गोरुत म्हणजे एक योजन. २७ ही झाली देशाची मोजणी.

२८ आता याच्यानंतर कालाची मोजणी. २९ तुट, लव, निमेष, काष्ठा, कला, नालिका, मुहुर्त, पूर्वाण्ह, अपराण्ह, दिवस, रात्र, पक्ष, महिना, ऋतू, अयन, संवत्सर, युग – हे कालाचे विभाग होत. ३० दोन तुट म्हणजे एक लव. ३१ दोन लव म्हणजे एक निमेष. ३२ पाच निमेष म्हणजे एक काष्ठा. ३३ तीस काष्ठा म्हणजे एक कला. ३४ चाळीस कला म्हणजे एक नालिका. ३५ किंवा चार माषक वजनाच्या सोन्याच्या चार अंगुले लांब तारेने पाडलेल्या घड्याच्या छिद्रातून एक आढक पाणी वाहून जाण्यास लागणारा वेळ म्हणजे एक नालिका. ३६ दोन नालिका म्हणज एक मुहूर्त.

३७ पंधरा मुहूर्तांचा दिवस आणि तितकीच रात्र चैत्र आणि आश्विन महिन्यांत होतात. ३८ त्यानंतर पुढील सहा महिन्यांत त्यांपैकी एक (दिवस) तीन मुहूर्ताइतका वाढत जाऊन नंतर कमी कमी होत जातो (व रात्र तीन मुहूर्तांनी कमी होत जाऊन पुढे वाढत जाते)

छायायामष्टपौरुष्यामष्टादशभागश्छेदः, षट्पौरुष्यां चतुर्दशभागः, त्रिपौरुष्यामष्टभागः, द्विपौरुष्यां षड्भागः, पौरुष्यां चतुर्भागः, अष्टाङ्गुलायां त्रयो दशभागाः चतुरङ्गुलायां त्रयोऽष्टभागाः, अच्छायो मध्याह्न इति । ३९ । परावृत्ते दिवसे शेषमेवं विद्यात् । ४० ।

आषाढे मासि नष्टच्छायो मध्याह्नो भवति । ४१ । अतः परं श्रावणादीनां षण्मासानां द्व्यङ्गुलोत्तरा माघादीनां द्व्यङ्गुलावरा छाया इति । ४२ ।

पञ्चदशाहोरात्राः पक्षः । ४३ । सोमाप्यायनः शुक्लः । ४४ । सोमावच्छेदनो बहुलः । ४५ ।

द्विपक्षो मासः । ४६ । त्रिंशदहोरात्रः कर्ममासः । ४७ । सार्धः सौरः । ४८ । अर्धन्यूनश्चान्द्रमासः । ४९ । सप्तविंशतिर्नाक्षत्रमासः । ५० । द्वात्रिंशद्बलमासः । ५१ । पञ्चत्रिंशदश्ववाहायाः । ५२ । चत्वारिंशद्हस्तिवाहायाः । ५३ ।

३९ (सूर्यघटीवरील शंकूची) छाया आठ पौरुष (शहाण्णव अंगुले) लांब झाली म्हणजे दिवसाचा अठरावा भाग व्यतीत झालेला असतो, सहा पौरुष लांब झाली म्हणजे चौदावा भाग गेलेला असतो, तीन पौरुष लांब झाली म्हणजे आठवा भाग, दोन पौरुष लांब झाली म्हणजे सहावा भाग, एक पौरुष (बारा अंगुले) लांब झाली म्हणजे चौथा भाग, आठ अंगुले लांब झाली म्हणजे तीनदशांश भाग, चार अंगुले लांब झाली म्हणजे दिवसाचा तीनअष्टमांश भाग व्यतीत झालेला असतो, आणि छाया मुळीच नसते तेव्हा मध्यान्ह होतो. ४० दिवस उलटल्यावर याचप्रमाणे त्याचे अवशिष्ट राहिलेले भाग समजावेत.

४१ आषाढ महिन्यात मध्यान्हसमयी छाया मुळीच पडत नाही. ४२ त्यानंतर श्रावणापासूनच्या सहा महिन्यांत मध्यान्हीची छाया दर महिन्याला दोन दोन अंगुलांनी वाढत जाते आणि माघापासूनच्या सहा महिन्यांत ती दर महिन्याला दोन दोन अंगुलांनी कमी कमी होत जाते.

४३ पंधरा अहोरात्र म्हणजे एक पक्ष. ४४ ज्यात चंद्र वाढत जातो तो शुक्ल पक्ष. ४५ ज्यात चंद्राचा ऱ्हास होत जातो तो बहुल पक्ष (कृष्ण पक्ष).

४६ दोन पक्ष मिळून एक महिना होतो. ४७ तीस अहोरात्रांचा एक कर्ममास (कामाचा हिशोब ठेवण्यास उपयुक्त) होतो. ४८ त्यात अर्धा अहोरात्र अधिक (साडेतीस दिवसांचा) एक सौर महिना होतो. ४९ अर्धा अहोरात्र कमी (साडेएकोणतीस दिवसांचा) एक चांद्रमास होतो. ५० सत्तावीस अहोरात्रांचा एक नाक्षत्रमास. ५१ बत्तीस अहोरात्रांचा एक बलमास (विसर्जन केलेल्या सैन्याच्या पगारासाठी मोजावयाचा महिना). ५२ पस्तीस अहो-

**द्वौ मासावृतुः । ५४ । श्रावणः प्रौष्ठपदश्च वर्षाः । ५५ । आश्वयुजः कार्त्तिकश्च शरत् । ५६ । मार्गशीर्षः पौषश्च हेमन्तः । ५७ । माघः फाल्गुनश्च शिशिरः । ५८ । चैत्रो वैशाखश्च वसन्तः । ५९ । ज्येष्ठामूलीय आषाढश्च ग्रीष्मः । ६० ।**

**शिशिराद्युत्तरायणम् । ६१ । वर्षादि दक्षिणायनम् । ६२ । द्व्ययनः संवत्सरः । ६३ । पञ्चसंवत्सरो युगम् । इति । ६४ ।**

**दिवसस्य हरत्यर्कः षष्ठिभागमृतौ ततः ।**
**करोत्येकमहश्छेदं तथैवैकं च चन्द्रमाः ॥ ६५ ॥**
**एवमर्धतृतीयानामब्दानामधिमासकम् ।**
**ग्रीष्मे जनयतः पूर्वं पञ्चाब्दान्ते च पश्चिमम् ॥ ६६ ॥**

**इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे देशकालमानम् विंशोऽध्यायः । आदित एकचत्वारिंशः ।**

रात्रांचा एक महिना अश्ववाहासाठी (घोड्यांची सरबराई करणाऱ्या नोकरांचा पगार मोजण्यासाठी). ५३ चाळीस अहोरात्रांचा एक महिना हस्तिवाहासाठी (हत्तींच्या खिदमतगारांचा पगार मोजण्यासाठी).

५४ दोन महिन्यांचा एक ऋतू होतो. ५५ श्रावण आणि भाद्रपद वर्षा ऋतू. ५६ आश्विन आणि कार्तिक शरद ऋतू. ५७ मार्गशीर्ष आणि पौष हेमंत ऋतू. ५८ माघ आणि फाल्गुन शिशिर ऋतू. ५९ चैत्र आणि वैशाख वसंत ऋतू. ६० ज्येष्ठ आणि आषाढ ग्रीष्म ऋतू.

६१ शिशिर ऋतूपासून सुरु होणारे ते उत्तरायण. ६२ वर्षा ऋतूपासून सुरू होणारे ते दक्षिणायन. ६३ दोन अयने मिळून एक संवत्सर होते. ६४ पाच संवत्सरांचे एक युग होते.

६५ सूर्य दिवसाचा एकषष्ठांश भाग हरण करतो (कारण, सौर दिवस कर्मदिवसापेक्षा तितक्या अंशाने जास्त असतो). त्यामुळे तो एका ऋतूत एक दिवसाचा छेद करतो. त्याप्रमाणेच (चान्द्रदिन कर्मदिनापेक्षा एकषष्ठांशाने कमी असल्याकारणाने) चंद्र सुद्धा एक दिवसाचा छेद करतो.

६६ याप्रमाणे ते दोघे अडीच वर्षांनी एक अधिक महिना उत्पन्न करतात, (पाच वर्षांच्या युगामध्ये) पहिला ग्रीष्म ऋतूत (आषाढात) आणि दुसरा पाच वर्षांच्या अखेरीस (हेमन्त ऋतुत पौष महिन्यात).

## २१

## [ एकोनचत्वारिंशं प्रकरणम् – शुल्काध्यक्षः ]

शुल्काध्यक्षः शुल्कशालां ध्वजं च प्राङ्मुखमुदङ्मुखं वा महाद्वाराभ्याशे निवेशयेत् । १ ।

शुल्कादायिनश्चत्वारः पञ्च वा सार्थोपयातान् वणिजो लिखेयुः – के कुतस्त्याः कियत्पण्याः क्व चाभिज्ञानं मुद्रा वा कृता इति । २ ।

अमुद्राणामत्ययो देयद्विगुणः । ३ । कूटमुद्राणां शुल्काष्टगुणो दण्डः । ४ । भिन्नमुद्राणामत्ययो घटिकास्थाने स्थानम् । ५ । राजमुद्रापरिवर्तने नामकृते वा सपादपणिकं वहनं दापयेत् । ६ ।

ध्वजमूलोपस्थितस्य प्रमाणमर्घं च वैदेहकाः पण्यस्य ब्रूयुः 'एतत्प्रमाणेनार्घेण पण्यमिदं कः क्रेता' इति । ७ । त्रिरुद्घोषितमर्थिभ्यो दद्यात् । ८ । क्रेतृसंघर्षे मूल्यवृद्धिः सशुल्का कोशं गच्छेत् । ९ ।

## एकविसावा अध्याय

### प्रकरण ३९ : शुल्काध्यक्ष (जकातीवरील मुख्य अधिकारी)

१ (जकातीवरील मुख्य) शुल्काध्यक्षाने नगराच्या मोठ्या वेशीनजीक एक पूर्वाभिमुख अथवा उत्तराभिमुख शुल्कगृह बांधून घ्यावे आणि त्यावर ध्वज फडकवावा.

२ जकात वसूल करणाऱ्या चार किंवा पाच कारकुनांनी तांड्याबरोबर आलेल्या व्यापाऱ्यांना ते कोण, कोठले, त्यांचा किती माल आहे, त्यांना ओळखपत्र कोठे मिळाले व मालावर मोहोर कोठे झाली हे विचारून ते सर्व लिहून घ्यावे.

३ मोहोर केलेली नसलेल्या मालाबद्दल द्यावयाच्या असलेल्या जकातीच्या दुप्पट दंड करावा. ४ खोटी मोहोर केलेली असल्यास जकातीच्या आठपट दंड करावा. ५ मोहोर तुटली असली तर माल वखारीत (तपास पूर्ण होइपर्यंत) ठेवून घ्यावा. ६ राजाची मोहोर बदलली असल्यास अथवा (व्यापाऱ्याचे ओळखपत्रावरील) नाव बदलले असल्यास प्रत्येक बोजामागे सव्वा पण दंड घ्यावा.

७ जकात नाक्यापाशी आलेल्या मालाचे प्रमाण व किंमत व्यापाऱ्यांनी उद्घोषित करावी, "इतक्या किंमतीचा इतका इतका हा माल आहे; कोण खरेदी करतो?" ८ तीनदा उद्घोषित केल्यावर ज्यांना तो पाहिजे असेल त्यांना तो द्यावा. ९ विकत घेऊ पहाणाऱ्यांमधील स्पर्धेमुळे किंमतीत वाढ झाल्यास ती वाढ जकातीबरोबरच सरकारी तिजोरीत भरणा करावी.

शुल्कभयात्पण्यप्रमाणं मूल्यं वा हीनं ब्रुवतस्तदतिरिक्तं राजा हरेत् । १० । शुल्कमष्टगुणं वा दद्यात् । ११ । तदेव निविष्टपण्यस्य भाण्डस्य हीनप्रतिवर्णकेनार्घापकर्षणे सारभाण्डस्य फल्गुभाण्डेन प्रतिच्छादने च कुर्यात् । १२ ।

प्रतिक्रेतृभयाद्वा पण्यमूल्यादुपरि मूल्यं वर्धयतो मूल्यवृद्धिं राजा हरेत्, द्विगुणं वा शुल्कं कुर्यात् । १३ । तदेवाष्टगुणमध्यक्षस्यच्छादयतः । १४ ।

तस्माद्विक्रयः पण्यानां धृतो मितो गणितो वा कार्यः, तर्कः फल्गुभाण्डानामानुग्राहिकाणां च । १५ ।

ध्वजमूलमतिक्रान्तानां चाकृतशुल्कानां शुल्कादष्टगुणो दण्डः । १६ । पथिकोत्पथिकास्तद्विद्युः । १७ ।

वैवाहिकमन्वायनमौपायनिकं यज्ञकृत्यप्रसवनैमित्तिकं देवेज्याचौलोपनयनगोदानव्रतदीक्षणादिषु क्रियाविशेषेषु भाण्डमुच्छुल्कं गच्छेत् । १८ । अन्यथावादिनः स्तेयदण्डः । १९ ।

१० (जास्त) जकातीच्या भीतीने मालाचे प्रमाण अथवा किंमत कमी सांगितली तर तो ज्यादा भरलेला माल सरकारजमा करावा. ११ किंवा जकात आठपट वसवावी. १२ गठ्ठ्यात भारी किंमतीचा माल भरून वाहेर कमी किंमतीचा नमुना दाखवून किंमत कमी भासविली, तसेच कमी किंमतीच्या मालाखाली भारी किंमतीचा माल लपवून ठेवला तर हीच शिक्षा (आठपट जकात) करावी.

१३ जर प्रतिस्पर्धी विकत घेईल ह्या भीतीने व्यापाऱ्याने आपल्या मालाची किंमत आहे त्यापेक्षा वाढवून सांगितली तर किंमतीतील ती वाढ सरकारजमा करावी किंवा जकात दुप्पट वसवावी. १४ हीच शिक्षा, आठपट, व्यापाऱ्यांचे गुन्हे लपविणाऱ्या अध्यक्षाला (अधिकाऱ्याला) करावी.

१५ म्हणून मालाची विक्री वजन करून, मापाने मोजून अथवा संख्या मोजून करावी. कमी किंमतीच्या तसेच ज्यांच्यापासून देशाला लाभ होणार आहे अशा पदार्थांच्या बाबतीत त्यांचे प्रमाण अंदाजाने ठरवावे.

१६ जकात न देताच जकातनाके पार करून नेलेल्या मालासाठी आठपट दंड करावा. १७ पथिक (रस्त्याने वावरणारे व्यापारी हेर) आणि उत्पथिक (अन्यत्र वावरणारे गुराखीप्रभृती हेर) यांनी यासंबंधीची माहिती मिळवावी.

१८ विवाहासाठी लागणारा माल, पतिगृही जाताना वधूबरोबर जाणारा माल, भेट म्हणून नेण्यात येणारा माल, यज्ञ, समारंभ (कृत्य) आणि प्रसूती या निमित्ताने, तसेच देवपूजा, चौल, उपनयन, गोदान, व्रताची दीक्षा इत्यादी

कृतशुल्केनाकृतशुल्कं निर्वाहयतो द्वितीयमेकमुद्रया भित्त्वा पण्यपुटमपहरतो वैदेहकस्य तच्च तावच्च दण्डः । २० । शुल्कस्थानाद्गोमयपलालं प्रमाणं कृत्वाऽपहरत उत्तमः साहसदण्डः । २१ ।

शस्त्रवर्मकवचलोहरथरत्नधान्यपशूनामन्यतममनिर्वाह्यं निर्वाहयतो यथावघुषितो दण्डः पण्यनाशश्च । २२ । तेषामन्यतमस्यानयने बहिरेवोच्छुल्को विक्रयः । २३ ।

अन्तपालः सपादपणिकां वर्तनीं गृह्णीयात्पण्यवहनस्य, पणिकामेकखुरस्य, पशूनामर्धपणिकाम्, क्षुद्रपशूनां पादिकाम्, अंसभारस्य माषिकाम् । २४ । नष्टापहृतं च प्रतिविदध्यात् । २५ । वैदेश्यं सार्थं कृतसारफल्गुभाण्डविचयनमभिज्ञानं मुद्रां च दत्त्वा प्रेषयेदध्यक्षस्य । २६ ।

धार्मिक क्रियांसाठी लागणारा माल जकात न घेता जाऊ द्यावा. १९ त्याबाबतीत खोटे बोलणारास चोरीप्रमाणेच दंड करावा.

२० ज्यावर जकात भरली आहे अशा मालाबरोबर जकात न भरलेला माल घेऊन जाणाऱ्या अथवा गठ्ठा फोडून व त्यात दुसरा आणखी माल भरून एकाच मोहोरेच्या जोरावर चोरून नेणाऱ्या व्यापाऱ्यास तो माल जप्त करून तितकाच दंड करावा. २१ जकातनाक्यावर गोवऱ्या, गवत इत्यादी नेत असल्याचे दाखवून त्यात भारी माल दडवून नेणाऱ्यास उत्तम साहसदंड (५०० ते १,००० पण) करावा.

२२ शस्त्रे, चिलखते, कवचे, धातू, रथ, रत्ने, धान्य आणि पशू ही देशाबाहेर नेण्यास बंदी असता ती बाहेर नेणाऱ्यास घोषित केल्याप्रमाणे दंड करावा आणि तो माल जप्त करावा. २३ जर यांपैकी कोणतीही वस्तू परदेशातून आणली तर तिच्यावर जकात न वसविता तिची बाहेरच विक्री होऊ द्यावी.

२४ सरहद्दीवरील दुर्गपालाने रस्त्यावरील संरक्षणासाठी मालाच्या प्रत्येक गाडीमागे सव्वा पण दस्तुरी घ्यावी, एक खूर असलेल्या प्रत्येक मालवाहू जनावरामागे एक पण, प्रत्येक माल लादलेल्या बैलामागे अर्धा पण, (गाढव आदी) लहान जनावरामागे पाव पण, आणि डोक्यावरील बोजामागे एक माषक. २५ आणि वाटेत जे हरवेल अथवा चोरीस जाईल त्याची भरपाई करून द्यावी. २६ परदेशातील व्यापाऱ्यांच्या तांडयाला, त्यांच्याजवळील भारी किमतीच्या व कमी किमतीच्या मालाची तपासणी करून आणि त्यांना ओळखपत्र देऊन व गासडयांवर मोहोर करून, शुल्काध्यक्षाकडे रवाना करावे.

**वैदेहकव्यञ्जनो वा सार्थप्रमाणं राज्ञः प्रेषयेत् । २७ । तेन प्रदेशेन राजा शुल्काध्यक्षस्य सार्थप्रमाणमुपदिशेत् सर्वज्ञत्वख्यापनार्थम् । २८ । ततः सार्थमध्यक्षोऽभिगम्य ब्रूयात् 'इदममुष्यामुष्य च सारभाण्डं फल्गुभाण्डं च, न निगूहितव्यम्, एष राज्ञः प्रभावः' इति । २९ । निगूहतः फल्गुभाण्डं शुल्काष्टगुणो दण्डः, सारभाण्डं सर्वापहारः । ३० ।**

**राष्ट्रपीडाकरं भाण्डमुच्छिन्द्यादफलं च यत् ।**
**महोपकारमुच्छुल्कं कुर्याद्बीजं च दुर्लभम् ।। ३१ ।।**

**इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे शुल्काध्यक्षः एकविंशोऽध्यायः । आदितो द्विचत्वारिंशः ।**

## २२

## [ एकोनचत्वारिंशं प्रकरणम् – शुल्काध्यक्षः, तत्र शुल्कव्यवहारः ]

**बाह्यमाभ्यन्तरं चातिथ्यम् । १ । निष्क्राम्यं प्रवेश्यं च शुल्कम् । २ । प्रवेश्यानां मूल्यपञ्चभागः । ३ । पुष्पफलशाकमूलकन्दवाल्लिक्यबीजशुष्कमत्स्यमांसानां षड्भागं गृह्णीयात् । ४ । शङ्खवज्रमणिमुक्ताप्रवालहाराणां**

२७ किंवा व्यापारी म्हणून मिरविणाऱ्या हेराने तांड्याविषयीचा तपशील राजाकडे पाठवून द्यावा. २८ त्या माहितीच्या आधारे राजाने त्या तांड्याविषयीचा तपशील आपली सर्वज्ञता दाखविण्यासाठी शुल्काध्यक्षाला कळवावा. २९ नंतर तो तांडा जकातनाक्यावर आला म्हणजे अध्यक्षाने म्हणावे, "हा इतका इतका भारी किमतीचा व इतका इतका कमी किमतीचा माल अमुक अमुक व्यापाऱ्याचा आहे. लपवून ठेऊ नका. राजाच्या सर्वज्ञतेचा हा प्रभाव आहे." ३० कमी किमतीचा माल लपविणाऱ्यास जकातीच्या आठपट दंड करावा, भारी किमतीचा माल लपविणाऱ्यास त्याचा सर्व माल जप्त करण्याची शिक्षा करावी.

३१ राष्ट्राला ज्यापासून पीडा होईल अशा वस्तू आणि ज्यापासून काही फलप्राप्ती नाही अशा वस्तू नष्ट करून टाकाव्यात. ज्याच्यापासून मोठा फायदा होईल त्यावर तसेच दुर्मिळ असलेल्या बियांवर जकात आकारू नये.

## बाविसावा अध्याय

## प्रकरण ३९ (पुढे चालू) : जकातीचे दर

१ बाहेरून (शहरात) येणारा, आतून बाहेर जाणारा आणि परदेशातून येणारा माल असतो. २ त्यावर बाहेर जाताना व आत येताना जकात व दस्तुरी आकारावी.

३ आत येणाऱ्या वस्तूंवर त्यांच्या किमतीच्या एकपंचमांश जकात बसवावी. ४ फुले, फळे, भाज्या, मुळे, कंद, वेलींची फळे, बिया, सुकविलेले मासे आणि

तज्जातपुरुषैः कारयेत् कृतकर्मप्रमाणकालवेतनफलनिष्पत्तिभिः । ५ । क्षौमदुकूलक्रिमितानकङ्कटहरितालमनःशिलाञ्जनहिङ्गुलुकलोहवर्णधातूनां चन्दनागुरुकटुककिण्वावराणां चर्मदन्तास्तरणप्रावरणक्रिमिजातानामाजेडकस्य च दशभागः पञ्चदशभागो वा । ६ । वस्त्रचतुष्पदद्विपदसूत्रकार्पासगन्धभैषज्यकाष्ठवेणुवल्कलचर्ममृद्भाण्डानां धान्यस्नेहक्षारलवणमद्यपक्वान्नादीनां च विंशतिभागः पञ्चविंशतिभागो वा । ७ ।

द्वारादेयं शुल्कं पञ्चभागः आनुग्राहिकं वा यथादेशोपकारं स्थापयेत् । ८ ।

जातिभूमिषु च पण्यानामविक्रयः । ९ । खनिभ्यो धातुपण्यादाने षट्छतमत्ययः । १० । पुष्पफलवाटेभ्यः पुष्पफलादाने चतुष्पञ्चाशत्पणो दण्डः । ११ । षण्डेभ्यः शाकमूलकन्दादाने पादोनं द्विपञ्चाशत्पणो दण्डः । १२ । क्षेत्रेभ्यः सर्वसस्यादाने त्रिपञ्चाशत्पणः । १३ । पणोऽध्यर्धपणश्च सीतात्ययः । १४ ।

मांस यांचा एकषष्ठांश भाग (जकात म्हणून) घ्यावा. ५ शंख, हिरे, रत्ने, मोती, पोवळी व हार यांच्या किमतीचा अंदाज, त्यात तज्ज्ञ असलेल्या कारागिरांकडून, त्यांच्याशी कामाचे प्रमाण, त्यासाठी लागणारा वेळ, मजुरी आणि उत्पन्न करावयाचे काम याबाबत करार करून, करून घ्यावा. ६ क्षौम, दुकूल, रेशमी सूत, सुती कवच, हरताळ, मनशीळ, अंजन, हिंगूळ व निरनिराळ्या प्रकारचे धातू, चंदन, अगुरु, मसाले व दारू तयार करण्यासाठी लागणारी किरकोळ द्रव्ये; चामडे, हस्तिदंत, चादरी, पांघरुणे व रेशमी कापड; आणि बकऱ्या व मेंढ्या यांच्यापासून मिळणारे पदार्थ; यांचा एकदशांश किंवा एकपंधरांश भाग (जकात म्हणून घ्यावा). ७ वस्त्रे, चार पायाचे प्राणी, दोन पायाचे प्राणी, सूत, कापूस, सुगंधी द्रव्ये, औषधे, लाकडे, बांबू, वल्कले, चामड्याचे पदार्थ व मातीची भांडी; धान्य, (तूप व तेल हे) स्नेह, (गूळ, साखर आदी) क्षार, लवण, मद्य, शिजविलेले अन्न इत्यादी; यांचा एकविसांश भाग किंवा एकपंचविसांश भाग घ्यावा.

८ द्वाराजवळ घ्यावयाची जकात एकपंचमांश इतकी असावी, अथवा देशाला फायदेशीर होईल त्याप्रमाणे त्यात सूट द्यावी.

९ आणि माल जेथे उत्पन्न होतो तेथेच त्याची विक्री करण्यावर बंदी घालावी. १० खाणींतून धातूंचा माल घेतल्यास सहाशे पण दंड करावा. ११ फुलबागांमधून व फळबागांमधून फुले व फळे घेतल्यास चोपन पण दंड. १२ मळ्यांमधून भाज्या, मुळे व कंद घेतल्यास पावणेबावन पण दंड. १३ शेतातून कोणत्याही प्रकारचे धान्य घेतल्यास त्रेपन पण दंड. १४ (विकत घेणाऱ्याने द्यावयाचा)

अतो नवपुराणानां देशजातिचरित्रतः ।
पण्यानां स्थापयेच्छुल्कमत्ययं चापकारतः ।। १५ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे शुल्काध्यक्षे शुल्कव्यवहारः द्वाविंशोऽध्यायः ।
आदितस्त्रिचत्वारिंशः ।

२३

[चत्वारिंशं प्रकरणम् – सूत्राध्यक्षः]

सूत्राध्यक्षः सूत्रवर्मवस्त्ररज्जुव्यवहारं तज्जातपुरुषैः कारयेत् । १ ।

ऊर्णावल्ककार्पासतूलशणक्षौमाणि च विधवान्यङ्गाकन्याप्रव्रजितादण्डप्रतिकारिणीभी रूपाजीवामातृकाभिर्वृद्धराजदासीभिर्व्युपरतोपस्थानदेवदासीभिश्च कर्तयेत् । २ ।

श्लक्ष्णस्थूलमध्यतां च सूत्रस्य विदित्वा वेतनं कल्पयेत्, बह्वल्पतां च । ३ । सूत्रप्रमाणं ज्ञात्वा तैलामलकोद्वर्तनैरेता अनुगृह्णीयात् । ४ । तिथिषु प्रतिमान-

एक पण आणि (विकणाऱ्याने द्यावयाचा) दीड पण हा सरकारी धान्याच्या शेतातील विक्रीबद्दल दंड.

१५ ह्यावरून नव्या व जुन्या मालावर जकात देश व जाति यांच्या प्रचलित असलेल्या प्रथेला अनुसरून ठरवावी आणि अपराधाला अनुरूप असा दंड ठरवावा.

## तेविसावा अध्याय

## प्रकरण ४० : सूत्राध्यक्ष (सूत व कापड यांच्या उत्पादनावरील मुख्य अधिकारी)

१ (सूत व कापड यांच्या उत्पादनावरील मुख्य) सूत्राध्यक्षाने सूत, कवच, कापड आणि दोर यांचे उत्पादन त्यात निष्णात असलेल्या माणसांकडून करून घ्यावे.

२ त्याने विधवा स्त्रिया, पंगू स्त्रिया, कन्यका, घर सोडलेल्या स्त्रिया, दंडाची रक्कम अंगमेहनतीने फेडणाऱ्या स्त्रिया, वेश्यांच्या माता, राजवाड्यातील वृद्ध दासी, आणि ज्यांची देवळातील सेवा बंद झाली आहे अशा देवदासी, यांच्याकडून लोकर, वृक्षाची साल, कापूस, तूल, सण आणि अंबाडी यांचे सूत कातून घ्यावे.

३ सूत वारीक, जाड की मध्यम आहे, तसेच ते जास्त आहे की कमी आहे हे लक्षात घेऊन त्याप्रमाणे मजुरी ठरवावी. ४ सुताचे प्रमाण पाहून त्यांना तेल, आवळकाठी आणि उटणे देऊन त्यांच्यावर अनुग्रह करावा. ५ आणि सणाच्या

दानैश्च कर्म कारयितव्याः ।५। सूत्रह्रासे वेतनह्रासो द्रव्यसारात् ।६।

कृतकर्मप्रमाणकालवेतनफलनिष्पत्तिभिः कारुभिश्च कर्म कारयेत्, प्रतिसंसर्गं च गच्छेत् ।७। क्षौमदुकूलक्रिमितानराङ्कवकार्पाससूत्रवानकर्मान्तांश्च प्रयुञ्जानो गन्धमाल्यदानैरन्यैश्चौपग्राहिकैराराधयेत् ।८। वस्त्रास्तरणप्रावरणविकल्पानुत्थापयेत् ।९। कङ्कटकर्मान्तांश्च तज्जातकारुशिल्पिभिः कारयेत् ।१०।

याश्चानिष्कासिन्यः प्रोषिता विधवा न्यङ्गाः कन्यका वात्मानं बिभृयुः ताः स्वदासीभिरनुसार्य सोपग्रहं कर्म कारयितव्याः ।११। स्वयमागच्छन्तीनां वा सूत्रशालां प्रत्युषसि भाण्डवेतनविनिमयं कारयेत् ।१२। सूत्रपरीक्षार्थमात्रः प्रदीपः ।१३। स्त्रिया मुखसंदर्शनेऽन्यकार्यसंभाषायां वा पूर्वः साहसदण्डः, वेतनकालातिपातने मध्यमः, अकृतकर्मवेतनप्रदाने च ।१४।

दिवशी त्यांचा सन्मान करून व बक्षीस देऊन त्यांच्याकडून काम करून घ्यावे. ६ सूत कमी भरल्यास द्रव्याच्या किमतीच्या प्रमाणात मजुरीत कपात करावी.

७ आणि करावयाच्या कामाचे प्रमाण, त्यासाठी वेळ व वेतन आणि तयार करावयाचा माल यासंबंधात करार करून कारागिरांकडून हे काम करून घ्यावे आणि त्यांच्याशी सतत संपर्क ठेवावा. ८ आणि क्षौम, दुकूल, रेशीम, रंकुहरणाचे केस व कापसाचे सूत यांपासून कापड विणण्याच्या गिरण्या उभारल्यावर तेथील कारागिरांना सुगंधी द्रव्ये आणि फुले देऊन तसेच दुसऱ्या काही प्रकारे अनुग्रह करून खूष ठेवावे. ९ निरनिराळ्या तऱ्हेचे कापड, चादरी व पांघरुणे विणून घ्यावीत. १० आणि त्या कामात निष्णात असलेल्या कारागिरांकडून व कलाकारांकडून कंकट-कवचाचे कारखाने चालवून घ्यावेत.

११ आणि घराबाहेर न पडणाऱ्या अशा ज्या स्त्रिया – पती दूर गेलेल्या, विधवा, पंगू अथवा कन्यका – स्वतःची उपजीविका मिळवू इच्छितील, त्यांच्याकडे सूत्राध्यक्षाने स्वतःच्या दासी पाठवून सन्मानपूर्वक त्यांच्याकडून काम करून घ्यावे. १२ किंवा त्या स्वतःच सुताच्या गिरणीत येणार असतील तर माल आणि मजुरी यांची देवघेव भल्या पहाटेस करावी. १३ सुताची परीक्षा करण्यापुरताच फक्त दिवा तेथे असावा. १४ अधिकाऱ्याने स्त्रीच्या तोंडाकडे पाहिल्यास अथवा तिच्याशी इतर गोष्टींबद्दल संभाषण केल्यास प्रथम साहसदंड करावा, मजुरी देण्यास दिरंगाई केल्यास आणि न केलेल्या कामाबद्दल मजुरी दिल्यास मध्यम साहसदंड करावा.

गृहीत्वा वेतनं कर्माकुर्वत्या अङ्गुष्ठसंदंशं दापयेत्, भक्षितापहृतावस्कन्दितानां च । १५ ।

वेतनेषु च कर्मकराणामपराधतो दण्डः । १६ ।

रज्जुवर्तकैर्वर्मकारैश्च स्वयं संसृज्येत । १७ । भाण्डानि च वरत्रादीनि वर्तयेत् । १८ ।

सूत्रवल्कमयी रज्जुर्वरत्रा वैत्रवैणवीः ।
सांनाह्या बन्धनीयाश्च यानयुग्यस्य कारयेत् ।। १९ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे सूत्राध्यक्षः त्रयोविंशोऽध्यायः । आदितश्चतुश्चत्वारिंशः ।

२४

[ एकचत्वारिंशं प्रकरणम् – सीताध्यक्षः ]

सीताध्यक्षः कृषितन्त्रशुल्बवृक्षायुर्वेदज्ञस्तज्ज्ञसखो वा सर्वधान्यपुष्पफलशाककन्दमूलवाल्लिक्यक्षौमकार्पासबीजानि यथाकालं गृह्णीयात् । १ ।

१५ मजुरी घेऊन काम न करणाऱ्या स्त्रीच्या (उजव्या हाताच्या) मधल्या बोटाचे टोक व अंगठा यांनी होणारी चिमटी कापून टाकावी, तसेच ज्या माल गडप करून अथवा चोरून पळून गेल्या असतील त्यांचीही (चिमटी कापून टाकावी).

१६ कामगारांच्या मजुरीतून अपराधानुसार दंड कापून घ्यावा.

१७ दोर वळणारे आणि कवच करणारे यांच्याशी सूत्राध्यक्षाने स्वतः संपर्क ठेवावा. १८ आणि वाद्या व इतर त्यासारखा माल त्याने विणून घ्यावा.

१९ वाहने व त्यांना जुंपावयाची जनावरे यांसाठी युद्धोपयोगी आणि बांधण्याच्या कामी उपयोगी असे सुताचे व इतर तंतूंचे दोर आणि वेत व बांबू यांच्या वाद्या तयार करून घ्याव्यात.

## चोविसावा अध्याय

### प्रकरण ४१ : सीताध्यक्ष (शेतकामावरील मुख्य अधिकारी)

१ शेतीचे शास्त्र, जमिनीतील पाण्याचा शोध लावणे आणि वृक्षांची जोपासना करणे या विद्यांत स्वतः पारंगत असलेल्या अथवा तशी तज्ज्ञ माणसे हाताखाली असलेल्या (सरकारी शेतीवरील वरिष्ठ) सीताध्यक्षाने योग्य वेळी सर्व प्रकारची धान्ये, फुले, फळे, भाज्या, कंद, मुळे, वेलींची फळे, ताग व कापूस यांच्या बियांचा संग्रह करून ठेवावा.

**बहुहलपरिकृष्टायां स्वभूमौ दासकर्मकरदण्डप्रतिकर्तृभिर्वापयेत् । २ । कर्षण-यन्त्रोपकरणबलीवर्दैश्चैषामसङ्गं कारयेत्, कारुभिश्च कर्मारकुट्टाकमेदकरज्जुवर्तकसर्पग्राहादिभिश्च । ३ । तेषां कर्मफलविनिपाते तत्फलहानं दण्डः । ४ ।**

**षोडशद्रोणं जाङ्गलानां वर्षप्रमाणम्, अध्यर्धमानूपानाम्, देशवापानाम् अर्धत्रयोदशाश्मकानाम्, त्रयोविंशतिरवन्तीनाम्, अमितमपरान्तानां हैमन्यानां च, कुल्यावापानां च कालतः । ५ ।**

**वर्षत्रिभागः पूर्वपश्चिममासयोः, द्वौ त्रिभागौ मध्यमयोः – सुषमारूपम् । ६ ।**

**तस्योपलब्धिर्बृहस्पतेः स्थानगमनगर्भाधानेभ्यः शुक्रोदयास्तमयचारेभ्यः सूर्यस्य प्रकृतिवैकृताच्च । ७ । सूर्याद्बीजसिद्धिः, बृहस्पतेः सस्यानां स्तम्बकरिता, शुक्राद्वृष्टिः । इति । ८ ।**

२ त्या त्या उत्पादनास योग्य अशा पुष्कळ वेळा नांगरलेल्या जमिनीत दास, कामगार आणि अंगमेहनतीने दंड भरणारे यांच्याकरवी (बियांची) पेरणी करून घ्यावी. ३ आणि नांगर, शेतीची अवजारे व बैल यांची वाण पडू देऊ नये, तसेच लोहार, सुतार, मेदक (टोपल्या विणणारे), दोर वळणारे, साप पकडणारे इत्यादी कारागिरांचीही वाण पडू देऊ नये. ४ त्यांच्यामुळे उत्पादनात तूट आल्यास त्या तुटीइतका दंड करावा.

५ कोरड्या प्रदेशात सोळा द्रोण (अदमासे पंचवीस अथवा बत्तीस इंच) पावसाचे प्रमाण (उत्तम पिकासाठी आवश्यक); त्याच्या दीडपट दमट प्रदेशात; प्रदेशानुसार पिकांसाठी अश्मकात (महाराष्ट्रात) साडे तेरा द्रोण पाऊस (उत्तम), अवंतिदेशात तेवीस द्रोण, अपरांतात (कोकणपट्टीत) आणि बर्फाच्या प्रदेशात प्रमाण नसलेला पाऊस (उत्तम); आणि कालव्यांवर होणाऱ्या शेतीसाठी ठराविक कालाची निश्चिती नसलेला पाऊस (चांगला).

६ पावसाळ्याच्या पहिल्या व शेवटच्या दोन (श्रावण व कार्तिक) महिन्यांत मिळून एकतृतीयांश पाऊस आणि मधल्या दोन (भाद्रपद व आश्विन) महिन्यांत दोनतृतीयांश – हे सुंदर प्रमाणात पडलेल्या वृष्टीचे स्वरूप.

७ पावसाचा अंदाज गुरूचे स्थान, त्याची गती आणि त्याने केलेले (मेघांचे) गर्भाधान, शुक्राचा उदय, अस्त आणि गती, आणि सूर्याच्या स्वाभाविक अवस्थेत घडणारा फरक यावरून करता येतो. ८ सूर्यावरून बिया रुजतील की नाही त्याचा, गुरूवरून कणसांत दाणे भरतील की नाही त्याचा आणि शुक्रावरून पावसाचा अंदाज करतात.

त्रयः सप्ताहिका मेघा अशीतिः कणशीकराः ।
षष्टिरातपमेघानामेषा वृष्टिः समा हिता ॥ ९ ॥
वातमातपयोगं च विभजन् यत्र वर्षति ।
त्रीन् करीषांश्च जनयंस्तत्र सस्यागमो ध्रुवः ॥ १० ॥

ततः प्रभूतोदकमल्पोदकं वा सस्यं वापयेत् । ११ । शालिव्रीहिकोद्रवतिलप्रियङ्गूदारकवरकाः पूर्ववापाः । १२ । मुद्गमाषशैम्ब्या मध्यवापाः । १३ । कुसुम्भमसूरकुलत्थयवगोधूमकलायातसीसर्षपाः पश्चाद्वापाः । १४ । यथर्तुवशेन वा बीजवापाः । १५ ।

वापातिरिक्तमर्धसीतिकाः कुर्युः, स्ववीर्योपजीविनो वा चतुर्थपञ्चभागिकाः । १६ । यथेष्टमनवसितभागं दद्युः, अन्यत्र कृच्छ्रेभ्यः । १७ ।

स्वसेतुभ्यो हस्तप्रावर्तिममुदकभागं पञ्चमं दद्युः, स्कन्धप्रावर्तिमं चतुर्थम्, स्रोतोयन्त्रप्रावर्तिमं च तृतीयम्, चतुर्थं नदीसरस्तटाककूपोद्घाटम् । १८ ।

९ सात दिवस सतत पाऊस पडणारे असे तीन मेघ, ऐंशी (दिवस) झिमझिम पाऊस पाडणारे मेघ आणि मधून मधून ऊन असणारे साठ मेघ, अशा प्रकारची वृष्टी चांगली वाटली गेलेली व हितकर होय.

१० जेथे वारा आणि ऊन यांची योग्य विभागणी करून पाऊस पडतो आणि तीन वेळा गोवऱ्या सुकण्याइतकी पावसात उघाड असते तेथे पीक खात्रीने येईल.

११ तदनुसार जास्त पाणी लागणारे किंवा कमी पाणी लागणारे धान्य पेरून घ्यावे. १२ शालि, व्रीहि, कोद्रव, तीळ, प्रियंगु, उदारक आणि वरी ही (पावसाळयाच्या) प्रारंभी पेरावयाची पिके. १३ मूग, उडीद आणि शैम्ब्य ही मध्ये पेरावयाची पिके. १४ कुसुंभ, मसूर, कुळीथ, जव, गहू, कलाय, अळशी आणि मोहरी ही शेवटी पेरावयाची पिके. १५ किंवा त्या त्या ऋतूप्रमाणे बी पेरावे.

१६ (सीताध्यक्षाला) पेरणी करून घेता न येण्यासारखी उरलेली (सरकारी) जमीन उत्पन्नाचा अर्धा भाग ठेऊन घेण्याच्या बोलीने खाजगी शेतकऱ्यांनी कसावी, किंवा फक्त अंगमेहनत करणाऱ्या मजुरांनी उत्पन्नाच्या एकचतुर्थांश अथवा एकपंचमांश भागाच्या बोलीने कसावी. १७ लागवडीखाली प्रथम आणलेल्या जमिनीच्या उत्पन्नाचा हिस्सा राजाच्या मर्जीनुसार द्यावा; याला अपवाद संकटकालाचा.

१८ स्वतःच्या तळयातून वगैरे शेतीसाठी हाताने पाणी उपसून नेणाऱ्यांनी उत्पन्नाचा एकपंचमांश भाग पाणीपट्टी द्यावी, (बैल वगैरेंच्या) खांद्याने पाणी

**कर्मोदकप्रमाणेन कैदारं हैमनं ग्रैष्मिकं वा सस्यं स्थापयेत् । १९ । शाल्यादि ज्येष्ठम्, षण्डो मध्यमः, इक्षुः प्रत्यवरः । २० । इक्षवो हि बह्वाबाधा व्ययग्राहिणश्च । २१ ।**

**फेनाघातो वल्लीफलानां, परीवाहान्ताः पिप्पलीमृद्वीकेक्षूणां, कूपपर्यन्ताः शाकमूलानां, हरणीपर्यन्ता हरितकानां, पाल्यो लवानां गन्धभैषज्योशीरह्रीबेरपिण्डालुकादीनाम् । २२ । यथास्वं भूमिषु च स्थाल्याश्चानूप्याश्चौषधीः स्थापयेत् । २३ ।**

**तुषारपायनमुष्णशोषणं चा सप्तरात्रादिति धान्यबीजानां, त्रिरात्रं वा पञ्चरात्रं वा कोशीधान्यानां, मधुघृतसूकरवसाभिः शकृद्युक्ताभिः काण्डबीजानां छेदलेपो, मधुघृतेन कन्दानाम्, अस्थिबीजानां शकृदालेपः, शाखिनां गर्तदाहो गोऽस्थि-**

उपसणाऱ्यांनी एकचतुर्थांश द्यावी, यंत्राने पाणी पाटातून नेणाऱ्यांनी एकतृतीयांश, आणि नदी, सरोवर, तलाव व विहीर यांतून पाणी खेचून काढणाऱ्यांनी एकचतुर्थांश पाणीपट्टी द्यावी.

१९ शेतीला उपलब्ध होणाऱ्या पाण्याला अनुसरून पावसाळी, हिवाळी किंवा उन्हाळी पिके काढण्याची व्यवस्था करावी. २० शालि आदी पिके उत्तम, भाजीपाला मध्यम, ऊस कनिष्ठ. २१ कारण, उसाच्या पिकाला अनेक धोके असतात आणि त्याला खर्चही फार येतो.

२२ जिच्यावर पाण्याचा फेस येऊन आदळतो अशी नदीकाठची रेताड जमीन (कलिंगडासारख्या) वेलींच्या फळांसाठी चांगली, पुराच्या कडेची जमीन पिंपळी, द्राक्षे व ऊस यांसाठी, विहिरीच्या आसपासची भाज्या व मुळे यांसाठी, तलावाच्या पाणथळ भागाच्या आसपासची हिरव्या गवतासाठी चांगली आणि शेताचे बांध सुगंधी व औषधी वनस्पती, वाळा, ऱ्हीबेर, पिंडालुक इत्यादी कापावयाच्या वनस्पतींसाठी चांगले. २३ आणि जमीनीत उगवणाऱ्या व दलदलीत उगवणाऱ्या औषधी वनस्पती प्रत्येकीला योग्य अशा जमिनीत लावून घ्याव्यात.

२४ धान्यांच्या बिया पसरून ठेऊन सात दिवसपर्यंत रात्री दवात ओल्या करून दिवसा उन्हात सुकवाव्यात; द्विदल धान्यांच्या बिया तीन दिवस किंवा पाच दिवस अशाच पसरून ठेवाव्यात; ज्यांची कांडी पेरावयाची असतात त्यांच्या कांड्यांना छेद देऊन तेथे मध, तूप व डुकराची चरबी लावून वर शेणाचा लेप द्यावा; कंदांना मध व तूप यांचा लेप द्यावा; कठीण बियांना शेणाचा लेप द्यावा; झाडासाठी खड्डे जाळावेत आणि योग्य वेळी गाईची हाडे व

शर्कृद्भिः काले दौहृदं च । २४ । प्ररूढांश्चाशुष्ककटुमत्स्यांश्च स्नुहिक्षीरेण पाययेत् । २५ ।

कार्पाससारं निर्मोकं सर्पस्य च समाहरेत् ।
न सर्पास्तत्र तिष्ठन्ति धूमो यत्रैष तिष्ठति ॥ २६ ॥

सर्वबीजानां तु प्रथमवापे सुवर्णोदकसंप्लुतां पूर्वमुष्टिं वापयेद्, अमुं च मन्त्रं ब्रूयात्–

'प्रजापतये काश्यपाय देवाय च नमः सदा ।
सीता मे ऋध्यतां देवी बीजेषु च धनेषु च' ॥ २७ ॥

षण्डवाटगोपालकदासकर्मकरेभ्यो यथापुरुषपरिवापं भक्तं कुर्यात्, सपादपणिकं च मासं दद्यात् । २८ । कर्मानुरूपं कारुभ्यो भक्तवेतनम् । २९ ।

प्रशीर्णं च पुष्पफलं देवकार्यार्थं व्रीहियवमाग्रयणार्थं श्रोत्रियास्तपस्विनश्चाहरेयुः, राशिमूलमुञ्छवृत्तयः । ३० ।

शेण यांचे खत द्यावे. २५ आणि झाडे उगवली म्हणजे त्यांना न सुकलेल्या (ताज्या) तिखट मासळीचे खत स्नुहि वनस्पतीच्या दुधाबरोबर घालावे.

२६ सरकी व सापाची कात आणून एकत्र जाळावीत. हा धूर ज्या ठिकाणी असतो त्या ठिकाणी साप रहात नाहीत.

२७ परंतु सर्व प्रकारच्या बियांची प्रथम पेरणी करताना मूठभर बी अगोदर सोने घातलेल्या पाण्यात बुचकळून पुढील मंत्र म्हणावा —

"प्रजापती काश्यपाला नमस्कार असो आणि (पर्जन्य पाडणाऱ्या) देवाला सदा नमन असो. माझ्या बियांत आणि धान्यात देवी सीता समृद्ध होवो"

२८ भाजीपाल्याचे मळे, फळाफुलांच्या बागा आणि गुरे यांची राखण करणारे दास व कामगार यांना त्यांचा परिवार असेल त्या प्रमाणात भोजन द्यावे, आणि महिन्याला सव्वा पण मजुरी द्यावी. २९ कारागिरांना त्यांच्या कामाप्रमाणे भोजन व वेतन द्यावे.

३० श्रोत्रिय आणि तपस्वी यांनी खाली गळून पडलेली फुले व फळे देवपूजेसाठी आणि व्रीही व जव आग्रयण (नवधान्य) इष्टीसाठी घेऊन जावे. रास हलविल्यानंतर खाली राहिलेले धान्य उंछवृत्तीने राहाणाऱ्या (खाली पडलेले धान्य गोळा करून उपजीविका करणाऱ्या) व्रतस्थांनी न्यावे.

यथाकालं च सस्यादि जातं जातं प्रवेशयेत् ।
न क्षेत्रे स्थापयेत्किञ्चित्पलालमपि पण्डितः ।। ३१ ।।

प्राकाराणां समुच्छ्रायान् वलभीर्वा तथाविधाः ।
न संहतानि कुर्वीत न तुच्छानि शिरांसि च ।। ३२ ।।

खलस्य प्रकरान् कुर्यान्मण्डलान्ते समाश्रितान् ।
अनग्निकाः सोदकाश्च खले स्युः परिकर्मिणः ।। ३३ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे सीताध्यक्षः चतुर्विंशोऽध्यायः । आदितः पञ्चचत्वारिंशः ।

## २५

## [ द्वाचत्वारिंशं प्रकरणम् – सुराध्यक्षः ]

सुराध्यक्षः सुराकिण्वव्यवहारान् दुर्गे जनपदे स्कन्धावारे वा तज्जातसुराकिण्वव्यवहारिभिः कारयेद्, एकमुखमनेकमुखं वा विक्रयक्रयवशेन वा । १ । षट्छतमत्ययमन्यत्र कर्तृक्रेतृविक्रेतृणां स्थापयेत् । २ ।

३१ आणि धान्य वगैरे जसजसे तयार होईल तसतसे ते खोपटात नेऊन ठेवावे. शहाण्या माणसाने शेतात काहीही, गवताची काडी सुद्धा, ठेवू नये.

३२ (खोपटाच्या) भिंती उंच कराव्यात किंवा छपरे तशीच (उंच) करावीत. आणि त्यांचे वरचे भाग फार घट्ट करू नयेत आणि हलकेही करू नयेत.

३३ खळयाच्या गोल सीमेच्या बाहेर धान्याच्या राशी कराव्यात. खळयावर काम करणाऱ्यांजवळ अग्नी असता कामा नये आणि त्यांच्या जवळपास पाणी असले पाहिजे.

## पंचविसावा अध्याय

## प्रकरण ४२ : सुराध्यक्ष (मद्याच्या उत्पादनावरील व विक्रीवरील मुख्य अधिकारी)

१ (मद्याचे उत्पादन व विक्री यांचे नियमन करणाऱ्या) सुराध्यक्षाने दुर्गात, जनपदात अथवा सैन्याच्या छावणीत मद्य व त्यासाठी लागणारी द्रव्ये यांच्यासंबंधीचे (उत्पादनादी) व्यवहार त्या व्यवहारात तरबेज असणाऱ्या माणसांकडून करून घ्यावेत; खरेदी व विक्रीला सोयिस्कर असेल त्याप्रमाणे एके ठिकाणी अथवा अनेक ठिकाणी (हे व्यवहार असावेत). २ इतर ठिकाणी मद्य करणारे, विकत घेणारे व विकणारे यांना सहाशे पण दंड ठेवावा.

प्रमादनिर्णयनमसंपातं च सुरायाः, प्रमादभयात्कर्मसु निर्दिष्टानां, मर्यादातिक्रमभयादार्याणाम्, उत्साहभयाच्च तीक्ष्णानाम् । ३ । लक्षितमल्पं वा चतुर्भागमर्धकुडुबं कुडुबमर्धप्रस्थं प्रस्थं वेति ज्ञातशौचा निर्हरेयुः । ४ । पानागारेषु वा पिबेयुरसंचारिणः । ५ ।

निक्षेपोपनिधिप्रयोगापहृतानामनिष्टोपगतानां च द्रव्याणां ज्ञानार्थमस्वामिकं कुप्यं हिरण्यं चोपलभ्य निक्षेप्तारमन्यत्र व्यपदेशेन ग्राहयेद्, अतिव्ययकर्तारमनायतिव्ययं च । ६ ।

न चानर्घेण कालिकां वा सुरां दद्याद्, अन्यत्र दुष्टसुरायाः । ७ । तामन्यत्र विक्रापयेत् । ८ । दासकर्मकरेभ्यो वा वेतनं दद्यात् । ९ । वाहनप्रतिपानं सूकरपोषणं वा दद्यात् । १० ।

पानागाराण्यनेककक्ष्याणि विभक्तशयनासनवन्ति पानोद्देशानि गन्धमाल्योदकवन्ति ऋतुसुखानि कारयेत् । ११ ।

३ मद्य गावाच्या बाहेर नेण्यास अथवा त्याचा साठा करण्यास प्रतिबंध करावा, कारण त्यामुळे कामावर नेमलेल्या माणसांकडून चुका होण्याची भीती असते, आर्य माणसे मर्यादा सोडून वागण्याची भीती असते आणि रागीट स्वभावाची माणसे बेदरकारपणे वागण्याची भीती असते. ४ अथवा ज्यांच्या चांगल्या वागणुकीबद्दल खात्री आहे अशांना थोडेच पाव कुडुब, अर्धे कुडुब, कुडुब, अर्धा प्रस्थ, प्रस्थ (इतके मद्य), त्यावर लक्ष ठेवून, बाहेर नेऊ द्यावे. ५ किंवा (त्यांनीही) मद्यगृहातच ते प्यावे आणि नंतर लगेच बाहेर फिरू नये.

६ निक्षेप म्हणून (कारागिराकडे वस्तू बनविण्यासाठी) दिलेला अथवा ठेव म्हणून ठेवलेला अथवा गहाण टाकलेला आणि नंतर गडप केलेला असा पदार्थ आहे की काय किंवा वाईट मार्गाने मिळविलेला पदार्थ आहे की काय हे शोधून काढण्यासाठी, जर कोणी त्याच्या मालकीची नसलेली वस्तू अथवा द्रव्य मद्यासाठी देताना आढळला तर त्याला कोणत्या तरी निमित्ताने दुसरीकडे पकडण्यास लावावे, तसेच दारूवर खूप खर्च करणाऱ्याला आणि काही उत्पन्न नसताही खर्च करणाऱ्याला (पकडण्यास लावावे).

७ आणि ठरलेल्या किमतीपेक्षा निराळ्या किमतीने अथवा उधारीने दारू देऊ नये; याला अपवाद खराब झालेल्या दारूचा. ८ ती दुसरीकडे विकावी. ९ किंवा दास व कामगार यांना वेतन म्हणून द्यावी. १० किंवा गाडीला जुंपावयाच्या जनावरांना पिण्यासाठी अथवा डुकरांच्या पोषणासाठी द्यावी.

११ सुराध्यक्षाने अनेक खोल्या असलेली आणि स्वतंत्र बिछाने व आसने यांची सोय असलेली पानगृहे (आणि) सुगंधी द्रव्ये, फुले व पाणी ठेवलेले आणि सर्व ऋतूंत आरामशीर असे गुत्ते बांधून घ्यावेत.

तत्रस्थाः प्रकृत्यौत्पत्तिकौ व्ययौ गूढा विद्युः, आगन्तूंश्च । १२ । क्रेतृणां मत्त-सुप्तानामलङ्काराच्छादनहिरण्यानि च विद्युः । १३ । तन्नाशे वणिजस्तच्च तावच्च दण्डं दद्युः । १४ । वणिजस्तु संवृतेषु कक्ष्याविभागेषु स्वदासीभिः पेशलरूपाभिरागन्तूनां वास्तव्यानां चार्यरूपाणां मत्तसुप्तानां भावं विद्युः । १५ ।

मेदकप्रसन्नासवारिष्टमैरेयमधूनाम् । १६ । उदकद्रोणं तण्डुलानामर्धाढकं त्रयः प्रस्थाः किण्वस्येति मेदकयोगः । १७ । द्वादशाढकं पिष्टस्य पञ्च प्रस्थाः किण्वस्य क्रमुकत्वक्फलयुक्तो वा जातिसंभारः प्रसन्नायोगः । १८ । कपित्थतुला फाणितं पञ्चतौलिकं प्रस्थो मधुन इत्यासवयोगः । १९ । पादाधिको ज्येष्ठः पादहीनः कनिष्ठः । २० । चिकित्सकप्रमाणाः प्रत्येकशो विकाराणामरिष्टाः । २१ । मेषशृङ्गीत्वक्क्वाथाभिषुतो गुडप्रतीवापः पिप्पलीमरिचसंभारस्त्रिफलायुक्तो वा मैरेयः । २२ । गुडयुक्तानां वा सर्वेषां त्रिफलासंभारः । २३ । मृद्वीकारसो मधु । २४ । तस्य स्वदेशो व्याख्यानं कापिशायनं हारहूरकमिति । २५ ।

१२ तेथे ठेवलेल्या गूढ पुरुषांनी गिऱ्हाइकांच्या नेहमीच्या व काही निमित्ताने होणाऱ्या विशेष खर्चावर नजर ठेवावी, तसेच परक्या माणसांची माहिती मिळवावी. १३ झिंगून झोपी गेलेल्या गिऱ्हाइकांचे अलंकार, वस्त्रे व द्रव्य हे लक्षात ठेवावेत. १४. ते नाहीसे झाले तर दुकानदारांनी ते नुकसान भरून देऊन तितकाच दंड द्यावा. १५ परंतु दुकानदारांनी आपल्या सुस्वरूप दासींकरवी एके बाजूला असलेल्या खोल्यांतून, वरून आर्य दिसणाऱ्या परक्या व स्वदेशातील गिऱ्हाइकांच्या मनातील भाव, ते झिंगले व झोपले असता, काढून घ्यावेत.

१६ मेदक, प्रसन्ना, आसव, अरिष्ट, मैरेय आणि मधु ह्या मद्यप्रकारांविषयी. १७ एक द्रोण पाणी, अर्धा आढक तांदूळ आणि तीन प्रस्थ किण्व (आम्ल) हे मेदकासाठी मिश्रण. १८ पीठ बारा आढक, पाच प्रस्थ किण्व किंवा क्रमुकाची (सुपारीच्या झाडाची) साल व फळ यांनी युक्त तिच्याकरिता निर्दिष्ट मसाला हे प्रसन्नासाठी मिश्रण. १९ एक तुला कवठाचा गीर, पाच तुला काकवी, एक प्रस्थ मध हे आसवासाठी मिश्रण. २० पाव (प्रस्थ मध) अधिक असल्यास उत्तम, पाव कमी असल्यास कनिष्ठ (मिश्रण) २१ अरिष्टे प्रत्येक विकारावर वैद्यांच्या सांगण्याप्रमाणे निरनिराळी. २२ मेषशृंगीच्या सालीच्या काढ्यात गूळ घालून पिंपळी, मिरी यांच्या मसाल्याने अथवा त्रिफळाने युक्त असलेले ते मैरेय मद्य. २३ किंवा ज्यात गूळ असेल त्या सर्व मद्यप्रकारात त्रिफळाचा मसाला वापरावा. २४ द्राक्षाच्या रसापासून मधु तयार करतात. २५ उत्पत्तिस्थानावरून त्याला पडलेली नावे कापिशायन आणि हारहूरक.

माषकलनीद्रोणमामं सिद्धं वा त्रिभागाधिकतण्डुलं मोरटादीनां कार्षिकभागयुक्तं किण्वबन्धः । २६ ।

पाठालोध्रतेजोवत्येलावालुकमधुकमधुरसाप्रियङ्गुदारुहरिद्रामरिचपिप्पलीनां च पञ्चकार्षिकः संभारयोगो मेदकस्य प्रसन्नायाश्च । २७ । मधुकनिर्यूहयुक्ता कटशर्करा वर्णप्रसादनी च । २८ ।

चोचचित्रकविलङ्गगजपिप्पलीनां च कार्षिकः क्रमुकमधुकमुस्तालोध्राणां द्विकार्षिकश्चासवसंभारः । २९ । दशभागश्चैषां बीजबन्धः । ३० ।

प्रसन्नायोगः श्वेतसुरायाः । ३१ । सहकारसुरा रसोत्तरा बीजोत्तरा वा महासुरा संभारिकी वा । ३२ । तासां मोरटापलाशपत्तूरमेषशृङ्गीकरञ्जक्षीरवृक्षकषायभावितं दग्धकटशर्कराचूर्णं लोध्रचित्रकविलङ्गपाठामुस्ताकलिङ्गयवदारुहरिद्रेन्दीवरशतपुष्पापामार्गसप्तपर्णनिम्बास्फोतकल्कार्धयुक्तमन्तर्नखो मुष्टिः कुम्भीं राजपेयां प्रसादयति । ३३ । फाणितः पञ्चपलिकश्चात्र रसवृद्धिर्देयः । ३४ ।

२६ उडदांचा लगदा, कच्चा किंवा शिजविलेला, एक द्रोण, एकतृतीयांश द्रोण अधिक इतके तांदूळ, आणि मोरटा आदी वनस्पतींचे एक कर्ष मिश्रण – याने किण्व तयार होते.

२७ पाठा, लोध्र, तेजोवती, वेलची, वालुक, ज्येष्ठीमध, मधुरसा, प्रियंगु, दारुहळद, मिरी व पिंपळी सर्व मिळून पाच कर्ष वजनाचा मसाला मैरेय व प्रसन्ना ह्या मद्यात घालतात. २८ आणि ज्येष्ठीमधाच्या काढ्याने युक्त कटशर्करा मद्याचा रंग स्वच्छ करते.

२९ दालचिनी, चित्रक, वावडिंग आणि गजपिपळी ही एक कर्ष भार आणि सुपारी, ज्येष्ठीमध, नागरमोथा आणि लोध्र ही दोन कर्ष भार हा आसवांसाठी मसाला. ३० आणि ह्यांचा एकदशांश भाग म्हणजे (मद्याचे) बीज.

३१ प्रसन्नासाठी जे मिश्रण तेच श्वेतसुरासाठी. ३२ आंब्यापासून केलेले मद्य जर त्यात रस अधिक असेल किंवा बीज अधिक असेल अथवा त्यात मसाला असेल तर ती महासुरा. ३३ ह्या मद्यांमध्ये मोरटा, पलाश, पत्तूर, मेषशृंगी, करंज आणि (वड आदी) क्षीरवृक्ष यांच्या काढ्यात मुरविलेले, जाळलेल्या कटशर्करेचे चूर्ण, लोध्र, चित्रक, वावडिंग, पाठा, नागरमोथा, कलिंगयव, दारुहळद, कमळ, शतपुष्प, आघाडा, सप्तपर्ण, निंब व आस्फोत यांच्या लगद्यात मिसळले तर बोटांची नखे न दिसतील अशा रीतीने केलेल्या मुठीत ते चूर्ण जेवढे मावेल तेवढे टाकले असता (त्यांपैकी कोणतेही) कुंभी भार मद्य राजाने पिण्यास योग्य असे निर्मळ होते. ३४ आणि त्यात रसवृद्धी म्हणून पाच पल काकवी घालावी.

**कुटुम्बिनः कृत्येषु श्वेतसुराम्, औषधार्थं वारिष्टम्, अन्यद्वा कर्तुं लभेरन् । ३५ । उत्सवसमाजयात्रासु चतुरहः सौरिको देयः। ३६ । तेष्वननुज्ञातानां प्रहवणान्तं दैवसिकमत्ययं गृह्णीयात् । ३७ ।**

**सुराकिण्वविचयं स्त्रियो बालाश्च कुर्युः । ३८ ।**

**अराजपण्याः पञ्चकं शतं शुल्कं दद्युः । ३९ ।**

**सुरकामेदकारिष्टमधुफलाम्लाम्लशीधूनां च –**

**अह्नश्च विक्रयं ज्ञात्वा व्याजीं मानहिरण्ययोः ।**
**तथा वैधरणं कुर्यादुचितं चानुवर्तयेत् ।। ४० ।।**

**इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे सुराध्यक्षः पञ्चविंशोऽध्यायः । आदितः षट्चत्वारिंशः ।**

**२६**

**[ त्रयश्चत्वारिंशं प्रकरणम् – सूनाध्यक्षः ]**

**सूनाध्यक्षः प्रदिष्टाभयानामभयवनवासिनां च मृगपशुपक्षिमत्स्यानां बन्धवधहिंसायामुत्तमं दण्डं कारयेत्, कुटुम्बिनामभयवनपरिग्रहेषु मध्यमम् । १ ।**

३५ कुटुंबियांना समारंभाच्या प्रसंगी श्वेतसुरा किंवा औषधासाठी अरिष्ट अथवा दुसरे एखादे मद्य स्वत: तयार करण्यास परवानगी असावी.

३६ उत्सव, मेळावे आणि यात्रा या प्रसंगी चार दिवस मद्य तयार करण्याची परवानगी द्यावी. ३७ ज्यांनी परवानगी घेतली नाही त्यांच्याकडून त्या दिवसांत समारंभ संपेपर्यंत रोजचा दंड वसूल करावा.

३८ सुरा आणि किण्व यांसाठी लागणारी द्रव्ये स्त्रिया व मुले यांनी शोधून आणावीत.

३९ सरकारी मद्याशिवाय इतर मद्याची विक्री करणाऱ्यांनी शेकडा पाच इतकी जकात दिली पाहिजे. ४० आणि सुरा, मेदक, अरिष्ट, मधु, फळांचा शिरका आणि आम्ल शीधु यांच्या बाबतीत–

दिवसाची विक्री, मापे व पैसे यांवरील अधिक आकारणी ही जाणून घेऊन तदनुसार सरकारच्या नुकसानीची भरपाई करून घ्यावी आणि ज्याचा प्रघात पडला असेल ते चालू राहू द्यावे.

## सव्विसावा अध्याय

## प्रकरण ४३ : सूनाध्यक्ष (प्राण्यांच्या कत्तलीवरील मुख्य अधिकारी)

१ कसाईखान्यावरील अध्यक्षाने जे मारण्यावर बंदी आहे अशा राखीव वनात ठेवलेल्या हरीण, पशू, पक्षी आणि मासे या प्राण्यांना कोणी बांधले, ठार केले किंवा इजा केली तर त्याबद्दल उत्तम साहसदंड करावा, कुटुंबियांनी राखीव वनात असे केले तर त्यांना मध्यम साहसदंड करावा.

अप्रवृत्तवधानां मत्स्यपक्षिणां बन्धवधहिंसायां पादोनसप्तविंशतिपणमत्ययं कुर्यात्, मृगपशूनां द्विगुणम् । २ । प्रवृत्तहिंसानामपरिगृहीतानां षड्भागं गृह्णीयात् मत्स्यपक्षिणां दशभागं वाधिकम्, मृगपशूनां शुल्कं वाधिकम् । ३ ।

पक्षिमृगाणां जीवत् षड्भागमभयवनेषु प्रमुञ्चेत् । ४ ।

सामुद्रहस्त्यश्वपुरुषवृषगर्दभाकृतयो मत्स्याः सारसा नादेयास्तटाककुल्योद्भवा वा क्रौञ्चोत्क्रोशकदात्यूहहंसचक्रवाकजीवञ्जीवकभृङ्गराजचकोरमत्तकोकिल- मयूरशुकमदनशारिका विहारपक्षिणो मङ्गल्याश्चान्येऽपि प्राणिनः पक्षिमृगा हिंसाबाधेभ्यो रक्ष्याः । ५ । रक्षातिक्रमे पूर्वः साहसदण्डः । ६ ।

मृगपशूनामनस्थिमांसं सद्योहतं विक्रीणीरन् । ७ । अस्थिमतः प्रतिपातं दद्युः । ८ । तुलाहीने हीनाष्टगुणम् । ९ ।

वत्सो वृषो धेनुश्चैषामवध्याः । १० । घ्नतः पञ्चाशत्को दण्डः, क्लिष्टघातं घातयतश्च । ११ ।

२ ज्यांना मारण्याचा प्रघात नाही असे मासे व पक्षी यांना बांधले, ठार केले किंवा इजा केली तर पावणेसत्तावीस पण दंड करावा, हरीण व पशू यांच्या बाबतीत दुप्पट दंड करावा. ३ ज्यांना मारण्याचा प्रघात आहे अशा राखीव वनांच्या बाहेरील प्राण्यांना मारले तर त्याचा एकषष्ठांश भाग (सरकारने) घ्यावा, मासे व पक्षी यांच्या बाबतीत एकदशांश भाग अधिक घ्यावा, हरीण व पशू यांच्या बाबतीत शिवाय जकात घ्यावी.

४ पक्षी आणि हरीण यांच्या एकषष्ठांश भागात जे जिवंत असतील त्यांना राखीव वनात मोकळे सोडून द्यावे.

५ समुद्रातील हत्ती, घोडे, मनुष्य, बैल व गाढव यांच्यासारखा आकार असणारे मासे, नद्या, सरोवरे, तलाव व कालवे यांत उत्पन्न होणारे मासे, क्रौंच, उत्क्रोश, दात्यूह, हंस, चक्रवाक, जीवंजीवक, भृंगराज, चकोर, मत्तकोकिल, मोर, पोपट, मदनसारिका हे क्रीडोपयोगी आणि शुभसूचक पक्षी, तसेच इतरही प्राणी – पक्षी अथवा हरीण – या सर्वांचे हिंसेच्या धोक्यापासून रक्षण केले पाहिजे. ६ रक्षण न केल्यास (हिंसा करणाऱ्यास) प्रथम साहसदंड करावा.

७ कसायांनी नुकतेच मारलेले (ताजे) हरीण व पशू यांचे मांस हाडे काढून विकावे. ८ त्यात हाडे असल्यास तितक्याच वजनाच्या मांसाने भरपाई करून द्यावी. ९ वजनात कमी दिल्यास जितके कमी असेल त्याच्या आठपट द्यावे.

१० आणि ह्या जनावरांपैकी वछडे, सांड आणि दुभते जनावर मारण्यास प्रतिबंध करावा. ११ ती मारणाऱ्याला (व इतर जनावरांना) हाल करून मारणाऱ्याला पन्नास पण दंड करावा.

परिशूनमशिर:पादास्थि विगन्धं स्वयंमृतं च न विक्रीणीरन् । १२ । अन्यथा द्वादशपणो दण्ड: । १३ ।

दुष्टा: पशुमृगव्याला मत्स्याश्चाभयचारिण: ।
अन्यत्र गुप्तिस्थानेभ्यो वधबन्धमवाप्नुयु: ।। १४ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे सूनाध्यक्ष: षड्विंशोऽध्याय: । आदित: सप्तचत्वारिंश: ।

२७

## [ चतुश्चत्वारिंशं प्रकरणम् – गणिकाध्यक्ष: ]

गणिकाध्यक्षो गणिकान्वयामगणिकान्वयां वा रूपयौवनशिल्पसंपन्नां सहस्रेण गणिकां कारयेत्, कुटुम्बार्धेन प्रतिगणिकाम् । १ ।

निष्पतिताप्रेतयोर्दुहिता भगिनी वा कुटुम्बं भरेत, माता वा प्रतिगणिकां स्थापयेत् । २ । तासामभावे राजा हरेत् । ३ ।

सौभाग्यालंकारवृद्धया सहस्रेण वारं कनिष्ठं मध्यममुत्तमं वारोपयेत् छत्र-

१२ सुजलेले, डोके, पाय व हाडे नसलेले, दुर्गंधी येत असलेले आणि स्वाभाविकपणे मेलेल्या जनावराचे मांस त्यांनी विकू नये. १३ नाही तर बारा पण दंड करावा.

१४ राखीव वनात ठेवलेले पशू, हरीण, श्वापद आणि मासे जर दुष्ट होऊन आवरेनासे झाले तर त्यांना त्यांच्या राखीव ठिकाणांहून दुसऱ्या जागी बांधून ठेवावे अथवा मारून टाकावे.

## सत्ताविसावा अध्याय

### प्रकरण ४४ : गणिकाध्यक्ष (गणिकांवरील मुख्य अधिकारी)

१ गणिकाध्यक्षाने गणिकेच्या कुलात जन्मलेल्या अथवा गणिकेच्या कुलात न जन्मलेल्या अशाही, सौंदर्य, तारुण्य आणि कला यांनी संपन्न गणिकेची एक हजार पण देऊन नेमणूक करावी, घरदार सुप्रतिष्ठित करण्यासाठी त्याच्या निम्मे पण देऊन एका दुय्यम गणिकेची नेमणूक करावी.

२ गणिका जर पळून गेली अथवा मरण पावली तर तिच्या मुलीने अथवा बहिणीने तिचा कुटुंबभार वहावा, अथवा तिच्या मातेने दुसऱ्या गणिकेची स्थापना करावी. ३ तसे कोणीच नसल्यास राजाने तिचे सर्व सामानसुमान आपल्या ताब्यात घ्यावे.

४ सौंदर्य आणि अलंकार यांच्या समृद्धीच्या अनुरोधाने एक हजार पणांवर कनिष्ठ, मध्यम आणि उत्तम अशी कामगिरी सोपवावी – छत्रधारण, जलपात्र-

भृङ्गारव्यजनशिबिकापीठिकारथेषु च विशेषार्थम् । ४ । सौभाग्यभङ्गे मातृकां कुर्यात् । ५ ।

निष्क्रयश्चतुर्विंशतिसाहस्रो गणिकायाः, द्वादशसाहस्रो गणिकापुत्रस्य । ६ । अष्टवर्षात्प्रभृति राज्ञः कुशीलवकर्म कुर्यात् । ७ ।

गणिकादासी भग्नभोगा कोष्ठागारे महानसे वा कर्म कुर्यात् । ८ । अविशन्ती सपादपणमवरुद्धा मासवेतनं दद्यात् । ९ ।

भोगं दायमायं व्ययमायतिं च गणिकाया निबन्धयेत्, अतिव्ययकर्म च वारयेत् । १० ।

मातृहस्तादन्यत्राभरणन्यासे सपादचतुष्पणो दण्डः । ११ । स्वापतेयं विक्रयमाधानं वा नयन्त्याः सपादपञ्चाशत्पणो दण्डः, चतुर्विंशतिपणो वाक्पारुष्ये, द्विगुणो दण्डपारुष्ये, सपादपञ्चाशत्पणः पणोऽर्धपणश्च कर्णच्छेदने । १२ ।

धारण, चवरी धरणे, पालखी, आसन व रथ यांवर राजा असता त्याच्या संनिध असणे, या विविध प्रकारच्या सेवेत वैशिष्टय उत्पन्न करण्यासाठी. ५ तिचे सौंदर्य नष्ट झाले म्हणजे तिला मातृका करावी.

६ व्यवसाय सोडून जाण्यासाठी गणिकेने चोवीस हजार पण इतकी रक्कम द्यावी, गणिकेच्या पुत्राने त्यासाठी बारा हजार पण द्यावेत. ७ गणिकेच्या मुलाने आठव्या वर्षापासून राजाच्या कुशीलवाचे (गाण्याचे अथवा नाचण्याचे) काम करावे.

८ गणिकेची दासी उपभोगास निरुपयोगी झाली म्हणजे तिने कोठारात अथवा मुदपाकखान्यात काम करावे. ९ जर ती तेथे जात नसेल तर तिच्यावर बंधन घालून तिला (तिच्या ऐवजी काम करणाऱ्या माणसाला) महिन्याचे सव्वा पण वेतन द्यावयास लावावे.

१० (गणिकाध्यक्षाने) गणिकेची उपभोगाची प्राप्ती, देणग्या, उत्पन्न, खर्च आणि इतर मिळकत यांची नोंद करून ठेवावी, आणि तिच्या उधळेपणाला प्रतिबंध करावा.

११ मातेशिवाय दुसऱ्या कोणाकडे अलंकार ठेवावयास दिल्यास सव्वाचार पण दंड करावा. १२ स्वतःची मालमत्ता विकणाऱ्या अथवा गहाण ठेवणाऱ्या गणिकेला सव्वापन्नास पण दंड करावा, शब्दाने ताडन (शिवीगाळ इत्यादी) केल्यास चोवीस पण दंड, मारहाण केल्यास त्याच्या दुप्पट, कान कापल्यास सव्वापन्नास पण, शिवाय एक पण व अर्धा पण इतका दंड करावा.

अकामायाः कुमार्या वा साहसे उत्तमो दण्डः, सकामायाः पूर्वः साहसदण्डः । १३ । गणिकामकामां रुन्धतो निष्पातयतो वा व्रणविदारणेन वा रूपमुपघ्नतः सहस्रं दण्डः । १४ । स्थानविशेषेण वा दण्डवृद्धिः आ निष्क्रयद्विगुणात् । १५ । प्राप्ताधिकारां गणिकां घातयतो निष्क्रयत्रिगुणो दण्डः । १६ । मातृकादुहितृकारूपदासीनां घाते उत्तमः साहसदण्डः । १७ ।

सर्वत्र, प्रथमेऽपराधे प्रथमः, द्वितीये द्विगुणः, तृतीये त्रिगुणः, चतुर्थे यथाकामी स्यात् । १८ ।

राजाज्ञया पुरुषमनभिगच्छन्ती गणिका शिफासहस्रं लभेत, पञ्चसहस्रं वा दण्डः । १९ ।

भोगं गृहीत्वा द्विषत्या भोगद्विगुणो दण्डः । २० । वसतिभोगापहारे भोगमष्टगुणं दद्याद् अन्यत्र व्याधिपुरुषदोषेभ्यः । २१ । पुरुषं घ्नत्याश्चिताप्रतापोऽप्सु प्रवेशनं वा । २२ ।

१३ इच्छा नसलेल्या कुमारीवर बळाचा वापर केल्यास उत्तम साहसदंड करावा, तिची संमती असल्यास प्रथम साहसदंड. १४ गणिकेच्या इच्छेविरुद्ध तिला कोंडून ठेवणाऱ्यास अथवा तिला पळवून नेणाऱ्यास अथवा जखम करून तिला विद्रूप करणाऱ्यास एक हजार पण दंड करावा. १५ किंवा तिच्या विशिष्ट दर्जाच्या अनुरोधाने दंडात वाढ करावी, मुक्ततेबद्दलच्या रकमेच्या दुपटीपर्यंत (अठ्ठेचाळीस हजार पणांपर्यंत). १६ अधिकारावर नेमणूक झालेल्या गणिकेस ठार मारणाऱ्यास त्या रकमेच्या तिप्पट (बहात्तर हजार पण) दंड करावा. १७ गणिकेची माता किंवा मुलगी किंवा रूपदासी यांना मारल्यास उत्तम साहसदंड करावा.

१८ सर्व अपराधांच्या बाबतीत पहिल्या अपराधाबद्दल प्रथम साहसदंड, दुसऱ्यांदा केल्यास त्याच्या दुप्पट, तिसऱ्यांदा केल्यास तिप्पट, चौथ्या खेपेस राजाने आपल्या मर्जीप्रमाणे शिक्षा करावी.

१९ राजाने आज्ञा केली असताही जर गणिका कोणा पुरुषाकडे जात नसेल तर तिला एक हजार फटक्यांची शिक्षा करावी किंवा पाच हजार पण दंड करावा.

२० उपभोगासाठी द्रव्य घेतल्यावर ते नाकारणाऱ्या गणिकेला त्या रकमेच्या दुप्पट दंड करावा. २१ रात्री वस्तीस असलेल्या पुरुषास द्रव्य घेऊन भोग नाकारल्यास त्या रकमेच्या आठपट दंड करावा; याला अपवाद ती आजारी असेल अथवा त्या पुरुषात काही दोष असतील यांचा. २२ पुरुषाला ठार मारणाऱ्या गणिकेला चितेवर जाळावे किंवा पाण्यात बुडवावे.

गणिकाभरणमर्थं भोगं वापहरतोऽष्टगुणो दण्डः । २३ ।

गणिका भोगमायतिं पुरुषं च निवेदयेत् । २४ ।

एतेन नटनर्तकगायनवादकवाग्जीवनकुशीलवप्लवकसौभिकचारणानां स्त्रीव्यवहारिणां स्त्रियो गूढाजीवाश्च व्याख्याताः । २५ । तेषां तूर्यमागन्तुकं पञ्चपणं प्रेक्षावेतनं दद्यात् । २६ ।

रूपाजीवा भोगद्वयगुणं मासं दद्युः । २७ ।

गीतवाद्यपाठ्यनृत्यनाट्याक्षरचित्रवीणावेणुमृदङ्गपरचित्तज्ञानगन्धमाल्यसंयूहनसंवादनसंवाहनवैशिककलाज्ञानानि गणिका दासी रङ्गोपजीविनीश्च ग्राहयतो राजमण्डलादाजीवं कुर्यात् । २८ ।

गणिकापुत्रान् रङ्गोपजीविनां च मुख्यान्निष्पादयेयुः, सर्वतालावचराणां च । २९ ।

२३ गणिकेचे अलंकार, द्रव्य अथवा उपभोगाची रक्कम यांचे अपहरण करणाऱ्यास आठपट दंड करावा.

२४ गणिकेने उपभोगद्रव्याची रक्कम, इतर प्राप्ती आणि पुरुषाचे नावगाव (गणिकाध्यक्षास) कळविले पाहिजे.

२५ हेच नियम नट, नर्तक, गायक, वादक, कथा सांगणारे, कुशीलव, दोरावर कसरत करणारे (डोंबारी), जादुगार व भाट ह्या स्त्रियांचा व्यवहार करणाऱ्या लोकांच्या स्त्रिया आणि गूढ व्यवसाय करणाऱ्या स्त्रिया यांनाही लागू आहेत. २६ ते परदेशातून आले असल्यास त्यांनी वाद्यांवर वगैरे खेळ करण्यासाठी कर म्हणून पाच पण दिले पाहिजेत.

२७ आपल्या रूपावर उपजीविका करणाऱ्या वेश्यांनी आपल्या उपभोगाच्या दराच्या दुप्पट रक्कम दर महिन्याला सरकारला दिली पाहिजे.

२८ गणिका आणि रंगभूमीवर उपजीविका करणाऱ्या दासी यांना गायन, वादन, पाठ्य म्हणणे, नृत्य, नाट्य, लेखन करणे, चित्र काढणे, वीणा, वेणू व मृदंग वाजविणे, दुसऱ्याचे मनोगत ओळखणे, सुगंध तयार करणे, माळा गुंफणे, संभाषणकला, संवाहनाची कला आणि वेश्यांच्या कला, ह्या कलांचे ज्ञान करून देणाऱ्या शिक्षकांच्या उपजीविकेची सोय सरकारी तिजोरीतून करून द्यावी.

२९ आणि (त्या शिक्षकांनी) गणिकेच्या पुत्रांना नटांमध्ये तसेच सर्व प्रकारच्या नर्तकांमध्ये ते प्रमुख होतील अशा रीतीने तयार करावे.

संज्ञाभाषान्तरज्ञाश्च स्त्रियस्तेषामनात्मसु ।
चारघातप्रमादार्थं प्रयोज्या बन्धुवाहनाः ॥ ३० ॥
इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे गणिकाध्यक्षः सप्तविंशोऽध्यायः । आदितोऽष्टचत्वारिंशः ।

२८

[ पञ्चचत्वारिंशं प्रकरणम् – नावध्यक्षः ]

नावध्यक्षः समुद्रसंयाननदीमुखतरप्रचारान् देवसरोविसरोनदीतरांश्च स्थानीयादिष्ववेक्षेत । १ ।

तद्वेलाकूलग्रामाः क्लृप्तं दद्युः । २ ।

मत्स्यबन्धका नौकाभाटकं षड्भागं दद्युः । ३ ।

पत्तनानुवृत्तं शुल्कभागं वणिजो दद्युः, यात्रावेतनं राजनौभिः संपतन्तः । ४ ।

शङ्खमुक्ताग्राहिणो नौभाटकं दद्युः, स्वनौभिर्वा तरेयुः । ५ । अध्यक्षश्चैषां खन्यध्यक्षेण व्याख्यातः । ६ ।

३० आणि त्यांच्या ज्या स्त्रिया विविध प्रकारच्या सांकेतिक भाषा जाणत असतील त्यांची त्यांच्या आप्तांच्या देखरेखीखाली दुष्ट लोकांची गुप्त माहिती मिळविणे, त्यांचा घात करणे अथवा त्यांना अपराध करावयास लावणे या कामगिरीवर योजना करावी.

## अठ्ठाविसावा अध्याय

## प्रकरण ४५ : नावध्यक्ष (नौकांवरील मुख्य अधिकारी)

१ नौकांवरील अध्यक्षाने समुद्रातून होणारी जहाजांची हालचाल, नद्यांच्या मुखावरील तरींची हालचाल आणि स्थानीयप्रभृती गावांत स्वाभाविक सरोवर, कृत्रिम तलाव आणि नद्या यांवरील तरी या सर्वांवर देखरेख ठेवावी.

२ त्या समुद्रकिनाऱ्यावरील आणि नदी आदींच्या तीरावरील गावांनी ठरवून दिलेला कर दिला पाहिजे.

३ मासे पकडणाऱ्या कोळ्यांनी एकषष्ठांश भाग (मासे) नावेचे भाडे म्हणून दिले पाहिजे.

४ व्यापाऱ्यांनी बंदरात प्रचलित असलेल्या दराप्रमाणे जकातीचा भाग दिला पाहिजे; जर ते सरकारी जहाजे मालाची नेआण करण्यासाठी वापरीत असतील तर प्रत्येक खेपेचे भाडे दिले पाहिजे.

५ शंख व मोती गोळा करणाऱ्यांनी नावेचे भाडे द्यावे, अथवा स्वतःच्या नावांतून जावे. ६ आणि त्यांच्यावरील अध्यक्ष खन्यध्यक्षासारखाच.

पत्तनाध्यक्षनिबद्धं पण्यपत्तनचारित्रं नावध्यक्षः पालयेत् । ७ ।

मूढवाताहता नावः पितेवानुगृह्णीयात् । ८ । उदकप्राप्तं पण्यमशुल्कमर्धशुल्कं वा कुर्यात् । ९ । यथानिर्दिष्टाश्चैताः पण्यपत्तनयात्राकालेषु प्रेषयेत् । १० ।

संयातीर्नावः क्षेत्रानुगताः शुल्कं याचेत । ११ । हिंस्रिका निर्घातयेत्, अमित्रविषयातिगाः पण्यपत्तनचारित्रोपघातिकाश्च । १२ ।

शासकनिर्यामकदात्ररश्मिग्राहकोत्सेचकाधिष्ठिताश्च महानावो हेमन्तग्रीष्मतार्यासु महानदीषु प्रयोजयेत्, क्षुद्रिकाः क्षुद्रिकासु वर्षास्राविणीषु । १३ । बद्धतीर्थाश्चैताः कार्या राजद्विष्टकारिणां तरणभयात् । १४ ।

अकालेऽतीर्थे च तरतः पूर्वः साहसदण्डः । १५ । काले तीर्थे चानिसृष्टतारिणः पादोनसप्तविंशतिपणस्तरात्ययः । १६ । कैवर्तकाष्ठतृणभारपुष्पफलवाटषण्ड-

७ बंदरावरील मुख्य अधिकाऱ्याने ठरवून दिलेले बंदरासंबंधीचे नियम नावध्यक्षाने पाळले पाहिजेत.

८ मार्गभ्रष्ट झालेल्या व वादळात सापडलेल्या नावांवर पित्याप्रमाणे अनुग्रह करावा. ९ पाण्यात पडलेल्या त्यांतील मालावर जकात मुळीच घेऊ नये किंवा फार तर अर्धी जकात घ्यावी. १० आणि बंदरातून बाहेर जाण्यास योग्य काळ आला म्हणजे त्या नावांना त्यांच्या मूळच्या अभिप्रेत स्थळांकडे रवाना करावे.

११ समुद्रमार्गे प्रवास करणाऱ्या नावा आपल्या हद्दीत आल्यास त्यांच्याकडून जकात घ्यावी. १२ ज्या नावा (चाचेगिरी करून) नुकसान पोचवीत असतील त्या नष्ट करून टाकाव्यात, तसेच शत्रुदेशाकडे जाणाऱ्या नावा आणि बंदराचे प्रचलित नियम मोडणाऱ्या नावाही नष्ट कराव्यात.

१३ आणि हेमंत व ग्रीष्म ऋतूंत सुद्धा तरीने ओलांडणे आवश्यक असलेल्या मोठ्या नद्यांवर कप्तान, सुकाणू चालविणारा, कोयता व दोर वापरणारा आणि पाणी उपसणारा इतकी माणसे असलेल्या मोठ्या नावांची तरतूद करावी, फक्त पावसाळ्यात वाहणाऱ्या लहान नद्यांवर लहान नावांची तरतूद करावी. १४ आणि राजद्रोही माणसांना नदी ओलांडता येऊ नये यासाठी ह्या नावा चालविण्याची तरीची ठिकाणे ठरवून द्यावीत.

१५ अवेळी आणि भलत्या ठिकाणी नदी ओलांडणाऱ्यास प्रथम साहसदंड करावा. १६ ठरलेल्या वेळी आणि ठरलेल्या ठिकाणी सुद्धा जो परवानगीशिवाय नदी ओलांडावयास मदत करील त्याला तरीच्या (एकाधिकाराच्या) भंगाबद्दल पावणेसत्तावीस पण दंड करावा. १७ कोळी, लाकडाचे व गवताचे भारे नेणारे,

**गोपालकानामनत्ययः संभाव्यदूतानुपातिनां च सेनाभाण्डप्रचारप्रयोगाणां च स्वतरणैस्तरताम्, बीजभक्तद्रव्योपस्करांश्चानूपग्रामाणां तारयताम् । १७ ।**

**ब्राह्मणप्रव्रजितबालवृद्धव्याधितशासनहरगर्भिण्यो नावध्यक्षमुद्राभिस्तरेयुः । १८ ।**

**कृतप्रवेशाः पारविषयिकाः सार्थप्रमाणा वा प्रविशेयुः । १९ । परस्य भार्यां कन्यां वित्तं वापहरन्तं शङ्कितमाविग्नमुद्भाण्डीकृतं महाभाण्डेन मूर्ध्नि भारेणावच्छादयन्तं सद्योगृहीतलिङ्गिनमलिङ्गिनं वा प्रव्रजितमलक्ष्यव्याधितं भयविकारिणं गूढसारभाण्डशासनशस्त्राग्नियोगं विषहस्तं दीर्घपथिकममुद्रं चोपग्राहयेत् । २० ।**

**क्षुद्रपशुर्मनुष्यश्च सभारो माषकं दद्यात्, शिरोभारः कायभारो गवाश्वं च द्वौ, उष्ट्रमहिषं चतुरः, पञ्च लघुयानम्, षड् गोलिङ्गम्, सप्त शकटम्, पण्यभारः**

फुलबागा, फळबागा, भाजीपाल्याचे मळे यांचे रक्षक व गुराखी यांच्या संबंधात हा दंड लागू नाही; तसेच दूताच्या परिवारात असण्याची संभाव्यता असलेले आणि सैन्यासाठी सामान नेणारे त्यांच्या स्वतःच्या नावांतून ओलांडतील तर दंड नाही; आणि नदीकाठची गावे बिया, खाद्य पदार्थ आणि घरगुती सामान दुसऱ्या नावांतून आणवितील तर त्यासंबंधातही वरील दंड लागू नाही.

१८ ब्राह्मण, संन्यासी, लहान मुले, वृद्ध माणसे, आजारी माणसे, राजाज्ञा घेऊन जाणारे आणि गरोदर स्त्रिया यांनी नावध्यक्षाची मोहोर असलेल्या परवान्याने तरीतून (मोफत) जावे.

१९ परदेशातील रहिवाशांनी परवानगी घेऊनच किंवा तांड्यातील व्यापाऱ्यांच्या ओळखीने (तरीमार्फत) प्रवेश केला पाहिजे. २० दुसऱ्याची पत्नी, कन्या किंवा धन पळविणारा, भयाकुल झालेला, गडबड उडालेला, मोठ्या बोजाखाली वाकलेला, डोक्यावरील पुष्कळ वस्तू असलेल्या मोठ्या बोजाने तोंड लपविणारा, नुकतीच कषायवस्त्रे आदी धारण केलेला संन्यासी किंवा त्या चिन्हांशिवाय असलेला संन्यासी, ज्याचा आजार दिसत नाही असा, भयाने रूप पालटलेला, गुप्तपणे भारी किमतीच्या वस्तू, पत्रे, शस्त्रे किंवा अग्नी उत्पन्न करणारी द्रव्ये घेऊन जाणारा, विष जवळ बाळगणारा, लांब प्रवास करून आलेला आणि मोहोर असलेला परवाना नसलेला, यांना पकडावे.

२१ लहान जनावर आणि बोजा घेतलेला मनुष्य यांना (तरीचे) भाडे एक माषक, डोक्यावर किंवा पाठीवर ओझे घेऊन जाणारा, गाय व घोडा यांना दोन

पादम् । २१ । तेन भाण्डभारो व्याख्यातः । २२ । द्विगुणो महानदीषु तरः । २३ ।

क्लृप्तमानूपग्रामा भक्तवेतनं दद्युः । २४ ।

प्रत्यन्तेषु: तराः शुल्कमातिवाहिकं वर्तनीं च गृह्णीयुः, निर्गच्छतश्चामुद्रद्रव्यस्य भाण्डं हरेयुः, अतिभारेणावेलायामतीर्थे तरतश्च । २५ ।

पुरुषोपकरणहीनायामसंस्कृतायां वा नावि विपन्नायां नावध्यक्षो नष्टं विनष्टं वाभ्यावहेत् । २६ ।

सप्ताहवृत्तामाषाढीं कार्त्तिकीं चान्तरा तरः ।
कार्मिकः प्रत्ययं दद्यान्नित्यं चाह्निकमावहेत् ।। २७ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे नावध्यक्षः अष्टाविंशोऽध्यायः । आदित एकोनपञ्चाशः ।

माषक, उंट व म्हैस यांना चार, लहान गाड्यांसाठी पाच, बैलाच्या गाडीसाठी सहा, मोठ्या शकटासाठी सात, व्यापारी मालाच्या एक भार वजनासाठी पाव पण. २२ इतर सामानाच्या एक भार वजनासाठीही तितकेच घ्यावे. २३ मोठ्या नद्यांवरील तरीचा दर याच्या दुप्पट.

२४ काठच्या गावांनी तरी चालविणाऱ्या माणसांना ठरलेले भोजन व वेतन दिले पाहिजे.

२५ दोन देशांमध्ये नदी सरहद्द असेल तेथे तर चालविणाऱ्यांनी जकात, संरक्षकाबद्दलचा आकार आणि मार्गावरील रक्षणासाठी आकारणी ही वसूल करावीत, आणि मोहोर नसलेला माल देशाबाहेर कोणी नेत असल्यास तो जप्त करावा, तसेच फार वजनदार माल अवेळी व तरीच्या ठिकाणाहून दुसरीकडून नेणाऱ्याचा मालही जप्त करावा.

२६ नावेवर खलाशी किंवा उपकरणे कमी असल्यामुळे किंवा ती नादुरुस्त असल्यामुळे ती बुडाली तर नावध्यक्षाने जे नाहीसे झाले असेल अथवा खराब झाले असेल त्याची भरपाई करून दिली पाहिजे.

२७ आषाढी पौर्णिमेनंतर सात दिवस उलटल्यापासून तो कार्तिकी पौर्णिमेनंतर सात दिवस उलटेपर्यंत मधल्या काळात तर सुरू ठेवावी. त्यावरील (अधिकारी) कामगाराने जामीन द्यावा आणि दिवसाची होणारी प्राप्ती नियमितपणे (नावध्यक्षाला) आणून द्यावी.

२९

[ षट्चत्वारिंशं प्रकरणम् – गोऽध्यक्षः ]

**गोऽध्यक्षो वेतनोपग्राहिकं करप्रतिकरं भग्नोत्सृष्टकं भागानुप्रविष्टकं व्रजपर्यग्रं नष्टं विनष्टं क्षीरघृतसंजातं चोपलभेत । १ ।**

**गोपालकपिण्डारकदोहकमन्थकलुब्धकाः शतं शतं धेनूनां हिरण्यभृताः पालयेयुः । २ । क्षीरघृतभृता हि वत्सानुपहन्युः । इति वेतनोपग्राहिकम् । ३ ।**

**जरद्गुधेनुगर्भिणीपष्ठौहीवत्सतरीणां समविभागं रूपशतमेकः पालयेत् । ४ । घृतस्याष्टौ वारकान् पणिकं पुच्छम् अङ्कचर्म च वार्षिकं दद्यात् । इति करप्रतिकरः । ५ ।**

**व्याधितान्यङ्गानन्यदोहीदुर्दोहापुत्रघ्नीनां च समविभागं रूपशतं पालयन्तस्तज्जातिकं भागं दद्युः । इति भग्नोत्सृष्टकम् । ६ ।**

## एकोणतिसावा अध्याय

### प्रकरण ४६ : गोध्यक्ष (गुरांवरील मुख्य अधिकारी)

१ गाई आदी जनावरांवरील अध्यक्षाने वेतनोपग्राहिक (वेतन घेऊन सांभाळलेली), करप्रतिकर (कर व ठरीव उत्पादन देऊन पाळलेली), भग्नोत्सृष्टक (निरुपयोगी होऊन टाकून दिलेली), भागानुप्रविष्ट (हिस्सा देऊन सरकारी कळपात आलेली), व्रजपर्यग्र (कळपातील एकूण जनावरे), नाहीशी झालेली व विनाश पावलेली जनावरे आणि दूध व तूप यांचे उत्पादन या सर्वांची व्यवस्था पहावी.

२ गाई राखणारे, म्हशी राखणारे, दूध काढणारे, ताक घुसळणारे आणि शिकारी यांनी शंभर शंभर दुभत्या जनावरांचे पालन वेतन घेऊन करावे. ३ (पगाराच्या ऐवजी) दूधतुपाच्या रूपात मोबदला घेऊ दिला तर ते वासरांचे हाल करतील. हे झाले वेतनोपग्राहिक.

४ म्हातारी झालेली, दुभती, गाभण, प्रथम गाभण राहिलेली आणि कालवड ह्या समप्रमाणात असलेल्या शंभर गाईंच्या कळपाचे पालन करण्याचे काम एका माणसाने पत्करावे. ५ त्याने वर्षाकाठी आठ वारक तूप, प्रत्येक जनावरामागे एक पण आणि (मेलेल्या जनावराचे) चिन्ह असलेले कातडे ही द्यावीत. हे करप्रतिकर.

६ रोगी, पंगू, दुसऱ्या कोणाला दोहन करू न देणाऱ्या, दोहनास कठीण आणि वासरे जगत नाहीत अशी ह्यांचे समप्रमाण असलेल्या शंभर गाईंचे पालन करणाऱ्यांनी त्या त्या जातीच्या उत्पन्नाचा अनुरूप भाग द्यावा. हे भग्नोत्सृष्टक.

**परचक्राटवीभयादनुप्रविष्टानां पशूनां पालनधर्मेण दशभागं दद्युः । इति भागानुप्रविष्टकम् । ७ ।**

**वत्सा वत्सतरा दम्या वहिनो वृषा उक्षाणश्च पुंगवाः, युगवाहनशकटवहा वृषभाः सूनामहिषाः पृष्ठस्कन्धवाहिनश्च महिषाः, वत्सिका वत्सतरी पष्ठौही गर्भिणी धेनुश्चाप्रजाता वन्ध्याश्च गावो महिष्यश्च, मासद्विमासजातास्तासामुपजा वत्सा वत्सिकाश्च । ८ । मासद्विमासजातानङ्कयेत् । ९ । मासद्विमासपर्युषितमङ्कयेत् । १० । अङ्कं चिह्नं वर्णं शृङ्गान्तरं च लक्षणम् एवमुपजा निबन्धयेत् । इति व्रजपर्यग्रम् । ११ ।**

**चोरहृतमन्ययूथप्रविष्टमवलीनं वा नष्टम् । १२ । पङ्कविषमव्याधिजरातोयाहारावसन्नं वृक्षतटकाष्ठशिलाभिहतमीशानव्यालसर्पग्राहदावाग्निविपन्नं विनष्टम् । १३ । प्रमादादभ्यावहेयुः । १४ ।**

७ परचक्राच्या भीतीने अथवा जंगलांतील टोळयांच्या भीतीने (सरकारी कळपात रक्षणासाठी) आलेल्या जनावरांसाठी (त्यांच्या मालकांनी) रक्षणासाठी म्हणून (त्यांच्यापासून मिळणाऱ्या उत्पन्नाचा) एकदशांश भाग द्यावा. हे भागानुप्रविष्टक.

८ वासरे, दूध तुटलेली वासरे, दमन केले जाणारे बैल, ओझे वाहणारे बैल, आणि सांड, तसेच जू असलेले वाहन व मोठे शकट ओढणारे याप्रमाणे (विविध प्रकारचे) बैल; कसाईखान्यात मारावयाचे आणि पाठीवर व खांद्यावर भार वाहून नेणारे रेडे; कालवड, दूध तुटलेली कालवड, प्रथम गाभण राहिलेली, गाभण, दुभती, वासरू न झालेली आणि वांझोटी याप्रमाणे गाई व म्हशी; आणि महिन्यादोनमहिन्यांची त्यांची वासरे व कालवडी ही उपज (या सर्वांची नोंद करावी). ९ एक किंवा दोन महिन्याची झाली की त्यांच्यावर चिन्ह करावे. १० (सरकारी कळपांत) एकदोन महिने राहिलेल्या जनावरांवर चिन्ह करावे. ११ चिन्ह, नैसर्गिक खूण, रंग आणि शिंगांमधील अंतर ही सर्व लक्षणे – याप्रमाणे कळपात भर पडणाऱ्या जनावरांची नोंद करून ठेवावी. हे झाले व्रजपर्यग्र.

१२ चोरांनी नेलेले, दुसऱ्या कळपात शिरलेले अथवा बेपत्ता झालेले जनावर नष्ट असे समजावे. १३ चिखलात रुतलेले, कठीण जागी अडकलेले, रोगाने पिडलेले, म्हातारे झालेले व अन्नपाण्यावाचून खंगलेले, तसेच झाड, नदीकाठ, लाकूड व खडक यांचा मार बसलेले आणि वीज, वाघ, साप, सुसर, दावाग्नी यांनी मेलेले जनावर विनष्ट असे समजावे. १४ प्रमादामुळे नष्ट अथवा विनष्ट झाले असल्यास (राखण करणाऱ्यांनी) त्याची भरपाई केली पाहिजे.

एवं रूपाग्रं विद्यात् । १५ ।

स्वयं हन्ता घातयिता हर्ता हारयिता च वध्यः । १६ ।

परपशूनां राजाङ्केन परिवर्तयिता रूपस्य पूर्वं साहसदण्डं दद्यात् । १७ ।

स्वदेशीयानां चोरहृतं प्रत्यानीय पणितं रूपं हरेत् । १८ । परदेशीयानां मोक्षयिताऽर्धं हरेत् । १९ ।

बालवृद्धव्याधितानां गोपालकाः प्रतिकुर्युः । २० । लुब्धकश्वगणिभिरपास्तस्तेनव्यालपराबाधभयमृतुविभक्तमरण्यं चारयेयुः । २१ । सर्पव्यालत्रासनार्थं गोचरानुपातज्ञानार्थं च त्रस्नूनां घण्टातूर्यं च बध्नीयुः । २२ । समव्यूढतीर्थमकर्दमग्राहमुदकमवतारयेयुः पालयेयुश्च । २३ । स्तेनव्यालसर्पग्राहगृहीतं व्याधिजरावसन्नं चावेदयेयुः, अन्यथा रूपमूल्यं भजेरन् । २४ ।

१५ याप्रमाणे (गोध्यक्षाला) सर्व जनावरांची माहिती असली पाहिजे.

१६ जनावरास स्वतः ठार करणाऱ्यास अथवा दुसऱ्याकडून ठार करविणाऱ्यास, स्वतः पळवून नेणाऱ्यास अथवा दुसऱ्याकडून पळवून नेणाऱ्यास वधाची शिक्षा करावी.

१७ दुसऱ्यांच्या (हलक्या) पशूंवर राजाचे चिन्ह करून त्याबदली राजाची भारी जनावरे देणाऱ्यास प्रत्येक जनावरामागे प्रथम साहसदंड करावा.

१८ आपल्या देशातील जनावरांपैकी चोरीस गेलेली परत मिळविणाऱ्याला ठरल्याप्रमाणे एक जनावर बक्षीस मिळाले पाहिजे. १९ परदेशातील चोरीस गेलेली जनावरे सोडवून आणणाऱ्यास त्यांपैकी अर्धी मिळाली पाहिजेत.

२० लहान, वृद्ध आणि आजारी जनावरांची निगा गुराख्यांनी राखावी. २१ पारधी व कुत्र्यांच्या साह्याने शिकार करणारे यांनी ज्यांत चोर, हिंस्र प्राणी, शत्रूचा उपद्रव यांची भीती नाहीशी केली आहे अशा, ऋतुमानाप्रमाणे निरनिराळ्या अरण्यांत त्यांनी गुरे चरावयास न्यावीत. २२ साप व हिंस्र प्राणी यांना घाबरविण्यासाठी, तसेच गुरे कोठे चरतात ते समजावे म्हणून भित्र्या जनावरांच्या गळ्यात घंटा बांधाव्यात. २३ जेथील उताराची जागा एकसारखी व रुंद आहे, जेथे चिखल नाही व मगरी नाहीत अशा ठिकाणी गुरांस पाणी पाजण्यासाठी न्यावे व तेथे त्यांच्यावर नजर ठेवावी. २४ चोर, हिंस्र प्राणी, साप, मगर यांनी पकडलेल्या आणि व्याधी व जरा यांनी मरण पावलेल्या जनावराची खबर त्यांनी (गोध्यक्षाला) दिली पाहिजे; नाहीतर त्यांना त्या जनावराची किंमत भरून द्यावी लागेल.

कारणमृतस्याङ्कचर्म गोर्महिषस्य, कर्णलक्षणमजाविकानां, पुच्छमङ्कचर्म चाश्वखरोष्ट्राणां, बालचर्मबस्तिपित्तस्नायुदन्तखुरशृङ्गास्थीनि चाहरेयुः । २५ । मांसमार्द्रं शुष्कं वा विक्रीणीयुः । २६ ।

उदश्विच्छ्ववराहेभ्यो दद्युः । २७ । कूर्चिकां सेनाभक्तार्थमाहरेयुः । २८ । किलाटो घाणपिण्याकक्लेदार्थः । २९ ।

पशुविक्रेता पादिकं रूपं दद्यात् । ३० ।

वर्षाशरद्धेमन्तानुभयतःकालं दुह्युः, शिशिरवसन्तग्रीष्मानेककालम् । ३१ । द्वितीयकालदोग्धुरङ्गुष्ठच्छेदो दण्डः । ३२ । दोहनकालमतिक्रामतस्तत्फलहानं दण्डः । ३३ । एतेन नस्यदम्ययुगपिङ्गनवर्तनकाला व्याख्याताः । ३४ ।

क्षीरद्रोणे गवां घृतप्रस्थः, पञ्चभागाधिको महिषीणाम्, द्विभागाधिकोऽजावीनाम् । ३५ । मन्थो वा सर्वेषां प्रमाणम् । ३६ । भूमितृणोदकविशेषाद्धि क्षीरघृतवृद्धिर्भवति । ३७ ।

२५ स्वाभाविक कारणाने जनावर मेल्यास गाई व म्हशी यांचे चिन्हांकित चामडे, बकऱ्या व मेंढ्या यांच्या कानावरील खूण, घोडे, खेचर आणि उंट यांचे शेपूट व चिन्हांकित चामडे आणि (सर्वांचे) केस, चामडे, मूत्राशय, पित्ताशय, स्नायू, दात, खूर, शिंगे आणि हाडे आणून द्यावीत. २६ मांस, ताजे किंवा सुकविलेले, विकून टाकावे.

२७ ताक, कुत्रे व डुकरे यांना द्यावे. २८ पनीर सैनिकांच्या भोजनात उपयोगासाठी आणून द्यावे. २९ नासलेल्या दुधाचा घाणीतून निघालेली पेंड ओली करण्यासाठी उपयोग करावा.

३० पशू विकणाऱ्याने दर जनावरामागे पाव पण द्यावा.

३१ वर्षा, शरद व हेमंत ह्या ऋतूंत दोन वेळा दूध काढावे, शिशिर, वसंत व ग्रीष्म ह्या ऋतूंत फक्त एक वेळ. ३२ त्या ऋतूंत जो दुसऱ्या वेळेस दूध काढील त्याला आंगठा कापण्याची शिक्षा करावी. ३३ दूध काढण्याची वेळ टाळणाऱ्यास दुधाच्या झालेल्या नुकसानीइतका दंड करावा. ३४ हाच नियम बैलाला वेसण घालणे, त्याचे दमन करणे, त्याला गाडीला जुंपणे व (घाणीभोवती) गोल फिरायला लावणे यांच्यासाठी योग्य वेळ टळून गेल्यासही लावावा.

३५ एक द्रोण गाईच्या दुधापासून एक प्रस्थ तूप निघते, म्हशीच्या दुधापासून एकपंचमांश अधिक निघते, शेळ्या व मेंढ्या यांच्या दुधापासून एकद्वितियांशाइतके अधिक निघते. ३६ किंवा सर्वांच्या बाबतीत ताक घुसळल्यावर प्रत्यक्ष जेवढे निघेल तेवढे प्रमाण मानावे. ३७ कारण, जमीन, गवत आणि पाणी ही उत्कृष्ट असली म्हणजे दुधात व तुपात वाढ होते.

यूथवृषं वृषेणावपातयतः पूर्वः साहसदण्डः, घातयत उत्तमः । ३८ । वर्णावरोधेन दशतीरक्षा । ३९ । उपनिवेशदिग्विभागो गोप्रचाराद् बलान्वयतो वा गवां रक्षासामर्थ्याच्च । ४० ।

अजावीनां षाण्मासिकीमूर्णां ग्राहयेत् । ४१ ।

तेनाश्वखरोष्ट्रवराहव्रजा व्याख्याताः । ४२ ।

बलीवर्दानां नस्याश्वभद्रगतिवाहिनां यवसस्यार्धभारस्तृणस्य द्विगुणं, तुला घाणपिण्याकस्य, दशाढकं कणकुण्डकस्य, पञ्चपलिकं मुखलवणं, तैलकुडुबो नस्यं प्रस्थः पानं, मांसतुला, दध्नश्चाढकं, यवद्रोणं माषाणां वा पुलाकः, क्षीरद्रोणमर्धाढकं वा सुरायाः स्नेहप्रस्थः क्षारदशपलं शृङ्गिबेरपलं च प्रतिपानम् । ४३ । पादोनमश्वतरगोखराणां, द्विगुणं महिषोष्ट्राणाम् । ४४ । कर्मकरबलीवर्दानां पायनार्थानां च धेनूनां कर्मकालतः फलतश्च विधादानम् । ४५ । सर्वेषां तृणोदकप्राकाम्यम् । ४६ ।

३८ कळपातील बैलाला दुसऱ्या बैलाकडून खाली लोळविणाऱ्यास प्रथम साहसदंड करावा, त्याच्या मृत्यूस कारणीभूत होणाऱ्यास उत्तम साहसदंड करावा

३९ वर्णाच्या (रंगाच्या अथवा जातीच्या) अनुरोधाने दहा दहा जनावरांचे गट पाडून त्यांचे रक्षण करावे. ४० गोठ्यातील जागेची विभागणी गाईंच्या हालचालीला अनुरूप अथवा त्यांच्या संख्येला अनुसरून आणि गाईंचे रक्षण करण्याच्या शक्त्यनुसार करावी.

४१ बकऱ्या-मेंढ्यांची लोकर सहा सहा महिन्यांनी काढून घ्यावी.

४२ घोडे, गाढव, उंट व डुकरे यांच्या कळपांच्या बाबतीतही हेच नियम समजावेत.

४३ वेसण घातलेल्या आणि भद्र अश्वाच्या गतीने चालणाऱ्या बैलांसाठी अर्धा भार घास, त्याच्या दुप्पट गवत, घाणीची पेंड एक तुला, कणीकोंडा दहा आढक, सैंधव पाच पल, एक कुडुव तेल नाकात घालण्यासाठी व एक प्रस्थ पिण्यासाठी, मांस एक तुला व एक आढक दही, एक द्रोण जव किंवा अर्धकच्चे शिजविलेले उडीद, एक द्रोण दूध किंवा अर्धा आढक मद्य, एक प्रस्थ तेल किंवा तूप, दहा पल क्षार (गूळ आदी) आणि एक पल आले प्रतिपान म्हणून (इतका आहार द्यावा). ४४ खेचर, गाई व गाढव यांसाठी पाऊणपट आणि म्हशी व उंट यांसाठी दुप्पट. ४५ कामास जुंपलेल्या बैलांना आणि वासरांना पाजणाऱ्या गाईंना (अनुक्रमे) कामाच्या प्रमाणात व दुधाच्या प्रमाणात शिधा द्यावा. ४६ सर्वांना गवत व पाणी हवे तेवढे द्यावे.

इति गोमण्डलं व्याख्यातम् । ४७ ।

पञ्चर्षभं खराश्वानामजावीनां दशर्षभम् ।
शत्यं गोमहिषोष्ट्राणां यूथं कुर्याच्चतुर्वृषम् ।। ४८ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे गोऽध्यक्षः एकोनत्रिंशोऽध्यायः । आदितः पञ्चाशः ।

३०

[ सप्तचत्वारिंशं प्रकरणम् – अश्वाध्यक्षः ]

अश्वाध्यक्षः पण्यागारिकं क्रयोपागतमाहवलब्धमाजातं साहाय्यागतकं पणस्थितं यावत्कालिकं वाऽश्वपर्यग्रं कुलवयोवर्णचिह्नवर्गागमैर्लेखयेत् । १ । अप्रशस्तन्यङ्गव्याधितांश्चावेदयेत् । २ ।

कोशकोष्ठागाराभ्यां च गृहीत्वा मासलाभमश्ववाहश्चिन्तयेत् । ३ ।

अश्वविभवेनायतामश्वायामद्विगुणविस्तारां चतुर्द्वारोपावर्तनमध्यां सप्रग्रीवां प्रद्वारासनफलकयुक्तां वानरमयूरपृषतनकुलचकोरशुकसारिकाकीर्णां शालां

४७ याप्रमाणे गाईंच्या कळपांविषयी सांगितले.

४८ गाढव व घोडे यांच्या शंभराच्या कळपात पाच नर ठेवावेत, बकऱ्या व मेंढ्या यांच्या शंभराच्या कळपात दहा नर आणि गाई, म्हशी व उंट यांच्या शंभराच्या कळपात चार नर ठेवावेत.

## तिसावा अध्याय

### प्रकरण ४७ : अश्वाध्यक्ष (अश्वशाळेचा प्रमुख)

१ घोड्यांच्या पागांवरील मुख्य अध्यक्षाने भेट म्हणून आलेले, विकत घेतलेले, लढाईत मिळालेले, पागांत जन्मलेले, मदतीसाठी मित्र राज्याकडून आलेले, तहाच्या अटीनुसार राहिलेले, तात्पुरते घेतलेले याप्रमाणे सर्व घोड्यांची नोंद त्यांचे कुल, वय, रंग, चिन्ह, वर्ग आणि उद्‌गमस्थान यांच्या निर्देशासह लेखी करून घ्यावी. २ आणि जे घोडे चांगले नसतील अथवा पंगू किंवा रोगी असतील त्यांची माहिती (राजाला) द्यावी.

३ घोड्याच्या खिजमतगाराने तिजोरीतून व कोठारातून महिन्याला लागणारे द्रव्य व पदार्थ आणून त्यांची नीट काळजी घ्यावी.

४ घोड्यांच्या संख्येच्या प्रमाणात लांब, घोड्याच्या लांबीच्या दुप्पट रुंद, चार दरवाजे व मध्ये घोड्यांना लोळण्यासाठी मोकळी जागा असलेली, सभोवती लाकडी कुंपण असलेली, दरवाजाजवळ बसण्यासाठी लाकडी फळ्या असलेली,

निवेशयेत् । ४ । अश्वायामचतुरश्रश्लक्ष्णफलकास्तारं सखादनकोष्ठकं समूत्रपुरीषोत्सर्गमेकैकशः प्राङ्मुखमुदङ्मुखं वा स्थानं निवेशयेत् । ५ । शालावशेन वा दिग्विभागं कल्पयेत् । ६ । वडवावृषकिशोराणामेकान्तेषु । ७ ।

वडवायाः प्रजातायास्त्रिरात्रं घृतप्रस्थः पानम् । ८ । अत ऊर्ध्वं सक्तुप्रस्थः स्नेहभैषज्यप्रतिपानं दशरात्रम् । ९ । ततः पुलाको यवसमार्तवश्चाहारः । १० ।

दशरात्रादूर्ध्वं किशोरस्य घृतचतुर्भागः सक्तुकुडुबः क्षीरप्रस्थश्चाहार आ षण्मासात् । ११ । ततः परं मासोत्तरमर्धवृद्धिर्यवप्रस्थ आ त्रिवर्षात्, द्रोण आ चतुर्वर्षात् । १२ । अत ऊर्ध्वं चतुर्वर्षः पञ्चवर्षो वा कर्मण्यः पूर्णप्रमाणः । १३ ।

द्वात्रिंशदङ्गुलं मुखमुत्तमाश्वस्य, पञ्चमुखान्यायामो, विंशत्यङ्गुला जङ्घा, चतुर्जङ्घ उत्सेधः । १४ । त्र्यङ्गुलावरं मध्यमावरयोः । १५ । शताङ्गुलः परिणाहः । १६ । पञ्चभागावरो मध्यमावरयोः । १७ ।

वानर, मोर, काळवीट, मुंगूस, चकोर, पोपट व मैना यांनी गजबजलेली अशी पागा बांधून घ्यावी. ५ प्रत्येक घोडयासाठी स्वतंत्र, घोडयाच्या लांबीच्या प्रमाणात चौरस, गुळगुळीत फळयांची तक्तपोशी केलेला, खाण्याच्या दाणाचाऱ्यासाठी जागा व मलमूत्र निघून जाण्याची सोय असलेला, पूर्वाभिमुख अथवा उत्तराभिमुख असा तबेला तयार करून घ्यावा. ६ अथवा पागा असेल त्याप्रमाणे तबेल्याचे मुख कोणत्या दिशेला करावे ते ठरवावे. ७ घोडया, वळू आणि किशोरावस्थेतील घोडे यांच्यासाठी तबेले एका टोकाला असावेत.

८ घोडी व्याली म्हणजे तीन रात्री तिला एक प्रस्थ तूप पिण्यास द्यावे. ९ त्यानंतर दहा रात्री एक प्रस्थ भाजलेल्या जवाचे पीठ आणि तेल अथवा तूप व औषधे पिण्यासाठी याप्रमाणे द्यावे. १० त्यानंतर अर्धकच्चे शिजविलेले जव अथवा उडीद, हिरवा घास आणि ऋतुमानाप्रमाणे अनुरूप आहार द्यावा.

११ दहा दिवसांनंतर सहा महिन्याचे होईपर्यंत शिंगराचा आहार एक कुडुव भाजलेल्या जवाचे पीठ, पाव कुडुव तूप आणि एक प्रस्थ दूध असा असावा. १२ त्यानंतर एक प्रस्थ जवाने सुरुवात करून पुढे दर महिन्याला अर्ध्या प्रस्थाने तीन वर्षाचे होईपर्यंत वाढवीत जावे, पुढे चार वर्षाचे होईपर्यंत एक द्रोण जव द्यावे. १३ त्यानंतर चार किंवा पाच वर्षाचे झाले म्हणजे शिंगरू काम करण्यास योग्य होते, तेव्हा त्याची वाढ पूर्ण झालेली असते.

१४ उत्तम जातीच्या घोडयाचे तोंड बत्तीस अंगुले लांब असते, तोंडाच्या लांबीच्या पाचपट घोडयाची लांबी, जांघ वीस अंगुले, उंची जांघेच्या चौपट.

उत्तमाश्वस्य द्विद्रोणं शालिव्रीहियवप्रियङ्गूणामर्धशुष्कमर्धसिद्धं वा मुद्गमाषाणां वा पुलाकः स्नेहप्रस्थश्च, पञ्चपलं लवणस्य, मांसं पञ्चाशत्पलिकं, रसस्याढकं द्विगुणं वा दध्नः पिण्डक्लेदनार्थम्, क्षारपञ्चपलिकः सुरायाः प्रस्थः पयसो वा द्विगुणः प्रतिपानम् । १८ । दीर्घपथभारक्लान्तानां च खादनार्थं स्नेहप्रस्थोऽनुवासनं कुडुबो नस्यकर्मणः, यवसस्यार्धभारस्तृणस्य द्विगुणः षडरत्निपरिक्षेपः पुञ्जीलग्रहो वा । १९ । पादावरमेतन्मध्यमावरयोः । २० । उत्तमसमो रथ्यो वृषश्च मध्यमः । २१ । मध्यमसमश्चावरः । २२ । पादहीनं वडवानां पारशमानां च । २३ । अतोऽर्धं किशोराणां च । २४ । इति विधायोगः । २५ ।

विधापाचकसूत्रग्राहकचिकित्सकाः प्रतिस्वादभाजः । २६ ।

१५ मध्यम आणि कनिष्ठ उत्तरोत्तर तीन अंगुले कमी असतात. १६ उत्तम घोडयाच्या पोटाचा घेर शंभर अंगुले असतो. १७ मध्यम व कनिष्ठ यांचा उत्तरोत्तर एकपंचमांशाने कमी असतो.

१८ उत्तम जातीच्या घोडयासाठी (आहार )– शालि, व्रीहि, जव व प्रियंगु यांपैकी कोणतेही अर्धे कोरडे अथवा अर्धे शिजविलेले दोन द्रोण धान्य, किंवा अर्धकच्चे शिजविलेले मूग व उडीद (दोन द्रोण) आणि एक प्रस्थ तेल अथवा तूप, मीठ पाच पल, मांस पन्नास पल, कोरडे पदार्थ भिजविण्यासाठी एक आढक रस किंवा दुप्पट दही, (आणि) पाच पल (गूळ आदी) क्षार असलेले एक प्रस्थ मद्य किंवा त्याच्या दुप्पट दूध बलवर्धक पेय म्हणून. १९ लांबच्या प्रवासाने अथवा ओझ्याने थकलेल्या घोडयांना अन्न जावे म्हणून एक प्रस्थ तेलाचा वस्ती द्यावा; एक कुडुब तेल नाकात घालण्यासाठी; हिरवा चारा अर्धा भार, गवत त्याच्या दुप्पट किंवा सहा अरत्नी घेराइतक्या गवताच्या पेंडया द्याव्या. २० मध्यम व कनिष्ठ घोडयांसाठी उत्तरोत्तर याच्या पावपट आहार द्यावा. २१ मध्यम जातीचा रथाचा घोडा व वळू घोडा यांना उत्तम घोडयाप्रमाणे आहार द्यावा. २२ आणि कनिष्ठ जातीच्या त्या घोडयांना मध्यमासारखा आहार द्यावा. २३ घोडया व खेचरे यांना एकचतुर्थांश कमी आहार द्यावा. २४ किशोरांना याच्या निम्मा द्यावा. २५ ही झाली आहाराची योजना.

२६ (घोडयाचे) अन्न शिजविणारे, लगाम धरणारे व अश्वचिकित्सक यांनी ते अन्न प्रथम चाखावे.

**युद्धव्याधिजराकर्मक्षीणाः पिण्डगोचरिकाः स्युः । २७ । असमरप्रयोग्याः पौरजानपदानामर्थेन वृषा वडवास्वायोज्याः । २८ ।**

**प्रयोग्यानामुत्तमाः काम्बोजसैन्धवारट्टजवानायुजाः, मध्यमा बाह्लीकपापेयकसौवीरकतैतलाः, शेषाः प्रत्यवराः । २९ । तेषां तीक्ष्णभद्रमन्दवशेन सांनाह्यमौपवाह्यकं वा कर्म प्रयोजयेत् । ३० ।**

**चतुरश्रं कर्माश्वस्य सांनाह्यम् । ३१ ।**

**वल्गनो नीचैर्गतो लङ्घनो धोरणो नारोष्ट्रश्चौपवाह्याः । ३२ ।**

**तत्रौपवेणुको वर्धमानको यमक आलीढप्लुतः पृथुगस्त्रिकचाली च वल्गनः । ३३ ।**

**स एव शिरःकर्णविशुद्धो नीचैर्गतः, षोडशमार्गो वा । ३४ । प्रकीर्णकः प्रकीर्णोत्तरो निषण्णः पार्श्वानुवृत्त ऊर्मिमार्गः शरभक्रीडितः शरभप्लुतस्त्रितालो बाह्या-**

२७ लढाया, रोग किंवा म्हातारपण यामुळे कामास निरुपयोगी झालेल्या घोड्यांना पोटापुरते अन्न द्यावे. २८ लढाईसाठी जे निरुपयोगी झाले असतील त्यांची शहरवासी व जनपदनिवासी यांच्यासाठी घोड्यांवर वळू म्हणून योजना करावी.

२९ उपयोगात आणावयाच्या घोड्यांपैकी कांबोज, सिंधु, आरट्ट व वनायु येथे निपजलेले उत्तम, बाल्हीक, पापेयक, सौवीरक आणि तैतल मध्यम, बाकीचे कनिष्ठ. ३० ते तीक्ष्ण, भद्र किंवा मंद असतील त्या अनुरोधाने त्यांना लढाईसाठी किंवा वर बसण्यासाठी तयार करावे.

३१ लढाईसाठी घोड्याचे काम सर्व प्रकारचे असते.

३२ स्वार व्हावयाचे घोडे वल्गन (मंडलाकार फिरणारे), नीचैर्गत (हळू चालणारे), लंघन (उड्या मारीत चालणारे), धोरण (दुडक्या चालीने चालणारे) आणि नारोष्ट्र (इशारा केल्याप्रमाणे वागणारे) अशा प्रकारचे असतात.

३३ त्यापैकी वल्गन हा औपवेणुक (हातभर मंडलात फिरणारा), वर्धमानक (हातभर मंडलात उड्या मारीत जाणारा), यमक (एकाच वेळेस दोन मंडलांत धावणारा), आलीढप्लुत (एक पाय दुमडून व दुसरा पसरून उडी मारणारा), पृथुग (पुढच्या भागाने उडी मारणारा), आणि त्रिकचाली (पाठीमागच्या भागाने उडी मारणारा) अशा प्रकारचा असतो.

३४ त्याच प्रकारचा पण डोके व कान स्थिर असलेला, तो नीचैर्गत; अथवा त्याचे सोळा प्रकार आहेत. ३५ प्रकीर्णक (सर्व गतींचे मिश्रण असलेला) प्रकीर्णोत्तर (प्रकीर्णातच एक गती प्रधान असलेला), निषण्ण (पाठीचा भाग

नुवृत्तः पञ्चपाणिः सिंहायतः स्वाधूतः क्लिष्टः श्लिङ्गितो बृंहितः पुष्पाभिकीर्णश्चेति नीचैर्गतमार्गाः । ३५ ।

कपिप्लुतो भेकप्लुत एणप्लुत एकपादप्लुतः कोकिलसंचार्युरस्यो बकचारी च लङ्घनः । ३६ ।

काङ्को वारिकाङ्को मायूरोऽर्धमायूरो नाकुलोऽर्धनाकुलो वाराहोऽर्धवाराहश्चेति धोरणः । ३७ ।

संज्ञाप्रतिकारो नारोष्ट्र इति । ३८ ।

षण्णव द्वादशेति योजनान्यध्वा रथ्यानान्, पञ्च योजनान्यर्धाष्टमानि दशेति पृष्ठवाहिनामश्वानामध्वा । ३९ ।

निश्चल असलेला), पार्श्वानुवृत्त (तिरकस गतीचा), ऊर्मिमार्ग (शरीर वरखाली होत जाणारा), शरभक्रीडित (शरभासारख्या खेळकर गतीचा), शरभप्लुत (शरभासारख्या उड्या मारणारा), त्रिताल (तीन पायांवर चालणारा), बाह्यानुवृत्त (उजवीकडे व डावीकडे चालणारा), पंचपाणि (तीन पाय जमिनीवर ठेवून चौथा दोन वेळा जमिनीवर आपटणारा), सिंहायत (सिंहासारखा लांब टांगा टाकणारा), स्वाधूत (खूप लांब टांगा टाकणारा), क्लिष्ट (वर कोणी बसलेला असता स्तब्धपणे चालणारा), श्लिंगित (पुढील भाग वाकवून चालणारा), बृंहित (पुढील भाग उंचावून चालणारा), आणि पुष्पाभिकीर्ण (नागमोडी चालीचा) हे ते सोळा प्रकार.

३६ माकडासारख्या उड्या मारीत चालणारा, बेडकासारख्या उड्या मारीत चालणारा, हरणाप्रमाणे उड्या मारीत चालणारा, तीन पाय दुमडून चौथ्या पायाने उड्या मारीत जाणारा, कोकिळेप्रमाणे चालणारा, उरस्य (चारी पाय दुमडून उड्या मारणारा), आणि वगळ्याप्रमाणे चालणारा हे लंघन घोड्याचे प्रकार.

३७ सारसगती असलेला, पाण्यावरील सारसाची गती असलेला, मोराची चाल असलेला, मोराची चाल अर्धवट असलेला, नकुलाची चाल असलेला, नकुलाची चाल अर्धवट असलेला, वराहाची चाल असलेला आणि वराहाची चाल अर्धवट असलेला हे धोरण घोड्याचे प्रकार.

३८ इशारा मिळाल्याप्रमाणे वागणारा तो नारोष्ट्र घोडा.

३९ रथाचे घोडे (दिवसात) सहा, नऊ आणि बारा योजने रस्ता चालून जातात, बसावयाचे घोडे पाच, साडेसात आणि दहा योजने जातात.

**विक्रमो भद्राश्वासो भारवाह्य इति मार्गाः । ४० ।**

**विक्रमो वल्गितमुपकण्ठमुपजवो जवश्च धाराः । ४१ ।**

**तेषां बन्धनोपकरणं योग्याचार्याः प्रतिदिशेयुः सांग्रामिकं रथाश्वालंकारं च सूताः । ४२ । अश्वानां चिकित्सकाः शरीरऱ्हासवृद्धिप्रतीकारमृतुविभक्तं चाहारम् । ४३ ।**

**सूत्रग्राहकाश्वबन्धकयावसिकविधापाचकस्थानपालकेशकारजाङ्गुलीविदश्च स्वकर्मभिरश्वानाराधयेयुः । ४४ । कर्मातिक्रमे चैषां दिवसवेतनच्छेदनं कुर्यात् । ४५ । नीराजनोपरुद्धं वाहयतश्चिकित्सकोपरुद्धं वा द्वादशपणो दण्डः । ४६ । क्रियाभैषज्यसङ्गेन व्याधिवृद्धौ प्रतीकारद्विगुणो दण्डः । ४७ । तदपराधेन वैलोम्ये पत्त्रमूल्यं दण्डः । ४८ ।**

**तेन गोमण्डलं खरोष्ट्रमहिषमजाविकं च व्याख्यातम् । ४९ ।**

४० विक्रम (हळूहळू चालणे), भद्राश्वास (सावकाश श्वासोच्छ्‌वास करीत चालणे) आणि भारवाह्य (ओझे घेऊन चालणे) हे तीन मार्ग (चालण्याचे प्रकार).

४१ विक्रम (हळू चाल), वल्गित (गोल चाल), उपकण्ठ (दौड), उपजव (जलद चाल.) आणि जव (खूप वेगवान चाल) हे चालींच्या वेगाचे प्रकार.

४२ त्यांना शिकविणाऱ्या शिक्षकांनी घोड्यांच्या बंधनासाठी लागणाऱ्या उपकरणांची माहिती पुरवावी आणि सारथ्यांनी लढाईसाठी उपयोगी अशा रथाच्या घोड्यांच्या अलंकारांची माहिती द्यावी. ४३ अश्ववैद्यांनी शरीर कृश अथवा लठ्ठ झाल्यास त्यावर उपाय आणि ऋतुमानाप्रमाणे बदलता आहार याविषयी सांगावे.

४४ लगाम धरणारे, घोड्यांना बांधणारे, गवत देणारे, शिधा शिजविणारे, तबेल्यांचे रक्षक, केस शोभिवंत करणारे आणि विषवैद्य यांनी आपापले काम चोख करून घोड्यांची निगा राखावी. ४५ आणि त्यांनी कामात चुकारपणा केल्यास त्यांचे एक दिवसाचे वेतन कापून घ्यावे. ४६ नीराजनाविधीसाठी अथवा वैद्याच्या सांगण्यावरून (उपचार करण्यासाठी) बाजूला ठेवलेल्या घोड्यावर बसून जाणाऱ्यास बारा पण दंड करावा. ४७ उपचार न केल्यामुळे अथवा औषध न दिल्यामुळे रोग वाढल्यास बरे करण्यासाठी होणाऱ्या खर्चाच्या दुप्पट दंड करावा. ४८ त्यांच्या अपराधामुळे घोडा मेला तर त्या घोड्याच्या किमतीइतका दंड करावा.

४९ गाईचे कळप, गाढव, उंट, म्हशी, बकऱ्या व मेंढ्या यांच्या बाबतीतही हेच नियम लागू करावेत.

द्विरह्नः स्नानमश्वानां गन्धमाल्यं च दापयेत् ।
कृष्णसंधिषु भूतेज्याः शुक्लेषु स्वस्तिवाचनम् ॥ ५० ॥
नीराजनामाश्वयुजे कारयेन्नवमेऽहनि ।
यात्रादाववसाने वा व्याधौ वा शान्तिके रतः ॥ ५१ ॥

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे अश्वाध्यक्षः त्रिंशोऽध्यायः । आदित एकपञ्चाशः ।

## ३१

## [अष्टचत्वारिंशं प्रकरणम् – हस्त्यध्यक्षः]

हस्त्यध्यक्षो हस्तिवनरक्षां दम्यकर्मक्षान्तानां हस्तिहस्तिनीकलभानां शालास्थानशय्याकर्मविधायवसप्रमाणं कर्मस्वायोगं बन्धनोपकरणं सांग्रामिकमलंकारं चिकित्सकानीकस्थौपस्थायिकवर्गं चानुतिष्ठेत् । १ ।

हस्त्यायामद्विगुणोत्सेधविष्कम्भायामां हस्तिनीस्थानाधिकां सप्रग्रीवां कुमारीसंग्रहां प्राङ्मुखीमुदङ्मुखीं वा शालां निवेशयेत् । २ । हस्त्यायामचतुरश्रश्लक्ष्णा-

५० घोड्यांना दिवसातून दोन वेळा स्नान घालावयास आणि गंध व फुले द्यावयास लावावे. अमावास्येच्या दिवशी भूतांना बली द्यावा आणि पौर्णिमेच्या दिवशी (ब्राह्मणांकडून) स्वस्तिवाचन करून घ्यावे.

५१ आश्विन महिन्यात नवव्या दिवशी, तसेच युद्धावर निघण्यापूर्वी व युद्धाहून परत आल्यावर आणि घोडा आजारी पडल्यास शांतिकर्म करण्यासाठी म्हणून नीराजनाविधी करून घ्यावा.

## एकतिसावा अध्याय

## प्रकरण ४८ : हस्त्यध्यक्ष (हत्तींच्या पागांवरील मुख्य)

१ हत्तींवरील अध्यक्षाने हस्तिवनांच्या रक्षणाची व्यवस्था पहावी, शिक्षण दिले जाणारे आणि काम करण्यास तयार झालेले हत्ती, हत्तिणी आणि छावे यांच्यासाठी हस्तिशाळा, प्रत्येकाचे बांधावयाचे व निजण्याचे ठिकाण, कामाचे, शिध्याचे व गवताचे प्रमाण हे सर्व अमलात आणून त्याची व्यवस्था पहावी, त्यांना काम लावून देणे, त्यांना बांधण्यासाठीं उपकरणे आणि युद्धोपयोगी अलंकार व्यवस्थित ठेवणे आणि वैद्य, माहूत (अथवा शिक्षक) व इतर नोकरवर्ग यांच्यावर देखरेख ठेवणे ही कामे करावीत.

२ हत्तीच्या लांबीच्या दुप्पट उंची, रुंदी व लांबी असलेला, हत्तिणींसाठी स्वतंत्र जागा असलेला, सभोवती लाकडी कुंपण असलेला, खुंट्यावर आडवे दांडे असलेला असा हत्तीखाना पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख बांधून घ्यावा.

लानस्तम्भफलकास्तरकं समूत्रपुरीषोत्सर्गं स्थानं निवेशयेत् । ३ । स्थानसमां शय्यामर्धापाश्रयां दुर्गे सांनाह्यौपवाह्यानां बहिर्दम्यव्यालानाम् । ४ ।

प्रथमसप्तमावष्टमभागावह्नः स्नानकालौ, तदनन्तरं विधायाः । ५ । पूर्वाह्णे व्यायामकालः, पश्चाह्नः प्रतिपानकालः । ६ । रात्रिभागौ द्वौ स्वप्नकालौ, त्रिभागः संवेशनोत्थानिकः । ७ ।

ग्रीष्मे ग्रहणकालः । ८ । विंशतिवर्षो ग्राह्यः । ९ । विक्को मोढो मक्कणो व्याधितो गर्भिणी धेनुका हस्तिनी चाग्राह्याः । १० ।

सप्तारत्निरुत्सेधो नवायामो दश परिणाहः प्रमाणतश्चत्वारिंशद्वर्षो भवत्युत्तमः, त्रिंशद्वर्षो मध्यमः, पञ्चविंशतिवर्षोऽवरः । ११ । तयोः पादावरो विधाविधिः । १२ ।

अरत्नौ तण्डुलद्रोणः, अर्धाढकं तैलस्य, सर्पिषस्त्रयः प्रस्थाः, दशपलं लवणस्य, मांसं पञ्चाशत्पलिकं, रसस्याढकं द्विगुणं वा दध्नः पिण्डक्लेदनार्थं, क्षारदशपलिकं

३ त्यात हत्तीच्या लांबीइतकी लांबरुंद, गुळगुळीत लाकडाचा बांधावयाचा खांब व गुळगुळीत फळ्यांची जमीन असलेली, मलमूत्र निघून जाण्याची सोय असलेली (प्रत्येक हत्तीसाठी स्वतंत्र) जागा करावी. ४ तेवढ्याच आकाराचे पण उंचीने त्याहून निम्मे असे निजण्याचे ठिकाण दुर्गात युद्धोपयोगी व स्वारीच्या हत्तींसाठी आणि दुर्गाच्या बाहेर शिकत असणारे व मस्त झालेले हत्ती यांच्यासाठी तयार करावे.

५ दिवसाचे पहिले व सातवे एकअष्टमांश भाग ह्या हत्तींच्या स्नानाच्या वेळा, त्यानंतर भोजनाच्या वेळा. ६ पूर्वाण्ह हा व्यायामाचा काल, अपराण्ह हा बलवर्धक पानाचा काल. ७ रात्रीचे दोन भाग झोपण्यासाठी वेळ, एक-तृतीयांश भाग निजण्यासाठी व उठण्यासाठी लागणारा वेळ.

८ ग्रीष्म हा हत्ती पकडण्यासाठी योग्य ऋतू. ९ वीस वर्षे वयाचा हत्ती पकडण्यास योग्य. १० वच्चा, (हत्तिणीप्रमाणे) लहान दात असलेला, दंतहीन किंवा रोगी हत्ती, गाभण व दुभती हत्तीण यांना पकडू नये.

११ सात हात उंची, नऊ हात लांब, दहा हात पोटाचा घेर इतकी मापे असलेला चाळीस वर्षांचा हत्ती उत्तम, तीस वर्षांचा मध्यम व पंचवीस वर्षांचा कनिष्ठ. १२ त्यांच्या खुराकाचे प्रमाण पाव पाव हिश्शाने कमी करावे.

१३ (उंचीच्या) प्रत्येक अरत्नीसाठी खुराक – एक द्रोण तांदूळ, अर्धा आढक तेल, तीन प्रस्थ तूप, दहा पल मीठ, पन्नास पल मांस, कोरडे पदार्थ भिजविण्यासाठी अर्धा आढक रस अथवा त्याच्या दुप्पट दही, दहा पल (गूळ आदी) क्षार, एक

मद्यस्याढकं द्विगुणं वा पयसः प्रतिपानं, गात्रावसेकस्तैलप्रस्थः, शिरसोऽष्टभागः प्रादीपिकश्च, यवसस्य द्वौ भारौ सपादौ, शष्पस्य शुष्कस्यार्धतृतीयो भारः, कडङ्करस्यानियमः । १३ । सप्तारत्निना तुल्यभोजनोऽष्टारत्निरत्यरालः । १४ । यथाहस्तमवशेषः षडरत्निः पञ्चारत्निश्च । १५ ।

क्षीरयावसिको विक्कः क्रीडार्थं ग्राह्यः । १६ ।

संजातलोहिता प्रतिच्छन्ना संलिप्तपक्षा समकक्ष्या व्यतिकीर्णमांसा समतल्पतला जातद्रोणिकेति शोभाः । १७ ।

शोभावशेन व्यायामं भद्रं मन्दं च कारयेत् ।
मृगं संकीर्णलिङ्गं च कर्मस्वृतुवशेन वा ॥ १८ ॥

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे हस्त्यध्यक्षः एकत्रिंशोऽध्यायः । आदितो द्विपञ्चाशः ।

## ३२

## [ अष्टचत्वारिंशं प्रकरणम् – हस्त्यध्यक्षः, तत्र हस्तिप्रचारः ]

कर्मस्कन्धाश्चत्वारो दम्यः सांनाह्य औपवाह्यो व्यालश्च । १ ।

आढक मद्य किंवा दुप्पट दूध बलवर्धक पेय म्हणून, अंगाला चोपडण्यासाठी एक प्रस्थ तेल, त्याच्या एकअष्टमांश तेल डोक्याला लावण्यासाठी व दिव्यासाठी, हिरवा चारा सव्वादोन भार, वाळलेले गवत अडीच भार; वृक्षवेलींच्या पानांविषयी काही मर्यादा नसावी. १४ सात अरत्नी उंच हत्तीच्या इतकाच खुराक आठ अरत्नी उंच हत्तीला त्याची मदावस्था संपल्यानंतर द्यावा. १५ सहा अरत्नी व पाच अरत्नी उंच ह्या बाकीच्या हत्तींना अरत्नीच्या प्रमाणात खुराक द्यावा.

१६ दूध व हिरवा चारा खाणारे हत्तीचे पिल्लू खेळण्यासाठी पकडावे.

१७ लाली अंगावर आली आहे अशी, (मांसाने) झाकलेली, दोन्ही बाजूला तुळतुळीत झालेली, घेर सारखा असलेली, मांस एकसारखे भरलेली, पाठीच्या कण्याबरोबर मांस असलेली आणि द्रोणासारखे खोलवे आलेली अशा ह्या सात (हत्तीच्या अवस्थांच्या सूचक) शोभा होत.

१८ ह्या शोभांच्या अनुरोधाने भद्र व मंद हत्तीला, तसेच मिश्र गुणांच्या हत्तीला निरनिराळ्या कामांसाठी शिक्षण घ्यावयास लावावे, किंवा ऋतुमानाप्रमाणे (ते शिक्षण द्यावे)

## बत्तिसावा अध्याय

## प्रकरण ४८ (पुढे चालू) : हत्तींचे कार्य

१ कामाच्या अनुरोधाने हत्तींचे चार वर्ग पडतात – ज्याला शिकविले जात आहे असा, युद्धोपयोगी, स्वारीच्या उपयोगाचा आणि दुष्ट झालेला.

**तत्र दम्यः पञ्चविधः स्कन्धगतः स्तम्भगतो वारिगतोऽवपातगतो यूथगतश्चेति । २ । तस्योपविचारो विक्ककर्म । ३ ।**

**सांनाह्यः सप्तक्रियापथ उपस्थानं संवर्तनं संयानं वधावधो हस्तियुद्धं नागरायणं सांग्रामिकं च । ४ । तस्योपविचारः कक्ष्याकर्म ग्रैवेयकर्म यूथकर्म च । ५ ।**

**औपवाह्योऽष्टविध आचरणः कुञ्जरौपवाह्यो धोरण आधानगतिको यष्ट्युपवाह्यस्तोत्रोपवाह्यः शुद्धोपवाह्यो मार्गयुकश्चेति । ६ । तस्योपविचारः शारदकर्म हीनकर्म नारोष्ट्रकर्म च । ७ ।**

२ त्यांपैकी शिकवून तयार केला जात असलेला हत्ती पाच प्रकारचा आहे. खांद्यावर मनुष्याला बसू देण्याची सवय केली जात असलेला, खुंटाला बांधू देण्याची सवय केली जात असलेला, हत्ती पकडतात त्या जागी जाण्याची सवय होत असलेला, खड्ड्यात जाण्याची सवय होत असलेला आणि कळपाची सवय केली जाणारा. ३ त्यावेळेस त्याला वागवावयाचे ते लहान छाव्याला वागवितात त्याप्रमाणे वागवावे.

४ युद्धोपयोगी हत्ती सात प्रकारची कामे करू शकतो – उपस्थान (पुढचा व मागचा भाग टेकणे व उचलणे, कोलीत, वांबू, दोर इत्यादीवरून उडी मारणे), संवर्तन (जमिनीवर निजणे, वसणे, खड्ड्यावरून वगैरे उडी मारणे), संयान (सरळ, तिरकस, नागमोडी, गोल इत्यादी प्रकारे चाल करणे), वधावध (घोडे, माणसे अथवा रथ सोंडेने अथवा दातांनी नष्ट करणे अथवा पकडणे), हस्तियुद्ध (दुसऱ्या हत्तीशी लढणे), नागरायण (नगराच्या तटबंदीची मोडतोड करणे) आणि सांग्रामिक (युद्धात भाग घेणे). ५ त्यावेळी कमरेला पट्टा बांधणे, गळ्यात साखळदंड बांधणे आणि कळपाबरोबर रहाणे ह्या कामांची सवय करून घेतलेली असावी.

६ स्वारीसाठी उपयुक्त हत्ती आठ प्रकारचा – आचरण (पुढचा किंवा मागचा भाग खाली टेकणारा), कुंजरौपवाह्य (दुसऱ्या हत्तीबरोबर जाणारा), धोरण (दुडक्या गतीने चालणारा), आधानगतिक (दोन किंवा तीन प्रकारच्या गतींनी चालणारा), यष्ट्युपवाह्य (काठीने चालविला जाणारा), तोत्रोपवाह्य (अंकुशाने चालविला जाणारा), शुद्धोपवाह्य (स्वतः होऊनच चालणारा) आणि मार्गयुक (मृगयेसाठी वापरला जाणारा) ७ त्यावेळी त्याची शरीरप्रकृती उत्तम ठेवणे, त्याच्यात काही कमतरता असल्यास ती दूर करणे, आणि इशाऱ्यावरहुकूम वागावयास लावणे ह्या गोष्टी कराव्यात.

व्याल एकक्रियापथः शङ्कितोऽवरुद्धो विषमः प्रभिन्नः प्रभिन्नविनिश्चयो मदहेतुविनिश्चयश्च । ८ । तस्योपविचार आयम्यैकरक्षाकर्म । ९ । क्रियाविपन्नो व्यालः शुद्धः सुव्रतो विषमः सर्वदोषप्रदुष्टश्च । १० ।

तेषां बन्धनोपकरणमनीकस्थप्रमाणम् । ११ । आलानग्रैवेयकक्ष्यापारायण-परिक्षेपोत्तरादिकं बन्धनम् । १२ । अङ्कुशवेणुयन्त्रादिकमुपकरणम् । १३ । वैजयन्तीक्षुरप्रमालास्तरणकुथादिकं भूषणम् । १४ । वर्मतोमरशरावापयन्त्रादिकः सांग्रामिकालंकारः ।१५ ।

चिकित्सकानीकस्थारोहकाधोरणहस्तिपकौपचारिकविधापाचकयावसिकपाद-पाशिककुटीरक्षकौपशायिकादिरौपस्थायिकवर्गः । १६ । चिकित्सककुटीरक्षविधा-पाचकाः प्रस्थौदनं स्नेहप्रसृतिं क्षारलवणयोश्च द्विपलिकं हरेयुः, दशपलं मांसस्य, अन्यत्र चिकित्सकेभ्यः । १७ । पथिव्याधिकर्ममदजराभितप्तानां चिकित्सकाः प्रतिकुर्युः । १८ ।

८ दुष्ट हत्ती एकच प्रकारची क्रिया करतो. भ्यालेला, कोंडून ठेवलेला, स्वभावतः दुष्ट, मद स्रवू लागणारा, मदस्राव निश्चित असणारा आणि मत्त होण्याचे कारण निश्चित असणारा (असे दुष्ट हत्तींचे प्रकार आहेत). ९ त्यावेळेस त्याला (एके ठिकाणी) बांधून ठेवून एकट्यावर पहारा ठेवावा. १० कोणतेही काम न करणारा दुष्ट हत्ती शुद्ध (अठरा दोषांनी युक्त), सुव्रत (पंधरा दोषांनी युक्त), विषम (तेहतीस दोषांनी युक्त) आणि सर्वदोषप्रदुष्ट (बावन दोषांनी युक्त) असा चार प्रकारचा आहे.

११ त्यांना बांधावयाची व इतर उपकरणे शिक्षकांच्या सांगण्याप्रमाणे करावीत. १२ बांधावयाचा खांब, गळ्यातील साखळदंड, कमरेचा पट्टा, चढण्यासाठी धरावयाचा दोर, पायबंद, दुसरी साखळी इत्यादी ही बांधावयाची उपकरणे. १३ अंकुश, वेणू, यंत्र इत्यादी ही उपकरणे. १४ वैजयंतीमाला, क्षुरप्रमाला (नक्षत्रमाला), झूल, गालिचा इत्यादी ही भूषणे. १५ कवच, भाला, बाणांचा भाता, यंत्रे इत्यादी ही युद्धोपयोगी उपकरणे.

१६ गजवैद्य, शिक्षक, स्वार होणारा माहूत, पहारेकरी, सजविणारा, अन्न शिजविणारा, गवत घालणारा, पाय बांधणारा, तबेल्याचा रक्षक, रात्रीचा सेवक इत्यादी हा नोकरवर्ग. १७ वैद्य, तबेल्याचा रक्षक आणि अन्न शिजविणारा यांनी एक प्रस्थ भात, पसाभर तेल अथवा तूप, (गूळ आदी) क्षार व मीठ प्रत्येकी दोन पल आणि वैद्याखेरीज इतर दोघांनी दहा पल मांस घ्यावे. १८ लांबच्या प्रवासाने, व्याधीने, मेहनतीच्या कामाने, मदस्रावाने अथवा म्हातारपणामुळे थकलेल्या व गांजलेल्या हत्तींच्या बाबतीत गजवैद्याने उपाययोजना करावी.

**स्थानस्याशुद्धिर्यवसस्याग्रहणं स्थले शायनमभागे घातः परारोहणमकाले यानमभूमावतीर्थेऽवतारणं तरुषण्ड इत्यत्ययस्थानानि । १९ । तमेषां भक्तवेतनादाददीत । २० ।**

**तिस्रो नीराजनाः कार्याश्चातुर्मास्यर्तुसंधिषु ।**
**भूतानां कृष्णसंधीज्याः सेनान्यः शुक्लसंधिषु ।। २१ ।।**
**दन्तमूलपरीणाहद्विगुणं प्रोज्झ्य कल्पयेत् ।।**
**अब्दे द्वयर्धे नदीजानां पञ्चाब्दे पर्वतौकसाम् ।। २२ ।।**

**इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे हस्त्यध्यक्षे हस्तिप्रचारः द्वात्रिंशोऽध्यायः । आदितस्त्रिपञ्चाशः ।**

## ३३

## [ एकोनपञ्चाशं प्रकरणम् – रथाध्यक्षः ; पञ्चाशं प्रकरणम् – पत्त्यध्यक्षः ; एकपञ्चाशं प्रकरणम् – सेनापतिप्रचारः ]

**अश्वाध्यक्षेण रथाध्यक्षो व्याख्यातः । १ । स रथकर्मान्तान् कारयेत् । २ ।**

१९ तबेला अस्वच्छ ठेवणे, खुराक (कोठारातून) न घेणे, हत्तीला उघड्या जमिनीवर निजावयास लावणे, नको त्या भागावर प्रहार करणे, दुसऱ्याला वर वसू देणे, भलत्या वेळी बाहेर घेऊन जाणे, भलत्या ठिकाणी घेऊन जाणे, उतार नाही अशा जागी पाण्यात उतरविणे, आणि दाट झाडीत नेणे हे नोकरवर्गास अपराधाबद्दल दंड करण्याचे प्रसंग. २० तो त्यांच्या अन्नपाण्यातून व पगारातून वसूल करून घ्यावा.

२१ चार चार महिन्यांनी येणाऱ्या ऋतूंच्या संधींच्या दिवशी (कार्तिकी, फाल्गुनी व आषाढी पौर्णिमेस वर्षातून) तीनदा नीराजनाविधी करावा. दर अमावास्येला भुताना व दर पौर्णिमेला कार्तिकेयाला बली अर्पण करावा.

२२ दातांच्या मुळाशी असलेल्या घेराच्या दुप्पट लांब भाग सोडून बाकीचे दात कापावेत – नदीकाठच्या हत्तींचे दर अडीच वर्षांनी व पर्वतावरील हत्तींचे दर पाच वर्षांनी.

## तेहतिसावा अध्याय

### प्रकरण ४९ : रथाध्यक्ष (रथांवरील मुख्य अधिकारी)
### प्रकरण ५० : पत्त्यध्यक्ष ( पायदळाचा मुख्य)
### प्रकरण ५१ : सेनापतीचे कार्य

१ रथावरील अध्यक्षाची कर्तव्ये अश्वाध्यक्षाच्या कर्तव्याप्रमाणेच समजावीत. २ त्याने रथ बनविण्याचे कारखाने स्थापावेत.

**दशपुरुषो द्वादशान्तरो रथः । ३ । तस्मादेकान्तरावरा आ षडन्तरादिति सप्त रथाः । ४ ।**

**देवरथपुष्यरथसांग्रामिकपारियाणिकपरपुराभियानिकवैनयिकांश्च रथान् कारयेत् । ५ ।**

**इष्वस्त्रप्रहरणावरणोपकरणकल्पनाः सारथिरथिकरथ्यानां च कर्मस्वायोगं विद्यात्, आ कर्मभ्यश्च भक्तवेतनं भृतानामभृतानां च योग्यारक्षानुष्ठानमर्थमानकर्म च । ६ ।**

**एतेन पत्त्यध्यक्षो व्याख्यातः । ७ । स मौलभृतश्रेणिमित्रामित्राटवीबलानां सारफल्गुतां विद्यात्, निम्नस्थलप्रकाशकूटखनकाकाशदिवारात्रियुद्धव्यायामं च, आयोगमयोगं च कर्मसु । ८ ।**

३ दहा पौरुष (अदमासे साडेसात फूट) उंच व बारा पौरुष लांब असा रथ (सर्वात मोठा). ४ लांबीला त्यापेक्षा एक एक पौरुष कमी होत जाणारे – सहा पौरुष लांबीपर्यंत – असे एकंदर सात आकाराचे रथ.

५ देवाच्या मिरवणुकीसाठी, समारंभासाठी, युद्धासाठी, प्रवासासाठी, शत्रूच्या नगरावर हल्ला करण्यासाठी आणि रथाचे शिक्षण देण्यासाठी – याप्रमाणे रथ तयार करून घ्यावेत.

६ बाण, शस्त्रे, कवच आणि उपकरणे यांची व्यवस्था आणि सारथी, रथावरील योद्धा व रथाचे घोडे यांची आपापल्या कामात योजना – हे रथाध्यक्षाने जाणून घ्यावे, तसेच पगारावर नेमलेल्या व हंगामी नोकरांच्या अन्नपाण्याची व मजुरीची कामे संपेपर्यंतची व्यवस्था पहाणे आणि त्यांना उचित संरक्षण व बक्षीस देऊन सन्मान करणे – इकडेही त्याने लक्ष पुरविले पाहिजे.

७ पायदळावरील अध्यक्षाची कर्तव्ये याप्रमाणेच समजावीत. ८ पूर्वापार परंपरेने आलेले सैन्य, पगारी सैन्य, श्रेणींचे सैन्य, मित्रराज्याचे सैन्य, शत्रुराज्यातील सैन्य व अरण्यवासीयांचे सैन्य, ह्या सैन्यांची श्रेष्ठता-कनिष्ठता याचे ज्ञान पत्त्यध्यक्षाला असले पाहिजे, तसेच पाण्यातील व जमिनीवरील युद्ध, प्रकाश व कूट युद्ध, खंदकातील व उघड्यावरील युद्ध, दिवसाचे व रात्रीचे युद्ध यांत होणाऱ्या सैनिकांच्या हालचाली, आणि त्यांची निरनिराळ्या कामांवर योजना किंवा त्या योजनेचा अभाव यांचेही त्याला ज्ञान असले पाहिजे.

**तदेव सेनापतिः सर्वयुद्धप्रहरणविद्याविनीतो हस्त्यश्वरथचर्यासंघुष्टश्चतुरङ्गस्य बलस्थानुष्ठानाधिष्ठानं विद्यात् । ९ । स्वभूमिं युद्धकालं प्रत्यनीकमभिन्नभेदनं भिन्नसंधानं संहतभेदनं भिन्नवधं दुर्गवधं यात्राकालं च पश्येत् । १० ।**

**तूर्यध्वजपताकाभिर्व्यूहसंज्ञाः प्रकल्पयेत् ।**
**स्थाने याने प्रहरणे सैन्यानां विनये रतः ।। ११ ।।**

**इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे रथाध्यक्षः पत्त्यध्यक्षः सेनापतिप्रचारश्च त्रयस्त्रिंशोऽध्यायः। आदितश्चतुष्पञ्चाशः ।**

## ३४

## [ द्विपञ्चाशं प्रकरणम् – मुद्राध्यक्षः; त्रिपञ्चाशं प्रकरणम् विवीताध्यक्षः ]

**मुद्राध्यक्षो मुद्रां माषकेण दद्यात् । १ ।**

**समुद्रो जनपदं प्रवेष्टुं निष्क्रमितुं वा लभेत । २ । द्वादशपणममुद्रो जानपदो दद्यात् । ३ । कूटमुद्रायां पूर्वः साहसदण्डः, तिरोजनपदस्योत्तमः । ४ ।**

९ सर्व प्रकारची युद्धे व शस्त्रविद्या यांत निष्णात असलेल्या व हत्ती, घोडा किंवा रथ चालविण्याविषयी प्रख्यात असलेल्या सेनापतीला सुध्दा हेच ज्ञान असले पाहिजे, तसेच त्याने चार प्रकारच्या सैन्यांच्या कामगिरीवर देखरेख करण्याचे काम पार पाडले पाहिजे. १० स्वतःच्या सैन्याला लढण्यासाठी योग्य भूमी, योग्य युद्धकाल, शत्रुसैन्याच्या विरुद्ध सैन्यरचना करणे, शत्रुसैन्याची फळी मोडणे, मोडलेली आपली फळी पुन्हा जोडणे, जोडलेली शत्रूची फळी पुन्हा तोडणे, फळी तुटलेल्या सैन्याचा नाश करणे, दुर्गाचा नाश करणे आणि मोहिमेवर निघण्यास योग्य काल, या गोष्टींकडे त्याने लक्ष दिले पाहिजे.

११ सैन्याच्या शिक्षणाविषयी दक्ष असलेल्या सेनापतीने सैन्याचा तळ असताना, ते कूच करीत असताना व हल्ला करीत असताना वाद्ये, (मोठे) ध्वज व (लहान) पताका यांच्या साह्याने व्यूहरचनेसंबंधीच्या खुणा ठरवून द्याव्यात.

## चौतिसावा अध्याय

## प्रकरण ५२ : मुद्राध्यक्ष (मुद्रांवरील अधिकारी)

## प्रकरण ५३ : विवीताध्यक्ष (कुरणांवरील अधिकारी)

१ मुद्राध्यक्षाने एका माषकाला मोहोरबंद परवाना द्यावा.

२ मोहोरबंद परवाना असलेला मनुष्यच जनपदात प्रवेश करू शकेल किंवा त्यातून बाहेर जाऊ शकेल. ३ परवाना नसलेल्या स्वदेशीयाने बारा पण दंड

**विवीताध्यक्षो मुद्रां पश्येत् ।५। ग्रामान्तरेषु च विवीतं स्थापयेत् ।६। चोरव्यालभयान्निम्नारण्यानि शोधयेत् ।७। अनुदके कूपसेतुबन्धोत्सान् स्थापयेत्, पुष्पफलवाटांश्च ।८।**

**लुब्धकश्वगणिनः परिव्रजेयुररण्यानि ।९। तस्करामित्राभ्यागमे शङ्खदुन्दुभि-शब्दमग्राह्याः कुर्युः शैलवृक्षाधिरूढा वा शीघ्रवाहना वा ।१०।**

**अमित्राटवीसंचारं च राज्ञो गृहकपोतैर्मुद्रायुक्तैर्हारयेत्, धूमाग्निपरम्परया वा ।११।**

**द्रव्यहस्तिवनाजीवं वर्तनीं चोररक्षणम् ।**
**सार्थातिवाह्यं गोरक्ष्यं व्यवहारं च कारयेत् ॥ १२ ॥**

**इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे मुद्राध्यक्षः विवीताध्यक्षश्च चतुस्त्रिंशोऽध्यायः ।**
**आदितः पञ्चपञ्चाशः ।**

द्यावा. ४ परवाना बनावट असल्यास प्रथम साहसदंड करावा, परदेशातील मनुष्यास उत्तम साहसदंड करावा.

५ (गुरचराईच्या कुरणांवरील मुख्य) विवीताध्यक्षाने मुद्रा आहे की नाही ते पहावे. ६ आणि त्याने गावांच्या मध्ये असलेल्या जागांत कुरणे स्थापावीत. ७ पाण्याची ठिकाणे व अरण्ये यांना चोर व हिंस्र प्राणी यांच्या भीतीपासून मुक्त ठेवावे. ८ जेथे पाणी नसेल तेथे विहिरी, तलाव व झरे तयार करावेत आणि फुलबागा व फळबागा लावाव्यात.

९ पारधी व कुत्री बाळगणारे शिकारी यांनी अरण्यांत संचार करावा. १० चोर किंवा शत्रू येत असल्यास त्यांनी स्वतः पकडले न जाता – पर्वतावर किंवा वृक्षावर चढून अथवा चपल वाहनावर आरूढ होऊन – शंख व दुंदुभी यांचा आवाज करावा.

११ (विवीताध्यक्षाने) शत्रू व रानातील टोळ्या यांच्या हालचालीची बातमी राजाला मोहोरबंद पत्रे नेणाऱ्या पाळीव कबूतरांच्या द्वारा किंवा आग व धूर एकापुढे एक उत्पन्न करून कळवावी.

१२ द्रव्यवने व हस्तिवने यांतील कामगारांची उपजीविका, रस्त्यावरील संरक्षण, चोरांपासून रक्षण, व्यापाऱ्यांचे रक्षकांच्या द्वारा संरक्षण, गाईंचे रक्षण आणि व्यापारावर देखरेख ही कामे विवीताध्यक्षाने करून घ्यावीत.

३५

[ चतुष्पञ्चाशं प्रकरणम् – समाहर्तृप्रचारः ; पञ्चपञ्चाशं प्रकरणम् – गृहपतिकवैदेहकतापसव्यञ्जनाः प्रणिधयः ]

समाहर्ता चतुर्धा जनपदं विभज्य ज्येष्ठमध्यमकनिष्ठविभागेन ग्रामाग्रं परिहारकमायुधीयं धान्यपशुहिरण्यकुप्यविष्टिप्रतिकरमिदमेतावद् इति निबन्धयेत् । १ । तत्प्रदिष्टः पञ्चग्रामीं दशग्रामीं वा गोपश्चिन्तयेत् । २ ।

सीमावरोधेन ग्रामाग्रं, कृष्टाकृष्टस्थलकेदारारामषण्डवाटवनवास्तुचैत्यदेवगृहसेतुबन्धश्मशानसत्त्रप्रपापुण्यस्थानविवीतपथिसंख्यानेन क्षेत्राग्रं, तेन सीम्नां क्षेत्राणां च मर्यादारण्यपथिप्रमाणसंप्रदानविक्रयानुग्रहपरिहारनिबन्धान् कारयेत् गृहाणां च करदाकरदसंख्यानेन । ३ । तेषु चैतावच्चातुर्वर्ण्यम्, एतावन्तः कर्षकगोरक्षकवैदेहककारुकर्मकरदासाश्च, एतावच्च द्विपदचतुष्पदम्, इदं चैषु हिरण्य-

पस्तिसावा अध्याय

प्रकरण ५४ : समाहर्त्याचे कार्य; प्रकरण ५५: गृहपतिक वैदेहक आणि तापस यांच्या वेषातील गुप्त हेरांची कामगिरी

१ समाहर्त्याने जनपदाचे चार भाग पाडून त्यांतील सर्व गावांची उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ अशा प्रतवारीने अमुक गाव करमुक्त, अमुक सैनिक पुरविणारे, इतके इतके धान्य, पशू, द्रव्य, जंगलातील माल, कामगार या स्वरूपात त्यापासून करप्राप्ती याप्रमाणे लेखी नोंदणी करून ठेवावी. २ त्याच्या सांगण्याप्रमाणे (त्याच्या हाताखालील) गोपांनी पाच किंवा दहा गावांची व्यवस्था पहावी.

३ त्याने ठरलेल्या सीमांच्या अनुरोधाने सर्व गावांची, प्रत्येक गावातील लागवडीची जमीन, विनलागवडीची जमीन, कोरडे पठार, भरपूर पाण्याने युक्त जमीन, बगीचा, मळा, वाग, वन, घर, चैत्य, देऊळ, बंधारा, स्मशान, अन्नसत्र, पाणपोई, पवित्र स्थान, कुरण व रस्ता यांच्या संख्यापूर्वक निर्देशासहित सर्व क्षेत्रांची आणि तदनुसार सीमा, अरण्ये व रस्ते यांचे प्रमाण आणि क्षेत्रांचे दान, विक्रय, अनुग्रह व परिहार या सर्वांची लेखी नोंद करावी, तसेच त्यातील प्रत्येक घराची कर देणारे, कर न देणारे याप्रमाणे नोंद करावी. ४ आणि त्या सर्व गावांत इतके प्रत्येक वर्णाचे लोक आहेत, इतके शेतकरी, इतके गाई पाळणारे, इतके व्यापारी, इतके कारागीर, इतके कामगार, इतके दास, इतके

**विष्टिशुल्कदण्डं समुत्तिष्ठतीति । ४ । कुलानां च स्त्रीपुरुषाणां बालवृद्धकर्मचरित्राजीवव्ययपरिमाणं विद्यात् । ५ ।**

**एवं च जनपदचतुर्भागं स्थानिकश्चिन्तयेत् । ६ ।**

**गोपस्थानिकस्थानेषु प्रदेष्टारः कार्यकरणं बलिप्रग्रहं च कुर्युः । ७ ।**

**समाहर्तृप्रदिष्टाश्च गृहपतिकव्यञ्जना येषु ग्रामेषु प्रणिहितास्तेषां ग्रामाणां क्षेत्रगृहकुलाग्रं विद्युः, मानसंजाताभ्यां क्षेत्राणि भोगपरिहाराभ्यां गृहाणि वर्णकर्मभ्यां कुलानि च । ८ । तेषां जङ्घाग्रमायव्ययौ च विद्युः । ९ । प्रस्थितागतानां च प्रवासावासकारणम्, अनर्थ्यानां च स्त्रीपुरुषाणां चारप्रचारं च विद्युः । १० ।**

**एवं वैदेहकव्यञ्जनाः स्वभूमिजानां राजपण्यानां खनिसेतुवनकर्मान्तक्षेत्रजानां प्रमाणमर्घं च विद्युः । ११ । परभूमिजातानां वारिस्थलपथोपयातानां सार-**

द्विपाद व इतके चतुष्पाद प्राणी आहेत आणि ह्या गावांतून इतके द्रव्य, इतके मजूर, इतकी जकात व इतका दंड यांची प्राप्ती होते या सर्वांची नोंद करावी. ५ त्याचप्रमाणे प्रत्येक कुटुंबातील स्त्रिया व पुरूष यांची संख्या, त्यात मुले व वृद्ध माणसे किती, त्यांचा व्यवसाय काय, त्यांची परंपरा कोणती, त्यांचे उत्पन्न व खर्च किती या सर्वांची नोंद करावी.

६ आणि ह्याचप्रमाणे स्थानिक नावाच्या अधिकाऱ्याने जनपदाच्या एका चौथ्या विभागाची व्यवस्था पहावी.

७ गोप आणि स्थानिक यांच्या कार्यक्षेत्राच्या ठिकाणी प्रदेष्टा नावाच्या अधिकाऱ्यांनी त्यांची स्वतःची कामे पार पाडावीत आणि थकलेले कर वसूल करावेत.

८ आणि समाहर्त्याने निर्दिष्ट केल्याप्रमाणे गृहपतिक हेरांनी त्यांची ज्या गावांत नेमणूक झाली असेल त्या गावांतील शेते, घरे व कुटुंबे यांचा एकूण विस्तार किती – शेतांच्या संबंधात त्यांचे क्षेत्रफळ व एकूण उत्पन्न, घरांच्या बाबतीत त्यांचे कर व करमाफी, कुटुंबांच्या बाबतीत त्यांचा वर्ण व व्यवसाय – याची माहिती काढावी. ९ शिवाय कुटुंबातील एकूण माणसांची संख्या, त्यांचे उत्पन्न व खर्च यांची माहिती काढावी. १० त्याचप्रमाणे गावातून दुसरीकडे जाणारे व बाहेरून गावात येणारे यांच्या तसे करण्यामागील उद्देशाचा शोध घ्यावा, तसेच (नटनर्तकादी) अहितकर स्त्रीपुरुषांच्या येण्याजाण्याच्या उद्देशाचा शोध घ्यावा आणि त्यांच्या हेरगिरीच्या कार्याची माहिती काढावी.

फल्गुपण्यानां कर्मसु च शुल्कवर्तन्यातिवाहिकगुल्मतरदेयभागभक्तपण्यागारप्रमाणं विद्युः । १२ ।

एवं समाहर्तृप्रदिष्टास्तापसव्यञ्जनाः कर्षकगोरक्षकवैदेहकानामध्यक्षाणां च शौचाशौचं विद्युः । १३ ।

पुराणचोरव्यञ्जनाश्चान्तेवासिनश्चैत्यचतुष्पथशून्यपदोदपाननदीनिपानतीर्थायतनाश्रमारण्यशैलवनगहनेषु स्तेनामित्रप्रवीरपुरुषाणां च प्रवेशनस्थानगमनप्रयोजनान्युपलभेरन् । १४ ।

समाहर्ता जनपदं चिन्तयेदेवमुत्थितः ।
चिन्तयेयुश्च संस्थास्ताः संस्थाश्चान्याः स्वयोनयः ॥ १ ॥

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे समाहर्तृप्रचारो गृहपतिकवैदेहकतापसव्यञ्जनाः प्रणिधयश्च पञ्चत्रिंशोऽध्यायः । आदितः षट्पञ्चाशः ।

११ याप्रमाणे वैदेहक हेरांनी आपल्या देशातील खाणी, तलाव, वन, कारखाने आणि शेते यांत उत्पन्न होणाऱ्या सरकारी मालाचे प्रमाण व किंमत यांची माहिती मिळवावी. १२ तसेच परदेशात उत्पन्न झालेल्या आणि खुष्कीच्या मार्गाने व जलमार्गाने आयात झालेल्या भारी व हलक्या किमतीच्या मालाच्या संबंधात जकात, रस्त्यावरील संरक्षणाबद्दल आकारणी, सोबत दिलेल्या रक्षकांबद्दल आकार, रक्षकांची चौकी व तर येथे द्यावयाचे दर, (सरकारला द्यावयाचा) भाग, अन्नपाणी व भेट या गोष्टींची माहिती काढावी.

१३ तसेच समाहर्त्याने आदेश दिल्याप्रमाणे तापस हेरांनी शेतकरी, गुरे पाळणारे व व्यापारी आणि अध्यक्ष यांच्या शुद्ध अथवा अशुद्ध वर्तनाची माहिती काढावी.

१४ आणि आपण जुने चोर आहोत अशी बतावणी करणाऱ्या शिष्यांनी चैत्य, शहरातील चौक, निर्जन जागा, विहिरी, नद्या, तलाव, नदीवरील उताराच्या जागा, देवळे, आश्रम, अरण्ये, पर्वत आणि दाट झाडी या ठिकाणी चोर व शत्रूचे शूर लोक ह्यांच्या प्रवेशाच्या, तेथे रहाण्याच्या व तेथून जाण्याच्या प्रयोजनांची माहिती मिळवावी.

१५ याप्रमाणे समाहर्त्याने सदा दक्ष राहून जनपदाची काळजी वहावी आणि (गृहपतिक आदी) त्या संस्थांनी तसेच इतर (उदास्थित आदी) स्वतंत्र संस्थांनीही अशी काळजी वहावी.

## ३६

### [ षट्पञ्चाशं प्रकरणम् – नागरिकप्रणिधिः ]

**समाहर्तृवन्नागरिको नगरं चिन्तयेत् । १ । दशकुलीं गोपो विंशतिकुलीं चत्वारिंशत्कुलीं वा । २ । स तस्यां स्त्रीपुरुषाणां जातिगोत्रनामकर्मभिः जङ्घाग्रमायव्ययौ च विद्यात् । ३ । एवं दुर्गचतुर्भागं स्थानिकश्चिन्तयेत् । ४ ।**

**धर्मावसथिनः पाषण्डिपथिकानावेद्य वासयेयुः, स्वप्रत्ययाश्च तपस्विनः श्रोत्रियांश्च । ५ । कारुशिल्पिनः स्वकर्मस्थानेषु स्वजनं वासयेयुः, वैदेहकाश्चान्योन्यं स्वकर्मस्थानेषु । ६ । पण्यानामदेशकालविक्रेतारमस्वकरणं च निवेदयेयुः । ७ ।**

**शौण्डिकपाक्वमांसिकौदनिकरूपाजीवाः परिज्ञातमावासयेयुः । ८ । अतिव्ययकर्तारमत्याहितकर्माणं च निवेदयेयुः । ९ ।**

## छत्तिसावा अध्याय

### प्रकरण ५६ : नगराध्यक्षाचे कार्य

१ समाहर्त्याप्रमाणेच (नगरावरील मुख्य अधिकारी) नागरिकाने नगराची व्यवस्था पहावी. २ (सर्वात खालच्या) गोप अधिकाऱ्यांनी दहा, वीस किंवा चाळीस कुटुंबांची व्यवस्था पहावी. ३ त्याने त्या कुटुंबांतील स्त्रिया व पुरुष यांची जात, गोत्र, नाव आणि व्यवसाय यांच्या निर्देशासह एकूण संख्या आणि त्यांचे उत्पन्न व खर्च यांची नोंद करावी. ४ याप्रमाणे स्थानिकाने दुर्गाच्या एकचतुर्थांश भागाची व्यवस्था पहावी.

५ धर्मशाळांच्या व्यवस्थापकांनी पाखंडी प्रवाशांना त्यांची वर्दी दिल्यानंतरच उतरावयास जागा द्यावी, आणि तपस्व्यांना व श्रुतिसंपन्न ब्राह्मणांना स्वतःची खात्री पटल्यावर (उतरू द्यावे). ६ कारागीर व कलाकार यांनी आपल्या व्यवसायाच्या जागेत आपल्या व्यवसायबंधूंची उतरण्याची सोय करावी, तसेच व्यापाऱ्यांनी आपल्या धंद्याच्या जागी एकमेकांची सोय करावी. ७ त्यांनी माल भलत्या ठिकाणी व भलत्या वेळेला विकणाऱ्याची आणि माल त्याचा स्वतःचा नसणाऱ्याची वर्दी दिली पाहिजे

८ दारूचे गुत्ते चालविणारे, मांसाहारी व शाकाहारी खाणावळी चालविणारे आणि वेश्या यांनी चांगल्या ओळखीच्या माणसासच आपल्याकडे उतरण्यास जागा द्यावी. ९ जो भरमसाट खर्च करीत असेल किंवा धाडसाचे काम करीत असेल त्याची सरकारात वर्दी दिली पाहिजे.

चिकित्सकः प्रच्छन्नव्रणप्रतीकारकारयितारमपथ्यकारिणं च गृहस्वामी च निवेद्य गोपस्थानिकयोर्मुच्येत, अन्यथा तुल्यदोषः स्यात् । १० । प्रस्थितागतौ च निवेदयेत्, अन्यथा रात्रिदोषं भजेत । ११ । क्षेमरात्रिषु त्रिपणं दद्यात् । १२ ।

पथिकोत्पथिकाश्च बहिरन्तश्च नगरस्य देवगृहपुण्यस्थानवनश्मशानेषु सव्रणमनिष्टोपकरणमुद्भाण्डीकृतमाविग्नमतिस्वप्नमध्वक्लान्तमपूर्वं वा गृह्णीयुः । १३ । एवमभ्यन्तरे शून्यनिवेशावेशनशौण्डिकौदनिकपाक्वमांसिकद्यूतपाषण्डावासेषु विचयं कुर्युः । १४ ।

अग्निप्रतीकारं च ग्रीष्मे । १५ । मध्यमयोरह्नश्चतुर्भागयोरष्टभागोऽग्निदण्डः । १६ । बहिरधिश्रयणं वा कुर्युः । १७ । पादः पञ्चघटीनां कुम्भद्रोणीनिःश्रेणीपरशुशूर्पाङ्कुशकचग्रहणीदृतीनां चाकरणे । १८ । तृणकटच्छन्नान्यप-

१० वैद्याने आपल्याला गुप्तपणे जखमेवर उपाय करावयास सांगणाऱ्याविषयी आणि अहितकारक काम करणाऱ्याविषयी गोप व स्थानिक यांना कळविले तरच तो आणि घराचा मालक निर्दोष ठरावेत, अन्यथा त्या गुन्ह्यात ते भागीदार व्हावेत. ११ आणि घरमालकाने आल्यागेल्याची वर्दी दिली पाहिजे, नाहीतर रात्री घडणाऱ्या गुन्ह्याबद्दल तो जबाबदार धरला जाईल. १२ रात्री गुन्हा घडला नाही तर त्याने तीन पण दंड दिला पाहिजे.

१३ रस्त्यांवर व इतरत्र हिंडणाऱ्या गुप्तचरांनी शहराच्या बाहेर आणि आत देवळे, पवित्र स्थाने, अरण्ये आणि स्मशाने या ठिकाणी जखमी झालेला, हिंसक हत्यार जवळ असणारा, मोठ्या बोजाआड तोंड लपविणारा, घाबरलेला, खूप झोप घेत असलेला, प्रवासाने दमलेला किंवा अपरिचित अशा मनुष्याला अटक करावी. १४ त्याचप्रमाणे शहराच्या आत रिकाम्या घरात, काम करण्याच्या जागेत, गुत्त्यांत, मांसाहारी व शाकाहारी खाणावळींत, जुगाराच्या जागेत आणि पाखंडी लोकांच्या निवासस्थानांत (वरील प्रकारच्या माणसांचा) शोध घ्यावा.

१५ आणि (शहरातील लोकांनी) उन्हाळ्यात आगीचा बंदोबस्त केला पाहिजे. १६ दिवसाच्या चार विभागांपैकी मधल्या दोन विभागांत अग्नी पेटविल्यास एकअष्टमांश पण दंड करावा. १७ किंवा त्यांनी घराबाहेरच्या जागेत स्वयंपाक करावा. १८ पाच घट, (मोठा) कुंभ, द्रोण, शिडी, कुऱ्हाड, सूप, आकडा, कचग्रहणी (टोकाला लोखंडी आकडा असलेला लांब बांबू, शत्रूच्या केसात अडकवून ओढण्याच्या उपयोगाचा) आणि पखाल ह्या जिनसा तयार न ठेवल्यास पाव पण दंड करावा. १९ गवत व चटया यांची छपरे काढून टाकावीत.

नयेत् । १९ । अग्निजीविन एकस्थान् वासयेत् । २० । स्वगृहप्रद्वारेषु गृहस्वामिनो वसेयुः असंपातिनो रात्रौ । २१ । रथ्यासु कुटव्रजाः सहस्रं तिष्ठेयुः, चतुष्पथ-द्वारराजपरिग्रहेषु च । २२ । प्रदीप्तमनभिधावतो गृहस्वामिनो द्वादशपणो दण्डः, षट्पणोऽवक्रयिणः । २३ । प्रमादाद्दीप्तेषु चतुष्पञ्चाशत्पणो दण्डः । २४ । प्रादीपिकोऽग्निना वध्यः । २५ ।

पांसुन्यासे रथ्यायामष्टभागो दण्डः, पङ्कोदकसंनिरोधे पादः । २६ । राजमार्गे द्विगुणः । २७ ।

पुण्यस्थानोदकस्थानदेवगृहराजपरिग्रहेषु पणोत्तरा विष्ठादण्डाः, मूत्रेष्वर्ध-दण्डाः । २८ । भैषज्यव्याधिभयनिमित्तमदण्ड्याः । २९ ।

मार्जारश्वनकुलसर्पप्रेतानां नगरस्यान्तरुत्सर्गे त्रिपणो दण्डः, खरोष्ट्राश्वतराश्व-पशुप्रेतानां षट्पणः, मनुष्यप्रेतानां पञ्चाशत्पणः । ३० । मार्गविपर्यासे शव-

२० व्यवसायात अग्नीचा उपयोग करणाऱ्यांना एके ठिकाणीच रहावयास लावावे. २१ घरमालकांनी आपल्या घराच्या पुढच्या दरवाजाजवळ राहिले पाहिजे, रात्री एकत्र गोळा होऊ नये. २२ रस्त्यांवर पाण्याने भरलेले हजारो घडे ठेवलेले असावेत, तसेच शहरातील चौकांत, वेशींजवळ आणि सरकारी इमारतींजवळही (तसे घडे असावेत). २३ आग लागली असता ती विझविण्यास न जाणाऱ्या घरमालकास बारा पण दंड करावा, भाडेकरूस सहा पण. २४ कोणाच्या निष्काळजीपणामुळे आग लागली असल्यास चोपन पण दंड करावा. २५ मुद्दाम आग लावणाऱ्यास आगीत जळून ठार करावे.

२६ रस्त्यावर केरकचरा टाकल्यास एकअष्टमांश पण दंड करावा, चिखलाच्या पाण्याने रस्ता अडविल्यास पाव पण दंड. २७ राजमार्गावर हे केल्यास याच्या दुप्पट दंड करावेत.

२८ पवित्र स्थान, जलाशय, देऊळ व राजाच्या इमारती या ठिकाणी मलोत्सर्ग केल्यास एक पणापासून पुढे एकपणाने वाढत जाणारे (१, २, ३ व ४) दंड करावेत, मूत्रोत्सर्गासाठी याच्या निम्मे. २९ औषधामुळे, रोगामुळे अथवा भीतीमुळे असे झाल्यास दंड करू नये.

३० मेलेले मांजर, कुत्रा, मुंगूस अथवा साप शहराच्या आत टाकल्यास तीन पण दंड करावा, मेलेले गाढव, उंट, खेचर किंवा घोडा टाकल्यास सहा पण आणि मनुष्याचे प्रेत टाकल्यास पन्नास पण दंड करावा. ३१ ठरलेला मार्ग बदलल्यास आणि प्रेत न्यावयाच्या वेशीहून दुसऱ्या वेशीने प्रेत नेल्यास प्रथम

द्वारादन्यतश्च शवनिर्णयने पूर्वः साहसदण्डः । ३१ । द्वाःस्थानां द्विशतम् । ३२ । श्मशानादन्यत्र न्यासे दहने च द्वादशपणो दण्डः । ३३ ।

विषण्णालिकमुभयतोरात्रं यामतूर्यम् । ३४ । तूर्यशब्दे राज्ञो गृहाभ्याशे सपादपणमक्षणताडनं प्रथमपश्चिमयामिकम्, मध्यमयामिकं द्विगुणम्, अन्तश्चतुर्गुणम् । ३५ । शङ्कनीये देशे लिङ्गे पूर्वापदाने च गृहीतमनुयुञ्जीत । ३६ । राजपरिग्रहोपगमने नगररक्षारोहणे च मध्यमः साहसदण्डः । ३७ । सूतिकाचिकित्सकप्रेतप्रदीपयाननागरिकतूर्यप्रेक्षाग्निनिमित्तं मुद्राभिश्चाग्राह्याः । ३८ । चाररात्रिषु प्रच्छन्नविपरीतवेषाः प्रव्रजिता दण्डशस्त्रहस्ताश्च मनुष्या दोषतो दण्ड्याः । ३९ ।

रक्षिणामवार्यं वारयतां वार्यं चावारयतामक्षणद्विगुणो दण्डः । ४० । स्त्रियं

साहसदंड करावा. ३२ (नेऊ देणाऱ्या) द्वाररक्षकांस दोनशे पण दंड करावा. ३३ स्मशानाखेरीज अन्यत्र प्रेत पुरले अथवा जाळले तर बारा पण दंड करावा.

३४ रात्रीच्या दोन्ही बाजूला सहा सहा नालिका (२ तास २४ मिनिटें) सोडून यामसूचक वाद्यध्वनी करावा. ३५ वाद्यध्वनी झाल्यानंतर राजवाड्यासंनिध पहिल्या व शेवटच्या यामांत निषिद्ध वेळी फिरकल्याबद्दल सव्वा पण दंड करावा, मधल्या यामात त्याच्या दुप्पट, आणि (राजाच्या परिसराच्या) आत फिरकल्याबद्दल चौपट दंड करावा. ३६ संशयास्पद जागी किंवा संशयास्पद चिन्हामुळे आणि पूर्वी गुन्हा केलेला असल्यामुळे (निषिद्ध काळात) पकडलेल्या मनुष्याची चौकशी करावी. ३७ राजवाड्याच्या परिसरातील वास्तूंकडे जाण्याबद्दल व शहराची तटबंदी चढल्याबद्दल मध्यम साहसदंड करावा. ३८ बाळंतिणीसाठी, वैद्यासाठी, प्रेतयात्रेनिमित्त, दिवा बरोबर घेतलेला असल्यास, गाडीने जात असल्यास, नागरिकाने नगारा वाजवून सूचना दिलेली असल्यास, नाटक वगैरेच्या निमित्ताने अथवा आगीच्या निमित्ताने जात असल्यास आणि मोहोरबंद परवाना असल्यास पकडण्यात येऊ नये. ३९ ज्या रात्री फिरण्याची पूर्ण मुभा आहे त्या रात्रीत गुप्त वेषातील अथवा पालटलेल्या वेषातील माणसांना, संन्याशांना व काठ्या व शस्त्रे हातात असणाऱ्या माणसांना दोषानुरूप दंड करावा.

४० ज्याला प्रतिबंध करावयास नको त्याला प्रतिबंध करणाऱ्या व ज्याला प्रतिबंध करणे आवश्यक आहे त्याला तो न करणाऱ्या रक्षकांना प्रतिषिद्ध वेळेत फिरल्याबद्दल होणाऱ्या दंडाच्या दुप्पट दंड करावा. ४१ दासी असणाऱ्या स्त्रीशी संग करणाऱ्यांस (रक्षकांस) प्रथम साहसदंड करावा, दासी नसलेल्या

दासीमधिमेहयतां पूर्वः साहसदण्डः, अदासीं मध्यमः, कृतावरोधामुत्तमः, कुलस्त्रियं वधः । ४१ । चेतनाचेतनिकं रात्रिदोषमशंसतो नागरिकस्य दोषानुरूपो दण्डः, प्रमादस्थाने च । ४२ ।

नित्यमुदकस्थानमार्गभ्रमच्छन्नपथवप्रप्राकाररक्षावेक्षणं नष्टप्रस्मृतापसृतानां च रक्षणम् । ४३ ।

बन्धनागारे च बालवृद्धव्याधितानाथानां जातनक्षत्रपौर्णमासीषु विसर्गः । ४४ । पुण्यशीलाः समयानुबद्धा वा दोषनिष्क्रयं दद्युः । ४५ ।

दिवसे पञ्चरात्रे वा बन्धनस्थान् विशोधयेत् ।
कर्मणा कायदण्डेन हिरण्यानुग्रहेण वा ।। ४६ ।।
अपूर्वदेशाधिगमे युवराजाभिषेचने
पुत्रजन्मनि वा मोक्षो बन्धनस्य विधीयते ।। ४७ ।।

इत्यध्यक्षप्रचारे द्वितीयेऽधिकरणे नागरिकप्रणिधिः षट्त्रिंशोऽध्यायः । आदितः सप्तपञ्चाशः ।
**एतावता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य अध्यक्षप्रचारो द्वितीयमधिकरण समाप्तम् ।**

स्त्रीशी केल्यास मध्यम साहसदंड, कोणाची अवरुद्ध असलेल्या स्त्रीशी केल्यास उत्तम साहसदंड करावा, कुलस्त्रीशी संग करणाऱ्याचा वध करावा. ४२ (रक्षकाने) रात्री घडलेल्या चेतन प्राणी किंवा अचेतन पदार्थ यांच्या संबंधातील गुन्ह्याची वर्दी नगराध्यक्षास न दिल्यास अपराधानुरूप दंड करावा, तसेच हलगर्जीपणा केल्यासही दंड करावा.

४३ जलाशय, रस्ते, गटारे, चोरवाटा, तट, कोट व इतर रक्षणाची साधने यांची नित्य पहाणी करीत राहिले पाहिजे आणि हरवलेल्या, विसरलेल्या व पळून आलेल्या वस्तूंचे व प्राण्यांचे रक्षण केले पाहिजे.

४४ राजाचे जन्मनक्षत्र व पौर्णिमा या दिवशी लहान मुले, वृद्ध, आजारी आणि अनाथ माणसे यांना तुरुंगातून मुक्त करावे. ४५ परोपकारी मनुष्यांनी अथवा (कैद्यांशी) कराराने बांधले गेलेल्यांनी (इतर अपराधी कैद्यांच्या) मुक्ततेसाठी अपराधानुरूप द्रव्याने भरपाई करावी.

४६ दररोज किंवा दर पाच दिवसांनी कैद्यांची मुक्तता करावी, त्यांच्याकडून काम करून घेऊन, त्यांना शारीरिक शिक्षा करून अथवा त्यांच्यापासून द्रव्यरूपी भरपाई घेऊन.

४७ नवीन मुलूख मिळविला म्हणजे, युवराजाला अभिषेक केला म्हणजे अथवा राजाला पुत्र झाला म्हणजे त्या दिवशी तुरुंगातून सर्व कैद्यांची मुक्तता करावी.

## दुसरे अधिकरण समाप्त

# धर्मस्थीयम् – तृतीयमधिकरणम्

१

[ सप्तपञ्चाशं प्रकरणम् – व्यवहारस्थापना,
अष्टपञ्चाशं प्रकरणम् – विवादपदनिबन्धः ]

**धर्मस्थास्त्रयस्त्रयोऽमात्या जनपदसंधिसंग्रहणद्रोणमुखस्थानीयेषु व्यावहारिकानर्थान् कुर्युः । १ ।**

**तिरोहितान्तरगारनक्तारण्योपध्युपह्वरकृतांश्च व्यवहारान् प्रतिषेधयेयुः । २ । कर्तुः कारयितुः पूर्वः साहसदण्डः । ३ । श्रोतृणामेकैकं प्रत्यर्धदण्डाः । ४ । श्रद्धेयानां तु द्रव्यव्यपनयः । ५ ।**

## न्यायाधिशांविषयी – तिसरे अधिकरण

### पहिला अध्याय

### प्रकरण ५७ : व्यवहारांचे प्रामाण्य ठरविणे;
### प्रकरण ५८ : मुकद्दम्यातील बाबींची नोंदणी

१ तीन न्यायाधीश – तिघेही अमात्यगुणांनी युक्त – यांनी जनपदाच्या सरहद्दीवर व संग्रहण, द्रोणमुख आणि स्थानीय ह्या लहानमोठ्या शहरांत व्यवहारातून (दोन पक्षांमध्ये झालेल्या करारातून) उद्भवलेल्या तंट्यात निवाडा लावण्याचे काम करावे.

२ (एका पक्षाच्या) गैरहजेरीत झालेला, घरात केलेला, रात्री केलेला, अरण्यात केलेला, फसवणुकीने केलेला आणि गुप्तपणे केलेला – हे करार रद्द ठरवावेत. ३ ते करणाऱ्याला व करविणाऱ्याला प्रथम साहसदंड करावा. ४ (त्या व्यवहाराला) साक्षिदार असणाऱ्यांपैकी प्रत्येकाला अर्धा दंड करावा. ५ परंतु (तसा व्यवहार करणारे) जर विश्वसनीय असतील तर (दंड न करता) फक्त कराराची अंमलबजावणी होऊ देऊ नये.

**परोक्षेणाधिकर्णग्रहणमवक्तव्यकरा वा तिरोहिताः सिध्येयुः । ६ । दायनिक्षेपोपनिधिविवाहयुक्ताः स्त्रीणामनिष्कासिनीनां व्याधितानां चामूढसंज्ञानामन्तरगारकृताः सिध्येयुः । ७ । साहसानुप्रवेशकलहविवाहराजनियोगयुक्ताः पूर्वरात्रव्यवहारिणां च रात्रिकृताः सिध्येयुः । ८ । सार्थव्रजाश्रमव्याधचारणमध्येष्वरण्यचराणामरण्यकृताः सिध्येयुः । ९ । गूढाजीविषु चोपधिकृताः सिध्येयुः । १० । मिथःसमवाये चोपह्वरकृताः सिध्येयुः । ११ । अतोऽन्यथा न सिध्येयुः, अपाश्रयवद्भिश्च कृताः, पितृमता पुत्रेण, पित्रा पुत्रवता, निष्कुलेन भ्रात्रा, कनिष्ठेनाविभक्तांशेन, पतिमत्या पुत्रवत्या च स्त्रिया, दासाहितकाभ्याम्, अप्राप्तातीतव्यवहाराभ्याम्, अभिशस्तप्रव्रजितन्यङ्गव्यसनिभिश्च, अन्यत्र निसृष्टव्यवहारेभ्यः । १२ । तत्रापि क्रुद्धेनार्तेन मत्तेनोन्मत्तेनावगृहीतेन वा कृता व्यवहारा न सिध्येयुः । १३ । कर्तृकारयितृश्रोतॄणां पृथग्यथोक्ता दण्डाः । १४ ।**

६ गहाण ठेवावयाची वस्तू प्रत्यक्ष नसता त्याच्या आधारावर कर्ज घेण्याचा करार अथवा ज्यांच्यात काही दोषास्पद नाही असे गैरहजेरीत केलेले करार कायदेशीर ठरवावेत. ७ संपत्तीची वारसदारांत विभागणी, कारागिराला कच्चा माल देणे, ठेवी व विवाह यांसंबंधीचे व्यवहार, तसेच घराबाहेर न पडणाऱ्या स्त्रियांचे आणि शुद्ध न हरपलेल्या रोग्यांचे व्यवहार घरात झालेले असले तरी कायदेशीर होत. ८ बळजबरीचे कृत्य करणे, घरात घुसणे, कलह, विवाह व राजाज्ञा यांसंबंधीचे व्यवहार, तसेच (वेश्या, गुत्ते आदी) पूर्वरात्री व्यवसाय करणाऱ्यांचे व्यवहार रात्री केलेले असले तरी कायदेशीर ठरवावेत. ९ व्यापाऱ्यांचे तांडे, जनावरांचे कळप, आश्रमवासी, शिकारी आणि चारण (भाट) हे अरण्यात असता तेथील त्यांचे व्यवहार कायदेशीर ठरवावेत. १० आणि गुप्त रीतीने उपजीविका करणाऱ्यांच्या संबंधात फसवणुकीने केलेले व्यवहार कायदेशीर ठरवावेत. ११ आणि गुप्त साहचर्याच्या संबंधात गुप्त करार कायदेशीर होत. १२ यांशिवाय इतर व्यवहार बेकायदेशीर होत, तसेच आश्रिताने केलेले व्यवहार (जसे) पित्यावर अवलंबून असणाऱ्या पुत्राने, पुत्रावर अवलंबून असणाऱ्या पित्याने, कुटुंबातून निघून गेलेल्या भावाने, अविभक्त कुटुंबातील धाकटचा भावाने, पती असलेल्या अथवा पुत्र असलेल्या स्त्रीने, दासीने, दासाने अथवा गहाण ठेवलेल्या मनुष्याने, वयात न आलेल्याने किंवा फार वय झालेल्याने, गुन्ह्याचा आरोप असलेल्याने, संन्यासी, पंगू अथवा संकटात सापडलेला यांनी केलेले (बेकायदेशीर होत). याला अपवाद जर तो व्यवहार करण्याचे कार्य कोणावर सोपविले असेल तर त्याचा. १३ त्या बाबतीत सुद्धा क्रोधाविष्ट, दु:खार्त, दारूने झिंगलेला, उन्मादावस्थेत असलेला अथवा कोणाच्या कह्यात असलेला, अशांनी

**स्वे स्वे तु वर्गे देशे काले च स्वकरणकृता: संपूर्णाचारा: शुद्धदेशा दृष्टरूपलक्षण-प्रमाणगुणा: सर्वव्यवहारा: सिध्येयु: । १५ । पश्चिमं चैषां करणमादेशाधिवर्जं श्रद्धेयम् । १६ । इति व्यवहारस्थापना ।**

**संवत्सरमृतुं मासं पक्षं दिवसं करणमधिकरणमृणं वेदकावेदकयो: कृतसमर्थावस्थयोर्देशग्रामजातिगोत्रनामकर्माणि चाभिलिख्य वादिप्रतिवादिप्रश्नानर्थानुपूर्व्या निवेशयेत् । १७ । निविष्टांश्चावेक्षेत । १८ ।**

**निबद्धं वादमुत्सृज्यान्यं वादं संक्रामति, पूर्वोक्तं पश्चिमेनार्थेन नाभिसंधत्ते परवाक्यमनभिग्राह्यमभिग्राह्यावतिष्ठते, प्रतिज्ञाय देशं निर्दिशेत्युक्ते न निर्दिशति, हीनदेशमदेशं वा निर्दिशति निर्दिष्टाद्देशादन्यं देशमुपस्थापयति, उपस्थिते देशेऽर्थवचनं नैवमित्यपव्ययते, साक्षिभिरवधृतं नेच्छति, असंभाष्ये देशे साक्षिभि-**

केलेले व्यवहार बेकायदेशीर ठरवावेत. १४ ते करणारे, करविणारे व साक्षिदार यांना वर सांगितलेले निरनिराळे दंड करावेत.

१५ परंतु आपापल्या वर्गात, योग्य ठिकाणी व योग्य वेळी, पूर्ण अधिकार असून केलेले, सर्व आचार पाळून केलेले, विशुद्ध साक्ष असलेले, (वस्तूचे) स्वरूप, लक्षणे, प्रमाण व गुण यांची नोंद असलेले सर्व व्यवहार कायदेशीर ठरवावेत. १६ आणि यांच्या संबंधात शेवटचा करार प्रमाण मानावा, आदेश (काम सांगणे) व आधी (गहाण ठेवणे) यांच्या बाबतीतील व्यवहार खेरीज करून. याप्रमाणे व्यवहारांच्या प्रामाण्याचा विचार झाला.

१७ वर्ष, ऋतू, महिना, पक्ष, तिथी, खाते, न्यायालय, कर्जाची रक्कम, आणि ज्यांच्याकडून समर्थ जामीन घेतले आहेत अशा वादीचे व प्रतिवादीचे देश, गाव, जात, गोत्र, नाव आणि व्यवसाय लिहून (लेखकाने) वादी व प्रतिवादी यांनी दिलेली प्रश्नांची उत्तरे अर्थानुरोधाने यथाक्रम लिहावीत. १८ आणि लिहिलेले पुन्हा तपासावे.

१९ (जर कोणी पक्षकार) लिहून घेतलेला वादाचा मुद्दा सोडून दुसरा मुद्दा उपस्थित करील, पहिल्या जबानीशी नंतरच्या जबानीचा मेळ घालू शकत नसेल, दुसऱ्या पक्षाच्या खोडता न येणाऱ्या विधानाला केवळ हरकत घेऊन गप्प राहील, पुरावा देतो असे कबूल करून दे असे म्हटल्यावर देणार नाही, कमकुवत पुरावा अथवा जो पुरावाच नाही तो पुढे करील, कबूल केलेल्या पुराव्याहून निराळाच पुरावा उपस्थित करील, पुरावा पुढे आला असता व खरे वचन बोलले गेले असता ' असे नाही ' म्हणून नाकबूल करील, साक्षिदारांनी सिद्ध केलेले मान्य करणार नसेल, जेथे साक्षिदारांशी बोलावयाचे नसते तेथे त्यांच्याशी बोलेल, तर

मिथः संभाषते, इति परोक्तहेतवः । १९ । परोक्तदण्डः पञ्चबन्धः । २० । स्वयंवादिदण्डो दशबन्धः । २१ ।

पुरुषभृतिरष्टांशः । २२ । पथिभक्तमर्घविशेषतः । २३ । तदुभयं नियम्यो दद्यात् । २४ ।

अभियुक्तो न प्रत्यभियुञ्जीत, अन्यत्र कलहसाहससार्थसमवायेभ्यः । २५ । न चाभियुक्तेऽभियोगोऽस्ति । २६ ।

अभियोक्ता चेत्प्रत्युक्तस्तदहरेव न प्रतिब्रूयात् परोक्तः स्यात् । २७ । कृतकार्यविनिश्चयो ह्यभियोक्ता नाभियुक्तः । २८ । तस्याप्रतिब्रुवतस्त्रिरात्रं सप्तरात्रमिति । २९ । अत ऊर्ध्वं त्रिपणावरार्ध्यं द्वादशपणपरं दण्डं कुर्यात् । ३० । त्रिपक्षादूर्ध्वमप्रतिब्रुवतः परोक्तदण्डं कृत्वा यान्यस्य द्रव्याणि स्युस्ततोऽभियोक्तारं प्रतिपादयेद्, अन्यत्र वृत्त्युपकरणेभ्यः । ३१ । तदेव निष्पततोऽभियुक्तस्य कुर्यात् । ३२ । अभियोक्तुर्निष्पातसमकालः परोक्तभावः । ३३ ।

ह्या कारणांस्तव तो मुकद्दम्यात पराजित होईल. २० वादात पराजित होणाऱ्याला रकमेच्या एकपंचमांश दंड करावा. २१ जो स्वतः होऊन कबूल करील त्याला एकदशांश दंड करावा.

२२ (साक्षिदारांना बोलावून आणणाऱ्या) नोकराला एकअष्टमांश पण मेहनताना द्यावा. २३ वाटेतील भोजनखर्च त्यावेळच्या किमतीप्रमाणे द्यावा. २४ हे दोन्ही हरलेल्या पक्षकाराने द्यावेत.

२५ कलह, बळजबरी आणि तांड्यामधील साहचर्य यांच्याविषयीच्या खटल्यांव्यतिरिक्त इतर खटल्यांत प्रतिवादीला वादीवर उलट फिर्याद करता येणार नाही. २६ आणि प्रतिवादीवर (त्याचवेळेस दुसरी) फिर्याद करता येणार नाही.

२७ प्रतिवादीने उत्तर दिले असता वादीने जर त्याच दिवशी प्रत्युत्तर दिले नाही तर तो पराजित होतो. २८ कारण, काय करावयाचे ते वादीने अगोदर ठरविलेले असते, प्रतिवादीने नाही. २९ प्रतिवादीने तात्काळ उत्तर न दिल्यास त्याला तीन दिवसांची किंवा सात दिवसांची मुदत द्यावी. ३० त्यानंतर त्याला कमीत कमी तीन पण व जास्तीत जास्त बारा पण दंड करावा. ३१ तीन पंधरवड्यांनंतर उत्तर न देणाऱ्या प्रतिवादीस पराजित पक्षकारास होणारा दंड करून त्याची जी मालमत्ता असेल तिच्यातून वादीची रक्कम देववावी, पण त्यासाठी त्याच्या उपजीविकेच्या साधनांचा उपयोग करू नये. ३२ पळून गेलेल्या प्रतिवादीच्या बाबतीतही तसेच करावे. ३३ वादी पळून गेला तर त्याच क्षणाला तो पराजित होतो.

प्रेतस्य व्यसनिनो वा साक्षिवचनमसारम् । ३४ ।

अभियोक्ता दण्डं दत्त्वा कर्म कारयेत् । ३५ । आधिं वा स कामं प्रवेशयेत् । ३६ । रक्षोघ्नरक्षितं वा कर्मणा प्रतिपादयेद्, अन्यत्र ब्राह्मणात् । ३७ ।

चतुर्वर्णाश्रमस्यायं लोकस्याचाररक्षणात् ।
नश्यतां सर्वधर्माणां राजा धर्मप्रवर्तकः ।। ३८ ।।
धर्मश्च व्यवहारश्च चरित्रं राजशासनम् ।
विवादार्थश्चतुष्पादः पश्चिमः पूर्वबाधकः ।। ३९ ।।
तत्र सत्ये स्थितो धर्मो व्यवहारस्तु साक्षिषु ।
चरित्रं संग्रहे पुंसां राज्ञामाज्ञा तु शासनम् ।। ४० ।।
राज्ञः स्वधर्मः स्वर्गाय प्रजा धर्मेण रक्षितुः ।
अरक्षितुर्वा क्षेप्तुर्वा मिथ्यादण्डमतोऽन्यथा ।। ४१ ।।

३४ (साक्ष दिल्यानंतर) साक्षिदार मरण पावला किंवा संकटात सापडला तर त्याची साक्ष कुचकामाची होय.

३५ (पराजित प्रतिवादी दाव्याची रक्कम देण्यास असमर्थ असल्यास) वादीने दंड सरकारात भरून त्याला आपल्यासाठी काम करावयास लावावे. ३६ किंवा त्या प्रतिवादीने आपल्या मर्जीनुसार वापरण्यालायक एखादी वस्तू वादीकडे गहाण ठेवावी. ३७ किंवा ब्राह्मण खेरीज करून इतर प्रतिवादीला राक्षसांचा नाश करणाऱ्या मंत्रांनी रक्षण देऊन कामाच्या द्वारा रक्कम द्यावयास लावावे.

३८ जेव्हा सर्व धर्मांचा लोप होत असतो तेव्हा चार वर्ण व चार आश्रम यांत विभक्त झालेल्या लोकांच्या (स्वधर्मोचित) आचारांचे पालन करीत असल्या-कारणाने राजा हा धर्माचा प्रवर्तक होय.

३९ (शाश्वत) धर्म, (उभय पक्षांमधील) व्यवहार, परंपरागत आचार आणि राजाची आज्ञा – खटल्याचा निवाडा करण्यासाठी हे चार आधार होत. त्यात नंतरनंतरचा आधार अगोदरच्यापेक्षा बलवत्तर होय.

४० त्यांपैकी धर्म हा सत्यावर प्रतिष्ठित आहे, पण व्यवहार साक्षिदारांवर प्रतिष्ठित आहे. परंपरागत आचार माणसांनी स्वीकारण्यावर अवलंबून आहे, परंतु राजांनी केलेली आज्ञा म्हणजे शासन.

४१ धर्मानुसार प्रजेचे रक्षणाऱ्या राजाचा हा स्वधर्म त्याला स्वर्गप्राप्ती करून देण्यास कारणीभूत होतो. रक्षण न करणाऱ्या अथवा अन्याय्य दंड करणाऱ्या राजाचा धर्म त्याला दुसरीकडे (नरकाप्रत) नेतो.

दण्डो हि केवलो लोकं परं चेमं च रक्षति ।
राज्ञा पुत्रे च शत्रौ च यथादोषं समं धृतः ॥ ४२ ॥
अनुशासद्धि धर्मेण व्यवहारेण संस्थया ।
न्यायेन च चतुर्थेन चतुरन्तां महीं जयेत् ॥ ४३ ॥
संस्था या धर्मशास्त्रेण शास्त्रं वा व्यावहारिकम् ।
यस्मिन्नर्थे विरुध्येत धर्मेणार्थं विनिर्णयेत् ॥ ४४ ॥
शास्त्रं विप्रतिपद्येत धर्मे न्यायेन केनचित् ।
न्यायस्तत्र प्रमाणं स्यात्तत्र पाठो हि नश्यति ॥ ४५ ॥
दृष्टदोषः स्वयंवादः स्वपक्षपरपक्षयोः ।
अनुयोगार्जवं हेतुः शपथश्चार्थसाधकः ॥ ४६ ॥
पूर्वोत्तरार्थव्याघाते साक्षिवक्तव्यकारणे ।
चारहस्ताच्च निष्पाते प्रदेष्टव्यः पराजयः ॥ ४७ ॥

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे व्यवहारस्थापना विवादपदनिबन्धश्च प्रथमोऽध्यायः ।
आदितोऽष्टपञ्चाशः ।

४२ कारण, पुत्र व शत्रू उभयतांना अपराधानुसार राजाने सारखाच केलेला दंडच केवळ (त्याच्या) परलोकाचे व ह्या लोकाचे रक्षण करतो.

४३ कारण, धर्माने, व्यवहाराने, परंपरागत रूढीने आणि चौथ्या न्यायावर अधिष्ठित आज्ञेने शासन करणारा राजा चारही दिशांच्या अंतापर्यंत विस्तार असलेली पृथ्वी जिंकून घेईल.

४४ ज्या बाबतीत परंपरागत रूढीचा अथवा व्यवहारावर अधिष्ठित शास्त्राचा धर्मशास्त्राशी विरोध येत असेल त्या बाबतीत धर्मानुसार निर्णय द्यावा·

४५ जेथे धर्मासंबंधीचे शास्त्र न्यायावर आधारित कोणत्याही राजाज्ञेच्या विरोधी असेल तेथे न्यायाला प्रमाण मानावे. कारण, त्याबाबतीत धर्मशास्त्रातील वचनाचे प्रामाण्य नष्ट होते.

४६ उघडच दिसून येणारा दोष, स्वतः होऊन दिलेली कबुली, स्वपक्ष व परपक्ष यांच्या प्रश्नांतील व उत्तरांतील सरळपणा, कारणमीमांसा आणि शपथ ह्या गोष्टी निर्णय लावण्याच्या कामी सहायक होतात.

४७ अगोदरचे व नंतरचे विधान यात विरोध असल्यास, साक्षिदार दोषास्पद असल्यास आणि रक्षकाच्या ताब्यातून पळून गेल्यास (पक्षकार) पराजित झाला असा निर्णय द्यावा.

२

[एकोनषष्टितमं प्रकरणम् – विवाहसंयुक्तम्, तत्र विवाहधर्मः, स्त्रीधनकल्पः, आधिवेदनि कं च]

**विवाहपूर्वो व्यवहारः । १ ।**

**कन्यादानं कन्यामलंकृत्य ब्राह्मो विवाहः । २ । सहधर्मचर्या प्राजापत्यः । ३ । गोमिथुनादानादार्षः । ४ । अन्तर्वेद्यामृत्विजे दानाद् दैवः । ५ । मिथःसमवायाद् गान्धर्वः । ६ । शुल्कादानाद् आसुरः । ७ । प्रसह्यादानाद् राक्षसः । ८ । सुप्तमत्तादानात् पैशाचः । ९ ।**

**पितृप्रमाणाश्चत्वारः पूर्वे धर्म्याः, मातापितृप्रमाणाः शेषाः । १० । तौ हि शुल्कहरौ दुहितुः, अन्यतराभावेऽन्यतरो वा । ११ । द्वितीयं शुल्कं स्त्री हरेत । १२ ।**

**सर्वेषां प्रीत्यारोपणमप्रतिषिद्धम् । १३ । इति विवाहधर्मः ।**

दुसरा अध्याय

प्रकरण ५९ : विवाहाशी संबद्ध विषय : विवाहधर्म; स्त्रीधनविषयक नियम; दुसऱ्या विवाहाविषयी

१ विवाहापासून (लौकिक) व्यवहाराला प्रारंभ होतो.

२ कन्येला अलंकार घालून तिचे वराला दान करणे हा ब्राह्म विवाह ३ उभयतांनी धर्मकृत्ये जोडीने करण्याचे आवाहन असते तो प्राजापत्य. ४ गोमिथुन घेऊन कन्या देणे म्हणजे आर्ष विवाह. ५ यज्ञवेदीमध्ये ऋत्विजाला कन्येचे दान म्हणजे दैव. ६ (वधूवरांच्या) परस्पर साहचर्याने होणारा तो गांधर्व विवाह. ७ हुंडा घेऊन कन्या दिल्यास आसुर. ८ बळजबरीने कन्येला पळवून नेल्यास राक्षस विवाह. ९ निद्रेत किंवा नशेत असलेल्या कन्येस पळविल्यास पैशाच.

१० यांपैकी पहिले चार विवाह पित्याच्या समतीने असल्यामुळे धर्माला अनुसरून होत, बाकीच्या विवाहांत माता व पिता उभयतांची अनुमती लागते. ११ कारण, त्या दोघांना कन्येच्या शुल्काची प्राप्ती होते, किंवा दोघांपैकी एकजण नसल्यास दुसऱ्याला होते. १२ दुसरे शुल्क स्त्रीलाच मिळावे.

१३ सर्व प्रकारच्या विवाहांत कन्येला प्रीतिदान देण्यास प्रतिबंध नाही. हा झाला विवाहाचा कायदा.

**वृत्तिराबन्ध्यं वा स्त्रीधनम् । १४ । परद्विसाहस्रा स्थाप्या वृत्तिः, आबन्ध्यानियमः।१५।तदात्मपुत्रस्नुषाभर्मणि प्रवासाप्रतिविधाने च भार्याया भोक्तुमदोषः, प्रतिरोधकव्याधिदुर्भिक्षभयप्रतीकारे धर्मकार्ये च पत्युः, संभूय वा दम्पत्योर्मिथुनं प्रजातयोः । १६ । त्रिवर्षोपभुक्तं च धर्मिष्ठेषु विवाहेषु नानुयुञ्जीत । १७ । गान्धर्वासुरोपभुक्तं सवृद्धिकमुभयं दाप्येत, राक्षसपैशाचोपभुक्तं स्तेयं दद्यात्। १८।**

**मृते भर्तरि धर्मकामा तदानीमेव स्थाप्याभरणं शुल्कशेषं च लभेत । १९ । लब्ध्वा वा विन्दमाना सवृद्धिकमुभयं दाप्येत । २० । कुटुम्बकामा तु श्वशुरपतिदत्तं निवेशकाले लभेत । २१ । निवेशकालं हि दीर्घप्रवासे व्याख्यास्यामः । २२ । श्वशुरप्रातिलोम्येन वा निविष्टा श्वशुरपतिदत्तं जीयेत । २३ ।**

१४ उपजीविकेसाठी तोडून दिलेली रक्कम (वृत्ति) आणि दागदागिने हे स्त्रीधन. १५ बाजूला काढून ठेवावयाची (स्थाप्या) अशी वृत्ती अधिकात अधिक दोन हजार पण असावी, दागदागिन्यांच्या बाबतीत मात्र काही मर्यादा नाही. १६ ते स्त्रीधन पत्नीने आपले पुत्र व सुना यांच्या पालनपोषणासाठी व निर्वाहाची तरतूद न करता पती प्रवासाला गेला असता वापरले तर त्यात दोष नाही, पतीने दरोडेखोर, आजार, दुर्भिक्ष व इतर संकटे याचा प्रतिकार करण्यासाठी आणि धर्मकार्यासाठी वापरले तर आणि नवराबायकोनी मिळून मुलगा व मुलगी झाल्यानंतर वापरले तर (त्यात दोष नाही). १७ आणि धार्मिक विवाहांच्या संबंधात तीन वर्षेपर्यंत (बिनतक्रार) उपभोग घेतलेल्या स्त्रीधनाविषयी पत्नी तक्रार करू शकणार नाही. १८ गांधर्व व आसुर विवाहांच्या संबंधात पतीने स्त्रीधन वापरल्यास त्याला ते व्याजासह परत करावयास लावले पाहिजे, राक्षस आणि पैशाच विवाहांत वापरल्यास ती चोरी होते म्हणून तदनुसार दंड द्यावा.

१९ पती मरण पावला असता धर्माचरणाने आयुष्य घालवू इच्छिणाऱ्या पत्नीला तिची वृत्ती, दागदागिने व शुल्काचा अवशिष्ट भाग तावडतोब मिळाला पाहिजे. २० ते मिळाल्यानंतर तिने जर दुसरे लग्न केले तर तिला ते सव्याज परत करायला लावले पाहिजे. २१ परंतु जर पुत्रोत्पत्ती व्हावी म्हणून ती दुसरे लग्न करू इच्छित असेल तर सासऱ्याने व (पहिल्या) पतीने दिलेल्या भेटी तिला मिळाल्या पाहिजेत. २२ पुनर्विवाहाचा काल दीर्घप्रवासावरील परिच्छेदात (पुढे ३.४.३७-४२ मध्ये) सांगू. २३ अथवा सासऱ्याच्या इच्छेविरुद्ध तिने दुसरा विवाह केला तर सासऱ्याने व पतीने दिलेल्या भेटी तिला परत करायला लावले पाहिजे.

**ज्ञातिहस्तादभिमृष्टाया ज्ञातयो यथागृहीतं दद्युः । २४ । न्यायोपगतायाः प्रतिपत्ता स्त्रीधनं गोपायेत् । २५ ।**

**पतिदायं विन्दमाना जीयेत । २६ । धर्मकामा भुञ्जीत । २७ । पुत्रवती विन्दमाना स्त्रीधनं जीयेत । २८ । तत्तु स्त्रीधनं पुत्रा हरेयुः । २९ । पुत्रभरणार्थं वा विन्दमाना पुत्रार्थं स्फातीकुर्यात् । ३० ।**

**बहुपुरुषप्रजानां पुत्राणां यथापितृदत्तं स्त्रीधनमवस्थापयेत् । ३१ । कामकरणीयमपि स्त्रीधनं विन्दमाना पुत्रसंस्थं कुर्यात् । ३२ ।**

**अपुत्रा पतिशयनं पालयन्ती गुरुसमीपे स्त्रीधनमायुःक्षयाद् भुञ्जीत । ३३ । आपदर्थं हि स्त्रीधनम् । ३४ । ऊर्ध्वं दायादं गच्छेत् । ३५ ।**

**जीवति भर्तरि मृतायाः पुत्रा दुहितरश्च स्त्रीधनं विभजेरन्, अपुत्राया दुहितरः, तदभावे भर्ता । ३६ । शुल्कमन्वाधेयमन्यद्वा बन्धुभिर्दत्तं बान्धवा हरेयुः । ३७ । इति स्त्रीधनकल्पः ।**

२४ तिच्या नातेवाइकांच्या ताब्यातून तिला काढून नेल्यास तिच्या (नव्या) नातेवाइकांनी तिला (पहिल्या लग्नाच्या वेळी) ज्याच्याकडून जे मिळाले असेल ते त्याला परत केले पाहिजे. २५ जर तिचे दुसरे लग्न रीतसर झाले असेल तर तिच्या दुसऱ्या पतीने (पहिल्या विवाहाचे) स्त्रीधन जपून ठेवावे.

२६ पतीची वारस म्हणून मिळालेली मालमत्ता दुसरे लग्न करताना तिने परत केली पाहिजे. २७ धर्माचरणात आयुष्य घालवू इच्छील तर तिचा उपभोग घ्यावा. २८ पुत्र असताही तिने पुनर्विवाह केला तर तिला स्त्रीधन देऊन टाकावयास लावले पाहिजे. २९ परंतु ते स्त्रीधन तिच्या पुत्रांना मिळावे. ३० अथवा पुत्रांच्या पालनपोषणासाठी ती पुनर्विवाह करीत असेल तर त्यांच्यासाठी तिने स्त्रीधनाची वाढ केली पाहिजे.

३१ अनेक पतींपासून झालेले पुत्र असतील तर त्या त्या पतीपासून मिळालेले स्त्रीधन त्याच्या त्याच्या पुत्रांना मिळण्याची व्यवस्था केली पाहिजे. ३२ तिला हवा तसा वापर करण्याची मुभा असलेले स्त्रीधन सुद्धा दुसरे लग्न करताना तिने पुत्रांच्या नावे ठेवले पाहिजे.

३३ पुत्र नसलेल्या स्त्रीने पातिव्रत्याने राहून वडीलधाऱ्या माणसांच्या संनिध आयुष्याच्या अंतापर्यंत स्त्रीधनाचा उपभोग घ्यावा. ३४ कारण, आपत्कालासाठीच स्त्रीधन अभिप्रेत असते. ३५ तिच्या मृत्यूनंतर तिच्या वारसांना ते मिळावे.

३६ पती जिवंत असता स्त्री मरण पावली तर मुलगे व मुली यांनी तिचे स्त्रीधन आपसात वाटून घ्यावे, मुलगे नसल्यास मुलींनी, संततीच नसल्यास

**वर्षाण्यष्टावप्रजायमानामपुत्रां वन्ध्यां चाकाङक्षेत, दश निन्दुम्, द्वादश कन्याप्रसविनीम् । ३८ । ततः पुत्रार्थी द्वितीयां विन्देत । ३९ । तस्यातिक्रमे शुल्कं स्त्रीधनमर्धं चाधिवेदनिकं दद्यात्, चतुर्विशतिपणपरं च दण्डम् । ४० । शुल्कं स्त्रीधनम् अशुल्कस्त्रीधनायास्तत्प्रमाणमाधिवेदनिकम् अनुरूपां च वृत्तिं दत्त्वा बह्वीरपि विन्देत । ४१ । पुत्रार्था हि स्त्रियः । ४२ ।**

**तीर्थसमवाये चासां यथाविवाहं पूर्वोढां जीवत्पुत्रां वा पूर्वं गच्छेत् । ४३ । तीर्थगूहनागमने षण्णवतिर्दण्डः । ४४ । पुत्रवतीं धर्मकामां वन्ध्यां निन्दुं नीरजस्कां वा नाकामामुपेयात् । ४५ । न चाकामः पुरुषः कुष्ठिनीमुन्मत्तां वा गच्छेत् । ४६ । स्त्री तु पुत्रार्थमेवंभूतं वोपगच्छेत् । ४७ ।**

नवऱ्याने ते घ्यावे. ३७ शुल्क, विवाहानंतर मिळालेल्या भेटी आणि बांधवांनी दुसरे जे काही दिले असेल ते त्या बांधवांनी घेऊन जावे. हे झाले स्त्रीधनाविषयीचे नियम.

३८ पत्नीला संतती होत नसेल किंवा पुत्र होत नसेल किंवा ती वंध्या असेल तर पतीने आठ वर्षे वाट पहावी, जन्मताच संतती मरत असेल तर दहा वर्षे आणि तिला मुलीच होत असतील तर बारा वर्षे वाट पहावी. ३९ त्यानंतर पुत्राच्या कामनेने त्याने दुसरी पत्नी करावी. ४० ह्या नियमांचे उल्लंघन केल्यास त्याने शुल्क, स्त्रीधन व त्याच्या अर्ध्याइतके आधिवेदनिक (दुसरे लग्न केल्याबद्दल पहिल्या पत्नीला द्यावयाची भरपाईची रक्कम) तिला देऊन सरकारला चोवीस पणांपर्यंत दंड द्यावा. ४१ शुल्क, स्त्रीधन, – जिला शुल्क व स्त्रीधन मिळालेले नाही तिला तेवढ्याच प्रमाणात आधिवेदनिक – आणि उपजीविकेसाठी अनुरूप वृत्ती, एवढे देऊन त्याने अनेक स्त्रियांशी लग्न करावयास हरकत नाही. ४२ कारण, स्त्रिया पुत्रप्राप्तीसाठी (आवश्यक) असतात.

४३ जेव्हा ह्यांपैकी अनेक पत्नींचा ऋतुकाळ एकाच वेळी येईल तेव्हा विवाहांच्या कालानुसार अगोदर विवाह केलेल्या पत्नीशी अथवा जिवंत पुत्र असलेल्या पत्नीशी अगोदर समागम करावा. ४४ ऋतुकाल लपवून ठेवल्यास अथवा समागम न केल्यास शहाण्णव पण दंड करावा. ४५ पुत्र असलेल्या, धर्माचरण करू इच्छिणाऱ्या, वंध्या, मृत संततीस जन्म देणाऱ्या, ऋतू येण्याचे बंद झालेल्या अशा पत्नीशी तिची इच्छा नसताना समागम करू नये. ४६ आणि इच्छा नसताना पतीने कुष्ठ झालेल्या अथवा वेड लागलेल्या स्त्रीशी समागम करू नये. ४७ परंतु स्त्रीने पुत्रासाठी अशा पतीबरोबरही संबंध ठेवावा.

**नीचत्वं परदेशं वा प्रस्थितो राजकिल्बिषी ।**
**प्राणाभिहन्ता पतितस्त्याज्यः क्लीबोऽपि वा पतिः ।। ४८ ।।**

**इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे विवाहसंयुक्ते विवाहधर्मः स्त्रीधनकल्प आधिवेदनिकं च द्वितीयोऽध्यायः । आदित एकोनषष्टितमः ।**

**३**

## [ एकोनषष्टितमं प्रकरणम् – विवाहसंयुक्तम्, तत्र शुश्रूषा, भर्म पारुष्यम्, द्वेषः, अतीचारः, उपकारव्यवहारप्रतिषेधश्च ]

**द्वादशवर्षा स्त्री प्राप्तव्यवहारा भवति, षोडशवर्षः पुमान् । १ । अत ऊर्ध्वमशुश्रूषायां द्वादशपणः स्त्रिया दण्डः, पुंसो द्विगुणः । २ । इति शुश्रूषा ।**

**भर्मण्यायामनिर्दिष्टकालायां ग्रासाच्छादनं वाऽधिकं यथापुरुषपरिवापं सविशेषं दद्यात् । ३ । निर्दिष्टकालायां तदेव संख्याय बन्धं च दद्यात् । ४ । शुल्कस्त्रीधनाधिवेदनिकानामनादाने च । ५ । श्वशुरकुलप्रविष्टायां विभक्तायां वा नाभियोज्यः पतिः । ६ । इति भर्म ।**

४८ अधोगतीला गेलेला, परदेशात गेलेला, राजाचा अपराध केलेला (राजद्रोही), तिच्या प्राणावर उठलेला, पतित झालेला अथवा नपुसक असलेला, अशा पतीचा त्याग करण्यास हरकत नाही.

## तिसरा अध्याय

### प्रकरण ५९ (पुढे चालू) : दांपत्यधर्म; पोटगी; निष्ठुर वर्तन; तिटकारा; दुर्वर्तन; भेटी देणेघेणे व व्यवहार करणे यांना प्रतिबंध

१ बारा वर्षांची झाली म्हणजे स्त्री व्यवहारास योग्य (सज्ञान) होते, सोळा वर्षाचा झाला म्हणजे पुरुष. २ त्यानंतर दांपत्यधर्माचे पालन न केल्यास स्त्रीला बारा पण दंड करावा, पुरुषाला त्याच्या दुप्पट. हा झाला दांपत्यधर्म.

३ जेव्हा (नवऱ्याशी संबंध न ठेवणाऱ्या पत्नीला द्यावयाच्या) पोटगीसाठी हप्त्याहप्त्याचा काल ठरवून दिला नसेल तेव्हा (तिच्यापुरते) अन्नवस्त्र किंवा तिचा परिवार असेल त्याप्रमाणे जास्त विशेष प्रकारचे द्यावे. ४ जर तो काल ठरविला असेल तर तेवढेच हिशोब करून आणि हप्त्याहप्त्याने द्यावे. ५ आणि पत्नीला शुल्क, स्त्रीधन व नवऱ्याने दुसरे लग्न करताना द्यावयाची भरपाई मिळाली नसेल तेव्हाही (हप्त्याहप्त्याने द्यावयाचे कबूल करावे). ६ पत्नी सासऱ्याच्या कुटुंबात रहात असेल किंवा विभक्त झाली असेल तर तिला नवऱ्यावर (पोटगीबद्दल) दावा लावता येणार नाही. हा झाला पोटगीचा विषय.

'नष्टे' 'विनष्टे' 'न्यङ्गे' 'अपितृके' 'अमातृके' इत्यनिर्देशेन विनय-ग्राहणम् । ७ । वेणुदलरज्जुहस्तानामन्यतमेन वा पृष्ठे त्रिराघातः । ८ । तस्याति-क्रमे वाग्दण्डपारुष्यदण्डाभ्यामर्धदण्डाः । ९ । तदेव स्त्रिया भर्तरि प्रसिद्धदोषायाः । १० । ईर्ष्यया बाह्यविहारेषु द्वारेष्वत्ययो यथानिर्दिष्टः । ११ । इति पारुष्यम् ।

भर्तारं द्विषती स्त्री सप्तार्तवान्यमण्डयमाना तदानीमेव स्थाप्याभरणं निधाय भर्तारमन्यया सह शयानमनुशयीत । १२ । भिक्षुक्यन्वाधिज्ञातिकुलानामन्यतमे वा भर्ता द्विषन् स्त्रियमेकामनुशयीत । १३ । दृष्टलिङ्गे मैथुनापहारे सवर्णा-पसर्पोपगमे वा मिथ्यावादी द्वादशपणं दद्यात् । १४ ।

अमोक्ष्या भर्तुरकामस्य द्विषती भार्या, भार्यायाश्च भर्ता । १५ । परस्परं द्वेषा-न्मोक्षः । १६ । स्त्रीविप्रकाराद्वा पुरुषश्चेन्मोक्षमिच्छेद् यथागृहीतमस्यै

७ 'नष्ट झालेली', 'मेलेली', 'पांगळी', 'बिनबापाची', 'बिनआईची' इत्यादी दुर्वचनांनी न संबोधिता पत्नीला नीट वागावयास शिकवावे. ८ किंवा (जरूरच तर) चिरलेला बांबू, दोर किंवा हात यांनी तीनदा पाठीवर मारावे. ९ ह्या नियमांचे उल्लंघन केल्यास वाक्पारुष्य आणि दंडपारुष्य यांच्या बाबतीत (अध्याय ३.१८ व ३.१९ मध्ये) सांगितलेल्या दंडांच्या निम्मे दंड करावेत. १० तीच (निम्म्या दंडाची) शिक्षा जिने पतीचा उघडपणे अपराध केला असेल अशा स्त्रीला करावी. ११ जर ईर्ष्येने प्रवृत्त होऊन ती बाहेर भटकत असेल तर त्याप्रसंगी तिला सांगितल्याप्रमाणे शिक्षा करावी. हा झाला निष्ठुर वर्तनाचा विषय.

१२ नवऱ्याचा तिटकारा करणाऱ्या स्त्रीने जर सात ऋतुकाळांत दांपत्य-धर्माचे पालन केले नाही तर तिने तात्काळ आपली वृत्तीची रक्कम व दागदागिने काढून ठेवून नवऱ्याला दुसऱ्या स्त्रीबरोबर समागम करण्यास अनुमती दिली पाहिजे. १३ पत्नीचा तिटकारा करणाऱ्या नवऱ्याने तिला एकटीलाच परि-व्राजिकेजवळ अथवा पालकाच्या किंवा एखाद्या नातेवाइकाच्या कुटुंबात रहाण्यास परवानगी दिली पाहिजे. १४ (तिटकाऱ्याची) चिन्हे स्पष्ट दिसत असता, समागम नाकारला असता अथवा सवर्ण स्त्रीकडे गुप्तपणे दूती पाठ-विली असता ते नाकबूल करू लागला तर त्याने बारा पण दंड दिला पाहिजे.

१५ पती जर इच्छित नसेल तर तिटकारा करणाऱ्या पत्नीला घटस्फोट मिळणार नाही, तसेच तिटकारा करणाऱ्या नवऱ्यालाही पत्नीच्या इच्छेविरुद्ध घटस्फोट मिळणार नाही. १६ उभयतांना परस्पराबद्दल तिटकारा वाटत असेल तरच घटस्फोट मिळेल. १७ अथवा पत्नीच्या अपराधामुळे पतीला

**दद्यात् । १७ । पुरुषविप्रकाराद्वा स्त्री चेन्मोक्षमिच्छेन्नास्यै यथागृहीतं दद्यात् । १८ । अमोक्षो धर्मविवाहानाम् । १९ । इति द्वेषः ।**

**प्रतिषिद्धा स्त्री दर्पमद्यक्रीडायां त्रिपणं दण्डं दद्यात् । २० । दिवा स्त्रीप्रेक्षा-विहारगमने षट्पणो दण्डः, पुरुषप्रेक्षाविहारगमने द्वादशपणः । २१ । रात्रौ द्विगुणः । २२ ।**

**सुप्तमत्तप्रव्रजने भर्तुरदाने च द्वारस्य द्वादशपणः । २३ । रात्रौ निष्कसने द्विगुणः । २४ ।**

**स्त्रीपुंसयोर्मैथुनार्थेनाङ्गविचेष्टायां रहोऽश्लीलसंभाषायां वा चतुर्विंशतिपणः स्त्रिया दण्डः, पुंसो द्विगुणः । २५ । केशनीविदन्तनखालम्बनेषु पूर्वः साहसदण्डः, पुंसो द्विगुणः । २६ । शङ्कितस्थाने संभाषायां च पणस्थाने शिफादण्डः । २७ । स्त्रीणां ग्राममध्ये चण्डालः पक्षान्तरे पञ्च शिफा दद्यात् । २८ । पणिकं वा प्रहारं मोक्षयेत् । २९ । इत्यतीचारः ।**

घटस्फोट पाहिजे असेल तर तिचे जे काही घेतले असेल ते तिला परत दिले पाहिजे. १८ किंवा पतीच्या अपराधामुळे स्त्रीला घटस्फोट पाहिजे असेल तर तिचे घेतलेले तिला परत देऊ नये. १९ धार्मिक पद्धतीच्या (पहिल्या चार) विवाहप्रकारांत घटस्फोट नाही. हा झाला तिटकाऱ्याचा विषय.

२० प्रतिबंध केला असताही पत्नी जर दर्पाने मद्यपान व क्रीडा करील तर तिने तीन पण दंड दिला पाहिजे. २१ स्त्रियांनी केलेले नाटक पहाण्यास अथवा स्त्रियांसमवेत विहार (मौज) करण्यास दिवसा गेली तर सहा पण दंड, पुरुषांचे नाटक पहाण्यास अथवा पुरुषांबरोबर विहार करण्यास दिवसा गेली तर बारा पण दंड करावा. २२ रात्री गेली तर दंड दुप्पट करावेत.

२३ नवरा झोपलेला अथवा मद्याने बेहोश असता घराबाहेर गेल्यास, तसेच नवऱ्याला (रात्री) दार न उघडल्यास बारा पण दंड. २४ रात्री घराबाहेर पडल्यास दुप्पट दंड करावा.

२५ समागमाच्या उद्देशाने स्त्री व पुरुष एकांतात अंगचेष्टा करतील किंवा असभ्य भाषण करतील तर स्त्रीला चोवीस पण व पुरुषाला त्याच्या दुप्पट दंड करावा. २६ केस, निरी, दात व नख यांना किंवा यांनी स्पर्श केल्यास प्रथम साहसदंड करावा, पुरुषाला त्याच्या दुप्पट. २७ आणि संशयास्पद जागी संभाषण केल्यास पणाच्या दंडाऐवजी फटक्यांची शिक्षा करावी. २८ गावाच्या मधल्या चौकात चांडाळाने स्त्रियांच्या दोन बाजूंच्या मध्ये (म्हणजे पाठीवर) पाच फटके मारावेत. २९ किंवा फटक्यांच्या ऐवजी पण देऊन तिने आपली सुटका करून घ्यावी. हा झाला दुर्वर्तनाचा विषय.

प्रतिषिद्धयोः स्त्रीपुंसयोरन्योन्योपकारे क्षुद्रकद्रव्याणां द्वादशपणो दण्डः, स्थूलकद्रव्याणां चतुर्विंशतिपणः, हिरण्यसुवर्णयोश्चतुष्पञ्चाशत्पणः स्त्रिया दण्डः, पुंसो द्विगुणः । ३० । त एवागम्ययोरर्धदण्डाः, तथा प्रतिषिद्धपुरुषव्यवहारेषु च । ३१ । इति प्रतिषेधः ।

राजद्विष्टातिचाराभ्यामात्मापक्रमणेन च ।
स्त्रीधनानीतशुल्कानामस्वाम्यं जायते स्त्रियाः ।। ३२ ।।

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे विवाहसंयुक्ते शुश्रूषाभर्मपारुष्यद्वेषातीचारोपकारव्यवहारप्रतिषेधाश्च तृतीयोऽध्यायः । आदितः षष्टितमः ।

४

## [ एकोनषष्टितमं प्रकरणम् – विवाहसंयुक्तम्, तत्र निष्पतनम्, पथ्यनुसरणम्, ह्रस्वप्रवासः, दीर्घप्रवासश्च

पतिकुलान्निष्पतितायाः स्त्रियाः षट्पणो दण्डः, अन्यत्र विप्रकारात् । १ । प्रतिषिद्धायां द्वादशपणः । २ । प्रतिवेशगृहातिगतायाः षट्पणः । ३ । प्रातिवेशिकभिक्षुकवैदेहकानामवकाशभिक्षापण्यदाने द्वादशपणो दण्डः । ४ । प्रतिषिद्धानां

३० प्रतिबंध केला असताही स्त्री व पुरुष यांनी एकमेकास लहान वस्तू भेट दिल्यास बारा पण दंड, मोठ्या वस्तू भेट दिल्यास चोवीस पण, द्रव्य किंवा सोने दिल्यास चोपन पण, याप्रमाणे स्त्रीला दंड करावेत, पुरुषाला यांच्या दुप्पट दंड करावेत. ३१ हेच दंड निम्मे करावेत, जर त्या स्त्रीपुरुषातील शरीरसंबंध निषिद्ध मानला गेला असेल (उदा० भाऊ व बहीण) तर, तसेच मना केलेल्या पुरुषांबरोबर (खरेदी, उसनवारी इत्यादी) व्यवहार (स्त्रीने) केले तर (निम्मे दंड करावेत). हा झाला प्रतिबंधाचा विषय.

३२ राजद्रोह व दुर्वर्तन यांच्यामुळे आणि घरातून पळून गेल्यामुळे स्त्रीचे स्त्रीधन, (माहेराहून) आणलेल्या वस्तू व शुल्क यांवरील स्वामित्व नष्ट होते.

### चौथा अध्याय

### प्रकरण ५९ (पुढे चालू) : घराबाहेर पडणे; कोणाबरोबर जाणे; अल्प प्रवास ; दीर्घ प्रवास

१ नवऱ्याचे घर सोडून गेलेल्या स्त्रीला सहा पण दंड करावा, तिचा छळ होत असेल तर मात्र करू नये. २ मना केली असताही ती गेल्यास बारा पण दंड करावा. ३ घर सोडून ती शेजारच्या घरात गेली असेल तर सहा पण दंड. ४ शेजारी, भिक्षू आणि व्यापारी यांनी तिला (अनुक्रमे) आसरा, अन्न

पूर्वः साहसदण्डः । ५ । परगृहातिगतायाश्चतुर्विंशतिपणः । ६ । परभार्यावकाशदाने शत्यो दण्डः, अन्यत्रापद्भ्यः । ७ । वारणाज्ञानयोर्निर्दोषः । ८ ।

'पतिविप्रकारात् पतिज्ञातिसुखावस्थग्रामिकान्वाधिभिक्षुकीज्ञातिकुलानामन्यतममपुरुषं गन्तुमदोषः' इत्याचार्याः । ९ । सपुरुषं वा ज्ञातिकुलम् । १० । कुतो हि साध्वीजनस्य च्छलम् । ११ । सुखमेतदवबोद्धुम्, इति कौटिल्यः । १२ ।

प्रेतव्याधिव्यसनगर्भनिमित्तमप्रतिषिद्धमेव ज्ञातिकुलगमनम् । १३ । तन्निमित्तं वारयतो द्वादशपणो दण्डः । १४ । तत्रापि गूहमाना स्त्रीधनं जीयेत, ज्ञातयो वा छादयन्तः शुल्कशेषम् । १५ । इति निष्पतनम् ।

पतिकुलान्निष्पत्य ग्रामान्तरगमने द्वादशपणो दण्डः स्थाप्याभरणलोपश्च । १६ । गम्येन वा पुंसा सह प्रस्थाने चतुर्विंशतिपणः सर्वधर्मलोपश्च, अन्यत्र भर्मदानतीर्थ-

व माल दिल्यास त्यांना बारा पण दंड करावा. ५ मना केली असताही त्यांनी दिल्यास त्यांना प्रथम साहसदंड करावा. ६ घर सोडून ती परक्या मनुष्याच्या घरात गेली तर तिला चोवीस पण दंड करावा. ७ परक्याच्या पत्नीला आपल्या घरात आसरा देणाऱ्यास शंभर पण दंड करावा; याला आपत्कालचा अपवाद. ८ जर त्याने आपल्या घरात येण्यास प्रतिबंध केला असेल किंवा ती आल्याचे त्याला माहीत झाले नसेल तर तो निर्दोष ठरतो.

९ "पतीकडून होणाऱ्या छळामुळे पत्नी पतीचे नातेवाईक, विवाह जुळवून आणणारे, गावाचा प्रमुख, पालक, परिव्राजिका, माहेरचे नातेवाईक यांच्यापैकी एकाच्या पुरुष नसलेल्या कुटुंबात गेली तर त्यात काही दोष नाही," असे आचार्यांचे मत आहे. १० "त्यात पुरुष असले तरी नातेवाइकाच्या कुटुंबात जाण्यात दोष नाही. ११ साध्वी स्त्री कपटाने कशी वागेल ? १२ हे सहज समजण्यासारखे आहे," असे कौटिल्याचे मत आहे.

१३ मरण, आजार, संकट, बाळंतपण या कारणांसाठी आपल्या नातेवाइकांच्या घरी जाण्यास मुळीच हरकत नाही. १४ त्या कारणांस्तव जात असता नवऱ्याने प्रतिबंध केल्यास त्याला बारा पण दंड करावा. १५ पण तशा प्रसंगी ती तेथेच दडून राहिली तर तिचा स्त्रीधनावरील हक्क नाहीसा होईल, आणि तिला दडवून ठेवणाऱ्या नातेवाइकांना अवशिष्ट शुल्काला मुकावे लागेल. हा झाला घराबाहेर पडण्याचा विषय.

१६ पतीचे घर सोडून पत्नी दुसऱ्या गावी गेल्यास बारा पण दंड करावा आणि तिचा ठेवलेली वृत्ती व दागदागिने यांवरील हक्क नष्ट करावा. १७ किंवा ज्याच्याशी शरीरसंबंध निषिद्ध नाही अशा पुरुषाबरोबर ती (परगावी जाण्यास)

गमनाभ्याम् । १७ । पुंसः पूर्वः साहसदण्डः तुल्यश्रेयसोः, पापीयसो मध्यमः । १८ । बन्धुरदण्ड्यः । १९ । प्रतिषेधेऽर्धदण्डाः । २० । पथि व्यन्तरे गूढदेशाभिगमने मैथुनार्थेन शङ्कितप्रतिषिद्धाभ्यां वा पथ्यनुसरणे संग्रहणं विद्यात् । २१ ।

तालावचरचारणमत्स्यबन्धकलुब्धकगोपालकशौण्डिकानामन्येषां च प्रसृष्टस्त्रीकाणां पथ्यनुसरणमदोषः । २२ । प्रतिषिद्धे वा नयतः पुंसः स्त्रियो वा गच्छन्त्यास्त एवार्धदण्डाः । २३ । इति पथ्यनुसरणम् ।

ह्रस्वप्रवासिनां शूद्रवैश्यक्षत्रियब्राह्मणानां भार्याः संवत्सरोत्तरं कालमाकाङ्क्षेरन् अप्रजाताः, संवत्सराधिकं प्रजाताः । २४ । प्रतिविहिता द्विगुणं कालम् । २५ । अप्रतिविहिताः सुखावस्था बिभृयुः, परं चत्वारि वर्षाण्यष्टौ वा ज्ञातयः । २६ । ततो यथादत्तमादाय प्रमुञ्चेयुः । २७ ।

निघाली तर चोवीस पण दंड करावा आणि पोटगी व ऋतुकाली गमन या दोन गोष्टींखेरीज इतर सर्व धर्मावरील हक्क नष्ट करावा. १८ तो पुरुष त्याच वर्णाचा अथवा वरच्या वर्णाचा असेल तर त्याला प्रथम साहसदंड करावा, खालच्या वर्णाचा असेल तर मध्यम साहसदंड. १९ तो तिचा बांधव असेल तर त्याला दड करू नये. २० पण त्याला मना केलेली असेल तर निम्मा दंड करावा. २१ जर वाटेने जात असता मध्येच ती गुप्त ठिकाणी गेली अथवा शंकित किवा मना केलेल्या पुरुषाबरोबर मैथुनाच्या उद्देशाने गेली तर तो व्यभिचार समजावा (व यथोचित शिक्षा करावी).

२२ तालावर नाचणारे, चारण (भाट), मासे पकडणारे, पारधी, गाई पाळणारे, दारूचे गुत्तेवाले आणि ज्यांच्यात स्त्रियांना स्वातंत्र्य असते असे इतर लोक यांच्या बाबतीत पुरुषाबरोबर जाण्यात दोष नाही. २३ परंतु मना केलेली असल्यास बरोबर नेणाऱ्या पुरुषास व जाणाऱ्या स्त्रीस वरच्याच्या निम्मे दंड करावेत. हा झाला कोणाबरोबर जाण्याचा विषय.

२४ थोड्या मुदतीच्या प्रवासाला गेलेल्या शूद्र, वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण यांच्या भार्यांनी, त्यांना मूलबाळ झालेले नसल्यास (अनुक्रमे) एक, दोन, तीन व चार वर्षे वाट पहावी, मूलबाळ असल्यास एक एक वर्ष अधिक वाट पहावी. २५ निर्वाहाची सोय केलेली असेल तर दुप्पट वर्षे वाट पहावी. २६ ज्यांच्या निर्वाहाची तरतूद केलेली नसेल त्यांचे पालनपोषण (वरील मुदतीपर्यंत) सुखावस्थांनी (लग्न जुळवून त्यांच्या सुखाची हमी देणाऱ्यांनी) करावे, वरील मुदतीनंतर चार किंवा आठ वर्षे त्यांच्या नातेवाइकांनी पालनपोषण करावे. २७ त्यानंतर तिला दिले असेल ते ज्याचे त्याने परत घेऊन तिला (दुसरा विवाह करण्यास) मोकळीक द्यावी.

**ब्राह्मणमधीयानं दशवर्षाण्यप्रजाता, द्वादश प्रजाता, राजपुरुषमायुःक्षयादाका-ङ्क्षेत । २८ । सवर्णतश्च प्रजाता नापवादं लभेत । २९ ।**

कुटुम्बर्द्धिलोपे वा सुखावस्थैर्विमुक्ता यथेष्टं विन्देत, जीवितार्थमापद्गता वा । ३० ।

**धर्मविवाहात् कुमारी परिग्रहीतारमनाख्याय प्रोषितमश्रूयमाणं सप्त तीर्थान्याकाङ्क्षेत, संवत्सरं श्रूयमाणम् । ३१ । आख्याय प्रोषितमश्रूयमाणं पञ्च तीर्थान्याकाङ्क्षेत, दश श्रूयमाणम् । ३२ । एकदेशदत्तशुल्कं त्रीणि तीर्थान्यश्रूयमाणम्, श्रूयमाणं सप्त तीर्थान्याकाङ्क्षेत । ३३ । दत्तशुल्कं पञ्च तीर्थान्यश्रूयमाणम्, दश श्रूयमाणम् । ३४ । ततः परं धर्मस्थैर्विसृष्टा यथेष्टं विन्देत । ३५ । तीर्थोपरोधो हि धर्मवध इति कौटिल्यः । ३६ । इति ह्रस्वप्रवासः ।**

२८ अध्ययनासाठी ब्राह्मण परगावी गेला असल्यास पत्नीने, मूल झालेले नसल्यास, दहा वर्षे वाट पहावी, मूल असल्यास बारा वर्षे; तो राजाच्या नोकरीत असल्यास तिने आपल्या आयुष्याच्या अंतापर्यंत वाट पहावी. २९ आणि तिला त्याच वर्णाच्या पुरुषापासून मूल झाल्यास तिला दोष लावता येणार नाही.

३० जेव्हा कुटुंबाची संपत्ती संपुष्टात आली असेल तेव्हा सुखावस्थांनी मोकळीक दिल्यानंतर, किंवा संकटात सापडली असता निर्वाहासाठी, तिने आपल्या इच्छेप्रमाणे दुसरे लग्न करावे.

३१ धर्मविवाहाच्या संबंधात पती (गर्भाधानापूर्वी) कुमारी पत्नीला न कळविता प्रवासास गेला असल्यास व त्याची काही बातमी नसल्यास तिने सात ऋतुकालांपर्यंत वाट पहावी, जर बातमी असेल तर एक वर्षभर वाट पहावी. ३२ तिला कळवून गेला असल्यास, त्याची बातमी नसेल तर पाच ऋतुकालांपर्यंत, बातमी असेल तर दहा ऋतुकालांपर्यंत वाट पहावी. ३३ जर त्याने शुल्काचा काही अंशच दिला असेल तर बातमी नसेल तेव्हा तीन ऋतुकाल, बातमी असेल तेव्हा सात ऋतुकाल वाट पहावी. ३४ संपूर्ण शुल्क दिलेले असल्यास बातमी नसेल तेव्हा पाच आणि असेल तेव्हा दहा ऋतुकाल वाट पहावी. ३५ त्या मुदतीनंतर न्यायाधिशांनी मोकळीक दिली म्हणजे तिने इच्छेला येईल त्याप्रमाणे दुसरा विवाह करावा. ३६ कारण, ऋतुकाल व्यर्थ दवडणे म्हणजे धर्माचा नाश करणे होय असे कौटिल्याचे मत आहे. हा झाला अल्प मुदतीच्या प्रवासाचा विषय.

**दीर्घप्रवासिनः प्रव्रजितस्य प्रेतस्य वा भार्या सप्त तीर्थान्याकाङ्क्षेत, संवत्सरं प्रजाता । ३७ । ततः पतिसोदर्यं गच्छेत् । ३८ । बहुषु प्रत्यासन्नं धार्मिकं भर्मसमर्थं कनिष्ठमभार्यं वा । ३९ । तदभावेऽप्यसोदर्यं सपिण्डं कुल्यं वाऽऽसन्नम् । ४० । एतेषामेष एव क्रमः । ४१ ।**

**एतानुत्क्रम्य दायादान् वेदने जारकर्मणि ।**
**जारस्त्रीदातृवेत्तारः संप्राप्ताः संग्रहात्ययम् ।। ४२ ।।**

**इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे विवाहसंयुक्ते निष्पतनं पथ्यनुसरणं ह्रस्वप्रवासो दीर्घप्रवासश्च चतुर्थोऽध्यायः । आदित एकषष्टितमः । विवाहसंयुक्तं समाप्तम् ।**

**५**

**[ षष्टितमं प्रकरणम् – दायविभागः, तत्र दायक्रमः ]**

**अनीश्वराः पितृमन्तः स्थितपितृमातृकाः पुत्राः । १ । तेषाम् ऊर्ध्वं पितृतो दायविभागः पितृद्रव्याणाम् । २ ।**

३७ पती लांब मुदतीच्या प्रवासास गेला असेल, संन्याशी झाला असेल किंवा मरण पावला असेल तर त्याच्या पत्नीने सात ऋतुकालांपर्यंत वाट पहावी, मुले असल्यास एक वर्षभर. ३८ त्यानंतर तिने पतीच्या सख्ख्या भावाशी (विवाहपूर्वक) समागम करावा. ३९ अनेक भाऊ असल्यास (वयाने) पतीच्या निकटच्या भावाशी, धार्मिक भावाशी, तिचे पालनपोषण करण्यास समर्थ असलेल्या भावाशी किंवा लग्न न झालेल्या धाकटचा भावाशी (समागम करावा). ४० तसा भाऊ नसल्यास सख्खा नसलेल्याही भावाशी, सपिंड नातेवाइकाशी किंवा निकटच्या सगोत्र बांधवाशी (समागम करावा). ४१ यांच्या बाबतीत ह्याच क्रमाचे पालन केले पाहिजे.

४२ पतीच्या ह्या दायादांना सोडून तिने दुसऱ्या कोणाशी विवाह केल्यास (किंवा) जारकर्म केल्यास तो जार, ती स्त्री, तिचा विवाह लावून देणारा व तिच्याशी लग्न करणारा हे सगळे व्यभिचाराच्या शिक्षेस पात्र होतात.

पाचवा अध्याय

प्रकरण ६० : वडिलोपार्जित संपत्तीची वाटणी ; वारसाचा क्रम

१ पिता असलेल्या पुत्रांना – ज्यांचे आईबाप जिवंत आहेत अशांना संपत्तीवर मालकी हक्क नाही. २ पित्याच्या मृत्यूनंतर त्याच्या संपत्तीची त्यांच्यात विभागणी व्हावी.

स्वयमर्जितमविभाज्यम्, अन्यत्र पितृद्रव्यादुत्थितेभ्यः । ३ ।

पितृद्रव्यादविभक्तोपगतानां पुत्राः पौत्रा वा आ चतुर्थादित्यंशभाजः । ४ । तावदविच्छिन्नः पिण्डो भवति । ५ । विच्छिन्नपिण्डाः सर्वे समं विभजेरन् । ६ ।

अपितृद्रव्या विभक्तपितृद्रव्या वा सह जीवन्तः पुनर्विभजेरन् । ७ । यतश्चोत्तिष्ठेत स द्व्यंशं लभेत । ८ ।

द्रव्यमपुत्रस्य सोदर्या भ्रातरः सहजीविनो वा हरेयुः कन्याश्च । ९ ।

रिक्थं पुत्रवतः पुत्रा दुहितरो वा धर्मिष्ठेषु विवाहेषु जाताः । १० । तदभावे पिता धरमाणः । ११ । पित्रभावे भ्रातरो भ्रातृपुत्राश्च । १२ ।

अपितृका बहवोऽपि च भ्रातरो भ्रातृपुत्राश्च पितुरेकमंशं हरेयुः । १३ ।

सोदर्याणामनेकपितृकाणां पितृतो दायविभागः । १४ ।

३ जे स्वतः कमाविलेले असेल त्याची इतरांबरोबर वाटणी करता येणार नाही; याला अपवाद पैतृक धनाचा उपयोग करून जे कमाविले असेल त्याचा.

४ पैतृक संपत्तीतून (पूर्वी) वाटणी न होता आलेल्या द्रव्यांचा त्यांच्या वाटणीचा हिस्सा पुत्र, पौत्र व प्रपौत्र याप्रमाणे चौथ्या पिढीपर्यंत मिळतो. ५ कारण, त्या पिढीपर्यंत पिंड अविच्छिन्न रहातो. ६ (चौथ्या पिढीनंतर) पिंड विच्छिन्न झालेल्या वंशजांना एकसारखेच हिस्से मिळावेत.

७ ज्यांना पैतृक धन मिळाले नाही किंवा ज्यांनी पैतृक धनाची वाटणी करून घेतली आहे असे पुन्हा एकत्र राहू लागले तर त्यांनी पुन्हा वाटणी करून विभक्त होण्यास हरकत नाही. ८ आणि ज्याच्यामुळे समाईक संपत्ती उत्पन्न झाली असेल त्याला अशा वाटणीच्या वेळी दुप्पट हिस्सा मिळाला पाहिजे.

९ ज्याला पुत्र नाही अशा मनुष्याची मिळकत त्याच्या सख्ख्या भावांनी किंवा त्याच्याबरोबर एकत्र रहाणाऱ्या भावांनी आणि त्याच्या मुलींनी आपसात वाटून घ्यावी.

१० पुत्र असलेल्या मनुष्याची मालमत्ता पुत्रांना मिळावी किंवा (पुत्र नसल्यास) धर्मविवाहाची संतती असलेल्या मुलींना मिळावी. ११ त्यांच्या अभावी पिता जिवंत असल्यास त्याला मिळावी. १२ पिता नसल्यास त्याचे भाऊ व पुतणे यांना मिळावी.

१३ आणि पिता नसलेले भाऊ आणि पुतणे अनेक असले तरी त्यांनी त्यांच्या पित्याला जो एक हिस्सा मिळाला असता तोच आपसात वाटून घ्यावा.

१४ अनेक पित्यांपासून झालेल्या एका स्त्रीच्या मुलांनी त्यांच्या त्यांच्या पित्याची संपत्ती आपसात वाटून घ्यावी.

पितृभ्रातृपुत्राणां पूर्वे विद्यमाने नापरमवलम्बन्ते, ज्येष्ठे च कनिष्ठमर्थग्राहिणम् । १५ ।

जीवद्विभागे पिता नैकं विशेषयेत् । १६ । न चैकमकारणान्निर्विभजेत । १७ ।
पितुरसत्यर्थे ज्येष्ठाः कनिष्ठाननुगृह्णीयुः, अन्यत्र मिथ्यावृत्तेभ्यः । १८ ।

प्राप्तव्यवहाराणां विभागः । १९ । अप्राप्तव्यवहाराणां देयविशुद्धं मातृबन्धुषु ग्रामवृद्धेषु वा स्थापयेयुः आ व्यवहारप्रापणात्, प्रोषितस्य वा । २० ।

संनिविष्टसममसंनिविष्टेभ्यो नैवेशनिकं दद्युः, कन्याभ्यश्च प्रादानिकम् । २१ ।
ऋणरिक्थयोः समो विभागः । २२ ।

'उदपात्राण्यपि निष्किंचना विभजेरन्' इत्याचार्याः । २३ । छलमेतदिति कौटिल्यः । २४ । सतोऽर्थस्य विभागो नासतः । २५ ।

१५ पिता, भ्राता आणि पुत्र यांपैकी अगोदरचा हयात असता नंतरच्यावर (इतर) अवलंबून असत नाहीत आणि ज्येष्ठ भ्राता हयात असता कनिष्ठावर, तो मिळविता असला तरी, अवलंबून असत नाहीत.

१६ आपल्या हयातीत वाटण्या करताना पित्याने कोणाला विशेष देऊ नये.
१७ आणि योग्य कारणाशिवाय कोणाच्या वाटणीचा हक्क बुडवू नये.

१८ पित्याची काही मालमत्ता नसेल तर मोठ्या भावांनी धाकट्यांचा – दुराचरणी असतील त्यांचा अपवाद वगळता – सांभाळ केला पाहिजे.

१९ वयात आले असतील त्यांच्यात वाटण्या होतात. २० जे वयात आले नसतील त्यांचा कर्जबोजारहित वाटा ते वयात येईपावेतो आईच्या बांधवांकडे किंवा गावातील वडीलधाऱ्यांकडे ठेवावा; जो प्रवासास गेला असेल त्याचाही वाटा असाच ठेवावा.

२१ विवाहितांच्या लग्नाप्रीत्यर्थ जो खर्च झाला असेल तितकीच रक्कम अविवाहितांना त्यांच्या लग्नासाठी म्हणून अधिक द्यावी; तसेच मुलींना त्यांच्या विवाहासाठी तितकीच रक्कम द्यावी.

२२ कर्ज आणि मालमत्ता यांची सर्वांत एकसारखी विभागणी करावी.

२३ "निष्कांचन असले तरी त्यांनी पाण्याच्या भांड्यांचीसुद्धा वाटणी करावी," असे आचार्यांचे म्हणणे आहे. २४ कौटिल्याचे म्हणणे असे की हा निव्वळ शब्दच्छल आहे. २५ असलेल्या द्रव्याची वाटणी होते, नसलेल्याची नाही.

एतावानर्थः सामान्यस्तस्यैतावान्प्रत्यंश इत्यनुभाष्य ब्रुवन् साक्षिषु विभागं कारयेत् ।२६। दुर्विभक्तमन्योन्यापहृतमन्तर्हितमविज्ञातोत्पन्नं वा पुनर्विभजेरन् । २७।

अदायादकं राजा हरेत् स्त्रीवृत्तिप्रेतकार्यवर्जम्, अन्यत्र श्रोत्रियद्रव्यात् । २८। तत्त्रैविद्येभ्यः प्रयच्छेत् । २९ ।

पतितः पतिताज्जातः क्लीबश्चानंशा, जडोन्मत्तान्धकुष्ठिनश्च । ३०। सति भार्यार्थे तेषामपत्यमतद्विधं भागं हरेत् । ३१। ग्रासाच्छादनमितरे पतितवर्जाः । ३२ ।

तेषां च कृतदाराणां लुप्ते प्रजनने सति ।
सृजेयुर्बान्धवाः पुत्रांस्तेषामंशान् प्रकल्पयेत् ।। ३३ ।।

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे दायविभागे दायक्रमः पञ्चमोऽध्यायः ।
आदितो द्विषष्टितमः ।

२६ ही इतकी मालमत्ता समाईक आहे, तिचा हा प्रत्येकाच्या वाटणीचा इतका भाग याप्रमाणे साक्षिदारांसमोर स्पष्ट शब्दात निर्देश करून वाटण्या कराव्यात. २७ वाटणी चुकीची झाली असेल, एकमेकांनी काही गडप केले असेल, काही लपवून ठेवलेले असेल अथवा अगोदर माहीत नसलेले नंतर उघडकीस आले असेल तर वाटण्या पुन्हा कराव्यात.

२८ वारस नसलेली मालमत्ता – स्त्रीच्या उपजीविकेची रक्कम व प्रेतकार्यासाठी करावयाचा खर्च यांचा अपवाद वगळता – सरकारजमा करावी. याला श्रोत्रिय ब्राह्मणाच्या मालमत्तेचा अपवाद आहे. २९ ती तीन वेदांत पारंगत असणाऱ्या ब्राह्मणांना द्यावी.

३० पतित झालेला, पतिताचा मुलगा आणि नपुसक यांना वाटणी नाही, तशीच ती खुळा, वेडा, आंधळा व कुष्ठरोगी यांनाही नाही. ३१ ह्या दुसऱ्या प्रकारच्यांना पत्नी असल्यास त्यांच्या स्वत:सारख्या (खुळा इत्यादी) नसलेल्या अपत्यांना वाटा मिळाला पाहिजे. ३२ इतरांना – पतिताचा अपवाद बगळता – अन्नवस्त्र मिळावे.

३३ आणि जर लग्न केल्यानंतर त्यांची प्रजननशक्ती नष्ट झाली तर त्यांच्या बांधवांनी त्यांच्यासाठी पुत्रोत्पत्ती करावी व त्यांना त्यांचे हिस्से द्यावेत.

## ६

### [ षष्टितमं प्रकरणम् – दायविभागः, तत्र अंशविभागः ]

एकस्त्रीपुत्राणां ज्येष्ठांशः – ब्राह्मणानामजाः, क्षत्रियाणामश्वाः, वैश्यानां गावः, शूद्राणामवयः । १ । काणलङ्गास्तेषां मध्यमांशः, भिन्नवर्णाः कनिष्ठांशः । २ । चतुष्पदाभावे रत्नवर्जानां दशानां भागं द्रव्याणामेकं ज्येष्ठो हरेत् । ३ । प्रतिमुक्तस्वधापाशो हि भवति । ४ । इत्यौशनसो विभागः । ५ ।

पितुः परिवापाद् यानमाभरणं च ज्येष्ठांशः, शयनासनं भुक्तकांस्यं च मध्यमांशः, कृष्णं धान्यायसं गृहपरिवापो गोशकटं च कनिष्ठांशः । ६ । शेषद्रव्याणामेकद्रव्यस्य वा समो विभागः । ७ ।

अदायादा भगिन्यः, मातुः परिवापाद् भुक्तकांस्याभरणभागिन्यः । ८ ।

मानुषहीनो ज्येष्ठस्तृतीयमंशं ज्येष्ठांशाल्लभेत, चतुर्थमन्यायवृत्तिः, निवृत्तधर्मकार्यो वा । ९ । कामाचारः सर्वं जीयेत । १० । तेन मध्यमकनिष्ठौ

### सहावा अध्याय

### प्रकरण ६० (पुढे चालू) : हिश्शांत विभागणी

१ एकाच पत्नीपासून झालेल्या पुत्रांमध्ये ज्येष्ठ मुलाचा विशेष वाटा याप्रमाणे – ब्राह्मणांस बोकड, क्षत्रियांस घोडे, वैश्यांस गाईबैल, शूद्रांस मेंढ्या. २ त्यांपैकी काणी व लंगडी जनावरे हा मधल्या मुलाचा विशेष वाटा, मिश्र रंगाची जनावरे धाकट्या मुलाचा. ३ जनावरे नसतील तर रत्ने खेरीजकरून इतर द्रव्यांचा एकदशांश भाग ज्येष्ठ पुत्राने घ्यावा. ४ कारण, पितरांना पिंड देण्याचे कार्य त्याच्याच अंगावर पडलेले असते. ५ ही झाली औशनसांनी सांगितलेली विभागणी.

६ पित्याच्या स्वतःच्या वापरातील वस्तूंपैकी गाडी व अंगावरील अलंकार हा ज्येष्ठ पुत्राचा भाग, बिछाना व आसन आणि जेवावयाचे काशाचे ताट मधल्या मुलाचा भाग, काळे धान्य, लोखंडी वस्तू, घरातील चिजा आणि बैलगाडी धाकट्या मुलाचा भाग. ७ बाकी राहिलेल्या वस्तूंची आणि (समाईक ठरवावयाच्या विहीर इत्यादी) एकाच वस्तूची सारखी वाटणी करावी.

८ बहिणींना वारसाहक्क नाही; त्यांना आईच्या स्वतःच्या वापरातील जेवावयाचे काशाचे ताट आणि दागिने हा भाग मिळावा.

९ कर्तबगारी नसलेल्या ज्येष्ठ पुत्राला त्याला मिळावयाच्या विशेष वाट्याचा एकतृतीयांश भागच मिळावा, तो अन्यायाने वागणारा असेल किंवा धर्मकार्य करण्याचे त्याने सोडून दिले असेल तर एकचतुर्थांश भागच मिळावा. १० तो

व्याख्यातौ । ११ । तयोर्मानुषोपेतो ज्येष्ठांशादर्धं लभेत । १२

नानास्त्रीपुत्राणां तु संस्कृतासंस्कृतयोः कन्याकृतक्षतयोरभावे च एकस्याः पुत्रयोर्यमयोर्वा पूर्वजन्मना ज्येष्ठभावः । १३ ।

सूतमागधव्रात्यरथकाराणामैश्वर्यतो विभागः । १४ । शेषास्तमुपजीवेयुः । १५ । अनीश्वराः समविभागाः । १६ ।

चातुर्वर्ण्यपुत्राणां ब्राह्मणीपुत्रश्चतुरोंऽशान् हरेत्, क्षत्रियापुत्रस्त्रीनंशान्, वैश्यापुत्रो द्वावंशौ, एकं शूद्रापुत्रः । १७ । तेन त्रिवर्णद्विवर्णपुत्रविभागः क्षत्रियवैश्ययोर्व्याख्यातः । १८ ।

ब्राह्मणस्यानन्तरापुत्रस्तुल्यांशः । १९ । क्षत्रियवैश्ययोरर्धांशः तुल्यांशो वा मानुषोपेतः । २० ।

स्वैराचारी असेल तर काहीही विशेष मिळू नये. ११ हेच नियम मध्यम व कनिष्ट यांनाही लागू आहेत. १२ त्यांच्यापैकी जो कर्तबगार असेल त्याला ज्येष्टाच्या विशेष वाटयाच्या अर्ध्याइतका विशेष वाटा मिळावा.

१३ परंतु जेव्हा अनेक स्त्रियांपासून झालेले पुत्र असतील तेव्हा एक धार्मिक संस्कारांनी विवाहित व दुसरी तशी नसलेली, एक अक्षतयोनी असता व दुसरी क्षतयोनी असता विवाहित, अशा परिस्थितीच्या अभावी एकीच्या मुलांमध्ये अथवा जुळ्या मुलांत अगोदर जन्मलेला तो ज्येष्ठ.

१४ सूत, मागध, व्रात्य आणि रथकार यांच्या संबंधात व्यवसायातील नैपुण्याच्या अनुरोधाने वाटणी व्हावी. १५ इतर मुलांनी त्याच्या आश्रयाने रहावे. १६ जर कोणीच निपुण नसेल तर (सर्व भावांत) सारखी वाटणी करावी.

१७ चार वर्णांच्या स्त्रियांपासून झालेल्या पुत्रांपैकी ब्राह्मण स्त्रीच्या पुत्राला चार भाग मिळावेत, क्षत्रिय स्त्रीच्या पुत्राला तीन भाग, वैश्य स्त्रीच्या पुत्राला दोन भाग आणि शूद्र स्त्रीच्या पुत्राला एक भाग. १८ क्षत्रिय व वैश्य यांना (अनुक्रमे) तीन व दोन वर्णांच्या स्त्रियांपासून झालेल्या पुत्रांच्या बाबतीत ह्याच प्रमाणात ( ३ : २ : १ आणि २ : १ ) वाटणी करावी.

१९ ब्राह्मणाला नंतरच्या वर्णाच्या (क्षत्रिय) स्त्रीपासून झालेल्या पुत्राला (ब्राह्मणीपुत्राच्या) बरोबरीने वाटा मिळावा. २० क्षत्रिय व वैश्य यांच्या तशा पुत्राला अर्धा वाटा, पण तो कर्तबगार असेल तर बरोबरीने वाटा मिळावा.

तुल्यातुल्ययोरेकपुत्रः सर्वं हरेत्, बन्धूंश्च बिभृयात् । २१ । ब्राह्मणानां तु पारशवस्तृतीयमंशं लभेत, द्वावंशौ सपिण्डः कुल्यो वाऽऽसन्नः, स्वधादानहेतोः । २२ । तदभावे पितुराचार्योऽन्तेवासी वा । २३ ।

क्षेत्रे वा जनयेदस्य नियुक्तः क्षेत्रजं सुतम् ।
मातृबन्धुः सगोत्रो वा तस्मै तत्प्रदिशेद्धनम् ।। २४ ।।

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे दायविभागेंऽशविभागः षष्ठोऽध्यायः । आदितस्त्रिषष्टितमः ।

७

[ षष्टितमं प्रकरणम् – दायविभागः, तत्र पुत्रविभागः ]

' परपरिग्रहे बीजमुत्सृष्टं क्षेत्रिणः ' इत्याचार्याः । १ । ' माता भस्त्रा, यस्य रेतस्तस्यापत्यम् ' इत्यपरे । २ । विद्यमानमुभयत्रिति कौटिल्यः । ३ ।

स्वयंजातः कृतक्रियायाम् औरसः । ४ । तेन तुल्यः पुत्रिकापुत्रः । ५ ।

२१ त्याच वर्णाची व भिन्न वर्णाची अशा दोन पत्नीमध्ये एकच पुत्र असेल तर तोच वारसदार होईल; आणि त्याने बांधवांचे पालनपोषण केले पाहिजे. २२ परंतु ब्राह्मणाचा शूद्र स्त्रीपासून झालेलाच पुत्र असेल तर त्याला फक्त एकतृतीयांश भाग मिळावा, दोन भाग पिंडदान करता यावे या कारणास्तव सपिंडाला अथवा जवळच्या सगोत्राला मिळावेत. २३ तसे कोणी नसल्यास ते दोन भाग पित्याच्या गुरूला अथवा शिष्याला मिळावेत.

२४ किंवा मातेचा बांधव अथवा सगोत्र असलेल्या पुरुषाने नियोगपद्धतीने त्या मृताच्या पत्नीपासून क्षेत्रज पुत्र उत्पन्न करावा आणि त्याच्या वाटणीचे ते धन असे ठरवून द्यावे.

## सातवा अध्याय

### प्रकरण ६० (पुढे चालू) : पुत्रांची वर्गवारी

१ " दुसऱ्याच्या क्षेत्रात टाकलेले बीज त्या क्षेत्राच्या मालकाचे, " असे (काही) आचार्यांचे मत आहे. २ " माता म्हणजे केवळ धारण करणारी थैली आहे; ज्याचे रेत त्याचेच अपत्य," असे दुसरे (आचार्य) मानतात. ३ दोन्ही रूढी प्रचलित आहेत असे कौटिल्याचे म्हणणे आहे.

४ संस्कारयुक्त विधीने विवाहित झालेल्या पत्नीपासून स्वतःला झालेला पुत्र तो औरस पुत्र. ५ पुत्र म्हणून मानलेल्या मुलीचा मुलगा औरस पुत्रासमान होय.

सगोत्रेणान्यगोत्रेण वा नियुक्तेन क्षेत्रजातः क्षेत्रजः पुत्रः । ६ । जनयितुरसत्यन्यस्मिन् पुत्रे स एव द्विपितृको द्विगोत्रो वा द्वयोरपि स्वधारिक्थभाग्भवति । ७ । तत्सधर्मा बन्धूनां गृहे गूढजातस्तु गूढजः । ८ ।

बन्धुनोत्सृष्टोऽपविद्धः संस्कर्तुः पुत्रः । ९ । कन्यागर्भः कानीनः । १० । सगर्भोढायाः सहोढः । ११ ।

पुनर्भूतायाः पौनर्भवः । १२ । स्वयंजातः पितुर्बन्धूनां च दायादः । १३ । परजातः संस्कर्तुरेव न बन्धूनाम् । १४ । तत्सधर्मा मातापितृभ्यामद्भिर्मुक्तो दत्तः । १५ ।

स्वयं बन्धुभिर्वा पुत्रभावोपगत उपगतः । १६ । पुत्रत्वेऽधिकृतः कृतकः । १७ । परिक्रीतः क्रीतः । इति । १८ ।

औरसे तूत्पन्ने सवर्णास्तृतीयांशहराः, असवर्णा ग्रासाच्छादनभागिनः । १९ ।

६ नियोगासाठी नियुक्त केलेल्या त्याच गोत्रातील किंवा अन्य गोत्रातील पुरुषाने स्त्रीपासून उत्पन्न केलेला तो (तिच्या पतीचा) क्षेत्रज पुत्र. ७ उत्पन्न करणाऱ्याला दुसरा कोणता पुत्र नसल्यास हाच दोघांचाही पुत्र होतो, दोघांच्याही गोत्रांत समाविष्ट (व्द्यामुष्यायण) होतो, दोघांनाही पिंड देऊन दोघांचा वारसदार होतो. ८ बांधवांच्या घरी गुप्तपणे झालेला गूढज पुत्र, त्याचे हक्क व कर्तव्ये क्षेत्रजासमानच.

९ बांधवाने टाकून दिलेला तो अपविद्ध, त्याचे (उपनयनादी) संस्कार करणाऱ्याचा तो पुत्र. १० कुमारी मुलीस झालेला पुत्र तो कानीन. ११ गरोदर असता विवाह झालेल्या स्त्रीचा पुत्र सहोढ.

१२ पुर्नविवाहित स्त्रीचा पुत्र पौनर्भव. १३ तो जर (दुसऱ्या पतीचा) स्वतःचा असेल तर तो पित्याचा व त्याच्या बांधवांचा वारसदार होतो. १४ जर तो दुसऱ्या कोणाचा असेल तर त्याचे (उपनयनादी) संस्कार करणाऱ्याचाच तो वारसदार होतो, त्याच्या बांधवांचा नाही. १५ त्याच्याच सारखे धर्म असलेला दत्त, मातापित्यांनी उदकपूर्वक दान केलेला.

१६ स्वतः होऊन किंवा बांधवांमार्फत कोणाचे पुत्रपद स्वीकारणारा तो उपगत. १७ पुत्राचे अधिकार देऊन केलेला तो कृतक. १८ विकत घेतलेला तो क्रीत पुत्र.

१९ परंतु औरस पुत्र झाला तर दुसऱ्या पुत्रांपैकी जे सवर्ण असतील त्यांना एकतृतीयांश हिस्सा मिळावा, जे सवर्ण नसतील त्यांना फक्त अन्नवस्त्र मिळावे.

ब्राह्मणक्षत्रिययोरनन्तरापुत्राः सवर्णाः, एकान्तरा असवर्णाः । २० । ब्राह्मणस्य वैश्यायामम्बष्ठः, शूद्रायां निषादः पारशवो वा । २१ । क्षत्रियस्य शूद्रायामुग्रः । २२ । शूद्र एव वैश्यस्य । २३ । सवर्णासु चैषामचरितव्रतेभ्यो जाता व्रात्याः । २४ । इत्यनुलोमाः । २५ ।

शूद्रादायोगवक्षत्तचण्डालाः । २६ । वैश्यान्मागधवैदेहकौ । २७ । क्षत्रियात्सूतः । २८ । पौराणिकस्त्वन्यः सूतो मागधश्च, ब्रह्मक्षत्राद्विशेषः । २९ । त एते प्रतिलोमाः स्वधर्मातिक्रमाद्राज्ञः संभवन्ति । ३० ।

उग्रान्नैषाद्यां कुक्कुटः, विपर्यये पुल्कसः । ३१ । वैदेहिकायामम्बष्ठाद् वैणः, विपर्यये कुशीलवः । ३२ । क्षत्तायामुग्राच्छ्वपाकः । ३३ । इत्येतेऽन्ये चान्तरालाः । ३४ ।

कर्मणा वैश्यो रथकारः । ३५ ।

२० ब्राह्मण व क्षत्रिय यांना त्यांच्या नंतरच्या वर्णाच्या (क्षत्रिय व वैश्य) स्त्रियांपासून झालेले पुत्र सवर्ण समजावेत, एक सोडून नंतरच्या वर्णाच्या (वैश्य व शूद्र) स्त्रियांपासून झालेले असवर्ण. २१ ब्राह्मणाचा वैश्य स्त्रीपासून झालेला पुत्र अंबष्ठ, शूद्र स्त्रीपासून झालेला निषाद किंवा पारशव. २२ क्षत्रियाचा शूद्र स्त्रीपासून झालेला पुत्र उग्र. २३ वैश्याचा शूद्र स्त्रीपासून झालेला पुत्र शूद्रच. २४ आणि ज्यांच्याकडून (उपनयनादी) व्रतांचे पालन झाले नाही त्यांना त्यांच्याच वर्णाच्या स्त्रियांपासून झालेले पुत्र व्रात्य समजावेत. २५ हे झाले अनुलोम पुत्र.

२६ शूद्राचे (वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण स्त्रियांपासून होणारे पुत्र अनुक्रमे) आयोगव, क्षत्त आणि चंडाल. २७ वैश्याचे (क्षत्रियापुत्र व ब्राह्मणीपुत्र) मागध व वैदेहक. २८ क्षत्रियाचा (ब्राह्मणीपुत्र) सूत. २९ परंतु पुराण सांगणारे सूत आणि मागध भिन्न आहेत; ते ब्राह्मण व क्षत्रिय यांपेक्षा विशेष आहेत. ३० ते हे प्रतिलोम पुत्र राजाने आपल्या स्वधर्माचे उल्लंघन केल्यामुळ अस्तित्वात येतात.

३१ उग्राची निषाद स्त्रीपासून होणारी संतती कुक्कुट, याच्या उलट (निषादाची उग्रस्त्रीपासूनची) पुल्कस. ३२ अंबष्ठाची वैदेहक स्त्रीपासून होणारी वैण, उलट (वैदेहकाची अंबष्ठस्त्रीपासूनची) कुशीलव. ३३ उग्राची क्षत्त स्त्रीपासून होणारी संतती श्वपाक. ३४ अशा ह्या व इतर मधल्या जाती होत.

३५ व्यवसायामुळे वैश्य रथकार म्हणून ओळखला जातो.

तेषां स्वयोनौ विवाहः, पूर्वापरगामित्वं वृत्तानुवृत्तं च । ३६ । शूद्रसधर्माणो वा, अन्यत्र चण्डालेभ्यः । ३७ ।

केवलमेवं वर्तमानः स्वर्गमाप्नोति राजा, नरकमन्यथा । ३८ ।

सर्वेषामन्तरालानां समो विभागः । ३९ ।

देशस्य जात्याः संघस्य धर्मो ग्रामस्य वापि यः ।
उचितस्तस्य तेनैव दायधर्मं प्रकल्पयेत् ।। ४० ।।

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे दायविभागे पुत्रविभागः सप्तमोऽध्यायः ।
दायविभागः समाप्तः । आदितश्चतुष्षष्टितमः ।

८

## [ एकषष्टितमं प्रकरणम् – वास्तुकम्, तत्र गृहवास्तुकम् ]

सामन्तप्रत्यया वास्तुविवादाः । १ । गृहं क्षेत्रमारामः सेतुबन्धस्तटाकमाधारो वा वास्तुः । २ ।

कर्णकीलायससंबन्धोऽनुगृहं सेतुः । ३ । यथासेतुभोगं वेश्म कारयेत् । ४ । अभूतं वा परकुडयादपक्रम्य द्वावरत्नी त्रिपदीं वा देशबन्धं कारयेत् । ५ ।

३६ ह्या सर्व जातींत विवाहसंबंध त्याच जातीत घडून यावेत, त्यांच्यात उच्चनीचपणा (मूळ पितृवर्णानुसार) प्रस्थापित व्हावा आणि त्यांनी पूर्वापार चालत आलेला व्यवसायच करावा. ३७ अथवा चंडाल खेरीजकरून इतर सर्वांनी शूद्राच्या धर्माचाच अवलंब करावा.

३८ केवळ याप्रमाणे वागणारा राजाच स्वर्गास जातो, नाहीतर नरकास.

३९ सर्व मधल्या जातींत संपत्तीची वाटणी समसमान हिश्श्यात करावी.

४० एखाद्या प्रदेशाचा, जातीचा, संघाचा अथवा गावाचा जो रूढ धर्म असेल त्या अनुसारच त्यांच्या बाबतीत वारसाचा कायदा लागू करावा.

### आठवा अध्याय

### प्रकरण ६१ : स्थावर मालमत्तेविषयी ; घरांसंबंधी

१ स्थावर मालमत्तेसंबंधीच्या दाव्यांचा शेजाऱ्यांच्या साक्षीच्या आधाराने निवाडा करावा. २ घर, शेत, बगीचा, बंधारा, तलाव आणि हौद हे वास्तू म्हणजे स्थावर मालमत्तेचे प्रकार होत.

३ घराच्या बाजूने (चार) कोपऱ्यांत पुरलेल्या खांबांत लोखंडी तारांनी पक्के केलेले हद्दीचे कुंपण घालावे. ४ हद्दीत समाविष्ट असलेले आवार जेवढे असेल तेवढ्या प्रमाणात घर बांधावे. ५ किंवा शेजारच्या घराच्या भिंतीपासून दोन अरत्नी अथवा तीन पद सोडून पूर्वी नसलेले (नवीन) कुंपण करावे.

अवस्करं भ्रममुदपानं वा न गृहोचितादन्यत्र, अन्यत्र सूतिकाकूपाद् आ निर्दशाहादिति । ६ । तस्यातिक्रमे पूर्वः साहसदण्डः । ७ । तेनेन्धनावघातनकृतं कल्याणकृत्येष्वाचामोदकमार्गाश्च व्याख्याताः । ८ ।

त्रिपदीप्रतिक्रान्तमध्यर्धमरत्निं वा गाढप्रसृतमुदकमार्गं प्रस्रवणप्रपातं वा कारयेत् । ९ । तस्यातिक्रमे चतुष्पञ्चाशत्पणो दण्डः । १० ।

एकपदीप्रतिक्रान्तमरत्निं वा चक्रिचतुष्पदस्थानमग्निष्ठमुदञ्जरस्थानं रोचनीं कुट्टनीं वा कारयेत् । ११ । तस्यातिक्रमे चतुर्विंशतिपणो दण्डः । १२ ।

सर्ववास्तुकयोः प्राक्षिप्तकयोर्वा शालयोः किष्कुरन्तरिका त्रिपदी वा । १३ । तयोश्चतुरङ्गुलं नीप्रान्तरं समारूढकं वा । १४ । किष्कुमात्रमाणिद्वारमन्तरिकायां खण्डफुल्लार्थमसंपातं कारयेत् । १५ । प्रकाशार्थमल्पमूर्ध्वं वातायनं कारयेत् । १६ । तदवसिते वेश्मनि च्छादयेत् । १७ ।

६ पायखाना, पाण्याचे गटार अथवा विहीर (शेजारच्या) घराला उपद्रवकारक न होतील असे करावेत; याला अपवाद बाळंतिणीसाठी दहा दिवसांपुरता होणाऱ्या सांडपाण्याचा. ७ ह्या नियमाचे उल्लंघन केल्यास प्रथम साहसदंड करावा. ८ हाच नियम जळणाची लाकडे फोडण्याच्या संबंधात आणि समारंभांच्या प्रसंगी (हात धुण्याच्या व) आचमन करण्याच्या पाण्याच्या पन्हळींच्या संबंधात लागू करावा.

९ (शेजारच्या घराच्या भिंतीपासून) तीन पद किंवा दीड अरत्नी दूर खोल वाहणारा पाण्याचा पाट अथवा खळखळ वाहणारा झरा करून घ्यावा. १० याचे उल्लंघन केल्यास चोपन्न पण दंड करावा.

११ (शेजारच्या घराच्या भिंतीपासून) एक पद अथवा एक अरत्नी दूर गाडी ठेवण्याची व जनावरे बांधण्याची जागा, अग्नी पेटविण्याची जागा, पाण्याच्या मोठ्या रांजणाची जागा, जाते व उखळ ही करावीत. १२ याचे उल्लंघन केल्यास चोवीस पण दंड करावा.

१३ सर्वत्र दोन घरांच्या मध्ये किंवा पुढे आलेल्या त्यांच्या दोन दालनांच्या मध्ये एक किष्कु अथवा तीन पद रुंद बोळ असावा. १४ त्यांच्या छपरांमधील अंतर चार अंगुले असावे किंवा एक दुसऱ्यावर चढलेले असावे. १५ बोळात एक किष्कु रुंद बाजूचा दरवाजा, मोडतोडीची दुरुस्ती करण्यासाठी, सहज आतबाहेर जाता येणार नाही असा करून घ्यावा. १६ प्रकाशासाठी वरच्या बाजूला एक लहानशी खिडकी ठेवावी. १७ घर पूर्ण होऊन त्यात रहावयास माणसे आली म्हणजे ती खिडकी (पडद्याने वगैरे) झाकून घ्यावी.

संभूय वा गृहस्वामिनो यथेष्टं कारयेयुः, अनिष्टं वारयेयुः । १८ ।

वानलटयाश्चोर्ध्वमावार्यभागं कटप्रच्छन्नमवमर्शभित्तिं वा कारयेद् वर्षाबाधभयात् । १९ । तस्यातिक्रमे पूर्वः साहसदण्डः, प्रतिलोमद्वारवातायनबाधायां च, अन्यत्र राजमार्गरथ्याभ्यः । २० । खातसोपानप्रणालीनिश्रेण्यवस्करभागैर्बहिर्बाधायां भोगनिग्रहे च । २१ ।

परकुड्यमुदकेनोपघ्नतो द्वादशपणो दण्डः, मूत्रपुरीषोपघाते द्विगुणः । २२ । प्रणालीमोक्षो वर्षति, अन्यथा द्वादशपणो दण्डः । २३ ।

प्रतिषिद्धस्य च वसतः, निरस्यतश्चावक्रयिणम् अन्यत्र पारुष्यस्तेयसाहससंग्रहणमिथ्याभोगेभ्यः । २४ । स्वयमभिप्रस्थितो वर्षावक्रयशेषं दद्यात् । २५ ।

सामान्ये वेश्मनि साहाय्यमप्रयच्छतः, सामान्यमुपरुन्धतो भोगं च गृहे द्वादशपणो दण्डः । २६ । विनाशयतस्तद्द्विगुणः । २७ ।

१८ अथवा शेजारी असलेल्या दोघा घरमालकांनी एकमत करून इच्छेनुसार घरे बाधून घ्यावीत व जे उपद्रवकारक असेल ते टाळावे.

१९ आणि पावसामुळे नुकसान होऊ नये यासाठी पडवीचा झाकणे अवश्य असलेला भाग चटयांनी झाकावा किंवा (छपराला) स्पर्श करील अशी भिंत बांधावी. २० ह्या नियमाचे उल्लंघन केल्यास प्रथम साहसदंड करावा; तसाच तो शेजारच्यांच्या हक्काला बाध आणणाऱ्या दरवाजाबद्दल अथवा खिडकीबद्दलही करावा; याला अपवाद राजमार्ग व मोठे रस्ते यांवरील दारेखिडक्यांचा. २१ (तोच दंड) गटार, जिना, पाण्याचा पाट, शिडी, पायखाना यांच्या काही भागाने बाहेरच्या बाजूस अडथळा उत्पन्न केल्यास आणि दुसऱ्याच्या हक्काच्या उपभोगास प्रतिबंध केल्यास (करावा).

२२ दुसऱ्याच्या घराच्या भिंतीचे पाण्याने नुकसान केल्यास बारा पण दंड करावा, मलमूत्राने केल्यास दुप्पट. २३ पाऊस पडत असता पन्हळी मोकळ्या ठेवल्या पाहिजेत. नाहीतर बारा पण दंड करावा.

२४ (तोच दंड) प्रतिबंध केला असताही रहाणाऱ्या भाडेकऱ्याला आणि जो भाडेकरी पारुष्य (वाक्पारुष्य व दण्डपारुष्य), चोरी, बळजबरी, व्यभिचार आणि गैरउपभोग या दोषांपासून मुक्त आहे अशा भाडेकऱ्याला काढून लावणाऱ्या मालकालाही (करावा). २५ भाडेकरी स्वतः घर सोडून जात असेल तर त्याने वर्षाचे राहिलेले भाडे दिले पाहिजे.

२६ समाईक घरात रहाणाऱ्याने मदत केली नाही अथवा घरातील समाईक वस्तूच्या उपभोगाला प्रतिबंध केला तर बारा पण दंड करावा. २७ तिची नासधूस करील तर दुप्पट दंड.

कोष्ठकाङ्गणवर्चानामग्निकुट्टनशालयोः ।
विवृतानां च सर्वेषां सामान्यो भोग इष्यते ।। २८ ।।

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे वास्तुके गृहवास्तुकम् अष्टमोऽध्यायः ।
आदितः पञ्चषष्टितमः ।

९

[ एकषष्टितमं प्रकरणम् – वास्तुकम्, तत्र वास्तुविक्रयः, सीमविवादः, क्षेत्रविवादः, मर्यादास्थापनम्, बाधाबाधिकं च ]

ज्ञातिसामन्तधनिकाः क्रमेण भूमिपरिग्रहान् क्रेतुमभ्याभवेयुः । १ । ततोऽन्ये बाह्याः । २ ।

सामन्तचत्वारिंशत्कुल्येषु गृहप्रतिमुखे वेश्म श्रावयेयुः, सामन्तग्रामवृद्धेषु क्षेत्रमारामं सेतुबन्धं तटाकमाधारं वा मर्यादासु यथासेतुभोगम् 'अनेनार्घेण कः क्रेता' इति । ३ । त्रिराघुषितमव्याहतं क्रेता क्रेतुं लभेत । ४ ।

स्पर्धया वा मूल्यवर्धने मूल्यवृद्धिः सशुल्का कोशं गच्छेत् । ५ । विक्रयप्रतिक्रोष्टा शुल्कं दद्यात् । ६ । अस्वामिप्रतिक्रोशे चतुर्विंशतिपणो दण्डः । ७

२८ कोठी, अंगण आणि पायखाना, अग्निशाला व कांडण्याची जागा आणि सर्व उघडचा असलेल्या जागा या सर्वांचा समाईक उपयोग अभिप्रेत आहे.

## नववा अध्याय

### प्रकरण ६१ (पुढे चालू) : स्थावराची विक्री; हद्दी-विषयक तंटे; अतिक्रमण व नुकसान

१ नातेवाईक, शेजारी आणि सावकार यांना ह्या क्रमाने जमीनजुमला वगैरे स्थावर विकत घेण्याचा हक्क राहील. २ त्यानंतर इतर बाहेरच्या लोकांना विकत घेता येईल.

३ (विकावयाचे असलेल्या) घराच्या बाबतीत घरासमोर शेजारच्या चाळीस कुटुंबातील माणसांच्या समक्ष, शेत, बगीचा, बंधारा, तलाव अथवा हौद यांच्या बाबतीत त्यांच्या हद्दीचा विस्तार असेल त्याप्रमाणे त्यांच्या हद्दींवर गावातील वृद्ध शेजाऱ्यांच्या समक्ष (मालकांनी) घोषित करावे, "अमुक इतक्या किमतीला कोण विकत घेण्यास तयार आहे ?" ४ तीनदा घोषित केल्यास व कोणी हरकत न घेतल्यास विकत घेणाऱ्यास ते विकत घेता येईल.

५ चढाओढीमुळे किमतीत वाढ झाल्यास किमतीतील ती वाढ खरेदीकरासह सरकारी तिजोरीत जमा करावी. ६ लिलावात यशस्वीरीत्या बोलणाराने

सप्तरात्रादूर्ध्वमनभिसरतः प्रतिक्रुष्टो विक्रीणीत । ८ । प्रतिक्रुष्टातिक्रमे वास्तुनि द्विशतो दण्डः, अन्यत्र चतुर्विंशतिपणो दण्डः । ९ । इति वास्तुविक्रयः ।

सीमविवादं ग्रामयोरुभयोः सामन्ता पञ्चग्रामी दशग्रामी वा सेतुभिः स्थावरैः कृत्रिमैर्वा कुर्यात् । १० ।

कर्षकगोपालकवृद्धाः पूर्वभुक्तिका वा बाह्याः सेतूनामभिज्ञा बहव एको वा निर्दिश्य सीमसेतून् विपरीतवेषाः सीमानं नयेयुः । ११ । उद्दिष्टानां सेतूनामदर्शने सहस्रं दण्डः । १२ । तदेव नीते सीमापहारिणां सेतुच्छिदां च कुर्यात् । १३ । प्रनष्टसेतुभोगं वा सीमानं राजा यथोपकारं विभजेत् । १४ ।

क्षेत्रविवादं सामन्तग्रामवृद्धाः कुर्युः । १५ । तेषां द्वैधीभावे यतो बहवः शुचयोऽनुमता वा ततो नियच्छेयुः मध्यं वा गृह्णीयुः । १६ । तदुभयपरोक्तं वास्तु राजा हरेत्, प्रनष्टस्वामिकं च । १७ । यथोपकारं वा विभजेत् । १८ ।

हा कर दिला पाहिजे. ७ स्वतः मालक नसलेल्या माणसाने (मुनीम, नातेवाईक वगैरेंनी) खरेदीस होकार दिल्यास चोवीस पण दंड करावा. ८ (विकत घेणारा) ताबा घेण्यास न आला तर सात दिवसानंतर लिलाव झालेल्या वास्तूच्या मालकाने ती पुन्हा विक्रीस काढावी. ९ जर विक्री झाल्यावर मालक ती बाजूस सारील (व ताबा देण्याचे नाकारील) तर स्थावराच्या संबंधात दोनशे पण दंड करावा, इतर बाबतीत चोवीस पण. हा झाला स्थावराच्या विक्रीचा विषय.

१० दोन गावांमधील सीमेविषयीच्या वादाचा निवाडा शेजारच्या पाच गावातील किंवा दहा गावांतील लोकांनी (वृक्ष, नदी वगैरे) स्थावर किंवा (जमिनीत पुरलेल्या वगैरे) कृत्रिम सीमाचिन्हांच्या साह्याने करावा.

११ वयोवृद्ध शेतकरी व गुराखी किंवा पूर्वी तेथे रहात असलेले बाहेरचे लोक – ज्यांना सीमेच्या खुणा माहीत आहेत असे अनेक जण किंवा एक जण सुद्धा – यांनी सीमेच्या खुणा कोणकोणत्या ते सांगून विपरीत (स्त्रीचा) वेष धारण करून सीमा प्रत्यक्ष दाखवावी. १२ सांगितलेल्या खुणा न दिसल्यास एक हजार पण दंड करावा. १३ तोच दंड सीमा दाखविल्यानंतर सीमेच्या खुणा नाहीशा करणाऱ्यांस व वृक्ष, बांध इत्यादी चिन्हे तोडणाऱ्यांस करावा. १४ किंवा ज्या सीमेवरील हद्दीच्या खुणा नष्ट झाल्या असतील ती सीमा राजाने सर्वांना हितकर होईल अशी ठरवून द्यावी.

१५ शेतांविषयीच्या तंटयाचा निवाडा गावातील वृद्ध शेजाऱ्यांनी करावा. १६ त्यांच्यात मतभेद झाल्यास ज्या बाजूला बहुसंख्य, सदाचरणी अथवा उभय पक्षांना मान्य अशा शेजाऱ्यांचे मत पडेल त्या बाजूने निकाल द्यावा किंवा दोहोंच्या मधल्या मार्गाचा अवलंब करावा. १७ ज्या शेताच्या बाबतीत दोन्ही

**प्रसह्यादाने वास्तुनि स्तेयदण्डः । १९ । कारणादाने प्रयासमाजीवं च परिसंख्याय बन्धं दद्यात् । २० ।**

**मर्यादापहरणे पूर्वः साहसदण्डः । २१ । मर्यादाभेदे चतुर्विंशतिपणः । २२ ।**

**तेन तपोवनविवीतमहापथश्मशानदेवकुलयजनपुण्यस्थानविवादा व्याख्याताः । २३ । इति मर्यादास्थापनम् ।**

**सर्व एव विवादाः सामन्तप्रत्ययाः । २४ ।**

**विवीतस्थलकेदारषण्डखलवेश्मवाहनकोष्ठानां पूर्वं पूर्वमाबाधं सहेत । २५ । ब्रह्मसोमारण्यदेवयजनपुण्यस्थानवर्जाः स्थलप्रदेशाः । २६ ।**

**आधारपरिवाहकेदारोपभोगैः परक्षेत्रकृष्टबीजहिंसायां यथोपघातं मूल्यं दद्युः । २७ । केदारारामसेतुबन्धानां परस्परहिंसायां हिंसाद्विगुणो दण्डः । २८ ।**

पक्ष हरतील, तसेच ज्याचा मालक नाहीसा झाला आहे असे शेत सरकारजमा करावे. १८ किंवा हितकर होईल अशी त्याची वाटणी करावी.

१९ स्थावराचा बळजबरीने ताबा घेतल्यास चोरीबद्दल होणारी शिक्षा करावी. २० काही योग्य कारणास्तव (उदा० गहाण म्हणून) ताबा घेतला असल्यास आपली मेहनत आणि नफा यांचा हिशोब करून (बाकीची) रक्कम मालकास द्यावी.

२१ (दोन शेतांमधील वगैरे) हद्दीच्या खुणा नाहीशा केल्यास प्रथम साहस-दंड करावा. २२ हद्द फोडल्यास चोवीस पण दंड करावा.

२३ हेच नियम तपोवने, गायराने, हमरस्ते, स्मशाने, देवळे, यज्ञभूमी आणि पवित्र स्थाने यांच्याविषयीच्या तंटयांना लागू होतात. हा झाला हद्दी ठरविण्याचा विषय.

२४ सर्व तटयांचा निवाडा शेजाऱ्यांच्या साक्षीला अनुसरून करावा.

२५ कुरणाची जमीन, कोरडी पठाराची जमीन, शेतीची पाणथळ जमीन, भाजीपाल्याचा मळा, खळे, इमारत आणि गाडीघोडयांसाठी तबेला यांपैकी अगोदरअगोदरच्या वास्तूने नंतरनंतरच्या वास्तूपासून होणारा उपद्रव सहन केला पाहिजे. २६ वेदाध्ययनासाठी वन, सोमयागासाठी वन, देवालय आणि पवित्र स्थान यांखेरीजचे पठाराचे प्रदेश (अभिप्रेत समजावेत).

२७ पाण्याची टाकी, पाण्याचा पाट किंवा पाणथळ शेत ह्यांच्या उपयोगामुळे दुसऱ्याच्या शेतात नांगरटीनंतर पेरलेल्या बियाण्याचे नुकसान झाल्यास नुकसानी-प्रमाणे भरपाई करून दिली पाहिजे. २८ पाणथळ शेत, बगीचा, बंधारे यांचे नुकसान एकमेकांनी केले असल्यास नुकसानीच्या दुप्पट दंड करावा.

पश्चान्निविष्टमधरतटाकं नोपरितटाकस्य केदारमुदकेनाप्लावयेत् । २९ । उपरिनिविष्टं नाधरतटाकस्य पूरास्रावं वारयेद्, अन्यत्र त्रिवर्षोपरतकर्मणः । ३० । तस्यातिक्रमे पूर्वः साहसदण्डः, तटाकवामनं च । ३१ ।

पञ्चवर्षोपरतकर्मणः सेतुबन्धस्य स्वाम्यं लुप्येत, अन्यत्रापद्भ्यः । ३२ ।

तटाकसेतुबन्धानां नवप्रवर्तने पाञ्चवर्षिकः परिहारः, भग्नोत्सृष्टानां चातुर्वर्षिकः, समुपारूढानां त्रैवर्षिकः, स्थलस्य द्वैवर्षिकः । ३३ । स्वात्माऽऽधाने विक्रये च । ३४ ।

खातप्रावृत्तिमनदीनिबन्धायतनतटाककेदारारामषण्डवापानां सस्यवर्णभागोत्तरिकम् अन्येभ्यो वा यथोपकारं दद्युः । ३५ ।

प्रक्रयावक्रयाधिभागभोगनिसृष्टोपभोक्तारश्चैषां प्रतिकुर्युः । ३६ । अप्रतीकारे हीनद्विगुणो दण्डः । ३७ ।

२९ खालच्या बाजूला नंतर बांधलेल्या तलावाचे पाणी वरच्या बाजूच्या तलावाने भिजणाऱ्या शेतात वाहून जाता कामा नये. ३० वरच्या बाजूला बांधलेल्या तलावामुळे खालच्या बाजूचे तळे पाण्याने भरून जाण्यास प्रतिबंध होता कामा नये; याला अपवाद तीन वर्षे वापरात नसलेल्या खालच्या तळ्याचा. ३१ या नियमाचे उल्लंघन केल्यास प्रथम साहसदंड करावा आणि तलावातील पाणी उपसून टाकून तो कोरडा करावा.

३२ पाच वर्षेपर्यंत वापरात नसलेल्या बंधारे, तलाव आदींवरील मालकी हक्क नष्ट होतो. आपत्कालात हा नियम लागू होत नाही.

३३ तलाव, पाटबंधारे नवीन बांधल्यास पाच वर्षे करात सूट द्यावी, नादुरुस्त व वापरात नसलेले पुन्हा उपयोगात आणल्यास चार वर्षे सूट द्यावी, आत वाढलेल्या जंगली वनस्पती काढून टाकून वापरात आणल्यास तीन वर्षे सूट द्यावी, कोरडी जमीन नव्याने शेतीखाली आणल्यास दोन वर्षे सूट द्यावी. ३४ हे करणाऱ्याला ते गहाण ठेवण्याची व विकण्याची पूर्ण मुभा आहे.

३५ कालव्यातून वाहणारे पाणी, नदीवरील बांधामुळे मिळणारे पाणी आणि तलावाचे पाणी दुसऱ्याच्या ओल्या शेतीसाठी, बगीचासाठी अथवा (फुले व फळे यांच्या) बागांसाठी त्यामुळे उत्पन्न होणाऱ्या धान्य वगैरे विविध पदार्थांच्या हिश्शाच्या बोलीने द्यावे, किंवा दुसऱ्यांनाही उपयोग होईल त्याप्रमाणे आपले पाणी देण्यास हरकत नाही.

३६ खंडाने, भाड्याने, गहाण म्हणून, हिस्सा देण्याच्या बोलीने किंवा मालकाच्या परवानगीने (तलाव, बंधारे वगैरे) वापरणारांनी ते दुरुस्त स्थितीत ठेवले पाहिजेत. ३७ दुरुस्त न ठेवल्यास नुकसानीच्या दुप्पट दंड करावा.

**सेतुभ्यो मुञ्चतस्तोयमवारे षट्पणो दमः ।**
**वारे वा तोयमन्येषां प्रमादेनोपरुन्धतः ॥ ३८ ॥**

**इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे वास्तुके वास्तुविक्रयः सीमविवादः क्षेत्रविवादः मर्यादास्थापनं बाधाबाधिकं नवमोऽध्यायः । आदितः षट्षष्टितमः ।**

**१०**

## [ एकषष्टितमं प्रकरणम् – वास्तुकम्, तत्र विवीतक्षेत्रपथहिंसा; द्विषष्टितमं प्रकरणम् – समयस्यानपाकर्म ]

**कर्मोदकमार्गमुचितं रुन्धतः कुर्वतोऽनुचितं वा पूर्वः साहसदण्डः, सेतुकूपपुण्यस्थानचैत्यदेवायतनानि च परभूमौ निवेशयतः । १ । पूर्वानुवृत्तं धर्मसेतुमाधानं विक्रयं वा नयतो नाययतो वा मध्यमः साहसदण्डः, श्रोतॄणामुत्तमः, अन्यत्र भग्नोत्सृष्टात् । २ । स्वाम्यभावे ग्रामाः पुण्यशीला वा प्रतिकुर्युः । ३ ।**

**पथिप्रमाणं दुर्गनिवेशे व्याख्यातम् । ४ । क्षुद्रपशुमनुष्यपथं रुन्धतो द्वादशपणो दण्डः, महापशुपथं चतुर्विंशतिपणः, हस्तिक्षेत्रपथं चतुष्पञ्चाशत्पणः, सेतुवनपथं**

३८ आपला पाळीचा दिवस नसता (समाईक) पाटबंधाऱ्यातून पाणी घेणाऱ्यास तसेच दुसऱ्याची पाळी असता चुकीने त्याला प्रतिबंध करणाऱ्यास सहा पण दंड करावा.

### दहावा अध्याय

### प्रकरण ६१ (पुढे चालू) : कुरणे, शेते व रस्ते यांचे नुकसान
### प्रकरण ६२ : रूढ आचारांचे पालन न करणे

१ वहिवाटीत असलेल्या (शेती वगैरेच्या) कामासाठी वापरण्यात येणाऱ्या पाण्याचा मार्ग अडविणाऱ्यास किंवा वहिवाटीत नसलेला पाण्याचा मार्ग करणाऱ्यास, तसेच दुसऱ्याच्या जमिनीत बांध, विहीर, पवित्र स्थान, चैत्य किंवा देऊळ बांधणाऱ्यास प्रथम साहसदंड करावा. २ पूर्वापार चालत आलेला धर्मकृत्य म्हणून बांधला असलेला बंधारा स्वतः किंवा दुसऱ्याच्या मार्फत गहाण ठेवणाऱ्यास किंवा विकणाऱ्यास मध्यम साहसदंड करावा, साक्षिदारांना उत्तम साहसदंड करावा. याला अपवाद मोडतोड झालेल्या व वापरात नसलेल्या सेतूचा. ३ मालक नसल्यास गावच्या लोकांनी किंवा धार्मिक मनुष्यांनी त्याची दुरुस्ती करावी.

४ रस्त्यांचे प्रमाण दुर्गनिवेश प्रकरणात (मागे २.४.३-५ या ठिकाणी) सांगितले आहेत. ५ लहान पशू व मनुष्य यांचा रस्ता अडविणाऱ्यास बारा पण दंड करावा, मोठ्या जनावरांचा रस्ता अडविणाऱ्यास चोवीस पण, हत्ती व

षट्छतः, श्मशानग्रामपथं द्विशतः, द्रोणमुखपथं पञ्चशतः, स्थानीयराष्ट्रविवीतपथं साहस्रः । ५ । अतिकर्षणे चैषां दण्डचतुर्थां दण्डाः । ६ । कर्षणे पूर्वोक्ताः । ७ ।

क्षेत्रिकस्याक्षिपतः क्षेत्रम् उपवासस्य वा त्यजतो बीजकाले द्वादशपणो दण्डः, अन्यत्र दोषोपनिपाताविषह्येभ्यः । ८ ।

करदाः करदेष्वाधानं विक्रयं वा कुर्युः, ब्रह्मदेयिका ब्रह्मदेयिकेषु । ९ । अन्यथा पूर्वः साहसदण्डः । १० । करदस्य वाऽकरदग्रामं प्रविशतः । ११ । करदं तु प्रविशतः सर्वद्रव्येषु प्राकाम्यं स्यात्, अन्यत्रागारात् । १२ । तदप्यस्मै दद्यात् । १३ ।

अनादेयमकृषतोऽन्यः पञ्चवर्षाण्युपभुज्य प्रयासनिष्क्रयेण दद्यात् । १४ ।

अकरदाः परत्र वसन्तो भोगमुपजीवेयुः । १५ ।

शेते यांचे रस्ते अडविणाऱ्यास चोपन पण, बंधारे व वन यांचे रस्ते अडविणाऱ्यास एकशेसहा पण, स्मशान व गाव यांचे रस्ते अडविणाऱ्यास दोनशे पण, द्रोण-मुखातील रस्ता अडविणाऱ्यास पाचशे पण, स्थानीय, राष्ट्र किंवा कुरण यांचे रस्ते अडविणाऱ्यास एक हजार पण दंड करावा. ६ ह्या रस्त्यांचे प्रमाण कमी केल्यास वरील दंडांच्या एकचतुर्थांश दंड करावेत. ७ जर त्यांवर नांगरले तर वर सांगितलेलेच दंड करावेत.

८ पेरणीच्या वेळेस कुळाकडून शेत काढून घेणाऱ्या शेतमालकास व त्यावेळेस शेत सोडून जाणाऱ्या कुळास बारा पण दंड करावा; याला अपवाद (शेतात वगैरे) काही दोष असेल, काही संकट ओढवले असेल किंवा (आजारा-सारखे) अपरिहार्य कारण असेल यांचा.

९ कर देणाऱ्यांनी (शेत वगैरे) कर देणाऱ्याकडेच गहाण टाकावीत किंवा विकावीत, ब्राह्मण म्हणून दान मिळालेल्यांनी तशाच प्रकारच्या ब्राह्मणांशीच ते व्यवहार करावेत. १० तसे न केल्यास प्रथम साहसदंड करावा. ११ तोच दंड करापासून मुक्त असलेल्या गावात रहावयास जाणाऱ्या करपात्र मनुष्यास करावा. १२ परंतु करमुक्त नसलेल्या गावात तो गेला तर त्याला घर खेरीज करून सर्व वस्तू प्राप्त करण्याचा अधिकार राहील. १३ ते (घर) सुद्धा त्याला देण्यात यावे.

१४ जी जमीन दुसऱ्याला घेता येत नाही ती जमीन मालक जर कशीत नसेल तर दुसऱ्याने पाच वर्षे तिचा उपभोग घेऊन व मेहनतीचा मोबदला घेऊन परत करावी.

१५ करापासून मुक्त असलेले मालक दुसरीकडे राहून जमीनीचे उत्पन्न उपभोगू शकतात.

ग्रामार्थेन ग्रामिकं व्रजन्तमुपवासाः पर्यायेणानुगच्छेयुः । १६ । अननुगच्छन्तः पणार्धपणिकं योजनं दद्युः । १७ ।

ग्रामिकस्य ग्रामादस्तेनपारदारिकं निरस्यतश्चतुर्विंशतिपणो दण्डः, ग्रामस्योत्तमः । १८ । निरस्तस्य-प्रवेशो ह्यभिगमेन व्याख्यातः । १९ ।

स्तम्भैः समन्ततो ग्रामाद्धनुःशतापकृष्टमुपसालं कारयेत् । २० ।

पशुप्रचारार्थं विवीतमालवनेनोपजीवेयुः । २१ । विवीतं भक्षयित्वाऽपसृतानामुष्ट्रमहिषाणां पादिकं रूपं गृह्णीयुः, गवाश्वखराणां चार्धपादिकम्, क्षुद्रपशूनां षोडशभागिकम् । २२ । भक्षयित्वा निषण्णानामेत एव द्विगुणा दण्डाः, परिवसतां चतुर्गुणाः । २३ । ग्रामदेववृषा वा अनिर्दशाहा वा धेनुरुक्षाणो गोवृषाश्चादण्ड्याः । २४ ।

सस्यभक्षणे सस्योपघातं निष्पत्तितः परिसंख्याय द्विगुणं दापयेत् । २५ । स्वामिनश्चानिवेद्य चारयतो द्वादशपणो दण्डः, प्रमुञ्चतश्चतुर्विंशतिपणः । २६ ।

१६ गावाचा मुख्य गावाच्या कामासाठी बाहेर जात असेल तेव्हा कुळांनी पाळीपाळीने त्याच्याबरोबर गेले पाहिजे. १७ जे जाणार नाहीत त्यांनी दर योजनास दीड पण दंड दिला पाहिजे.

१८ चोर किंवा परस्त्रीशी समागम करणारा नसलेल्या मनुष्यास गावाच्या मुख्याने गावातून हद्दपार केल्यास त्याला चोवीस पण दंड करावा, गावाला उत्तम साहसदंड करावा. १९ हद्दपार केलेल्या मनुष्याचे परत येणे बेकायदा प्रवेशाप्रमाणे (पुढे ४.१३.३–४) ठरवावे.

२० गावाच्या सर्व बाजूंनी सभोवार शंभर धनुष्य अंतरावर खांबाचे एक कुंपण घालावे.

२१ जनावरांच्या चरणासाठी कुरणातील गवत कापून (गवत कापणाऱ्यांनी) उपजीविका प्राप्त करावी. २२ कुरणातील गवत खाऊन, निघून गेलेल्या उंट व म्हशी यांसाठी प्रत्येक जनावरामागे त्यांनी पाव पण घ्यावा. गाई, घोडे व गाढव यांसाठी अष्टमांश पण, लहान जनावरासाठी पणाचा सोळावा भाग घ्यावा. २३ गवत खाऊन तेथेच बसलेल्या जनावरांबद्दल दुप्पट दंड घ्यावा, रात्री तेथे राहिल्यास चौपट. २४ गावातील देवळाच्या मालकीचे बैल, दहा दिवसाच्या आतील दुभती गाय व वळू बैल यांच्याबद्दल (त्यांनी असे केल्यास) दंड घेऊ नये.

२५ जनावरांनी शेतातील पीक खाल्ल्यास पीक आले असेल त्याप्रमाणे नुकसानीचा हिशोब करून त्याच्या दुप्पट भरपाई करावयास लावावे. २६ आणि (शेतमालकास) न कळविता शेतात जनावरे चरावयास नेणाऱ्या त्यांच्या

पालिनामर्धदण्डाः । २७ । तदेव षण्डभक्षणे कुर्यात् । २८ । वाटभेदे द्विगुणः, वेश्मखलवलयगतानां च धान्यानां भक्षणे । २९ ।

हिंसाप्रतीकारं कुर्यात् । ३० । अभयवनमृगाः परिगृहीता वा भक्षयन्तः स्वामिनो निवेद्य यथावध्यास्तथा प्रतिषेद्धव्याः । ३१ । पशवो रश्मिप्रतोदाभ्यां वारयितव्याः । ३२ । तेषामन्यथा हिंसायां दण्डपारुष्यदण्डाः । ३३ । प्रार्थयमाना दृष्टापराधा वा सर्वोपायैर्नियन्तव्याः । ३४ । इति क्षेत्रपथहिंसा ।

कर्षकस्य ग्राममभ्युपेत्याकुर्वतो ग्राम एवात्ययं हरेत् । ३५ । कर्माकरणे कर्मवेतनद्विगुणं, हिरण्यादाने प्रत्यंशद्विगुणं, भक्ष्यपेयादाने च प्रहवणेषु द्विगुणमंशं दद्यात् । ३६ । प्रेक्षायामनंशदः सस्वजनो न प्रेक्षेत । ३७ । प्रच्छन्नश्रवणेक्षणे च सर्वहिते च कर्मणि निग्रहेण द्विगुणमंशं दद्यात् । ३८ ।

मालकास बारा पण दंड करावा, गुरे तेथे सोडून देणाऱ्यास चोवीस पण. २७ गुरे राखणाऱ्यांना ह्याबद्दल अर्धे दंड करावेत. २८ मळ्यातील भाजीपाला खाल्ल्यासही तेच दंड करावेत. २९ (फुले व फळे यांच्या) बागांची मोडतोड केल्यास, तसेच खोपटातील अथवा खळ्यातील धान्य खाल्ल्यास दुप्पट दंड करावेत.

३० (जनावरांना) इजा करण्याला प्रतिबंध करावा. ३१ राखीव वनातील जनावरे अथवा संरक्षित जनावरे (धान्य वगैरे) खात असतील तर त्यांच्या मालकांना कळवून त्यांना इजा न होईल अशा रीतीने हाकून लावावे. ३२ पशूंना दोर किंवा चाबूक यांनी हाकून लावावे. ३३ इतर प्रकारांनी त्यांना इजा केल्यास दंडपारुष्याचे (अध्याय ३.१९ मधील) दंड करावेत. ३४ अंगावर येणाऱ्या किंवा गुन्हा स्पष्ट असलेल्या जनावरांचे सर्व उपायांनी नियमन करावे. हा झाला शेते व रस्ते यांच्या नुकसानीचा विषय.

३५ गावात रहावयास येऊन शेतकरी (समाईक कार्यात) आपले काम करीत नसेल तर गावानेच दंड घ्यावा (सरकारने नाही). ३६ काम न केल्यास त्या कामाच्या मजुरीच्या दुप्पट, पैसे न दिल्यास प्रत्येकाने द्यावयाच्या पैशाच्या दुप्पट आणि समारंभात अन्नपाणी न दिल्यास दुप्पट हिस्सा त्याने दिला पाहिजे. ३७ नाटकाच्या प्रसंगी आपला (वर्गणीचा) वाटा जो देणार नाही त्याने आपल्या माणसांसह ते पाहता कामा नये. ३८ चोरून ऐकणाऱ्यास किंवा पाहणाऱ्यास, तसेच सर्वांना हितकारक असलेल्या कामासाठी दुप्पट हिस्सा देण्यास जबरीने भाग पाडावे.

सर्वहितमेकस्य ब्रुवतः कुर्युराज्ञाम् । ३९ । अकरणे द्वादशपणो दण्डः । ४० । तं चेत्संभूय वा हन्युः पृथगेषामपराधद्विगुणो दण्डः । ४१ । उपहन्तृषु विशिष्टः । ४२ ।

ब्राह्मणतश्चैषां ज्यैष्ठ्यं नियम्येत । ४३ । प्रहवणेषु चैषां ब्राह्मणा नाकामाः कुर्युः, अंशं च लभेरन् । ४४ ।

तेन देशजातिकुलसंघानां समयस्यानपाकर्म व्याख्यातम् । ४५ ।

राजा देशहितान् सेतून् कुर्वतां पथि संक्रमान् ।
ग्रामशोभाश्च रक्षाश्च तेषां प्रियहितं चरेत् ।। ४६ ।।

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे वास्तुके विवीतक्षेत्रपथहिंसा वास्तुकं समाप्तं समयस्यानपाकर्म च दशमोऽध्यायः । आदितः सप्तषष्टितमः ।

११

## [ त्रिषष्टितमं प्रकरणम् – ऋणादानम् ]

सपादपणा धर्म्या मासवृद्धिः पणशतस्य, पञ्चपणा व्यावहारिकी, दशपणा कान्तारगाणाम्, विंशतिपणा सामुद्राणाम् । १ । ततः परं कर्तुः कारयितुश्च

३९ सर्वांना हितकारक होईल असे सांगणाऱ्या एका मनुष्याच्या आज्ञा इतरांनी अंमलात आणल्या पाहिजेत. ४० तसे कोणी न केल्यास बारा पण दंड करावा. ४१ जर ते संगनमत करून त्या एका मनुष्याला मारझोड करतील तर त्यांच्यापैकी प्रत्येकाला त्या अपराधाबद्दलच्या नेहमीच्या दंडाच्या दुप्पट दंड करावा. ४२ त्याला भयंकर जखमी करणाऱ्यांना विशेष शिक्षा करावी.

४३ आणि त्यांच्यामध्ये ज्येष्ठता, ब्राह्मणापासून (खाली याप्रमाणे) निर्धारित करावी. ४४ आणि त्यांच्या समारंभात इच्छा नसेल तर ब्राह्मणांनी काही काम करू नये. तथापि त्यांचा भाग त्यांना मिळाला पाहिजे.

४५ देश, जात, कुल व संघ यांच्या परंपरागत आचारांचे पालन न करण्याच्या संबंधातही हेच नियम लागू करावेत.

४६ देशाला हितकर असलेले पाटबंधारे, रस्त्यांमधले पूल आणि गावाची शोभा वाढविणाऱ्या व संरक्षण करणाऱ्या गोष्टी हे करणाऱ्यांना आवडेल व त्यांना हितकर होईल अशा प्रकारे राजाने त्यांच्या बाबतीत वागावे.

## अकरावा अध्याय

### प्रकरण ६३ : कर्जफेड

१ शंभर पणांवर महिन्याला सव्वा पण व्याज धर्माला अनुसरून आहे. व्यापारउदीमासाठी पाच पण, जंगलातून जाणाऱ्यांसाठी दहा पण आणि

**पूर्वः साहसदण्डः, श्रोतॄणामेकैकं प्रत्यर्धदण्डः । २ । राजन्ययोगक्षेमावहे तु धनिकधारणिकयोश्चरित्रमवेक्षेत । ३ ।**

**धान्यवृद्धिः सस्यनिष्पत्तावुपार्धा, परं मूल्यकृता वर्धेत । ४ । प्रक्षेपवृद्धिरुदयार्धं संनिधानसन्ना वार्षिकी देया । ५ । चिरप्रवासः स्तम्भप्रविष्टो वा मूल्यद्विगुणं दद्यात् । ६ ।**

**अकृत्वा वृद्धिं साधयतो वर्धयतो वा, मूल्यं वा वृद्धिमारोप्य श्रावयतो बन्धचतुर्गुणो दण्डः । ७ । तुच्छश्रावणायामभूतचतुर्गुणः । ८ । तस्य त्रिभागमादाता दद्यात्, शेषं प्रदाता । ९ ।**

**दीर्घसत्त्रव्याधिगुरुकुलोपरुद्धं बालमसारं वा नर्णमनुवर्धेत । १० ।**

समुद्रावरून जाणाऱ्यांसाठी महिन्याला वीस पण व्याज आकारण्यास हरकत नाही. २ त्यापेक्षा अधिक व्याज आकारणाऱ्याला व तसे करण्यास उत्तेजन देणाऱ्याला प्रथम साहसदंड करावा. साक्षिदारांना प्रत्येकी अर्धा दंड करावा. ३ परंतु राजा प्रजेच्या योगक्षेमाची काळजी वाहण्यास (उदा० जंगलात अथवा समुद्रावर)असमर्थ असल्यास ऋणको व धनको यांच्यामधील नेहमीचा व्यवहार विचारात घ्यावा.

४ धान्यावरील व्याज पीक हाती आल्यानंतर (उसने घेतलेल्या धान्याच्या) अर्ध्या भागापर्यंत घ्यावे; त्यानंतर त्याचे किमतीनुसार पैशात रूपांतर होऊन त्यावर व्याज सुरू होईल. ५ गुंतविलेल्या पैशावरील व्याज नफ्याच्या अर्ध्याइतके बाजूस साठा करून वर्षाच्या हिशोबाने द्यावे. ६ दीर्घकाल प्रवासास गेलेल्याने अथवा व्याज अडवून ठेवणाऱ्याने मूळ रकमेच्या दुप्पट दिले पाहिजे.

७ व्याज न ठरविता ते मागणाऱ्यास अथवा ठरल्यापेक्षा अधिक मागणाऱ्यास किंवा मूळ रक्कम तिच्यात व्याज मिळवून साक्षिदारांच्या साह्याने मागणाऱ्यास (अधिक) रकमेच्या चौपट दंड करावा. ८ न दिलेले कर्ज साक्षिदारांच्या साह्याने मागितल्यास त्या रकमेच्या चौपट दंड करावा. ९ त्यापैकी एकतृतीयांश भाग रक्कम घेऊ पाहणाऱ्याने द्यावा, बाकीचा त्याला मदत करणाऱ्याने.

१० लांब मुदतीचा यज्ञ, आजार अथवा गुरुगृही वास यामुळे अडकून पडलेल्याचे, अज्ञान बालकाचे अथवा निष्किंचनाचे कर्ज (ह्या मुदतीत) व्याजापासून मुक्त रहावे.

**मुच्यमानमृणमप्रतिगृह्णतो द्वादशपणो दण्डः । ११ । कारणापदेशेन निवृत्त-वृद्धिकमन्यत्र तिष्ठेत् । १२ ।**

**दशवर्षोपेक्षितमृणमप्रतिग्राह्यम्, अन्यत्र बालवृद्धव्याधितव्यसनिप्रोषितदेश-त्यागराज्यविभ्रमेभ्यः । १३ ।**

**प्रेतस्य पुत्राः कुसीदं दद्युः, दायादा वा रिक्थहराः, सहग्राहिणः, प्रतिभुवो वा । १४ । न प्रातिभाव्यमन्यत् । १५ । असारं बालप्रातिभाव्यम् । १६ ।**

**असंख्यातदेशकालं तु पुत्राः पौत्रा दायादा वा रिक्थं हरमाणा दद्युः । १७ ।**

**जीवितविवाहभूमिप्रातिभाव्यमसंख्यातदेशकालं तु पुत्राः पौत्रा वा वहेयुः । १८ ।**

**नानर्णसमवाये तु नैकं द्वौ युगपदभिवदेयाताम्, अन्यत्र प्रतिष्ठमानात् । १९ । तत्रापि गृहीतानुपूर्व्या राजश्रोत्रियद्रव्यं वा पूर्वं प्रतिपादयेत् । २० ।**

११ फेडावयास आणलेली कर्जाची रक्कम न स्वीकारणाऱ्या धनकोस बारा पण दंड करावा. १२ जर त्यासाठी योग्य कारणाची सबब असेल तर व्याज बंद होऊन ती रक्कम दुसऱ्या कोणाच्या ताब्यात रहावी.

१३ दहा वर्षे ज्या कर्जाची वास्तपुस्त केली नाही ते परत मागता येणार नाही; याला अपवाद धनको अज्ञान, वृद्ध, व्याधिग्रस्त, संकटात सापडलेला, प्रवासास गेलेला किंवा देश सोडून गेलेला असा असेल त्याचा किंवा राज्यात धामधूम माजली असेल त्याचा.

१४ मेलेल्या मनुष्याचे कर्ज व्याजासहित त्याच्या मुलांनी दिले पाहिजे, किंवा त्याच्या संपत्तीला वारसदार होणाऱ्यांनी, कर्जात भागिदार असणाऱ्यांनी अथवा जामीन राहणाऱ्यांनी दिले पाहिजे. १५ इतर प्रकारची जामीनकी कायदेशीर नाही. १६ अज्ञान मुलाची जामीनकी निरुपयोगी.

१७ परंतु जे कर्ज परत करण्याच्या बाबतीत देश व काल याविषयी निर्बंध नाही ते पुत्र, पौत्र किंवा संपत्ती मिळणाऱ्या वारसदारांनी फेडले पाहिजे.

१८ परंतु जीवित, विवाह आणि भूमी यांच्यासाठी देशाचा व कालाचा निर्बंध नसलेल्या जामीनकीची जबाबदारी पुत्र किंवा पौत्र यांनी स्वीकारली पाहिजे.

१९ अनेकांचे कर्ज एका माणसावर असल्यास दोन धनकोंनी एकाच वेळेस त्याच्यावर दावा करू नये, मात्र तो दुसरीकडे जाण्याच्या तयारीत असल्यास तसे करण्यास हरकत नाही. २० त्या प्रसंगीही कर्ज घेण्याचा जो क्रम होता त्या क्रमानेच किंवा सरकारी देणे व श्रोत्रिय ब्राह्मणाचे कर्ज अगोदर परत करावयास लावावे.

**दम्पत्योः पितापुत्रयोः भ्रातॄणां चाविभक्तानां परस्परकृतमृणमसाध्यम् । २१ । अग्राह्याः कर्मकालेषु कर्षका राजपुरुषाश्च । २२ । स्त्री चाप्रतिश्राविणी पतिकृतमृणम्, अन्यत्र गोपालकार्धसीतिकेभ्यः । २३ । पतिस्तु ग्राह्यः स्त्रीकृतमृणम्, अप्रतिविधाय प्रोषित इति । २४ ।**

**संप्रतिपत्तावुत्तमः । २५ । असंप्रतिपत्तौ तु साक्षिणः प्रमाणं प्रात्ययिकाः शुचयोऽनुमता वा त्रयोऽवरार्ध्याः । २६ । पक्षानुमतौ वा द्वौ, ऋणं प्रति न त्वेवैकः । २७ ।**

**प्रतिषिद्धाः स्यालसहायान्वर्थिधनिकधारणिकवैरिन्यङ्गधृतदण्डाः, पूर्वे चाव्यवहार्याः । २८ । राजश्रोत्रियग्राममृतककुष्ठिव्रणिनः पतितचण्डालकुत्सितकर्माणोऽन्धबधिरमूकाहंवादिनः स्त्रीराजपुरुषाश्च, अन्यत्र स्ववर्गेभ्यः । २९ ।**

२१ नवरा व बायको, पिता व पुत्र आणि विभक्त न झालेले भाऊ यांच्यातील परस्परांना दिलेल्या कर्जाबद्दल दावा करता येणार नाही.

२२ शेतकरी व सरकारी नोकर काम करीत असता त्यांच्यावर कर्जासाठी दावा करता येणार नाही. २३ आणि तिने देण्याचे कबूल न केलेल्या पतीच्या कर्जाबद्दल स्त्रीवर दावा करता येणार नाही. याला अपवाद गाई पाळणारे व अर्ध्या हिश्शाने जमीन कसणारे यांच्या स्त्रियांचा. २४ परंतु उपजीविकेची तरतूद न करता पती गेला म्हणून स्त्रीने कर्ज केल्यास त्याला ते फेडावयास लावले पाहिजे.

२५ कर्ज कबूल केले तर उत्तम. २६ कबूल न केल्यास विश्वास ठेवण्यास पात्र असे शुद्ध आचरणाचे अथवा दोन्ही पक्षांना मान्य असणारे कमीत कमी तीन साक्षिदार प्रमाण मानावेत. २७ अथवा उभय पक्षांना मान्य असल्यास दोन (साक्षिदार) चालतील, पण कर्जाच्या बाबतीत एक मुळीच चालणार नाही.

२८ बायकोचा भाऊ, सहायकर्ता, त्याच्यावर अवलंबून असणारा, धनको, ऋणको, वैरी, व्यंग असलेला व शिक्षा झालेला मनुष्य, तसेच पूर्वी (३.१.१२ मध्ये) व्यवहार करण्यास अपात्र म्हणून सांगितलेले साक्षिदार म्हणून निषिद्ध होत. २९ राजा, श्रोत्रिय, ब्राह्मण, गावातील अधिकारी, कुष्ठ झालेला, जखम झालेला, पतित, चंडाल, निंद्य व्यवसाय करणारा, आंधळा, बहिरा, मुका, स्वतः होऊन साक्ष देण्यास येणारा, स्त्रिया व सरकारी नोकर हे सुद्धा निषिद्ध; याला अपवाद त्या त्या वर्गातील साक्षिदारांचा. ३० परंतु पारुष्य, स्तेय व

**पारुष्यस्तेयसंग्रहणेषु तु वैरिस्यालसहायवर्जाः । ३० । रहस्यव्यवहारेष्वेका स्त्री पुरुष उपश्रोता उपद्रष्टा वा साक्षी स्याद् राजतापसवर्जम् । ३१ ।**

**स्वामिनो भृत्यानामृत्विगाचार्याः शिष्याणां मातापितरौ पुत्राणां चानिग्रहेण साक्ष्यं कुर्युः, तेषामितरे वा । ३२ । परस्पराभियोगे चैषाम् उत्तमाः परोक्ता दशबन्धं दद्युः, अवराः पञ्चबन्धम् । ३३ । इति साक्ष्यधिकारः ।**

**ब्राह्मणोदकुम्भाग्निसकाशे साक्षिणः परिगृह्णीयात् । ३४ । तत्र ब्राह्मणं ब्रूयात् ' सत्यं ब्रूहि ' इति । ३५ । राजन्यं वैश्यं वा ' मा तवेष्टापूर्तफलम्, कपालहस्तः शत्रुकुलं भिक्षार्थी गच्छेः ' इति । ३६ । शूद्रं ' जन्ममरणान्तरे यद्वः पुण्यफलं तद्राजानं गच्छेद्, राज्ञश्च किल्बिषं युष्मान् अन्यथावादे, दण्डश्चानुबद्धः, पश्चादपि ज्ञायेत यथादृष्टश्रुतम्, एकमन्त्राः सत्यमुपहरत ' इति । ३७ । अनुपहरतां सप्तरात्रादूर्ध्वं द्वादशपणो दण्डः, त्रिपक्षादूर्ध्वमभियोगं दद्युः । ३८ ।**

संग्रहण यांविषयीच्या दाव्यात वैरी, बायकोचा भाऊ व सहायकर्ता वगळून बाकीचे साक्षिदार म्हणून चालतील. ३१ गुप्त व्यवहारांच्या संबंधात एकच स्त्री अथवा पुरुष – ज्यांनी प्रत्यक्ष पाहिले असेल किंवा ऐकले असेल असे – साक्षिदार म्हणून चालतील; राजा किंवा तापस यांना हे लागू नाही.

३२ मालकांनी नोकरांसाठी, ऋत्विजांनी व आचार्यांनी शिष्यांसाठी, आईबापांनी पुत्रांसाठी स्वखुशीने साक्ष देण्यास हरकत नाही, तसेच ह्या कनिष्ठांनी त्या श्रेष्ठ मनुष्यांसाठी (साक्ष देण्यास हरकत नाही). ३३ आणि ह्यांनी एकमेकावर दावा केल्यास श्रेष्ठ हरले तर त्यांनी एकदशांश रकमेइतका दंड द्यावा, कनिष्ठ हरल्यास एकपंचमांश रकमेइतका. हे झाले साक्षीचे प्रकरण.

३४ (न्यायाधिशाने) ब्राह्मण, पाण्याचा घडा व अग्नी यांच्या समक्ष साक्षिदारांना ताकीद द्यावी. ३५ त्यावेळी ब्राह्मण साक्षिदारास म्हणावे, "खरे ते सांग." ३६ क्षत्रिय किंवा वैश्य यांना म्हणावे, "(तू खोटे बोललास तर) यज्ञयाग व पुण्यकर्मे यांचे फळ तुला न मिळो, हातात खापर घेऊन शत्रूच्या घरी तू भीक मागण्यासाठी जावो." ३७ शूद्रांना म्हणावे, "खोटे बोललात तर जन्म व मृत्यू यांच्या मधल्या काळात तुम्ही केलेल्या सर्व पुण्याचे फळ राजाला मिळेल व राजाच्या पापाचे तुम्ही धनी व्हाल; शिवाय तुम्हाला दंड होईलच. नंतरसुद्धा जसे पाहिले असेल व ऐकले असेल तसे कळून आल्याशिवाय रहाणार नाही. तेव्हा एकमताने खरे ते सांगा." ३८ जे खरी साक्ष देत नाहीत त्यांना सात दिवसानंतर बारा पण दंड करावा, तीन पंधरवडयानंतर त्यांना दाव्याची रक्कम द्यावी लागेल.

साक्षिभेदे यतो बहवः शुचयोऽनुमता वा ततो नियच्छेयुः, मध्यं वा गृह्णीयुः । ३९ । तद्वा द्रव्यं राजा हरेत् । ४० । साक्षिणश्चेदभियोगादूनं ब्रूयुरतिरिक्तस्याभियोक्ता बन्धं दद्यात् । ४१ । अतिरिक्तं वा ब्रूयुस्तदतिरिक्तं राजा हरेत् । ४२ ।

बालिश्यादभियोक्तुर्वा दुःश्रुतं दुर्लिखितं प्रेताभिनिवेशं वा समीक्ष्य साक्षिप्रत्ययमेव स्यात् । ४३ ।

'साक्षिबालिश्येष्वेव पृथगनुयोगे देशकालकार्याणां पूर्वमध्यमोत्तमा दण्डाः' इत्यौशनसाः । ४४ । 'कूटसाक्षिणो यमर्थमभूतं कुर्युर्भूतं वा नाशयेयुस्तद्दशगुणं दण्डं दद्युः' इति मानवाः । ४५ । 'बालिश्याद्वा विसंवादयतां चित्रो घातः' इति बार्हस्पत्याः । ४६ । नेति कौटिल्यः । ४७ । ध्रुवं हि साक्षिभिः श्रोतव्यम् । ४८ । अशृण्वतां चतुर्विंशतिपणो दण्डः, ततोऽर्धमब्रुवाणानाम् । ४९ ।

३९ साक्षिदारांत मतभेद झाल्यास ज्या बाजूला शुद्ध आचरणाचे अथवा उभयसंमत अशा बहुसंख्य साक्षिदारांचे मत पडले असेल त्या बाजूने निकाल द्यावा किंवा दोहोंच्या मधला मार्ग पत्करावा. ४० किंवा ते द्रव्य सरकारजमा करावे. ४१ दाव्यातील रकमेपेक्षा कमी रक्कम साक्षिदारांनी निश्चित केली तर वादीने त्या अधिक रकमेचा भाग (दंड म्हणून) द्यावा. ४२ दाव्यातील रकमेपेक्षा जास्त रक्कम असल्याचे त्यांनी सांगितले तर ती अधिक रक्कम सरकारजमा करावी.

४३ वादीच्या मूर्खपणामुळे जे चुकीचे ऐकले गेले असेल किंवा (कर्जरोख्यात) चुकीचे लिहिले गेले असेल किंवा जबानी केल्यानंतर कोणी मयत झाला असेल तर त्याबाबतीत तपास करून दाव्याचा निकाल साक्षिदारांच्या साक्षीप्रमाणेच लावावा.

४४ "साक्षिदारांच्या मूर्खपणामुळेच देश, काल व कार्य यांच्या संबंधात त्यांनी भिन्न भिन्न जबान्या केल्यास त्यांना (अनुक्रमे) प्रथम, मध्यम व उत्तम साहसदंड करावेत," असे औशनसांचे मत आहे. ४५ "खोटे साक्षिदार ज्या नसलेल्या रकमेची साक्ष देतील किंवा जी असलेली रक्कम नव्हतीच अशी साक्ष देतील त्या रकमेच्या दसपट दंड त्यांनी दिला पाहिजे," असे मानवांचे मत आहे. ४६ "मूर्खपणामुळे साक्षिदार चुकीच्या निर्णयास कारणीभूत होतील तर हालहाल करून त्यांचा वध करावा," असे बार्हस्पत्यांचे मत आहे. ४७ कौटिल्याच्या मते हे बरोबर नाही. ४८ कारण, साक्षिदारांनी जे सत्य असेल ते सांगितले पाहिजे. ४९ जे सत्य सांगत नसतील त्यांना चोवीस पण दंड करावा, जे साक्षच देणार नसतील त्यांना याच्या अर्धा दंड करावा.

देशकालाविदूरस्थान् साक्षिणः प्रतिपादयेत् ।
दूरस्थानप्रसारान् वा स्वामिवाक्येन साधयेत् ।। ५० ।।

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे ऋणादानम् एकादशोऽध्यायः । आदितोऽष्टषष्टितमः ।

१२

## [ चतुष्षष्टितमं प्रकरणम् – औपनिधिकम् ]

उपनिधिर् ऋणेन व्याख्यातः । १ ।

परचक्राटविकाभ्यां दुर्गराष्ट्रविलोपे वा, प्रतिरोधकैर्वा ग्रामसार्थव्रजविलोपे, चक्रयुक्तनाशे वा, ग्राममध्याग्न्युदकाबाधे ज्वालावेगोपरुद्धे वा, नावि निमग्नायां मुषितायां वा स्वयमुपरूढो नोपनिधिमभ्यावहेत् । २ ।

उपनिधिभोक्ता देशकालानुरूपं भोगवेतनं दद्यात्, द्वादशपणं च दण्डम् । ३ । उपभोगनिमित्तं नष्टं विनष्टं वाभ्यावहेत्, चतुर्विंशतिपणश्च दण्डः, अन्यथा वा निष्पतने । ४ । प्रेतं व्यसनगतं वा नोपनिधिमभ्यावहेत् । ५ । आधानविक्रया-

५० (वादीने अथवा प्रतिवादीने) जे देशदृष्टचा अथवा कालदृष्टचा फार दूर नाहीत असे साक्षिदार बोलवावेत. जे दूर असतील किंवा येण्यास तयार नसतील त्यांना सरकारी हुकुमाने आणावे.

## बारावा अध्याय

### प्रकरण ६४ : ठेवीसंबंधी

१ कर्जफेडीविषयीचे नियम ठेव परत करण्यास लागू आहेत.

२ शत्रुसैन्य किंवा जंगली टोळचा यांनी दुर्ग अथवा जनपद उध्वस्त केले असेल, किंवा दरोडेखोरांनी गाव, तांडा अथवा कळप लुटला असेल, किंवा (ठेव असलेल्या) गाडीचा नाश झाला असेल, किंवा गावात आगीचे किंवा पुराचे संकट असता (ठेव) आगीने किंवा पुराने वेढली गेली असेल, (ठेव असलेली) नाव बुडाली किंवा लुटली गेली असेल तर त्या संकटात स्वतः सापडलेला ठेव स्वीकारणारा ती परत करण्यास बांधलेला नाही.

३ ठेवीचा उपभोग घेणाऱ्याने देश व काल यांना अनुरूप अशी उपभोगाबद्दल किंमत दिली पाहिजे व शिवाय बारा पण दंड. ४ उपभोग केल्यामुळे ठेवीचे नुकसान झाले अथवा ती नष्ट झाली तर तिची भरपाई केली पाहिजे व चोवीस पण दंड दिला पाहिजे; दुसऱ्या काही कारणामुळे (सजीव) ठेव पळून गेल्यासही हे शासन करावे. ५ ठेव मृत किंवा संकटग्रस्त झाली तर ती स्वीकारणाऱ्याला जबाबदार धरता येणार नाही. ६ ठेव गहाण ठेवल्यास, विकल्यास अथवा

पव्ययनेषु चास्य चतुर्गुणपञ्चबन्धो दण्डः ।६। परिवर्तने निष्पातने वा मूल्यसमः ।७।

तेन आधिप्रणाशोपभोगविक्रयाधानापहारा व्याख्याताः ।८।

नाधिः सोपकारः सीदेत्, न चास्य मूल्यं वर्धेत, अन्यत्र निसर्गात् ।९। निरुपकारः सीदेत्, मूल्यं चास्य वर्धेत ।१०।

उपस्थितस्याधिमप्रयच्छतो द्वादशपणो दण्डः ।११। प्रयोजकासंनिधाने वा ग्रामवृद्धेषु स्थापयित्वा निष्क्रयमाधिं प्रतिपद्येत ।१२। निवृत्तवृद्धिको वाऽऽधिस्तत्कालकृतमूल्यस्तत्रैवावतिष्ठेत, अनाशविनाशकरणाधिष्ठितो वा ।१३। धारणिकासंनिधाने वा विनाशभयादुद्गतार्घं धर्मस्थानुज्ञातो विक्रीणीत, आधिपालप्रत्ययो वा ।१४।

घेतली असल्याचे नाकबूल केल्यास तिच्या किमतीच्या चौपटीच्या एकपंचमांशाइतका दंड करावा. ७ तिच्यात बदल केल्यास अथवा तिला पळवून लावल्यास किमतीइतका दंड करावा.

८ हेच नियम गहाण ठेवलेल्या वस्तूच्या नाश, उपभोग, विक्री, गहाण व अपहार ह्या व्यवहारांसही लागू होतात.

९ ज्या गहाण ठेवलेल्या वस्तूचा (उदा० शेत, गाय) उपभोग घेता येतो तिच्यावरचा ऋणकोचा मालकी हक्क नष्ट होणार नाही आणि त्या मुदलावर व्याज चढणार नाही; याला अपवाद ऋणकोने व्याज देण्याचेही मान्य केले असेल त्याचा. १० जिचा उपभोग घेता येत नाही अशा गहाण वस्तूवरचा मालकी हक्क नष्ट होऊ शकेल आणि मुदलावर व्याजही चढत राहील.

११ गहाण वस्तू सोडविण्यास मालक आला असता ती न देणाऱ्यास बारा पण दंड करावा. १२ कर्ज देणारा हजर नसेल तर मुदलाची रक्कम वयोवृद्ध ग्रामस्थांकडे ठेवून गहाण वस्तू घेऊन जावी. १३ किंवा व्याज चढत रहाण्याचे बंद होऊन त्या गहाण वस्तूची त्या वेळची किंमत निश्चित करुन ती तेथेच राहू द्यावी किंवा नष्ट-विनष्ट वस्तूंचे संरक्षण करणाऱ्या कचेरीत ठेवावी. १४ किंवा कर्जदार हजर नसल्यास गहाण वस्तू नाश पावेल ह्या भीतीने सावकाराने न्यायाधिशांच्या परवानगीने अथवा गहाणांचे रक्षण करणाऱ्या अधिकाऱ्याची खात्री पटवून ती वस्तू जास्तीत जास्त किमतीला विकावी.

**स्थावरस्तु प्रयासभोग्यः फलभोग्यो वा प्रक्षेपवृद्धिमूल्यशुद्धमाजीवममूल्यक्षयेणोपनयेत् । १५ । अनिसृष्टोपभोक्ता मूल्यशुद्धमाजीवं बन्धं च दद्यात् । १६ । शेषमुपनिधिना व्याख्यातम् । १७ ।**

**एतेनादेशोऽन्वाधिश्च व्याख्यातौ । १८ । सार्थेनान्वाधिहस्तो वा प्रदिष्टां भूमिमप्राप्तश्चोरैर्भग्नोत्सृष्टो वा नान्वाधिमभ्यावहेत् । १९ । अन्तरे वा मृतस्य दायादोऽपि नाभ्यावहेत् । २० । शेषमुपनिधिना व्याख्यातम् । २१ ।**

**याचितकमवक्रीतकं वा यथाविधं गृह्णीयुस्तथाविधमेवार्पयेयुः । २२ । भ्रेषोपनिपाताभ्यां देशकालोपरोधि दत्तं नष्टं विनष्टं वा नाभ्यावहेयुः । २३ । शेषमुपनिधिना व्याख्यातम् । २४ ।**

**वैयावृत्यविक्रयस्तु – वैयावृत्यकरा यथादेशकालं विक्रीणानाः पण्यं यथाजातं मूल्यमुदयं च दद्युः । २५ । देशकालातिपातने वा परिहीणं संप्रदानकालिकेनार्घेण**

१५ परंतु मेहनत करून उपभोग घ्यावयाची असलेली (उदा० शेत) किंवा मेहनतीशिवाय उपभोग घेता येण्यासारखी (उदा० भाडेकरी असलेले घर) स्थावर स्वरूपाची गहाण वस्तू असल्यास मुदलावरील व्याजाच्या रकमेहून अधिक होणाऱ्या नफ्याचा, मुदलात काट न करता, उपभोग घ्यावयास हरकत नाही. १६ परंतु परवानगीशिवाय उपभोग घेणाऱ्याने (व्याजाची) किंमत वजा करून घेऊन नफा व (दंड म्हणून एकपंचमांश) भाग दिला पाहिजे. १७ बाकी (गहाणासंबंधी) सर्व ठेवीप्रमाणे समजावे.

१८ हेच नियम आदेश (कोणाला नेऊन देण्यास सांगितलेली वस्तू) व अन्वाधि (दूर देशी घेऊन जाण्यास सांगितलेली वस्तू) यांनाही लागू होतात. १९ किंवा तांड्याबरोबर अन्वाधि घेऊन जाणारा मनुष्य सांगितलेल्या ठिकाणी पोचला नाही किंवा चोरांनी मारहाण करून त्याला टाकून दिले तर तो त्या वस्तूबद्दल जबाबदार नाही. २० किंवा वाटेत जर तो मरण पावला तर त्याचे वारसदारसुद्धा ती देण्यास बांधलेले रहाणार नाहीत. २१ बाकी सर्व ठेवीप्रमाणे समजावे.

२२ उसनी घेतलेली वस्तू किंवा भाड्याने घेतलेली वस्तू ज्या स्थितीत घेतली असेल त्याच स्थितीत परत केली पाहिजे. २३ देश व काल यांच्यासंबंधी निर्बंध घालून दिलेली वस्तू स्वाभाविकपणे खराब झाल्यामुळे किंवा आकस्मिक संकटामुळे नाहिशी झाली किंवा तिचे नुकसान झाले तर ती घेणाऱ्याला जबाबदार धरता येणार नाही. २४ बाकी सर्व ठेवीप्रमाणे समजावे.

२५ परंतु गुमास्त्यांच्या मार्फत करावयाच्या विक्रीसंबंधी नियम—माल योग्य ठिकाणी व योग्य वेळी विकून गुमास्त्यांनी जी किंमत येईल ती व नफा

**मूल्यमुदयं च दद्युः । २६ । यथासंभाषितं वा विक्रीणाना नोदयमधिगच्छेयुः, मूल्यमेव दद्युः । २७ । अर्घपतने वा परिहीणं यथापरिहीणं मूल्यमूनं दद्युः । २८ । सांव्यवहारिकेषु वा प्रात्ययिकेष्वराजवाच्येषु भ्रेषोपनिपाताभ्यां नष्टं विनष्टं वा मूल्यमपि न दद्युः । २९ । देशकालान्तरितानां तु पण्यानां क्षयव्ययविशुद्धं मूल्यमुदयं च दद्युः, पण्यसमवायानां च प्रत्यंशम् । ३० । शेषमुपनिधिना व्याख्यातम् । ३१ । एतेन वैयावृत्यविक्रयो व्याख्यातः । ३२ ।**

**निक्षेपश्चोपनिधिना । ३३ । तमन्येन निक्षिप्तमन्यस्यार्पयतो हीयेत । ३४ । निक्षेपापहारे पूर्वापदानं निक्षेप्तारश्च प्रमाणम् । ३५ । अशुचयो हि कारवः । ३६ । नैषां करणपूर्वो निक्षेपधर्मः । ३७ ।**

(मालकाला) दिला पाहिजे. २६ योग्य ठिकाण व योग्य वेळ चुकविल्यामुळे कमी प्राप्ती झाल्यास माल त्यांच्या ताब्यात देताना जो दर असेल त्या दराने किंमत व नफा त्यांनी दिला पाहिजे. २७ किंवा सांगितलेल्या दराने विक्री केल्यामुळे नफा मिळाला नसेल तर फक्त किंमतच द्यावी. २८ भाव उतरल्यामुळे प्राप्ती कमी झाल्यास ज्या प्रमाणात भाव कमी आला असेल त्या प्रमाणात किंमत कमी द्यावी. २९ किंवा जे विश्वासपात्र, सरकारच्या दृष्टीने सच्चे व्यवहार करणारे असतील अशा व्यापाऱ्यांनी स्वाभाविकपणे खराब झाल्यामुळे किंवा आकस्मिक संकटामुळे नुकसान पावलेल्या अथवा नष्ट झालेल्या मालाची किंमतसुद्धा देण्याचे कारण नाही. ३० परंतु दूर देशी अथवा कालांतराने विकावयाच्या मालाच्या संबंधात तूट व खर्च वजा करून किंमत व नफा द्यावा, आणि अनेक जातीचा माल एकत्र घेतला असेल तर प्रत्येकाचा स्वतंत्र हिशोब दिला पाहिजे. ३१ बाकी सर्व ठेवीप्रमाणे समजावे. ३२ हा झाला गुमास्त्यांमार्फत विक्रीचा विषय.

३३ निक्षेपासंबंधी (पदार्थ बनविण्यासाठी कारागिराला दिलेल्या कच्च्या मालासंबंधी) नियम ठेवीप्रमाणेच समजावेत. ३४ एकाने निक्षेप दिला असता दुसऱ्याला परत केल्यास तो नष्ट झाला (असे समजून शासन करावे). ३५ निक्षेपाचा अपहार केल्यास त्याने पूर्वी अपराध केला असल्यास तो आणि निक्षेप देणाऱ्यांचे म्हणणे विचारात घेऊन निर्णय द्यावा. ३६ कारण, कारागीर (बहुतेक) लबाड असतात. ३७ त्यांच्यात साक्षिपूर्वक निक्षेप स्वीकारण्याची पद्धत नाही.

**करणहीनं निक्षेपमपव्ययमानं गूढभित्तिन्यस्तान् साक्षिणो निक्षेप्ता रहसि प्रणिपातेन प्रज्ञापयेत्, वनान्ते वा मद्यप्रहवणविश्वासेन । ३८ ।**

**रहसि वृद्धो व्याधितो वा वैदेहकः कश्चित्कृतलक्षणं द्रव्यमस्य हस्ते निक्षिप्यापगच्छेत् । ३९ । तस्य प्रतिदेशेन पुत्रो भ्राता वाऽभिगम्य निक्षेपं याचेत । ४० । दाने शुचिः, अन्यथा निक्षेपं स्तेयदण्डं च दद्यात् । ४१ ।**

**प्रव्रज्याभिमुखो वा श्रद्धेयः कश्चित्कृतलक्षणं द्रव्यमस्य हस्ते निक्षिप्य प्रतिष्ठेत । ४२ । ततः कालान्तरागतो याचेत । ४३ । दाने शुचिः, अन्यथा निक्षेपं स्तेयदण्डं च दद्यात् । ४४ ।**

**कृतलक्षणेन वा द्रव्येण प्रत्यानयेदेनम् । ४५ ।**

३८ साक्षिदाराशिवाय दिलेला निक्षेप नाकबूल करीत असल्यास तो देणाऱ्याने गुप्तपणे भिंतीआड साक्षिदार लपवून एकांतात (त्या कारागिराच्या) हातापाया पडून मागणी करावी व अशा रीतीने त्या साक्षिदारांना निक्षेपाची माहिती करून द्यावी, किंवा उपवनात मद्याच्या मैफलीत त्याच्यात विश्वास उत्पन्न करून त्याच्या तोंडून इतरांच्या समक्ष निक्षेपाची हकीकत वदवावी.

३९ एखाद्या वृद्ध अथवा आजारी व्यापाऱ्याने खूण केलेली वस्तू एकांतात त्या कारागिराला निक्षेप म्हणून देऊन (गावातून) निघून जावे. ४० त्याच्या सांगीवरून म्हणून त्याच्या मुलाने अथवा भावाने त्याच्याकडे जाऊन तो निक्षेप परत मागावा. ४१ त्याने दिला तर तो शुद्ध आचरणाचा असे समजावे, नाहीतर त्याला मूळचा (वादाचा विषय असलेला) निक्षेप व चोरीबद्दलचा दंड द्यावा लागेल.

४२ किंवा विश्वास ठेवण्यास योग्य अशा एखाद्या माणसाने संन्यास घेण्याच्या तयारीत असल्याचे दाखवून खूण केलेली वस्तू त्याच्या हाती ठेवावी व निघून जावे. ४३ नंतर काही काल गेल्यावर परत येऊन ती मागावी. ४४ त्याने ती दिल्यास तो शुद्ध आचरणाचा, नाहीतर त्याला मूळ निक्षेप व चोरीबद्दलचा दंड द्यावा लागेल.

४५ किंवा खूण केलेल्या द्रव्याच्या साह्याने (निक्षेप देणाऱ्यानेच) त्याला परत करावयास लावावे.

बालिशजातीयो वा रात्रौ राजदायिकाक्षणभीतः सारमस्य हस्ते निक्षिप्यापगच्छेत् । ४६ । स एनं बन्धनागारगतो याचेत । ४७ । दाने शुचिः, अन्यथा निक्षेपं स्तेयदण्डं च दद्यात् । ४८ ।

अभिज्ञानेन चास्य गृहे जनमुभयं याचेत । ४९ । अन्यतरादाने यथोक्तं पुरस्तात् । ५० ।

द्रव्यभोगानामागमं चास्यानुयुञ्जीत, तस्य चार्थस्य व्यवहारोपलिङ्गनम्, अभियोक्तुश्चार्थसामर्थ्यम् । ५१ ।

एतेन मिथःसमवायो व्याख्यातः । ५२ ।

तस्मात्साक्षिमदच्छन्नं कुर्यात्सम्यग्विभाषितम् ।
स्वे परे वा जने कार्यं देशकालाग्रवर्णतः ।। ५३ ।।

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे औपनिधिकम् द्वादशोऽध्यायः । आदित एकोनसप्ततितमः ।

४६ किंवा मूर्ख दिसणाऱ्या माणसाने रात्री सरकारी देण्यासाठी अथवा निषिद्ध वेळात भटकण्यासाठी पकडला जाईन ह्या भीतीने भारी किंमतीच्या वस्तू त्याच्याकडे ठेवावयास देऊन निघून जावे. ४७ मग तुरुंगातून त्याने त्याच्याकडे (त्या वस्तूची) मागणी करावी. ४८ त्याने दिल्यास तो शुद्ध आचरणाचा, नाहीतर त्याला मूळ निक्षेप व चोरीबद्दलचा दंड द्यावा लागेल.

४९ आणि (तो मृत झाल्यास) ओळख पटविणाऱ्या खुणेच्या साह्याने त्याच्या घरातील माणसांकडे दोहोंची मागणी करावी. ५० जर त्यांपैकी एक दिला नाही तर वर सांगितल्याप्रमाणे निर्णय द्यावा.

५१ आणि त्या कारागिराला तो वापरीत असलेली द्रव्ये कोठून मिळाली ते विचारावे आणि त्या पदार्थाची त्या व्यवहाराविषयीची चिन्हे, तसेच वादीची त्या पदार्थावर मालकी असण्याची संभाव्यता ह्या गोष्टींचाही शोध घ्यावा.

५२ याचप्रमाणे दोघांमधील गुप्त कराराच्या बाबतीत (एकजण नाकबूल करीत असल्यास वरील युक्त्यांचा अवलंब करून) निर्णय द्यावा.

५३ म्हणून स्वजनांबरोबर अथवा परक्यांबरोबर व्यवहार करावयाचा तो साक्षिदारांसमक्ष, उघडपणे, देश, काल, संख्या व प्रत यांचा व्यवस्थितपणे निर्देश करून करावा.

## १३

## [ पञ्चषष्टितमं प्रकरणम् – दासकर्मकरकल्पः ]

उदरदासवर्जमार्यप्राणमप्राप्तव्यवहारं शूद्रं विक्रयाधानं नयतः स्वजनस्य द्वादशपणो दण्डः, वैश्यं द्विगुणः, क्षत्रियं त्रिगुणः, ब्राह्मणं चतुर्गुणः । १ । परजनस्य पूर्वमध्यमोत्तमवधा दण्डाः, क्रेतृश्रोतॄणां च । २ ।

म्लेच्छानामदोषः प्रजां विक्रेतुमाधातुं वा । ३ । न त्वेवार्यस्य दासभावः । ४ । अथवाऽऽर्यमाधाय कुलबन्धन आर्याणामापदि, निष्क्रयं चाधिगम्य बालं साहाय्यदातारं वा पूर्वं निष्क्रीणीरन् । ५ ।

सकृदात्माधाता निष्पतितः सीदेत्, द्विरन्येनाहितकः, सकृदुभौ परविषयाभिमुखौ । ६ ।

वित्तापहारिणो वा दासस्यार्यभावमपहरतोऽर्धदण्डः । ७ ।

## तेरावा अध्याय

## प्रकरण ६५ : दास व कामगार यांच्याविषयीचा कायदा

१ उदरभरणासाठी दास्य स्वीकारणाऱ्या मनुष्याखेरीज सज्ञान न झालेल्या आर्य माणसाला विकणाऱ्यास अथवा गहाण ठेवणाऱ्यास शूद्राच्या बाबतीत त्याच्या नातेवाइकाला बारा पण दंड करावा, वैश्याच्या बाबतीत दुप्पट, क्षत्रियाच्या बाबतीत तिप्पट, ब्राह्मणाच्या बाबतीत चौपट. २ परक्या माणसाने हे केल्यास त्याला अनुक्रमे प्रथम, मध्यम व उत्तम साहसदंड आणि वध अशा शिक्षा कराव्यात; विकत घेणाऱ्याला व साक्षिदारांना ह्याच शिक्षा कराव्यात.

३ म्लेच्छांनी आपले अपत्य विकले किंवा गहाण ठेवले तर त्यात काही दोष नाही. ४ परंतु आर्य मनुष्याला केव्हाही दासत्व येता कामा नये. ५ किंवा आर्य माणसांवर आपत्ती ओढवली असता एखाद्या आर्य कुटुंबाने गहाण राहून स्वतःस बांधून घेतल्यास, नंतर सोडवणूक करून घेण्यासाठी रक्कम मिळाल्यावर प्रथम अज्ञान बालकाची अथवा मदत मिळविणाऱ्याची सोडवणूक करावी.

६ स्वतःला गहाण ठेवणारा मनुष्य एकदा पळून गेला तर त्याचे हक्क बुडतात (व तो दास होतो), दुसऱ्याने गहाण ठेवलेला मनुष्य दोनदा पळून गेला तर (तो दास होतो), परदेशात जाण्याच्या तयारीने दोघेही एकदाच पळून गेले तरी (दास होतात).

७ किंवा पैसे चोरणाऱ्या दासाचे आर्यत्व नष्ट करणाऱ्यास वरील दंडांच्या अर्धे दंड करावेत.

निष्पतितप्रेतव्यसनिनामाधाता मूल्यं भजेत । ८ ।

प्रेतविण्मूत्रोच्छिष्टग्राहणमाहितस्य नग्नस्नापनं दण्डप्रेषणमतिक्रमणं च स्त्रीणां मूल्यनाशकरम्, धात्रीपरिचारिकार्धसीतिकोपचारिकाणां च मोक्षकरम् । ९ । सिद्धमुपचारकस्याभिप्रजातस्यापक्रमणम् । १० ।

धात्रीमाहितिकां वाऽकामां स्ववशां गच्छतः पूर्वः साहसदण्डः, परवशां मध्यमः । ११ । कन्यामाहितिकां वा स्वयमन्येन वा दूषयतो मूल्यनाशः शुल्कं तद्द्विगुणश्च दण्डः । १२ ।

आत्मविक्रयिणः प्रजामार्यां विद्यात् । १३ । आत्माधिगतं स्वामिकर्माविरुद्धं लभेत, पित्र्यं च दायम् । १४ । मूल्येन चार्यत्वं गच्छेत् । १५ । तेनोदरदासाहितकौ व्याख्यातौ । १६ । प्रक्षेपानुरूपश्चास्य निष्क्रयः । १७ ।

८ गहाण ठेवलेला मनुष्य पळून गेला, मरण पावला अथवा संकटात सापडला तर गहाण ठेवणाऱ्याने मुदलाबद्दल (दुसरी) जबाबदारी स्वीकारली पाहिजे.

९ गहाण ठेवलेल्या मनुष्यास प्रेत, विष्ठा, मूत्र अथवा उष्टे उचलावयास लावणे, गहाण स्त्रियांना नग्न मनुष्याला आंघोळ घालावयास लावणे, त्यांना मार देणे व त्यांच्यावर अत्याचार करणे, या गोष्टी कर्जाची रक्कम बुडण्यास कारणीभूत होतात; दाई, परिचारिका, अर्ध्या पिकाच्या बोलीने शेतजमीन कसणारी स्त्री आणि सेविका यांच्या बाबतीत ह्या गोष्टी त्यांच्या मुक्ततेस कारणीभूत होतात. १० जिला (कर्ज देणाऱ्यापासून) मूल झाले आहे तिचे तेथून निघून जाणे कायदेशीर आहे.

११ गहाण ठेवलेल्या दाईशी तिची इच्छा नसताना समागम करणाऱ्यास, ती त्याच्या स्वतःच्या ताब्यात असल्यास, प्रथम साहसदंड करावा, दुसऱ्याच्या ताब्यात असल्यास मध्यम साहसदंड. १२ कुमारी असलेल्या गहाण मुलीस स्वतः किंवा दुसऱ्याकरवी भ्रष्ट करणाऱ्याचे कर्ज बुडते व त्याने तिच्या विवाहाचे शुल्क देऊन त्याच्या दुप्पट दंड दिला पाहिजे.

१३ स्वत.ची विक्री करून दास होणाऱ्याची संतती आर्यच मानली पाहिजे. १४ मालकाच्या कामात व्यत्यय न आणता दासाने स्वतः मिळविलेले व पैतृक धन यावर त्याची मालकी राहील. १५ आणि विक्रीची किंमत परत करून तो पुन्हा आर्य होऊ शकेल. १६ हाच नियम उपजीविकेसाठी दास होणारा व गहाण ठेवलेला मनुष्य यांनाही लागू आहे. १७ त्याच्या (गहाण माणसाच्या) बाबतीत कर्जाच्या रकमेइतक्या रकमेने त्याची मुक्तता होईल.

दण्डप्रणीतः कर्मणा दण्डमुपनयेत् । १८ ।

आर्यप्राणो ध्वजाहृतः कर्मकालानुरूपेण मूल्यार्धेन वा विमुच्येत । १९ ।

गृहेजातदायागतलब्धक्रीतानामन्यतमं दासमूनाष्टवर्षं विबन्धुमकामं नीचे कर्मणि विदेशे दासीं वा सगर्भामप्रतिविहितगर्भभर्मण्यां विक्रयाधानं नयतः पूर्वः साहसदण्डः, क्रेतृश्रोतॄणां च । २० ।

दासमनुरूपेण निष्क्रयेणार्यमकुर्वतो द्वादशपणो दण्डः, संरोधश्चा करणात् । २१ ।

दासद्रव्यस्य ज्ञातयो दायादाः, तेषामभावे स्वामी । २२ ।

स्वामिनः स्वस्यां दास्यां जातं समातृकमदासं विद्यात् । २३ । गृह्या चेत् कुटुम्बार्थचिन्तनी माता भ्राता भगिनी चास्या अदासाः स्युः । २४ ।

१८ दंड झालेल्या (पण तो भरण्यास असमर्थ असलेल्या) मनुष्याने काम करून दंड पुरा करावा.

१९ लढाईत पकडून आणून दास केलेल्या आर्य मनुष्याची, त्याने अमुक काम अमुक कालपर्यंत केल्यावर अथवा दासाच्या (नेहमीच्या) किमतीच्या अर्धी रक्कम घेऊन, मुक्तता करावी.

२० घरी जन्मलेला, वारसात मिळालेला, (बक्षीस म्हणून) मिळालेला आणि विकत घेतलेला ह्या चार प्रकारच्या दासांपैकी कोणत्याही एका प्रकारच्या दासास, तो आठ वर्षांहून लहान असता व त्याला कोणी बांधव नसता, त्याच्या इच्छेविरुद्ध नीच काम करावयास लावणाऱ्याला अथवा परदेशात पाठविणाऱ्याला, किंवा गरोदर असलेल्या तशा प्रकारच्या दासीला तिच्या गर्भारपणाची सोय न करता गहाण ठेवणाऱ्याला किंवा विकणाऱ्याला प्रथम साहसदंड करावा; विकत घेणारा व साक्षिदार यांनाही तोच दंड करावा.

२१ मुक्तता करण्यासाठी योग्य रक्कम घेऊन जो दासाला आर्य करणार नाही त्याला बारा पण दंड करावा आणि मुक्त करीपर्यंत त्याला बंधनात ठेवावे.

२२ दासाच्या धनाचे त्याचे नातेवाईक वारसदार होत; ते कोणी नसल्यास त्याचा मालक.

२३ मालकाला स्वतःच्या दासीपासून झालेले अपत्य त्याच्या मातेसह दास्यातून मुक्त होते असे समजावे. २४ ती जर घरातल्यासारखीच कुटुंबाचा कारभार पहाणारी अशी असेल तर तिची आई, भाऊ व बहीण हे सुद्धा दास्यातून मुक्त होतील.

दासं दासीं वा निष्क्रीय पुनर्विक्रयाधानं नयतो द्वादशपणो दण्डः, अन्यत्र स्वयंवादिभ्यः । २५ । इति दासकल्पः ।

कर्मकरस्य कर्मसंबन्धमासन्ना विद्युः । २६ ।

यथासंभाषितं वेतनं लभेत, कर्मकालानुरूपमसंभाषितवेतनः । २७ । कर्षकः सस्यानां गोपालकः सर्पिषां वैदेहकः पण्यानामात्मना व्यवहृतानां दशभागमसंभाषितवेतनो लभेत । २८ । संभाषितवेतनस्तु यथासंभाषितम् । २९ ।

कारुशिल्पिकुशीलवचिकित्सकवाग्जीवनपरिचारकादिराशाकारिकवर्गस्तु यथान्यस्तद्विधः कुर्याद् यथा वा कुशलाः कल्पयेयुस्तथा वेतनं लभेत । ३० ।

साक्षिप्रत्ययमेव स्यात् । ३१ । साक्षिणामभावे यतः कर्म ततोऽनुयुञ्जीत । ३२ ।

वेतनादाने दशबन्धो दण्डः, षट्पणो वा । ३३ । अपव्ययमाने द्वादशपणो दण्डः, पञ्चबन्धो वा । ३४ ।

२५ दासाला किंवा दासीला मोबदला घेऊन मुक्त केल्यानंतर त्यांना पुन्हा गहाण ठेवणाऱ्यास अथवा विकणाऱ्यास बारा पण दंड करावा; याला अपवाद स्वत: होऊन दास्य पत्करणाऱ्यांचा. हा झाला दासाविषयीचा कायदा.

२६ कामगाराने कोणते व किती काम केले ते जवळपासच्या माणसांनी जाणून घ्यावे.

२७ त्याला ठरली असेल त्याप्रमाणे मजुरी मिळाली पाहिजे, जर मजुरी ठरली नसेल तर काम व काळ यांना अनुरूप अशी मिळावी. २८ मजुरी ठरली नसेल तेव्हा शेतकऱ्याला त्याने काढलेल्या पिकाचा एकदशांश भाग, गुराख्याला त्याने पाळलेल्या गाई-म्हशींच्या तुपाचा एकदशांश भाग व व्यापाऱ्याला त्याने व्यवहार केलेल्या मालाचा एकदशांश भाग मिळाला पाहिजे. २९ पण मजुरी ठरली असेल तर ठरल्याप्रमाणे ती मिळावी.

३० परंतु कारागीर, कलाकार, कुशीलव, वैद्य, कथा सांगणारे, परिचारक व इतर (वेतनाच्या) अपेक्षेने काम करणाऱ्या मंडळीला त्यांच्यासारख्या इतरांना जेवढे मिळत असेल तेवढे किंवा तज्ज्ञ ठरवून देतील तेवढे वेतन मिळावे.

३१ साक्षिदारांच्या साह्यानेच (कामासंबंधीच्या तंट्यात) निर्णय द्यावा. ३२ साक्षिदार नसतील तर जेथे काम झाले असेल तेथे तपास करावा.

३३ वेतन दिले नाही तर त्याच्या एकदशांश रकमेइतका अथवा सहा पण दंड करावा. ३४ ते देण्याचे नाकबूल केले तर बारा पण अथवा एकपंचमांश रकमेइतका दंड करावा.

नदीवेगज्वालास्तेनव्यालोपरुद्धः सर्वस्वपुत्रदारात्मदानेनार्तस्त्रातारमाहूय निस्तीर्णः कुशलप्रदिष्टं वेतनं दद्यात् ।३५। तेन सर्वत्रार्तदानानुशया व्याख्याताः । ३६ ।

लभेत पुंश्चली भोगं संगमस्योपलिङ्गनात् ।
अतियाच्ञा तु जीयेत दौर्मत्याविनयेन वा ।। ३७ ।।

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे दासकर्मकरकल्पे दासकल्पः कर्मकरकल्पे स्वाम्यधिकारः त्रयोदशोऽध्यायः । आदितः सप्ततितमः ।

१४

## [ पञ्चषष्टितमं प्रकरणम् – दासकर्मकरकल्पः, तत्र भृतकाधिकारः; षट्षष्टितमं प्रकरणम् – सम्भूयसमुत्थानम् ]

गृहीत्वा वेतनं कर्माकुर्वतो भृतकस्य द्वादशपणो दण्डः, संरोधश्चा करणात् । १ । अशक्तः कुत्सिते कर्मणि व्याधौ व्यसने वाऽनुशयं लभेत, परेण वा कारयितुम् । २ । तस्य व्ययकर्मणा लभेत भर्ता वा कारयितुम् । ३ ।

३५ नदीचा पूर, आग, चोर, हिंस्त्र प्राणी यांच्या तावडीत सापडलेल्या संकटग्रस्त मनुष्याने रक्षणासाठी कोणाला आपले सर्वस्व, पत्नी, मुले व स्वतःला देण्याचे कबूल करून हाक मारली व तो त्या संकटातून वाचला तर तज्ज्ञ जे ठरवितील तेवढेच बक्षीस त्याने द्यावे. ३६ हाच नियम सर्व प्रकारच्या संकटांत देण्याचे कबूल केल्यावर माघार घेण्याच्या बाबतीत लागू होतो.

३७ वेश्येला समागमाच्या चिन्हाच्या अनुरोधाने दिलेल्या उपभोगाबद्दल वेतन मिळावे. परंतु ती फार मागत असेल किंवा दुष्टबुद्धीने अथवा अविनयाने वागत असेल तर तिला वेतन गमवावे लागेल.

## चौदावा अध्याय
### प्रकरण ६५ (पुढे चालू) : नोकरांच्या विषयी
### प्रकरण ६६ : एकत्र येऊन काम करण्याविषयी

१ वेतन घेऊन काम न करणाऱ्या नोकराला बारा पण दंड करावा आणि ते करीपर्यंत त्याला बंधनात ठेवावे. २ तो असमर्थ असेल, ते काम गर्हणीय असेल, तो आजारी किंवा संकटग्रस्त असेल तर त्याला ते काम न करण्याचा अथवा दुसऱ्याकडून ते करवून घेण्याचा हक्क राहील. ३ किंवा त्याच्या खर्चाने मालकाला ते काम (दुसऱ्याकडून) करवून घेता येईल.

'नान्यस्त्वया कारयितव्यो, मया वा नान्यस्य कर्तव्यम्' इत्यवरोधे भर्तुरकारयतो भृतकस्याकुर्वतो वा द्वादशपणो दण्डः । ४ । कर्मनिष्ठापने भर्तुरन्यत्र गृहीतवेतनो नासकामः कुर्यात् । ५ ।

'उपस्थितमकारयतः कृतमेव विद्याद्' इत्याचार्याः । ६ । नेति कौटिल्यः । ७ । कृतस्य वेतनं नाकृतस्यास्ति । ८ । स चेदल्पमपि कारयित्वा न कारयेत् कृतमेवास्य विद्यात् । ९ ।

देशकालातिपातनेन कर्मणामन्यथाकरणे वा नासकामः कृतमनुमन्येत । १० । संभाषितादधिकक्रियायां प्रयासं न मोघं कुर्यात् । ११ ।

तेन संघभृता व्याख्याताः । १२ । तेषामाधिः सप्तरात्रमासीत । १३ । ततोऽन्यमुपस्थापयेत्, कर्मनिष्पाकं च । १४ । न चानिवेद्य भर्तुः संघः कंचित् परिहरेद् उपनयेद्वा । १५ । तस्यातिक्रमे चतुर्विंशतिपणो दण्डः । १६ । संघेन परिहृतस्यार्धदण्डः । १७ । इति भृताधिकारः ।

४ "तू दुसऱ्याकडून हे काम करून घेता कामा नये, मीही दुसऱ्याचे काम करता कामा नये" असे बंधन असता त्याच्याकडून काम करून न घेणाऱ्या मालकाला अथवा त्याचे काम न करणाऱ्या नोकराला बारा पण दंड करावा. ५ मालकाव्यतिरिक्त दुसऱ्याकडून आगाऊ वेतन घेतले असेल तर काम संपल्यावर (मालकाने सांगितलेले दुसरे काम) इच्छा नसल्यास त्याने करण्याचे कारण नाही.

६ "नोकर हजर झाला असता त्याला काम करावयास दिले नाही तर त्याने ते काम केले असे समजावे," असे आचार्यांचे मत आहे. ७ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ८ वेतन केलेल्या कामाबद्दल असते, न केलेल्या कामाबद्दल नाही. ९ मालकाने जर थोडेसेही काम करून घेऊन नंतर त्याला करू दिले नाही तर त्याने ते (संपूर्ण) काम केले असे समजावे.

१० देश किंवा काल यांचे उल्लंघन केल्यास अथवा निराळ्याच प्रकारे काम केल्यास मालकाची इच्छा नसल्यास ते काम केले आहे असे न मानण्यास हरकत नाही. ११ ठरलेल्यापेक्षा अधिक काम केले असल्यास त्याची मेहनत फुकट घालविता कामा नये.

१२ हेच नियम संघाचे सदस्य असणाऱ्या मजुरांना लागू आहेत. १३ त्यांनी कामावर ठेवलेल्या मनुष्याने सात दिवसपर्यंत तेथे काम करावे. १४ त्यानंतर संघाने दुसरा मनुष्य द्यावा आणि काम पूर्ण करून घ्यावे. १५ आणि मालकाला कळविल्याशिवाय संघाने कोणाला काढून घेऊ नये किंवा कामावर लावू नये.

संघभृताः संभूयसमुत्थातारो वा यथासंभाषितं वेतनं समं वा विभजेरन् । १८ ।

कर्षकवैदेहका वा सस्यपण्यारम्भपर्यवसानान्तरे सन्नस्य यथाकृतस्य कर्मणः प्रत्यंशं दद्युः । १९ । पुरुषोपस्थापने समग्रमंशं दद्युः । २० । संसिद्धे तूद्धृतपण्ये सन्नस्य तदानीमेव प्रत्यंशं दद्युः । २१ । सामान्या हि पथि सिद्धिश्चासिद्धिश्च । २२ । प्रक्रान्ते तु कर्मणि स्वस्थस्यापक्रामतो द्वादशपणो दण्डः । २३ । न च प्राकाम्यमपक्रमणे । २४ ।

चोरं त्वभयपूर्वं कर्मणः प्रत्यंशेन ग्राहयेद्, दद्यात्प्रत्यंशमभयं च । २५ । पुनः स्तेये प्रवासनम्, अन्यत्र गमने च । २६ । महापराधे तु दूष्यवदाचरेत् । २७ ।

१६ ह्या नियमाचा भंग केल्यास चोवीस पण दंड करावा. १७ संघाने काढून घेतलेल्या मजुरास ह्याच्या अर्धा दंड करावा. हा झाला नोकरांचा विषय.

१८ संघातील मजूर किंवा एकत्र येऊन भागिदारीत काम करणारे यांनी अगोदर ठरविलेले असेल त्याप्रमाणे किंवा सर्वांना सारख्या प्रमाणात वेतन व नफा यांची वाटणी करावी.

१९ शेतकरी किंवा व्यापारी यांच्यापैकी कोणी शेतकामाची अथवा व्यापाराची सुरुवात व शेवट यांच्या दरम्यानच्या काळात आजारी पडला तर त्याने जितके काम केले असेल तितक्याच प्रमाणात त्याला (मजुरीचा, उत्पन्नाचा अथवा नफ्याचा) हिस्सा दिला पाहिजे. २० त्याने बदली मनुष्य दिला असल्यास संपूर्ण हिस्सा दिला पाहिजे. २१ परंतु जर एकत्र केलेल्या मालाला चांगला भाव आल्यावर तो आजारी पडला तर त्याचा हिस्सा तावडतोब दिला पाहिजे. २२ कारण, वाटेत फायदा होणे किंवा न होणे हे (सर्व भागिदारांना) समान असते. २३ परंतु कामास प्रारंभ झाल्यानंतर प्रकृती उत्तम असताही जो ते सोडून जाईल त्याला बारा पण दंड करावा. २४ आणि मर्जीप्रमाणे काम सोडून देण्याची मुभा असता कामा नये.

२५ परंतु (समाईक उत्पन्नातून) चोरी करणाऱ्यास अभय देऊन त्याच्या कामाबद्दल त्याला हिस्सा देण्याचे कबूल करावे व त्याप्रमाणे (पहिला गुन्हा म्हणून) त्याचा वाटा देऊन त्याला माफ करावे. २६ त्याने पुन्हा चोरी केल्यास, तसेच दुसरीकडे निघून गेल्यास त्याला हद्दपार करावे. २७ परंतु त्याचा अपराध फार मोठा असल्यास राजद्रोह्याच्या बाबतीत जी उपाययोजना (अध्याय ५.१ मध्ये) सांगितली आहे तिचा अवलंब करावा.

याजकाः स्वप्रचारद्रव्यवर्जं यथासंभाषितं वेतनं समं वा विभजेरन् । २८ । अग्निष्टोमादिषु च क्रतुषु दीक्षणादूर्ध्वं याजकः सन्नः पञ्चममंशं लभेत, सोमविक्रयादूर्ध्वं चतुर्थमंशम्, मध्यमोपसदः प्रवर्ग्योद्वासनादूर्ध्वं तृतीयमंशम्, मध्यमोपसद ऊर्ध्वमर्धमंशम्, सुत्ये प्रातःसवनादूर्ध्वं पादोनमंशम् । २९ । माध्यन्दिनात्सवनादूर्ध्वं समग्रमंशं लभेत । ३० । नीता हि दक्षिणा भवन्ति । ३१ । बृहस्पतिसववर्जं प्रतिसवनं हि दक्षिणा दीयन्ते । ३२ । तेनाहर्गणदक्षिणा व्याख्याताः । ३३ । सन्नानाम् आ दशाहोरात्राच्छेषभृताः कर्म कुर्युः, अन्ये वा स्वप्रत्ययाः । ३४ । कर्मण्यसमाप्ते तु यजमानः सीदेद्, ऋत्विजः कर्म समापय्य दक्षिणां हरेयुः । ३५ । असमाप्ते तु कर्मणि याज्यं याजकं वा त्यजतः पूर्वः साहसदण्डः । ३६ ।

अनाहिताग्निः शतगुरयज्वा च सहस्रगुः ।
सुरापो वृषलीभर्ता ब्रह्महा गुरुतल्पगः ।। ३७ ।।

२८ यज्ञातील ऋत्विजांनी त्यांना विशिष्ट कामाबद्दल मिळणारी खास दक्षिणा वगळून इतर दक्षिणा ठरले असेल त्याप्रमाणे किंवा सम प्रमाणात वाटून घ्यावी. २९ आणि अग्निष्टोमादी यागांमध्ये दीक्षाविधी झाल्यानंतर कोणी ऋत्विज आजारी पडला तर त्याला त्याच्या हिश्श्याच्या एकपंचमांश दक्षिणा मिळाली पाहिजे, सोमाची खरेदी झाल्यानंतर एकचतुर्थांश, मध्यम उपसदाच्या दिवशी प्रवर्ग्याचे भांडे गरम केल्यानंतर एकतृतीयांश, मध्यम उपसद दिवसानंतर अर्धी, सोमरस काढण्याच्या दिवशी सकाळच्या सवनानंतर (आजारी पडल्यास) पाऊण (दक्षिणा मिळाली पाहिजे). ३० माध्यंदिन सवनानंतर पूर्ण दक्षिणा मिळाली पाहिजे. ३१ कारण, (त्या वेळेस) दक्षिणा स्वीकारल्या जातात. ३२ कारण, बृहस्पतिसवयाग खेरीजकरून प्रत्येक सवनाच्या (सोमरस काढण्याच्या) वेळेस दक्षिणा दिल्या जातात. ३३ असेच अनेक दिवस चालणाऱ्या यागांतील दक्षिणांच्या बाबतीत समजावे. ३४ मृत झालेल्या ऋत्विजांचे काम दहा दिवसपर्यंत इतर ऋत्विजांनी करावे अथवा त्यांच्या विश्वासातील दुसऱ्या ऋत्विजांनी. ३५ यज्ञ पुरा झाला नसताना यजमान आजारी पडला तर ऋत्विजांनी (त्याच्या बांधवांना) तो पुरा करावयास लावून आपली दक्षिणा घ्यावी. ३६ परंतु यज्ञ पूर्ण झाला नसताही यजमानाचा ऋत्विजाने अथवा ऋत्विजाचा यजमानाने त्याग केल्यास प्रथम साहसदंड करावा.

३७–३८ शंभर गाईंचा मालक असून अग्न्याधान न करणारा, हजार गाईंचा मालक असता यज्ञ न करणारा, दारुडा, वृषल स्त्रीशी विवाह करणारा, ब्राह्मणास ठार मारणारा, गुरुपत्नीशी समागम करणारा, दुष्ट मनुष्यांकडून

असत्प्रतिग्रहे युक्तः स्तेनः कुत्सितयाजकः ।
अदोषस्त्यक्तुमन्योन्यं कर्मसंकरनिश्चयात् ।। ३८ ।।

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे दासकर्मकरकल्पे भृतकाधिकारः संभूयसमुत्थानं च चतुर्दशोऽध्यायः । आदित एकसप्ततितमः ।

१५

## [ सप्तषष्टितमं प्रकरणम् – विक्रीतक्रीतानुशयः ]

**विक्रीय पण्यमप्रयच्छतो द्वादशपणो दण्डः, अन्यत्र दोषोपनिपाताविषह्येभ्यः । १ । पण्यदोषो दोषः । २ । राजचोराग्न्युदकबाध उपनिपातः । ३ । बहुगुणहीनमार्तकृतं वाऽविषह्यम् । ४ ।**

**वैदेहकानामेकरात्रमनुशयः, कर्षकाणां त्रिरात्रम्, गोरक्षकाणां पञ्चरात्रम् । ५ । व्यामिश्राणामुत्तमानां च वर्णानां वृत्तिविक्रये सप्तरात्रम् । ६ ।**

**आतिपातिकानां पण्यानाम् 'अन्यत्राविक्रेयम्' इत्यवरोधेनानुशयो देयः । ७ । तस्यातिक्रमे चतुर्विंशतिपणो दण्डः, पण्यदशभागो वा । ८ ।**

देणग्या स्वीकारण्याची सवय असलेला, चोर, गर्हणीय माणसाच्या यज्ञात ऋत्विक्कर्म करणारा अशांच्या बाबतीत (यजमान अथवा याजक यांनी) एकमेकांचा त्याग करण्यात काही दोष नाही, कारण त्यांच्यामुळे यज्ञकर्म निश्चितपणे पावित्र्यहीन होते.

### पंधरावा अध्याय

### प्रकरण ६७ : केलेली विक्री व खरेदी नाकारणे

१ माल विकल्यानंतर त्याचा ताबा न देणाऱ्यास बारा पण दंड करावा; याला अपवाद दोष, आकस्मिक संकट आणि अस्वीकार्यता यांचा. २ दोष म्हणजे मालात असणारा दोष. ३ राजा, चोर, आग व पाणी यांचा उपद्रव म्हणजे आकस्मिक संकट. ४ ज्यात पुष्कळच चांगले गुण नाहीत अथवा जे आर्त माणसाने केलेले असेल ते सहन करता न येण्यासारखे (म्हणून अस्वीकार्य).

५ विकलेला माल देण्याचे नाकारण्यास व्यापाऱ्यांना एक दिवसाची मुदत द्यावी, शेतकऱ्यांना तीन दिवसांची, गवळ्यांना पाच दिवसांची. ६ मिश्र जातींतील व उत्तम वर्णातील मनुष्यांना त्यांच्या उपजीविकेच्या साधनांच्या विक्रीच्या बाबतीत फेरविचारास सात दिवसांची मुदत द्यावी.

७ लवकर खराब होणाऱ्या मालाच्या (दूध, फुले वगैरेच्या) बाबतीत "दुसऱ्या कोणाला ते विकता कामा नये" असे बंधन घालून विक्री नाकारण्यास मुभा द्यावी. ८ ह्या नियमाचे उल्लंघन केल्यास चोवीस पण अथवा मालाच्या एकदशांश भाग इतका दंड करावा.

**क्रीत्वा पण्यमप्रतिगृह्णतो द्वादशपणो दण्डः, अन्यत्र दोषोपनिपाताविषह्येभ्यः । ९ । समानश्चानुशयो विक्रेतुरनुशयेन । १० ।**

**विवाहानां तु त्रयाणां पूर्वेषां वर्णानां पाणिग्रहणात्सिद्धमुपावर्तनम्, शूद्राणां च प्रकर्मणः । ११ । वृत्तपाणिग्रहणयोरपि दोषमौपशायिकं दृष्ट्वा सिद्धमुपावर्तनम् । १२ । न त्वेवाभिप्रजातयोः । १३ । कन्यादोषमौपशायिकमनाख्याय प्रयच्छतः कन्यां षण्णवतिर्दण्डः, शुल्कस्त्रीधनप्रतिदानं च । १४ । वरयितुर्वा वरदोषमनाख्याय विन्दतो द्विगुणः, शुल्कस्त्रीधननाशश्च । १५ ।**

**द्विपदचतुष्पदानां तु कुण्ठव्याधिताशुचीनामुत्साहस्वास्थ्यशुचीनामाख्याने द्वादशपणो दण्डः । १६ । आ त्रिपक्षादिति चतुष्पदानामुपावर्तनम्, आ संवत्सरादिति मनुष्याणाम् । १७ । तावता हि कालेन शक्यं शौचाशौचे ज्ञातुम् । १८ ।**

**दाता प्रतिग्रहीता च स्यातां नोपहतौ यथा ।**
**दाने क्रये वाऽनुशयं तथा कुर्युः सभासदः ।। १९ ।।**

**इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे विक्रीतक्रीतानुशयः पञ्चदशोऽध्यायः । आदितो द्विसप्ततितमः ।**

९ माल विकत घेतल्यावर तो न स्वीकारणाऱ्यास बारा पण दंड करावा, याला अपवाद दोष, आकस्मिक संकट व अस्वीकार्यता यांचा. १० विकणाऱ्याला फेरविचारासाठी जितकी मुदत तितकीच विकत घेणाऱ्यालाही द्यावी.

११ परंतु विवाहाच्या संबंधात पहिल्या तीन वर्णांच्या लग्नात पाणिग्रहणाच्या विधीपर्यंत लग्न मोडता येते, शूद्रांच्या लग्नात गर्भाधानापर्यंत. १२ पाणिग्रहणविधी झाल्यानंतरसुद्धा (क्लीबत्वक्षतयोनित्वादी) समागमविषयक दोष दिसून आल्यास लग्न रद्द होईल (बेकायदेशीर ठरेल). १३ परंतु अपत्योत्पत्ती झाल्यावर लग्न कधीही बेकायदेशीर ठरणार नाही. १४ कन्येतील समागम विषयक दोष न कळविता तिला विवाहात अर्पण करणाऱ्यास शहाण्णव पण दंड करावा आणि त्याला शुल्क व स्त्रीधन परत करावयास लावावे. १५ तसेच वरातील तद्विषयक दोष न कळविता लग्न करणाऱ्या वरास दुप्पट दंड करावा आणि त्याला शुल्क व स्त्रीधन गमवावे लागेल.

१६ परंतु द्विपाद आणि चतुष्पाद प्राण्यांच्या संबंधात ते मंद, रोगी व अशुद्ध असता ते उत्साही, धडधाकट व शुद्ध आहेत असे सांगून विकणाऱ्यास बारा पण दंड करावा. १७ चतुष्पाद प्राण्यांच्या बाबतीत तीन पंधरवड्यापर्यंत खरेदी नाकारता येईल, (दासादी) मनुष्यांच्या बाबतीत एक वर्षपर्यंत. १८ कारण, तेवढ्या वेळात चांगले की वाईट हे कळून येऊ शकते.

१९ देणारा व घेणारा ह्या दोघांचेही नुकसान होणार नाही अशा रीतीने दानाच्या बाबतीत अथवा खरेदी-विक्रीच्या बाबतीत (अधिकरणातील) सभासदांनी ते व्यवहार रद्द ठरण्याविषयी निर्णय द्यावा.

## १६

## [ अष्टषष्टितमं प्रकरणम् – दत्तस्यानपाकर्म; एकोनसप्ततितमं प्रकरणम् – अस्वामिविक्रयः; सप्ततितमं प्रकरणम् – स्वस्वामिसंबन्धः ]

दत्तस्याप्रदानमृणादानेन व्याख्यातम् । १ ।

दत्तमव्यवहार्यम् एकत्रानुशये वर्तेत । २ । सर्वस्वं पुत्रदारमात्मानं वा प्रदायानुशयिनः प्रयच्छेत् । ३ । धर्मदानमसाधुषु कर्मसु चौपघातिकेषु वा, अर्थदानमनुपकारिष्वपकारिषु वा, कामदानमनर्हेषु च । ४ । यथा च दाता प्रतिग्रहीता च नोपहतौ स्यातां तथाऽनुशयं कुशलाः कल्पयेयुः । ५ ।

दण्डभयादाक्रोशभयादनर्थभयाद्वा भयदानं प्रतिगृह्णतः स्तेयदण्डः, प्रयच्छतश्च । ६ । रोषदानं परहिंसायाम्, राज्ञामुपरि दर्पदानं च । ७ । तत्रोत्तमो दण्डः । ८ ।

## सोळावा अध्याय

## प्रकरण ६८ : देऊ केलेल्या देणग्या न देणे; प्रकरण ६९ : मालकीहक्काशिवाय केलेली विक्री; प्रकरण ७० : मालकी हक्क

१ (कबूल केलेले) दान न देणे ह्या विषयाला कर्जफेडीविषयीचे नियम लागू होतात.

२ ज्या वस्तूंच्या बाबतीत दानाचा व्यवहार होऊ शकत नाही ती तो व्यवहार रद्द ठरून मूळ ठिकाणीच राहिली पाहिजे. ३ आपल्या सर्वस्वाचे, बायकामुलांचे अथवा स्वतःचे दान केल्यावर ते परत घेऊ इच्छिणाऱ्याला (दान घेणाऱ्याने) परत केले पाहिजे. ४ दुराचरणी मनुष्यांना दिलेले तसेच हानिकारक कार्यांसाठी दिलेले धर्मदान, ज्यांनी काही उपकार केलेला नाही अथवा ज्यांनी अपकारच केला आहे अशांना केलेले अर्थदान आणि जे पात्र नाहीत अशांना केलेले कामदान (परत करावयास लावले पाहिजे). ५ आणि देणारा व घेणारा या उभयतांचे नुकसान होणार नाही अशा रीतीने तज्ज्ञांनी दानाचा व्यवहार रद्द ठरवावा.

६ शिक्षेचे भय दाखवून, निंदा होण्याचे भय दाखवून अथवा अनर्थ ओढवण्याचे भय दाखवून भयदान घेणाऱ्याला चोरीबद्दलचा दंड करावा, तोच दंड ते देणाऱ्यालाही करावा. ७ तोच नियम कोणाला इजा करण्यासाठी म्हणून

**प्रातिभाव्यं दण्डशुल्कशेषमाक्षिकं सौरिकं कामदानं च नाकामः पुत्रो दायादो वा रिक्थहरो दद्यात् । ९ । इति दत्तस्यानपाकर्म ।**

**अस्वामिविक्रयस्तु – नष्टापहृतमासाद्य स्वामी धर्मस्थेन ग्राहयेत् । १० । देशकालातिपत्तौ वा स्वयं गृहीत्वोपहरेत् । ११ । धर्मस्थश्च स्वामिनमनुयुञ्जीत 'कुतस्ते लब्धम्' इति । १२ । स चेदाचारक्रमं दर्शयेत, न विक्रेतारं, तस्य द्रव्यस्यातिसर्गेण मुच्येत । १३ । विक्रेता चेद्दृश्येत, मूल्यं स्तेयदण्डं च दद्यात् । १४ । स चेदपसारमधिगच्छेद् अपसरेदापसारक्षयात् । १५ । क्षये मूल्यं स्तेयदण्डं च दद्यात् । १६ ।**

**नाष्टिकश्च स्वकरणं कृत्वा नष्टप्रत्याहृतं लभेत । १७ । स्वकरणाभावे पञ्चबन्धो दण्डः । १८ । तच्च द्रव्यं राजधर्म्यं स्यात् । १९ । नष्टापहृतमनिवेद्योत्कर्षतः स्वामिनः पूर्वः साहसदण्डः । २० ।**

रागाच्या भरात दिलेल्या दानाच्या बाबतीत आणि गर्वाने राजापेक्षा अधिक दिलेल्या दानाच्या बाबतीतही लागू करावा. ८ मात्र त्याप्रसंगी उत्तम साहसदंड करावा.

९ जामीनकीची रक्कम, बाकी राहिलेला दंड किंवा शुल्क, जुगारातील कर्ज, दारूपायी झालेले कर्ज आणि कामपूर्तीसाठी दान ह्या गोष्टी पुत्राने अथवा संपत्तीच्या वारसदाराने इच्छा नसल्यास देण्याचे कारण नाही. हा झाला दान पुरे न करण्याचा विषय.

१० परंतु मालकी नसता केलेल्या विक्रीच्या बाबतीत – हरवलेली किंवा चोरीस गेलेली वस्तू सापडल्यावर मालकाने न्यायाधिशाला ती ताब्यात घेण्यास सांगावे. ११ किंवा जर देश व काल चुकण्याचा संभव असेल तर स्वतः ताब्यात घेऊन न्यायाधिशाकडे न्यावी. १२ आणि ज्याच्याजवळ ती सापडली त्याला न्यायाधिशाने विचारावे, "तुला ही कोठून मिळाली ?" १३ तो जर प्राप्तीची योग्य पद्धत दाखवू शकला, पण विकणारा कोण ते सांगू शकला नाही तर ती वस्तू देऊन टाकल्याने त्याला सोडून देण्यात यावे. १४ विकणारा जर मिळाला तर त्याने त्या वस्तूची किंमत आणि चोरीबद्दलचा दंड दिला पाहिजे. १५ त्याला स्वतःला निर्दोष ठरवून त्याची सुटका करणारा दुसरा कोणी असल्यास ह्या दुसऱ्याची चौकशी करावी; निर्दोष ठरविण्याचे बंद होईपर्यंत हे करावे. १६ शेवटी निर्दोष न ठरून ज्याला त्या वस्तूच्या प्राप्तीचा खुलासा करता येणार नाही त्याने तिची किंमत व स्तेयदंड दिला पाहिजे.

१७ आणि हरवलेल्या वस्तूच्या मालकाला त्याच्या मालकीचा पुरावा सादर केल्यावर, हरवलेली अथवा चोरीस गेलेली वस्तू सापडली तर, मिळाली पाहिजे.

**शुल्कस्थाने नष्टापहृतोत्पन्नं तिष्ठेत् । २१ । त्रिपक्षादूर्ध्वमनभिसारं राजा हरेत्, स्वामी वा स्वकरणेन । २२ । पञ्चपणिकं द्विपदरूपस्य निष्क्रयं दद्यात्, चतुष्पणिकमेकखुरस्य, द्विपणिकं गोमहिषस्य, पादिक क्षुद्रपशूनाम् । २३ । रत्नसारफल्गुकुप्यानां पञ्चकं शतं दद्यात् । २४ ।**

**परचक्राटवीहृतं तु प्रत्यानीय राजा यथास्वं प्रयच्छेत् । २५ । चोरहृतमविद्यमानं स्वद्रव्येभ्यः प्रयच्छेत्, प्रत्यानेतुमशक्तो वा । २६ । स्वयंग्राहेणाहृतं प्रत्यानीय तन्निष्क्रयं वा प्रयच्छेत् । २७ ।**

**परविषयाद्वा विक्रमेणानीतं यथाप्रदिष्टं राज्ञा भुञ्जीत, अन्यत्रार्यप्राणेभ्यो देवब्राह्मणतपस्विद्रव्येभ्यश्च । २८ । इत्यस्वामिविक्रयः ।**

१८ मालकीचा पुरावा नसल्यास किमतीच्या एकपंचमांश दंड करावा. १९ आणि ती वस्तू सरकारजमा करावी. २० हरवलेली किंवा चोरीस गेलेली वस्तू न्यायाधिशाला न कळविता ताब्यात घेणाऱ्या मालकाला प्रथम साहसदंड करावा.

२१ हरवलेली किंवा चोरीस गेलेली वस्तू जकात नाक्यावर ठेवावी. २२ ती मागण्यास कोणी आला नाही तर तीन पंधरवड्यानंतर सरकारजमा करावी किंवा मालकीचा पुरावा सादर करून मालकाने ती घेऊन जावी. २३ सोडवणुकीसाठी त्याने द्विपाद प्राण्याबद्दल प्रत्येकी पाच पण, एक खुराच्या प्राण्याबद्दल चार पण, गाईम्हशीबद्दल प्रत्येकी दोन, लहान जनावराबद्दल पाव पण दिला पाहिजे. २४ रत्ने, भारी किमतीच्या व हलक्या किमतीच्या वस्तू आणि जंगलातील उत्पन्न यांच्याबद्दल किमतीप्रमाणे शेकडा पाच (राखणीचा खर्च) दिला पाहिजे.

२५ शत्रुसैन्याने अथवा रानटी लोकांनी लुटून नेलेल्या वस्तू राजाने परत मिळवून ज्याच्या त्यास दिल्या पाहिजेत. २६ चोराने नेलेल्या वस्तू न मिळाल्यास अथवा त्या परत मिळविण्यास राजा असमर्थ असल्यास त्याने आपल्या तिजोरीतून भरपाई केली पाहिजे. २७ ज्याला जे मिळेल ते त्याने घ्यावे अशा पद्धतीने लुटून नेलेले राजाने परत मिळवून दिले पाहिजे अथवा त्याबद्दल भरपाई केली पाहिजे.

२८ परदेशातून स्वपराक्रमाने जिंकून आणलेल्या वस्तू राजाच्या सांगण्याप्रमाणे उपभोगाव्यात; मात्र त्यात आर्य मनुष्य, आणि देव, ब्राह्मण व तपस्वी यांचे द्रव्य ही अंतर्भूत नसली पाहिजेत. हा झाला मालकीहक्काशिवाय विक्रीचा विषय.

**स्वस्वामिसंबन्धस्तु – भोगानुवृत्तिरुच्छिन्नदेशानां यथास्वं द्रव्याणाम् । २९ । यत्स्वं द्रव्यमन्यैर्भुज्यमानं दश वर्षाण्युपेक्षेत, हीयेतास्य, अन्यत्र बालवृद्धव्याधितव्यसनिप्रोषितदेशत्यागराज्यविभ्रमेभ्यः । ३० ।**

**विंशतिवर्षोपेक्षितमनवसितं वास्तु नानुयुञ्जीत । ३१ ।**

**ज्ञातयः श्रोत्रियाः पाषण्डा वा राज्ञामसंनिधौ परवास्तुषु विवसन्तो न भोगेन हरेयुः, उपनिधिमाधिं निधिं निक्षेपं स्त्रियं सीमानं राजश्रोत्रियद्रव्याणि च । ३२ ।**

**आश्रमिणः पाषण्डा वा महत्यवकाशे परस्परमबाधमाना वसेयुः । ३३ । अल्पां बाधां सहेरन् । ३४ । पूर्वागतो वा वासपर्यायं दद्यात् । ३५ । अप्रदाता निरस्येत । ३६ ।**

**वानप्रस्थयतिब्रह्मचारिणामाचार्यशिष्यधर्मभ्रातृसमानतीर्थ्या रिक्थभाजः क्रमेण । ३७ ।**

२९ परंतु मालकीहक्काच्या संबंधात – ज्या वस्तूंच्या मालकीचा पुरावा नष्ट झाला आहे त्यांच्या उपभोगाचे सातत्य त्या उपभोग घेणाऱ्याची मालकी ठरविते. ३० आपल्या स्वतःच्या वस्तूचा उपभोग दुसरा कोणी घेत असता जो मालक दहा वर्षे स्वस्थ रहातो त्याचा तिच्यावरील मालकीहक्क नष्ट होतो, मात्र हा नियम अज्ञान बालक, वयोवृद्ध, रोगी, संकटग्रस्त, प्रवासाला गेलेला, देश सोडून गेलेला यांच्या बाबतीत आणि राज्यात उलथापालथ होत असता लागू होत नाही.

३१ वीस वर्षेपर्यंत उपेक्षा केलेल्या, (स्वतः) राहत नसलेल्या घराच्या बाबतीत दावा करता येणार नाही.

३२ देशात राजा नसताना दुसऱ्यांच्या घरात राहणाऱ्या नातेवाइकांना, श्रोत्रिय ब्राह्मणांना अथवा पाखंडी साधूंना उपभोगामुळे मालकीहक्क प्राप्त होणार नाही; त्याचप्रमाणे ठेव, गहाण, जमिनीत पुरलेला निधी, निक्षेप, स्त्री, सीमा, राजा व श्रोत्रिय यांचे द्रव्य (ही दीर्घ काळ ताब्यात असली तरी त्यांच्यावर मालकीहक्क प्रस्थापित होत नाही).

३३ संन्यासी किंवा पाखंडी साधू यांनी मोठ्या जागेमध्ये एकमेकाला उपसर्ग न होईल अशा रीतीने वस्ती करावी. ३४ थोडा उपसर्ग झाला तर तो सहन करावा. ३५ किंवा अगोदर आलेल्याने नंतरच्याला वस्तीसाठी जागा द्यावी. ३६ न देणाऱ्याला घालवून लावावे.

३७ वानप्रस्थ, संन्यासी आणि ब्रह्मचारी यांच्या मालमत्तेचे आचार्य, शिष्य, धर्मबंधू आणि सहाध्यायी हे या क्रमाने वारस होत.

विवादपदेषु चैषां यावन्तः पणा दण्डास्तावती रात्रीः क्षपणाभिषेकाग्निकार्य-महाकच्छवर्धनानि राज्ञश्चरेयुः । ३८ । अहिरण्यसुवर्णाः पाषण्डाः साधवः । ३९ । ते यथास्वमुपवासव्रतैराराधयेयुः, अन्यत्र पारुष्यस्तेयसाहससंग्रहणेभ्यः । ४० । तेषु यथोक्ता दण्डाः कार्याः । ४१ ।

प्रव्रज्यासु वृथाचारान् राजा दण्डेन वारयेत् ।
धर्मो ह्यधर्मोपहतः शास्तारं हन्त्युपेक्षितः ॥ ४२ ॥

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे दत्तस्यानपाकर्म अस्वामिविक्रयः स्वस्वामिसंबन्धश्च षोडशोऽध्यायः । आदितः त्रिसप्ततितमः ।

१७

## [ एकसप्ततितमं प्रकरणम् – साहसम् ]

साहसमन्वयवत्प्रसभकर्म । १ । निरन्वये स्तेयम्, अपव्ययने च । २ ।

'रत्नसारफल्गुकुप्यानां साहसे मूल्यसमो दण्डः' इति मानवाः । ३ । 'मूल्य-द्विगुणः' इत्यौशनसाः । ४ । यथापराध इति कौटिल्यः । ५ ।

३८ आणि यांच्यात तंटे उपस्थित झाल्यास हरणाऱ्याला जितके पण दंड सांगितला आहे तितके दिवस त्यांनी राजाच्या कल्याणार्थ उपवास, स्नान, अग्नीत होम व महाकच्छाची पूजा करावी. ३९ पाखंडी साधूंजवळ द्रव्य किंवा सोने नसते. ४० (ते हरल्यास) त्यांनी आपापल्या धर्माप्रमाणे उपवास व व्रते यांनी आराधना करावी; याला अपवाद पारुष्य, स्तेय, साहस व संग्रहण या अपराधांचा. ४१ ते गुन्हे केल्यास त्याबद्दल सांगितल्याप्रमाणे शिक्षा करावी.

४२ संन्यास घेतलेले दुराचरण करीत असतील तर राजाने शिक्षेच्या द्वारा त्यांचे निवारण करावे. कारण, अधर्माने नष्ट होणाऱ्या धर्माकडे जर दुर्लक्ष केले तर तो शासनकर्त्याचा घात करतो.

### सतरावा अध्याय

### प्रकरण ७१ : बळजबरीची कृत्ये

१ साहस म्हणजे मालकाच्या समक्ष बळजबरीने वस्तू घेऊन जाणे. २ मालकाच्या परोक्ष वस्तू नेणे म्हणजे स्तेय, तसेच (वस्तू नेल्याचे) नाकबूल करणे म्हणजेही स्तेय.

३ "रत्न, भारी किमतीच्या व हलक्या किमतीच्या वस्तू आणि जंगलातील उत्पादन बळजबरीने नेल्यास त्यांच्या किमतीइतका दंड करावा," असे मानवांचे मत आहे. ४ "किमतीच्या दुप्पट," असे औशनसांचे मत आहे. ५ अपराधा-नुसार दंड करावा असे कौटिल्याचे मत आहे.

'पुष्पफलशाकमूलकन्दपक्वान्नचर्मवेणुमृद्भाण्डादीनां क्षुद्रकद्रव्याणां द्वादशपणावरश्चतुर्विंशतिपणपरो दण्डः । ६ । कालायसकाष्ठरज्जुद्रव्यक्षुद्रपशुपटादीनां स्थूलकद्रव्याणां चतुर्विंशतिपणावरोऽष्टचत्वारिंशत्पणपरो दण्डः । ७ । ताम्रवृत्तकंसकाचदन्तभाण्डादीनां स्थूलकद्रव्याणामष्टचत्वारिंशत्पणावरः षण्णवतिपरः पूर्वः साहसदण्डः । ८ । महापशुमनुष्यक्षेत्रगृहहिरण्यसुवर्णसूक्ष्मवस्त्रादीनां स्थूलकद्रव्याणां द्विशतावरः पञ्चशतपरो मध्यमः साहसदण्डः । ९ । स्त्रियं पुरुषं वाऽभिषह्य बध्नतो बन्धयतो बन्धं वा मोक्षयतः पञ्चशतावरः सहस्रपर उत्तमः साहसदण्डः । ' इत्याचार्याः । १० ।

'यः साहसं "प्रतिपत्ता" इति कारयति स द्विगुणं दद्यात् । ११ । "यावद्धिरण्यमुपयोक्ष्यते तावद्दास्यामि" इति स चतुर्गुणं दण्डं दद्यात् । १२ । यः "एतावद्धिरण्यं दास्यामि" इति प्रमाणमुद्दिश्य कारयति स यथोक्तं हिरण्यं

६ "फुले, फळ, भाज्या, मुळे, कंद, शिजवलेले अन्न, चामडयाचे पदार्थ, वांबूच्या टोपल्या, मातीची भांडी इतक्या हलक्या पदार्थांच्या बावतीत (साहसाबद्दल) कमीत कमी बारा पण व जास्तीत जास्त चोवीस पण दंड करावा. ७ लोखंड, लाकूड व दोर यांचे पदार्थ, लहान जनावर, कापड इत्यादी मोठया पदार्थांच्या बाबतीत कमीत कमी चोवीस पण व जास्तीत जास्त अठ्ठेचाळीस पण दंड करावा. ८ तांबे, पोलाद, कासे, काच, हस्तिदंत यांचे पदार्थ इत्यादी भारी पदार्थांच्या बावतीत कमीत कमी अठ्ठेचाळीस पण व जास्तीत जास्त शहाण्णव पण असा प्रथम साहसदंड करावा. ९ मोठ जनावर, मनुष्य, शेत, घर, पैसे, सोने, तलम वस्त्र इत्यादी भारी पदार्थांच्या बाबतीत कमीत कमी दोनशे पण व जास्तीत जास्त पाचशे पण असा मध्यम साहसदंड करावा. १० जो स्त्रीला अथवा पुरुषाला बळजबरीने बंधनात ठेवील अथवा ठेवावयास लावील किंवा त्यांना (बळजबरीने) बंधनातून सोडवील त्याला कमीत कमी पाचशे पण व जास्तीत जास्त एक हजार पण असा उत्तम साहसदंड करावा," असे आचार्यांचे मत आहे.

११ "जो 'मी जबाबदार आहे' असे म्हणून दुसऱ्याला जबरीने पदार्थ घ्यावयास लावतो त्याला दुप्पट दंड करावा. १२ 'जितका पैसा लागेल तितका मी देईन' असे म्हणून साहस करविणाऱ्याला चौपट दंड करावा. १३ जो 'मी अमुक इतके पैसे देईन' याप्रमाणे आकडा ठरवून साहस करावयास लावतो त्याला कबूल केलेले पैसे अधिक नेहमीचा दंड द्यावयास लावावे," असे बाहस्पत्यांचे मत आहे. १४ त्याने जर मी रागात होतो, दारूच्या नशेत होतो किंवा

दण्डं च दद्यात्' इति बार्हस्पत्याः । १३ । स चेत्कोपं मदं मोहं वाऽपदिशेद् यथोक्तवद्दण्डमेनं कुर्यादिति कौटिल्यः । १४ ।

दण्डकर्मसु सर्वेषु रूपमष्टपणं शतम् ।
शतात्परेषु व्याजीं च विद्यात्पञ्चपणं शतम् ।। १५ ।।
प्रजानां दोषबाहुल्याद्राज्ञां वा भावदोषतः ।
रूपव्याज्यावधर्मिष्ठे धर्म्या तु प्रकृतिः स्मृता ।। १६ ।।

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे साहसम् सप्तदशोऽध्यायः । आदितश्चतुःसप्ततितमः ।

१८

## [ द्विसप्ततितमं प्रकरणम् – वाक्पारुष्यम् ]

वाक्पारुष्यम् उपवादः कुत्सनमभिभर्त्सनमिति । १ ।

शरीरप्रकृतिश्रुतवृत्तिजनपदानां शरीरोपवादे काणखञ्जादिभिः सत्ये त्रिपणो दण्डः, मिथ्योपवादे षट्पणो दण्डः । २ । 'शोभनाक्षिमन्तः' इति काणखञ्जादीनां स्तुतिनिन्दायां द्वादशपणो दण्डः । ३ ।

शुद्धीवर नव्हतो अशी (पटण्यासारखी) सबब सांगितली तर त्याला सांगितला तेवढाच दंड करावा (अधिक करू नये) असे कौटिल्याचे मत आहे.

१५ दंड करण्याच्या सर्व प्रसंगी शेकडा आठ पण असे 'रूप' आणि शंभराच्या वरच्या रकमांवर शेकडा पाच प्रमाणे 'व्याजी' (आकारण्यात येतात) असे जाणावे.

१६ प्रजाजन पुष्कळ प्रमाणात गुन्हे करीत असल्यामुळे आणि राजांच्या (लोभरूपी) स्वभावदोषामुळे धर्माला सोडून असलेले रूप व व्याजी आकारले जातात. परंतु फक्त मूळ दंडच धर्माला अनुसरून मानला गेला पाहिजे.

## अठरावा अध्याय

### प्रकरण ७२ : वाणीने होणारे गुन्हे

१ वाक्पारुष्य (वाणीची कठोरता) म्हणजे हिणविणे अथवा बदनामी, निंदा आणि धमकी.

२ शरीर, स्वभाव, विद्या, व्यवसाय आणि देश यांच्या विषयीच्या हेटाळणीपैकी 'काणा' 'लंगडा' इत्यादी शब्दांत शरीरदोषावरून हिणविल्यास तो दोष खरोखर असला तर तीन पण दंड करावा, (तसा दोष नसता) खोटीच हेटाळणी केली तर सहा पण दंड करावा. ३ काणे, लंगडे इत्यादींची 'काय आपले सुंदर डोळे' वगैरे शब्दांत व्याजस्तुतीने निंदा केल्यास बारा पण दंड करावा.

कुष्ठोन्मादक्लैब्यादिभिः कुत्सायां च सत्यमिथ्यास्तुतिनिन्दासु द्वादशपणोत्तरा दण्डास्तुल्येषु । ४ । विशिष्टेषु द्विगुणाः, हीनेष्वर्धदण्डाः, परस्त्रीषु द्विगुणाः, प्रमाद-मदमोहादिभिरर्धदण्डाः । ५ । कुष्ठोन्मादयोश्चिकित्सकाः संनिकृष्टाः पुमांसश्च प्रमाणम्, क्लीबभावे स्त्रियो मूत्रफेनोऽप्सु विष्ठानिमज्जनं च । ६ ।

प्रकृत्युपवादे ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्रान्तावसायिनाम् अपरेण पूर्वस्य त्रिपणोत्तरा दण्डाः, पूर्वेणापरस्य द्विपणाधराः, कुब्राह्मणादिभिश्च कुत्सायाम् । ७ ।

तेन श्रुतोपवादो वाग्जीवनानाम्, कारुकुशीलवानां वृत्त्युपवादः, प्राज्जूणक-गान्धारादीनां च जनपदोपवादा व्याख्याताः । ८ ।

यः परम् 'एवं त्वां करिष्यामि' इति करणेनाभिभर्त्सयेद्, अकरणे यस्तस्य करणे दण्डस्ततोऽर्धदण्डं दद्यात् । ९ । अशक्तः कोपं मदं मोहं वाऽपदिशेद् द्वादशपणं दण्डं दद्यात् । १० । जातवैराशयः शक्तश्चापकर्तुं यावज्जीविकावस्थं दद्यात् । ११ ।

४ आणि महारोगी, वेडा, नपुंसक इत्यादी (गंभीर स्वरूपाची) बदनामी केल्यास, ते खरे असले, खोटे असले आणि त्यात स्तुतीच्या रूपात निंदा असली तर अनुक्रमे बारा पण, चोवीस पण व छत्तीस पण दंड करावेत; हे दंड समान (दर्जाच्या अथवा वर्णातील) लोकांच्या बाबतीत समजावेत. ५ वरिष्ठ लोकांच्या बाबतीत याच्या दुप्पट दंड, कनिष्ठांच्या बाबतीत अर्धे दंड, पर-स्त्रियांच्या बाबतीत दुप्पट आणि चूक, नशा, मोह इत्यादी कारणांमुळे तसे केले असल्यास अर्धे दंड करावेत. ६ महारोग व वेड यांच्याविषयी वैद्य आणि शेजारी राहणारे यांचे मत प्रमाण मानावे, नपुंसकत्वाबद्दल स्त्रियांचे मत, मूत्रावर फेस आणि विष्ठा पाण्यात बुडणे या गोष्टी प्रमाण मानाव्यात.

७ स्वभावाच्या बदनामीच्या संबंधात ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व अंत्यज यांपैकी नंतरच्याने अगोदरच्याची बदनामी केल्यास तीन पणांपासून सुरुवात करून तीन तीन पणांनी वाढत जाणारे दंड करावेत, अगोदरच्याने नंतरच्याची केल्यास दोन दोन पणांनी कमी होत जाणारे व दोन पणांत शेवट होणारे असे दंड करावेत; हेच (दुसऱ्या प्रकारचे) दंड 'कुब्राह्मण' इत्यादी शब्दांत निंदा केल्या-बद्दल करावेत.

८ हेच नियम कथाकारांच्या विद्वत्तेची हेटाळणी केल्यास, कारागीर, कुशीलव यांच्या धंद्याची कुचेष्टा केल्यास आणि प्राज्जूण, गंधार इत्यादी देशातील रहिवाशांची त्यांच्या देशावरून निंदा केल्यास लागू होतात.

९ जो दुसऱ्याला 'मी तुला अमुक करीन' अशी काही करण्याची धमकी देतो त्याने जर प्रत्यक्ष तसे काही केले नाही तर तसे करण्याबद्दल जो दंड सांगितला

**स्वदेशग्रामयोः पूर्वं मध्यमं जातिसंघयोः ।**
**आक्रोशाद्देवचैत्यानामुत्तमं दण्डमर्हति ।। १२ ।।**

**इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे वाक्पारुष्यम् अष्टादशोऽध्यायः । आदितः पञ्चसप्ततितमः ।**

**१९**

**[ त्रिसप्ततितमं प्रकरणम् – दण्डपारुष्यम् ]**

**दण्डपारुष्यम् स्पर्शनमवगूर्णं प्रहृतमिति । १ ।**

**नाभेरधःकायं हस्तपङ्कभस्मपांसुभिरिति स्पृशतस्त्रिपणो दण्डः, तैरेवामेध्यैः पादष्ठीविकाभ्यां च षट्पणः, छर्दिमूत्रपुरीषादिभिर्द्वादशपणः । २ । नाभेरुपरि द्विगुणाः, शिरसि चतुर्गुणाः समेषु । ३ । विशिष्टेषु द्विगुणाः, हीनेष्वर्धदण्डाः, परस्त्रीषु द्विगुणाः, प्रमादमदमोहादिभिरर्धदण्डाः । ४ ।**

आहे त्याच्या अर्धा दंड त्याला करावा. १० तसे करण्यास असमर्थ असून तो क्रोध, नशा अथवा मोह यांसारखे कारण सांगू शकेल तर बारा पण दंड करावा. ११ त्याने जर वैर धरले असेल आणि अपाय करण्यास तो समर्थ असेल तर त्याने आयुष्याच्या अंतापर्यंत जामीन दिला पाहिजे.

१२ स्वतःच्या देशाची अथवा गावाची निंदा केल्यास मनुष्य प्रथम साहस-दंडास पात्र होतो, स्वतःच्या जातीची अथवा संघाची निंदा केल्यास मध्यम दंडास आणि देव व चैत्य यांची निंदा केल्यास उत्तम दंडास पात्र होतो.

## एकोणिसावा अध्याय

### प्रकरण ७३ : बळाच्या वापराने होणारे गुन्हे

१ दंडपारुष्य (बळाची कठोरता) म्हणजे स्पर्श करणे, हात, शस्त्र वगैरे उगारणे आणि मारणे.

२ हात, चिखल, राख अथवा धूळ यांनी कोणाला बेंबीच्या खालच्या भागास स्पर्श केला तर तीन पण दंड करावा, तेच घाणेरडे असता त्यांनी, तसेच पायाने अथवा थुंकीने स्पर्श केल्यास सहा पण, ओकारी, मूत्र, विष्ठा इत्यादी लावल्यास बारा पण दंड करावा. ३ नाभीच्या वरच्या भागास असे स्पर्श केल्यास दंड दुप्पट करावेत, डोक्यावर केल्यास चौपट; ही शिक्षा समान (दर्जाच्या अथवा वर्णाच्या) माणसांच्या संबंधात करावी. ४ वरिष्ठ लोकांच्या बाबतीत दंड दुप्पट करावेत, कनिष्ठ लोकांच्या बाबतीत अर्धे, परस्त्रियांच्या बाबतीत दुप्पट, चूक, नशा, मोह इत्यादीमुळे तसे केल्यास अर्धे दंड करावेत.

पादवस्त्रहस्तकेशावलम्बनेषु षट्पणोत्तरा दण्डाः । ५ । पीडनावेष्टनाञ्चनप्रकर्षणाध्यासनेषु पूर्वः साहसदण्डः । ६ । पातयित्वाऽपक्रामतोऽर्धदण्डः । ७ ।

शूद्रो येनाङ्गेन ब्राह्मणमभिहन्यात् तदस्य च्छेदयेत् । ८ । अवगूर्णे निष्क्रयः, स्पर्शेऽर्धदण्डः । ९ । तेन चण्डालाशुचयो व्याख्याताः । १० ।

हस्तेनावगूर्णे त्रिपणावरो द्वादशपणपरो दण्डः, पादेन द्विगुणः, दुःखोत्पादनेन द्रव्येण पूर्वः साहसदण्डः, प्राणाबाधिकेन मध्यमः । ११ ।

काष्ठलोष्टपाषाणलोहदण्डरज्जुद्रव्याणामन्यतमेन दुःखमशोणितमुत्पादयत श्चतुर्विंशतिपणो दण्डः, शोणितोत्पादने द्विगुणः, अन्यत्र दुष्टशोणितात् । १२ । मृतकल्पमशोणितं घ्नतो हस्तपादपारञ्चिकं वा कुर्वतः पूर्वः साहसदण्डः पाणिपाददन्तभङ्गे कर्णनासाच्छेदने व्रणविदारणे च, अन्यत्र दुष्टव्रणेभ्यः । १३ । सक्थि-

५ (दुसऱ्याचा) पाय, वस्त्र, हात आणि केस पकडणाऱ्यास (अनुक्रमे) सहा, बारा, अठरा आणि चोवीस पण दंड करावा. ६ दाबणे, आवळणे, पिरगळणे ओढीत नेणे आणि वर बसणे ह्या क्रियांबद्दल प्रथम साहसदंड करावा. ७ खाली पाडून निघून जाणाऱ्याला याच्या निम्मा दंड करावा.

८ शूद्र ज्या अवयवाने ब्राह्मणावर प्रहार करील तो त्याचा अवयव तोडून टाकावा. ९ (तो अवयव) उगारल्यास सोडून देण्याबद्दल रक्कम घ्यावी, (त्या अवयवाने) स्पर्श केल्यास अर्धा दंड करावा. १० हाच नियम चंडालादी अशुद्ध जातींना लागू आहे.

११ हात उगारल्याबद्दल (वर्णानुसार) कमीत कमी तीन पण व जास्तीत जास्त बारा पण दंड करावा, पाय उगारल्यास दुप्पट दंड, (काठी वगैरे) दुःखकारक पदार्थ उगारल्यास प्रथम साहसदंड, (शस्त्र वगैरे) प्राणघातक वस्तू उगारल्यास मध्यम साहसदंड करावा.

१२ लाकूड, ढेकूळ, दगड, लोखंडी कांब, दोर या पदार्थांपैकी कोणत्याही पदार्थाने रक्त न काढता इजा करणाऱ्यास चोवीस पण दंड करावा, रक्त काढल्यास याच्या दुप्पट; मात्र ते रक्त दूषित नसले पाहिजे. १३ रक्त न काढता मेल्यासारखा होईपर्यंत मारणाऱ्यास, हात किंवा पाय मुरगळणाऱ्यास तसेच हात, पाय मोडल्याबद्दल, दात पाडल्याबद्दल, कान, नाक कापल्याबद्दल आणि जखम मोठी केल्याबद्दल प्रथम साहसदंड करावा; मात्र ती जखम दूषित असता कामा नये. १४ मांडी किंवा मान मोडल्यास किंवा डोळा फोडल्यास,

**ग्रीवाभञ्जने नेत्रभेदने वा वाक्यचेष्टाभोजनोपरोधेषु च मध्यमः साहसदण्डः समुत्थानव्ययश्च । १४ । विपत्तौ कण्टकशोधनाय नीयेत । १५ ।**

**महाजनस्यैकं घ्नतः प्रत्येकं द्विगुणो दण्डः । १६ ।**

**'पर्युषितः कलहोऽनुप्रवेशो वा नाभियोज्यः' इत्याचार्याः । १७ । नास्त्यपकारिणो मोक्ष इति कौटिल्यः । १८ ।**

**'कलहे पूर्वागतो जयति, अक्षममाणो हि प्रधावति' इत्याचार्याः । १९ । नेति कौटिल्यः । २० । पूर्वं पश्चाद्वाभिगतस्य साक्षिणः प्रमाणम्, असाक्षिके घातः कलहोपलिङ्गनं वा । २१ ।**

**घाताभियोगमप्रतिब्रुवतस्तदहरेव पश्चात्कारः । २२ ।**

**कलहे द्रव्यमपहरतो दशपणो दण्डः, क्षुद्रकद्रव्यहिंसायां तच्च तावच्च दण्डः, स्थूलकद्रव्यहिंसायां तच्च द्विगुणश्च दण्डः, वस्त्राभरणहिरण्यसुवर्णभाण्डहिंसायां तच्च पूर्वश्च साहसदण्डः । २३ ।**

तसेच बोलणे, हालचाल करणे व खाणे यांत अडथळा उत्पन्न होईल अशी दुखापत केल्यास मध्यम साहसदंड करावा आणि बरे करण्याचा खर्च द्यावयास लावावा. १५ जर अशा मारामुळे मृत्यू ओढवला तर कंटकशोधनाप्रमाणे (अध्याय ४.११ प्रमाणे) शिक्षेस पात्र ठरवावे.

१६ पुष्कळ मनुष्यांनी मिळून एकास मारहाण केल्यास प्रत्येकाला दुप्पट दंड करावा.

१७ "पूर्वी होऊन गेलेल्या भांडणाबद्दल किंवा बेकायदा प्रवेशाबद्दल दावा मांडता येणार नाही," असे आचार्यांचे मत आहे. १८ गुन्हा करणाऱ्याला मोकळा सोडता कामा नये असे कौटिल्याचे मत आहे.

१९ "भांडण-मारामारीच्या बाबतीत जो प्रथम दावा मांडायला येईल तो दावा जिंकील; कारण, इजा सहन न झाल्यामुळे त्याने (न्याय मिळावा म्हणून) धाव घेतलेली असते," असे आचार्यांचे मत आहे. २० ते बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. २१ अगोदर आलेला असो की नंतर, साक्षिदारांचे म्हणणे प्रमाण मानले पाहिजे; साक्षिदार नसल्यास झालेली इजा अथवा कलहाच्या खाणाखुणा यांच्या आधारे निर्णय द्यावा.

२२ इजा केली असल्याच्या दाव्यात प्रतिवादीने बचावाचे उत्तर दिले नाही तर त्याच दिवशी त्याच्याविरुद्ध निकाल द्यावा.

२३ भांडण-मारामारीत वस्तू पळविणाऱ्यास दहा पण दंड करावा, हलक्या वस्तूची हानी केल्यास तिची किंमत द्यावयास लावून तितकाच दंड करावा, मोठ्या वस्तूची हानी केल्यास तिची किंमत देववून तिच्या दुप्पट दंड करावा,

परकुडचमभिघातेन क्षोभयतस्त्रिपणो दण्डः, छेदनभेदने षट्पणः प्रतीकारश्च । २४ । दुःखोत्पादनं द्रव्यमन्यवेश्मनि प्रक्षिपतो द्वादशपणो दण्डः, प्राणाबाधिकं पूर्वः साहसदण्डः । २५ ।

क्षुद्रपशूनां काष्ठादिभिर्दुःखोत्पादने पणो द्विपणो वा दण्डः, शोणितोत्पादने द्विगुणः । २६ । महापशूनामेतेष्वेव स्थानेषु द्विगुणो दण्डः समुत्थानव्ययश्च । २७ ।

पुरोपवनवनस्पतीनां पुष्पफलच्छायावतां प्ररोहच्छेदने षट्पणः, क्षुद्रशाखाच्छेदने द्वादशपणः, पीनशाखाच्छेदने चतुर्विंशतिपणः, स्कन्धवधे पूर्वः साहसदण्डः, समुच्छित्तौ मध्यमः । २८ । पुष्पफलच्छायावद्गुल्मलतास्वर्धदण्डाः, पुण्यस्थानतपोवनश्मशानद्रुमेषु च । २९ ।

सीमवृक्षेषु चैत्येषु द्रुमेष्वालक्षितेषु च ।
त एव द्विगुणा दण्डाः कार्या राजवनेषु च ॥ ३० ॥

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे दण्डपारुष्यम् एकोनविंशोऽध्यायः । आदितः षट्सप्ततितमः ।

वस्त्र, दागिने, पैसे, सोन्याचे पदार्थ यांचे नुकसान केल्यास त्याची भरपाई करावयास लावून प्रथम साहसदंड करावा.

२४ दुसऱ्याच्या घराची भिंत धक्के मारून हलविणाऱ्याला तीन पण दंड करावा, मोडतोड केल्यास सहा पण दंड व दुरुस्तीचा खर्च द्यावा लागेल. २५ दुसऱ्याच्या घरात दुखापत करणारी वस्तू फेकणाऱ्यास बारा पण दंड करावा, प्राणघातक वस्तू फेकल्यास प्रथम साहसदंड करावा.

२६ लहान जनावरांना लाकूड वगैरेनी दुखापत केल्यास एक अथवा दोन पण दंड करावा, रक्त काढल्यास दुप्पट. २७ मोठ्या जनावरांच्या बाबतीत ह्याच गोष्टींबद्दल दुप्पट दंड करावेत आणि बरे करण्याचा खर्च द्यावयास लावावा.

२८ शहराच्या बगीचांतील फुले, फळे व सावली देणाऱ्या वृक्षांचे अंकुर तोडल्यास सहा पण दंड करावा, लहान फांद्या तोडल्यास बारा पण, जाड फांद्या तोडल्यास चोवीस पण, बुंधा तोडल्यास प्रथम साहसदंड, समूळ उपटून टाकल्यास मध्यम साहसदंड करावा. २९ फुले, फळे व छाया देणाऱ्या झुडपांच्या व वेलींच्या बाबतीत, तसेच पवित्र स्थलातील, तपोवनातील आणि स्मशानातील झाडांच्या बाबतीत अर्धे दंड करावेत.

३० हद्दीवरील वृक्ष, चैत्यभूमीतील वृक्ष, प्रख्यात वृक्ष आणि सरकारी वनांतील वृक्ष यांच्या संबंधात हेच दंड दुप्पट करावेत.

२०

## [ चतुःसप्ततितमं प्रकरणम् – द्यूतसमाह्वम्; पञ्चसप्ततितमं प्रकरणम् – प्रकीर्णकम् ]

द्यूताध्यक्षो द्यूतमेकमुखं कारयेत् । १ । अन्यत्र दीव्यतो द्वादशपणो दण्डो गूढाजीविज्ञापनार्थम् । २ ।

'द्यूताभियोगे जेतुः पूर्वः साहसदण्डः, पराजितस्य मध्यमः । ३ । बालिशजातीयो ह्येष जेतुकामः पराजयं न क्षमते ' इत्याचार्याः । ४ । नेति कौटिल्यः । ५ । पराजितश्चेद् द्विगुणदण्डः क्रियेत न कश्चन राजानमभिसरिष्यति । ६ । प्रायशो हि कितवाः कूटदेविनः । ७ ।

तेषामध्यक्षाः शुद्धाः काकणीरक्षांश्च स्थापयेयुः । ८ । काकण्यक्षाणामन्योपधाने द्वादशपणो दण्डः, कूटकर्मणि पूर्वः साहसदण्डो जितप्रत्यादानम्, उपधौ स्तेयदण्डश्च । ९ ।

## विसावा अध्याय

### प्रकरण ७४ : जुगार आणि पैज

### प्रकरण ७५ : विविध स्वरूपाचे गुन्हे

१ द्यूतावरील अध्यक्षाने जुगार एके ठिकाणीच खेळण्याची सोय करावी. २ दुसरीकडे जुगार खेळणाऱ्यास बारा पण दंड करावा, गुप्त रीतीने उपजीविका करणाऱ्यांची माहिती व्हावी यासाठी.

३ " जुगारीबद्दलच्या खटल्यात जिंकणाऱ्याला प्रथम साहसदंड, हरणाऱ्याला मध्यम साहसदंड करावा. ४ कारण, हा (हरणारा) मूर्ख माणूस जिंकण्याची हाव धरतो, म्हणून पराजय सहन करीत नाही (व दावा मांडतो)," असे आचार्यांचे मत आहे. ५ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ६ हरलेल्याला जर दुप्पट दंड केला तर राजाकडे कोणीच फिर्याद घेऊन येणार नाही. ७ जुगारी लोक बहुधा खेळण्यात लबाडी करतात.

८ त्यांच्यावर देखरेख करणाऱ्यांनी खऱ्या कवडया व फासे पुरवावेत. ९ कवडया व फासे बदलून दुसरे वापरल्यास बारा पण दंड करावा, खेळताना लबाडी केल्यास प्रथम साहसदंड करून जिंकलेले परत घ्यावे, फसवणूक केल्यास शिवाय चोरीबद्दलचा दंड करावा.

जितद्रव्यादध्यक्षः पञ्चकं शतमाददीत, काकण्यक्षारालाशलाकावक्रयमुदकभूमिकर्मक्रयं च । १० । द्रव्याणामाधानं विक्रयं च कुर्यात् । ११ । अक्षभूमिहस्तदोषाणां चाप्रतिषेधने द्विगुणो दण्डः । १२ ।

तेन समाह्वयो व्याख्यातः, अन्यत्र विद्याशिल्पसमाह्वयात् । इति । १३ ।

प्रकीर्णकं तु –

याचितकावक्रीतकाहितकनिक्षेपकाणां यथादेशकालमदाने, यामच्छायासमुपवेशसंस्थितीनां वा देशकालातिपातने, गुल्मतरदेयं ब्राह्मणं साधयतः, प्रतिवेशानुवेशयोरुपरि निमन्त्रणे च द्वादशपणो दण्डः । १४ ।

संदिष्टमर्थमप्रयच्छतो, भ्रातृभार्यां हस्तेन लङ्घयतो, रूपाजीवामन्योपरुद्धां गच्छतः, परवक्तव्यं पण्यं क्रीणानस्य, समुद्रं गृहमुद्भिन्दतः, सामन्तचत्वारिंशत्कुल्याबाधामाचरतश्च अष्टचत्वारिंशत्पणो दण्डः । १५ ।

१० जिंकलेल्या पैशातून अध्यक्षाने शेकडा पाच (कर), आणि कवड्या, फासे, अराला (चामड्याचे पट्टे) आणि शलाका (हस्तिदंती फासे) यांचे भाडे व पाणी, जागा व खेळण्याची परवानगी याबद्दल आकार वसूल करावा. ११ त्याने खेळणाऱ्यांच्या वस्तूंचे गहाण व विक्रीचे व्यवहार करावेत. १२ फासे, जमीन किंवा हात यांच्या बाबतीतील लबाडीला प्रतिबंध न केल्यास त्याला दुप्पट दंड करावा.

१३ विद्येबद्दलचे आणि कलेबद्दलचे आव्हान खेरीज करून इतर आव्हानांच्या (पैजांच्या) बाबतीत हेच नियम लागू होतात.

१४ परंतु विविध स्वरूपाचे अपराध पुढीलप्रमाणे –

उसनी घेतलेली, भाड्याने घेतलेली, गहाण ठेवलेली आणि निक्षेप म्हणून घेतलेली वस्तू योग्य ठिकाणी व योग्य वेळी परत न केल्यास, रात्री किंवा दिवसा हजर होण्याचे व एकत्र राहण्याचे ठिकाण व वेळ चुकविल्यास, ब्राह्मणाकडून चौकीवर व तरीवर पैसे घेतल्यास आणि आपला शेजारी व शेजाऱ्याच्या पलीकडचा शेजारी यांना वगळून (भोजनाचे) निमंत्रण दिल्यास बारा पण दंड करावा.

१५ (दुसऱ्याला द्यावयास) सांगितलेली वस्तू न देणाऱ्यास, भावाच्या बायकोला हाताने स्पर्श करणाऱ्यास, दुसऱ्याच्या अवरुद्ध स्त्रीशी समागम करणाऱ्यास, दुसऱ्याचा हक्क असलेला माल विकत घेणाऱ्यास, मोहोरबंद घर फोडणाऱ्यास आणि शेजारच्या चाळीस कुटुंबांतील माणसांना उपद्रव देणाऱ्यास अठ्ठेचाळीस पण दंड करावा.

कुलनीवीग्राहकस्यापव्ययने, विधवां छन्दवासिनीं प्रसह्याधिचरतः, चण्डालस्यार्यां स्पृशतः, प्रत्यासन्नमापद्यनभिधावतो, निष्कारणमभिधावनं कुर्वतः, शाक्याजीवकादीन् वृषलप्रव्रजितान् देवपितृकार्येषु भोजयतः शत्यो दण्डः । १६ ।

शपथवाक्यानुयोगमनिसृष्टं कुर्वतः, युक्तकर्म चायुक्तस्य, क्षुद्रपशुवृषाणां पुंस्त्वोपघातिनः, दास्या गर्भमौषधेन पातयतश्च पूर्वः साहसदण्डः । १७ ।

पितापुत्रयोर्दम्पत्योर्भ्रातृभगिन्योर्मातुलभागिनेययोः शिष्याचार्ययोर्वा परस्परमपतितं त्यजतः, सार्थाभिप्रयातं ग्राममध्ये वा त्यजतः पूर्वः साहसदण्डः, कान्तारे मध्यमः, तन्निमित्तं भ्रेषयत उत्तमः, सहप्रस्थायिष्वन्येष्वर्धदण्डाः । १८ ।

पुरुषमबन्धनीयं बध्नतो बन्धयतो बन्धं वा मोक्षयतो, बालमप्राप्तव्यवहारं बध्नतो बन्धयतो वा सहस्रं दण्डः । १९ ।

१६ कुटुंबाची धनदौलत ताब्यात असणाऱ्याने ती नाकबूल केल्यास, स्वतंत्र राहणाऱ्या विधवेवर बलात्कार करणाऱ्यास, आर्य स्त्रीला स्पर्श करणाऱ्या चंडालास, संकटात सापडलेल्या जवळच्या माणसाच्या मदतीस न जाणाऱ्यास, विनाकारण धावाधाव करणाऱ्यास (आणि) देवकार्य व पितृकार्य यांच्या प्रसंगी शाक्य, आजीवक प्रभृती पाखंडी भिक्षूंना भोजन घालणाऱ्यास शंभर पण दंड करावा.

१७ अधिकार नसता शपथेवर जबानी घेणाऱ्यास आणि सरकारी नोकर नसता सरकारी नोकराचे काम करणाऱ्यास, लहान पशू व पोळ यांच्या पुंस्त्वाची खच्ची करणाऱ्यास आणि दासीचा गर्भपात औषधाने घडवून आणणाऱ्यास प्रथम साहसदंड करावा.

१८ पिता व पुत्र, पती व पत्नी, भाऊ व बहीण, मामा व भाचा किंवा आचार्य व शिष्य यांच्यापैकी एकाचा, तो जातिबहिष्कृत नसता, त्याग करणाऱ्या दुसऱ्याला किंवा तांड्याबरोबर जात असलेल्या माणसाला वाटेत गावात सोडून जाणाऱ्याला प्रथम साहसदंड करावा, रानात सोडून दिल्यास मध्यम साहसदंड, त्यामुळे त्याला हानी पोचविणाऱ्याला उत्तम साहसदंड करावा; तांड्यातील इतर बरोबर जाणाऱ्या माणसांना अर्धे दंड करावेत.

१९ बंधनास पात्र नसलेल्या मनुष्यास बंधनात टाकणाऱ्याला, टाकविणाऱ्याला किंवा (गुन्हेगाराला) बंधनातून सोडविणाऱ्याला, तसेच वयात न आलेल्या मुलास बंधनात टाकणाऱ्याला किंवा टाकविणाऱ्याला एक हजार पण दंड करावा.

पुरुषापराधविशेषेण दण्डविशेषः कार्यः । २० । तीर्थकरस्तपस्वी व्याधितः क्षुत्पिपासाध्वक्लान्तस्तिरोजनपदो दण्डखेदी निष्किंचनश्चानुग्राह्याः । २१ । देवब्राह्मणतपस्विस्त्रीबालवृद्धव्याधितानामनाथानामनभिसरतां धर्मस्थाः कार्याणि कुर्युः, न च देशकालभोगच्छलेनातिहरेयुः । २२ । पूज्या विद्याबुद्धिपौरुषाभिजनकर्मातिशयतश्च पुरुषाः । २३ ।

एवं कार्याणि धर्मस्थाः कुर्युरच्छलदर्शिनः ।
समाः सर्वेषु भावेषु विश्वास्या लोकसंप्रियाः ।। २४ ।।

इति धर्मस्थीये तृतीयेऽधिकरणे द्यूतसमाह्वयं प्रकीर्णकं च विंशोऽध्यायः ।।
आदितः सप्तसप्ततितमः ।

एतावता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य धर्मस्थीयम् तृतीयमधिकरणम् समाप्तम् ।।

२० मनुष्याच्या दर्जानुसार व अपराधाच्या स्वरूपानुसार विशिष्ट दंड करावेत. २१ तीर्थंकर, तपस्वी, रोगी, भुकेने व तहानेनें व्याकुळ झालेला, प्रवासाने शिणलेला, परदेशचा रहिवाशी, दंडाने खिन्न झालेला आणि निष्किंचन ह्यांना दया दाखवावी. २२ देव, ब्राह्मण, तपस्वी, स्त्रिया, अज्ञान मुले, वृद्ध, रोगी व अनाथ हे स्वतः फिर्याद घेऊन येत नसतील तर न्यायाधिशांनी आपण होऊन त्यांच्या तक्रारींची चौकशी करावी, आणि स्थल, काल व उपभोग यांच्या सबबीवर त्यांच्या तक्रारी फेटाळून लावू नयेत. २३ आणि विद्या, बुद्धी, पराक्रम, कुल आणि कर्म यांच्या उत्कृष्टतेमुळे मनुष्यांना सन्मानाने वागवावे.

२४ याप्रमाणे न्यायाधिशांनी छलाचा आश्रय न घेता, सर्व प्राण्यांशी समतेने वागून, विश्वासास पात्र व लोकांत प्रिय होऊन कज्जांचे निवाडे द्यावेत.

## तिसरे अधिकरण समाप्त

# कण्टकशोधनम् — चतुर्थमधिकरणम्

१

## [षट्सप्ततितमं प्रकरणम् — कारुकरक्षणम्]

**प्रदेष्टारस्त्रयस्त्रयोऽमात्याः कण्टकशोधनं कुर्युः ।१।**

**अर्थ्यप्रतीकाराः कारुशासितारः संनिक्षेप्तारः स्ववित्तकारवः श्रेणीप्रमाणा निक्षेपं गृह्णीयुः ।२। विपत्तौ श्रेणी निक्षेपं भजेत ।३।**

**निर्दिष्टदेशकालकार्यं च कर्म कुर्युः, अनिर्दिष्टदेशकालं कार्यापदेशम् ।४। कालातिपातने पादहीनं वेतनं तद्द्विगुणश्च दण्डः ।५। अन्यत्र भ्रेषोपनिपाताभ्यां नष्टं विनष्टं वाऽभ्यावहेयुः ।६। कार्यस्यान्यथाकरणे वेतननाशस्तद्द्विगुणश्च दण्डः ।७।**

## कंटकांचे निर्मूलन — चौथे अधिकरण

### पहिला अध्याय

### प्रकरण ७६ : कारागिरांवर देखरेख

१ अमात्याच्या दर्जाचे असलेल्या (फौजदारी स्वरूपाच्या गुन्ह्यांचा तपास करणाऱ्या व त्याबद्दल शिक्षा करणाऱ्या) तीन प्रदेष्टयांनी (गुन्हेगार) समाज-कंटकांचा बंदोबस्त करावा.

२ (हरवलेला अथवा नष्ट झालेला) पदार्थ भरून देण्यास समर्थ असलेले कारागिरांचे मालक (आणि) प्रामाणिकपणे निक्षेप वापरणारे स्वतःच्या भांडवला-वर स्वतंत्र धंदा करणारे कारागीर यांनी श्रेणीच्या जामिनकीवर निक्षेप घ्यावा. ३ (कारागीर) मरण पावल्यास श्रेणी निक्षेपाबद्दल जबाबदार राहील.

४ आणि (कारागिरांनी) सांगितलेल्या ठिकाणी व वेळात सांगितल्याप्रमाणे काम करावे, कामाच्या स्वरूपाची योग्य सबब असल्यास देश व काल हे अगोदर न ठरविता काम करावे. ५ ठरलेली वेळ चुकविल्यास पावपट मजुरी कमी देऊन त्याच्या दुप्पट (म्हणजे अर्ध्या मजुरीइतका) दंड करावा. ६ स्वाभाविक होणारा ऱ्हास व आकस्मिक संकट यांखेरीज जे नाश पावेल अथवा नाहीसे होईल त्याबद्दल ते जबाबदार धरले जातील. ७ सांगितल्यापेक्षा निराळ्याच प्रकारे काम केल्यास मजुरी बुडवून तिच्या दुप्पट दंड करावा.

तन्तुवाया दशैकादशिकं सूत्रं वर्धयेयुः । ८ । वृद्धिच्छेदे छेदद्विगुणो दण्डः । ९ । सूत्रमूल्यं वानवेतनम्, क्षौमकौशेयानामध्यर्धगुणम्, पत्त्रोर्णाकम्बलदुकूलानां द्विगुणम् । १० । मानहीने हीनावहीनं वेतनं तद्द्विगुणश्च दण्डः, तुलाहीने हीनचतुर्गुणो दण्डः, सूत्रपरिवर्तने मूल्यद्विगुणः । ११ । तेन द्विपटवानं व्याख्यातम् । १२ ।

ऊर्णातुलायाः पञ्चपलिको विहननच्छेदो रोमच्छेदश्च । १३ ।

रजकाः काष्ठफलकश्लक्ष्णशिलासु वस्त्राणि नेनिज्युः । १४ । अन्यत्र नेनिजतो वस्त्रोपघातं षट्पणं च दण्डं दद्युः । १५ । मुद्गराङ्कादन्यद्वासः परिदधानास्त्रिपणं दण्डं दद्युः । १६ । परवस्त्रविक्रयावक्रयाधानेषु च द्वादशपणो दण्डः, परिवर्तने मूल्यद्विगुणो वस्त्रदानं च । १७ । मुकुलावदातं शिलापट्टशुद्धं धौतसूत्रवर्णं प्रमृष्टश्वेतं चैकरात्रोत्तरं दद्युः । १८ । पञ्चरात्रिकं तनुरागं, षड्रात्रिकं नीलं,

८ विणकरांनी सूत दहा पलास अकरा पल (कापड) या प्रमाणात वाढविले पाहिजे. ९ वाढीत कमतरता आल्यास कमतरतेच्या दुप्पट दंड करावा. १० विणण्याची मजुरी सुताच्या किमतीइतकी द्यावी, क्षौम व कौशेय यांच्या बाबतीत दीडपट, पत्त्रोर्णा, कांबळे व दुकूल यांच्या बाबतीत (सुताच्या किमतीच्या) दुप्पट मजुरी द्यावी. ११ (कापडाच्या लांबीरुंदीचे) माप कमी भरल्यास कमी मापास अनुरूप अशी मजुरीत कपात करावी व कपातीच्या दुप्पट दंड करावा, वजनात कमी भरल्यास कमी भरलेल्याच्या (किमतीच्या) चौपट दंड करावा, सूत बदलल्यास किमतीच्या दुप्पट दंड करावा. १२ हेच नियम दुहेरी सुताने विणलेल्या कापडाच्या बाबतीत लागू होतात.

१३ एक तुला लोकरीची पाच पल पिंजताना घट (योग्य मानावी) आणि तितकीच घट प्राण्यांचे केस पिंजताना (योग्य मानावी).

१४ धोब्यांनी लाकडी फळीवर किंवा गुळगुळीत दगडावर कपडे धुतले पाहिजेत. १५ दुसऱ्या ठिकाणी धुणाऱ्यांनी वस्त्राचे होणारे नुकसान भरून देऊन सहा पण दंड दिला पाहिजे. १६ मुद्गराची खूण असलेल्या कपड्याखेरीज इतर कपडे वापरल्यास त्यांनी तीन पण दंड दिला पाहिजे. १७ दुसऱ्यांचे कपडे विकले, भाड्याने दिले अथवा गहाण ठेवले तर बारा पण दंड करावा, कपडा बदलल्यास त्याच्या किमतीच्या दुप्पट दंड देऊन कपडा परत केला पाहिजे. १८ कळीप्रमाणे शुभ्र, शिळेवर घासून स्वच्छ केलेला, धुतलेल्या सुताच्या रंगाचा आणि चोळून चोळून सफेत केलेला – अशा प्रकारे धुतलेले कपडे (अनुक्रमे) एक, दोन, तीन व चार दिवसांनी परत केले पाहिजेत. १९ हलक्या रंगाचा कपडा पाच दिवसांनी, निळ्या रंगाचा सहा दिवसांनी, केशर, लाक्षारस अथवा

पुष्पलाक्षामञ्जिष्ठारक्तं गुरुपरिकर्म यत्नोपचार्यं जात्यं वासः सप्तरात्रिकम् ।१९। ततः परं वेतनहानिं प्राप्नुयुः ।२०। श्रद्धेया रागविवादेषु वेतनं कुशलाः कल्पयेयुः ।२१। परार्ध्यानां पणो वेतनम्, मध्यमानामर्धपणः, प्रत्यवराणां पादः, स्थूलकानां माषकद्विमाषकम्, द्विगुणं रक्तकानाम् ।२२। प्रथमनेजने चतुर्भागः क्षयः, द्वितीये पञ्चभागः ।२३। तेनोत्तरं व्याख्यातम् ।२४।

रजकैस्तुन्नवाया व्याख्याताः ।२५।

सुवर्णकाराणामशुचिहस्ताद्रूप्यं सुवर्णमनाख्याय सरूपं क्रीणतां द्वादशपणो दण्डः, विरूपं चतुर्विंशतिपणः, चोरहस्तादष्टचत्वारिंशत्पणः ।२६। प्रच्छन्नविरूप-मूल्यहीनक्रयेषु स्तेयदण्डः, कृतभाण्डोपधौ च ।२७। सुवर्णान्माषकमपहरतो द्विशतो दण्डः, रूप्यधरणान्माषकमपहरतो द्वादशपणः।२८।तेनोत्तरं व्याख्यातम् ।२९। वर्णोत्कर्षमपसारणं योगं वा साधयतः पञ्चशतो दण्डः ।३०। तयोरपचरणे रागस्यापहारं विद्यात् ।३१। माषको वेतनं रूप्यधरणस्य,

मंजिष्ठा यांनी रंगविलेला, जास्त मेहनत आवश्यक असलेला, काळजीपूर्वक हाताळावयाचा असलेला भारी कपडा सात दिवसांनी परत केला पाहिजे. २० त्यानंतर त्यांना मजुरी गमवावी लागेल. २१ रंगाविषयीच्या तंटयांत विश्वासपात्र तज्ज्ञांनी मजुरी ठरवावी. २२ भारी कपडयांची धुणावळ एक पण, मध्यम कपडयांची अर्धा पण, कनिष्ठ कपडयांची पाव पण, जाडयाभरडया कपडयांची एक किंवा दोन माषक; रंगविलेल्या कपडयांची धुणावळ दुप्पट. २३ पहिल्या धुण्यात (कपडयांची किंमत) एकचतुर्थांशाने कमी होते, दुसऱ्या धुण्यात एकपंचमाशांने. २४ याप्रमाणेच पुढचे समजावे.

२५ धोब्यांच्याविषयीचे नियम शिंप्यांना लागू आहेत.

२६ संशयित माणसाकडून चांदीसोन्याच्या वस्तू (अधिकाऱ्यांना) न कळविता मूळ स्वरूपात विकत घेणाऱ्या सोनारांना बारा पण दंड करावा, तिचे स्वरूप बदलले असल्यास चोवीस पण, चोराकडून विकत घेतली असल्यास अठ्ठेचाळीस पण. २७ गुप्तपणे किंवा बदललेली वस्तू कमी किमतीला विकत घेतल्यास, तसेच केलेल्या वस्तूत लबाडी केल्यास चोरीबद्दलचा दंड करावा. २८ एक सुवर्ण वजनाच्या वस्तूतून एक माषक सोने चोरणाऱ्यास दोनशे पण दंड करावा, एक धरण वजनाच्या वस्तूतून एक माषक चांदी चोरणाऱ्यास बारा पण दंड. २९ अधिक चोरीबद्दल याच प्रमाणांत दंड करावेत. ३० खोटा मुलामा देणे, सोनेचांदी काढून घेणे किंवा त्यांचे हलक्या धातूशी मिश्रण करणे या गोष्टी करणाऱ्यास पाचशे पण दंड करावा. ३१ (सोने व चांदी) ह्या दोन धातूंच्या संबंधात लबाडी केल्यास रंग नाहीसा करण्याचा गुन्हा समजावा

**सुवर्णस्याष्टभागः । ३२ । शिक्षाविशेषेण द्विगुणा वेतनवृद्धिः । ३३ । तेनोत्तरं व्याख्यातम् । ३४ ।**

**ताम्रवृत्तकंसवैकृन्तकारकूटकानां पञ्चकं शतं वेतनम् । ३५ । ताम्रपिण्डो दशभागक्षयः । ३६ । पलहीने हीनद्विगुणो दण्डः । ३७ । तेनोत्तरं व्याख्यातम् । ३८ । सीसत्रपुपिण्डो विंशतिभागक्षयः । ३९ । काकणी चास्य पलवेतनम् । ४० । कालायसपिण्डः पञ्चभागक्षयः । ४१ । काकणीद्वयं चास्य पलवेतनम् । ४२ । तेनोत्तरं व्याख्यातम् । ४३ ।**

**रूपदर्शकस्य स्थितां पणयात्रामकोप्यां कोपयतः कोप्यामकोपयतो द्वादशपणो दण्डः । ४४ । व्याजीपरिशुद्धौ पणयात्रा । ४५ । पणान्माषकमुपजीवतो द्वादशपणो दण्डः । ४६ । तेनोत्तरं व्याख्यातम् । ४७ ।**

**कूटरूपं कारयतः प्रतिगृहणतो निर्यापयतो वा सहस्रं दण्डः, कोशे प्रक्षिपतो वधः । ४८ ।**

(व पुढे ४.४.२२ मध्ये सांगितल्याप्रमाणे शिक्षा करावी). ३२ एक धरण चांदीच्या कामाबद्दल एक माषक मजुरी, एक सुवर्ण सोन्याच्या कामाबद्दल एकअष्टमांश पण मजुरी द्यावी. ३३ विशेष कारागिरीबद्दल दुपटीपर्यंत मजुरी वाढवावी. ३४ त्याच प्रमाणात अधिक कामाची मजुरी ठरवावी.

३५ तांबे, पोलाद, कासे, वैकृंतक व पितळ यांच्या बाबतीत शंभर पलांना पाच पण मजुरी द्यावी. ३६ तांब्याचा पदार्थ बनविताना त्याचे वजन एकदशांशाने घटते. ३७ याहून अधिक घटल्यास एक पल अधिक तुटीला तिच्या किमतीच्या दुप्पट दंड करावा. ३८ याच प्रमाणात पुढचे समजावे. ३९ शिसे व कथील यात एकविसांश घट येते. ४० आणि त्यांच्या बाबतीत एक पल वजनाला एक काकणी मजुरी ठरवावी. ४१ लोखंडाचा पदार्थ बनविताना एकपंचमांश घट येते. ४२ त्याच्या बाबतीत एका पलाला दोन काकणी मजुरी ठरवावी. ४३ त्याच प्रमाणात पुढचे समजावे.

४४ नाणी तपासणाऱ्याने प्रचारात असलेले स्वीकार्य चलन अस्वीकार्य ठरविल्यास किंवा अस्वीकार्य चलन स्वीकार्य ठरविल्यास त्याला बारा पण दंड करावा. ४५ (शेकडा पाच याप्रमाणे) व्याजी दिली की चलन प्रचारात येऊ शकते. ४६ चलनातील एका पणाच्या मान्यतेसाठी एक माषक घेणाऱ्यास बारा पण दंड करावा. ४७ त्याच प्रमाणात पुढचे समजावे.

४८ खोटे नाणे पाडविणाऱ्यास, स्वीकारणाऱ्यास अथवा चलनात वापरणाऱ्यास एक हजार पण दंड करावा, सरकारी तिजोरीत जमा करणाऱ्याला वधाची शिक्षा करावी.

**चरकपांसुधावकाः सारत्रिभागं लभेरन्, द्वौ राजा रत्नं च । ४९ । रत्नापहार उत्तमो दण्डः । ५० ।**

**खनिरत्ननिधिनिवेदनेषु षष्ठमंशं निवेत्ता लभेत, द्वादशमंशं भृतकः । ५१ । शतसहस्रादूर्ध्वं राजगामी निधिः । ५२ । ऊने षष्ठमंशं दद्यात् । ५३ । पौर्वपौरुषिकं निधिं जानपदः शुचिः स्वकरणेन समग्रं लभेत । ५४ । स्वकरणाभावे पञ्चशतो दण्डः, प्रच्छन्नादाने सहस्रम् । ५५ ।**

**भिषजः प्राणाबाधिकमनाख्यायोपक्रममाणस्य विपत्तौ पूर्वः साहसदण्डः, कर्मापराधेन विपत्तौ मध्यमः । ५६ । मर्मवधवैगुण्यकरणे दण्डपारुष्यं विद्यात् । ५७ ।**

**कुशीलवा वर्षारात्रमेकस्था वसेयुः । ५८ । कामदानमतिमात्रमेकस्यातिवादं च वर्जयेयुः । ५९ । तस्यातिक्रमे द्वादशपणो दण्डः । ६० । कामं देशजातिगोत्रचरण-**

४९. नोकरांना व कचरा साफ करणाऱ्यांना मिळालेल्या भारी वस्तूचा एकतृतीयांश भाग मिळावा, दोनतृतीयांश भाग आणि रत्न (मिळाले तर ते) सरकारला दिले पाहिजे. ५० त्यांनी रत्नाचा अपहार केल्यास उत्तम साहसदंड करावा.

५१ खाण, रत्न किंवा पुरलेले धन यांची माहिती दिली असता माहिती देणाऱ्याला एकषष्ठांश भाग मिळावा; तो सरकारी नोकर असेल तर त्याला एकबारांश भाग मिळावा. ५२ जमिनीत पुरलेला निधी एक लाख पणाच्या वर असेल तर तो सरकारजमा करावा. ५३ कमी असेल तर एकषष्ठांश भाग माहिती देणाऱ्याला द्यावा. ५४ वाडवडिलांनी पुरून ठेवलेला निधी देशातील नागरिकाला, त्याने आपला मालकीहक्क सिद्ध केल्यावर, सगळाच्या सगळा मिळाला पाहिजे. ५५ मालकीहक्क सिद्ध न झाल्यास पाचशे पण दंड करावा, गुप्तपणे ताब्यात घेतल्यास एक हजार पण दंड करावा.

५६ (अधिकाऱ्यांना) न कळविता प्राणघातक ठरण्याचा संभव असलेले इलाज करणाऱ्या वैद्याला, रोगी दगावल्यास, प्रथम साहसदंड करावा, चुकीचा इलाज केल्यामुळे रोगी मेल्यास मध्यम साहसदंड करावा. ५७ मर्मस्थानाला दुखापत केल्यास किंवा रोग्यामध्ये वैगुण्य उत्पन्न केल्यास दंडपारुष्यातल्याप्रमाणे (३.१९.१२–१४ यातील) शिक्षा कराव्यात.

५८ (नटनर्तकादी) कुशीलवांनी पावसाळ्याच्या दिवसांत एके ठिकाणीच राहिले पाहिजे. ५९ एकालाच खूष होऊन फार मोठे बक्षीस देण्याचे आणि अतिशय स्तुती करण्याचे टाळावे. ६० ह्या नियमांचे उल्लंघन केल्यास बारा पण दंड करावा. ६१ त्यांनी वाटल्यास देश, जात, गोत्र, चरण व मैथुन यांची

मैथुनावहासेन नर्मयेयुः । ६१ । कुशीलवैश्चारणा भिक्षुकाश्च व्याख्याताः । ६२ । तेषामयःशूलेन यावतः पणानभिवदेयुस्तावन्तः शिफाप्रहारा दण्डाः । ६३ ।

शेषाणां कर्मणां निष्पत्तिवेतनं शिल्पिनां कल्पयेत् । ६४ ।

एवं चोरानचोराख्यान् वणिक्कारुकुशीलवान् ।
भिक्षुकान् कुहकांश्चान्यान् वारयेद्देशपीडनात् ।। ६५ ।।

इति कण्टकशोधने चतुर्थेऽधिकरणे कारुकरक्षणं प्रथमोऽध्यायः । आदितोऽष्टसप्ततितमः ।

२

[ सप्तसप्ततितमं प्रकरणम् – वैदेहकरक्षणम् ]

संस्थाध्यक्षः पण्यसंस्थायां पुराणभाण्डानां स्वकरणविशुद्धानामाधानं विक्रयं वा स्थापयेत् । १ । तुलामानभाण्डानि चावेक्षेत पौतवापचारात् । २ ।

परिमाणीद्रोणयोरर्धपलहीनातिरिक्तमदोषः । ३ । पलहीनातिरिक्ते द्वादशपणो दण्डः । ४ । तेन पलोत्तरा दण्डवृद्धिर्व्याख्याता । ५ । तुलायाः कर्षहीनातिरिक्तम-

थट्टा करून मनरंजन करावे. ६२ कुशीलवांप्रमाणेच भाट व भिक्षुक यांना वागवावे. ६३ त्यांच्या अपराधांबद्दल (न्यायाधिशांनी) जितके पण दंड सांगितला असेल तितके चाबकाचे फटके जोराने मारण्याची शिक्षा करावी.

६४ इतर कलाकारांच्या कामाबद्दल त्यांच्या उत्पादनाला अनुरूप अशी मजुरी ठरवून द्यावी.

६५ याप्रमाणे जे चोर असून चोर म्हणून ओळखले जात नाहीत असे व्यापारी, कारागीर, कुशीलव, भिक्षुक, जादुगार व इतर हे देशाला पीडा देणार नाहीत अशी खबरदारी घ्यावी.

## दुसरा अध्याय

### प्रकरण ७७ : व्यापाऱ्यांवर देखरेख

१ बाजारपेठांवरील अध्यक्षाने बाजारपेठेत मालकीहक्क चोख असलेल्या जुन्या मालाच्या गहाणाची अथवा विक्रीची परवानगी द्यावी. २ आणि वजन-मापात लवाडी होण्याचा संभव असतो म्हणून वजनांची व मापांची तपासणी करावी.

३ (दोनशे पलाच्या) परिमाणी वजनात व द्रोण मापात अर्धा पल कमी अथवा अधिक भरल्यास काही दोष नाही. ४ त्यात एक पल कमी किंवा अधिक भरल्यास बारा पण दंड करावा. ५ याप्रमाणेच दर एक पल फरकाला हा दंड वाढवीत जावा. ६ (शंभर पल अथवा चारशे कर्ष असलेल्या) तुला वजनात

दोषः । ६ । द्विकर्षहीनातिरिक्ते षट्पणो दण्डः । ७ । तेन कर्षोत्तरा दण्डवृद्धि-र्व्याख्याता । ८ । आढकस्यार्धकर्षहीनातिरिक्तमदोषः । ९ । कर्षहीनातिरिक्ते त्रिपणो दण्डः । १० । तेन कर्षोत्तरा दण्डवृद्धिर्व्याख्याता । ११ । तुलामान-विशेषाणामतोऽन्येषामनुमानं कुर्यात् । १२ । तुलामानाभ्यामतिरिक्ताभ्यां क्रीत्वा हीनाभ्यां विक्रीणानस्य त एव द्विगुणा दण्डाः । १३ । गण्यपण्येष्वष्टभागं पण्य-मूल्येष्वपहरतः षण्णवतिर्दण्डः । १४ ।

काष्ठलोहमणिमयं रज्जुचर्ममृण्मयं सूत्रवल्करोममयं वा जात्यमित्यजात्यं विक्रयाधानं नयतो मूल्याष्टगुणो दण्डः । १५ । सारभाण्डमित्यसारभाण्डं तज्जातमित्यतज्जातं राधायुक्तमुपधियुक्तं समुद्गपरिवर्तिमं वा विक्रयाधानं नयतो हीनमूल्यं चतुष्पञ्चाशत्पणो दण्डः, पणमूल्यं द्विगुणो, द्विपणमूल्यं द्विशतः । १६ । तेनार्घवृद्धौ दण्डवृद्धिर्व्याख्याता । १७ ।

एक कर्ष कमीअधिक असल्यास दोष नाही. ७ दोन कर्षाचा फरक असल्यास सहा पण दंड करावा. ८ दर एक कर्षाच्या फरकाला याच प्रमाणात पुढे दंड वाढवीत जावा. ९ (पन्नास पल अथवा दोनशे कर्षाच्या) आढक मापात अर्धा कर्ष अमीअधिक असल्यास दोष नाही. १० एक कर्षाचा फरक असल्यास तीन पण दंड करावा. ११ पुढील एकएक कर्षाच्या फरकाबद्दल याच प्रमाणात दंडाची वाढ करावी. १२ इतर वजनें व मापेयासंबंधीच्या फरकाबद्दलच्या दंडाचे यावरूनच अनुमान करावे. १३ अधिक भरणाऱ्या वजनामापांनी विकत घेऊन कमी भरणाऱ्या वजनामापांनी विकणाऱ्या व्यापाऱ्यास हेच दंड दुप्पट करावेत. १४ (वजनामापांचा उपयोग न करता) मोजून विकावयाचा असलेल्या मालाच्या संबंधात मालाच्या किमतीच्या एकअष्टमांशाइतकी चोरी करणाऱ्यास शहाण्णव पण दंड करावा.

१५ लाकूड, लोखंड व रत्ने यांचे बनविलेले पदार्थ, दोर, चामडे व माती यांचे केलेले पदार्थ अथवा सूत, वल्कल व (प्राण्यांचे) केस यांची विणलेली वस्त्रें ही खरीं (मौल्यवान) नसता खरी म्हणून विकणाऱ्यास अथवा गहाण ठेवणाऱ्यास किमतीच्या आठपट दंड करावा. १६ भारी किमतीचा नसलेला माल भारी किमतीचा म्हणून, विशिष्ट प्रकारचा नसलेला माल त्या प्रकारचा म्हणून, खोटी चकाकी दिलेला माल, बनावट माल अथवा दुसऱ्या पेटाऱ्यातील माल विकणाऱ्याला अथवा गहाण ठेवणाऱ्याला, त्याची किंमत अल्प असल्यास चोपन पण दंड करावा, किंमत एक पण असल्यास दुप्पट दंड, दोन पण किंमत असल्यास दोनशे पण दंड करावा. १७ याच प्रमाणात किमतीच्या वाढीनुसार दंड वाढवीत जावा.

कारुशिल्पिनां कर्मगुणापकर्षमाजीवं विक्रयक्रयोपघातं वा संभूय समुत्थापयतां सहस्रं दण्डः । १८ । वैदेहकानां वा संभूय पण्यमवरुन्धतामनर्घेण विक्रीणतां वा सहस्रं दण्डः । १९ ।

तुलामानान्तरमर्घवर्णान्तरं वा – धरकस्य मायकस्य वा पणमूल्यादष्टभागं हस्तदोषेणाचरतो द्विशतो दण्डः । २० । तेन द्विशतोत्तरा दण्डवृद्धिर्व्याख्याता । २१ । धान्यस्नेहक्षारलवणगन्धभैषज्यद्रव्याणां समवर्णोपधाने द्वादशपणो दण्डः । २२ ।

यन्निसृष्टमुपजीवेयुस्तदेषां दिवससंजातं संख्याय वणिक् स्थापयेत् । २३ । क्रेतृविक्रेत्रोरन्तरपतितमादायादन्यद्भवति । २४ । तेन धान्यपण्यनिचयांश्चानुज्ञाताः कुर्युः । २५ । अन्यथानिचितमेषां पण्याध्यक्षो गृह्णीयात् । २६ । तेन धान्यपण्यविक्रये व्यवहरेतानुग्रहेण प्रजानाम् । २७ ।

१८ जे कारागीर अथवा कलाकार आपसात एकी करून कामाचा दर्जा कमी करतील अथवा (अधिक) नफा काढतील किंवा मालाच्या खरेदीविक्रीत अडथळे उत्पन्न करतील त्यांना एक हजार पण दंड करावा. १९ किंवा व्यापाऱ्यांनी आपसात एकी करून माल अडवून ठेवला अथवा जास्त भावाने विकला तर त्यांना एक हजार पण दंड करावा.

२० वजने व मापे यांच्यातील फरक अथवा किमतीतील व मालाच्या प्रतीतील फरक यासंबंधी वजन करणाऱ्याने अथवा मापी देणाऱ्याने हातचलाखी करून एक पण किमतीचा माल एकअष्टमांशाइतका कमी दिला तर दोनशे पण दंड करावा. २१ तशीच दंडाच्या रकमेत दोनदोनशेची वाढ होते असे समजावे. २२ धान्य, तेल व तूप, (गूळ आदी) क्षार, लवण, सुगंधी पदार्थ, औषध ह्या पदार्थांत त्याच जातीचे पदार्थ मिसळल्यास बारा पण दंड करावा.

२३ ह्या (गुमास्ते) लोकांची दिवसात होणारी विक्री हिशोबात घेऊन त्यांनी स्वतःच्या उपजीविकेसाठी परवानगीने किती वापरावे ते (मुख्य) व्यापाऱ्याने ठरवून द्यावे. २४ विकत घेणारा व विकणारा यांच्या दरम्यान जे राहते (म्हणजे खरेदी केलेल्या मालापैकी विक्री झाल्यावर शिल्लक उरणारा माल) ते त्यांनी घ्यावयाचे असलेल्या वेतनाहून भिन्न असते. २५ आणि त्याचा उपयोग परवानगी घेऊन धान्य व इतर माल यांचे साठे करण्यासाठी करावा. २६ त्यांनी इतर प्रकारांनी साठे केल्यास पण्याध्यक्षाने ते ताब्यात घ्यावेत. २७ धान्य व इतर माल विकताना प्रजाजनांवर अनुग्रह करण्यासाठी त्या साठ्यांचा उपयोग करावा.

अनुज्ञातक्रयादुपरि चैषां स्वदेशीयानां पण्यानां पञ्चकं शतमाजीवं स्थापयेत्, परदेशीयानां दशकम् । २८ । ततः परमर्घं वर्धयतां क्रये विक्रये वा भावयतां पणशते पञ्चपणाद् द्विशतो दण्डः । २९ । तेनार्घवृद्धौ दण्डवृद्धिर्व्याख्याता । ३० ।

संभूयक्रये चैषामविक्रीते नान्यं संभूयक्रयं दद्यात् । ३१ । पण्योपघाते चैषामनुग्रहं कुर्यात् । ३२ ।

पण्यबाहुल्यात्पण्याध्यक्षः सर्वपण्यान्येकमुखानि विक्रीणीत । ३३ । तेष्वविक्रीतेषु नान्ये विक्रीणीरन् । ३४ । तानि दिवसवेतनेन विक्रीणीरन्ननुग्रहेण प्रजानाम् । ३५ ।

देशकालान्तरितानां तु पण्यानां –

प्रक्षेपं पण्यनिष्पत्तिं शुल्कं वृद्धिमवक्रयम् ।
व्ययानन्यांश्च संख्याय स्थापयेदर्घमर्घवित् ।। ३६ ।।

इति कण्टकशोधने चतुर्थेऽधिकरणे वैदेहकरक्षणं द्वितीयोऽध्यायः । आदित एकोनाशीतितमः ।

२८ संमत केलेल्या खरेदीच्या भावावर स्वदेशी मालाच्या बाबतीत नफा शेकडा पाच ठरवून द्यावा, परदेशी मालाच्या बाबतीत शेकडा दहा. २९ त्यापेक्षा अधिक भाव घेणाऱ्यांना किंवा खरेदीत अथवा विक्रीत अधिक नफा काढणाऱ्यांना शंभर पणांवर पाच पण (अधिक) घेतल्याबद्दल दोनशे पण दंड करावा. ३० ह्याच प्रमाणात भाववाढीबद्दल दंडात वाढ समजावी.

३१ आणि त्यांनी एकत्र येऊन खरेदी केलेल्या मालाची विक्री झाल्याशिवाय दुसऱ्या एकत्र खरेदीस परवानगी देऊ नये. ३२ आणि मालाचे नुकसान झाले असल्यास त्यांना सवलत द्यावी.

३३ माल फार मोठ्या प्रमाणात उपलब्ध झाला असल्यास पण्याध्यक्षाने सर्व माल एकेच ठिकाणी विक्रीस ठेवावा. ३४ तो विकला गेल्याशिवाय दुसऱ्यांनी आपला माल विक्रीस काढता कामा नये. ३५ तो माल गुमास्त्यांनी दिवसाच्या वेतनाच्या बोलीवर प्रजाजनांवर अनुग्रह होईल अशा रीतीने विकावा.

३६ परंतु दूरदेशीच्या व बऱ्याच काळापूर्वीच्या मालाच्या संबंधात भाव ठरविण्यात कुशल असलेल्या (पण्याध्यक्षाने) गुंतलेले भांडवल, उत्पन्न झालेला माल (किती आहे ते), जकात, व्याज, भाडे आणि इतर खर्च यांचा हिशोब करून विक्रीचा भाव ठरवून द्यावा.

३

[ अष्टसप्ततितमं प्रकरणम् – उपनिपातप्रतीकारः ]

दैवान्यष्टौ महाभयानि – अग्निरुदकं व्याधिर्दुर्भिक्षं मूषिका व्यालाः सर्पा रक्षांसीति । १ । तेभ्यो जनपदं रक्षेत् । २ ।

ग्रीष्मे बहिरधिश्रयणं ग्रामाः कुर्युः, दशकुलीसंग्रहेणाधिष्ठिता वा । ३ । नागरिकप्रणिधावग्निप्रतिषेधो व्याख्यातः, निशान्तप्रणिधौ राजपरिग्रहे च । ४ । बलिहोमस्वस्तिवाचनैः पर्वसु चाग्निपूजाः कारयेत् । ५ ।

वर्षारात्रमानूपग्रामाः पूरवेलामुत्सृज्य वसेयुः । ६ । काष्ठवेणुनावश्चोपगृह्णीयुः । ७ । उह्यमानमलाबुदृतिप्लवगण्डिकावेणिकाभिस्तारयेयुः । ८ । अनभिसरतां द्वादशपणो दण्डः, अन्यत्र प्लवहीनेभ्यः । ९ । पर्वसु च नदीपूजाः कारयेत् । १० । मायायोगविदो वेदविदो वा वर्षमभिचरेयुः । ११ ।

## तिसरा अध्याय

## प्रकरण ७८ : आकस्मिक आपत्तींचे निवारण

१ महान दैवी आपत्ती आठ आहेत – आग, पूर, रोग, दुष्काळ, उंदीर, हिंस्र पशू, साप आणि राक्षस (भूतपिशाच्चादी). २ त्यांच्यापासून देशाचे रक्षण केले पाहिजे.

३ उन्हाळ्यात गावातील रहिवाशांनी घराबाहेर स्वैपाक करावा, किंवा दहा दहा कुटुंबांच्या समूहाच्या देखरेखीखाली (स्वैपाक करावा) ४ आगीसंबंधीची उपाययोजना नागरिकप्रणिधी प्रकरणात (मागे २.३६.१५–१७ मध्ये) आणि निशांतप्रणिधी प्रकरणात राजाच्या मालमत्तेच्या संबंधात (मागे १.२०.४ मध्ये) सांगितली आहे. ५ आणि अमावास्या व पौर्णिमा ह्या पर्वदिवशी बली देऊन, होमहवन व स्वस्तिवाचन करून अग्नीची पूजा करावी.

६ पाण्याच्या जवळ असणाऱ्या गावांतील लोकांनी पावसाळ्याच्या दिवसांत पुराच्या हद्दीच्या पलीकडे वस्ती करावी. ७ लाकडाचे ओंडके, बांबूचे तराफे व नावा जवळ बाळगाव्यांत. ८ पुराने वाहून जात असलेल्यास भोपळा, पखाल, होडगे, झाडाचा बुंधा व दोरखंड यांच्या साह्याने वाचवावे. ९ जे मदतीस धावून जाणार नाहीत त्यांना बारा पण दंड करावा, पण ज्यांच्याजवळ होडी नसेल त्यांना दंड करू नये. १० आणि पर्वांच्या दिवशी नद्यांची पूजा करावयास लावावे. ११ मायेचा प्रयोग जाणणाऱ्यांनी अथवा वेद जाणणाऱ्यांनी पावसाविरुद्ध मंत्रप्रयोग करावा.

वर्षावग्रहे शचीनाथगङ्गापर्वतमहाकच्छपूजाः कारयेत् । १२ ।

व्याधिभयमौपनिषदिकैः प्रतीकारैः प्रतिकुर्युः, औषधैश्चिकित्सकाः शान्तिप्रायश्चित्तैर्वा सिद्धतापसाः । १३ । तेन मरको व्याख्यातः । १४ । तीर्थाभिषेचनं महाकच्छवर्धनं गवां श्मशानावदोहनं कबन्धदहनं देवरात्रिं च कारयेत् । १५ ।

पशुव्याधिमरके स्थानार्थनीराजनं स्वदैवतपूजनं च कारयेत् । १६ ।

दुर्भिक्षे राजा बीजभक्तोपग्रहं कृत्वाऽनुग्रहं कुर्यात्, दुर्गसेतुकर्म वा भक्तानुग्रहेण, भक्तसंविभागं वा, देशनिक्षेपं वा । १७ । मित्राणि वा व्यपाश्रयेत, कर्शनं वमनं वा कुर्यात् । १८ । निष्पन्नसस्यमन्यविषयं वा सजनपदो यायात्, समुद्रसरस्तटाकानि वा संश्रयेत । १९ । धान्यशाकमूलफलावापान् वा सेतुषु कुर्वीत, मृगपशुपक्षिव्यालमत्स्यारम्भान् वा । २० ।

१२ अवर्षण पडल्यास शचीपती (इंद्र), गंगा, पर्वत व महाकच्छ यांची पूजा करवावी.

१३ रोगांच्या संकटाचे निवारण औपनिषदिक (चौदाव्या) अधिकरणात सांगितलेल्या गुप्त उपायांनी करावे, वैद्यांनी औषधांच्या द्वारा आणि सिद्ध तापसांनी शांतिकर्म व प्रायश्चित्तविधी यांच्या द्वारा (रोगनिवारण करावे). १४ असेच उपाय महामारीच्या साथीत करावेत. १५ शिवाय, तीर्थाच्या ठिकाणी अभिषेक करणे, महाकच्छाची पूजा करणे, स्मशानात गाईचे दूध काढणे, प्रतिमा करून जाळणे आणि रात्रभर देवांची प्रार्थना करणे या गोष्टी करावयास सांगावे.

१६ जनावरांत रोगराई पसरली तर त्यांचे गोठे व इतर वस्तू यांचा नीराजनविधी आणि त्यांच्या विशिष्ट देवतांची पूजा करावयास लावावे.

१७ दुष्काळ पडला असता राजाने बिया व धान्ये यांचा संग्रह करून प्रजाजनांना साहाय्य करावे, किंवा किल्ला अथवा बंधारा बांधण्याचे काम काढून त्यांच्या पोटापाण्याची सोय करावी, किंवा आपल्याजवळचे अन्नधान्य त्यांच्याबरोबर वाटून घ्यावे, किंवा आपला देश दुसऱ्या राजाकडे ठेव म्हणून ठेवावा. १८ किंवा मित्रराजांच्या आश्रयास जावे, किंवा प्रजेला परदेशात जावयास अथवा देशातच दुसरीकडे जाण्यास सांगावे. १९ किंवा जेथे धान्य पिकले आहे अशा दुसऱ्या प्रदेशात प्रजाजनांसह जावे, किंवा समुद्र, सरोवर, तलाव यांचा आश्रय घ्यावा. २० किंवा पाटबंधाऱ्यांच्या जागी धान्य, भाजीपाला, मुळे व फळे पेरण्याची व लावण्याची व्यवस्था करावी, किंवा हरीण पशू, पक्षी, हिंस्र प्राणी यांच्या शिकारीचे व मासे पकडण्याचे उद्योग सुरू करावेत.

**मूषिकभये मार्जारनकुलोत्सर्गः । २१ । तेषां ग्रहणहिंसायां द्वादशपणो दण्डः, शुनामनिग्रहे च अन्यत्रारण्यचरेभ्यः । २२ । स्नुहिक्षीरलिप्तानि धान्यानि विसृजेद्, उपनिषद्योगयुक्तानि वा । २३ । मूषिककरं वा प्रयुञ्जीत । २४ । शान्तिं वा सिद्धतापसाः कुर्युः । २५ । पर्वसु च मूषिकपूजाः कारयेत् । २६ । तेन शलभपक्षिक्रिमिभयप्रतीकारा व्याख्याताः । २७ ।**

**व्यालभये मदनरसयुक्तानि पशुशवानि प्रसृजेत्, मदनकोद्रवपूर्णान्यौदर्याणि वा । २८ । लुब्धकाः श्वगणिनो वा कूटपञ्जरावपातैश्चरेयुः । २९ । आवरणिनः शस्त्रपाणयो व्यालानभिहन्युः । ३० । अनभिसर्तुर्द्वादशपणो दण्डः । ३१ । स एव लाभो व्यालघातिनः । ३२ । पर्वसु च पर्वतपूजाः कारयेत् । ३३ । तेन मृगपशुपक्षिसंघग्राहप्रतीकारा व्याख्याताः । ३४ ।**

**सर्पभये मन्त्रैरोषधिभिश्च जाङ्गुलीविदश्चरेयुः । ३५ । संभूय वापि सर्पान्**

२१ उंदरांचा खूप उपद्रव झाल्यास मांजरे व मुंगूस मोकळे सोडावेत. २२ त्यांना (मांजर-मुंगुसांस) पकडल्यास अथवा मारल्यास बारा पण दंड करावा, तोच दंड अरण्यवासीयांच्या कुत्र्यांखेरीज इतर कुत्र्यांना न आवरल्यास करावा. २३ स्नुहि-वनस्पतीच्या चिकाने माखलेले अथवा गुह्य उपायांनी सिद्ध केलेले धान्य जिकडे तिकडे टाकावे. २४ किंवा उंदराच्या स्वरूपात कर बसवावा. २५ किंवा सिद्ध तापसांनी शांतिकर्म करावे. २६ आणि पर्वांच्या (अमावास्येच्या व पौर्णिमेच्या) दिवशी उंदरांची पूजा करावयास सांगावे. २७ असेच उपाय टोळ, पक्षी, किडे यांचा उपद्रव झाल्यास योजावेत.

२८ हिंस्र प्राण्यांचा उपद्रव झाल्यास मदनरसाने युक्त अशी जनावरांची प्रेते ठेवून द्यावीत किंवा मदनकोद्रवाने भरलेली जनावरांची आतडी (ठेवून द्यावीत). २९ फासेपारधी किंवा शिकारी कुत्रे बाळगणाऱ्यांनी झाकून ठेवलेले पिंजरे व खड्डे यांचा उपयोग करावा. ३० चिलखत घालून शस्त्रे धारण करणाऱ्यांनी हिंस्र प्राण्यांचा वध करावा. ३१ मदतीस धावून न जाणाऱ्याला बारा पण दंड करावा. ३२ तेवढेच बक्षीस हिंस्र प्राणी मारणाऱ्याला द्यावे. ३३ आणि पर्वांच्या दिवशी पर्वतांची पूजा करावयास सांगावे. ३४ तेच उपाय हरिणांचे किंवा पशूंचे कळप, पक्ष्यांचे थवे अथवा मगरी यांचा उपद्रव झाल्यास योजावेत.

३५ सापांचा उपद्रव झाल्यास सापाचे विष उतरविणाऱ्यांनी मंत्र व औषधे यांचा उपयोग करावा. ३६ किंवा मनुष्यांनी एकत्र येऊन सापांचा संहार

**हन्युः । ३६ । अथर्ववेदविदो वाऽभिचरेयुः । ३७ । पर्वसु च नागपूजाः कारयेत् । ३८ । तेनोदकप्राणिभयप्रतीकारा व्याख्याताः । ३९ ।**

**रक्षोभये रक्षोघ्नान्यथर्ववेदविदो मायायोगविदो वा कर्माणि कुर्युः । ४० । पर्वसु च वितर्दिच्छत्रोल्लोपिकाहस्तपताकाच्छागोपहारैश्चैत्यपूजाः कारयेत् । ४१ ।**

**'चरुं वश्चरामः' इत्येवं सर्वभयेष्वहोरात्रं चरेयुः । ४२ । सर्वत्र चोपहतान् पितेवानुगृह्णीयात् । ४३ ।**

**मायायोगविदस्तस्माद्विषये सिद्धतापसाः ।**
**वसेयुः पूजिता राज्ञा दैवापत्प्रतिकारिणः ।। ४४ ।।**

**इति कण्टकशोधने चतुर्थेऽधिकरणे उपनिपातप्रतीकारस्तृतीयोऽध्यायः । आदितः अशीतितमः ।**

४

## [ एकोनाशीतितमं प्रकरणम् – गूढाजीविनां रक्षा ]

**समाहर्तृप्रणिधौ जनपदरक्षणमुक्तम् । १ । तस्य कण्टकशोधनं वक्ष्यामः । २ ।**

करावा. ३७ किंवा अथर्ववेदातील उपचार जाणणाऱ्यांनी त्यातील मंत्रतंत्राचा उपयोग करावा. ३८ आणि पर्वांच्या दिवशी नागांची पूजा करावयास सांगावे. ३९ जलचर प्राण्यांचा उपद्रव झाल्यास हेच उपाय योजावेत.

४० भूतपिशाच्चांचा उपद्रव झाल्यास अथर्ववेद जाणणाऱ्यांनी अथवा मायेचा प्रयोग करणाऱ्यांनी भुते घालवून लावणारी कर्मे करावीत. ४१ आणि पर्वांच्या दिवशी स्थंडिल, छत्र, नैवेद्य, हस्तपताका व बकरे अर्पण करून चैत्यस्थानांची पूजा करावयास सांगावे.

४२ सर्व प्रकारच्या संकटांमध्ये "आम्ही तुम्हाला चरू अर्पण करतो" याप्रमाणे रात्रंदिवस मंत्र जपून बली अर्पण करावा. ४३ आणि सर्व प्रसंगी पीडलेल्या प्रजाजनांचे पित्याप्रमाणे पालन करावे.

४४ यास्तव दैवी आपत्तींचे निवारण करण्यास समर्थ असे मायेचा प्रयोग जाणणारे सिद्ध तापस यांना राजाने सन्मानपूर्वक वागणूक देऊन आपल्या राज्यात राहण्यास प्रवृत्त करावे.

## चौथा अध्याय

## प्रकरण ७९ : गूढ रीतीने उपजीविका करणाऱ्यांचा बंदोबस्त

१ समाहर्त्याविषयीच्या प्रकरणात (अध्याय २.३५) जनपदाचे रक्षण कसे करावे ते सांगितले आहे. २ आता तेथील कंटकांचा नाश कसा करावा ते सांगतो.

समाहर्ता जनपदे सिद्धतापसप्रव्रजितचक्रचरचारणकुहकप्रच्छन्दककार्तान्तिक-नैमित्तिकमौहूर्तिकचिकित्सकोन्मत्तमूकबधिरजडान्धवैदेहककारुशिल्पिकुशीलववेशशौण्डिकापूपिकपाक्वमांसिकौदनिकव्यञ्जनान् प्रणिदध्यात् । ३ । ते ग्रामाणामध्यक्षाणां च शौचाशौचं विद्युः । ४ । यं चात्र गूढाजीविनं शङ्केत तं सत्त्रिणापसर्पयेत् । ५ ।

धर्मस्थं विश्वासोपगतं सत्त्री ब्रूयात् – 'असौ मे बन्धुरभियुक्तः, तस्यायमनर्थः प्रतिक्रियताम्, अयं चार्थः प्रतिगृह्यताम्' इति । ६ । स चेत्तथा कुर्यादुपदाग्राहक इति प्रवास्येत । ७ । तेन प्रदेष्टारो व्याख्याताः । ८ ।

ग्रामकूटमध्यक्षं वा सत्त्री ब्रूयात् – 'असौ जाल्मः प्रभूतद्रव्यः, तस्यायमनर्थः, तेनैनमाहारयस्व' इति । ९ । स चेत्तथा कुर्यादुत्कोचक इति प्रवास्येत । १० ।

कृतकाभियुक्तो वा कूटसाक्षिणोऽभिज्ञातानर्थवैपुल्येनारभेत । ११ । ते चेत्तथा कुर्युः कूटसाक्षिण इति प्रवास्येरन् । १२ । तेन कूटश्रावणकारका व्याख्याताः । १३ ।

३ समाहर्त्याने जनपदामध्ये सिद्ध तापस, संन्यासी, गाडीवान, भाट, जादुगार, भटक्ये, भविष्य सांगणारे, शकुन उलगडणारे, ज्योतिषी, वैद्य, वेडे, मुके, बहिरे, खुळे, आंधळे, व्यापारी, कारागीर, कलाकार, नटनर्तकादी कुशीलव, वेश्यांच्या वस्तीत रहाणारे, दारूचे दुकानदार, चपात्या विकणारे, मांसाहार पुरविणारे व शाकाहार पुरविणारे यांच्या वेषात असणाऱ्या हेरांना कामावर ठेवावे. ४ त्यांनी गावातील लोकांची व सरकारी अध्यक्षांची वर्तणूक सचोटीची आहे की नाही त्याची माहिती काढावी. ५ आणि त्यांच्यापैकी गूढ रीतीने उपजीविका मिळवितो अशी ज्याच्याबद्दल शंका येत असेल त्याला गुप्त हेरामार्फत प्रलोभन दाखवून त्याच्या गुह्याचा छडा लावावा.

६ न्यायाधिशाचा विश्वास संपादन करून गुप्त हेराने त्याला म्हणावे, "माझ्या अमुक नातेवाइकावर फिर्याद झाली आहे, त्याच्यावरील हे संकट दूर करा आणि हे पैसे घ्या." ७ त्याने जर त्याप्रमाणे केले तर लाच घेणारा म्हणून त्याला हद्दपार करावे. ८ प्रदेष्ट्यांच्या संबंधातही अशीच उपाययोजना करावी.

९ गावाच्या मुख्याला अथवा अध्यक्षाला गुप्त हेराने म्हणावे, "अमुक अमुक दुष्ट माणसाकडे खूप धन आहे. तो अशा अशा संकटात सापडला आहे. त्याच्या निवारणार्थ त्याच्याकडून हवे तितके पैसे काढ." १० त्याने जर त्याप्रमाणे केले तर पैसे उकळणारा म्हणून त्याला हद्दपार करावे.

११ आपल्यावर फिर्याद झाली आहे अशी बतावणी करणाऱ्या गुप्त हेराने खोटी साक्ष देणारे म्हणून प्रसिद्ध असलेल्या इसमांना पुष्कळ द्रव्य देऊ करून

**यं वा मन्त्रयोगमूलकर्मभिः श्माशानिकैर्वा संवदनकारकं मन्येत तं सत्त्री ब्रूयात् – ' अमुष्य भार्यां स्नुषां दुहितरं वा कामये, सा मां प्रतिकामयताम्, अयं चार्थः प्रतिगृह्यताम् ' इति । १४ । स चेत्तथा कुर्यात् संवदनकारक इति प्रवास्येत । १५ । तेन कृत्याभिचारशीलौ व्याख्यातौ । १६ ।**

**यं वा रसस्य कर्तारं क्रेतारं विक्रेतारं भैषज्याहारव्यवहारिणं वा रसदं मन्येत तं सत्त्री ब्रूयात् – ' असौ मे शत्रुः, तस्योपघातः क्रियताम्, अयं चार्थः प्रतिगृह्यताम् ' इति । १७ । स चेत्तथा कुर्याद्रसद इति प्रवास्येत । १८ । तेन मदनयोगव्यवहारी व्याख्यातः । १९ ।**

**यं वा नानालोहक्षाराणाम् अङ्गारभस्त्रासंदंशमुष्टिकाधिकरणीबिम्बटङ्कमूषाणामभीक्ष्णक्रेतारं मषीभस्मधूमदिग्धहस्तवस्त्रलिङ्गं कर्मारोपकरणसंसर्गं कूटरूपकारक मन्येत तं सत्त्री शिष्यत्वेन संव्यवहारेण चानुप्रविश्य प्रज्ञापयेत् । २० ।**

आपल्या बाजूने खोटी साक्ष देण्यास सांगावे. १२ त्यांनी जर त्याप्रमाणे केले तर खोटी साक्ष देणारे म्हणून त्यांना हद्दपार करावे. १३ खोटी साक्ष देण्यास सांगणाऱ्यांच्या बाबतीतही असेच करावे.

१४ किंवा ज्याच्याबद्दल अशी शंका असेल की तो मंत्रांच्या प्रयोगाने, औषधी मुळ्यांची क्रिया करून अथवा स्मशानात कर्म करून स्त्रीचे प्रेम प्राप्त करून देण्याचा उद्योग करतो, त्याला गुप्त हेराने म्हणावे, " माझे अमक्याच्या पत्नीवर, सुनेवर किंवा मुलीवर प्रेम आहे. ती माझ्यावर उलट प्रेम करील असे कर. त्यासाठी हे पैसे घे. " १५ त्याने जर त्याप्रमाणे केले तर वशीकरणाचे प्रयोग करणारा म्हणून त्याला हद्दपार करावे. १६ जारणमारण करणारे व जादूटोणा करणारे यांच्याबाबतीतही अशीच उपाययोजना करावी.

१७ किंवा जर कोणा विष तयार करणाऱ्याबद्दल, ते विकत घेणाऱ्याबद्दल, ते विकणाऱ्याबद्दल, औषध किंवा आहार यांचा व्यवहार करणाऱ्याबद्दल असा संशय आला की तो विषप्रयोग करण्याचा उद्योग करतो तर गुप्त हेराने त्याला म्हणावे, " अमुक अमुक मनुष्य माझा शत्रू आहे. त्याचा घात कर आणि हे पैसे घे. " १८ त्याने जर त्याप्रमाणे केले तर विष देणारा म्हणून त्याला हद्दपार करावे. १९ मदनरसाचा प्रयोग करणाऱ्याच्या बाबतीतही हाच उपाय योजावा.

२० किंवा नाना प्रकारचे धातू व क्षार, कोळसे, भाते, सांडशी, चिमटे, ऐरणी, साचे, छन्या व मुशी ह्या गोष्टी जो नेहमी विकत घेतो, ज्याचे हात व वस्त्रे काजळी, राख व धूर यांनी माखले असल्याची चिन्हे आहेत आणि ज्याच्याजवळ लोहाराची हत्यारे आहेत तो मनुष्य खोटी नाणी पाडणारा असावा असा संशय आल्यास गुप्त हेराने शिष्यत्व पत्करून व उत्तम व्यवहार करून त्याचा

प्रज्ञातः कूटरूपकारक इति प्रवास्येत । २१ । तेन रागस्यापहर्ता कूटसुवर्णव्यवहारी च व्याख्यातः । २२ ।

आरब्धारस्तु हिंसायां गूढाजीवास्त्रयोदश ।
प्रवास्या निष्क्रयार्थं वा दद्युर्दोषविशेषतः ।। २३ ।।

इति कण्टकशोधने चतुर्थेऽधिकरणे गूढाजीविनां रक्षा चतुर्थोऽध्यायः । आदित एकाशीतितमः ।

५

[ अशीतितमं प्रकरणम् — सिद्धव्यञ्जनैर्माणवप्रकाशनम् ]

सत्त्रिप्रयोगादूर्ध्वं सिद्धव्यञ्जना माणवान्माणवविद्याभिः प्रलोभयेयुः, प्रस्वापनान्तर्धानद्वारापोहमन्त्रेण प्रतिरोधकान्, संवदनमन्त्रेण पारतल्पिकान् । १ ।

तेषां कृतोत्साहानां महान्तं संघमादाय रात्रावन्यं ग्राममुद्दिश्यान्यं ग्रामं कृतकस्त्रीपुरुषं गत्वा ब्रूयुः — ' इहैव विद्याप्रभावो दृश्यताम्, कृच्छ्रः परग्रामो गन्तुम् '

विश्वास संपादन करावा व त्याचे गुह्य उघडकीस आणावे. २१ तसे झाले म्हणजे खोटी नाणी पाडणारा म्हणून त्याला हद्दपार करावे. २२ मण्यांचे रंग (कृत्रिमपणे) पालटणारे व खोटया सोन्याचा व्यवहार करणारे यांच्या बाबतीतही हीच उपाययोजना करावी.

२३ परंतु हे तेरा प्रकारचे गूढ रीतीने उपजीविका करणारे मनुष्य जर हिंसा करण्यास प्रवृत्त झाले तर त्यांना हद्दपार करावे किंवा विशेष प्रकारच्या अपराधाला अनुसरून हद्दपारी रद्द करून घेण्यासाठी त्यांनी रक्कम दिली पाहिजे.

## पाचवा अध्याय

## प्रकरण ८० : साधूंच्या वेषातील हेरांच्या द्वारा गुन्हेगार उघडकीस आणणे

१ गुप्त हेरांच्या योजनेनंतर आपण सिद्ध पुरुष आहोत अशी बतावणी करणाऱ्या गूढ पुरुषांनी गुन्हेगार नेहमी उपयोग करू इच्छिणाऱ्या विद्यांच्या द्वारा त्यांच्यावर छाप पाडावी, इतरांना निद्रावश करणारे, अदृश्य करणारे, दारे उघडणारे अशा मंत्रांच्या द्वारा दरोडेखोरांवर आणि वशीकरण मंत्रांच्या द्वारा परस्त्रीगमन करणाऱ्यांवर.

२ (मंत्रांचा प्रभाव पाहण्यास) ते उत्कंठित झाले म्हणजे रात्री दरोडेखोरांची मोठी टोळी बरोबर घेऊन एका गावाला जायचे ठरवून ज्यातील स्त्रीपुरुषांना अगोदर पढवून ठेवले आहे अशा दुसऱ्याच गावाला जाऊन म्हणावे, " येथेच आमच्या विद्यांचा प्रभाव पहा. त्या दुसऱ्या गावाला जाणे कष्टाचे

इति । २ । ततो द्वारापोहमन्त्रेण द्वाराण्यपोह्य 'प्रविश्यताम्' इति ब्रूयुः । ३ । अन्तर्धानमन्त्रेण जाग्रतामारक्षिणां मध्येन माणवानतिक्रामयेयुः । ४ । प्रस्वापनमन्त्रेण प्रस्वापयित्वा रक्षिणः शय्याभिर्माणवैः संचारयेयुः । ५ । संवदनमन्त्रेण भार्याव्यञ्जनाः परेषां माणवैः संमोदयेयुः । ६ । उपलब्धविद्याप्रभावाणां पुरश्चरणाद्यादिशेयुः अभिज्ञानार्थम् । ७ । कृतलक्षणद्रव्येषु वा वेश्मसु कर्म कारयेयुः । ८ । अनुप्रविष्टा वैकत्र ग्राहयेयुः । ९ । कृतलक्षणद्रव्यक्रयविक्रयाधानेषु योगसुरामत्तान्वा ग्राहयेयुः । १० । गृहीतान् पूर्वापदानसहायाननुयुञ्जीत । ११ ।

पुराणचोरव्यञ्जना वा चोराननुप्रविष्टास्तथैव कर्म कारयेयुर्ग्राहयेयुश्च । १२ । गृहीतान् समाहर्ता पौरजानपदानां दर्शयेत् – 'चोरग्रहणीं विद्यामधीते राजा, तस्योपदेशादिमे चोरा गृहीताः, भूयश्च ग्रहीष्यामि, वारयितव्यो वः स्वजनः

आहे." ३ नंतर बंद दारे उघडणाऱ्या मंत्राने दरवाजे उघडून "चला आत" असे म्हणावे. ४ अदृश्य करणाऱ्या मंत्राने जागे असणाऱ्या पहारेकऱ्यांच्या मधून त्या गुन्हेगारांना पार करावे. ५ नंतर निद्रावश करणाऱ्या मंत्राने पहारेकऱ्यांना झोपी जावयास लावून त्यांच्या बिछान्यासह त्यांना गुन्हेगारांच्या हस्ते इकडेतिकडे हलवावे. ६ वशीकरण मंत्राच्या साह्याने परस्त्री म्हणून बतावणी करणाऱ्या (वेश्या) स्त्रियांशी गुन्हेगारांचा समागम घडवून आणावा. ७ त्यांना विद्यांच्या प्रभावाची खात्री पटली म्हणजे त्या सिद्ध हेरांनी त्यांना पुरश्चरण वगैरे क्रियाकर्म करावयास सांगावे, त्यांची ओळख पटावी ह्या उद्देशाने. ८ किंवा ज्या घरांतील वस्तूंवर खुणा केलेल्या आहेत त्या घरांत त्यांना (चोरीचे) काम करावयास सांगावे. ९ किंवा त्यांचा विश्वास संपादन करून त्यांना एके ठिकाणी पकडण्याची व्यवस्था करावी. १० खुणा केलेल्या वस्तू ते विकीत असता अथवा गहाण टाकीत असता किंवा गुंगी आणणाऱ्या द्रव्याने मिश्रित दारू पिऊन ते झिंगले असता त्यांना पकडण्याची व्यवस्था करावी. ११ त्यांना पकडले म्हणजे त्यांचे पूर्वीचे गुन्हे, त्यांचे मदतनीस यांचा तपास करावा.

१२ किंवा आपण फार जुने चोर आहोत अशी बतावणी करणाऱ्या गूढ पुरुषांनी चोरांचा विश्वास संपादन करून वरीलप्रमाणेच त्यांना चोरी करावयास लावावे व त्यावेळेस त्यांना पकडण्याची व्यवस्था करावी. १३ त्यांना पकडले म्हणजे समाहर्त्याने नगरवासी व जनपदनिवासी प्रजाजनांना दाखवून म्हणावे, "राजाने चोर पकडण्याच्या विद्येचे अध्ययन केले आहे, त्याने सांगितले त्याप्रमाणे वागूनच हे चोर पकडण्यात आले आहेत आणि यापुढेही मी आणखी पकडीन, तेव्हा कोणाचा नातेवाईक पापकर्म करीत असेल तर त्याला त्यापासून

पापाचारः ' इति । १३ । यं चात्रापसर्पोपदेशेन शम्याप्रतोदादीनामपहर्तारं जानीयात् तमेषां प्रत्यादिशेत् ' एष राज्ञः प्रभावः ' इति । १४ ।

पुराणचोरगोपालकव्याधश्वगणिनश्च वनचोराटविकाननुप्रविष्टाः प्रभूतकूट-हिरण्यकुप्यभाण्डेषु सार्थव्रजग्रामेष्वेनानभियोजयेयुः । १५ । अभियोगे गूढबलैर्घातयेयुः, मदनरसयुक्तेन वा पथ्यदनेन । १६ । गृहीतलोप्त्रभारानायतगत-परिश्रान्तान् प्रस्वपतः प्रहवणेषु योगसुरामत्तान्वा ग्राहयेयुः । १७ ।

पूर्ववच्च गृहीत्वनान् समाहर्ता प्ररूपयेत् ।
सर्वज्ञख्यापनं राज्ञः कारयन् राष्ट्रवासिषु ।। १८ ।।

इति कण्टकशोधने चतुर्थेऽधिकरणे सिद्धव्यञ्जननैर्माणवप्रकाशनम् पञ्चमोऽध्यायः । आदितो व्यशीतितमः ।

६

## [ एकाशीतितमं प्रकरणम् – शङ्कारूपकर्माभिग्रहः ]

सिद्धप्रयोगादूर्ध्वं शङ्कारूपकर्माभिग्रहः । १ ।

परावृत्त करा." १४ आणि जर गुप्त हेरांच्या द्वारा असे कळून आले की, अमुक माणसाने ह्या ठिकाणी जूचा खुंटा, चाबूक इत्यादी वस्तू पळविल्या आहेत तर समाहर्त्याने लोकांना म्हणावे, " (ह्यांना पकडले) हा राजाचा प्रभाव."

१५ पूर्वी चोर असलेले, गुराखी, फासेपारधी आणि कुत्र्यांनी शिकार करणारे यांनी रानातील चोर व रानटी टोळ्या यांचा विश्वास संपादन करून त्यांना खोट्या सोन्याचे व हलक्या किमतीचे खूप पदार्थ असलेल्या व्यापारी तांड्यावर, गुरांच्या कळपावर अथवा गावावर हल्ला करण्यास प्रवृत्त करावे. १६ त्यांनी हल्ला केला म्हणजे लपवून ठेवलेल्या सैनिकांच्या द्वारा त्यांचा घात करावा किंवा मदनरसाने मिश्रित वाटेवरच्या शिदोरीने (त्यांचा मृत्यू घडवून आणावा). १७ किंवा चोरलेल्या मालाचे बोजे घेऊन जात असता, दूरच्या प्रवासाने थकले म्हणून झोपले असता किंवा समारंभांच्या प्रसंगी गुंगी आणणाऱ्या द्रव्याने मिश्रित दारू पिऊन झिंगले असता त्यांना पकडण्याची व्यवस्था करावी.

१८ आणि त्यांना पकडल्यावर समाहर्त्याने वरीलप्रमाणेच राष्ट्रातील लोकांमध्ये राजाचे सर्वज्ञत्व प्रसिद्ध करण्यासाठी त्यांना लोकांच्या नजरेस आणावे.

## सहावा अध्याय

### प्रकरण ८१: संशयावरून, जवळ माल सापडल्यावरून आणि गुन्ह्याच्या खाणाखुणांवरून करावयाची अटक

१ सिद्ध पुरुषांच्या प्रयोगाच्या वर्णनानंतर आता संशयावरून, (सापडलेल्या) मालावरून व गुन्ह्यांच्या खाणाखुणांवरून करावयाच्या अटकेसंबंधी.

**क्षीणदायकुटुम्बम्, अल्पनिर्वेशं, विपरीतदेशजातिगोत्रनामकर्मापदेशं, प्रच्छन्नवृत्तिकर्माणं, मांससुराभक्ष्यभोजनगन्धमाल्यवस्त्रविभूषणेषु प्रसक्तम्, अतिव्ययकर्तारं, पुंश्चलीद्यूतशौण्डिकेषु प्रसक्तम्, अभीक्ष्णप्रवासिनम्, अविज्ञातस्थानगमनम्, एकान्तारण्यनिष्कुटविकालचारिणं, प्रच्छन्ने सामिषे वा देशे बहुमन्त्रसंनिपातं, सद्यःक्षतव्रणानां गूढप्रतीकारकारयितारम्, अन्तर्गृहनित्यम्, अभ्यधिगन्तारं, कान्तापरं, परपरिग्रहाणां परस्त्रीद्रव्यवेश्मनामभीक्ष्णप्रष्टारं, कुत्सितकर्मशास्त्रोपकरणसंसर्गं, विरात्रे छन्नकुडयच्छायासंचारिणं विरूपद्रव्याणामदेशकालविक्रेतारं, जातवैराशयं, हीनकर्मजातिं विगूहमानरूपं, लिङ्गेनालिङ्गिनं, लिङ्गिनं वा भिन्नाचारं, पूर्वकृतापदानं, स्वकर्मभिरपदिष्टं, नागरिकमहामात्रदर्शने गूह-**

२ ज्याची वडिलोपार्जित संपत्ती संपुष्टात आली आहे अथवा ज्याच्या कुटुंबाचे उत्पन्न घटले आहे, ज्याचा पगार अगदी थोडा आहे, जो आपला देश, जात, गोत्र, नाव आणि कामधंदा खोटेच सांगतो, ज्याचे उपजीविकेचे साधन आणि व्यवसाय गुप्त आहेत, ज्याला मांस, मद्य, चैनीचे खाणेपिणे, सुगंधी पदार्थ, फुले, उंची कपडे, दागिने यांची चटक लागली आहे, जो भरमसाट खर्च करतो, वेश्या, जुगार अथवा दारू यांचे ज्याला व्यसन जडले आहे, जो वारंवार प्रवास करीत असतो, ज्याचे राहणे व जाणे माहीत होत नाही, जो एकांतात, अरण्यात अथवा बागेत भलत्याच वेळी भटकतो, जो गुप्त ठिकाणी अथवा सावज मिळेल अशा ठिकाणी खूप वेळ मसलत करतो अथवा भेटीगाठी घेतो, नुकत्याच झालेल्या जखमांवर जो गुप्तपणे उपचार करून घेतो, जो नेहमी घरात दडून बसलेला असतो, जो लपून छपून जातो, जो स्त्रीलंपट आहे, दुसऱ्यांच्या वस्तूंविषयी — परस्त्री, दुसऱ्याचे द्रव्य अथवा दुसऱ्याचे घर याविषयी — जो वारंवार चौकशी करतो, ज्याच्याजवळ गर्हणीय धंद्याची अथवा (जादुटोण्यासारख्या) विद्येची साधने आहेत, जो अपरात्री भिंतीच्या सावलीत लपतछपत संचार करतो, जो रूप बदललेल्या पदार्थांची भलत्याच ठिकाणी व भलत्याच वेळेला विक्री करतो, ज्याने कोणावर वैर धरले आहे, हीन व्यवसायाचा अथवा जातीचा असून ज्याने आपले रूप पालटले आहे, संन्यासी नसता ज्याने (कषायवस्त्रादी) चिन्हे धारण केली आहेत, किंवा संन्यासी असता ज्याची वागणूक निराळ्याच प्रकारची आहे, पूर्वी ज्याने गुन्हा केला आहे, त्यावेळी तो करीत असलेल्या त्याच्या कृत्यांमुळे ज्याचा गुन्हा शाबीत होतो, नगराध्यक्ष किंवा मोठा अधिकारी दिसताच जो लपून राहतो, पळून जातो, श्वास न घेता बसून राहतो, कावराबावरा होतो अथवा ज्याचा घसा कोरडा होऊन आवाज बदलतो व चेहरा पांढराफटक पडतो, शस्त्रे हातात घेतलेल्या माणसांच्या घोळक्याने जो भयभीत होतो, — असा मनुष्य

मानमपसरन्तमनुच्छ्वासोपवेशिनमाविग्नं शुष्कभिन्नस्वरमुखवर्णं, शस्त्रहस्त-मनुष्यसंपातत्रासिनं, हिंस्रस्तेननिधिनिक्षेपापहारपरप्रयोगगूढाजीविनामन्यतमं शङ्केत । २ । इति शङ्काभिग्रहः ।

रूपाभिग्रहस्तु — नष्टापहृतमविद्यमानं तज्जातव्यवहारिषु निवेदयेत् । ३ । तच्चेन्निवेदितमासाद्य प्रच्छादयेयुः साचिव्यकरदोषमाप्नुयुः । ४ । अजानन्तोऽस्य द्रव्यस्यातिसर्गेण मुच्येरन् । ५ । न चानिवेद्य संस्थाध्यक्षस्य पुराणभाण्डानामाधानं विक्रयं वा कुर्युः । ६ ।

तच्चेन्निवेदितमासाद्येत, रूपाभिगृहीतमागमं पृच्छेत् 'कुतस्ते लब्धम्' इति । ७ । स चेद् ब्रूयात् 'दायाद्यादवाप्तम्, अमुष्माल्लब्धम् क्रीतं कारितम् आधि-प्रच्छन्नम्, अयमस्य देशः कालश्चोपसंप्राप्तेः, अयमस्यार्घः प्रमाणं लक्षणं मूल्यं च' इति, तस्यागमसमाधौ मुच्येत । ८ । नाष्टिकश्चेत्तदेव प्रतिसंदध्यात्, यस्य पूर्वो दीर्घश्च परिभोगः शुचिर्वा देशस्तस्य द्रव्यमिति विद्यात् । ९ । चतुष्पदद्विपदा-

हिंसा करणारा, चोर, भूमिगत धन अथवा ठेव यांचा अपहार करणारा, शत्रूने कामगिरी सांगितलेला, गूढ रीतीने उपजीविका मिळविणारा यांपैकी आहे असा संशय घ्यावा. हा झाला संशयावरून अटकेचा विषय.

३ परंतु माल मिळाल्यामुळे करावयाच्या अटकेसंबंधी — नाहीशी झालेली किंवा चोरीस गेलेली वस्तू सापडली नाही तर त्या वस्तूंचा व्यवहार करणाऱ्या व्यापाऱ्यांना कळवावे. ४ त्यांनी जर ती सांगितलेली वस्तू मिळाली तरी लपवून ठेवली तर (चोरीला) साह्य करणारे म्हणून त्यांना अपराधी ठरवावे. ५ जर (ती चोरलेली आहे हे) त्यांना माहीत नसेल तर ती वस्तु परत केल्याने त्यांची सुटका व्हावी. ६ आणि संस्थाध्यक्षाला कळविल्याशिवाय त्यांनी जुन्या वस्तू गहाण ठेवता किंवा विकता कामा नये.

७ जर ती सांगितलेली वस्तू सापडली तर ज्याला मालासह पकडले त्याला त्याच्या प्राप्तीसंबंधाने विचारावे, "तुला ही वस्तू कोठून मिळाली ?" ८ तो जर म्हणाला, "मला ही वारसाहक्काने मिळाली आहे अथवा अमक्यापासून दान म्हणून मिळाली आहे, अमक्यापासून विकत घेतली आहे, अमक्याकडून करून घेतली आहे, अमक्याने गुप्तपणे गहाण म्हणून ठेवली आहे, ती मला प्राप्त होण्याचे हे ठिकाण व ही वेळ, तिचा हा इतका भाव, हे इतके प्रमाण, ही अमुक अमुक चिन्हे व ही इतकी किमत," तर तिच्या प्राप्तीविषयीचे त्याचे म्हणणे खरे ठरल्यास त्याला सोडून द्यावे. ९ ज्याची वस्तू हरवली त्यानेसुद्धा तेच सिद्ध केले तर ज्याच्या ताब्यात ती वस्तू अगोदरपासून आणि दीर्घकालपर्यंत होती किंवा ज्याचा पुरावा निःसंदिग्ध असेल त्याची ती वस्तू असे ठरवावे. १० कारण,

**नामपि हि रूपलिङ्गसामान्यं भवति, किमङ्ग पुनरेकयोनिद्रव्यकर्तृप्रसूतानां कुप्याभरणभाण्डानामिति । १० ।**

**स चेद्ब्रूयात् 'याचितकमवक्रीतकमाहितकं निक्षेपमुपनिधिं वैयावृत्यकर्म वाऽमुष्य' इति, तस्यापसारप्रतिसंधानेन मुच्येत । ११ । 'नैवम्' इत्यपसारो वा ब्रूयात्, रूपाभिगृहीतः परस्य दानकारणमात्मनः प्रतिग्रहकारणमुपलिङ्गनं वा दायकदापकनिबन्धकप्रतिग्राहकोपद्रष्टृभिरुपश्रोतृभिर्वा प्रतिसमानयेत् । १२ ।**

**उज्झितप्रनष्टनिष्पतितोपलब्धस्य देशकाललाभोपलिङ्गनेन शुद्धिः । १३ । अशुद्धस्तच्च तावच्च दण्डं दद्यात् । १४ । अन्यथा स्तेयदण्डं भजेत । १५ । इति रूपाभिग्रहः ।**

**कर्माभिग्रहस्तु – मुषितवेश्मनः प्रवेशनिष्कसनमद्वारेण, द्वारस्य संधिना बीजेन वा वेधम्, उत्तमागारस्य जालवातायननीप्रवेधम्, आरोहणावतरणे च कुडयस्य**

चतुष्पाद व द्विपाद प्राण्यांचीही रूपे व खाणाखुणा एकसारख्या असतात, मग एकाच ठिकाणच्या व एकाच प्रकारच्या पदार्थांपासून एकाच कारागिराने बनविलेल्या जंगलातील वस्तूंची व दागदागिन्यांची गोष्ट कशाला ?

११ तो जर म्हणाला, "अमक्यापासून मी उसनी आणली आहे, भाडयाने घेतली आहे, गहाण घेतली आहे, अमक्याचा निक्षेप आहे, अमक्याची ठेव आहे, अमक्याने विक्री करण्यासाठी मजजवळ दिली आहे," तर त्याच्या म्हणण्याला दुजोरा देणाऱ्याने त्याचे निरपराधित्व सिद्ध केल्यास त्याला सोडून द्यावे. १२ "हे खरे नाही" असे जर तो मनुष्य म्हणाला तर ज्याच्याजवळ ती वस्तू सापडली त्याने दुसऱ्याने आपल्याला ती वस्तू का दिली याचे कारण व आपण ती का घेतली त्याचे कारण सिद्ध करावे अथवा देणारा, देवविणारा, लिहून ठेवणारा, घेणारा, तो व्यवहार पहाणारा व ऐकणारा यांच्यामार्फत आपल्या म्हणण्याला पुष्टी मिळवावी.

१३ सोडून दिलेली, नाहिशी झालेली अथवा पळून गेलेली वस्तू मिळाली असता, देश, काल, प्राप्तीचा मार्ग यांच्या बाबतीत खातरजमा करून दिली तर अपराध नाही असे समजावे. १४ जर तसे न करता आल्यामुळे अपराधी ठरला तर त्याने ती सोडून देऊन तितकाच दंड दिला पाहिजे. १५ नाही तर त्याला चोरीबद्दलचा दंड द्यावा लागेल. हा झाला माल सापडल्यामुळे होणाऱ्या अटकेचा विषय.

१६ परंतु गुन्ह्याच्या खाणाखुणांवरून करावयाच्या अटकेसंबंधी – ज्या घरात चोरी झाली आहे त्या घरात दरवाजापेक्षा अन्य प्रकारे आत जाणे किंवा बाहेर येणे, दरवाजाला भोक पाडणे किंवा तो उपटणे, वरच्या मजल्यावरच्या

**वेधम्, उपखननं वा गूढद्रव्यनिक्षेपणग्रहणोपायम्, उपदेशोपलभ्यम् अभ्यन्तरच्छेदोत्करपरिमर्दोपकरणम् अभ्यन्तरकृतं विद्यात् । १६ । विपर्यये बाह्यकृतम्, उभयत उभयकृतम् । १७ । अभ्यन्तरकृते पुरुषमासन्नं व्यसनिनं क्रूरसहायं तस्करोपकरणसंसर्गं, स्त्रियं वा दरिद्रकुलामन्यप्रसक्तां वा, परिचारकजनं वा तद्विधाचारम्, अतिस्वप्नं, निद्राक्लान्तम्, आविग्नं, शुष्कभिन्नस्वरमुखवर्णम्, अनवस्थितम्, अतिप्रलापिनम्, उच्चारोहणसंरब्धगात्रं, विलूननिघृष्टभिन्नपाटितशरीरवस्त्रं, जातकिणसंरब्धहस्तपादं, पांसुपूर्णकेशनखं विलूनभुग्नकेशनखं वा, सम्यक्स्नातानुलिप्तं तैलप्रमृष्टगात्रं सद्योधौतहस्तपादं वा, पांसुपिच्छिलेषु तुल्यपादपदनिक्षेपं, प्रवेशनिष्कसनयोर्वा तुल्यमाल्यमद्यगन्धवस्त्रच्छेदविलेपनस्वेदं परीक्षेत । १८ । चोरं पारदारिकं वा विद्यात् । १९ ।**

जाळीच्या खिडक्यांना अथवा झडपांना भोक पाडणे, चढण्यामुळे व उतरण्यामुळे भिंत ढासळणे, गुप्तपणे पदार्थ पुरण्यासाठी अथवा पुरलेला काढून घेण्यासाठी जमीन खणणे, या सर्व गोष्टी घरातील आतल्या बाजूने केल्या आहेत असे समजावे, जर माहितगार माणसाचा त्यात हात असण्याचा संभव असेल तर, (आणि) मोडतोड, कचरा, पाडापाड व ती करण्याची हत्यारे आतल्या बाजूला असतील तर. १७ याच्या उलट, त्या घराच्या बाहेरून केल्या आहेत असे आणि घराच्या दोन्ही बाजूला असल्यास दोन्ही बाजूंनी केल्या आहेत असे समजावे. १८ आतल्या बाजूने गुन्हा झाला असल्यास जो जवळचा पुरुष व्यसनी, क्रूर माणसांच्या संगतीत व चोरीची हत्यारे जवळ बाळगून असेल त्याचा, किंवा जी स्त्री दरिद्री कुलातून आली असेल अथवा दुसऱ्याच्या प्रेमात पडली असेल तिचा, किंवा सेवकवर्गापैकी जो याच प्रकारचा (व्यसनी वगैरे) असेल त्याचा, खूप झोपला असेल, झोपेने घेरला असेल, गडबडून गेला असेल, घसा कोरडा पडून आवाज बदलला असेल व तोंड पांढरेफटक पडले असेल, स्वस्थ राहू शकत नसेल, खूप वडवड करीत असेल, वर चढण्यामुळे ज्याचे अवयव भरून आले असतील, ज्याचे शरीर व कपडे कापले गेले, घासले गेले, तुटले अथवा फाटले असतील, ज्याच्या हातापायांना घट्टे पडले असतील अथवा ते जड झाले असतील, ज्याचे केस व नख धुळीने भरले असतील अथवा केस व नख कापले गेले किंवा तुटले असतील, ज्याने छानपैकी स्नान करून अंगाला सुगंधी द्रव्ये लावली आहेत, तेलाने अंगाचे मर्दन केले आहे अथवा हातपाय नुकतेच धुतले आहेत, धुळीत अथवा चिखलात उमटलेल्या पावलांसारखीच ज्याची पावले आहेत, किंवा आत व बाहेर जाण्याच्या ठिकाणांच्या प्रमाणेच ज्याच्याकडे फुले, मद्य, सुगंधी द्रव्य (यांचा वास), तुटलेले वस्त्र, उटणे व

सगोपस्थानिको बाह्यं प्रदेष्टा चोरमार्गणम् ।
कुर्यान्नागरिकश्चान्तर्दुर्गे निर्दिष्टहेतुभिः ।। २० ।।

इति कण्टकशोधने चतुर्थेऽधिकरणे शङ्कारूपकर्माभिग्रहः षष्ठोऽध्यायः । आदितस्त्र्यशीतितमः ।

७

[ त्र्यशीतितमं प्रकरणम् – आशुमृतकपरीक्षा ]

तैलाभ्यक्तमाशुमृतकं परीक्षेत । १ ।

निष्कीर्णमूत्रपुरीषं वातपूर्णकोष्ठत्वक्कं शूनपादपाणिमुन्मीलिताक्षं सव्यञ्जनकण्ठं पीडननिरुद्धोच्छ्वासहतं विद्यात् । २ । तमेव संकुचितबाहुसक्थिमुद्बन्धहतं विद्यात् । ३ ।

शूनपाणिपादोदरमपगताक्षमुद्वृत्तनाभिमवरोपितं विद्यात् । ४ ।
निस्तब्धगुदाक्षं संदष्टजिह्वमाध्मातोदरमुदकहतं विद्यात् । ५ ।
शोणितानुसिक्तं भग्नभिन्नगात्रं काष्ठैरश्मभिर्वा हतं विद्यात् । ६ ।

घाम (यांचा वास) आढळून येतील – त्यांचा तपास करावा. १९ असा मनुष्य चोर किंवा व्यभिचारी आहे असे समजावे.

२० गोप व स्थानिक यांच्या साहचाने दुर्गा बाहेरच्या प्रदेशात प्रदेष्टचाने आणि दुर्गाच्या आत नागरिकाने वर सांगितलेल्या कारणांवरून चोरांचा शोध करावा.

## सातवा अध्याय

### प्रकरण ८२ : अकस्मात मेलेल्या मनुष्याची चौकशी

१ अकस्मात मेलेल्या मनुष्याच्या शरीराला तेल चोपडून तपासणी करावी.

२ मल व मूत्र बाहेर टाकले गेले असतील, कोठचाचे कातडे वाताने भरले असेल, हातपाय सुजले असतील, डोळे उघडे असतील, गळचावर काही खूण असेल तर गळा दाबल्यामुळे श्वास कोंडून मारले आहे असे समजावे. ३ तीच चिन्हे असून शिवाय बाहू व मांडचा आखडल्या असतील तर टांगून मारले आहे असे समजावे.

४ हात, पाय व पोट सुजले असतील, डोळे खोल गेले असतील, बेंबी फुगून आली असेल तर सुळावर चढविले होते असे समजावे.

५ गुदद्वार व डोळे बंद झाले असतील, जीभ चावली गेली असेल, पोट फुगून आले असेल तर पाण्यात बुडवून मारले आहे असे समजावे.

६ शरीर रक्ताने माखले असेल, अवयव मोडले किंवा तुटले असतील तर काठचांनी किंवा दगडाधोंडचांनी मारले आहे असे समजावे.

**संभग्नस्फुटितगात्रमवक्षिप्तं विद्यात् । ७ ।**

**श्यावपाणिपाददन्तनखं शिथिलमांसरोमचर्माणं फेनोपदिग्धमुखं विषहतं विद्यात् । ८ । तमेव सशोणितदंशं सर्पकीटहतं विद्यात् । ९ ।**

**विक्षिप्तवस्त्रगात्रमतिवान्तविरिक्तं मदनयोगहतं विद्यात् । १० ।**

**अतोऽन्यतमेन कारणेन हतं हत्वा वा दण्डभयादुद्बद्धनिकृत्तकण्ठं विद्यात् ।११।**

**विषहतस्य भोजनशेषं वयोभिः परीक्षेत । १२ । हृदयादुद्धृत्याग्नौ प्रक्षिप्तं चिटिचिटायदिन्द्रधनुर्वर्णं वा विषयुक्तं विद्यात्, दग्धस्य हृदयमदग्धं दृष्ट्वा वा । १३ ।**

**तस्य परिचारकजनं वाग्दण्डपारुष्यातिलब्धं मार्गेत, दुःखोपहतमन्यप्रसक्तं वा स्त्रीजनम्, दायवृत्तिस्त्रीजनाभिमन्तारं वा बन्धुम् ।१४। तदेव हतोद्बद्धस्य परीक्षेत । १५ । स्वयमुद्बद्धस्य वा विप्रकारमयुक्तं मार्गेत । १६ ।**

७ अवयव छिन्नविच्छिन्न झाले असतील तर वरून खाली फेकले आहे असे समजावे.

८ हात, पाय, दात व नखे काळे पडले असतील, मांस, शरीरावरचे केस व कातडे शिथिल पडले असतील, तोंड फेसाने माखले असेल, तर विषाने मृत्यू आला असे समजावे. ९ हेच सगळे असून शिवाय रक्ताळलेली दंशाची खूण असेल तर साप किंवा विषारी कीटक यांच्यामुळे मृत्यू आला असे समजावे.

१० कपडे व अवयव अस्ताव्यस्त झाले असतील, खूप उलटचा व झाडे झाले असतील तर मदनरसाच्या प्रयोगाने मृत्यू आला असे समजावे.

११ यांच्यापैकी कोणत्या तरी प्रकारे मारले आहे किंवा तसे मारल्यावर शिक्षेच्या भयाने टांगण्यात आले आहे किंवा गळा कापण्यात आला आहे असे समजावे.

१२ विषप्रयोगाने मेलेल्याच्या उरलेल्या अन्नाची पक्ष्यांमार्फत परीक्षा करावी. १३ हृदयापासून काढलेले मांस अग्नीत टाकले असता चिटचिट आवाज आला अथवा इंद्रधनुष्याचे रंग दिसले, तर ते विषयुक्त होते असे समजावे, किंवा त्याला जाळले असता त्याचे हृदय जळले नसेल तर (विषाने मृत्यू आला असे समजावे).

१४ मृताने खूप वाक्ताडन केलेल्या अथवा देहदंड दिलेल्या नोकराचा तपास करावा, दुःखाने गांजलेल्या अथवा परपुरुषावर आसक्त असलेल्या स्त्रीचा किंवा वडिलोपार्जित मिळकत, उपजीविका अथवा स्त्री यांचा अभिलाष करणाऱ्या बांधवाचा (तपास करावा). १५ खून करून टांगलेल्या मनुष्याच्या बाबतीतही

**सर्वेषां वा स्त्रीदायाद्यदोषः कर्मस्पर्धा प्रतिपक्षद्वेषः पण्यसंस्थासमवायो वा विवादपदानामन्यतमद्वा रोषस्थानम् । १७ । रोषनिमित्तो घातः । १८ ।**

**स्वयमादिष्टपुरुषैर्वा, चोरैरर्थनिमित्तं, सादृश्यादन्यवैरिभिर्वा हतस्य घातमासन्नेभ्यः परीक्षेत । १९ । येनाहूतः सह स्थितः प्रस्थितो हतभूमिमानीतो वा तमनुयुञ्जीत । २० । ये चास्य हतभूमावासन्नचरास्तानेकैकशः पृच्छेत् ' केनायमिहानीतो हतो वा, कः सशस्त्रः संगूहमान उद्विग्नो वा युष्माभिर्दृष्टः ' इति । २१ । ते यथा ब्रूयुस्तथाऽनुयुञ्जीत । २२ ।**

**अनाथस्य शरीरस्थमुपभोगं परिच्छदम् ।**
**वस्त्रं वेषं विभूषां वा दृष्ट्वा तद्व्यवहारिणः ।। २३ ।।**
**अनुयुञ्जीत संयोगं निवासं वासकारणम् ।**
**कर्म च व्यवहारं च ततो मार्गणमाचरेत् ।। २४ ।।**

असाच तपास करावा. १६ स्वतः गळफास लावून घेतलेल्याच्या संबंधात कोणी त्याला त्याचा दोष नसता वाईट रीतीने वागविले होते काय याचा तपास करावा.

१७ अथवा सर्वांच्या बाबतीत स्त्री किंवा वारसा याबद्दलचा अपराध, धंद्यातील स्पर्धा, प्रतिस्पर्ध्याचा द्वेष, बाजारपेठेतील भागिदारी किंवा दावा करण्याच्या कारणांपैकी कोणतेही एक, ही रोषास निमित्त होतात. १८ आणि रोषामुळे खून होतो.

१९ स्वतः किंवा मारेकऱ्यांमार्फत, चोरांनी पैशासाठी, सादृश्यामुळे दुसऱ्याच कोणाच्या शत्रूंनी ज्याचा खून केला असेल त्याच्या खुनाची चौकशी त्याच्या जवळच्या माणसांकडे करावी. २० ज्याने त्याला बोलावले असेल, ज्याच्याबरोबर तो राहिला असेल, ज्याच्याबरोबर तो गेला असेल अथवा ज्याने त्याला खुनाच्या जागी आणला असेल त्याच्याकडे चौकशी करावी. २१ आणि खुनाच्या जागी त्याच्या अगदी जवळ जे असतील त्यांच्यापैकी प्रत्येकाला स्वतंत्रपणे विचारावे, " कोणी त्याला येथे आणले अथवा मारले ? तुम्हाला कोणी सशस्त्र मनुष्य किंवा लपून असलेला किंवा घाबरलेला मनुष्य दिसला का ? " २२ ते जसे सांगतील त्याप्रमाणे पुढील तपास करावा.

२३–२४ मृत मनुष्याच्या शरीरावरील वापरण्यात असलेल्या वस्तू, त्याचे सामान, कपडे, वेष, भूषणे इत्यादी पाहून त्या पदार्थांचा व्यवहार करणाऱ्या माणसांना त्याची झालेली भेट, त्यांचे राहण्याचे ठिकाण, तेथे राहण्याचे कारण, कामधंदा व व्यवहार यासंबंधी विचारावे आणि त्याला अनुसरून पुढील तपास करावा.

रज्जुशस्त्रविषैर्वाऽपि कामक्रोधवशेन यः ।
घातयेत्स्वयमात्मानं स्त्री वा पापेन मोहिता ।। २५ ।।
रज्जुना राजमार्गे तांश्चण्डालेनापकर्षयेत् ।
न श्मशानविधिस्तेषां न संबन्धिक्रियास्तथा ।। २६ ।।
बन्धुस्तेषां तु यः कुर्यात्प्रेतकार्यक्रियाविधिम् ।
तद्गतिं स चरेत्पश्चात्स्वजनाद्वा प्रमुच्यते ।। २७ ।।
संवत्सरेण पतति पतितेन समाचरन् ।
याजनाध्यापनाद्यौनात्तैश्चान्योऽपि समाचरन् ।। २८ ।।

इति कण्टकशोधने चतुर्थेऽधिकरणे आशुमृतकपरीक्षा सप्तमोऽध्यायः । आदितश्चतुरशीतितमः ।

८

[ त्र्यशीतितमं प्रकरणम् – वाक्यकर्मानुयोगः ]

मुषितसंनिधौ बाह्यानामभ्यन्तराणां च साक्षिणामभिशस्तस्य देशजातिगोत्रनामकर्मसारसहायनिवासाननुयुञ्जीत । १ । तांश्चापदेशैः प्रतिसमानयेत् । २ । ततः

२५–२६ कामवश अथवा क्रोधवश होऊन जो दोर, शस्त्र अथवा विष यांनी आत्महत्या करील किंवा जी स्त्री पापाने मोहित होऊन (तसे करील), त्यांना राजमार्गावर चंडालाच्या मार्फत दोराने ओढीत न्यावयास लावावे. त्यांच्या बाबतीत स्मशानातील अंत्यविधी तसेच बांधवांनी करावयाची उत्तरक्रिया करू देऊ नये.

२७ परंतु जो कोणी त्यांचा बांधव त्यांचा अंत्यसंस्कार व उत्तरक्रिया करील त्याचीही नंतर तीच स्थिती होईल आणि इतर बांधवांकडून बहिष्कृत होईल असे करावे.

२८ बहिष्कृत झालेल्या मनुष्याबरोबर याजन, अध्यापन व विवाह हे व्यवहार करणारा स्वतः एक वर्षाने पतित होतो, आणि त्यांच्याशी व्यवहार करणारा दुसरा सुद्धा पतित होतो.

## आठवा अध्याय

## प्रकरण ८३ : तोंडी जबानी घेऊन व छळणूक करून करावयाचा तपास

१ ज्याची चोरी झाली असेल त्याच्या समक्ष आणि बाहेरच्या व आतल्या साक्षिदारांच्या समक्ष चोरीचा आळ घेतलेल्या मनुष्याला त्याचा देश, जात, गोत्र, नाव, धंदा, संपत्ती, मदतनीस, राहण्याचे ठिकाण याविषयी विचारावे:

पूर्वस्याह्नः प्रचारं रात्रौ निवासं चा ग्रहणादित्यनुयुञ्जीत । ३ । तस्यापसारप्रतिसंधाने शुद्धः स्यात्, अन्यथा कर्मप्राप्तः । ४ ।

त्रिरात्रादूर्ध्वमग्राह्यः शङ्कितकः पृच्छाभावाद् अन्यत्रोपकरणदर्शनात् । ५ ।

अचोरं चोर इत्यभिव्याहरतश्चोरसमो दण्डः, चोरं प्रच्छादयतश्च । ६ । चोरेणाभिशस्तो वैरद्वेषाभ्यामपदिष्टकः शुद्धः स्यात् । ७ । शुद्धं परिवासयतः पूर्वः साहसदण्डः । ८ ।

शङ्कानिष्पन्नमुपकरणमन्त्रिसहायरूपवैयावृत्यकरान् निष्पादयेत् । ९ । कर्मणश्च प्रवेशद्रव्यादानांशविभागैः प्रतिसमानयेत् । १० । एतेषां कारणानामनभिसंधाने विप्रलपन्तमचोरं विद्यात् । ११ । दृश्यते ह्यचोरोऽपि चोरमार्गे यदृच्छया संनिपाते चोरवेषशस्त्रभाण्डसामान्येन गृह्यमाणश्चोरभाण्डस्योपवासेन

२ आणि त्याची उत्तरे इतरांनी दिलेल्या माहितीशी ताडून पहावीत. ३ नंतर त्याची अगोदरच्या दिवसाची हालचाल व रात्रीचा मुक्काम याविषयी तो पकडला जाईपर्यंतच्या माहितीसाठी त्याला विचारावे. ४ त्याने सांगितलेल्या गोष्टींना इतरांनी दुजोरा दिल्यास तो निरपराधी ठरेल; तसे झाले नाही तर कबुलीजबाबासाठी तो छळणुकीस पात्र होतो.

५ गुन्हा घडल्यावर तीन रात्री उलटून गेल्यानंतर संशयिताला पकडता येणार नाही, कारण त्या वेळेस प्रश्न विचारण्याला अवकाश नसतो; याला अपवाद चोरीची हत्यारे सापडतील त्याचा.

६ जो चोर नाही त्याच्यावर चोरीचा आळ घेणाऱ्याला चोराइतकाच दंड करावा; तोच दंड चोराला लपवून ठेवणाऱ्यास करावा. ७ चोरीचा आळ ज्याच्यावर घेतला आहे त्याच्यावर जर तो वैरामुळे अथवा द्वेषामुळे घेतला गेला असेल तर त्याला निरपराधी ठरवावे. ८ निरपराधी मनुष्यास बंदीत ठेवणाऱ्यास प्रथम साहसदंड करावा.

९ ज्याच्याविषयी चोरीची शंका उत्पन्न झाली असेल त्याच्याजवळ चोरीची हत्यारे असल्याचे, त्याला सल्लामसलत देणारे, मदतनीस, त्याने सांगितल्याप्रमाणे काम करणारे यांचे साह्य असल्याचे व त्याच्याजवळ चोरीचा माल असल्याचे सिद्ध करणारा पुरावा मिळवावा. १० तसेच घरात प्रवेश, द्रव्यांची उचल व त्यांची वाटणी या त्याच्या क्रियांशी ते ताडून पहावे. ११ ह्या चोरीच्या पुराव्याची खातरजमा न झाल्यास बडबड करीत असला तरी तो चोर नाही असे ठरवावे. १२ कारण, असे दिसून येते की चोर नसलेला मनुष्यसुद्धा यदृच्छेने चोरांच्या वाटेत त्यांची गाठ पडली असता चोरांसारखाच वेष, शस्त्रे व द्रव्ये

वा, यथाणिमाण्डव्यः कर्मक्लेशभयादचोरः ' चोरोऽस्मि ' इति ब्रुवाणः । १२ । तस्मात्समाप्तकरणं नियमयेत् । १३ ।

मन्दापराधं बालं वृद्धं व्याधितं मत्तमुन्मत्तं क्षुत्पिपासाध्वक्लान्तमत्याशितमामकाशितं दुर्बलं वा न कर्म कारयेत् । १४ । तुल्यशीलपुंश्चलीप्रापाविककथावकाशभोजनदातृभिरपसर्पयेत् । १५ । एवमतिसंदध्यात्, यथा वा निक्षेपापहारे व्याख्यातम् । १६ ।

आप्तदोषं कर्म कारयेत्, न त्वेव स्त्रियं गर्भिणीं सूतिकां वा मासावरप्रजाताम् । १७ । स्त्रियास्त्वर्धकर्म, वाक्यानुयोगो वा । १८ । ब्राह्मणस्य सत्त्रिपरिग्रहः श्रुतवतस्तपस्विनश्च । १९ । तस्यातिक्रम उत्तमो दण्डः कर्तुः कारयितुश्च, कर्मणा व्यापादनेन च । २० ।

व्यावहारिकं कर्मचतुष्कम् – षड् दण्डाः, सप्त कशाः, द्वावुपरिनिबन्धौ उदकनालिका च । २१ । परं पापकर्मणां नव वेत्रलताः, द्वादश कशाः, द्वावूरुवेष्टौ,

जवळ असल्याकारणाने पकडला जातो, किंवा चोरीच्या वस्तूंच्या जवळ असल्याकारणाने पकडला जातो, उदाहरणार्थ, चोर नसताही छळाने होणाऱ्या हालाच्या भीतीने अणिमांडव्याने "मी चोर आहे" अशी कबुली दिली. १३ म्हणून ज्याच्यावर पुराव्याने गुन्हा शाबीत झाला असेल त्याचेच दमन करावे.

१४ ज्याचा अपराध क्षुल्लक असेल, जो लहान वयाचा, वृद्ध, रोगी, झिंगलेला, वेडा, भूक, तहान अथवा प्रवास यांनी थकून गेला असेल, ज्याने खूप खाल्ले आहे, ज्याचे जेवण पचन झालेले नाही किंवा जो दुबळा आहे त्याची छळणूक करू नये. १५ अशांच्या गुन्ह्याची खात्री त्यांच्याचसारखे दुसरे, वेश्या, पाणपोईवरील माणसे, त्यांना सल्ला, रहावयास जागा व भोजन देणारे यांच्यामार्फत गुप्तपणे करावी. १६ याप्रमाणे त्यांच्यावर मात करावी किंवा निक्षेपाच्या अपहाराच्या संबंधात (मागे ३ . १२ . ३८–५० येथे) सांगितलेल्या युक्त्यांनी मात करावी.

१७ ज्याच्या गुन्ह्याची दाट संभाव्यता असेल (पण जो गुन्हा कबूल करीत नसेल) त्याचा छळ करावा, परंतु गरोदर स्त्रीचा अथवा बाळंतपणानंतर एक महिन्याच्या आतील स्त्रीचा मुळीच छळ करू नये. १८ परंतु (इतर) स्त्रियांच्या बाबतीत छळाचे प्रमाण अर्धे ठेवावे, किंवा तोंडी तपासावरच काम भागवावे. १९ विद्वान ब्राह्मणाच्या आणि तपस्व्याच्या बाबतीत फक्त गुप्त हेरांचाच उपयोग करावा. २० या नियमांचे उल्लंघन केल्यास ते करणारा व करविणारा यांना उत्तम साहसदंड करावा, छळामुळे मृत्यू आल्यासही तोच दंड करावा.

२१ सामान्यतः वापरावयाचे छळाचे चार प्रकार आहेत – काठीने सहा वेळा मारणे, चाबकाने सात वेळा मारणे, दोनदा वर टांगणे आणि एकदा पाण्याची

विंशतिर्नक्तमाललता:, द्वात्रिंशत्तला:, द्वौ वृश्चिकबन्धौ, उल्लम्बने च द्वे, सूची हस्तस्य, यवागूपीतस्य एकपर्वदहनमङ्गुल्या:, स्नेहपीतस्य प्रतापनमेकमह:, शिशिररात्रौ बल्बजाग्रशय्या च । २२ । इत्यष्टादशकं कर्म । २३ ।

तस्योपकरणं प्रमाणं प्रहरणं प्रधारणमवधारणं च खरपट्टादागमयेत् । २४ । दिवसान्तरमेकैकं च कर्म कारयेत् । २५ ।

पूर्वकृतापदानं प्रतिज्ञायापहरन्तमेकदेशदृष्टद्रव्यं कर्मणा रूपेण वा गृहीतं राजकोशमवस्तृणन्तं कर्मवध्यं वा राजवचनात् समस्तं व्यस्तमभ्यस्तं वा कर्म कारयेत् । २६ ।

सर्वापराधेष्वपीडनीयो ब्राह्मण: । २७ । तस्याभिशस्ताङ्को ललाटे स्याद् व्यवहारपतनाय, स्तेये श्वा, मनुष्यवधे कबन्ध:, गुरुतल्पे भगम्, सुरापाने मद्यध्वज: । २८ ।

नळी घालणे. २२ मोठे गुन्हे करणाऱ्यांच्या बाबतीत – वेताच्या छडीने नऊ वेळा मारणे, बारा वेळा चाबकाने मारणे, दोनदा मांड्यांना खोडा घालणे वीस वेळा नक्तमाललतेने मारणे, बत्तीस वेळा हाताच्या तळव्याने चापट्या मारणे, दोनदा विंचवासारखे बांधून ठेवणे, व दोनदा टांगणे, हाताला सुई टोचणे, यवाची कांजी प्यालेल्या मनुष्याच्या बोटाचे एक पेरे जाळणे, तूप किंवा तेल प्यालेल्या मनुष्यास एक दिवसभर उन्हात तापत ठेवणे आणि शिशिर ऋतूत रात्री बल्वजाच्या टोकांच्या शय्येवर झोपविणे. २३ याप्रमाणे छळाचे हे अठरा प्रकार आहेत.

२४ त्या छळाची साधने, प्रमाण, मारण्याचा प्रकार, निश्चित करणे व मर्यादित करणे या गोष्टी खरपट्टावरून समजून घ्याव्यात. २५ एक दिवसाआड व एका दिवशी एकाच प्रकारचा छळ करावा.

२६ ज्याने पूर्वी गुन्हा केला होता, जो कबूल केल्यावर आपले शब्द फिरवितो, ज्याच्याजवळ चोरीच्या मालापैकी काही भाग सापडला आहे, जो चौर्यकर्माच्या चिन्हांमुळे अथवा माल सापडल्यामुळे पकडला गेला आहे, ज्याने सरकारी द्रव्याचा अपहार केला आहे, किंवा राजाच्या आज्ञेवरून ज्याचा छळाने वध करावयाचा आहे अशांच्या बाबतीत छळाचे हे प्रकार एकत्रितपणे, एकेकटे किंवा पुन्हा पुन्हा उपयोगात आणावेत.

२७ कोणताही अपराध केला असला तरी ब्राह्मणाचा छळ करू नये. २८ त्याच्याशी इतरांनी व्यवहार करू नये यासाठी त्याच्या कपाळावर गुन्ह्याचे चिन्ह करावे – चोरीबद्दल कुत्र्याचे, खुनाबद्दल मस्तकहीन मनुष्यशरीराचे,

ब्राह्मणं पापकर्माणमुद्घुष्याङ्ककृतव्रणम् ।
कुर्यान्निर्विषयं राजा वासयेदाकरेषु वा ॥ २९ ॥

इति कण्टकशोधने चतुर्थेऽधिकरणे वाक्यकर्मानुयोगः अष्टमोऽध्यायः । आदितः पञ्चाशीतितमः ।

९

[ चतुरशीतितमं प्रकरणम् – सर्वाधिकरणरक्षणम् ]

समाहर्तृप्रदेष्टारः पूर्वमध्यक्षाणामध्यक्षपुरुषाणां च नियमनं कुर्युः । १ ।

खनिसारकर्मान्तेभ्यः सारं रत्नं वाऽपहरतः शुद्धवधः । २ । फल्गुद्रव्यकर्मान्तेभ्यः फल्गु द्रव्यमुपस्करं वा पूर्वः साहसदण्डः । ३ ।

पण्यभूमिभ्यो वा राजपण्यं माषमूल्यादूर्ध्वमापादमूल्यादित्यपहरतो द्वादशपणो दण्डः, आ द्विपादमूल्यादिति चतुर्विंशतिपणः, आ त्रिपादमूल्यादिति षट्त्रिंशत्पणः, आ पणमूल्यादित्यष्टचत्वारिंशत्पणः, आ द्विपणमूल्यादिति पूर्वः साहसदण्डः, आ चतुष्पणमूल्यादिति मध्यमः, आष्टपणमूल्यादित्युत्तमः, आ दशपणमूल्यादिति

गुरुभार्येशी समागम केल्याबद्दल स्त्रीयोनीचे, सुरापानाबद्दल गुत्त्याच्या निशाणाचे (चिन्ह करावे).

२९ पापकर्म करणाऱ्या ब्राह्मणाच्या कपाळावर असे खुणेचे डाग केल्यावर त्याच्या पापाची ग्वाही फिरवून राजाने त्याला हद्दपार करावे किंवा खाणीत काम करावयास ठेवावे.

## नववा अध्याय

### प्रकरण ८४ : सर्व खात्यांतील अधिकाऱ्यांवर देखरेख

१ समाहर्ता व प्रदेष्टे यांनी प्रथम अध्यक्ष व अध्यक्षांच्या हाताखालचे नोकर यांच्या वागणुकीवर नियंत्रण ठेवावे.

२ खाणींतून किंवा भारी किमतीच्या वस्तू तयार करणाऱ्या कारखान्यातून भारी किमतीची वस्तू अथवा रत्न चोरून नेणाऱ्या अधिकाऱ्यास साध्या वधाची शिक्षा करावी. ३ हलक्या किमतीच्या वस्तू तयार करणाऱ्या कारखान्यांतून हलक्या किमतीची वस्तू अथवा अवजार नेणाऱ्यास प्रथम साहसदंड करावा.

४ किंवा सरकारी माल ठेवलेल्या जागेतून तो चोरून नेणाऱ्यास एक माप किमतीपासून पाव पण किमतीपर्यंतची वस्तू नेल्यास (सरकारी नोकराला) बारा पण दंड करावा, अर्धा पण किमतीपर्यंत चोवीस पण दंड, तीनचतुर्थांश पण किमतीपर्यंत छत्तीस पण, एक पण किमतीपर्यंत अठ्ठेचाळीस पण, दोन पण किमतीपर्यंत प्रथम साहसदंड, चार पण किमतीपर्यंत मध्यम साहसदंड, आठ पण

**वधः । ४ । कोष्ठपण्यकुप्यायुधागारेभ्यः कुप्यभाण्डोपस्करापहारेष्वर्धमूल्येषु एत एव दण्डाः । ५ । कोशभाण्डागाराक्षशालाभ्यश्चतुर्भागमूल्येषु एत एव द्विगुणा दण्डाः । ६ । चोराणामभिप्रधर्षणे चित्रो घातः । ७ । इति राजपरिग्रहेषु व्याख्यातम् । ८ ।**

**बाह्येषु तु – प्रच्छन्नमहनि क्षेत्रखलवेश्मापणेभ्यः कुप्यभाण्डमुपस्करं वा माषमूल्यादूर्ध्वम् आ पादमूल्यादित्यपहरतस्त्रिपणो दण्डः, गोमयप्रदेहेन वा प्रलिप्यावघोषणम्; आ द्विपादमूल्यादिति षट्पणः, गोमयभस्मना वा प्रलिप्यावघोषणम्; आ त्रिपादमूल्यादिति नवपणः, गोमयभस्मना वा प्रलिप्यावघोषणम्, शरावमेखलया वा; आ पणमूल्यादिति द्वादशपणः, मुण्डनं प्रव्राजनं वा; आ द्विपणमूल्यादिति चतुर्विंशतिपणः, मुण्डस्येष्टकाशकलेन प्रव्राजनं वा; आ चतुष्पणमूल्यादिति षट्त्रिंशत्पणः, आ पञ्चपणमूल्यादित्यष्टचत्वारिंशत्पणः, आ दशपणमूल्यादिति पूर्वः साहसदण्डः, आ विंशतिपणमूल्यादिति द्विशतः, आ**

किमतीपर्यंत उत्तम साहसदंड करावा, दहा पण किमतीपर्यंत (व पुढे) वधाची शिक्षा करावी. ५ कोठारातून, मालाच्या गुदामातून, जंगलातील उत्पादन साठवावयाच्या कोठीतून अथवा शस्त्रागारातून जंगलातील उत्पादन, इतर पदार्थ अथवा अवजारे, वरील किमतीच्या अर्ध्या किमतीची, चोरून नेणाऱ्या सरकारी नोकरास हेच दंड करावेत. ६ तिजोरीतून, धान्यादींच्या वखारीतून किंवा सुवर्णकाराच्या दुकानातून नेलेल्या वरील किमतीच्या एकचतुर्थांश किमतीच्या वस्तूंबद्दल हेच दंड दुप्पट करावेत. ७ तिजोरी वगैरे फोडून चोरी करणाऱ्यांना हाल हाल करून वधाची शिक्षा करावी. ८ हे सरकारी मालकीच्या कोठारांतील वस्तूंबद्दल सांगितले.

९ बिनसरकारी मालकीच्या वस्तूंबद्दल – शेत, खळे, घर किंवा दुकान यांतून जंगलातील पदार्थांपासून केलेली वस्तू अथवा अवजार दिवसा चोरून नेणाऱ्या सरकारी नोकराला एक माष किमतीपासून पाव पणपर्यंत किमतीच्या वस्तूबद्दल तीन पण दंड करावा किंवा त्याच्या अंगाला शेण फासून त्याचा गुन्हा जाहीर करावा; अर्धा पण किमतीपर्यंत सहा पण दंड किंवा शेण व राख फासून गुन्हा जाहीर करावा; पाऊण पण किमतीपर्यंत नऊ पण दंड किंवा शेण व राख फासून गुन्हा जाहीर करावा किंवा त्याच्या कमरेला खापऱ्यांचा कमरपट्टा बांधून गुन्हा जाहीर करावा ; एक पण किमतीपर्यंत बारा पण दंड किंवा मुंडन करून हद्दपार करावे; दोन पण किमतीपर्यंत चोवीस पण दंड किंवा मुंडन करून विटांच्या तुकड्यांनी त्याला गावाबाहेर हाकून द्यावे ; चार पण किमतीबद्दल छत्तीस पण दंड; पाच पण किमतीपर्यंत अठ्ठेचाळीस पण दंड; दहा पण किमतीपर्यंत

त्रिंशत्पणमूल्यादिति पञ्चशतः, आ चत्वारिंशत्पणमूल्यादिति साहस्रः, आ पञ्चाशत्पणमूल्यादिति वधः । ९ । प्रसह्य दिवा रात्रौ वाऽन्तर्यामिकमपहरतोऽर्धमूल्येषु एत एव दण्डाः । १० । प्रसह्य दिवा रात्रौ वा सशस्त्रस्यापहरतश्चतुर्भागमूल्येषु एत एव द्विगुणा दण्डाः । ११ ।

कुटुम्बिकाध्यक्षमुख्यस्वामिनां कूटशासनमुद्राकर्मसु पूर्वमध्यमोत्तमवधा दण्डाः यथापराधं वा । १२ ।

धर्मस्थश्चेद्विवदमानं पुरुषं तर्जयति भर्त्सयत्यपसारयत्यभिग्रसते वा पूर्वमस्मै साहसदण्डं कुर्यात्, वाक्पारुष्ये द्विगुणम् । १३ । पृच्छ्यं न पृच्छति, अपृच्छ्यं पृच्छति, पृष्ट्वा वा विसृजति, शिक्षयति, स्मारयति, पूर्वं ददाति वा, इति मध्यममस्मै साहसदण्डं कुर्यात् । १४ । देयं देशं न पृच्छति, अदेयं देशं पृच्छति, कार्यमदेशेनातिवाहयति, च्छलेनातिहरति, कालहरणेन श्रान्तमपवाहयति, मार्गापन्नं वाक्यमुत्क्रमयति, मतिसाहाय्यं साक्षिभ्यो ददाति, तारितानुशिष्टं कार्यं

प्रथम साहसदंड; वीस पण किमतीपर्यंत दोनशे पण दंड; तीस पण किमतीपर्यंत पाचशे पण दंड, चाळीस पण किमतीपर्यंत एक हजार पण दंड करावा; पन्नास पणांपर्यंत किमतीचा माल चोरल्याबद्दल वधाची शिक्षा करावी. १० बळजबरीने दिवसा अथवा बाहेर फिरण्यास मना असलेल्या रात्रीच्या यामांत चोरणाऱ्यास निम्म्या किमतीच्या वस्तूंबद्दल हेच दंड करावेत. ११ दिवसा किंवा रात्री शस्त्र घेऊन बळजबरीने एकचतुर्थांश किमतीच्या वस्तू नेणाऱ्यास हेच दंड दुप्पट करावेत.

१२ कुटुंबाचा मुख्य, अध्यक्ष, मुख्य अधिकारी किंवा राजा यांच्या नावाचा खोटा लेख व खोटी मोहोर केल्यास (अनुक्रमे) प्रथम, मध्यम, उत्तम साहसदंड आणि वध अशा शिक्षा कराव्यात किंवा गुन्ह्यास अनुरूप अशी शिक्षा करावी.

१३ न्यायाधिशाने जर पक्षकाराला धमकी दिली, त्याची निर्भर्त्सना केली, त्याला घालवून लावले अथवा गप्प बसविले तर त्याला प्रथम साहसदंड करावा, वाक्पारुष्याबद्दल दुप्पट दंड करावा. १४ जे विचारायला पाहिजे होते ते विचारले नाही, जे विचारायला नको होते ते विचारले किंवा विचारल्यानंतर ती बाब सोडून दिली, (कोणाला) पढवले, आठवण करून दिली किंवा काही सुचविले तर त्याला मध्यम साहसदंड करावा. १५ जो पुरावा द्यावयास पाहिजे त्याविषयी विचारले नाही, जो पुरावा द्यावयास नको त्याविषयी विचारले, पुराव्याशिवायच कज्जा चालविला, छळाचा अवलंब करून खटला काढून टाकला, कालहरण करून पक्षकार दमल्यावर खटला काढून घ्यावयास लावले,

**पुनरपि गृह्णाति, उत्तममस्मै साहसदण्डं कुर्यात् । १५ । पुनरपराधे द्विगुणं स्थानाद्व्यवरोपणं च । १६ ।**

**लेखकश्चेद् उक्तं न लिखति, अनुक्तं लिखति, दुरुक्तमुपलिखति, सूक्तमुल्लिखति, अर्थोत्पत्तिं वा विकल्पयति, इति पूर्वमस्मै साहसदण्डं कुर्याद्, यथापराधं वा । १७ ।**

**धर्मस्थः प्रदेष्टा वा हैरण्यदण्डमदण्ड्ये क्षिपति क्षेपद्विगुणमस्मै दण्डं कुर्यात्, हीनातिरिक्ताष्टगुणं वा । १८ । शारीरदण्डं क्षिपति शारीरमेव दण्डं भजेत, निष्क्रयद्विगुणं वा । १९ । यं वा भूतमर्थं नाशयति अभूतमर्थं करोति तदष्टगुणं दण्डं दद्यात् । २० ।**

**धर्मस्थीये चारके बन्धनागारे वा शय्यासनभोजनोच्चारसंचाररोधबन्धनेषु त्रिपणोत्तरा दण्डाः कर्तुः कारयितुश्च । २१ । चारकादभियुक्तं मुञ्चतो निष्पातयतो वा मध्यमः साहसदण्डः, अभियोगदानं च, बन्धनागारात् सर्वस्वं वधश्च । २२ ।**

योग्य संदर्भात असलेले वाक्य दुसऱ्या संदर्भात उपयोगात आणले, साक्षिदारांस त्यांच्या साक्षीत मदत केली अथवा पूर्ण होऊन निकाल दिलेला खटला पुन्हा चालववयास घेतला तर त्याला उत्तम साहसदंड करावा. १६ पुन्हा तोच अपराध केल्यास दुप्पट दंड करावा व कामावरून काढून टाकावे.

१७ लेखकाने जर बोललेले लिहिले नाही, न बोललेले लिहिले, वाईट बोललेले चांगले लिहिले, चांगले बोललेले वाईट लिहिले किंवा निराळाच अर्थ निष्पन्न केला तर त्याला प्रथम साहसदंड करावा किंवा अपराधानुसार दंड करावा.

१८ धर्मस्थाने किंवा प्रदेष्टयाने दंडास पात्र नसलेल्या मनुष्याला पैशाच्या रूपात दंड केला तर त्याला त्या रकमेच्या दुप्पट दंड करावा किंवा जितका कमी अथवा जास्त दंड केला असेल त्याच्या आठपट दंड करावा. १९ जर त्याने शारीरिक शिक्षा केली तर त्याला शारीरिक शिक्षाच करावी किंवा त्यातून सुटका करून घेण्याच्या रकमेच्या दुप्पट दंड करावा. २० किंवा जितकी न्याय्य रक्कम अमान्य ठरविली असेल अथवा अन्याय्य रक्कम मान्य ठरविली असेल तिच्या आठपट दंड द्यावयास लावावे.

२१ धर्मस्थाच्या दिवाणी कोठडीत अथवा फौजदारी तुरुंगात झोपणे, वसणे, भोजन करणे, शौचास जाणे, हालचाल करणे या क्रियांना प्रतिबंध करणे व बांधून ठेवणे या अपराधांबद्दल तेथील अधिकाऱ्यांना अनुक्रमे तीन, सहा, नऊ, बारा, पंधरा व अठरा पण दंड ते करणाऱ्याला व करविणाऱ्याला करावेत. २२ दिवाणी कोठडीतून आरोपीला सोडून देणाऱ्यास अथवा पळून जाण्यास मदत करणाऱ्यास

**बन्धनागाराध्यक्षस्य संरुद्धकमनाख्याय चारयतश्चतुर्विंशतिपणो दण्डः, कर्म कारयतो द्विगुणः, स्थानान्यत्वं गमयतोऽन्नपानं वा रुन्धतः षण्णवतिर्दण्डः, परिक्लेशयत उत्कोटयतो वा मध्यमः साहसदण्डः, घ्नतः साहस्रः । २३ । परिगृहीतां दासीमाहितिकां वा संरुद्धिकामधिचरतः पूर्वः साहसदण्डः, चोर-डामरिकभार्यां मध्यमः, संरुद्धिकामार्यामुत्तमः । २४ । संरुद्धस्य वा तत्रैव घातः । २५ । तदेवाक्षणगृहीतायामार्यायां विद्यात्, दास्यां पूर्वः साहसदण्डः । २६ ।**

**चारकमभित्त्वा निष्पातयतो मध्यमः, भित्त्वा वधः, बन्धनागारात् सर्वस्वं वधश्च । २७ ।**

**एवमर्थचरान् पूर्वं राजा दण्डेन शोधयेत् ।**
**शोधयेयुश्च शुद्धास्ते पौरजानपदान् दमैः ।। २८ ।।**

**इति कण्टकशोधने चतुर्थेऽधिकरणे सर्वाधिकरणरक्षणं नवमोऽध्यायः । आदितः षडशीतितमः ।**

मध्यम साहसदंड करावा आणि त्याला दाव्याची रक्कम द्यावी लागेल; फौजदारी तुरुंगातून तसे केल्यास त्याचे सर्वस्व जप्त करून त्याला वधाची शिक्षा करावी.

२३ (न्यायाधिशाला अथवा प्रदेष्टयाला) कळविल्याशिवाय कैद्याला हिंडण्याची मोकळीक देणाऱ्या तुरुंगावरील अधिकाऱ्याला चोवीस पण दंड करावा, छळ करणाऱ्याला त्याच्या दुप्पट, दुसऱ्या ठिकाणी जाऊ देणाऱ्यास किंवा अन्नपाणी रोखून ठेवणाऱ्यास शहाण्णव पण दंड, त्याचे हाल करणाऱ्याला अथवा शरीरात व्यंग उत्पन्न करणाऱ्याला मध्यम साहसदंड, त्याच्या मृत्यूस कारणीभूत होणाऱ्याला एक हजार पण दंड करावा. २४ कैदेत असलेल्या विवाहित दासीवर अथवा गहाण स्त्रीवर बलात्कार करणाऱ्या तुरुंगाधिकाऱ्याला प्रथम साहसदंड करावा, चोर किंवा दंगेखोराच्या बायकोवर केल्यास मध्यम साहसदंड, कैदेत असलेल्या आर्य स्त्रीवर केल्यास उत्तम साहसदंड करावा. २५ कैद्याने (आर्य स्त्रीवर बलात्कार केल्यास) त्याला तेथल्या तेथेच ठार करावे. २६ रात्रीच्या प्रतिषिद्ध वेळात फिरल्याबद्दल पकडलेल्या आर्य स्त्रीशी तसे वर्तन केल्यास तोच दंड करावा, दासीशी केल्यास प्रथम साहसदंड करावा.

२७ दिवाणी तुरुंग न फोडता कैद्याला पळून जाण्यास मदत करणाऱ्याला मध्यम साहसदंड करावा, तुरुंग फोडून सुटका केल्यास वधाची शिक्षा करावी; फौजदारी तुरुंगातून सुटका केल्यास सर्व मालमत्ता जप्त करून वधाची शिक्षा करावी.

२८ याप्रमाणे राजाने प्रथम पैशाचा व्यवहार करणाऱ्या अधिकाऱ्यांना दंडाच्या साह्याने चांगले वागावयास लावावे, आणि ते चांगले वागू लागले म्हणजे त्यांनी नगरवासी व जनपदनिवासी यांना दंडांच्या साह्याने सन्मार्गास लावावे.

## १०

## [पञ्चाशीतितमं प्रकरणम् – एकाङ्गवधनिष्क्रयः]

तीर्थघातग्रन्थिभेदोर्ध्वकराणां प्रथमेऽपराधे संदंशच्छेदनं चतुष्पञ्चाशत्पणो वा दण्डः, द्वितीये छेदनं पणस्य शत्यो वा दण्डः, तृतीये दक्षिणहस्तवधश्चतुःशतो वा दण्डः, चतुर्थे यथाकामी वधः । १ ।

पञ्चविंशतिपणावरेषु कुक्कुटनकुलमार्जारश्वसूकरस्तेयेषु हिंसायां वा चतुष्पञ्चाशत्पणो दण्डः, नासाग्रच्छेदनं वा; चण्डालारण्यचराणामर्धदण्डाः । २ ।

पाशजालकूटावपातेषु बद्धानां मृगपशुपक्षिव्यालमत्स्यानामादाने तच्च तावच्च दण्डः । ३ । मृगद्रव्यवनान्मृगद्रव्यापहारे शत्यो दण्डः । ४ । बिम्बविहारमृगपक्षिस्तेये हिंसायां वा द्विगुणो दण्डः । ५ ।

कारुशिल्पिकुशीलवतपस्विनां क्षुद्रकद्रव्यापहारे शत्यो दण्डः, स्थूलकद्रव्यापहारे द्विशतः, कृषिद्रव्यापहारे च । ६ ।

## दहावा अध्याय

## प्रकरण ८५ : एखादा अवयव तोडण्याच्या शिक्षेतून दंड भरून सुटका

१ तीर्थाच्या ठिकाणी घात करणारा, वस्त्राची गाठ कापून पैसे चोरणारा, व उचलेगिरी करणारा यांचा तो पहिलाच अपराध असल्यास (आंगठा व मधले बोट यांनी बनलेला) चिमटा कापून टाकावा किंवा चोपन पण दंड करावा; दुसऱ्या अपराधाबद्दल हाताची सर्व बोटे कापावीत किंवा शंभर पण दंड करावा; तिसऱ्या खेपेस उजवा हात कापून टाकावा किंवा चारशे पण दंड करावा; चौथ्या खेपेस (न्यायाधिशाच्या) मनास येईल त्याप्रमाणे वधाची शिक्षा करावी.

२ पंचवीस पणांपेक्षा कमी किमतीचे कोंबडे, मुंगूस, मांजर, कुत्रे किंवा डुक्कर यांची चोरी केल्यास अथवा त्यांना ठार मारल्यास चोपन पण दंड करावा किंवा नाकाचा शेंडा कापावा; चंडाल व रानात राहणारे यांना अर्धा दंड करावा.

३ फासात, जाळ्यात अथवा झाकलेल्या खड्डयात पकडले गेलेले हरीण, पशू, पक्षी, हिंस्र प्राणी किंवा मासे घेऊन गेल्यास ते द्यावयास लावून तेवढाच दंड करावा. ४ मृगवन किंवा द्रव्यवन यांतून हरीण किंवा वस्तू चोरल्याबद्दल शंभर पण दंड करावा. ५ शोभेसाठी किंवा खेळण्यासाठी पाळलेल्या हरिणांची किंवा पक्ष्यांची चोरी केल्यास अथवा त्यांना मारल्यास दुप्पट दंड करावा.

६ कारागीर, कलाकार, कुशीलव, तपस्वी यांच्या क्षुल्लक वस्तू चोरल्यास शंभर पण दंड करावा, मोठ्या वस्तू चोरल्यास दोनशे पण; आणि शेतीची द्रव्ये चोरल्याबद्दल हाच दंड करावा.

**दुर्गमकृतप्रवेशस्य प्रविशतः प्राकारच्छिद्राद्वा निक्षेपं गृहीत्वाऽपसरतः काण्डरा-वधो, द्विशतो वा दण्डः । ७ ।**

**चक्रयुक्तं नावं क्षुद्रपशुं वाऽपहरत एकपादवधः, त्रिशतो वा दण्डः । ८ ।**

**कूटकाकण्यक्षारालाशलाकाहस्तविषमकारिण एकहस्तवधः, चतुःशतो वा दण्डः । ९ ।**

**स्तेनपारदारिकयोः साचिव्यकर्मणि स्त्रियाः संगृहीतायाश्च कर्णनासाच्छेदनं, पञ्चशतो वा दण्डः, पुंसो द्विगुणः । १० ।**

**महापशुमेकं दासं दासीं वाऽपहरतः प्रेतभाण्डं वा विक्रीणानस्य द्विपादवधः, षट्छतो वा दण्डः । ११ ।**

**वर्णोत्तमानां गुरूणां च हस्तपादलङ्घने राजयानवाहनाद्यारोहणे चैकहस्त-पादवधः, सप्तशतो वा दण्डः । १२ ।**

७ आत येण्याची परवानगी नसता किल्ल्यात शिरणाऱ्यास किंवा तटाच्या छिद्रातून निक्षेप घेऊन पळून जाणाऱ्यास पायाचे स्नायू कापण्याची शिक्षा अथवा दोनशे पण दंड करावा.

८ बैलगाडी, नाव किंवा लहान पशू चोरणाऱ्याचा एक पाय तोडावा किंवा तीनशे पण दंड करावा.

९ (जुगार खेळताना) बनावट काकणी, फासे, चर्मपट्टे अथवा हस्तिदंती कांड्या वापरणाऱ्याचा किंवा हातचलाखी करणाऱ्याचा एक हात तोडावा किंवा चारशे पण दंड करावा.

१० चोर व परस्त्रीगमन करणारा यांना मदत केल्याबद्दल, तसेच व्यभि-चारात सापडलेल्या स्त्रीचे कान व नाक कापावेत किंवा पाचशे पण दंड करावा; पुरुषाला दुप्पट दंड करावा.

११ एक मोठा पशू, दास किंवा दासी पळवून नेणाऱ्यास अथवा प्रेताच्या अंगावरील वस्तू विकणाऱ्यास दोन्ही पाय कापण्याची शिक्षा किंवा सहाशे पण दंड करावा.

१२ श्रेष्ठ वर्णातील मनुष्यांवर किंवा गुरुजनांवर हाताने अथवा पायाने प्रहार केल्यास, तसेच राजाच्या गाडीत अथवा वाहनावर चढून बसल्यास एक हात व एक पाय तोडण्याची शिक्षा करावी किंवा सातशे पण दंड करावा.

शूद्रस्य ब्राह्मणवादिनो देवद्रव्यमवस्तृणतो राजद्विष्टमादिशतो द्विनेत्रभेदिनश्च योगाञ्जनेनान्धत्वम्, अष्टशतो वा दण्डः । १३ ।

चोरं पारदारिकं वा मोक्षयतो राजशासनमूनमतिरिक्तं वा लिखतः कन्यां दासीं वा सहिरण्यमपहरतः कूटव्यवहारिणो विमांसविक्रयिणश्च वामहस्तद्विपादवधो, नवशतो वा दण्डः । १४ । मानुषमांसविक्रये वधः । १५ ।

देवपशुप्रतिमामनुष्यक्षेत्रगृहहिरण्यसुवर्णरत्नसस्यापहारिण उत्तमो दण्डः, शुद्धवधो वा । १६ ।

पुरुषं चापराधं च कारणं गुरुलाघवम् ।
अनुबन्धं तदात्वं च देशकालौ समीक्ष्य च ।। १७ ।।
उत्तमावरमध्यत्वं प्रदेष्टा दण्डकर्मणि ।
राज्ञश्च प्रकृतीनां च कल्पयेदन्तरा स्थितः ।। १८ ।।

इति कण्टकशोधने चतुर्थेऽधिकरणे एकाङ्गवधनिष्क्रयः दशमोऽध्यायः । आदितः सप्ताशीतितमः ।

१३ स्वतःला ब्राह्मण म्हणवून घेणाऱ्या शूद्राला, देवांना अर्पण केलेले द्रव्य गडप करणाऱ्याला, राजद्रोहाची शिकवण देणाऱ्याला, तसेच कोणाचे दोन्ही डोळे फोडणाऱ्याला विषारी अंजन घालून आंधळे करावे किंवा आठशे पण दंड करावा.

१४ चोराला किंवा परस्त्रीगमन करणाऱ्याला बंधनातून सोडविणाऱ्यास, राजाचे आज्ञापत्र कमी किंवा अधिक शब्द घालून लिहिणाऱ्यास, कुमारी मुलीला अथवा दासीला द्रव्यासह पळविणाऱ्यास, फसविण्याचे उद्योग करणाऱ्यास आणि बिघडलेले मांस विकणाऱ्यास डावा हात व दोन्ही पाय तोडण्याची शिक्षा करावी किंवा नऊशे पण दंड करावा. १५ मनुष्याचे मांस विकल्यास वधाची शिक्षा करावी.

१६ देवांचे पशू, मूर्ती, दास, शेते, घरे, धन, सोने, रत्ने अथवा धान्य चोरणाऱ्यास उत्तम साहसदंड करावा किंवा साध्या वधाची शिक्षा करावी.

१७–१८ (गुन्हा करणारा) मनुष्य व त्याचा गुन्हा, तो करण्याचा हेतू, त्याची गंभीरता अथवा क्षुल्लकता, त्याचे होणारे पुढील परिणाम व तात्कालिक परिस्थिती, देश व काल ह्या सर्व गोष्टी पूर्णपणे विचारात घेऊन प्रदेष्ट्याने राजा व प्रजाजन यांच्यामध्ये निःपक्षपाताची भूमिका घेऊन दंडाच्या बाबतीत भारी, हलका व मधला यांपैकी कोणता करावयाचा ते ठरवावे.

११

[ षडशीतितमं प्रकरणम् – शुद्धश्चित्रश्च दण्डकल्पः ]

कलहे घ्नतः पुरुषं चित्रो घातः । १ । सप्तरात्रस्यान्तर्मृते शुद्धवधः, पक्षस्यान्त-रुत्तमः, मासस्यान्तः पञ्चशतः समुत्थानव्ययश्च । २ ।

शस्त्रेण प्रहरत उत्तमो दण्डः । ३ । मदेन हस्तवधः, मोहेन द्विशतः । ४ । वधे वधः । ५ ।

प्रहारेण गर्भं पातयत उत्तमो दण्डः, भैषज्येन मध्यमः, परिक्लेशेन पूर्वः साहसदण्डः । ६ ।

प्रसभस्त्रीपुरुषघातकाभिसारकनिग्राहकावघोषकावस्कन्दकोपवेधकान् पथिवेश्मप्रतिरोधकान् राजहस्त्यश्वरथानां हिंसकान् स्तेनान् वा शूलानारोहयेयुः । ७ । यश्चैनान् दहेदपनयेद्वा स तमेव दण्डं लभेत, साहसमुत्तमं वा । ८ ।

## अकरावा अध्याय

### प्रकरण ८६ : साध्या वधाची आणि हाल करून वधाची शिक्षा

१ भांडणात कोणा मनुष्याला ठार मारणाऱ्याला हाल करून वधाची शिक्षा करावी. २ मनुष्य सात दिवसांच्या आत मरण पावल्यास साध्या वधाची शिक्षा करावी, पंधरवड्याच्या आत मृत्यू पावल्यास उत्तम साहसदंड करावा, महिन्याच्या आत पाचशे पण दंड करावा व औषधपाण्याचा खर्च द्यावयास लावावे.

३ शस्त्राने प्रहार करणाऱ्याला उत्तम साहसदंड करावा. ४ दारूच्या नशेत तसे केल्यास हात तोडावा, मोहाने तसे केल्यास दोनशे पण दंड करावा. ५ (शस्त्राने) वध केल्यास वधाची शिक्षा करावी.

६ प्रहार करून गर्भपात करणाऱ्याला उत्तम साहसदंड करावा, औषधाने गर्भपात करणाऱ्याला मध्यम दंड करावा, स्त्रीला क्लेश देऊन गर्भपात करणाऱ्याला प्रथम साहसदंड करावा.

७ स्त्री अथवा पुरुष यांना बळाचा वापर करून मारणारा, त्यांच्यावर धावून जाणारा, त्यांना दाबून ठेवणारा, त्यांना दमदाटी करणारा, त्यांच्यावर हल्ला करणारा, त्यांच्या अंगात शस्त्र खुपसणारा यांना, तसेच वाटसरूंना लुटणारे, घरांवर दरोडा घालणारे, राजाचे हत्ती, घोडे व रथ नष्ट करणारे किंवा चोरणारे यांना सुळावर चढवावे. ८ आणि जो मनुष्य त्यांचे दहन करील किंवा सुळावरून काढून नेईल त्याला तीच शिक्षा करावी किंवा उत्तम साहसदंड करावा.

हिंस्रस्तेनानां भक्तवासोपकरणाग्निमन्त्रदानवैयावृत्यकर्मसूत्तमो दण्डः, परिभाषणमविज्ञाते ।९। हिंस्रस्तेनानां पुत्रदारमसमन्त्रं विसृजेत्, समन्त्रमाददीत ।१०।

राज्यकामुकमन्तःपुरप्रधर्षकमटव्यमित्रोत्साहकं दुर्गराष्ट्रदण्डकोपकं वा शिरोहस्तप्रादीपिकं घातयेत् ।११। ब्राह्मणं तमः प्रवेशयेत् ।१२।

मातृपितृपुत्रभ्रात्राचार्यतपस्विघातकं वाऽत्वक्छिरःप्रादीपिकं घातयेत् ।१३। तेषामाक्रोशे जिह्वाच्छेदः, अङ्गाभिरदने तदङ्गान्मोच्यः ।१४।

यदृच्छाघाते पुंसः पशुयूथस्तेये च शुद्धवधः ।१५। दशावरं च यूथं विद्यात् ।१६।

उदकधारणं सेतुं भिन्दतस्तत्रैवाप्सु निमज्जनम्, अनुदकमुत्तमः साहसदण्डः, भग्नोत्सृष्टकं मध्यमः ।१७।

९ खुनी माणसांना किंवा चोरांना अन्न, आसरा, हत्यारे, विस्तव, सल्ला देणे व त्यांनी सांगितलेले काम करणे ह्या गुन्ह्यांबद्दल उत्तम साहसदंड करावा; त्यांना त्यांच्या अपराधाची माहिती नसल्यास ताकीद देऊन सोडावे. १० खुनी माणसांची आणि चोरांची बायकामुले त्यांना सामील नसले तर सोडून द्यावेत, सामील असले तर पकडावेत.

११ राज्याची अभिलाषा धरणारा, राजवाड्यावर चढाई करणारा, रानटी टोळ्या किंवा शत्रू यांना प्रोत्साहन देणारा किंवा दुर्ग, जनपद किंवा सैन्य यांत बंडाचा उठाव करणारा यांच्या मस्तकास व हातास जाळ लावून मारावे. १२ तो ब्राह्मण असल्यास त्याला आंधळे करावे.

१३ आई, बाप, मुलगा, भाऊ, आचार्य अथवा तपस्वी यांचा खून करणाऱ्याच्या डोक्याचे कातडे सोलून डोके पेटवून देऊन मारावे. १४ त्यांची निंदा केल्यास जीभ छाटून टाकावी, त्यांचा एखादा अवयव रगडल्यास त्याचा तोच अवयव कापून टाकावा.

१५ आकस्मिकपणे मनुष्याचा घात केल्यास, तसेच जनावरांचा कळप चोरल्यास साध्या वधाची शिक्षा करावी. १६ कमीत कमी दहा जनावरे असली म्हणजे कळप असे समजावे.

१७ पाणी अडवून ठेवणारा बंधारा फोडणाऱ्याला तेथेच पाण्यात बुडवून मारावे, पाणी नसणारा बंधारा फोडणाऱ्याला उत्तम साहसदंड करावा, तो भग्न होऊन वापरात नसेल तर मध्यम साहसदंड करावा.

विषदायकं पुरुषं स्त्रियं च पुरुषघ्नीमपः प्रवेशयेदगर्भिणीम्, गर्भिणीं मासावरप्रजाताम् । १८ । पतिगुरुप्रजाघातिकामग्निविषदां संधिच्छेदिकां वा गोभिः पाटयेत् । १९ ।

विवीतक्षेत्रखलवेश्मद्रव्यहस्तिवनादीपिकमग्निना दाहयेत् । २० ।

राजाक्रोशकमन्त्रभेदकयोरनिष्टप्रवृत्तिकस्य ब्राह्मणमहानसावलेहिनश्च जिह्वामुत्पाटयेत् । २१ ।

प्रहरणावरणस्तेनमनायुधीयमिषुभिर्घातयेत् । २२ । आयुधीयस्योत्तमः । २३ । मेढ्रफलोपघातिनस्तदेव च्छेदयेत् । २४ । जिह्वानासोपघाते संदंशवधः । २५ ।

एते शास्त्रेष्वनुगताः क्लेशदण्डा महात्मनाम् ।
अक्लिष्टानां तु पापानां धर्म्यः शुद्धवधः स्मृतः ।। २६ ।।

इति कण्टकशोधने चतुर्थेऽधिकरणे शुद्धश्चित्रश्च दण्डकल्पः एकादशोऽध्यायः ।
आदितोऽष्टाशीतितमः ।

१८ विषप्रयोग करणारा पुरुष आणि पुरुषाचा खून करणारी गरोदर नसलेली स्त्री यांना पाण्यात बुडवून मारावे, गरोदर स्त्री बाळंतपणानंतर कमीत कमी एक महिना जाऊ देऊन (मग बुडवावे). १९ नवरा, वडील मनुष्य अथवा अपत्य यांना मारणारी, आग लावणारी किंवा विषप्रयोग करणारी किंवा घर फोडणारी, अशा स्त्रीला बैलांकरवी ठार करावे.

२० कुरण, शेत, खळे, घर, द्रव्यवन, हस्तिवन यांना आग लावणाऱ्यास अग्नीत जाळून मारावे.

२१ राजाची निंदा करणारा व गुप्त सल्लामसलत बाहेर फोडणारा, (राजाविषयी) वाईट बातमी पसरविणारा आणि ब्राह्मणाच्या स्वयंपाकघरातील अन्नाला चाटून दूषित करणारा, यांची जीभ उपटून टाकावी.

२२ सैनिक नसलेल्या मनुष्याने शस्त्रे किंवा चिलखते चोरली तर बाणांनी त्याचा वध करावा. २३ सैनिकाने तसे केल्यास उत्तम साहसदंड करावा.

२४ पुरुषाचे जननेंद्रिय व वृषण यांना इजा करणाऱ्याची तीच इंद्रिये कापून टाकावीत. २५ जीभ अथवा नाक यांना इजा केली असता (आंगठा व मधले बोट यांनी होणारा) चिमटा तोडून टाकावा.

२६ हे क्लेशदायक शिक्षेचे प्रकार थोर आचार्यांच्या शास्त्रग्रंथांत सांगितले आहेत. परंतु पीडा न देणाऱ्या गुन्ह्यांबद्दल साध्या वधाची शिक्षाच धर्माला अनुसरून मानली गेली आहे.

१२

[ सप्ताशीतितमं प्रकरणम् — कन्याप्रकर्म ]

सवर्णामप्राप्तफलां कन्यां प्रकुर्वतो हस्तवधः, चतुःशतो वा दण्डः । १ । मृतायां वधः । २ । प्राप्तफलां प्रकुर्वतो मध्यमाप्रदेशिनीवधो, द्विशतो वा दण्डः । ३ । पितुश्चावहीनं दद्यात् । ४ । न च प्राकाम्यमकामायां लभेत । ५ । सकामायां चतुष्पञ्चाशत्पणो दण्डः, स्त्रियास्त्वर्धदण्डः । ६ । परशुल्कावरुद्धायां हस्तवधः, चतुःशतो वा दण्डः, शुल्कदानं च । ७ ।

सप्तार्तवप्रजातां वरणादूर्ध्वमलभमानः प्रकृत्य प्राकामी स्यात्, न च पितुरवहीनं दद्यात् । ८ । ऋतुप्रतिरोधिभिः स्वाम्यादपक्रामति । ९ ।

त्रिवर्षप्रजातार्तवायास्तुल्यो गन्तुमदोषः, ततः परमतुल्योऽप्यनलङ्कृतायाः । १० । पितृद्रव्यादाने स्तेयं भजेत । ११ ।

## बारावा अध्याय

### प्रकरण ८७ : कुमारिकेला भ्रष्ट करणे

१ ऋतू प्राप्त न झालेल्या आपल्याच वर्णाच्या कुमारिकेला भ्रष्ट करणाऱ्याचा हात तोडावा अथवा चारशे पण दंड करावा. २ ती मरण पावल्यास वधाची शिक्षा करावी. ३ ऋतू प्राप्त झालेल्या कुमारिकेला भ्रष्ट करणाऱ्याची दुसरे व मधले ही बोटे तोडावीत किंवा दोनशे पण दंड करावा. ४ आणि तिच्या पित्याची होणारी हानी त्याने भरून दिली पाहिजे. ५ आणि तिची इच्छा नसल्यास त्याला स्वेच्छेनुसार वागण्याची मुभा असणार नाही. ६ तिची संमती असल्यास त्याला चोपन पण दंड करावा, परंतु त्या स्त्रीला अर्धा दंड करावा. ७ ती शुल्काने दुसऱ्या वराशी विवाह ठरलेली कुमारिका असल्यास हात तोडण्याची शिक्षा किंवा चारशे पण दंड करावा, आणि शिवाय त्याने तिचे शुल्क दिले पाहिजे.

८ ऋतुप्राप्तीनंतर सात मासिक पाळ्या गेल्यावर विवाह ठरलेला असूनही वराला तिची प्राप्ती न झाली तर कुमारिकेला भ्रष्ट करून त्याला इच्छेप्रमाणे वागता येईल, आणि त्याने पित्याच्या हानीची भरपाई करून देण्याचे मुळीच कारण नाही. ९ कारण, कन्येचा ऋतू व्यर्थ घालविण्याच्या त्याच्या कृत्यांमुळे त्याचे तिच्यावरचे स्वामित्व नष्ट झालेले असते.

१० ऋतुप्राप्तीनंतर तीन वर्षे लोटलेल्या कुमारीने त्याच वर्णाच्या पुरुषाबरोबर (विवाहाच्या उद्देशाने) समागम करण्यात दोष नाही; त्यानंतर भिन्न

**परमुद्दिश्यान्यस्य विन्दतो द्विशतो दण्डः । १२ । न च प्राकाम्यमकामायां लभेत । १३ ।**

**कन्यामन्यां दर्शयित्वाऽन्यां प्रयच्छतः शत्यो दण्डस्तुल्यायाम्, हीनायां द्विगुणः । १४ ।**

**प्रकर्मण्यकुमार्याश्चतुष्पञ्चाशत्पणो दण्डः, शुल्कव्ययकर्मणी च प्रतिदद्यात् । १५ । अवस्थाय तज्जातं पश्चात्कृता द्विगुणं दद्यात् । १६ । अन्यशोणितोपधाने द्विशतो दण्डः, मिथ्याभिशंसिनश्च पुंसः । १७ । शुल्कव्ययकर्मणी च जीयेत । १८ । न च प्राकाम्यमकामायां लभेत । १९ ।**

**स्त्रीप्रकृता सकामा समाना द्वादशपणं दण्डं दद्यात्, प्रकर्त्री द्विगुणम् । २० । अकामायाः शत्यो दण्ड आत्मरागार्थम्, शुल्कदानं च । २१ । स्वयं प्रकृता राजदास्यं गच्छेत् । २२ ।**

वर्णाच्या पुरुषाबरोबरही, फक्त तिने आपले अलंकार बरोबर नेता कामा नये. ११ पित्याचे द्रव्य तिने घेतल्यास ती चोरी असे समजावे.

१२ दुसऱ्यासाठी म्हणून वधू निश्चित करून स्वतःच तिच्याशी लग्न करणाऱ्यास दोनशे पण दंड करावा. १३ आणि तिची संमती नसल्यास त्याला तिच्यावर हक्क प्राप्त होणार नाही.

१४ एक कन्या दाखवून दुसरीच देणाऱ्याला, ती वराच्याच वर्णाची असल्यास, शंभर पण दंड करावा, खालच्या वर्णाची असल्यास दुप्पट दंड करावा.

१५ समागमाच्या वेळेस कुमारिका नसलेल्या वधूला चोपन पण दंड करावा, आणि तिने शुल्क व लग्नाचा खर्च परत केला पाहिजे. १६ आपण कुमारिका असल्याचा दावा करून तिला ते सिद्ध करता आले नाही तर तिने दुप्पट दंड दिला पाहिजे. १७ (ते सिद्ध करण्यासाठी) दुसरीकडचे रक्त ठेवल्यास दोनशे पण दंड करावा; तोच दंड ती कुमारिका नाही असा खोटाच आळ घेणाऱ्या पुरुषाला करावा. १८ आणि त्या पुरुषाला शुल्क व लग्नाचा खर्च गमवावा लागेल. १९ आणि तिची इच्छा नसल्यास त्याला तिच्यावर हक्क प्राप्त होणार नाही.

२० स्त्रीकडून भ्रष्ट झालेल्या कुमारिकेने, तिची संमती असल्यास व ती त्याच वर्णाची असल्यास बारा पण दंड दिला पाहिजे, भ्रष्ट करणाऱ्या स्त्रीने दुप्पट दंड दिला पाहिजे. २१ तिची संमती नसल्यास भ्रष्ट करणाऱ्या स्त्रीने आपल्या वासनापूर्तीप्रीत्यर्थ शंभर पण दंड व तिचे शुल्क दिले पाहिजे. २२ स्वतःला आपल्या हाताने भ्रष्ट करून घेणाऱ्या कुमारिकेने राजाचे दास्य पत्करले पाहिजे.

बहिर्ग्रामस्य प्रकृतायां मिथ्याभिशंसने च द्विगुणो दण्डः । २३ ।

प्रसह्य कन्यामपहरतो द्विशतः, ससुवर्णामुत्तमः । २४ । बहूनां कन्यापहारिणां पृथग् यथोक्ता दण्डाः । २५ ।

गणिकादुहितरं प्रकुर्वतश्चतुष्पञ्चाशत्पणो दण्डः, शुल्कं मातुर्भोगः षोडशगुणः । २६ । दासस्य दास्या वा दुहितरमदासीं प्रकुर्वतश्चतुर्विंशतिपणो दण्डः शुल्काबन्ध्यदानं च । २७ । निष्क्रयानुरूपां दासीं प्रकुर्वतो द्वादशपणो दण्डो वस्त्राबन्ध्यदानं च । २८ ।

साचिव्यावकाशदाने कर्तृसमो दण्डः । २९ ।

प्रोषितपतिकामपचरन्तीं पतिबन्धुस्तत्पुरुषो वा संगृह्णीयात् । ३० । संगृहीता पतिमाकाङ्क्षेत । ३१ । पतिश्चेत्क्षमेत विसृज्येतोभयम् । ३२ । अक्षमायां स्त्रियाः कर्णनासाच्छेदनम्, वधं जारश्च प्राप्नुयात् । ३३ । जारं चोर इत्यभिहरतः पञ्चशतो दण्डः, हिरण्येन मुञ्चतस्तदष्टगुणः । ३४ ।

२३ कुमारिकेला गावाबाहेर भ्रष्ट केल्यास, तसेच त्यासंबंधी खोटा आळ घेतल्यास दुप्पट दंड करावा.

२४ बळजबरीने कुमारिकेला पळवून नेणाऱ्यास दोनशे पण दंड करावा, तिच्या अंगावर सोन्याचे दागिने असल्यास उत्तम साहसदंड करावा. २५ अनेक जणांनी मिळून कुमारिकेला पळविल्यास प्रत्येकाला सांगितलेले दंड करावेत.

२६ गणिकेच्या मुलीला भ्रष्ट करणाऱ्यास चोपन पण दंड करावा आणि तिच्या आईला शुल्क म्हणून तिच्या उपभोगाच्या दराच्या सोळापट रक्कम द्यावयास लावावे. २७ दासाच्या किंवा दासीच्या दासी नसलेल्या मुलीस भ्रष्ट करणाऱ्याला चोवीस पण दंड करावा आणि तिचे शुल्क व दागिने द्यावयास लावावे. २८ निष्क्रयाने मुक्त होऊ घातलेल्या दासीला भ्रष्ट करणाऱ्यास बारा पण दंड करावा आणि वस्त्रे व दागिने द्यावयास लावावे.

२९ (ह्या गुन्ह्यात) मदत किंवा जागा दिल्यास गुन्हेगाराइतकाच दंड करावा.

३० नवरा प्रवासास गेला असता कुमार्गाने जाणाऱ्या पत्नीला नवऱ्याच्या बांधवाने अथवा त्याच्या नोकराने आपल्या ताब्यात ठेवावे. ३१ त्यांच्या ताब्यात राहून तिने पतीची वाट पहावी. ३२ पतीने जर अपराध सहन केला तर (पत्नी व तिचा प्रियकर ह्या) दोघांनाही सोडून देण्यात यावे. ३३ जर त्याने क्षमा केली नाही तर स्त्रीचे कान व नाक कापून टाकावेत आणि जाराला वधाची शिक्षा करावी. ३४ जाराला तो चोर आहे अशी बतावणी करणाऱ्याला पाचशे पण दंड करावा, पैसे देऊन त्याची सुटका करणाऱ्याला त्या रकमेच्या आठपट दंड करावा.

केशाकेशिकं संग्रहणम्, उपलिङ्गनाद्वा शरीरोपभोगानां, तज्जातेभ्यः, स्त्रीवचनाद्वा । ३५ ।

परचक्राटवीहृतामोघप्रव्यूढामरण्येषु दुर्भिक्षे वा त्यक्तां प्रेतभावोत्सृष्टां वा परस्त्रियं निस्तारयित्वा यथासंभाषितं समुपभुञ्जीत । ३६ । जातिविशिष्टामकामामपत्यवतीं निष्क्रयेण दद्यात् । ३७ ।

चोरहस्तान्नदीवेगाद्दुर्भिक्षाद्देशविभ्रमात् ।
निस्तारयित्वा कान्तारान्नष्टां त्यक्तां मृतेति वा ॥ ३८ ॥
भुञ्जीत स्त्रियमन्येषां यथासंभाषितं नरः ।
न तु राजप्रतापेन प्रमुक्तां स्वजनेन वा ॥ ३९ ॥
न चोत्तमां न चाकामां पूर्वापत्यवतीं न च ।
ईदृशीं त्वनुरूपेण निष्क्रयेणापवाहयेत् ॥ ४० ॥

इति कण्टकशोधने चतुर्थेऽधिकरणे कन्याप्रकर्म द्वादशोऽध्यायः । आदित एकोननवतितमः ।

३५ एकमेकांचे केस गोंजारले की व्यभिचार समजावा, अथवा शरीरावरील उपभोगाच्या चिन्हांवरून, तज्ज्ञांच्या मतानुसार किंवा स्त्रियांच्या सांगण्यावरून (व्यभिचार ओळखावा).

३६ शत्रुसैन्याने अथवा रानटी टोळचांनी पळवून नेलेल्या, पुरात वाहून चाललेल्या, अरण्यात किंवा दुष्काळामध्ये टाकून दिलेल्या, अथवा मेली अशा समजुतीने सोडून दिलेल्या दुसऱ्याच्या पत्नीला संकटातून वाचविल्यावर कबूल केल्याप्रमाणे तिच्याशी समागम करावा. ३७ परंतु ती वरच्या जातीची असल्यास, तिची इच्छा नसल्यास किंवा तिला संतती असल्यास निष्क्रयाची रक्कम घेऊन तिला जाऊ द्यावे.

३८–४० चोराच्या हातातून, नदीच्या पुरातून, दुष्काळातून, देशातील धामधुमीतून, अरण्यातून सोडविल्यावर, किंवा ती नाहिशी झाली असता अथवा मेली असे समजून सोडून दिलेली असता तिला वाचविल्यावर, कबूल केल्याप्रमाणे पुरुषाने दुसऱ्यांच्या स्त्रीचा उपयोग घ्यावा; परंतु तिची सुटका राजाच्या प्रतापाने झाली असल्यास किंवा तिच्या नातेवाइकाने केली असल्यास, किंवा ती उत्तम वर्णाची असल्यास, तिची संमती नसल्यास किंवा तिला अगोदरची संतती असल्यास तसे करता कामा नये. अशा स्त्रीला अनुरूप निष्क्रयाची रक्कम घेऊन जाण्यास मोकळीक द्यावी.

## १३
## [ अष्टाशीतितमं प्रकरणम् – अतिचारदण्डाः ]

**ब्राह्मणमपेयमभक्ष्यं वा ग्रासयत उत्तमो दण्डः, क्षत्रियं मध्यमः, वैश्यं पूर्वः साहसदण्डः, शूद्रं चतुष्पञ्चाशत्पणो दण्डः । १ । स्वयं प्रसितारो निर्विषयाः कार्याः । २ ।**

**परगृहाभिगमने दिवा पूर्वः साहसदण्डः, रात्रौ मध्यमः । ३ । दिवा रात्रौ वा सशस्त्रस्य प्रविशत उत्तमो दण्डः । ४ । भिक्षुकवैदेहकौ मत्तोन्मत्तौ बलादापदि चातिसंनिकृष्टाः प्रवृत्तप्रवेशाश्चादण्ड्याः, अन्यत्र प्रतिषेधात् । ५ । स्ववेश्मनो विरात्रादूर्ध्वं परिवार्यमारोहतः पूर्व साहसदण्डः, परवेश्मनो मध्यमः, ग्रामाराम-वाटभेदिनश्च । ६ ।**

**ग्रामेष्वन्तः सार्थिका ज्ञातसारा वसेयुः । ७ । मुषितं प्रवासितं चैषामनिर्गतं रात्रौ ग्रामस्वामी दद्यात् । ८ । ग्रामान्तरेषु वा मुषितं प्रवासितं विवीताध्यक्षो**

## तेरावा अध्याय
## प्रकरण ८८ : अत्याचारांबद्दल शिक्षा

१ पिण्यास अयोग्य अथवा खाण्यास अयोग्य पदार्थ ब्राह्मणास खाऊ घालणाऱ्याला उत्तम साहसदंड करावा, क्षत्रियास तसे खाऊ घालणाऱ्याला मध्यम साहसदंड, वैश्यास तसे केल्यास प्रथम साहसदंड, शूद्रास तसे केल्यास चोपन पण दंड करावा. २ स्वतःच तसे खाणाऱ्यांना हद्दपार करावे.

३ दुसऱ्याच्या घरात दिवसा घुसल्यास प्रथम साहसदंड करावा, रात्री घुसल्यास मध्यम. ४ दिवसा किंवा रात्री शस्त्र घेऊन शिरणाऱ्याला उत्तम साहसदंड करावा. ५ भिक्षेकरी आणि व्यापारी, दारूच्या नशेत असलेला आणि वेडा मनुष्य, अगदी निकटचे शेजारी त्यांच्यावर बळाचा वापर होत असता आणि ते संकटात असता, तसेच जे नेहमी येजा करीत असतात त्यांना दंड करू नये, फक्त त्यांना मना केली असेल तरच दंड करावा. ६ मध्यरात्रीनंतर स्वतःच्या घराच्या कुंपणाची भिंत चढणाऱ्यास प्रथम साहसदंड करावा, दुसऱ्याच्या घराची भिंत चढणाऱ्यास आणि गावाच्या बगीचाचे कुंपण तोडणाऱ्यास मध्यम साहसदंड करावा.

७ तांड्यातील व्यापाऱ्यांनी आपल्याजवळील किमती मालाची माहिती (अधिकाऱ्यांना) देऊन गावात मुक्कामास रहावे. ८ आणि त्यांच्या सामानापैकी काही (जनावरे वगैरे) वस्तू गावाबाहेर न जाता रात्री चोरीस गेली अथवा मारण्यात आली तर गावाच्या मालकाने भरून दिली पाहिजे. ९ दोन गावांच्या

**दद्यात् । ९ । अविवीतानां चोररज्जुकः । १० । तथाप्यगुप्तानां सीमावरोधेन विचयं दद्युः । ११ । असीमावरोधे पञ्चग्रामी दशग्रामी वा । १२ ।**

**दुर्बलं वेश्म शकटमनुत्तब्धमूर्धस्तम्भं शस्त्रमनपाश्रयमप्रतिच्छन्नं श्वभ्रं कूपं कूटावपातं वा कृत्वा हिंसायां दण्डपारुष्यं विद्यात् । १३ ।**

**वृक्षच्छेदने दम्यरश्मिहरणे चतुष्पदानामदान्तसेवने वाहने वा काष्ठलोष्टपाषाणदण्डबाणबाहुविक्षेपणेषु याने हस्तिना च संघट्टने ' अपेहि ' इति प्रक्रोशन्नदण्ड्यः । १४ ।**

**हस्तिना रोषितेन हतो द्रोणान्नं मद्यकुम्भं माल्यानुलेपनं दन्तप्रमार्जनं च पटं दद्यात् । १५ । अश्वमेधावभृथस्नानेन तुल्यो हस्तिना वध इति पादप्रक्षालनम् । १६ । उदासीनवधे यातुरुत्तमो दण्डः । १७ ।**

मधल्या प्रदेशात जे चोरीस जाईल किंवा मारण्यात येईल ते विवीताध्यक्षाने भरून दिले पाहिजे. १० गायरान नसलेल्या (जंगल वगैरे) प्रदेशांत चोरांचा बंदोबस्त करणाऱ्या अधिकाऱ्याने भरून दिले पाहिजे. ११ तरीसुद्धा त्यांना संरक्षण न मिळाल्यास गावांच्या ठरलेल्या हद्दीप्रमाणे झडती घ्यावी. १२ गावांच्या हद्दी ठरलेल्या नसतील तर पाच किंवा दहा गावांच्या समूहात झडती घ्यावी.

१३ मोडके तोडके घर, ज्याच्या वरच्या वाशाला चांगला आधार नाही असा गाडा, म्यान नसलेले शस्त्र, नीट आच्छादन नसलेला खड्डा, विहीर अथवा सापळा या गोष्टी केल्यामुळे कोणास इजा झाल्यास दंडपारुष्याचा गुन्हा झाला आहे असे समजावे.

१४ झाड तोडीत असता, शिकाऊ जनावर दोर हातात धरून नेत असता, जनावरांपैकी माणसाळलेले नसलेल्या जनावराचा उपयोग करीत असता अथवा त्याच्यावर बसून जात असता, लाकडे, ढेकळे, दगड, काठ्या, बाण किंवा बाहू इकडेतिकडे फेकीत अथवा फिरवीत असता, तसेच गाडी किंवा हत्ती यांच्यामुळे गर्दी झाली असता ' बाजूला व्हा ' असे जो ओरडून सांगतो तो दंडास पात्र होत नाही.

१५ हत्तीला क्रोधाविष्ट करून (त्याच्या पायाखाली) मृत्यू इच्छिणाऱ्या माणसाने एक द्रोण अन्न, मद्याचा एक कुंभ, फुले आणि उटणे आणि सुळे स्वच्छ करण्यासाठी कपडा इतके सर्व दिले पाहिजे. १६ हत्तीकडून होणारा मृत्यू अश्वमेधयागाच्या अंती करावयाच्या स्नानासारखाच (पुण्यप्रद) आहे म्हणून ही त्याची पाद्यपूजा. १७ ज्याला तशी इच्छा नसेल त्याचा हत्तीने घात केल्यास माहुतास उत्तम साहसदंड करावा.

**शृङ्गिणा दंष्ट्रिणा वा हिंस्यमानममोक्षयतः स्वामिनः पूर्वः साहसदण्डः, प्रतिक्रुष्टस्य द्विगुणः । १८ । शृङ्गिदंष्ट्रिभ्यामन्योन्यं घातयतस्तच्च तावच्च दण्डः । १९ ।**

**देवपशुमृषभमुक्षाणं गोकुमारीं वा वाहयतः पञ्चशतो दण्डः, प्रवासयत उत्तमः । २० । लोमदोहवाहनप्रजननोपकारिणां क्षुद्रपशूनामादाने तच्च तावच्च दण्डः, प्रवासने च, अन्यत्र देवपितृकार्येभ्यः । २१ ।**

**छिन्ननस्यं भग्नयुगं तिर्यक्प्रतिमुखागतं प्रत्यासरद्वा चक्रयुक्तं याता पशुमनुष्यसंबाधे वा हिंसायामदण्डयः । २२ । अन्यथा यथोक्तं मानुषप्राणिहिंसायां दण्डमभ्यावहेत् । २३ । अमानुषप्राणिवधे प्राणिदानं च । २४ । बाले यातरि यानस्थः स्वामी दण्डयः, अस्वामिनि यानस्थः, प्राप्तव्यवहारो वा याता । २५ । बालाधिष्ठितमपुरुषं वा यानं राजा हरेत् । २६ ।**

१८ शिंगे किंवा दंष्ट्रा असलेला प्राणी इजा करीत असलेल्या मनुष्याची सुटका न करणाऱ्या त्याच्या मालकास प्रथम साहसदंड करावा, त्याला ओरडून हाक मारली असता (तो सुटका करावयास आला नाही तर) दुप्पट दंड करावा. १९ शिंगे किंवा दंष्ट्रा असलेल्या प्राण्यांचा एकमेकाकडून घात घडवून आणणाऱ्याला त्याची किंमत द्यावयास लावून तितकाच दंड करावा.

२० देवांचे पशू, सांड अथवा कालवड यावर बसून जाणाऱ्याला पाचशे पण दंड करावा, त्यांना मारल्यास उत्तम साहसदंड करावा. २१ ज्या लहान पशूंचा त्यांच्या केसासाठी अथवा दुधासाठी, वाहन म्हणून अथवा प्रजोत्पत्तीसाठी उपयोग होतो ते चोरल्यास किंवा मारल्यास त्यांची किंमत द्यावयास लावून तितकाच दंड करावा; याला अपवाद देवकार्य किंवा पितृकार्य यासाठी घेतलेल्या पशूंचा.

२२ वेसण तुटली असता (किंवा) जू मोडले असता, तिरकस किंवा समोरून येणारी किंवा पाठीमागे सरकणारी गाडी असता, (रस्त्यात) पशू व मनुष्य यांची गर्दी असता कोणाला इजा झाली तर गाडीवान दंडास पात्र होत नाही. २३ नाहीतर मनुष्य व पशू यांना इजा केल्याबद्दलचे दंड लागू होतील. २४ मनुष्येतर प्राणी मेल्यास त्याची किंमतसुद्धा दिली पाहिजे. २५ गाडी हाकणारा वयाने लहान असल्यास गाडीत बसलेल्या मालकाला दंड करावा, मालक नसल्यास गाडीत जो असेल त्याला किंवा हाकणारा वयात आला असेल तर त्याला. २६ लहान मुलाच्या ताब्यात असलेली किंवा पुरुष आत नसलेली गाडी सरकारजमा करावी.

कृत्याभिचाराभ्यां यत्परमापादयेत् तदापादयितव्यः । २७ । कामं भार्याया-मनिच्छन्त्यां कन्यायां वा दारार्थिनो भर्तरि भार्याया वा संवदनकरणम् । २८ । अन्यथा हिंसायां मध्यमः साहसदण्डः । २९ ।

मातापित्रोर्भगिनीं मातुलानीमाचार्याणीं स्नुषां दुहितरं भगिनीं वाऽधिचरतस्त्रिलिङ्गच्छेदनं वधश्च । ३० । सकामा तदेव लभेत, दासपरिचारकाहितकभुक्ता च । ३१ ।

ब्राह्मण्यामगुप्तायां क्षत्रियस्योत्तमः, सर्वस्वं वैश्यस्य, शूद्रः कटाग्निना दह्येत । ३२ । सर्वत्र राजभार्यागमने कुम्भीपाकः । ३३ । श्वपाकीगमने कृतकबन्धाङ्कः परविषयं गच्छेत्, श्वपाकत्वं वा शूद्रः । ३४ । श्वपाकस्यार्यागमने वधः, स्त्रियाः कर्णनासाच्छेदनम् । ३५ । प्रव्रजितागमने चतुर्विंशतिपणो दण्डः । ३६ । सकामा तदेव लभेत । ३७ ।

२७ जादूटोणा किंवा मंत्रतंत्र यांच्याद्वारा जी इजा कोणी दुसऱ्यास करू पाहील तीच त्याला भोगावयास लावावी. २८ प्रेम न करणाऱ्या पत्नीवर पतीने, लग्न करू इच्छिणाऱ्याने कुमारिकेवर किंवा पत्नीने पतीवर वशीकरणविद्येचा प्रयोग करण्यास हरकत नाही. २९ अन्यथा कोणास इजा झाल्यास मध्यम साहसदंड करावा.

३० मावशी, आत्या, मामी, आचार्यपत्नी, सून, मुलगी, बहीण यांच्याशी समागम करणाऱ्याचे जननेंद्रिय व वृषण कापावे आणि नंतर वध करावा. ३१ तिची संमती असल्यास तीच शिक्षा तिला करावी; दास, नोकर किंवा गहाण ठेवलेला मनुष्य यांनी भोगलेल्या स्त्रीलाही तशीच शिक्षा करावी.

३२ कोणाच्या संरक्षणाखाली नसलेल्या ब्राह्मण स्त्रीशी समागम करणाऱ्या क्षत्रियास उत्तम साहसदंड करावा, वैश्याची सर्व संपत्ती जप्त करावी, शूद्राला गवताच्या अग्नीत जाळून मारावे. ३३ राजाच्या भार्येशी समागम केल्यास सर्व प्रसंगी मोठ्या कुंभात शिजवून मारावे. ३४ श्वपाकस्त्रीशी समागम केल्यास कपाळावर मस्तकरहित धडाचे चिन्ह करून देशाबाहेर घालवून द्यावे, तो शूद्र असल्यास त्याला श्वपाक करावे. ३५ श्वपाकाने आर्य स्त्रीशी समागम केल्यास वधाची शिक्षा करावी, स्त्रीचे कान व नाक कापून टाकावेत. ३६ घर सोडून निघालेल्या स्त्रीशी समागम केल्यास चोवीस पण दंड करावा. ३७ तिची संमती असल्यास तिलाही तोच दंड करावा.

रूपाजीवायाः प्रसह्योपभोगे द्वादशपणो दण्डः । ३८ । बहूनामेकामधिचरतां पृथक् चतुर्विंशतिपणो दण्डः । ३९ ।

स्त्रियमयोनौ गच्छतः पूर्वः साहसदण्डः, पुरुषमधिमेहतश्च । ४० ।

मैथुने द्वादशपणस्तिर्यग्योनिष्वनात्मनः ।
दैवतप्रतिमानां च गमने द्विगुणः स्मृतः ।। ४१ ।।
अदण्ड्यदण्डने राज्ञो दण्डस्त्रिंशद्गुणोऽम्भसि ।
वरुणाय प्रदातव्यो ब्राह्मणेभ्यस्ततः परम् ।। ४२ ।।
तेन तत्पूयते पापं राज्ञो दण्डापचारजम् ।
शास्ता हि वरुणो राज्ञां मिथ्या व्याचरतां नृषु ।। ४३ ।।

इति कण्टकशोधने चतुर्थेऽधिकरणे अतिचारदण्डाः त्रयोदशोऽध्यायः । आदितो नवतितमः ।

एतावता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य कण्टकशोधनम् चतुर्थमधिकरणम् समाप्तम् ।।

३८ वेश्येशी जबरीने संभोग केल्यास बारा पण दंड करावा. ३९ अनेक पुरुषांनी एका वेश्येशी जबरीने समागम केल्यास त्यांपैकी प्रत्येकाला चोवीस पण दंड करावा.

४० योनीशिवाय अन्यत्र स्त्रीशी समागम करणाऱ्यास, तसेच पुरुषाशी समागम करणाऱ्यास प्रथम साहसदंड करावा.

४१ जनावरांशी संभोग करणाऱ्या मूढ माणसाला बारा पण दंड करावा; आणि देवतांच्या मूर्तीशी तसा व्यवहार केल्यास दुप्पट दंड सांगितला आहे.

४२ दंड करण्यास पात्र नसलेल्याला दंड केला असता त्याच्या तीसपट दंड राजाला करून तो पाण्यात वरुणाला अर्पण करावा आणि त्यानंतर तो ब्राह्मणांना द्यावा.

४३ त्यायोगे शासन करताना होणाऱ्या चुकांमुळे लागणारे राजाचे पाप धुऊन निघते. कारण, वरुण हा लोकांशी अन्यायाने व्यवहार करणाऱ्या राजांचा शासनकर्ता आहे.

चौथे अधिकरण समाप्त

# योगवृत्तम्—पञ्चममधिकरणम्

१

[ एकोननवतितमं प्रकरणम् – दाण्डकर्मिकम् ]

दुर्गराष्ट्रयोः कण्टकशोधनमुक्तम् । १ । राजराज्ययोर्वक्ष्यामः । २ ।

राजानमवगृह्योपजीविनः शत्रुसाधारणा वा ये मुख्यास्तेषु गूढपुरुषप्रणिधिः कृत्यपक्षोपग्रहो वा सिद्धिः यथोक्तं पुरस्ताद्, उपजापोऽपसर्पो वा यथा पारग्रामिके वक्ष्यामः । ३ । राज्योपघातिनस्तु वल्लभाः संहता वा ये मुख्याः प्रकाशमशक्याः प्रतिषेद्धुं दूष्याः तेषु धर्मरुचिरुपांशुदण्डं प्रयुञ्जीत । ४ ।

दूष्यमहामात्रभ्रातरमसत्कृतं सत्री प्रोत्साह्य राजानं दर्शयेत् । ५ । तं राजा दूष्यद्रव्योपभोगातिसर्गेण दूष्ये विक्रमयेत् । ६ । शस्त्रेण रसेन वा विक्रान्तं तत्रैव

## पाचवे अधिकरण – गुप्त व्यवहार

### पहिला अध्याय

### प्रकरण ८९ : गुप्त रीतीने शिक्षा करण्याविषयी

१ दुर्ग आणि राष्ट्र यांना उपद्रव देणाऱ्या कंटकांचा नायनाट कसा करावा ते सांगितले आहे. २ आता राजा आणि त्याचे राज्य यांना उपद्रव देणाऱ्या कंटकांचा नायनाट कसा करावा ते सांगतो.

३ जे मुख्य अधिकारी राजाला कह्यात ठेवून उपजीविका प्राप्त करीत असतील किंवा ज्यांचे शत्रूशी संधान असेल त्यांचा बंदोबस्त करण्याचा उपाय मागे सांगितल्याप्रमाणे गूढ पुरुषांची योजना (१.१२) अथवा फितुरीचा संभव असलेल्यांना वश करून घेणे (१.१३) हा, किंवा पुढे पारग्रामिक (शत्रूचे शहर जिंकून घेण्याविषयीच्या) प्रकरणात सांगणार आहोत त्याप्रमाणे गुप्त चिथावणी (१३.१) अथवा गुप्त हेर (१३.३) हा. ४ परंतु जे मुख्य अधिकारी राजवल्लभ असल्यामुळे अथवा एकजूट करून राजाच्या शासनाचा नाश करीत असताही उघडपणे काढून टाकणे शक्य नसते त्या राजद्रोह्यांच्या बाबतीत धर्माची आवड असणाऱ्या (कर्तव्यदक्ष) राजाने गुप्त शिक्षेची योजना करावी.

५ राजद्रोही अधिकाऱ्याच्या भावाला त्याच्याकडून चांगली वागणूक मिळत नसल्यास गुप्त हेराने त्याला चिथवून राजाकडे आणावे. ६ राजाने

घातयेद् 'भ्रातृघातकोऽयम्' इति ।७। तेन पारशवः परिचारिकापुत्रश्च व्याख्यातौ ।८।

दूष्यमहामात्रं वा सत्त्रिप्रोत्साहितो भ्राता दायं याचेत । ९ । तं दूष्यगृहप्रतिद्वारि रात्रावुपशयानमन्यत्र वा वसन्तं तीक्ष्णो हत्वा ब्रूयाद् 'हतोऽयं दायकामुकः' इति । १० । ततो हतपक्षमुपगृह्येतरं निगृह्णीयात् । ११ । दूष्यसमीपस्था वा सत्त्रिणो भ्रातरं दायं याचमानं घातेन परिभर्त्संयेयुः । १२ । तं रात्रौ इति समानम् । १३ ।

दूष्यमहामात्रयोर्वा यः पुत्रः पितुः पिता वा पुत्रस्य दारानधिचरति, भ्राता वा भ्रातुः, तयोः कापटिकमुखः कलहः पूर्वेण व्याख्यातः । १४ ।

दूष्यमहामात्रपुत्रमात्मसंभावितं वा सत्त्री 'राजपुत्रस्त्वं, शत्रुभयादिह न्यस्तोऽसि' इत्युपजपेत् । १५ । प्रतिपन्नं राजा रहसि पूजयेत् 'प्राप्तयौव-

राजद्रोह्याच्या संपत्तीचा उपभोग घेऊ देण्याचे आश्वासन देऊन त्याला राजद्रोह्याचा वध करण्यास उद्युक्त करावे. ७ त्याने शस्त्राने अथवा विषप्रयोगाने त्याचा खून केल्यास "आपल्या भावाचा ह्याने खून केला आहे" असे म्हणून त्याच गुन्ह्याबद्दल त्याचा वध करावा. ८ याचप्रमाणे राजद्रोह्याचा शूद्र स्त्रीपासून झालेला पुत्र आणि परिचारिकेपासून झालेला पुत्र यांचाही उपयोग करावा.

९ किंवा गुप्त हेराने चिथविलेल्या राजद्रोही अधिकाऱ्याच्या भावाने त्याच्याकडे संपत्तीतील आपल्या हिश्शाची मागणी करावी. १० राजद्रोह्याच्या दाराशी धरणे धरून रात्री तो तेथे झोपला असता किंवा दुसरीकडे रहात असता तीक्ष्ण हेराने त्याला ठार मारून पुकारावे, "संपत्तीत वाटा मागणाऱ्या ह्या माणसाला मारले आहे." ११ नंतर खून झालेल्याची बाजू घेऊन राजाने दुसऱ्याला (राजद्रोह्याला) शासन करावे. १२ किंवा राजद्रोह्याच्या संनिध असणाऱ्या गुप्त हेरांनी संपत्तीत वाटा मागणाऱ्या भावाला ठार मारण्याची धमकी द्यावी. १३ मग रात्री तीक्ष्ण हेराने इत्यादी मागच्याप्रमाणेच.

१४ दोन राजद्रोही अधिकाऱ्यांपैकी जर पुत्र पित्याच्या बायकोशी (सापत्न मातेशी) अथवा पिता पुत्राच्या बायकोशी किंवा भाऊ भावाच्या बायकोशी अनीतिपर संबंध ठेवीत असेल तर त्या दोघात कापटिक हेराच्या द्वारा कलह लावून पुढे काय करायचे ते वरीलप्रमाणेच समजावे.

१५ राजद्रोही अधिकाऱ्याच्या मुलाची स्वतःच्या मोठेपणाविषयी भलतीच कल्पना असल्यास गुप्त हेराने त्याला सुचवावे, "तू खरोखर राजपुत्र आहेस; शत्रूच्या भीतीने तुला येथे ठेवले आहे." १६ त्याचा त्यावर विश्वास बसला म्हणजे राजाने त्याचा एकांतात सन्मान करावा व म्हणावे, "तुला युवराज म्हणून नेमण्याची वेळ आली असताही ह्या अधिकाऱ्याच्या भीतीने मी तुला

राज्यकालं त्वां महामात्रभयान्नाभिषिञ्चामि ' इति । १६ । तं सत्त्री महामात्रवधे योजयेत् । १७ । विक्रान्तं तत्रैव घातयेत् ' पितृघातकोऽयम् ' इति । १८ ।

भिक्षुकी वा दूष्यभार्यां सांवदनिकीभिरौषधीभिः संवास्य रसेनातिसंदध्यात् । १९ ।

इत्याप्यप्रयोगः । २० ।

दूष्यमहामात्रमटवीं परग्रामं वा हन्तुं कान्तारव्यवहिते वा देशे राष्ट्रपालमन्तपालं वा स्थापयितुं नागरस्थानं वा कुपितमवग्रहीतुं सार्थातिवाह्यं प्रत्यन्ते वा सप्रत्यादेयमादातुं फल्गुबलं तीक्ष्णयुक्तं प्रेषयेत् । २१ । रात्रौ दिवा वा युद्धे प्रवृत्ते तीक्ष्णाः प्रतिरोधकव्यञ्जना वा हन्युः ' अभियोगे हतः ' इति । २२ ।

यात्राविहारगतो वा दूष्यमहामात्रान् दर्शनायाह्वयेत् । २३ । ते गूढशस्त्रैस्तीक्ष्णैः सह प्रविष्टा मध्यमकक्ष्यायामात्मविचयमन्तःप्रवेशनार्थं दद्युः । २४ । ततो दौवारिकाभिगृहीतास्तीक्ष्णाः ' दूष्यप्रयुक्ताः स्मः ' इति ब्रूयुः । २५ । ते तदभिविख्याप्य दूष्यान् हन्युः । २६ । तीक्ष्णस्थाने चान्ये वध्याः । २७ ।

अभिषेक करीत नाही. " १७ मग हेराने त्याला अधिकाऱ्याचा वध करण्यास प्रवृत्त करावे. १८ त्याने खून केल्यास त्याच गुन्ह्यासाठी " हा पितृघातक आहे " असे म्हणून त्याचा वध करावा.

१९ किंवा हेर असलेल्या परिव्राजिकेने वशीकरण करणाऱ्या औषधींनी राजद्रोही अधिकाऱ्याच्या पत्नीचा विश्वास संपादन करावा आणि मग विषप्रयोगाने त्याचा निकाल लावावा.

२० हे झाले नातेवाइकांच्या द्वारा करावयाचे प्रयोग.

२१ तीक्ष्ण हेर आत असलेल्या दुर्बल सैन्यानिशी राजद्रोही अधिकाऱ्याला रानटी टोळ्यांचा बीमोड करावयास अथवा शत्रूचे शहर उध्वस्त करावयास, किंवा जंगलातून जावयाचे असलेल्या दूरच्या प्रदेशात राष्ट्रपाल अथवा अंतपाल यांची स्थापना करावयास, किंवा बंड करून उठलेल्या नगराला ताब्यात आणावयास, किंवा सरहद्दीवरील, शत्रू सहज परत घेऊ शकेल अशा प्रदेशासह व्यापारी मार्ग जिंकावयास पाठवावे. २२ दिवसा किंवा रात्री युद्ध जुंपले असता तीक्ष्ण हेरांनी किंवा दरोडेखोरांच्या वेषातील हेरांनी त्याला मारावे, तो लढाईत मेला असे भासविण्यासाठी.

२३ स्वारीवर किंवा सहलीला गेला असता राजाने राजद्रोही अधिकाऱ्यांना भेटीस बोलवावे. २४ शस्त्रे लपविलेल्या तीक्ष्ण हेरांबरोबर ते आले असता मधल्या दालनात आत प्रवेश मिळविण्यासाठी त्यांनी आपली झडती द्यावी. २५ द्वारपालांनी पकडले असता तीक्ष्ण हेरांनी ह्या अधिकाऱ्यांनी (राजाला मारण्यासाठी) आमची योजना केली होती असे सांगावे. २६ ते जाहीर करून

**बहिर्विहारगतो वा दूष्यानासन्नावासान् पूजयेत् । २८ । तेषां देवीव्यञ्जना वा दु:स्त्री रात्रावावासेषु गृह्येत इति समानं पूर्वेण । २९ ।**

**दूष्यमहामात्रं वा ' सूदो भक्षकारो वा ते शोभनः ' इति स्तवेन भक्ष्यभोज्यं याचेत, बहिर्वा क्वचिदध्वगतः पानीयम् । ३० । तदुभयं रसेन योजयित्वा प्रतिस्वादने तावेवोपयोजयेत् । ३१ । तदभिविख्याप्य ' रसदौ ' इति घातयेत् । ३२ ।**

**अभिचारशीलं वा सिद्धव्यञ्जनो ' गोधाकूर्मकर्कटकूटानां लक्षण्यानामन्यतमप्राशनेन मनोरथानवाप्स्यसि ' इति ग्राहयेत् । ३३ । प्रतिपन्नं कर्मणि रसेन लोहमुसलैर्वा घातयेत् ' कर्मव्यापदा हतः ' इति । ३४ ।**

**चिकित्सकव्यञ्जनो वा दौरात्मिकमसाध्यं वा व्याधिं दूष्यस्य स्थापयित्वा भैषज्याहारयोगेषु रसेनातिसंदध्यात् । ३५ । सूदारालिकव्यञ्जना वा प्रणिहिता दूष्यं रसेनातिसंदध्युः । ३६ ।**

द्वारपालांनी राजद्रोही अधिकाऱ्यांना ठार करावे. २७ तीक्ष्ण हेरांच्या जागी वधाची शिक्षा झालेल्या दुसऱ्या गुन्हेगारांना मारावे.

२८ किंवा सहलीला नगराबाहेर गेला असता राजद्रोही अधिकाऱ्यांची आपल्या संनिध रहावयाची सोय करून सन्मान करावा. २९ रात्री त्यांच्या निवासस्थानी राणीचा वेष धारण केलेल्या दुर्वर्तनी स्त्रीला पकडावे; त्यापुढील उपाययोजना पूर्वीप्रमाणेच.

३० किंवा राजद्रोही अधिकाऱ्याकडे " तुझा आचारी किंवा खाद्यपदार्थ बनविणारा फार चांगला आहे " अशी स्तुती करून खाण्याचे पदार्थ मागावेत, किंवा कधी बाहेर गेला असता वाटेत एखाद्या राजद्रोह्याकडे पिण्यास पेय मागावे. ३१ त्या दोहोंत (भक्ष्य व पेय यांत) विष कालवून त्यांनाच ते प्रथम चाखावयास लावावे. ३२ (ते विषयुक्त आहेत हे उघडकीस आल्यावर) ते जाहीर करून विषप्रयोग करणारे म्हणून त्यांचा वध करावा.

३३ किंवा मंत्रतंत्र, जादूटोणा यांची आवड असणाऱ्या राजद्रोह्याच्या मनात सिद्ध हेराने " उत्तम लक्षणांनी युक्त घोरपड, कासव, खेकडा व शिंगे मोडलेला बैल यांच्यापैकी कोणत्याही एका प्राण्याचे स्मशानाग्नीत होम करून उरलेले मांस खाल्ल्यास तुझे मनोरथ सिद्धीस जातील " असे भरवून द्यावे. ३४ त्याला ते पटले तर तो क्रिया करीत असता विषप्रयोगाने अथवा लोखंडी मुसळांनी त्याचा घात करावा आणि " क्रियेमध्ये दोष घडल्यामुळे तो मेला " असे जाहीर करावे.

३५ किंवा वैद्यवेषातील हेराने राजद्रोही अधिकाऱ्याला वाईट लक्षणे असलेला किंवा असाध्य असा रोग जडला आहे असे निदान करून औषध किंवा आहार यांच्या उपयोगाच्या वेळी विषप्रयोगाने त्याचा काटा काढावा. ३६ किंवा आचारी व वाढपे म्हणून त्याच्या घरात ठेवलेल्या गुप्त हेरांनी विषप्रयोगाने राजद्रोही अधिकाऱ्याचा मृत्यू घडवून आणावा.

**इत्युपनिषत्प्रतिषेधः । ३७ ।**

**उभयदूष्यप्रतिषेधस्तु । ३८ । यत्र दूष्यः प्रतिषेद्धव्यस्तत्र दूष्यमेव फल्गुबल-तीक्ष्णयुक्तं प्रेषयेत्, ' गच्छ, अमुष्मिन् दुर्गे राष्ट्रे वा सैन्यमुत्थापय हिरण्यं वा, वल्लभाद्वा हिरण्यमाहारय, वल्लभकन्यां वा प्रसह्यानय, दुर्गसेतुवणिक्पथ-शून्यनिवेशखनिद्रव्यहस्तिवनकर्मणामन्यतमद्वा कारय राष्ट्रपाल्यमन्तपाल्यं वा; यश्च त्वा प्रतिषेधयेन्न वा ते साहाय्यं दद्यात् स बन्धव्यः स्यात् ' इति । ३९ । तथैवेतरेषां प्रेषयेद् ' अमुष्याविनयः प्रतिषेद्धव्यः ' इति । ४० । तमेतेषु कलह-स्थानेषु कर्मप्रतिघातेषु वा विवदमानं तीक्ष्णाः शस्त्रं पातयित्वा प्रच्छन्नं हन्युः । ४१ । तेन दोषेणेतरे नियन्तव्याः । ४२ ।**

**पुराणां ग्रामाणां कुलानां वा दूष्याणां सीमाक्षेत्रखलवेश्ममर्यादासु द्रव्योपकरण-सस्यवाहनहिंसासु प्रेक्षाकृत्योत्सवेषु वा समुत्पन्ने कलहे तीक्ष्णैरुत्पादिते वा तीक्ष्णाः**

३७ हे झाले गुप्त रीतीने (राजद्रोह्यांचा) निकाल लावण्याचे प्रकार.

३८ आता दोन राजद्रोही अधिकाऱ्यांची विल्हेवाट लावण्यासंबंधी. ३९ ज्या ठिकाणी एका राजद्रोह्याचा निकाल लावावयाचा असेल तिकडे दुसऱ्या राज-द्रोह्यालाच तीक्ष्ण हेर आत असलेल्या थोडच्या सैन्यानिशी पाठवावे; त्याला सांगावे, " जा, अमुक दुर्गामध्ये किंवा राष्ट्रामध्ये सैन्याची जमवाजमव कर किंवा पैसे गोळा कर, किंवा राजवल्लभापासून त्याचे धन लुबाडून आण, किंवा वल्लभाच्या कन्येला बळजबरीने घेऊन ये, किंवा किल्ला बांधणे, बंधारा बांधणे, व्यापारी मार्ग सुरू करणे, वस्ती नसलेल्या ठिकाणी वसाहत करणे, खाणी खोदणे, द्रव्यवन व हस्तिवन तयार करणे यांपैकी कोणतेही एक काम सुरू करून घे किंवा राष्ट्रपालाचे काम अथवा अंतपालाचे काम करून घे; आणि जो कोणी तुला प्रतिबंध करील अथवा मदत देणार नाही त्याला अटक करण्यात यावी." ४० त्याचप्रमाणे त्या दुसऱ्या अधिकाऱ्यांना (गुप्तपणे) निरोप पाठवावा, " अमक्या अमक्याच्या जबरीच्या कृत्याला तुम्ही पायबंद घातला पाहिजे." ४१ कलहास कारणीभूत होणाऱ्या ह्या सर्व प्रसंगी अथवा करीत असलेल्या कार्यात विघ्ने उत्पन्न झाल्यामुळे तो भांडत असता तीक्ष्ण हेरांनी गुप्तपणे शस्त्र चालवून त्यास ठार करावे. ४२ त्या अपराधाबद्दल दुसऱ्या राजद्रोह्यांना शिक्षा करावी.

४३ राजद्रोह करणाऱ्या (दोन) शहरांमध्ये, गावांमध्ये अथवा कुटुंबांमध्ये गावाची सीमा, शेताची, खळ्याची, अथवा घराची हद्द यांच्याविषयी, अथवा मालमत्ता, अवजारे, धान्य, अथवा वाहन यांचे नुकसान झाल्यामुळे किंवा नाट्यप्रयोग, धर्मकार्य अथवा उत्सव अशा प्रसंगी, तंटा उत्पन्न झाला असता किंवा तीक्ष्ण हेरांनी उत्पन्न केला असता तीक्ष्ण हेरांनी शस्त्र चालवून पुकारा करावा,

शस्त्रं पातयित्वा ब्रूयुः ' एवं क्रियन्ते येऽमुना कलहायन्ते ' इति । ४३ । तेन दोषेणेतरे नियन्तव्याः । ४४ ।

येषां वा दूष्याणां जातमूलाः कलहास्तेषां क्षेत्रखलवेश्मान्यादीपयित्वा बन्धुसंबन्धिषु वाहनेषु वा तीक्ष्णाः शस्त्रं पातयित्वा तथैव ब्रूयुः ' अमुना प्रयुक्ताः स्मः ' इति । ४५ । तेन दोषेणेतरे नियन्तव्याः । ४६ ।

दुर्गराष्ट्रदूष्यान् वा सत्रिणः परस्परस्यावेशनिकान् कारयेयुः । ४७ । तत्र रसदा रसं दद्युः । ४८ । तेन दोषेणेतरे नियन्तव्याः । ४९ ।

भिक्षुकी वा दूष्यराष्ट्रमुख्यं ' दूष्यराष्ट्रमुख्यस्य भार्या स्नुषा दुहिता वा त्वां कामयते ' इत्युपजपेत् । ५० । प्रतिपन्नस्याभरणमादाय स्वामिने दर्शयेत् ' असौ ते मुख्यो यौवनोत्सिक्तो भार्यां स्नुषां दुहितरं वाऽभिमन्यते ' इति । ५१ । तयोः कलहो रात्रौ इति समानम् । ५२ ।

दूष्यदण्डोपनतेषु तु – युवराजः सेनापतिर्वा किंचिदपकृत्यापक्रान्तो विक्रमेत । ५३ । ततो राजा दूष्यदण्डोपनतानेव प्रेषयेत्फल्गुबलतीक्ष्णयुक्तान् इति समानाः

" जे अमक्या अमक्याबरोबर तंटा करतात त्यांना अशी शिक्षा होते. " ४४ त्या अपराधाबद्दल त्या दुसऱ्यांना जबाबदार धरून शिक्षा करावी.

४५ किंवा ज्या राजद्रोही अधिकाऱ्यांचे आपसातील वैमनस्य खूप खोलवर रुजले असेल त्यांच्या शेतांना, खळ्यांना अथवा घरांना आग लावून देऊन किंवा त्यांचे आप्त, संबंधी अथवा वाहन यांच्यावर शस्त्र चालवून तीक्ष्ण हेरांनी वरच्याप्रमाणेच पुकारा करावा, " अमक्या अमक्याने आम्हाला हे करावयास सांगितले आहे. " ४६ त्या अपराधाबद्दल त्या दुसऱ्यांना शिक्षा करावी.

४७ किंवा दुर्गातील राजद्रोही अधिकारी व बाहेरच्या प्रदेशातील राजद्रोही अधिकारी यांना गुप्त हेरांनी एकमेकाचे पाहुणे होण्यास प्रवृत्त करावे. ४८ तेथे विष देणाऱ्या हेरांनी पाहुण्यांवर विषप्रयोग करावा. ४९ त्या अपराधाबद्दल यजमानांना शासन करावे.

५० किंवा बाहेरच्या प्रदेशातील राजद्रोही अधिकाऱ्याला भिक्षुकी वेषातील हेर स्त्रीने " अमुक राजद्रोही अधिकाऱ्याची पत्नी, सून किंवा मुलगी तुझ्यावर प्रेम करते " असे सुचवावें. ५१ त्याचा त्यावर विश्वास बसला म्हणजे भेट देण्यासाठी म्हणून त्याच्याकडून दागिने घेऊन ते त्या स्त्रियांच्या पालनकर्त्याला नेऊन दाखवावेत व म्हणावे, " अमुक अधिकारी यौवनाने उन्मत्त होऊन तुझ्या पत्नीची, सुनेची अथवा मुलीची अभिलाषा करतो." ५२ त्यांचे भांडण जुंपले असता रात्री तीक्ष्ण हेरांनी इत्यादी सर्व पूर्वीप्रमाणे.

५३ परंतु सैन्य अर्पण करून शरण आलेले मांडलीक द्रोह करू लागल्यास, त्यांच्या संबंधात – युवराजाने अथवा सेनापतीने अल्पसा अपराध करून निघून जावे आणि बंड उभारल्यासारखे करावे. ५४ मग राजाने त्या द्रोह करणाऱ्या

**सर्व एव योगाः । ५४ । तेषां च पुत्रेष्वनुक्षियत्सु यो निर्विकारः स पितृदायं लभेत । ५५ ।**

**एवमस्य पुत्रपौत्राननुवर्तते राज्यमपास्तपुरुषदोषम् । ५६ ।**

**स्वपक्षे परपक्षे वा तूष्णीं दण्डं प्रयोजयेत् ।**
**आयत्यां च तदात्वे च क्षमावानविशङ्कितः ॥ ५७ ॥**

**इति योगवृत्ते पञ्चमेऽधिकरणे दाण्डकर्मिकं प्रथमोऽध्यायः । आदित एकनवतितमः ।**

## २

## [ नवतितमं प्रकरणम् – कोशाभिसंहरणम् ]

**कोशमकोशः प्रत्युत्पन्नार्थकृच्छ्रः संगृह्णीयात् । १ ।**

**जनपदं महान्तमल्पप्रमाणं वाऽदेवमातृकं प्रभूतधान्यं धान्यस्यांशं तृतीयं चतुर्थं वा याचेत, यथासारं मध्यममवरं वा । २ । दुर्गसेतुकर्मवणिक्पथशून्यनिवेशखनिद्रव्यहस्तिवनकर्मोपकारिणं प्रत्यन्तमल्पप्रमाणं वा न याचेत । ३ ।**

मांडलिकांनाच तीक्ष्ण हेर आत असलेल्या क्षुल्लक सैन्यानिशी (पारिपत्य करण्यासाठी म्हणून) पाठवावे, इत्यादी सर्व मागचेच प्रयोग. ५५ आणि त्या मांडलिकांच्या मृत्यूनंतर त्यांच्या मागे राहिलेल्या मुलांपैकी ज्याच्यात (द्रोहाची) विकृती उत्पन्न झाली नसेल त्याला पित्याचा वारस ठरवावे.

५६ याप्रमाणे मनुष्यकृत दोषांपासून मुक्त झालेले राजाचे राज्य पुत्र, पौत्र यप्रमाणे वंशपरंपरा टिकून रहाते.

५७ राजाने भविष्यकाळाच्या व वर्तमानकाळाच्या दृष्टीने क्षमाशील राहून आपल्या पक्षातील व शत्रुपक्षातील लोकांवर ‘ गुप्त ’ शिक्षेचा प्रयोग निःशंकपणे करावा.

## दुसरा अध्याय

## प्रकरण ९० : रिकामा खजिना भरून काढणे

१ रिता खजिना असलेल्या राजाने, आर्थिक संकट उपस्थित झाले असता, खजिना भरून काढावा.

२ पावसावर अवलंबून नसणाऱ्या व खूप धान्य पिकविणाऱ्या मोठया किंवा लहान आकाराच्या जनपदाकडे तेथील धान्याच्या एकतृतीयांश किंवा एकचतुर्थांश हिश्शाची मागणी करावी, मध्यम प्रतीच्या किंवा कनिष्ठ प्रतीच्या जनपदांकडे त्यांच्या पिकांच्या दर्जाप्रमाणे मागणी करावी. ३ ज्या प्रदेशाचा दुर्ग बांधणे, पाटबंधारे बांधणे, व्यापारी मार्ग, नवीन वसाहती, खाणी, द्रव्यवन किंवा हस्तिवन प्रस्थापित करणे ह्या कामासाठी उपयोग होतो त्याच्याकडे किंवा सरहद्दीवरील लहान प्रदेशाकडे अशी मागणी करू नये.

**धान्यपशुहिरण्यादि निविशमानाय दद्यात् । ४ ।**

**चतुर्थमंशं धान्यानां बीजभक्तशुद्धं च हिरण्येन क्रीणीयात् । ५ । अरण्यजातं श्रोत्रियस्वं च परिहरेत् । ६ । तदप्यनुग्रहेण क्रीणीयात् । ७ ।**

**तस्याकरणे वा समाहर्तृपुरुषा ग्रीष्मे कर्षकाणामुद्वापं कारयेयुः । ८ । प्रमादावस्कन्नस्यात्ययं द्विगुणमुदाहरन्तो बीजकाले बीजलेख्यं कुर्युः । ९ । निष्पन्ने हरितपक्वादानं वारयेयुः, अन्यत्र शाककटभङ्गमुष्टिभ्यां देवपितृपूजादानार्थं गवार्थं वा । १० । भिक्षुकग्रामभृतकार्थं च राशिमूलं परिहरेयुः । ११ । स्वसस्यापहारिणः प्रतिपातोऽष्टगुणः । १२ । परसस्यापहारिणः पञ्चाशद्गुणः सीतात्ययः स्ववर्गस्य, बाह्यस्य तु वधः । १३ ।**

**चतुर्थमंशं धान्यानां षष्ठं वन्यानां तूललाक्षाक्षौमवल्ककार्पासरौमकौशेयकौषधगन्धपुष्पफलशाकपण्यानां काष्ठवेणुमांसवल्लूराणां च गृह्णीयुः, दन्ताजिनस्यार्धम् । १४ । तदनिसृष्टं विक्रीणानस्य पूर्वः साहसदण्डः । १५ ।**

४ नवीन वसाहत करणाऱ्याला धान्य, पशू व द्रव्य मदतीदाखल द्यावे.

५ बियाण्यासाठी व उपजीविकेसाठी लागणारे धान्य वजा जाता राहिलेल्या धान्याचा एकचतुर्थांश भाग पैसे देऊन विकत घ्यावा. ६ अरण्यात उत्पन्न झालेले व श्रोत्रिय ब्राह्मणांच्या मालकीचे धान्य घेऊ नये. ७ परंतु तेसुद्धा त्यांना फायदेशीर होईल अशा रीतीने विकत घेण्यास हरकत नाही.

८ एवढे करून जर भागले नाही तर समाहर्त्याच्या हाताखालच्या (गोप व स्थानिक ह्या) अधिकाऱ्यांनी उन्हाळ्यात शेतकऱ्यांकडून जमिनीची मशागत करून घ्यावी. ९ पेरण्या करण्याच्या वेळेस शेतकऱ्यांच्या चुकांमुळे पीक जितके कमी येईल त्याच्या दुप्पट दंड होईल अशा अर्थाचा करार असलेला बियाणे दिल्याचा लेख करावा. १० पीक उगवल्यावर हिरवे अथवा पक्व झालेले धान्य घेण्यास मनाई करावी, फक्त देवपूजेसाठी, श्राद्धासाठी अथवा गाईसाठी मूठभर भाजी अथवा हाताने तोडलेले धान्य घेऊ द्यावे. ११ रास काढून नेल्यावर जमिनीवर राहिलेले धान्य भिक्षुक व गावकामगार यांच्यासाठी राहू द्यावे. १२ स्वतः उत्पन्न केलेले पीक चोरणाऱ्याकडून हानीच्या आठपट भरपाई वसूल करावी. १३ दुसऱ्याने उत्पन्न केलेले पीक चोरणाऱ्याकडून, तो त्याच वर्गातील (म्हणजे शेतकरी) असल्यास, पन्नासपट धान्यदंड वसूल करावा, दुसऱ्या वर्गातील असल्यास त्याचा वध करावा.

१४ त्यांनी धान्याचा एकचतुर्थांश भाग, वनातील उत्पादनाचा, तसेच रुई, लाख, ताग, वल्क, कापूस, लोकर, रेशीम, औषधे, सुगंधी द्रव्ये, फुले, फळे आणि भाजीपाला ह्या पदार्थांचा आणि लाकडे, वांबू, ताजे आणि सुकविलेले मांस यांचा एकषष्ठांश भाग घ्यावा, हस्तिदंत व मृगचर्म यांचा अर्धा भाग घ्यावा. १५ परवानगीशिवाय ते विकणाऱ्यास प्रथम साहसदंड करावा.

इति कर्षकेषु प्रणयः । १६ ।

सुवर्णरजतवज्रमणिमुक्ताप्रवालाश्वहस्तिपण्याः पञ्चाशत्कराः । १७ । सूत्रवस्त्रताम्रवृत्तकंसगन्धभैषज्यशीधुपण्याश्चत्वारिंशत्कराः । १८ । धान्यरसलोहपण्याः शकटव्यवहारिणश्च त्रिंशत्कराः । १९ । काचव्यवहारिणो महाकारवश्च विंशतिकराः । २० । क्षुद्रकारवो बन्धकीपोषकाश्च दशकराः । २१ । काष्ठवेणुपाषाणमृद्भाण्डपक्वान्नहरितपण्याः पञ्चकराः । २२ । कुशीलवा रूपाजीवाश्च वेतनार्धं दद्युः । २३ । हिरण्यकरं कर्मण्यानाहारयेयुः, न चैषां कंचिदपराधं परिहरेयुः । २४ । ते ह्यपरिगृहीतमभिनीय विक्रीणीरन् । २५ ।

इति व्यवहारिषु प्रणयः । २६ ।

कुक्कुटसूकरमर्धं दद्यात्, क्षुद्रपशवः षड्भागम्, गोमहिषाश्वतरखरोष्ट्राश्च दशभागम् । २७ ।

बन्धकीपोषका राजप्रेष्याभिः परमरूपयौवनाभिः कोशं संहरेयुः । २८ ।

१६ ही झाली शेतकऱ्यांकडे करावयाची मागणी.

१७ सोने, रुपे, हिरे, रत्ने, मोती, पोवळी, घोडे व हत्ती यांचा व्यापार करणाऱ्यांकडून पन्नास पण (खास) कराची मागणी करावी. १८ सूत, कापड, तांबे, पोलाद, कासे, सुगंधी द्रव्ये, औषधे व दारू यांचा व्यापार करणाऱ्यांवर चाळीस पण (खास) कर बसवावा. १९ धान्य, द्रव पदार्थ व लोखंड यांचा व्यापार करणाऱ्यांवर, तसेच गाड्यांचा व्यवहार करणाऱ्यांवर तीस पण कर. २० काचेचा व्यवहार करणारे आणि मोठे कारागीर यांच्यावर वीस पण कर. २१ छोटे कारागीर व कुंटणखाना चालविणारे यांच्यावर दहा पण कर. २२ लाकूड, बांबू, दगड व माती यांपासून बनविलेल्या वस्तूंचा आणि शिजविलेले अन्न व हिरवा भाजीपाला यांचा व्यापार करणाऱ्यांवर पाच पण कर. २३ नटनर्तकादी कुशीलव व वेश्या यांनी त्यांच्या (एका वेळेच्या)कमाईचा अर्धा भाग (खास कर म्हणून) द्यावा. २४ आपल्या कामात कुशल असलेल्यांकडून पैशाच्या रूपातील खास कर लुवाडून घ्यावा व त्यांच्या कोणत्याही अपराधाबद्दल त्यांची गय करू नये. २५ कारण, तो माल आपल्या मालकीचा नाही अशी बतावणी करून तो ते विकतील.

२६ ही झाली व्यापाऱ्यांकडे करावयाची मागणी.

२७ कोंबडी व डुकरे यांचा अर्धा भाग द्यावा, लहान पशूंचा सहावा भाग आणि गाई, म्हशी, खेचरे, गाढव व उंट यांचा दहावा भाग द्यावा.

२८ कुंटणखाने चालविणाऱ्यांनी राजाच्या नोकरीतील अतिशय सुंदर व तरुण स्त्रियांच्या द्वारा खजिन्यात भर घालावी.

**इति योनिपोषकेषु प्रणयः । २९ ।**

**सकृदेव न द्विः प्रयोज्यः । ३० ।**

**तस्याकरणे वा समाहर्ता कार्यमपदिश्य पौरजानपदान् भिक्षेत । ३१ । योगपुरुषाश्चात्र पूर्वमतिमात्रं दद्युः । ३२ । एतेन प्रदेशेन राजा पौरजानपदान् भिक्षेत । ३३ । कापटिकाश्चैनानल्पं प्रयच्छतः कुत्सयेयुः । ३४ । सारतो वा हिरण्यमाढ्यान् याचेत, यथोपकारं वा, स्ववशा वा यदुपहरेयुः । ३५ । स्थानच्छत्रवेष्टनविभूषाश्चैषां हिरण्येन प्रयच्छेत् । ३६ ।**

**पाषण्डसंघद्रव्यमश्रोत्रियोपभोग्यं देवद्रव्यं वा कृत्यकराः प्रेतस्य दग्धगृहस्य वा हस्ते न्यस्तमित्युपहरेयुः । ३७ । देवताध्यक्षो दुर्गराष्ट्रदेवतानां यथास्वमेकस्थं कोशं कुर्यात्, तथैव चोपहरेत् । ३८ ।**

**दैवतचैत्यं सिद्धपुण्यस्थानमौपपादिकं वा रात्रावुत्थाप्य यात्रासमाजाभ्यामाजीवेत् । ३९ । चैत्योपवनवृक्षेण वा देवताभिगमनमनार्तवपुष्पफलयुक्तेन ख्यापयेत्**

२९ ही झाली जनावरांची पैदास करणारे व वेश्यांना पोसणारे यांच्याकडे करावयाची मागणी.

३० अशा तऱ्हेच्या ह्या मागण्या फक्त एकदाच कराव्यात, दुसऱ्यांदा नाही.

३१ इतके करूनही जर काम भागले नाही तर समाहर्त्याने करावयाचे असलेल्या एखाद्या कामासाठी म्हणून नगरवासी व जनपदनिवासी यांच्याकडे पैशाची मदत मागावी. ३२ आणि गूढ पुरुषांनी त्यासाठी प्रथम खूप मोठमोठ्या रकमा द्याव्यात. ३३ त्यांचा निर्देश करून राजाने पौर व जानपद यांच्याकडे त्या प्रमाणात देणगीची मागणी करावी. ३४ आणि जे कमी देऊ करतील त्यांची कापटिक हेरांनी निर्भर्त्सना करावी. ३५ किंवा श्रीमंत लोकांकडे त्यांच्या संपत्तीच्या प्रमाणात पैशाची मागणी करावी, किंवा त्यांच्यावर काही उपकार केला असेल त्या प्रमाणात मागावे; किंवा ते होऊन जे देतील ते घ्यावे. ३६ आणि त्यांना पैशाच्या मोबदल्यात मानाची जागा, छत्र, पगडी व भूषणे द्यावीत.

३७ पाखंडी संघांच्या मालकीचे द्रव्य किंवा श्रोत्रिय ब्राह्मण ज्याचा उपयोग करीत नाहीत असे देवालयांचे द्रव्य तेथील व्यवस्था पहाणाऱ्यांनी ज्याच्याकडे ते होते तो मयत झाला आहे किंवा ज्या घरात ते ठेवले होते ते आगीत जळून गेले आहे असे म्हणून खजिन्यात आणून जमा करावे. ३८ देवस्थानांवरील अध्यक्षाने दुर्गातील देवळांचे व बाहेरच्या प्रदेशातील देवळांचे द्रव्य पृथक्पणे एकत्रित करावे आणि वरच्याप्रमाणेच तिजोरीत जमा करावे.

३९ रात्रीतून एकाएकी प्रकट झालेले देवतेचे मंदिर अथवा सिद्ध पुरुषाचे पवित्र ठिकाण उभे करून यात्रा किंवा मेळावा भरवून पैसे मिळवावेत. ४० किंवा

। ४० । मनुष्यकरं वा वृक्षे रक्षोभयं प्ररूपयित्वा सिद्धव्यञ्जनाः पौरजानपदानां हिरण्येन प्रतिकुर्युः । ४१ । सुरुङ्गायुक्ते वा कूपे नागमनियतशिरस्कं हिरण्योपहारेण दर्शयेत् । ४२ । नागप्रतिमायामन्तश्छन्नायां चैत्यच्छिद्रे वल्मीकच्छिद्रे वा सर्पदर्शनमाहारेण प्रतिबद्धसंज्ञं कृत्वा श्रद्दधानानां दर्शयेत् । ४३ । अश्रद्दधानानामाचमनप्रोक्षणेषु रसमुपचार्य देवताभिशापं ब्रूयात्, अभित्यक्तं वा दंशयित्वा । ४४ । योगदर्शनप्रतीकारेण वा कोशाभिसंहरणं कुर्यात् । ४५ ।

वैदेहकव्यञ्जनो वा प्रभूतपण्यान्तेवासी व्यवहरेत । ४६ । स यदा पण्यमूल्ये निक्षेपप्रयोगैरुपचितः स्यात्तदैनं रात्रौ मोषयेत् । ४७ । एतेन रूपदर्शकः सुवर्णकारश्च व्याख्यातौ । ४८ । वैदेहकव्यञ्जनो वा प्रख्यातव्यवहारः प्रहवणनिमित्तं याचितकमवक्रीतकं वा रूप्यसुवर्णभाण्डमनेकं गृह्णीयात् । ४९ । समाजे वा

चैत्याच्या बगीच्यातील एखाद्या वृक्षाला त्यांचा ऋतू नसताही फुले व फळ आलेली दाखवून तेथे देवता उपस्थित झाली आहे अशी प्रसिद्धी करावी. ४१ किंवा सिद्ध पुरुषाच्या वेषातील हेरांनी एखाद्या झाडावर कररूपाने मनुष्याचा बळी मागणारा राक्षस वास करतो अशी भीती दाखवून पुरवासी व जनपदनिवासी यांच्याकडून पैसे घेऊन त्या संकटाचे निवारण करावे. ४२ किंवा भुयारी मार्गाने जोडलेल्या विहिरीत अनेक फणा असलेला नाग पैशाच्या रूपात दक्षिणा घेऊन दाखवावा. ४३ चैत्यस्थानातील बिळात अथवा वारुळाच्या बिळात आत लपवून ठेवलेल्या नागाच्या प्रतिमेत आहाराने संज्ञाहीन केलेल्या सापाचे दर्शन श्रद्धाळू लोकांना (पैशाच्या मोबदल्यात) घडवावे. ४४ जे त्यावर विश्वास ठेवणार नसतील त्यांच्या आचमनाच्या अथवा अंगावर शिंपडण्याच्या पाण्यात विष कालवून तो देवतेचा शाप आहे असे जाहीर करावे, किंवा वधाची शिक्षा झालेल्या गुन्हेगाराला सापाचा दंश करवून (देवतेचा शाप आहे असे जाहीर करावे). ४५ किंवा अद्भुत चमत्कारांचे दर्शन झाले असता त्यांच्या निवारणासाठी पैसे घेऊन तिजोरीत भर टाकावी.

४६ किंवा व्यापाऱ्याच्या वेषातील हेराने पुष्कळ माल व नोकरचाकर ठेवून धंदा करावा. ४७ मालाच्या किमतीच्या तारणावर घेतलेल्या ठेवी व कर्ज त्याच्याजवळ खूप साचली म्हणजे त्याच्याकडे रात्री चोरी करवावी. ४८ याचप्रमाणे (तपासण्यासाठी लोकांची नाणी गोळा करणाऱ्या) नाणी तपासणाऱ्या अधिकाऱ्याचा व (दागिने करण्यासाठी सोनेचांदी स्वीकारणाऱ्या) सुवर्णकाराचा उपयोग करून घ्यावा. ४९ किंवा ज्याचे व्यवहार प्रसिद्ध आहेत अशा वैदेहक हेराने सहलीच्या निमित्ताने सोन्यारुप्याचे पुष्कळ जिन्नस उसने अथवा भाड्याने घ्यावेत. ५० अथवा एखाद्या मेळ्याच्या प्रसंगी सर्व माल एकत्र आणून त्याच्या तारणावर खूप पैसे व सोने कर्ज म्हणून घ्यावे आणि प्रत्येक

**सर्वपण्यसंदोहेन प्रभूतं हिरण्यसुवर्णमृणं गृह्णीयात्, प्रतिभाण्डमूल्यं च । ५० । तदुभयं रात्रौ मोषयेत् । ५१ ।**

**साध्वीव्यञ्जनाभिः स्त्रीभिर्दूष्यानुन्मादयित्वा तासामेव वेश्मस्वभिगृह्य सर्वस्वान्याहरेयुः । ५२ ।**

**दूष्यकुल्यानां वा विवादे प्रयुत्पन्ने रसदाः प्रणिहिता रसं दद्युः । ५३ । तेन दोषेणेतरे पर्यादातव्याः । ५४ ।**

**दूष्यमभित्यक्तो वा श्रद्धेयापदेशं पण्यं हिरण्यनिक्षेपमृणप्रयोगं दायं वा याचेत । ५५ । दासशब्देन वा दूष्यमालम्बेत, भार्यामस्य स्नुषां दुहितरं वा दासीशब्देन भार्याशब्देन वा । ५६ । तं दूष्यगृहप्रतिद्वारि रात्रावुपशयानमन्यत्र वा वसन्तं तीक्ष्णो हत्वा ब्रूयात् ' हतोऽयमर्थकामुकः ' इति । ५७ । तेन दोषेणेतरे पर्यादातव्याः । ५८ ।**

**सिद्धव्यञ्जनो वा दूष्यं जम्भकविद्याभिः प्रलोभयित्वा ब्रूयात् ' अक्षयहिरण्यं राजद्वारिकं स्त्रीहृदयमरिव्याधिकरमायुष्यं पुत्रीयं वा कर्म जानामि ' इति । ५९ ।**

वस्तूची किंमतही (विकत घेणाऱ्याकडून आगाऊ) घ्यावी. ५१ रात्री त्या दोहोंची (कर्ज व किंमत यांची) चोरी करवावी.

५२ साध्वी म्हणून मिरवणाऱ्या स्त्रीहेरांकरवी राजद्रोह्यांना त्यांच्या नादी लावून त्यांना त्यांच्याच घरात पकडून (साध्वी स्त्रिया भ्रष्ट करण्याच्या आरोपावरून) त्यांची सर्व मालमत्ता जप्त करावी.

५३ किंवा राजद्रोही कुटुंबांमध्ये तंटा उत्पन्न झाल्यास तेथे ठेवलेल्या रसद हेरांनी विषप्रयोग करावा. ५४ त्या अपराधाबद्दल दुसऱ्यांची मालमत्ता जप्त करावी.

५५ किंवा वधाची शिक्षा झालेल्या माणसाने राजद्रोह्याकडे जाऊन विश्वास बसेल अशी सबब सांगून त्याच्याकडे मालाची, पैशाच्या ठेवीची, कर्जफेडीची अथवा वारसाहक्काची मागणी करावी. ५६ किंवा त्याने राजद्रोह्याला दास म्हणून संबोधावे अथवा त्याच्या पत्नीला, सुनेला किंवा मुलीला दासी म्हणून किंवा भार्या म्हणून संबोधावे. ५७ तो रात्री राजद्रोह्याच्या दाराशी धरणे धरून निजला असता अथवा दुसरीकडे रहात असता तीक्ष्ण हेराने त्यास ठार मारावे आणि "पैशाच्या ह्या लोभी माणसाला मारले आहे" असा पुकारा करावा. ५८ त्या अपराधाबद्दल दुसऱ्यांची मालमत्ता जप्त करावी.

५९ किंवा सिद्ध वेषातील हेराने राजद्रोह्याला जादूच्या विद्यांनी भुलवून म्हणावे, "मला कधीही क्षय न होणारे द्रव्य मिळविण्याची विद्या, राजदरबारी स्थान प्राप्त करून देणारी विद्या, स्त्रीचे प्रेम मिळविण्याची विद्या, शत्रूला व्याधिग्रस्त करण्याची विद्या, दीर्घ आयुष्य प्राप्त करण्याची विद्या, पुत्रप्राप्ती

**प्रतिपन्नं चैत्यस्थाने रात्रौ प्रभूतसुरामांसगन्धमुपहारं कारयेत् । ६० । एकरूपं चात्र हिरण्यं पूर्वनिखातं प्रेताङ्गं प्रेतशिशुर्वा यत्र निहितः स्यात्, ततो हिरण्यमस्य दर्शयेद् 'अत्यल्पम्' इति च ब्रूयात् । ६१ । 'प्रभूतहिरण्यहेतोः पुनरुपहारः कर्तव्य इति स्वयमेवैतेन हिरण्येन श्वोभूते प्रभूतमौपहारिकं क्रीणीहि' इति । ६२ । स तेन हिरण्येनौपहारिकक्रये गृह्येत । ६३ ।**

**मातृव्यञ्जनया वा 'पुत्रो मे त्वया हतः' इत्यवरूपितः स्यात् । ६४ । संसिद्धमेवास्य रात्रियागे वनयागे वनक्रीडायां वा प्रवृत्तायां तीक्ष्णा विशस्याभित्यक्तमतिनयेयुः । ६५ ।**

**दूष्यस्य वा भृतकव्यञ्जनो वेतनहिरण्ये कूटरूपं प्रक्षिप्य प्ररूपयेत् । ६६ ।**

**कर्मकरव्यञ्जनो वा गृहे कर्म कुर्वाणः स्तेनकूटरूपकारकोपकरणमुपनिदध्यात्, चिकित्सकव्यञ्जनो वा गरमगदापदेशेन । ६७ ।**

**प्रत्यासन्नो वा दूष्यस्य सत्त्री प्रणिहितमभिषेकभाण्डममित्रशासनं च कापटिकमुखेनाचक्षीत, कारणं च ब्रूयात् । ६८ ।**

करण्याची विद्या हे सर्व अवगत आहे." ६० त्याला ते पटले म्हणजे त्याला रात्री चैत्याच्या ठिकाणी खूप मद्य, मांस व सुगंधी द्रव्ये यांची भेट अर्पण करावयास लावावे. ६१ आणि तेथे ज्या ठिकाणी एक नाणे अगोदर पुरून ठेवलेले असेल (आणि वर खुणेसाठी) प्रेताचा अवयव अथवा बालकाचे प्रेत ठेवलेले असेल तेथून ते नाणे काढून त्याला दाखवावे व म्हणावे, " हे द्रव्य फार थोडे आहे. ६२ पुष्कळ द्रव्य प्राप्त करण्यासाठी पुन्हा भेट अर्पण केली पाहिजे, तेव्हा तू स्वतःच उद्या ह्या पैशाने खूपसे भेटीचे पदार्थ विकत आण." ६३ त्या पैशाने तो भेटीच्या वस्तू विकत घेत असता त्याला पकडावे.

६४ किंवा आई म्हणून बहाणा करणाऱ्या स्त्रीहेराने राजद्रोह्यावर " तू माझा मुलगा मारला आहेस " असा आरोप करावा. ६५ (तो सिद्ध करण्यासाठी) तीक्ष्ण हेरांनी त्या राजद्रोह्याच्या रात्रीच्या यज्ञात, वनातील यज्ञात किंवा त्याची वनक्रीडा चालू असता ज्याच्या वधाची वेळ आली आहे अशाच वधाची शिक्षा झालेल्या गुन्हेगारास ठार मारून गुप्तपणे नेऊन ठेवावे.

६६ किंवा राजद्रोह्याचा नोकर म्हणून असलेल्या हेराने पगाराच्या मिळालेल्या पैशांत खोटे नाणे मिसळून ते (अधिकाऱ्यांच्या) नजरेस आणावे.

६७ किंवा कामगाराच्या वेषातील हेराने राजद्रोह्याच्या घरी काम करीत असता चोरीची किंवा खोटी नाणी पाडण्याची उपकरणे तेथे ठेवून द्यावीत, किंवा वैद्याच्या वेषातील हेराने औषध म्हणून विष तेथे ठेवून द्यावे.

६८ किंवा राजद्रोही माणसाच्या निकटवर्ती सत्री हेराने तेथे ठेवलेली राज्याभिषेकाची सामुग्री व शत्रूकडचे म्हणून आलेले पत्र यांची बातमी कापटिक

**एवं दूष्येष्वधार्मिकेषु च वर्तेत, नेतरेषु । ६९ ।**

**पक्वं पक्वमिवारामात्फलं राज्यादवाप्नुयात् ।**
**आत्मच्छेदभयादामं वर्जयेत्कोपकारकम् ॥ ७० ॥**

**इति योगवृत्ते पञ्चमेऽधिकरणे कोशाभिसंहरणं द्वितीयोऽध्यायः । आदितो द्विनवतितमः ।**

**३**

## [ एकनवतितमं प्रकरणम् – भृत्यभरणीयम् ]

**दुर्गजनपदशक्त्या भृत्यकर्म समुदयपादेन स्थापयेत्, कार्यसाधनसहेन वा भृत्यलाभेन । १ । शरीरमवेक्षेत, न धर्मार्थौ पीडयेत् । २ ।**

**ऋत्विगाचार्यमन्त्रिपुरोहितसेनापतियुवराजराजमातृराजमहिष्योऽष्टचत्वारिंशत्साहस्राः । ३ । एतावता भरणेनानास्पद्यत्वमकोपकं चैषां भवति । ४ ।**

**दौवारिकान्तर्वंशिकप्रशास्तृसमाहर्तृसंनिधातारश्चतुर्विंशतिसाहस्राः । ५ । एतावता कर्मण्या भवन्ति । ६ ।**

हेराच्या द्वारा अधिकाऱ्यांच्या कानावर घालावी आणि त्याचा उद्देश काय तो सांगावा.

६९ राजद्रोही व अधार्मिक अशा लोकांच्या बाबतीतच याप्रकारचे वर्तन करावे, इतरांच्या नाही.

७० बागेतून ज्याप्रमाणे पिकत चाललेली फळे घेतात त्याप्रमाणे राजाने राज्यातून पक्व होत चाललेले उत्पन्न काढून घ्यावे. जे कच्चे असेल ते प्रकृतींच्या उठावास कारणीभूत होते यास्तव स्वतःच्या विनाशाच्या भीतीने घेऊ नये.

### तिसरा अध्याय

### प्रकरण ९१ : नोकर लोकांच्या पगारांविषयी

१ दुर्ग आणि जनपद यांची जशी शक्ती असेल त्याप्रमाणे एकूण उत्पन्नाच्या एकचतुर्थांश त्यावर खर्च होईल अशा प्रकारे नोकरांचे काम (व त्यासाठी वेतन) ठरवून द्यावे, किंवा त्यांचे कार्य सिद्ध करण्यासाठी आवश्यक असे उत्पन्न नोकरांना प्राप्त होईल असे (वेतन ठरवावे). २ उत्पन्नाच्या बाबींकडे लक्ष द्यावे, धर्म व अर्थ यांची हानी होऊ देऊ नये.

३ ऋत्विज, आचार्य, मंत्री, पुरोहित, सेनापती, युवराज, राजमाता व ज्येष्ठ राणी यांना प्रत्येकी अठ्ठेचाळीस हजार पण (वर्षाला) द्यावेत. ४ त्यांना एवढी प्राप्ती झाली म्हणजे ते (शत्रूच्या कारवायांना) बळी पडणार नाहीत व बंड करून उठण्यास प्रवृत्त होणार नाहीत.

५ द्वारपालांवरील मुख्य, राजवाड्याच्या रक्षकांवरील मुख्य, सैन्याच्या स्वारीतील मुक्कामांची व्यवस्था पहाणारा, समाहर्ता व संनिधाता यांना प्रत्येकी

कुमारकुमारमातृनायकपौरव्यावहारिककार्मान्तिकमन्त्रिपरिषद्राष्ट्रान्तपालाश्च द्वादशसाहस्राः । ७ । स्वामिपरिबन्धबलसहाया ह्येतावता भवन्ति । ८ ।

श्रेणीमुख्या हस्त्यश्वरथमुख्याः प्रदेष्टारश्चाष्टसाहस्राः । ९ । स्ववर्गानुकर्षिणो ह्येतावता भवन्ति । १० ।

पत्त्यश्वरथहस्त्यध्यक्षा द्रव्यहस्तिवनपालाश्च चतुःसाहस्राः । ११ ।

रथिकानीकस्थचिकित्सकाश्वदमकवर्धकयो योनिपोषकाश्च द्विसाहस्राः । १२ ।

कार्तान्तिकनैमित्तिकमौहूर्तिकपौराणिकसूतमागधाः पुरोहितपुरुषाः सर्वाध्यक्षाश्च साहस्राः । १३ ।

शिल्पवन्तः पादाताः संख्यायकलेखकादिवर्गश्च पञ्चशताः । १४ ।

कुशीलवास्त्वर्धतृतीयशताः, द्विगुणवेतनाश्चैषां तूर्यकराः । १५ ।

कारुशिल्पिनो विंशतिशतिकाः । १६ ।

चोवीस हजार पण द्यावेत. ६ एवढ्या उत्पन्नामुळे ते आपल्या कामात तत्पर राहतील.

७ राजकुमार, राजकुमारांच्या माता (इतर राण्या), सैन्याचा नायक, नगरवासियांचे कज्जे चालविणारा (न्यायाधीश), कारखान्यांवरील मुख्य, मंत्रिपरिषदेचे सदस्य, राष्ट्रपाल व अंतपाल यांना प्रत्येकी बारा हजार पण द्यावेत. ८ कारण, एवढ्या उत्पन्नामुळे ते राजाच्या परिवाराची शक्ती वाढविण्यास मदत करतील.

९ श्रेणी प्रकारच्या सैन्यांचे मुख्य, हत्ती, घोडदळ व रथ यांचे मुख्य आणि प्रदेष्टे यांना आठ हजार पण द्यावेत. १० कारण, एवढ्या उत्पन्नामुळे ते आपापल्या वर्गाला आपल्याबरोबर काम करायला लावू शकतात.

११ पत्त्यध्यक्ष, अश्वाध्यक्ष, रथाध्यक्ष आणि हस्त्यध्यक्ष, तसेच द्रव्यवनाचे व हस्तिवनाचे मुख्य रक्षक यांना प्रत्येकी चार हजार पण द्यावेत.

१२ रथावरून लढणारे, हत्तींना शिकविणारे, वैद्य, घोड्यांना मऊ आणणारे व बांधकाम करणारे, तसेच जनावरांची पैदास करणारे व कुंटणखाने चालविणारे यांना दोन हजार पण द्यावेत.

१३ भविष्य सांगणारे, शकुन सांगणारे, ज्योतिषी, पुराण सांगणारे सूत व मागध, पुरोहिताचे मदतगार आणि सर्व अध्यक्ष यांना एक हजार पण द्यावेत.

१४ युद्धकलेत तरबेज पदाती, हिशोब ठेवणारे, लेखक इत्यादी यांना पाचशे पण द्यावेत.

१५ कुशीलवांना अडीचशे पण द्यावेत, आणि त्यांची वाद्ये वाजविणाऱ्यांना दुप्पट द्यावेत.

१६ कारागीर व कलाकार यांना एकशेवीस पण द्यावेत.

**चतुष्पदद्विपदपरिचारकपारिकर्मिकौपस्थायिकपालकविष्टिबन्धकाः षष्टि-वेतनाः, आर्ययुक्तारोहकमाणवकशैलखनकाः सर्वोपस्थायिनश्च । १७ ।**

**आचार्या विद्यावन्तश्च पूजावेतनानि यथार्हं लभेरन् पञ्चशतावरं सहस्रपरम् । १८ ।**

**दशपणिको योजने दूतो मध्यमः, दशोत्तरे द्विगुणवेतन आ योजन-शतादिति । १९ ।**

**समानविद्येभ्यस्त्रिगुणवेतनो राजा राजसूयादिषु क्रतुषु । २० ।**

**राज्ञः सारथिः साहस्रः । २१ ।**

**कापटिकोदास्थितगृहपतिकवैदेहकतापसव्यञ्जनाः साहस्राः । २२ । ग्राम-भृतकसत्त्रितीक्ष्णरसदभिक्षुक्यः पञ्चशताः । २३ । चारसंचारिणोऽर्धतृतीयशताः, प्रयासवृद्धवेतना वा । २४ ।**

**शतवर्गसहस्रवर्गाणामध्यक्षा भक्तवेतनलाभमादेशं विक्षेपं च कुर्युः । २५ । अविक्षेपो राजपरिग्रहदुर्गराष्ट्ररक्षावेक्षणेषु च । २६ । नित्यमुख्याः स्युरनेक-मुख्याश्च । २७ ।**

१७ चतुष्पाद व द्विपाद प्राण्यांची निगा राखणारे, सेवक, हुजरे, रक्षक व मजुरांवरचे मुकादम यांना प्रत्येकी साठ पण पगार द्यावा. तसेच, आर्यांच्या देखरेखीखाली चढण्याचे काम करणारे माणवक, डोंगर खणणारे आणि सर्व नोकरवर्ग यांना तोच पगार द्यावा.

१८ आचार्य आणि विद्वान लोक यांना त्यांच्या योग्यतेनुसार कमीत कमी पाचशे पण आणि जास्तीत जास्त एक हजार पण इतके मानधन देण्यात यावे.

१९ मध्यम प्रतीच्या दूतास दर योजनास (प्रवास खर्चासाठी) दहा पण द्यावेत, दहा योजनांच्या वर शंभर योजनांपर्यंत ह्याच्या दुप्पट दर द्यावा.

२० राजसूय आदी यज्ञांमध्ये राजाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या अध्वर्यूला त्याच्याइतकीच विद्वत्ता असलेल्या ऋत्विजांपेक्षा तिप्पट दक्षिणा द्यावी.

२१ राजाच्या सारथ्याला एक हजार पण पगार द्यावा.

२२ कापटिक, उदास्थित व गृहपतिक, वैदेहक आणि तापस वेषातील हेरांस एक हजार पण द्यावेत. २३ गावातील नोकर व सत्री, तीक्ष्ण, रसद आणि भिक्षुकी हेर यांना पाचशे पण द्यावेत. २४ हेरगिरीसाठी फिरत रहाणाऱ्या नोकरांना अडीचशे पण द्यावेत किंवा त्यांच्या मेहनतीप्रमाणे त्यात वाढ करावी.

२५ शंभर सैनिकांवरील व हजार सैनिकांवरील मुख्य अधिकाऱ्यांनी त्यांचे शिधा व पगार यांचे वाटप करणे, त्यांना हुकूम देणे व त्यांना सैन्यातून कमी करणे ही कामे करावीत. २६ राजवाडा व सरकारी इमारती, दुर्ग व राष्ट्र यांतील रक्षक सैन्यामधल्या कोणालाही कमी करू नये. २७ त्या रक्षक सैन्यां-वरील मुख्य एकाहून अधिक आणि कायम असावेत.

**कर्मसु मृतानां पुत्रदारा भक्तवेतनं लभेरन् । २८ । बालवृद्धव्याधिताश्चै-षामनुग्राह्याः । २९ । प्रेतव्याधितसूतिकाकृत्येषु चैषामर्थमानकर्म कुर्यात् । ३० ।**

**अल्पकोशः कुप्यपशुक्षेत्राणि दद्यात्, अल्पं च हिरण्यम् । ३१ । शून्यं वा निवेशयितुमभ्युत्थितो हिरण्यमेव दद्यात्, न ग्रामं ग्रामसंजातव्यवहारस्थापनार्थम् । ३२ ।**

**एतेन भृतानामभृतानां च विद्याकर्मभ्यां भक्तवेतनविशेषं च कुर्यात् । ३३ ।**

**षष्टिवेतनस्याढकं कृत्वा हिरण्यानुरूपं भक्तं कुर्यात् । ३४ ।**

**पत्त्यश्वरथद्विपाः सूर्योदये बहिः संधिदिवसवर्जं शिल्पयोग्याः कुर्युः । ३५ । तेषु राजा नित्ययुक्तः स्यात्, अभीक्ष्णं चैषां शिल्पदर्शनं कुर्यात् । ३६ ।**

**कृतनरेन्द्राङ्कं शस्त्रावरणमायुधागारं प्रवेशयेत् । ३७ ।**

**अशस्त्राश्चरेयुः, अन्यत्र मुद्रानुज्ञातात् । ३८ ।**

२८ नोकरीवर काम करीत असता मरण पावलेल्यांच्या बायकामुलांना शिधा व पगार चालू ठेवावा. २९ आणि त्यांच्या कुटुंबातील लहान मुले, वृद्ध व आजारी माणसे यांच्यावर मेहेरनजर ठेवावी. ३० आणि त्यांच्या कुटुंबात कोणी मेल्यास, कोणी आजारी पडल्यास, बाळंतपण झाल्यास अथवा काही धार्मिक कृत्य करावयाचे असल्यास द्रव्यसाहाय्य देऊन आस्थापूर्वक विचारपूस करावी.

३१ तिजोरीत द्रव्य कमी असल्यास (नोकरांना) जंगलातील उत्पन्न, पशू, शेतेही व थोडे द्रव्य द्यावे. ३२ किंवा (राजा) वस्ती नसलेल्या प्रदेशात नवी वसाहत करणे इच्छित असेल तर (तसे नोकरांनी करावे म्हणून) त्यांना द्रव्यच द्यावे, पण (पगाराच्या बदल्यात अगोदरच अस्तित्वात असलेले) गाव देऊ नये, त्या गावात झालेले व्यवहार तसेच टिकून रहावेत ह्या उद्देशाने.

३३ याप्रमाणे कायम नोकरीवर असलेले व तसे नसलेले यांना त्यांची विद्वत्ता व काम यांच्या अनुरोधाने विशेष भत्ते व वेतन द्यावे.

३४ साठ पण वेतन असणाऱ्याला एक आढक (रोजचा) शिधा असे ठरवून द्रव्याच्या अनुरोधाने शिधा द्यावा.

३५ (पौणिमा व अमावास्या हे) पर्व दिवस वर्ज करून इतर दिवशी रोज सूर्योदयाच्या वेळी पायदळ, घोडे, रथ व हत्ती यांनी युद्धकलेची तालीम केली पाहिजे. ३६ त्याबद्दल राजाने नेहमी दक्ष असले पाहिजे आणि त्यांच्या युद्ध-कलेची वारंवार पहाणी केली पाहिजे.

३७ राजाचे चिन्ह असलेलीच शस्त्रे व चिलखते शस्त्रागारात (तेथील अधिकाऱ्याने) प्रविष्ट करून घ्यावीत.

३८ मोहोरबंद परवाना असल्याशिवाय लोकांनी सशस्त्र हिंडू नये.

नष्टं विनष्टं वा द्विगुणं दद्यात् । ३९ । विध्वस्तगणनां च कुर्यात् । ४० । सार्थिकानां शस्त्रावरणमन्तपाला गृह्णीयुः, समुद्रमवचारयेयुर्वा । ४१ । यात्रामभ्युत्थितो वा सेनामुद्योजयेत् । ४२ । ततो वैदेहकव्यञ्जनाः सर्वपण्यान्यायुधीयेभ्यो यात्राकाले द्विगुणप्रत्यादेयानि दद्युः । ४३ । एवं राजपण्ययोगविक्रयो वेतनप्रत्यादानं च भवति । ४४ ।

एवमवेक्षितायव्ययः कोशदण्डव्यसनं नावाप्नोति । ४५ ।

इति भक्तवेतनविकल्पः । ४६ ।

सत्त्रिणश्चायुधीयानां वेश्याः कारुकुशीलवाः ।
दण्डवृद्धाश्च जानीयुः शौचाशौचमतन्द्रिताः ।। ४७ ।।

इति योगवृत्ते पञ्चमेऽधिकरणे भृत्यभरणीयं तृतीयोऽध्यायः । आदितस्त्रिनवतितमः ।

४

[ द्विनवतितमं प्रकरणम् – अनुजीविवृत्तम् ]

लोकयात्राविद् राजानमात्मद्रव्यप्रकृतिसंपन्नं प्रियहितद्वारेणाश्रयेत । १ । यं वा मन्येत 'यथाहमाश्रयेप्सुरेवमसौ विनयेप्सुराभिगामिकगुणयुक्तः' इति,

३९ (शस्त्रागारावरील अध्यक्षाने) नाश पावलेले किंवा नाहीसे झालेले (शस्त्र वगैरे) दुप्पट भरून दिले पाहिजे. ४० आणि त्याने मोडतोड झालेल्याची मोजदाद केली पाहिजे.

४१ तांड्यातील व्यापाऱ्यांची शस्त्रे व चिलखते सरहद्दीवरील दुर्गपालाने ठेवून घ्यावीत, किंवा त्यांच्यावर मोहोर करून आत नेऊ द्यावीत.

४२ किंवा स्वारीवर जाण्याचे ठरविले असता सैन्याला तयार करावे. ४३ तेव्हा व्यापाऱ्याच्या वेषातील हेरांनी सैनिकांना सर्व प्रकारचा माल दुप्पट परत घेण्याच्या बोलीने स्वारी निघण्याच्या वेळी द्यावा. ४४ असे केल्याने सरकारी मालाची गुप्त विक्री होते व वेतनही परत मिळते.

४५ याप्रमाणे उत्पन्न व खर्च यांची काळजी घेतली असता तिजोरी व सैन्य यांच्या संबंधात संकट उत्पन्न होत नाही.

४६ हे झाले भत्ते व वेतन यांचे निरनिराळे प्रकार.

४७ आणि सत्री हेर, वेश्या, कारागीर, कुशीलव आणि सैन्यातील ज्येष्ठ अंमलदार यांनी दक्ष राहून सैनिक स्वामिभक्त आहेत की नाही याचा शोध घ्यावा.

## चौथा अध्याय

### प्रकरण ९२ : नोकराने करावयाचे वर्तन

१ जगाचे व्यवहार जाणणाऱ्या मनुष्याने आत्मगुणसंपन्न व (कोशादी) द्रव्यप्रकृतींनी समृद्ध अशा राजाच्या आश्रयास त्याला (राजाला) प्रिय व हितकर

**द्रव्यप्रकृतिहीनमप्येनमाश्रयेत, न त्वेवानात्मसंपन्नम् । २ । अनात्मवान् हि नीतिशास्त्रद्वेषादनर्थ्यसंयोगाद्वा प्राप्यापि महदैश्वर्यं न भवति । ३ ।**

**आत्मवति लब्धावकाशः शास्त्रानुयोगं दद्यात् । ४ । अविसंवादाद्धि स्थानस्थैर्यमवाप्नोति । ५ । मतिकर्मसु पृष्टस्तदात्वे चायत्यां च धर्मार्थसंयुक्तं समर्थं प्रवीणवदपरिषद्भीरुः कथयेत् । ६ ।**

**ईप्सितः पणेत 'धर्मार्थानुयोगमविशिष्टेषु बलवत्संयुक्तेषु दण्डधारणं मत्संयोगे तदात्वे च दण्डधारणमिति न कुर्याः, पक्षं वृत्तिं गुह्यं च मे नोपहन्याः, संज्ञया च त्वां कामक्रोधदण्डनेषु वारयेयम्' इति । ७ ।**

**आदिष्टः प्रदिष्टायां भूमावनुज्ञातः प्रविशेत्, उपविशेच्च पार्श्वतः संनिकृष्टविप्रकृष्टः परासनम् । ८ । विगृह्य कथनमसभ्यमप्रत्यक्षमश्रद्धेयमनृतं च**

असणाऱ्या मनुष्याच्या मार्फत जावे. २ किंवा एखाद्या राजाविषयी त्याला असे वाटत असेल की, "ज्याप्रमाणे मला आश्रयाची इच्छा आहे त्याप्रमाणे त्यालाही विनयप्राप्तीची इच्छा आहे आणि त्याच्याकडे सहज जाता येईल असे गुण त्याच्यात आहेत," तर द्रव्यप्रकृतींनी हीन असला तरी त्याच्या आश्रयास जावे, पण आत्मगुणांनी संपन्न नसलेल्याच्या आश्रयास केव्हाही जाऊ नये. ३ कारण, ज्याच्या ठायी आत्मगुण नाहीत तो राजनीतिशास्त्राबद्दलच्या तिरस्कारामुळे अथवा अनर्थकारक लोकांच्या संगतीमुळे, मोठे एश्वर्य प्राप्त झालेले असताही, विनाश पावतो.

४ आत्मगुणसंपन्न राजाची भेट घडून आली असता राजनीतिशास्त्राविषयीच्या प्रश्नांना उत्तरे द्यावीत. ५ कारण, शास्त्राशी विसंगत असे काही न सांगितल्यास त्याच्या स्थानाला स्थैर्य प्राप्त होईल. ६ ज्यांत बुद्धी चालवावयाची असते अशा कार्याविषयी प्रश्न विचारल्यास जे वर्तमानकाळी व भविष्यकाळी धर्म व अर्थ साध्य करणारे आणि युक्तियुक्त असेल ते निपुण माणसाप्रमाणे सभाधीटपणे सांगावे.

७ राजाने पसंत केल्यास त्याने पुढील अटी घालाव्यात, "ज्यांच्यात काही वैशिष्टच नाही अशांना धर्म व अर्थ यांच्या संबंधात त्यांचे मत तू विचारता कामा नये, बलवान लोकांशी संबद्ध असलेल्यांना शासन करता कामा नये, माझ्याशी संबद्ध असणाऱ्यांना आणि तेही तडकाफडकी शासन करता कामा नये, माझा पक्ष, माझी उपजीविका आणि माझे गुह्य यांना तू हानी पोचविता कामा नये, काम किंवा क्रोध यांच्या आहारी जाऊन तू शिक्षा करण्यास प्रवृत्त झालास तर खुणेने त्यापासून तुला परावृत्त करण्याची मला मुभा असली पाहिजे."

८ नेमणूक झाली तर परवानगी घेऊन सांगितलेल्या ठिकाणी प्रवेश करावा आणि बाजूला फार जवळ नाही फार दूर नाही अशा दुसऱ्या आसनावर बसावे.

वाक्यमुच्चैरनर्मणि हासं वातष्ठीवने च शब्दवती न कुर्यात् । ९ । मिथः कथनमन्येन, जनवादे द्वन्द्वकथनं, राज्ञो वेषम् उद्धतकुहकानां च, रत्नातिशयप्रकाशाभ्यर्थनम्, एकाक्ष्योष्ठनिर्भोगं भ्रुकुटीकर्म वाक्यावक्षेपणं च ब्रुवति, बलवत्संयुक्तविरोधं, स्त्रीभिः स्त्रीदर्शिभिः सामन्तदूतैर्द्वेष्यपक्षावक्षिप्तानर्थ्यैश्च प्रतिसंसर्गमेकार्थचर्यां संघातं च वर्जयेत् । १० ।

अहीनकालं राजार्थं स्वार्थं प्रियहितैः सह ।
परार्थं देशकाले च ब्रूयाद्धर्मार्थसंहितम् ।। ११ ।।
पृष्टः प्रियहितं ब्रूयान्न ब्रूयादहितं प्रियम् ।
अप्रियं वा हितं ब्रूयाच्छृण्वतोऽनुमतो मिथः ।। १२ ।।
तूष्णीं वा प्रतिवाक्ये स्याद्द्वेष्यादींश्च न वर्णयेत् ।
अप्रिया अपि दक्षाः स्युस्तद्भावाद्ये बहिष्कृताः ।। १३ ।।

९ वर्दळीवर येऊन बोलणे, असभ्य, स्वतःला प्रत्यक्ष माहीत नसलेले, विश्वास बसणार नाही असे आणि खोटे विधान करणे, काही विनोद झाला नसताही मोठ्याने हसणे, आवाज करून पादणे व थुंकणे ह्या गोष्टी करू नयेत. १० दुसऱ्या कोणाशी एकीकडे आपसात बोलणे, लोकांत वाद चालू असता भांडणाच्या स्वरात बोलणे, राजासारखा वेष किंवा भडक, विदूषकांसारखा पोशाख धारण करणे, रत्न किंवा विशेष प्रसाद यांची उघडपणे मागणी करणे, एक डोळा मिचकावणे व एक ओठ मुरडणे, भुवया चढविणे, कोणी बोलत असता त्याचे भाषण मध्येच तोडणे, बलवान माणसांशी संबद्ध असलेल्यांना विरोध करणे, स्त्रिया, स्त्रियांना नेहमी भेटणारे, शेजारच्या राजांचे दूत, शत्रुपक्ष, नोकरीवरून काढून टाकलेले व अनर्थकारक लोक यांच्यापैकी कोणाशी संपर्क ठेवणे, त्यांच्याशी सहभागी होऊन एखादे काम करणे आणि त्यांच्याशी एकजूट करणे, ह्या सर्व गोष्टी वर्ज्य कराव्यात.

११ राजासाठी असेल ते वेळ न दवडता, स्वतःसाठी असेल ते (राजाला) प्रिय व हितकर लोकांच्या समक्ष आणि दुसऱ्यासाठी असेल ते योग्य ठिकाणी व योग्य वेळी, धर्म व अर्थ यांना अनुसरून सांगावे.

१२ विचारले असता राजाला प्रिय वाटेल व हितकर असेल ते सांगावे; प्रिय वाटणारे पण अहितकर असे सांगू नये. किंवा राजा ऐकून घेण्यास तयार असेल तर त्याच्या संमतीने अप्रिय पण हितकर असे एकांतात सांगावे.

१३ किंवा उत्तर देण्याच्या वेळेस गप्प बसावे, आणि आपले शत्रू वगैरेंचे वर्णन करू नये. राजाच्या मर्जीतून जे उतरले असतील ते आपल्या कामात वाकबगार असले तरी त्याला अप्रिय होतात.

अनर्थ्याश्च प्रिया दृष्टाश्चित्तज्ञानानुवर्तिनः ।
अभिहास्येष्वभिहसेद्घोरहासांश्च वर्जयेत् ।। १४ ।।
परात्संक्रामयेद्घोरं न च घोरं परे वदेत् ।
तितिक्षेतात्मनश्चैव क्षमावान् पृथिवीसमः ।। १५ ।।
आत्मरक्षा हि सततं पूर्वं कार्या विजानता ।
अग्नाविव हि संप्रोक्ता वृत्ती राजोपजीविनाम् ।। १६ ।।
एकदेशं दहेदग्निः शरीरं वा परं गतः ।
सपुत्रदारं राजा तु घातयेदर्धयेत वा ।। १७ ।।

इति योगवृत्ते पञ्चमेऽधिकरणे अनुजीविवृत्तं चतुर्थोऽध्यायः । आवितश्चतुर्नवतितमः ।

## ५

## [ त्रिनवतितमं प्रकरणम् – समयाचारिकम् ]

**नियुक्तः कर्मसु व्ययविशुद्धमुदयं दर्शयेत् । १ । आभ्यन्तरं बाह्यं गुह्यं प्रकाश्यमात्ययिकमुपेक्षितव्यं वा कार्यम् ' इदमेवम् ' इति विशेषयेच्च । २ ।**

१४ आणि राजाच्या मनातील विचार ओळखून त्याप्रमाणे वागणारे अनर्थकारक लोक त्याला प्रिय होत असलेले दिसून येतात. हास्यकारक गोष्टीं-बद्दल हसावे, परंतु फार मोठ्याने हसण्याचे टाळावे.

१५ दुसऱ्याविषयीचे (राजाचे) कठोर वचन दूर करावे, आणि स्वतः दुसऱ्याला कठोर बोलू नये आणि स्वतःला (राजा) तसे बोलल्यास पृथ्वीप्रमाणे क्षमाशील होऊन ते सहन करावे.

१६ शहाण्या माणसाने नेहमी प्रथम स्वतःचे संरक्षण करून घ्यावे. कारण राजाच्या नोकरीत रहाणे हे आगीत रहाण्यासारखे आहे असे म्हणतात.

१७ अग्नी शरीराचा एक भाग जाळील, किंवा फार तर सर्व शरीर जाळील, परंतु राजा बायकामुलांसह घात करू शकेल किंवा (संतुष्ट झाल्यास) वैभवास चढवू शकेल.

## पाचवा अध्याय

## प्रकरण ९३ : राजदरबारी पाळावयाच्या आचारांविषयी

१ त्याची कामावर नेमणूक झाली तर त्याने खर्च वजा जाता नफा झालेला दाखवावा. २ आणि ते काम दुर्गातील (किंवा) बाहेरच्या प्रदेशातील, गुप्त (किंवा) उघड, तातडीचे (किंवा) बाजूला ठेवण्यासारखे असेल त्याप्रमाणे " हे अशा प्रकारचे आहे " असे त्याचे वैशिष्ट्य सांगावे.

**मृगयाद्यूतमद्यस्त्रीषु प्रसक्तं नैनमनुवर्तेत प्रशंसाभिः । ३ । आसन्नश्चास्य व्यसनोपघाते प्रयतेत, परोपजापातिसंधानोपधिभ्यश्च रक्षेत् । ४ ।**

**इङ्गिताकारौ चास्य लक्षयेत् । ५ । कामद्वेषहर्षदैन्यव्यवसायभयद्वन्द्वविपर्यासमिङ्गिताकाराभ्यां हि मन्त्रसंवरणार्थमाचरति प्राज्ञः । ६ ।**

**दर्शने प्रसीदति, वाक्यं प्रतिगृह्णाति, आसनं ददाति, विविक्तो दर्शयते, शङ्कास्थाने नातिशङ्कते, कथायां रमते, परिज्ञाप्येष्ववेक्षते, पथ्यमुक्तं सहते, स्मयमानो नियुङ्क्ते, हस्तेन स्पृशति, श्लाघ्ये नोपहसति, परोक्षं गुणं ब्रवीति, भक्ष्येषु स्मरति, सह विहारं याति, व्यसनेऽभ्युपपद्यते, तद्भक्तीन् पूजयति, गुह्यमाचष्टे, मानं वर्धयति, अर्थं करोति, अनर्थं प्रतिहन्ति – इति तुष्टज्ञानम् । ७ ।**

**एतदेव विपरीतमतुष्टस्य, भूयश्च वक्ष्यामः । ८ । संदर्शने कोपः, वाक्यस्याश्रवणप्रतिषेधौ, आसनचक्षुषोरदानम्, वर्णस्वरभेदः, एकाक्षिभ्रुकुट्योष्ठनिर्भोगः,**

३ राजा मृगया, द्यूत, मद्य किंवा स्त्री ह्या व्यसनांच्या आहारी गेला असता (खोटी) स्तुती करून त्याच्या छंदास उत्तेजन देऊ नये. ४ आणि त्याच्याजवळ राहून त्याचे व्यसन दूर करण्याचा प्रयत्न करावा आणि शत्रूचे गुप्त बेत, डावपेच व कपट यांपासून त्याचे रक्षण करावे.

५ आणि राजाच्या हालचाली व चेहऱ्यावरील भाव यांकडे नीट लक्ष द्यावे. ६ कारण, बुद्धिमान मनुष्य आपल्या मनातील विचार गुप्त राखण्यासाठी शरीराची हालचाल व चेहऱ्यावरील भाव यांच्याद्वारा राग व द्वेष, आनंद व दुःख, निर्धार व भीती या विकारांच्या जोडयांमध्ये उलटापालट करून दाखवितो.

७ तो दिसला असता (राजा) प्रसन्न होतो, त्याचे म्हणणे स्वीकारतो, त्याला बसावयास सांगतो, एकांतात भेट घेऊ देतो, शंकेला जागा असता फार संशय घेत नाही, त्याच्या भाषणात रस घेतो, काही कळविण्याजोगे असल्यास त्याची आठवण ठेवतो, त्याचे हितकर बोलणे ऐकून घेतो, त्याला हसून काम सांगतो, हाताने त्याला स्पर्श करतो, स्तुती करण्यासारख्या गोष्टीत त्याचा उपहास करीत नाही, पाठीमागे त्याच्या गुणांचा निर्देश करतो, खाण्याच्या प्रसंगी त्याची आठवण करतो, सहलीला बरोबर घेऊन जातो, संकटकाली मदत करतो, त्याच्या एकनिष्ठ अनुयायांचा सत्कार करतो, आपले गुह्य त्याला सांगतो, त्याचा मानमरातब वाढवितो, त्याच्या फायद्याचे ते करतो, अनर्थाचे निवारण करतो – यांवरून राजा संतुष्ट आहे याचे ज्ञान होते.

८ ह्या सर्व गोष्टी उलट असल्या की तो असंतुष्ट आहे असे समजावे, शिवाय दुसरीही असंतुष्टतेची चिन्हे सांगतो. ९ तो दिसला की रागावणे, त्याचे भाषण न ऐकणे किंवा त्याच्या भाषणाला प्रतिबंध करणे, त्याला बसावयास न सांगणे व त्याच्याकडे न पहाणे, मुखाचा रंग व स्वर बदलणे, एक डोळा मिचकावणे,

**स्वेदश्वासस्मितानामस्थानोत्पत्तिः, परमन्त्रणम्, अकस्माद्व्रजनम्, वर्धनमन्यस्य, भूमिगात्रविलेखनम्, अन्यस्योपतोदनम्, विद्यावर्णदेशकुत्सा, समदोषनिन्दा, प्रतिदोषनिन्दा, प्रतिलोमस्तवः, सुकृतानवेक्षणम्, दुष्कृतानुकीर्तनम्, पृष्ठावधानम्, अतित्यागः, मिथ्याभिभाषणम्, राजदर्शिनां च तद्वृत्तान्यत्वम् । ९ ।**

**वृत्तिविकारं चावेक्षेताप्यमानुषाणाम् । १० । 'अयमुच्चैः सिञ्चति' इति कात्यायनः प्रवव्राज, 'क्रौञ्चोऽपसव्यम्' इति कणिङ्को भारद्वाजः, 'तृणम्' इति दीर्घश्चारायणः, 'शीता शाटी' इति घोटमुखः, 'हस्ती प्रत्यौक्षीत्' इति किञ्जल्कः, 'रथाश्वं प्राशंसीत्' इति पिशुनः, प्रतिरवणे शुनः पिशुनपुत्रः ।११।**

**अर्थमानावक्षेपे च परित्यागः । १२ । स्वामिशीलमात्मनश्च किल्बिषमुपलभ्य वा प्रतिकुर्वीत । १३ । मित्रमुपकृष्टं वाऽस्य गच्छेत् । १४ ।**

एक भुवई चढविणे व एक ओठ मुरडणे, कारण नसता घाम येणे, सुस्कारा टाकणे व हसणे, दुसऱ्याशीच मसलत करणे, एकाएकी निघून जाणे, दुसऱ्याला बढती देणे, जमिनीवर रेघोट्या ओढणे व अंग खाजविणे, दुसऱ्याला (त्याच्याविरुद्ध) चिथावणे, त्याची विद्या, वर्ण व देश यांच्याबद्दल तिरस्कार दर्शविणे, त्याच्या-सारखाच दोष असलेल्याची निंदा करणे, प्रत्येक दोषाची निंदा करणे, त्याच्या विरुद्ध असलेल्याची स्तुती करणे, त्याच्या चांगल्या कृत्यांकडे लक्ष न देणे, वाईट कृत्यांचा उच्चार करीत रहाणे, पाठीमागे पहात रहाणे, त्याच्याकडे पूर्ण दुर्लक्ष करणे, खोटे सांगणे आणि राजाची भेट घेणाऱ्यांच्या त्याच्याशी होणाऱ्या वागणुकीत फरक पडणे (ही असंतुष्टतेची चिन्हे होत).

१० आणि त्याने मनुष्येतर प्राण्यांच्या वागणुकीत पडणाऱ्या फरकाकडेही लक्ष द्यावे. ११ "हा (माळी) वरून पाणी शिंपडीत आहे" असा विचार मनात आणून कात्यायन (राजाची नोकरी सोडून) निघून गेला, "क्रौंच पक्षी डाव्या बाजूने उडत गेला" ह्याचा विचार करून कणिक भारद्वाज निघून गेला, (अनपेक्षित ठिकाणी) गवत पाहून दीर्घ चारायण निघून गेला, "वस्त्र ओले आहे" यावर विचार करून घोटमुख निघून गेला, " "हत्तीने माझ्यावर पाणी फवारले आहे" यावर विचार करून किंजल्क निघून गेला, "रथ व घोडे यांची स्तुती केली आहे" यावर विचार करून पिशुन निघून गेला, कुत्र्याच्या भुंकण्या-मुळे पिशुनाचा मुलगा नोकरी सोडून गेला.

१२ द्रव्य व मान ही कमी केली असता नोकरीचा त्याग करून जाणे श्रेयस्कर. १३ किंवा राजाचे चारित्र्य आणि स्वतःचे संभाव्य दोष यांचा शोध घेऊन योग्य ती उपाययोजना करावी. १४ किंवा राजाच्या निकटच्या मित्राकडे जावे.

तत्रस्थो दोषनिर्घातं मित्रैर्भर्तरि त्राचरेत् ।
ततो भर्तरि जीवे वा मृते वा पुनराव्रजेत् ।। १५ ।।

इति योगवृत्ते पञ्चमेऽधिकरणे समयाचारिकं पञ्चमोऽध्यायः । आदितः पञ्चनवतितमः ।

६

## [ चतुर्नवतितमं प्रकरणम् – राज्यप्रतिसंधानम्ः पञ्चनवतितमं प्रकरणम् – एकैश्वर्यम् ]

राजव्यसनमेवममात्यः प्रतिकुर्वीत । १ ।

प्रागेव मरणाबाधभयाद् राज्ञः प्रियहितोपग्रहेण मासद्विमासान्तरं दर्शनं स्थापयेद् 'देशपीडापहममित्रापहमायुष्यं पुत्रीयं वा कर्म राजा साधयति' इत्यपदेशेन । २ । राजव्यञ्जनमरूपवेलायां प्रकृतीनां दर्शयेत् मित्रामित्रदूतानां च । ३ । तैश्च यथोचितां संभाषाममात्यमुखो गच्छेत् । ४ । दौवारिकान्तर्वंशिकमुखश्च यथोक्तं राजप्रणिधिमनुवर्तयेत् । ५ । अपकारिषु च हेडं प्रसादं वा प्रकृतिकान्तं दर्शयेत्, प्रसादमेवोपकारिषु । ६ ।

१५ आणि तेथे (त्या मित्राकडे) राहून मित्रांच्या द्वारा आपल्या स्वामीच्या बाबतीत घडलेल्या दोषाचे परिमार्जन करून घ्यावे, आणि नंतर स्वामीच्या हयातीत किंवा त्याच्या मृत्यूनंतरही त्या राज्यात परत यावे.

## सहावा अध्याय

### प्रकरण ९४ : राज्याचे सातत्य टिकविणे ; प्रकरण ९५ : ऐश्वर्याचे सातत्य

१ राजावर मोठे संकट आले असता अमात्याने पुढीलप्रमाणे उपाययोजना करावी.

२ राजाच्या मृत्यूच्या संकटाचे भय उत्पन्न होण्याच्या अगोदरपासूनच त्याला जे प्रिय व हितकर असतील त्यांचे मन वळवून "राजा देशाची पीडा दूर करणारा, शत्रूंचा नाश करणारा, दीर्घायुष्याचा लाभ करून देणारा किंवा पुत्रोत्पत्ती करून देणारा तांत्रिक विधी साध्य करीत आहे" ह्या सबबीवर प्रजेला राजाचे दर्शन एक एक महिन्याने किंवा दोन दोन महिन्यांनी होईल असे ठरवावे. ३ ज्या वेळी रूप स्पष्ट दिसत नाही अशा वेळी (अंधुक प्रकाशात) राजाच्या वेषातील त्याच्यासारखा दिसणाऱ्या मनुष्याचे दर्शन प्रजेला व मित्रराजे व शत्रुराजे यांच्या दूतांना घडवावे. ४ आणि त्याने त्यांच्याशी उचित असेल तसे संभाषण अमात्याच्या मुखाने करावे. ५ आणि द्वारपालांचा मुख्य व प्रासादरक्षकांचा मुख्य यांच्यामार्फत नेहमीची राजाने करावयाची कामे पार पाडावीत. ६ अपकार करणाऱ्यांवर प्रजाजनांना आवडेल त्याप्रमाणे राग दाखवावा किंवा कृपा करावी, उपकार करणाऱ्यांवर मात्र फक्त प्रसादच करावा.

आप्तपुरुषाधिष्ठितौ दुर्गप्रत्यन्तस्थौ वा कोशदण्डावेकस्थौ कारयेत्, कुल्यकुमारमुख्यांश्चान्यापदेशेन । ७ ।

यश्च मुख्यः पक्षवान् दुर्गाटवीस्थो वा वैगुण्यं भजेत तमुपग्राहयेत् । ८ । बह्वाबाधां वा यात्रां प्रेषयेत्, मित्रकुलं वा । ९ ।

यस्माच्च सामन्तादाबाधं पश्येत् तमुत्सवविवाहहस्तिबन्धनाश्वपण्यभूमिप्रदानापदेशेनावग्राहयेत्, स्वमित्रेण वा । १० । ततः संधिमदूष्यं कारयेत् । ११ । आटविकामित्रैर्वा वैरं ग्राहयेत् । १२ । तत्कुलीनमपरुद्धं वा भूम्येकदेशेनोपग्राहयेत् । १३ ।

कुल्यकुमारमुख्योपग्रहं कृत्वा वा कुमारमभिषिक्तमेव दर्शयेत् । १४ ।

दाण्डकर्मिकवद्वा राज्यकण्टकानुद्धृत्य राज्यं कारयेत् । १५ ।

७ खजिना व सैन्य विश्वासू माणसांच्या ताब्यात दुर्गात किंवा सरहद्दीवर एके ठिकाणी गोळा करावे, तसेच राजकुलातील माणसे, राजकुमार व मुख्य अधिकारी यांना दुसरी काही सबब सांगून एकत्र जमवावे.

८ आणि जो कोणी मुख्य अधिकारी अनुयायांचे पाठबळ असून दुर्ग किंवा अरण्य येथे सुरक्षित असल्यामुळे विरोध करील त्याला वश करून घ्यावे. ९ किंवा त्याला पुष्कळ अडचणी असलेल्या स्वारीवर पाठवावे किंवा मित्र राजाकडे धाडावे.

१० आणि ज्या शेजारच्या राजापासून धोका आहे असे त्याला वाटत असेल त्याला उत्सव, विवाह, हत्ती पकडणे, घोडे खरेदी करणे अथवा विकणे, भूमिदान करणे इत्यादी निमित्ताने बोलावून ताब्यात घ्यावे, किंवा स्वतःच्या मित्रराजामार्फत त्याला कह्यात ठेवावे. ११ नंतर त्याच्याशी मोडला जाणार नाही असा तह करावा. १२ किंवा रानटी टोळ्या अथवा शत्रू यांच्याशी त्याचे शत्रुत्व घडवून आणावे. १३ किंवा त्याच्या कुलातील गादीवर हक्क सांगणारा पुरुष अथवा त्याच्या मर्जीतून उतरलेला पुत्र यांना त्याच्या राज्याचा भाग देऊ करून आपल्या बाजूला वळवून घ्यावे.

१४ किंवा राजकुलातील पुरुष, राजकुमार व मुख्य अधिकारी यांची संमती मिळवून राज्याभिषेक झालेल्या युवराजाचेच प्रजेला दर्शन घडवावे.

१५ किंवा दांडकर्मिक प्रकरणात (अध्याय ५.१ मध्ये) सांगितल्याप्रमाणे राज्यातील कंटकांचा उच्छेद करून राज्यकारभार चालू ठेवावा.

वि (वाय)— ३१७-२७-अ

यदि वा कश्चिन्मुख्यः सामन्तादीनामन्यतमः कोपं भजेत तम् 'एहि, राजानं त्वा करिष्यामि' इत्यावाहयित्वा घातयेत् । १६ । आपत्प्रतीकारेण वा साधयेत् । १७ ।

युवराजे वा क्रमेण राज्यभारमारोप्य राजव्यसनं ख्यापयेत् । १८ ।

परभूमौ राजव्यसने मित्रेणामित्रव्यञ्जनेन शत्रोः संधिमवस्थाप्यापगच्छेत् । १९ । सामन्तादीनामन्यतमं वाऽस्य दुर्गे स्थापयित्वाऽपगच्छेत् । २० । कुमारमभिषिच्य वा प्रतिव्यूहेत । २१ । परेणाभियुक्तो वा यथोक्तमापत्प्रतीकारं कुर्यात् । २२ ।

एवमेकैश्वर्यममात्यः कारयेदिति कौटिल्यः । २३ ।

'नैवम्' इति भारद्वाजः । २४ । 'प्रम्रियमाणे वा राजन्यमात्यः कुल्यकुमारमुख्यान् परस्परं मुख्येषु वा विक्रमयेत् । २५ । विक्रान्तं प्रकृतिकोपेन घातयेत् । २६ । कुल्यकुमारमुख्यानुपांशुदण्डेन वा साधयित्वा स्वयं राज्यं गृह्णीयात् । २७ । राज्यकारणाद्धि पिता पुत्रान् पुत्राश्च पितरमभिद्रुह्यन्ति, किमङ्ग पुनरमात्य-

१६ जर कोणी मुख्य अधिकारी अथवा मांडलिकांपैकी एखादा बंड करून उठेल तर त्याला "ये, मी तुला राजा करतो" अशा निरोपाने बोलावून आणून ठार करावे. १७ किंवा आपत्प्रतीकार प्रकरणात (अध्याय ९.५ मध्ये) सांगितल्याप्रमाणे त्याचा काटा काढावा.

१८ किंवा क्रमाक्रमाने युवराजावर राज्यकारभार सोपवून राजावरील (मृत्युरूप) संकट जाहीर करावे.

१९ राजाचा मृत्यू परदेशात झाला असता वाहेरून शत्रू म्हणून भासविणाऱ्या मित्रराजाच्या मार्फत शत्रूशी तह घडवून आणावा व परत यावे. २० किंवा (शत्रूचा दुर्ग जिंकलेला असल्यास) मांडलिकापैकी एखाद्याला त्या शत्रूच्या दुर्गात स्थापन करून परत यावे. २१ किंवा (युद्ध अनिर्णीत राहिले असल्यास) कुमाराला राज्याभिषेक करून शत्रूवर हल्ला करावा. २२ किंवा शत्रूने हल्ला केल्यास आपत्प्रतीकार प्रकरणात (अध्याय ९.५ मध्ये) सांगितले आहे तसे करावे.

२३ याप्रमाणे अमात्याने ऐश्वर्याचे (राजघराण्यातील) सातत्य टिकवावे असे कौटिल्याचे मत आहे.

२४ "असे करणे बरोबर नाही," असे भारद्वाजाचे मत आहे. २५ "राजा मरावयास टेकला असता अमात्याने राजकुलातील पुरुष, राजकुमार व मुख्य अधिकारी यांना एकमेकाशी किंवा (इतर) मुख्य अधिकाऱ्यांशी लढावयास उद्युक्त करावे. २६ लढाई करणाऱ्याचा प्रजेत क्षोभ उत्पन्न करून घात घडवून आणावा. २७ किंवा राजकुलातील पुरुष, राजकुमार व मुख्य अधिकारी यांचा

प्रकृतिर्ह्येकप्रग्रहो राज्यस्य । २८ । तत्स्वयमुपस्थितं नावमन्येत । २९ । "स्वयमारूढा हि स्त्री त्यज्यमानाऽभिशपति" इति लोकप्रवादः । ३० ।

'कालश्च सकृदभ्येति यं नरं कालकाङ्क्षिणम् ।
दुर्लभः स पुनस्तस्य कालः कर्म चिकीर्षतः ।। ३१ ।।'

प्रकृतिकोपकमधर्मिष्ठमनैकान्तिकं चैतदिति कौटिल्यः । ३२ । राजपुत्रमात्मसंपन्नं राज्ये स्थापयेत् । ३३ । संपन्नाभावेऽव्यसनिनं कुमारं राजकन्यां गर्भिणीं देवीं वा पुरस्कृत्य महामात्रान् संनिपात्य ब्रूयात् 'अयं वो निक्षेपः, पितरमस्यावेक्षध्वं सत्त्वाभिजनमात्मनश्च, ध्वजमात्रोऽयं भवन्त एव स्वामिनः, कथं वा क्रियताम्' इति । ३४ । तथा ब्रुवाणं योगपुरुषा ब्रूयुः 'कोऽन्यो भवत्पुरोगादस्माद्राज्ञश्चातुर्वर्ण्यमर्हति पालयितुम्' इति । ३५ । 'तथा' इत्यमात्यः कुमारं राजकन्यां गर्भिणीं देवीं वाऽधिकुर्वीत, बन्धुसंबन्धिनां मित्रामित्रदूतानां च दर्शयेत् । ३६ ।

गुप्त दंडाने निकाल लावून आपणच राज्य बळकवावे. २८ कारण, राज्यासाठी पिता पुत्रांशी, पुत्र पित्याशी वैर करतात, मग राज्याचा एकमात्र आधार असलेले अमात्य हे जे राज्याचे अंग (त्याने राज्याची हाव का धरू नये ?) २९ ते आपण होऊन चालत आले असता त्याचा अव्हेर करू नये. ३० कारण, स्वतः होऊन समागमार्थ आलेल्या स्त्रीस झिडकारले तर ती शाप देते अशी म्हण आहे.

३१ आणि संधीची वाट पहात बसलेल्या मनुष्याला योग्य संधी एकदाच येते. काम करावयाचे असता तशी वेळ पुन्हा प्राप्त होणे अशक्यप्राय असते."

३२ असे करणे प्रजाजनांत क्षोभ उत्पन्न करणारे, धर्माच्या विरुद्ध आणि यशस्वितेबद्दल खात्री नसलेले असे आहे असे कौटिल्याचे मत आहे. ३३ अमात्याने आत्मगुणांनी संपन्न अशा राजपुत्राला गादीवर बसवावे. ३४ असा संपन्न राजपुत्र नसल्यास व्यसनी नसलेला राजपुत्र अथवा राजकन्या अथवा गरोदर राणी यांना पुढे करून मोठ्या अधिकाऱ्यांना जमवून म्हणावे, "ही तुमच्या स्वाधीन केलेली ठेव आहे. ह्याच्या पित्याची आठवण ठेवा आणि आपले सच्छील व उच्च कुल ही लक्षात असू द्या. हा केवळ निशाण आहे, तुम्हीच खरोखर मालक आहात. किंवा दुसरे काय करावे असे तुम्हाला वाटते ?" ३५ तो असे म्हणाला की त्याचे गुप्त हस्तक असलेल्या मनुष्यांनी म्हणावे, "तुमच्या मार्गदर्शनाखाली असणाऱ्या ह्या राजाखेरीज दुसरा कोण चारी वर्णांचे पालन करू शकेल ?" ३६ "बरे आहे" असे म्हणून अमात्याने त्या राजपुत्राला अथवा राजकन्येला अथवा गरोदर राणीला अधिकारारूढ करावे, आणि आप्त व बांधव आणि मित्रराजे व शत्रुराजे यांचे दूत यांची त्यांच्याशी भेट घडवून आणावी.

**भक्तवेतनविशेषममात्यानामायुधीयानां च कारयेत्, 'भूयश्चायं वृद्धः करिष्यति' इति ब्रूयात् । ३७ । एवं दुर्गराष्ट्रमुख्यानाभाषेत, यथार्हं च मित्रामित्रपक्षम् । ३८ । विनयकर्मणि च कुमारस्य प्रयतेत । ३९ ।**

**कन्यायां समानजातीयादपत्यमुत्पाद्य वाऽभिषिञ्चेत् । ४० । मातुश्चित्तक्षोभभयात्कुल्यमल्पसत्त्वं छात्रं च लक्षण्यमुपनिदध्यात् । ४१ । ऋतौ चैनां रक्षेत् । ४२ ।**

**न चात्मार्थं कंचिदुत्कृष्टमुपभोगं कारयेत् । ४३ । राजार्थं तु यानवाहनाभरणवस्त्रस्त्रीवेश्मपरिवापान् कारयेत् । ४४ ।**

**यौवनस्थं च याचेत विश्रमं चित्तकारणात् ।**
**परित्यजेदतुष्यन्तं तुष्यन्तं चानुपालयेत् ।। ४५ ।।**
**निवेद्य पुत्ररक्षार्थं गूढसारपरिग्रहान् ।**
**अरण्यं दीर्घसत्त्रं वा सेवेतारुच्यतां गतः ।। ४६ ।।**

३७ इतर अमात्य व सैनिक यांच्या शिध्यात व पगारात वाढ करून द्यावी आणि म्हणावे, "मोठा झाल्यावर हा आणखी वाढ करील." ३८ दुर्ग व राष्ट्र यांतील मुख्य अधिकाऱ्यांना तसेच सांगावे आणि मित्र पक्षातील व शत्रु पक्षातील लोकांना त्यांच्या योग्यतेनुसार आश्वासन द्यावे. ३९ आणि शिक्षणाने राजपुत्र विनयसंपन्न होईल असे प्रयत्न करावेत.

४० किंवा राजकन्येला त्याच जातीच्या पुरुषापासून पुत्राची प्राप्ती करून देऊन त्या पुत्राला अभिषेक करावा. ४१ त्याच्या आईच्या मनात चलबिचल होऊ नये यासाठी तिच्याजवळ राजकुलातील अल्प सत्त्व असलेला मनुष्य आणि (मुलाला सोबत म्हणून) शुभ लक्षणांनी युक्त शिष्य ठेवावा. ४२ आणि तिच्या ऋतुकाळी तिचे रक्षण करावे.

४३ आणि (अमात्याने) स्वत:साठी कोणतीही उत्कृष्ट भोग्य वस्तू करून घेऊ नये. ४४ परंतु (नूतन) राजासाठी गाडी, घोडे, अलंकार, वस्त्रे, स्त्रिया, वाडे इत्यादी वस्तूंची सोय करून द्यावी.

४५ आणि तो वयात आला म्हणजे त्याच्या मनाचा कल काय आहे ते पाहण्यासाठी 'आता मला विश्रांती घेऊ द्या' अशी विनंती करावी. तो असंतुष्ट असला तर त्याला सोडून जावे, आणि संतुष्ट असला तर त्याचे पालन करीत रहावे.

४६ जर तो त्याला आवडेनासा झाला तर आपल्या खास विश्वासातील कर्तबगार नोकरांना त्या राजपुत्राचे रक्षण करावयास बजावून अरण्यात जाऊन रहावे किंवा दीर्घकाळ चालू रहाणारा यज्ञ करावयास घ्यावा.

मुख्यैरवगृहीतं वा राजानं तत्प्रियाश्रितः ।
इतिहासपुराणाभ्यां बोधयेदर्थशास्त्रवित् ।। ४७ ।।
सिद्धव्यञ्जनरूपो वा योगमास्थाय पार्थिवम् ।
लभेत लब्ध्वा दूष्येषु दाण्डकर्मिकमाचरेत् ।। ४८ ।।

इति योगवृत्ते पञ्चमेऽधिकरणे राज्यप्रतिसंधानम् एकैश्वर्यं च षष्ठोऽध्यायः । आदितः षण्णवतितमः ।

**एतावता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य योगवृत्तं पञ्चममधिकरणं समाप्तम् ।**

४७ किंवा राजा जर मुख्य अधिकाऱ्यांच्या कह्यात गेला असेल तर अर्थशास्त्रात निष्णात असणाऱ्या अमात्याने राजाला प्रिय असणाऱ्या माणसांचा आधार मिळवून इतिहास व पुराणे यांच्या द्वारा त्याला बोध करून द्यावा.

४८ किंवा सिद्ध पुरुषाचे बाह्य रूप धारण करून (आणि) गूढ उपायांचा अवलंब करून (अमात्याने) राजावर ताबा मिळवावा आणि तो मिळविल्यावर राजद्रोह्यांच्या संबंधात दांडकर्मिक प्रकरणात (अध्याय ५.१ मध्ये) सांगितलेले उपाय योजावेत.

पाचवे अधिकरण समाप्त

# मण्डलयोनिः – षष्ठमधिकरणम्

१

## [ षण्णवतितमं प्रकरणम् – प्रकृतिसंपदः ]

**स्वाम्यमात्यजनपददुर्गकोशदण्डमित्राणि प्रकृतयः । १ ।**

**तत्र स्वामिसंपत् । २ ।**

**महाकुलीनो दैवबुद्धिसत्त्वसंपन्नो वृद्धदर्शी धार्मिकः सत्यवागविसंवादकः कृतज्ञः स्थूललक्षो महोत्साहोऽदीर्घसूत्रः शक्यसामन्तो दृढबुद्धिरक्षुद्रपरिषत्को विनयकाम इत्याभिगामिका गुणाः । ३ ।**

**शुश्रूषाश्रवणग्रहणधारणविज्ञानोहापोहतत्त्वाभिनिवेशाः प्रज्ञागुणाः । ४ ।**
**शौर्यममर्षः शीघ्रता दाक्ष्यं चोत्साहगुणाः । ५ ।**

## सहावे अधिकरण – राजमंडलाचे मूळ

## पहिला अध्याय

## प्रकरण ९६ : राज्याच्या प्रकृतींचे उत्कृष्ट गुण

१ राजा, अमात्य, जनपद, दुर्ग, कोश, सैन्य आणि मित्र ह्या राज्याच्या (सात) प्रकृती (अंगे) होत.

२ त्यांपैकी राजाच्या ठायी आवश्यक उत्कृष्ट गुण पुढीलप्रमाणे :

३ श्रेष्ठ कुलात जन्मलेला, नशीबवान, बुद्धिमान आणि सत्त्वयुक्त, विद्यावृद्धांची संगत ठेवणारा, धर्माचरण करणारा, खरे बोलणारा, विसंवाद न दाखविणारा (बोलेल तसे वागणारा), कृतज्ञ, उदार, मोठा उत्साह असणारा, दीर्घसूत्री नसणारा, शेजारी दुर्बल राजे असलेला, निश्चयी स्वभावाचा, मंत्रिपरिषद भारदस्त असलेला आणि विनयाची कामना करणारा – हे आभिगामिक (ज्याच्याकडे जाण्यास भीती वाटण्याचे कारण नाही अशा राजाचे) गुण.

४ श्रवण करण्याची इच्छा, श्रवण करणे, ग्रहण करणे, धारण करणे, ज्ञान होणे, विचार करणे, (चुकीच्या विचारांचा) त्याग आणि खऱ्या अर्थाविषयी आग्रह हे बुद्धीचे गुण होत.

५ शौर्य, अन्याय वगैरे सहन न करणे, त्वरित काम करणे व दक्षता हे उत्साहाचे गुण होत.

**वाग्मी प्रगल्भः स्मृतिमतिबलवानुदग्रः स्ववग्रहः कृतशिल्पोऽव्यसनो दण्डनाय्युपकारापकारयोर्दृष्टप्रतीकारी ह्रीमानापत्प्रकृत्योर्विनियोक्ता दीर्घदूरदर्शी देशकालपुरुषकारकार्यप्रधानः संधिविक्रमत्यागसंयमपणपरच्छिद्रविभागी संवृतोऽदीनाभिहास्यजिह्मभ्रुकुटीक्षणः कामक्रोधलोभस्तम्भचापलोपतापपैशुन्यहीनः शक्लः स्मितोदग्राभिभाषी वृद्धोपदेशाचार इत्यात्मसंपत् । ६ ।**

**अमात्यसंपदुक्ता पुरस्तात् । ७ ।**

**मध्ये चान्ते च स्थानवानात्मधारणः परधारणश्चापदि स्वारक्षः स्वाजीवः शत्रुद्वेषी शक्यसामन्तः पङ्कपाषाणोषरविषमकण्टकश्रेणीव्यालमृगाटवीहीनः कान्तः सीताखनिद्रव्यहस्तिवनवान् गव्यः पौरुषेयो गुप्तगोचरः पशुमानदेवमातृको वारिस्थलपथाभ्यामुपेतः सारचित्रबहुपण्यो दण्डकरसहः कर्मशीलकर्षकोऽबालिशस्वाम्यवरवर्णप्रायो भक्तशुचिमनुष्य इति जनपदसंपत् । ८ ।**

६ बोलण्यात कुशल, धीट, स्मरणशक्ती, बुद्धी व बल यांनी युक्त, उमदा, मार्गदर्शन करून घेण्यास कठीण नसलेला, कला अवगत असलेला, व्यसनांपासून मुक्त, सैन्याचे नेतृत्व करण्यास समर्थ, उपकार किंवा अपकार झाला असता शास्त्रदृष्ट रीतीने प्रतिकार करणारा, (प्रसंगी) लज्जेची भावना असणारा, आपत्काळ व नेहमीची वेळ यांत यथोचित उपाय योजणारा, कालदृष्ट्या व देशदृष्ट्या दूरवरचे पाहू शकणारा, देश, काल व पुरुषाचे प्रयत्न यांनी साध्य होणाऱ्या कार्यांना प्राधान्य देणारा, तह करणे व युद्ध करणे, देणे व राखून ठेवणे, अटी पाळणे व शत्रूचे छिद्र दिसल्यास त्या मोडणे यांतील भेद जाणून त्याप्रमाणे वागणारा, (मंत्राची) गुप्तता राखणारा, दीनपणे न हसणारा, भुवया व दृष्टी वाकडी न करणारा, काम, क्रोध, लोभ, ताठा, चापल्य (अस्थिरता), छळ आणि निंदकता यांनी रहित असलेला, मधुरभाषी, हसून व प्रतिष्ठितपणे बोलणारा, वृद्धांच्या उपदेशानुसार वागणारा हे आत्म्याचे उत्कृष्ट गुण होत.

७ अमात्याचे उत्कृष्ट गुण मागे (१.९.१ या सूत्रात) सांगितले आहेत.

८ मध्यभागी व सरहद्दीवर (दुर्गासारखी) मजबूत ठिकाणे असलेला, आपत्काली स्वतःचे व दुसऱ्यांचे पोषण करावयास समर्थ, रक्षण करावयास सोपा, उपजीविकेची साधने सुलभ असलेला, शत्रूंचा विरोध करणारा, शेजारचे राजे दुर्बल असलेला, चिखल, दगड, खारी जमीन, उंचसखल जमीन, काटे, श्रेणी, हिंस्र प्राणी, हरीण व रानटी टोळ्या यांनी विरहित, रमणीय, शेतीची जमीन, खाणी, द्रव्यवन व हस्तिवन यांनी युक्त, दुभत्या जनावरांना लाभदायक, मनुष्यांना लाभदायक, संरक्षित कुरणे असलेला, पुष्कळ व उत्तम जनावरे असलेला, पावसाच्या पाण्यावरच अवलंबून नसलेला, जलमार्ग व स्थलमार्ग असलेला, भारी किंमतीचा, निरनिराळ्या प्रकारचा विक्रेय माल भरपूर असलेला,

**दुर्गसंपदुक्ता पुरस्तात् । ९ ।**

**धर्माधिगतः पूर्वैः स्वयं वा हेमरूप्यप्रायश्चित्रस्थूलरत्नहिरण्यो दीर्घामप्यापदमनायतिं सहेतेति कोशसंपत् । १० ।**

**पितृपैतामहो नित्यो वश्यस्तुष्टभृतपुत्रदारः प्रवासेष्वविसंवादितः सर्वत्राप्रतिहतो दुःखसहो बहुयुद्धः सर्वयुद्धप्रहरणविद्याविशारदः सहवृद्धिक्षयिकत्वादद्वैध्यः क्षत्रप्राय इति दण्डसंपत् । ११ ।**

**पितृपैतामहं नित्यं वश्यमद्वैध्यं महल्लघुसमुत्थमिति मित्रसंपत् । १२ ।**

**अराजबीजी लुब्धः क्षुद्रपरिषत्को विरक्तप्रकृतिरन्यायवृत्तिरयुक्तो व्यसनी निरुत्साहो दैवप्रमाणो यत्किंचनकार्यगतिरननुबन्धः क्लीबो नित्यापकारी चेत्यमित्रसंपत् । १३ । एवंभूतो हि शत्रुः सुखः समुच्छेत्तुं भवति । १४ ।**

दंड व कर देण्यास समर्थ, उद्यमशील शेतकरी असलेला, मूर्ख राजा नसलेला, मुख्यतः खालच्या (शूद्र) वर्णाची वस्ती असलेला आणि राजनिष्ठ व सदाचारी माणसे असलेला – हे (जनपदाचे म्हणजे) देशाचे उत्कृष्ट गुण होत.

९ दुर्गाचे उत्कृष्ट गुण मागे (अध्याय २.३ मध्ये) सांगितले आहेत.

१० पूर्वजांनी किंवा स्वतः न्यायाने मिळविलेला, मुख्यतः सोनेचांदीच्या रूपात असलेला, मोठ्या व विविध प्रकारच्या रत्नांनी व द्रव्याने भरलेला, उत्पन्न प्राप्त होत नसलेल्या अशा फार वेळ टिकणाऱ्या आपत्तीलाही तोंड देऊ शकणारा – हे खजिन्याचे उत्कृष्ट गुण होत.

११ वाडवडिलांपासून आलेले, कायम असलेले, आज्ञापालन करणारे, सैनिकांची वायकामुले संतुष्ट असलेले, प्रवासांत निराशाग्रस्त न होणारे, कोठेही अडविले न जाणारे, कष्ट सहन करणारे, अनेक युद्धांत भाग घेतलेले, सर्व प्रकारच्या युद्धांत व शस्त्रविद्यांत निष्णात असलेले, (राजाच्या) बरोबरच भरभराट व विपन्नावस्था होत असल्यामुळे त्याच्यापेक्षा दुसरे काही प्रयोजन नसणारे आणि मुख्यतः क्षत्रिय वर्णाचे – हे सैन्याचे उत्कृष्ट गुण होत.

१२ वाडवडिलांपासून मैत्रीच्या नात्याने जोडलेला, स्थिर, ताब्यात असलेला, स्वतःचे भिन्न प्रयोजन नसलेला, मोठा आणि त्वरित मदतीची उभारणी करणारा – हे मित्राचे उत्कृष्ट गुण होत.

१३ राजकुलात जन्मास न आलेला, लोभी, क्षुद्र सदस्यांची मंत्रिपरिषद असलेला, प्रजाजनांचे प्रेम नसलेला, अन्यायाने वागणारा, कामात दक्ष नसलेला, व्यसनी, उत्साहहीन, नशिबावर भरवसा ठेवणारा, मनास येईल ते करणारा, आधार नसलेला, अनुयायी नसलेला, षंढ व नेहमी अपकार करणारा – हे शत्रूचे उत्कृष्ट गुण. १४ कारण, अशा प्रकारच्या शत्रूचा समूळ उच्छेद करणे सोपे असते.

अरिवर्जाः प्रकृतयः सप्तैताः स्वगुणोदयाः ।
उक्ताः प्रत्यङ्गभूतास्ताः प्रकृता राजसंपदः ॥ १५ ॥
संपादयत्यसंपन्नाः प्रकृतीरात्मवान्नृपः ।
विवृद्धाश्चानुरक्ताश्च प्रकृतीर्हन्त्यनात्मवान् ॥ १६ ॥
ततः स दुष्टप्रकृतिश्चातुरन्तोऽप्यनात्मवान् ।
हन्यते वा प्रकृतिभिर्याति वा द्विषतां वशम् ॥ १७ ॥
आत्मवांस्त्वल्पदेशोऽपि युक्तः प्रकृतिसंपदा ।
नयज्ञः पृथिवीं कृत्स्नां जयत्येव न हीयते ॥ १८ ॥

इति मण्डलयोनौ षष्ठेऽधिकरणे प्रकृतिसंपदः प्रथमोऽध्यायः । आदितः सप्तनवतितमः ।

२

## [ सप्तनवतितमं प्रकरणम् – शमव्यायामिकम् ]

**शमव्यायामौ योगक्षेमयोर्योनिः । १ । कर्मारम्भाणां योगाराधनो व्यायामः । २ । कर्मफलोपभोगानां क्षेमाराधनः शमः । ३ । शमव्यायामयोर्योनिः षाड्गुण्यम् । ४ । क्षयः स्थानं वृद्धिरित्युदयास्तस्य । ५ ।**

१५ शत्रू वगळून बाकीच्या ह्या सात प्रकृती त्यांच्या गुणांच्या उत्कृष्टतेसह वर्णन केल्या आहेत; त्या व्यापृत होत असता राजाच्या उत्कृष्ट गुणांच्या अंगीभूत होऊन असतात.

१६ आत्मगुणांनी संपन्न असलेला राजा इतर प्रकृतींना संपन्न बनवितो. आत्मसंपन्न नसलेला राजा समृद्ध व राजनिष्ठ प्रकृतींचाही नाश करतो.

१७ त्यानंतर तो आत्मगुणहीन राजा, इतर प्रकृती दोषपूर्ण झाल्यामुळे, पृथ्वीच्या चारी अंतांपर्यंत राज्य करीत असला तरी, एक तर प्रजाजनांकडून मारला जातो किंवा शत्रूंच्या तावडीत सापडतो.

१८ परंतु आत्मसंपन्न राजा लहान देशाचा स्वामी असला तरी प्रकृतींच्या संपन्नतेने युक्त होऊन, राजनीतीत पारंगत असल्यामुळे सर्व पृथ्वी जिंकून घेतोच, कधीही पराभूत होत नाही.

## दुसरा अध्याय

### प्रकरण ९७ : शांततापालन व उद्यमशीलता यांविषयी

१ शांतता आणि उद्योग हे योगक्षेमाचे मूळ होत. २ प्रारभ केलेल्या कार्यांची सिद्धी (योग) घडवून आणणारा तो व्यायाम अथवा उद्योग. ३ कार्याच्या फलांच्या उपभोगांची सुरक्षितता (क्षेम) निर्माण करणारी ती शांतता. ४ शांतता व उद्योग यांचे मूळ षाड्गुण्यात (सहा प्रकारच्या परराष्ट्रीय धोरणात) आहे. ५ उत्कर्ष, आहे तशीच स्थिती आणि अपकर्ष हे त्या षाड्गुण्याचे परिणाम.

**मानुषं नयापनयौ, दैवमयानयौ । ६ । दैवमानुषं हि कर्म लोकं यापयति । ७ । अदृष्टकारितं दैवम् । ८ । तस्मिन्निष्टेन फलेन योगोऽयः, अनिष्टेनानयः । ९ । दृष्टकारितं मानुषम् । १० । तस्मिन् योगक्षेमनिष्पत्तिर्नयः, विपत्तिरपनयः । ११ । तच्चिन्त्यम्, अचिन्त्यं दैवम् । १२ ।**

**राजा आत्मद्रव्यप्रकृतिसंपन्नो नयस्याधिष्ठानं विजिगीषुः । १३ । तस्य समन्ततो मण्डलीभूता भूम्यनन्तरा अरिप्रकृतिः । १४ । तथैव भूम्येकान्तरा मित्रप्रकृतिः । १५ ।**

**अरिसंपद्युक्तः सामन्तः शत्रुः, व्यसनी यातव्यः, अनपाश्रयो दुर्बलाश्रयो वोच्छेदनीयः, विपर्यये पीडनीयः कर्शनीयो वा । १६ । इत्यरिविशेषाः । १७ ।**

**तस्मान्मित्रमरिमित्रं मित्रमित्रमरिमित्रमित्रं चानन्तर्येण भूमीनां प्रसज्यन्ते पुरस्तात्, पश्चात् पार्ष्णिग्राह आक्रन्दः पार्ष्णिग्राहासार आक्रन्दासारः । १८ ।**

६ नय (नीती) व अपनय (चुकीची नीती) हे मनुष्यकृत होत, अय (चांगले नशीब) व अनय (वाईट नशीब) दैवकृत होत. ७ दैवकृत व मनुष्यकृत कृत्यांनी लोकव्यवहार चालतात. ८ अदृश्य कारणांनी घडून येणारे ते दैवकृत. ९ त्यात इष्ट फलाची प्राप्ती म्हणजे अय (सुदैव), अनिष्ट फलाची प्राप्ती म्हणजे अनय (दुर्दैव). १० दृश्य कारणांनी घडून येते ते मनुष्यकृत. ११ त्यात योगक्षेमाची सिद्धी म्हणजे नय, (योगक्षेमाचा) नाश म्हणजे अपनय. १२ त्याचा विचार करता येतो, दैवकृताची अगोदर कल्पना करता येत नाही.

१३ आत्मगुणांनी व द्रव्यप्रकृतींच्या गुणांनी संपन्न (आणि) नयाचे अधिष्ठान असलेला राजा विजिगीषु (इतरांना जिंकण्याची इच्छा बाळगणारा). १४ त्याला सर्व बाजूनी घेरणारी, त्याच्या राज्याला लागून असणारी ती अरि (शत्रू) नावाची प्रकृती. १५ तशीच (सर्व बाजूनी घेरणारी) एक राज्य सोडून पलीकडे असणारी ती मित्र नावाची प्रकृती.

१६ अरीच्या 'गुणांनी' संपन्न असा शेजारचा राजा तो शत्रू, संकटात सापडलेला (शेजारचा राजा) तो यातव्य (चाल करून जाण्यास योग्य) ज्याला (दुर्ग अथवा मित्र) यांचा आश्रय नाही किंवा ज्याचा आश्रय दुर्बल आहे (असा शेजारचा राजा) उच्छेदनीय (समूळ नाश करण्यास योग्य); याच्या उलट (बलवान आश्रय असलेला) पीडनीय (त्रास देत राहण्यास योग्य) किंवा कर्शनीय (दुर्बल करण्यास योग्य). १७ असे हे अरींचे प्रकार होत.

१८ त्याच्या पलीकडे विजिगीषूच्या पुढच्या बाजूला एकाच्या राज्याला लागून दुसऱ्याचे याप्रमाणे मित्र, अरीचा मित्र, मित्राचा मित्र आणि अरीच्या मित्राचा मित्र असे राजे असतात, त्याच्या पिछाडीला पार्ष्णिग्राह (पाय ओढणारा पिछाडीचा शत्रू), आक्रंद (ज्याला मदतीसाठी हाक मारली जाते तो पिछाडीचा

भूम्यनन्तरः प्रकृत्यमित्रः, तुल्याभिजनः सहजः, विरुद्धो विरोधयिता वा कृत्रिमः । १९ ।

भूम्येकान्तरं प्रकृतिमित्रं, मातापितृसंबद्धं सहजं, धनजीवितहेतोराश्रितं कृत्रिमम् । २० ।

अरिविजिगीष्वोर्भूम्यनन्तरः संहतासंहतयोरनुग्रहसमर्थो निग्रहे चासंहतयोर्मध्यमः । २१ ।

अरिविजिगीषुमध्यानां बहिः प्रकृतिभ्यो बलवत्तरः संहतासंहतानामरिविजिगीषुमध्यमानामनुग्रहसमर्थो निग्रहे चासंहतानामुदासीनः । २२ ।

इति प्रकृतयः । २३ ।

विजिगीषुर्मित्रं मित्रमित्रं वाऽस्य प्रकृतयस्तिस्रः । २४ । ताः पञ्चभिरमात्यजनपददुर्गकोशदण्डप्रकृतिभिरेकैकशः संयुक्ता मण्डलमष्टादशकं भवति । २५ । अनेन मण्डलपृथक्त्वं व्याख्यातमरिमध्यमोदासीनानाम् । २६ । एवं चतुर्मण्डलसंक्षेपः । २७ ।

मित्र), पार्ष्णिग्राहासार (पार्ष्णिग्राहाच्या मदतीस जाणारा त्याचा मित्र) आणि आक्रंदासार (आक्रंदाचा मित्र) याप्रमाणे एकामागे एक असे राजे असतात.

१९ (विजिगीषुच्या) राज्याला लागून असलेला तो स्वाभाविक शत्रू, समान कुळात जन्मलेला तो सहज (बरोबर उत्पन्न झालेला) शत्रू, विरुद्ध असणारा किंवा विरोध करावयास लावणारा तो कृत्रिम शत्रू.

२० एक राज्य सोडून पलीकडे असलेला तो स्वाभाविक मित्र, आई किंवा बाप यांच्या द्वारा नात्याने जोडलेला तो सहज मित्र, धन किंवा जीवित यांच्या रक्षणासाठी ज्याच्या आश्रयास जावे लागते तो कृत्रिम मित्र.

२१ अरी व विजिगीषू यांच्या राज्यांना लागून असलेला, ते दोघे एक झाले असता किंवा एक झाले नसता त्यांना मदत करण्यास समर्थ आणि त्यांची एकजूट नसता उभयतांचे दमन करण्यास समर्थ असलेला तो मध्यम राजा.

२२ अरी, विजीगीषू व मध्यम यांच्या राज्यांच्या बाहेर, (त्यांच्या) प्रकृतींपेक्षा अधिक बलवान असलेला, ते तिघे एक झाले असता किंवा एक झाले नसता त्यांना मदत देण्यास समर्थ आणि त्यांची एकजूट झाली नसता तिघांचेही दमन करण्यास समर्थ असलेला तो उदासीन राजा.

२३ याप्रमाणे ह्या प्रकृती होत.

२४ किंवा ह्या मंडलाच्या विजीगीषू, त्याचा मित्र आणि त्या मित्राचा मित्र ह्या तीन प्रकृती समजाव्यात. २५ अमात्य, जनपद, दुर्ग, कोश व दंड ह्या पाच प्रकृतींनी त्या तिन्ही प्रत्येकी संयुक्त झाल्या म्हणजे एकंदर अठरा प्रकृतींचे मंडल

**द्वादश राजकृतयः षष्टिर्द्रव्यप्रकृतयः, संक्षेपेण द्विसप्ततिः । २८ । तासां यथास्वं संपदः । २९ ।**

**शक्तिः सिद्धिश्च । ३० । बलं शक्तिः । ३१ । सुखं सिद्धिः । ३२ । शक्तिस्त्रिविधा – ज्ञानबलं मन्त्रशक्तिः, कोशदण्डबलं प्रभुशक्तिः, विक्रमबलमुत्साहशक्तिः । ३३ । एवं सिद्धिस्त्रिविधैव – मन्त्रशक्तिसाध्या मन्त्रसिद्धिः, प्रभुशक्तिसाध्या प्रभुसिद्धिः, उत्साहशक्तिसाध्या उत्साहसिद्धिः । ३४ ।**

**ताभिरभ्युच्चितो ज्यायान् भवति, अपचितो हीनः, तुल्यशक्तिः समः । ३५ । तस्माच्छक्तिं सिद्धिं च घटेतात्मन्यावेशयितुम्, साधारणो वा द्रव्यप्रकृतिष्वानन्तर्येण शौचवशेन वा । ३६ । दूष्यामित्राभ्यां वाऽपकृष्टुं यतेत । ३७ ।**

**यदि वा पश्येत् 'अमित्रो मे शक्तियुक्तो वाग्दण्डपारुष्यार्थदूषणैः प्रकृतीरुपहनिष्यति, सिद्धियुक्तो वा मृगयाद्यूतमद्यस्त्रीभिः प्रमादं गमिष्यति, स विरक्त-**

बनते. २६ याचप्रमाणे अरी, मध्यम व उदासीन यांचे प्रत्येकाचे निराळे अठरा प्रकृतींचे मंडल समजावे. २७ याप्रमाणे एकंदर चार मंडले होतात.

२८ बारा राजाच्या स्वरूपातील प्रकृती, साठ द्रव्यरूप प्रकृती, एकूण बहात्तर. २९ त्यांचे आपापले उत्कृष्ट गुण असतात.

३० शक्ती आणि सिद्धी (पुढीलप्रमाणे समजाव्यात). ३१ शक्ती म्हणजे बळ. ३२ सिद्धी म्हणजे सुखप्राप्ती. ३३ शक्ती तीन प्रकारची आहे – ज्ञानाने प्राप्त होणारी शक्ती ती मंत्रशक्ती, कोश व सैन्य यांनी प्राप्त होणारे बळ म्हणजे प्रभुशक्ती आणि पराक्रमाची शक्ती ती उत्साहशक्ती. ३४ याप्रमाणे सिद्धी सुद्धा तीनच प्रकारची – मंत्रशक्तीने साध्य होणारी ती मंत्रसिद्धी, प्रभुशक्तीने साध्य होणारी ती प्रभुसिद्धी आणि उत्साहशक्तीने साध्य होणारी ती उत्साहसिद्धी.

३५ त्या (शक्ती) वृद्धिंगत झाल्या म्हणजे (विजिगीषू अरीपेक्षा) वरचढ होतो, ऱ्हास पावल्या म्हणजे (तो त्याच्यापेक्षा) कमजोर होतो आणि उभयतांच्या शक्ती सारख्याच असल्या तर तो त्याच्या बरोबरीचा होतो. ३६ यास्तव त्याने शक्ती व सिद्धी स्वतःच्या ठिकाणी साध्य करण्याचा यत्न करावा, किंवा (त्या बाबतीत तो अरीच्या) बरोबरीचा असल्यास त्या (शक्ती व सिद्धी) द्रव्यप्रकृतींच्या ठिकाणी – जवळची असेल- त्याप्रमाणे किंवा राजनिष्ठतेच्या अनुरोधाने – साध्य करण्याचा प्रयत्न करावा. ३७ किंवा राजद्रोही आणि शत्रू (यांच्या शक्ती व सिद्धी) यांचा ऱ्हास करण्याचा प्रयत्न करावा.

३८ किंवा त्याला जर असे दिसून आले की, " शक्तींनी युक्त झाला म्हणजे माझा शत्रू वाक्पारुष्य (वचनाची कठोरता), दंडपारुष्य (शासनाची कठोरता) आणि अर्थदूषण (प्रजेची मालमत्ता लुबाडणे) ह्या (क्रोधज) व्यसनांमुळे

प्रकृतिरुपक्षीणः प्रमत्तो वा साध्यो मे भविष्यति; विग्रहाभियुक्तो वा सर्वसंदोहेनैकस्थोऽदुर्गस्थो वा स्थास्यति, स संहतसैन्यो मित्रदुर्गवियुक्तः साध्यो मे भविष्यति; "बलवान् वा राजा परतः शत्रुमुच्छेत्तुकामः तमुच्छिद्य मामुच्छिन्द्याद्" इति बलवता प्रार्थितस्य मे विपन्नकर्मारम्भस्य वा साहाय्यं दास्यति;' मध्यमलिप्सायां च, इत्येवमादिषु कारणेष्वमित्रस्यापि शक्तिं सिद्धिं चेच्छेत् । ३८ ।

नेमिमेकान्तरान् राज्ञः कृत्वा चानन्तरानरान् ।
नाभिमात्मानमायच्छेन्नेता प्रकृतिमण्डले ॥ ३९ ॥
मध्ये ह्युपहितः शत्रुर्नेतुर्मित्रस्य चोभयोः ।
उच्छेद्यः पीडनीयो वा बलवानपि जायते ॥ ४० ॥

इति मण्डलयोनौ षष्ठेऽधिकरणे शमव्यायामिकं द्वितीयोऽध्यायः । आदितोऽष्टनवतितमः ।

एतावता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य मण्डलयोनिः षष्ठमधिकरणं समाप्तम् ।

प्रजाजनांची हानी करील, अथवा सिद्धी प्राप्त झाली म्हणजे मृगया, द्यूत, मद्य व स्त्रिया ह्या (कामज) व्यसनांमुळे तो राज्याकडे दुर्लक्ष करील, मग प्रजाजनांचे त्याच्यावरील प्रेम नाहीसे झाले अथवा तो दुर्बल झाला किंवा राज्याकडे त्याचे दुर्लक्ष झाले म्हणजे तो सहज माझ्या तावडीत सापडेल; किंवा युद्ध पुकारून त्याच्यावर हल्ला केला तर तो आपल्या सर्व सैन्यानिशी एके ठिकाणी किंवा दुर्ग नसलेल्या ठिकाणी राहील, मग त्याचे सर्व सैन्य एकत्रित झाले असता व मित्र आणि दुर्ग यांचा त्याला आश्रय नसता मला त्याचा सहज पाडाव करता येईल; किंवा '(दुसरा एखादा) बलवान राजा माझा शत्रू जो (विजिगीषू) त्याचा उच्छेद करण्याच्या बेतात आहे, तो त्याचा उच्छेद करून नंतर माझाही उच्छेद करील' ह्या विचाराने शत्रू, त्या बलवान राजाने माझ्यावर हल्ला केला असता किंवा माझी सर्व कार्ये असफल झाली असता मला साह्य करील" तर (म्हणजे ह्या तीन संभाव्य प्रसंगी), तसेच (विजिगीषू) मध्यम राजावर तावा मिळवू इच्छित असेल तेव्हा, इत्यादी कारणांसाठी (विजिगीषूने) आपल्या शत्रूला सुद्धा शक्ती व सिद्धी यांची प्राप्ती व्हावी अशी इच्छा करावी.

३९ एक राज्य सोडून पलीकडे असलेल्या (मित्र) राजांना (चाकाच्या) परिघाच्या ठिकाणी आणि लागून असलेल्या (शत्रू) राजांना आऱ्यांच्या ठिकाणी कल्पून (राजमंडलाचे) नेतृत्व करणाऱ्याने (विजिगीषूने) स्वतःला प्रकृतींच्या मंडलामध्ये नाभीच्या स्थानी मानावे.

४० कारण, नेता (विजिगीषू) आणि त्याचा मित्र ह्या दोहोंच्या मध्ये सापडलेला शत्रू, तो बलवान असला तरी, उच्छेद करण्यालायक किंवा (निदान) सतत त्रास देण्यालायक होतो.

सहावे अधिकरण समाप्त

# षाड्गुण्यम्—सप्तममधिकरणम्

## १

**[ अष्टनवतितमं प्रकरणम् – षाड्गुण्यसमुद्देशः ;**

**नवनवतितमं प्रकरणम् – क्षयस्थानवृद्धिनिश्चयः ]**

**षाड्गुण्यस्य प्रकृतिमण्डलं योनिः । १ ।**

**'संधिविग्रहासनयानसंश्रयद्वैधीभावाः षाड्गुण्यम्' इत्याचार्याः । २ । 'द्वैगुण्यम्' इति वातव्याधिः । ३ । 'संधिविग्रहाभ्यां हि षाड्गुण्यं संपद्यते' इति । ४ । षाड्गुण्यमेवैतद् अवस्थाभेदादिति कौटिल्यः । ५ ।**

## सातवे अधिकरण – सहा प्रकारची धोरणे

### पहिला अध्याय

प्रकरण ९८ : परराष्ट्रविषयक धोरणाच्या सहा अंगांचा निर्देश ;
प्रकरण ९९ : ऱ्हास, स्थिरता व वृद्धी यांच्या प्रसंगी घ्यावयाचे निर्णय

१ सहा प्रकारच्या परराष्ट्रीय धोरणांचे मूळ प्रकृतींच्या मंडलात आहे.

२ "संधी (तह करणे), विग्रह (युद्ध पुकारणे), आसन (स्वस्थ बसणे), यान (चढाई करून जाणे), संश्रय (आश्रयास जाणे) आणि द्वैधीभाव (एकाशी तह करून दुसऱ्याशी युद्ध पुकारणे) हे धोरणांचे सहा प्रकार होत," असे आचार्यांचे मत आहे. ३ "धोरणाचे (संधी व विग्रह हे) दोनच प्रकार आहेत, असे वातव्याधीचे मत आहे. ४ "कारण, संधी व विग्रह यांच्यातूनच सहा प्रकारची धोरणे निष्पन्न होतात." ५ "परिस्थितीतील भेदांमुळे हे सहा प्रकार भिन्न भिन्नच आंहेत," असे कौटिल्याचे मत आहे.

६ त्यांपैकी संधी म्हणजे अटी घालून केलेला करार. ७ विग्रह म्हणजे शत्रूला अपकार करणे. ८ आसन म्हणजे उपेक्षा करणे. ९ यान म्हणजे शक्ती वृद्धिगत होणे. १० संश्रय म्हणजे दुसऱ्याला शरण जाणे. ११ द्वैधीभाव म्हणजे (एकाशी) संधी व (दुसऱ्याशी) विग्रह यांचा अवलंब करणे. १२ अशी ही सहा धोरणे आहेत.

**तत्र पणबन्धः संधिः । ६ । अपकारो विग्रहः । ७ । उपेक्षणमासनम् । ८ । अभ्युच्चयो यानम् । ९ । परार्पणं संश्रयः । १० । संधिविग्रहोपादानं द्वैधीभावः । ११ । इति षड् गुणाः । १२ ।**

**परस्माद्धीयमानः संदधीत । १३ । अभ्युच्चीयमानो विगृह्णीयात् । १४ । 'न मां परो नाहं परमुपहन्तुं शक्तः' इत्यासीत । १५ । गुणातिशययुक्तो यायात् । १६ । शक्तिहीनः संश्रयेत । १७ । सहायसाध्ये कार्ये द्वैधीभावं गच्छेत् । १८ । इति गुणावस्थापनम् । १९ ।**

**तेषां यस्मिन् वा गुणे स्थितः पश्येत् 'इहस्थः शक्ष्यामि दुर्गसेतुकर्मवणिक्पथशून्यनिवेशखनिद्रव्यहस्तिवनकर्माण्यात्मनः प्रवर्तयितुं, परस्य चैतानि कर्माण्युपहन्तुम्' इति तमातिष्ठेत् । २० । सा वृद्धिः । २१ । 'आशुतरा मे वृद्धिर्भूयस्तरा वृद्ध्युदयतरा वा भविष्यति, विपरीता परस्य' इति ज्ञात्वा परवृद्धिमुपेक्षेत । २२ । तुल्यकालफलोदयायां वा वृद्धौ संधिमुपेयात् । २३ ।**

**यस्मिन् वा गुणे स्थितः स्वकर्मणामुपघातं पश्येन्नेतरस्य तस्मिन्न तिष्ठेत् । २४ ।**

१३ शत्रूपेक्षा कमजोर असता संधी करावा. १४ अधिक बलवान असल्यास विग्रह करावा. १५ "शत्रू मला इजा करू शकत नाही व मीही त्याला इजा करू शकत नाही," अशा स्थितीत आसनाचा अवलंब करावा. १६ (प्रकृतींच्या) गुणांनी अतिशय संपन्न झाला असेल तर यान करावे. १७ शक्तिहीन झाला असता संश्रयाचा अवलंब करावा. १८ एखादे कार्य दुसऱ्याच्या मदतीने साध्य होण्यासारखे असेल तेव्हा द्वैधीभावाचा अवलंब करावा. १९ याप्रमाण धोरणे प्रस्थापित केली आहेत.

२० त्यांपैकी ज्या धोरणाचा अवलंब केला असता त्याला असे दिसून येईल की, "ह्या धोरणाच्या अवलंबनाने मी दुर्ग बांधणे, सेतु बांधणे, व्यापारी मार्ग प्रस्थापित करणे, नवीन वसाहती स्थापणे, खाणी सुरू करणे, हस्तिवन व द्रव्यवन तयार करणे ही स्वतःची कार्ये पार पाडू शकेन आणि शत्रूच्या ह्याच कार्यांचा नाश करू शकेन," त्या धोरणाचा अवलंब करावा. २१ ही वृद्धी. २२ "माझी वृद्धी (शत्रूपेक्षा) अधिक लवकर किंवा अधिक मोठ्या प्रमाणात प्राप्त होणारी आहे किंवा भविष्यकाळी अधिक वृद्धी उत्पन्न करील अशी आहे, शत्रूची याच्या उलट आहे" असे जर त्याच्या ध्यानात आले तर शत्रूच्या वृद्धीची उपेक्षा करावी. २३ जर उभयतांच्या वृद्धीला तेवढाच काळ लागत असेल किंवा तिच्यामुळे दोघांना सारखीच फलप्राप्ती होणार असेल तर शत्रूशी संधी करावा.

२४ जे धोरण अवलंबिले असता स्वतःच्या कार्याचा नाश दिसून येईल, शत्रूच्या कार्याचा नाही, त्या धोरणाचा अवलंब करू नये. २५ हा ऱ्हास होय.

वि (वाय)— ३१७-२८

**एष क्षयः । २५ । 'चिरतरेणाल्पतरं वृद्धयुदयतरं वा क्षेष्ये, विपरीत परः' इति ज्ञात्वा क्षयमुपेक्षेत । २६ । तुल्यकालफलोदये वा क्षये संधिमुपेयात् । २७ ।**

**यस्मिन् वा गुणे स्थितः स्वकर्मवृद्धिं क्षयं वा नाभिपश्येदेतत्स्थानम् । २८ । 'ह्रस्वतरं वृद्धयुदयतरं वा स्थास्यामि, विपरीतं परः' इति ज्ञात्वा स्थानमुपेक्षेत । २९ । 'तुल्यकालफलोदये वा स्थाने संधिमुपेयाद्' इत्याचार्याः । ३० । नैनद्विभाषितमिति कौटिल्यः । ३१ ।**

**यदि वा पश्येत् 'सन्धौ स्थितो महाफलैः स्वकर्मभिः परकर्माण्युपहनिष्यामि; महाफलानि वा स्वकर्माण्युपभोक्ष्ये, परकर्माणि वा; संधिविश्वासेन वा योगोपनिषत्प्रणिधिभिः परकर्माण्युपहनिष्यामि; सुखं वा सानुग्रहपरिहारसौकर्यं फललाभभूयस्त्वेन स्वकर्मणां परकर्मयोगावहं जनमास्त्रावयिष्यामि; बलिनाऽतिमात्रेण वा संहितः परः स्वकर्मोपघातं प्राप्स्यति; येन वा विगृहीतो मया संधत्ते**

२६ (शत्रूपेक्षा) अधिक दीर्घ कालानंतर किंवा कमी प्रमाणात किंवा भविष्यकाळी अधिक वृद्धी उत्पन्न करणारा असा माझा ऱ्हास होईल व याच्या उलट शत्रूचा ऱ्हास होईल" असे कळून आले तर आपल्या ऱ्हासाची उपेक्षा करावी. २७ उभयतांचा ऱ्हास सारखाच वेळ टिकणारा असेल किंवा उभयतांना त्याचे सारखेच परिणाम भोगावे लागणार असतील तर शत्रूशी संधी करावा.

२८ ज्या धोरणाचा अवलंब केला असता स्वतःच्या कार्यांची भरभराट अथवा ऱ्हास दिसून येत नाही ती स्थिर अवस्था. २९ "(शत्रूपेक्षा) कमी अवधीची अथवा पुढे अधिक वृद्धी उत्पन्न करणारी अशी माझी स्थिर अवस्था आहे, शत्रूची याच्या उलट" असे लक्षात आले तर आपल्या स्थिर स्थितीची उपेक्षा करावी. ३० "दोघांचीही स्थिर स्थिती सारखाच वेळ टिकणारी अथवा सारखेच परिणाम घडवून आणणारी असेल तर संधी करावा," असे आचार्यांनी म्हटले आहे. ३१ यात काही विशेष असे सांगितले नाही, असे कौटिल्याचे म्हणणे आहे

३२ त्याला जर असे दिसून आले की, "संधी करून मोठे फळ देणाऱ्या माझ्या कार्यांच्या द्वारा मी शत्रूच्या कार्यांचा विध्वंस करीन; किंवा मोठे फळ देणाऱ्या स्वतःच्या कार्यांचा अथवा शत्रूच्या कार्यांचा मी उपभोग घेईन; किंवा संधीमुळे विश्वास उत्पन्न करून मी गुप्त व तांत्रिक उपायांची योजना करून शत्रूच्या कार्यांचा नाश करीन; किंवा शत्रूची कार्ये करण्यास समर्थ असलेल्या लोकांना खास अनुग्रह व करमाफी अनायासे मिळून माझ्या कार्यांत अधिक फलप्राप्ती होईल असे दाखवून मी स्वतःच्या राज्यात सहज आणवीन; किंवा (माझ्यासारख्या) अतिशय बलवान राजाशी संधी केल्यामुळे शत्रूच्या स्वतःच्या कार्यांचा आपोआपच नाश होईल; किंवा ज्याच्याशी युध्द चालू असल्यामुळे तो माझ्याशी संधी करीत

**तेनास्य विग्रहं दीर्घं करिष्यामि; मया वा संहितस्य मद्द्वेषिणो जनपदं पीडयिष्यति; परोपहतो वाऽस्य जनपदो मामागमिष्यति, ततः कर्मसु वृद्धिं प्राप्स्यामि; विपन्नकर्मारम्भो वा विषमस्थः परः कर्मसु न मे विक्रमेत; परतः प्रवृत्तकर्मारम्भो वा ताभ्यां संहितः कर्मसु वृद्धिं प्राप्स्यामि; शत्रुप्रतिबद्धं वा शत्रुणा संधिं कृत्वा मण्डलं भेत्स्यामि, भिन्नमवाप्स्यामि; दण्डानुग्रहेण वा शत्रुमुपगृह्य मण्डललिप्सायां विद्वेषं ग्राहयिष्यामि, विद्विष्टं तेनैव घातयिष्यामि' इति संधिना वृद्धिमातिष्ठेत् । ३२ ।**

**यदि वा पश्येत् 'आयुधीयप्रायः श्रेणीप्रायो वा मे जनपदः शैलवननदीदुर्गैकद्वारारक्षो वा शक्ष्यति पराभियोगं प्रतिहन्तुम्; विषयान्ते दुर्गमविषह्यमपाश्रितो वा शक्ष्यामि परकर्माण्युपहन्तुम्; व्यसनपीडोपहतोत्साहो वा परः संप्राप्तकर्मोपघातकालः; विगृहीतस्यान्यतो वा शक्ष्यामि जनपदमपवाहयितुम्' इति विग्रहे स्थितो वृद्धिमातिष्ठेत् । ३३ ।**

आहे त्याच्याशी त्याचे युद्ध दीर्घ काळ चालेल असे करीन; किंवा माझ्याशी तह केलेल्या पण शत्रुत्व करणाऱ्या (दुसऱ्या) राजाच्या प्रदेशाला तो (शत्रू) त्रास देत राहील; किंवा त्याच्या शत्रूने पीडलेला त्याचा प्रदेश माझ्याकडे (रक्षणासाठी) येईल व त्यामुळे माझ्या कार्यांची भरभराट होईल; किंवा त्याची कार्ये नष्ट झाल्यामुळे अडचणीत असलेला शत्रू माझ्या कार्यांवर हल्ला करणार नाही; किंवा दुसऱ्या ठिकाणी (दुसऱ्या एखाद्या राजाच्या प्रदेशानजीक) माझी कार्ये चालू असल्यामुळे उभयतांशी (शत्रू व तो दुसरा राजा यांच्याशी) संधी करून माझ्या कार्यांची वाढ करून घेईन; किंवा शत्रूशी संधी करून शत्रूच्या बाजूला असलेले राजमंडल त्याच्यापासून फोडीन आणि ते फुटले म्हणजे त्याला (मंडलाला) स्वतःच्या बाजूला वळवून घेईन; किंवा शत्रू मंडलाला आपल्या ताब्यात ठेऊ इच्छित असल्यास त्याला सैन्याची मदत देऊन मंडलाशी त्याचे शत्रुत्व उत्पन्न करीन व त्या शत्रुत्वाने मंडलामार्फतच त्याचा नाश घडवून आणीन," तर शत्रूशी संधी करून आपली वृद्धी साध्य करून घ्यावी.

३३ जर त्याला असे दिसून आले की, "मुख्यतः लढवय्यांची अथवा श्रेणींची वस्ती असलेला आणि पर्वतदुर्ग, वनदुर्ग अथवा नदीदुर्ग ह्याच एका आत प्रवेश करू देणाऱ्या दरवाज्यामुळे सुरक्षित असलेला माझा देश शत्रूचा हल्ला परतवून लावण्यास समर्थ आहे; किंवा राज्याच्या सरहद्दीवरील अभेद्य किल्ल्यात राहून मी शत्रूच्या कार्यांचा विध्वंस करू शकेन; किंवा संकटांनी होणाऱ्या त्रासामुळे उत्साहभंग झालेल्या शत्रूच्या कार्यांचा विनाशकाल जवळ आला आहे; किंवा तो दुसरीकडे युद्धात गुंतला असता मी त्याचा देश वळकावू शकेन," तर विग्रहाचा अवलंब करून आपली भरभराट साध्य करावी.

यदि वा मन्येत 'न मे शक्तः परः कर्माण्युपहन्तुं नाहं तस्य कर्मोपघाती वा; व्यसनमस्य, श्ववराहयोरिव कलहे वा, स्वकर्मानुष्ठानपरो वा वर्धिष्ये' इत्यासनेन वृद्धिमातिष्ठेत् । ३४ ।

यदि वा मन्येत 'यानसाध्यः कर्मोपघातः शत्रोः, प्रतिविहितस्वकर्मारक्षश्चास्मि' इति यानेन वृद्धिमातिष्ठेत् । ३५ ।

यदि वा मन्येत 'नास्मि शक्तः परकर्माण्युपहन्तुं, स्वकर्मोपघातं वा त्रातुम्' इति, बलवन्तमाश्रितः स्वकर्मानुष्ठानेन क्षयात्स्थानं स्थानाद्वृद्धिं चाकाङ्क्षेत । ३६ ।

यदि वा मन्येत 'संधिनैकतः स्वकर्माणि प्रवर्तयिष्यामि, विग्रहेणैकतः परकर्माण्युपहनिष्यामि' इति द्वैधीभावेन वृद्धिमातिष्ठेत् । ३७ ।

एवं षड्भिर्गुणैरेतैः स्थितः प्रकृतिमण्डले ।
पर्येषेत क्षयात्स्थानं स्थानाद्वृद्धिं च कर्मसु ।। ३८ ।।

इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे षाड्गुण्यसमुद्देशः क्षयस्थानवृद्धिनिश्चयश्च प्रथमोऽध्यायः ।
आदितो नवनवतितमः ।

३४ त्याला जर असे वाटले की, "शत्रू माझ्या कार्यांचा नाश करू शकत नाही किंवा मीही त्याची कार्ये नष्ट करू शकत नाही; तो संकटात आहे अशा वेळी किंवा त्याचे (दुसऱ्या राजाबरोबर) शिकारी कुत्रा व रानडुक्कर यांच्यातील लढ्यासारखा (दोघांपैकी कोणातरी एकाच्या नाशानेच शेवट होणारा) लढा चालू आहे अशा वेळी मी स्वतःची कार्ये करीत राहून वृद्धी साध्य करीन," तर आसनाचा अवलंब करून भरभराट करून घ्यावी.

३५ जर त्याला वाटले की, "चाल करून गेल्यानेच शत्रूच्या कार्यांचा नाश होऊ शकेल आणि माझ्या स्वतःच्या कार्यांच्या रक्षणाची मी तजवीज केली आहे," तर यानाचा अवलंब करून वृद्धी प्राप्त करून घ्यावी.

३६ जर त्याला वाटले की, "मी शत्रूच्या कार्यांचा विध्वंस करू शकत नाही किंवा माझ्या कार्यांचे विनाशापासून रक्षण करू शकत नाही," तर बलवान राजाच्या आश्रयास जाऊन आपली कार्ये पार पाडून ऱ्हासापासून स्थिरता व स्थिरतेपासून वृद्धी प्राप्त करण्याचा प्रयत्न करावा.

३७ जर त्याला वाटले की, "एका बाजूला (म्हणजे एका राजाशी) संधी करून मी स्वतःची कार्ये चालू करीन आणि दुसऱ्या बाजूला (दुसऱ्या राजाशी) विग्रह करून मी शत्रूच्या कार्यांचा नाश करीन," तर द्वैधीभावाचा अवलंब करून वृद्धी प्राप्त करून घ्यावी.

३८ याप्रमाणे राजमंडलाच्या प्रकृतींमध्ये ह्या सहा धोरणांचा अवलंब करून आपल्या कार्यांत ऱ्हासापासून स्थिर स्थिती आणि स्थिर स्थितीपासून वृद्धी याप्रमाणे प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करावा.

२

[ शततमं प्रकरणम् – संश्रयवृत्तिः ]

**संधिविग्रहयोस्तुल्यायां वृद्धौ संधिमुपेयात् । १ । विग्रहे हि क्षयव्ययप्रवास-प्रत्यवाया भवन्ति । २ । तेनासनयानयोरासनं व्याख्यातम् । ३ । द्वैधीभाव-संश्रययोर्द्वैधीभावं गच्छेत् । ४ । द्वैधीभूतो हि स्वकर्मप्रधान आत्मन एवोपकरोति, संश्रितस्तु परस्योपकरोति, नात्मनः । ५ ।**

**यद्बलः सामन्तस्तद्विशिष्टबलमाश्रयेत । ६ । तद्विशिष्टबलाभावे तमेवाश्रितः कोशदण्डभूमीनामन्यतमेनास्योपकर्तुमदृष्टः प्रयतेत । ७ । महादोषो हि विशिष्ट-बलसमागमो राज्ञाम्, अन्यत्रारिविगृहीतात् । ८ । अशक्ये दण्डोपनतवद्वर्तेत । ९ । यदा चास्य प्राणहरं व्याधिमन्तःकोपं शत्रुवृद्धिं मित्रव्यसनमुपस्थितं वा तन्निमित्ता-**

## दुसरा अध्याय

### प्रकरण १०० : आश्रयास जाताना वागणूक

१ संधी व विग्रह ह्या दोहोंपासून सारखीच भरभराट होत असेल तर संधीचा अवलंब करावा. २ कारण, विग्रहात सैनिकांची व वाहनांची हानी, पैशाचा खर्च, लांबचा प्रवास आणि अडचणी उत्पन्न होतात. ३ त्याचप्रमाणे आसन व यान यांपैकी आसनाचा अवलंब करावा. ४ द्वैधीभाव व संश्रय (यांच्यापासून सारखाच लाभ असता) यांपैकी द्वैधीभावाचा अवलंब करावा. ५ कारण, द्वैधीभाव अवलंबिल्यावर (विजिगीषू) आपलीच कार्ये पार पाडण्यावर भर देऊन स्वतःचाच लाभ करून घेतो, परंतु कोणाच्या आश्रयास गेल्यावर तो दुसऱ्याचा लाभ करून देतो, स्वतःचा नाही.

६ शेजारच्या राजाचे (अरीचे) जितके बळ असेल त्याच्यापेक्षा अधिक बळ असलेल्या राजाकडे आश्रयास जावे. ७ त्याच्यापेक्षा अधिक बळ असलेला कोणी राजा नसल्यास त्याच्याच (अरीच्याच) आश्रयास जाऊन स्वतः त्याच्या दृष्टीस न पडता (दूर राहून) त्याला कोश, सैन्य व भूमी यांच्यापैकी एकाने संतुष्ट करण्याचा प्रयत्न करावा. ८ कारण, बलाढ्य राजाशी ऐक्य करण्यात, तो त्याच्या स्वतःच्या शत्रूशी विग्रह करीत नसताना, (दुर्बल) राजांना मोठा धोका असतो. ९ हे (त्याच्यापासून दूर रहाणे) शक्य नसल्यास दंडोपनतवृत्त प्रकरणात (पुढे अध्याय ७.१५ मध्ये) सांगितल्याप्रमाणे वागावे. १० आणि जेव्हा त्याला प्राणघातक व्याधी जडला असेल, त्याच्या राज्यात क्षोभ झाला असेल, त्याच्या शत्रूची वृद्धी झाली असेल किंवा त्याचा मित्र संकटात सापडला असेल आणि ह्या कारणांमुळे आपली आता भरभराट होईल असे दिसेल, तेव्हा

मात्मनश्च वृद्धिं पश्येत् तदा संभाव्यव्याधिधर्मकार्यापदेशेनापयायात् ।१०। स्वविषयस्थो वा नोपगच्छेत् ।११। आसन्नो वाऽस्य च्छिद्रेषु प्रहरेत् ।१२।

बलीयसोर्वा मध्यगतस्त्राणसमर्थमाश्रयेत, यस्य वाऽन्तर्धिः स्यात् ।१३। उभौ वा कपालसंश्रयस्तिष्ठेत्, मूलहरमितरस्येतरमपदिशन् ।१४। भेदमुभयोर्वा परस्परापदेशं प्रयुञ्जीत, भिन्नयोरुपांशुदण्डम् ।१५।

पार्श्वस्थो वा बलस्थयोरासन्नभयात्प्रतिकुर्वीत ।१६। दुर्गापाश्रयो वा द्वैधीभूतस्तिष्ठेत् ।१७। संधिविक्रमहेतुभिर्वा चेष्टेत ।१८। दूष्यामित्राटविकानुभयोरुपगृह्णीयात् ।१९। एतयोरन्यतरं गच्छंस्तैरेवान्यतरस्य व्यसने प्रहरेत् ।२०।

द्वाभ्यामुपहतो वा मण्डलापाश्रयस्तिष्ठेत्, मध्यममुदासीनं वा संश्रयेत ।२१। तेन सहैकमुपगृह्येतरमुच्छिन्द्याद्, उभौ वा ।२२।

व्याधीची अथवा धर्मकार्याची संभाव्य सबब सांगून (त्याच्याजवळून) निघून जावे. ११ किंवा आपल्या स्वतःच्याच देशात असल्यास त्याच्याकडे जाऊ नये. १२ किंवा त्याच्या संनिध असल्यास योग्य संधी साधून त्याच्यावर प्रहार करावा.

१३ दोन बलवान राजांच्या मध्ये असलेल्या (दुर्बल) राजाने जो रक्षण करण्यास समर्थ असेल त्याच्या आश्रयास जावे किंवा ज्याचा तो अंतर्धी असेल त्याच्या. १४ किंवा दोघांच्याही आश्रयास (हातात भिकेसाठी) खापर घेऊन जावे आणि (तसे करताना) त्यांच्यापैकी एक दुसऱ्याचे राज्य बळकावू पहात आहे असा प्रचार करावा. १५ किंवा त्या दोघांना एकमेकांविरुद्ध गोष्टी सांगून त्यांच्यात फूट पाडावी आणि फूट पडली की गुप्त दंडाने त्यांचा निकाल लावावा.

१६ किंवा दोन बलवान राजांच्या बाजूच्या भागाला असल्यास जो जवळचा धोका असेल त्याचे निवारण करावे. १७ किंवा दुर्गाच्या आश्रयाने द्वैधीभावाचा (एकाशी संधी व दुसऱ्याशी विग्रह) अवलंब करावा. १८ किंवा संधी अथवा पराक्रम यांचा अवलंब करण्याची जी कारणे त्यांना अनुसरून वागावे. १९ दोघांचे राजद्रोही, शत्रू आणि रानटी टोळ्या यांना पाठिंबा द्यावा. २० ह्या दोहोंपैकी एकाकडे जाऊन दुसऱ्यावरील संकटाच्या वेळी ह्या राजद्रोही वगैरेंच्या द्वाराच त्याच्यावर प्रहार करावा.

२१ किंवा दोघांनी पीडिला गेला असता मंडलाच्या आश्रयाने रहावे किंवा मध्यम अथवा उदासीन यांच्या आश्रयास जावे. २२ त्याच्या साह्याने त्या दोहोंपैकी एकाला पाठिंबा देऊन दुसऱ्याचा उच्छेद करावा, किंवा दोघांचा उच्छेद करावा.

द्वाभ्यामुच्छिन्नो वा मध्यमोदासीनयोस्तत्पक्षीयाणां वा राज्ञां न्यायवृत्तिमाश्रयेत । २३ । तुल्यानां वा यस्य प्रकृतयः सुख्येयुरेनं, यत्रस्थो वा शक्नुयादात्मानमुद्धर्तुं, यत्र वा पूर्वपुरुषोचिता गतिरासन्नः संबन्धो वा, मित्राणि भूयांस्यतिशक्तिमन्ति वा भवेयुः । २४ ।

प्रियो यस्य भवेद् यो वा प्रियोऽस्य कतरस्तयोः ।
प्रियो यस्य स तं गच्छेदित्याश्रयगतिः परा ।। २५ ।।

इति षाडगण्ये सप्तमेऽधिकरणे संश्रयवृत्तिः द्वितीयोऽध्यायः । आदितः शततमः ।

३

[ एकशततमं प्रकरणम् – समहीनज्यायसां गुणाभिनिवेशः;
द्विशततमं प्रकरणम् – हीनसंधयः ]

विजिगीषुः शक्त्यपेक्षः षाड्गुण्यमुपयुञ्जीत । १ । समज्यायोभ्यां संधीयेत, हीनेन विगृह्णीयात् । २ । विगृहीतो हि ज्यायसा हस्तिना पादयुद्धमिवाभ्युपैति

२३ किंवा दोघांनी त्याचा उच्छेद केला असल्यास मध्यम, उदासीन व ह्या उभयतांच्या बाजूचे राजे ह्यांपैकी जो न्यायाने वागणारा असेल त्याच्या आश्रयास जावे. २४ सारखेच (न्यायवृत्ति) असलेल्यांपैकी ज्याच्या प्रकृती त्याला सुख देतील त्याच्या, किंवा ज्याच्याकडे राहून त्याला आपला उद्धार करून घेता येईल त्याच्या, किंवा ज्याच्याकडे त्याचे पूर्वज जात असत किंवा त्याचा निकटचा संबंध असेल त्याच्या, किंवा ज्याचे मित्र पुष्कळ अथवा अतिशय शक्तिसंपन्न असतील त्याच्या (आश्रयास जावे).

२५ ज्याला तो प्रिय आहे आणि त्याला जो प्रिय आहे ह्या दोहोंपैकी कोणाच्या आश्रयास त्याने जावे? ज्याला तो प्रिय असेल त्याच्या आश्रयास त्याने जावे. आश्रय घेण्याचा हाच सर्वोत्कृष्ट मार्ग.

## तिसरा अध्याय

### प्रकरण १०१ : तुल्यबल, हीनबल व बलवत्तर राजांनी करावयाचा धोरणांचा अवलंब

### प्रकरण १०२ : हीनबल राजाने करावयाचे संधी

१ विजिगीषूने आपल्या शक्तीच्या अनुरोधाने सहा प्रकारच्या धोरणांचा अवलंब करावा. २ तुल्यबल व बलवत्तर राजांशी संधी करावा, हीनबल राजाशी विग्रह. ३ कारण बलवत्तर राजाशी विग्रह केल्यास हत्तीबरोबर

। ३ । समेन चामं पात्रमामेनाहतमिवोभयतः क्षयं करोति । ४ । कुम्भेनेवाश्मा हीनेनैकान्तसिद्धिमवाप्नोति । ५ ।

ज्यायांश्चेन्न संधिमिच्छेद्दण्डोपनतवृत्तमाबलीयसं वा योगमातिष्ठेत् । ६ ।

समश्चेन्न संधिमिच्छेद्यावन्मात्रमपकुर्यात्तावन्मात्रमस्य प्रत्यपकुर्यात् । ७ । तेजो हि संधानकारणम् । ८ । नातप्तं लोहं लोहेन संधत्त इति । ९ ।

हीनश्चेत्सर्वत्रानुप्रणतस्तिष्ठेत् संधिमुपेयात् । १० । आरण्योऽग्निरिव हि दुःखामर्षजं तेजो विक्रमयति । ११ । मण्डलस्य चानुग्राह्यो भवति । १२ ।

संहितश्चेत् 'परप्रकृतयो लुब्धक्षीणापचरिताः प्रत्यादानभयाद्वा नोपगच्छन्ति' इति पश्येद्धीनोऽपि विगृह्णीयात् । १३ ।

विगृहीतश्चेत् 'परप्रकृतयो लुब्धक्षीणापचरिता विग्रहोद्विग्ना वा मां नोपगच्छन्ति' इति पश्येज्ज्यायानपि संधीयेत, विग्रहोद्वेगं वा शमयेत् । १४ ।

पायी लढल्यासारखे होईल. ४ आणि तुल्यबल राजाशी विग्रह केल्यास कच्चे मडके कच्च्या मडक्यावर आपटल्याप्रमाणे दोघांचा नाश करील. ५ हीन बलाशी विग्रह केल्यास मडक्यावर आपटलेल्या दगडाप्रमाणे त्याला परिपूर्ण सिद्धी प्राप्त होते.

६ बलवत्तर राजा संधी करण्यास तयार नसेल तर दंडोपनत प्रकरणात (अध्याय ७.१५ मध्ये) किंवा आबलीयस (ह्या बाराव्या) अधिकरणात सांगितल्याप्रमाणे उपाय योजावेत.

७ तुल्यबल राजा संधीस तयार नसेल तर तो जितका अपकार करील तितकाच उलट अपकार करावा. ८ कारण, तेज जोडणी करण्यास कारणीभूत होते. ९ तापविले नसता लोखंड लोखंडाबरोबर सांधले जात नाही.

१० हीनबल राजा जर सर्व बाबतीत नमून वागत असेल तर त्याच्याशी संधी करावा. ११ कारण, दुःख व अमर्ष यांनी उत्पन्न झालेले तेज अरण्यातील अग्नीप्रमाणे पराक्रम करण्यास उद्युक्त करते. १२ शिवाय, तो राजा मंडलाच्या अनुग्रहास पात्र होतो.

१३ हीनबल राजाने संधी केल्यानंतर त्याला जर दिसून आले की, " (बलवत्तर) शत्रूचे प्रजाजन लोभी, दारिद्र्याने गांजलेले किंवा अराजनिष्ठ असले तरी तो पुन्हा परत घेईल ह्या भीतीने माझ्याकडे येत नाहीत," तर त्याने सुद्धा विग्रह करावा.

१४ विग्रह केल्यानंतर बलवत्तर राजाला जर असे दिसून आले की, " शत्रूचे प्रजाजन लोभी, दारिद्र्याने गांजलेले अथवा अराजनिष्ठ असले तरी विग्रहामुळे भयभीत होऊन माझ्या बाजूला येत नाहीत," तर त्याने सुद्धा संधी करावा किंवा विग्रहाची भीती घालवून द्यावी.

**व्यसनयौगपद्येऽपि ‘गुरुव्यसनोऽस्मि, लघुव्यसनः परः सुखेन प्रतिकृत्य व्यसनमात्मनोऽभियुञ्ज्याद्’ इति पश्येज्ज्यायानपि संधीयेत । १५ ।**

**संधिविग्रहयोश्चेत्परकर्शनमात्मोपचयं वा नाऽभिपश्येज्ज्यायानप्यासीत । १६ ।**

**परव्यसनमप्रतिकार्यं चेत्पश्येद्धीनोऽप्यभियायात् । १७ ।**

**अप्रतिकार्यासन्नव्यसनो वा ज्यायानपि संश्रयेत । १८ ।**

**संधिनैकतो विग्रहेणैकतश्चेत्कार्यसिद्धिं पश्येज्ज्यायानपि द्वैधीभूतस्तिष्ठेत् ।१९।**

**एवं समस्य षाड्गुण्योपयोगः । २० ।**

**तत्र तु प्रतिविशेषः । २१ । –**

**प्रवृत्तचक्रेणाक्रान्तो राज्ञा बलवताऽबलः ।**
**संधिनोपनमेत्तूर्णं कोशदण्डात्मभूमिभिः ।। २२ ।।**

१५ उभयतांवर एकाचवेळी संकटे आली असता जर असे दिसून आले की, “माझ्यावरचे संकट मोठे आहे, शत्रूवरील संकट लहान असल्यामुळे तो त्याचे सहज निवारण करून माझ्यावर हल्ला करील,” तर बलवत्तर राजाने सुद्धा संधी करावा.

१६ संधी किंवा विग्रह यांपैकी कोणत्याही धोरणाने शत्रू दुर्बल होणार नाही किंवा स्वतःचे बल वाढणार नाही असे दिसून आल्यास बलवत्तर राजाने सुद्धा स्वस्थ रहावे.

१७ शत्रूवरील संकटाचे निवारण होणे शक्य नाही असे दिसल्यास हीनबल राजाने सुद्धा त्याच्यावर चाल करून जावे.

१८ निवारण होणे अशक्य असे संकट येऊन ठेपले तर बलवत्तर राजाने सुद्धा आश्रय घ्यावा.

१९ एका बाजूला संधी करून व दुसऱ्या बाजूला विग्रह करून कार्यसिद्धी होईल असे दिसले तर बलवत्तर राजाने सुद्धा द्वैधीभावाचा अवलंब करावा.

२० याप्रमाणेच तुल्यबल राजाने सहा प्रकारच्या धोरणांचा उपयोग करावा.

२१ परंतु त्या (धोरणांच्या उपयोगाच्या) संबंधात एक विशिष्ट बाब पुढीलप्रमाणे –

२२ सैन्याचा उपयोग करून बलवान राजाने आक्रमण केले असता दुर्बल राजाने आपला कोश, सैन्य, स्वतःला अथवा भूमी देऊ करून त्वरित संधी करून शरण जावे.

**स्वयं संख्यातदण्डेन दण्डस्य विभवेन वा ।**
**उपस्थातव्यमित्येष संधिरात्मामिषो मतः ॥ २३ ॥**
**सेनापतिकुमाराभ्यामुपस्थातव्यमित्ययम् ।**
**पुरुषान्तरसंधिः स्यान्नात्मनेत्यात्मरक्षणः ॥ २४ ॥**
**एकेनान्यत्र यातव्यं स्वयं दण्डेन वेत्ययम् ।**
**अदृष्टपुरुषः संधिर्दण्डमुख्यात्मरक्षणः ॥ २५ ॥**
**मुख्यस्त्रीबन्धनं कुर्यात्पूर्वयोः पश्चिमे त्वरिम् ।**
**साधयेद्गूढमित्येते दण्डोपनतसंधयः ॥ २६ ॥**
**कोशदानेन शेषाणां प्रकृतीनां विमोक्षणम् ।**
**परिक्रयो भवेत्संधिः स एव च यथासुखम् ॥ २७ ॥**
**स्कन्धोपनेयो बहुधा ज्ञेयः संधिरुपग्रहः ।**
**निरुद्धो देशकालाभ्यामत्ययः स्यादुपग्रहः ॥ २८ ॥**
**विषह्यदानादायत्यां क्षमः स्त्रीबन्धनादपि ।**
**सुवर्णसंधिर्विश्वासादेकीभावगतो भवेत् ॥ २९ ॥**

२३ काही मोजक्या सैन्यानिशी अथवा जितके सैन्य असेल तितक्यानिशी स्वतः (बलवान राजाच्या सेवेस) हजर रहावे लागते अशा प्रकारचा तह आत्मामिष (स्वतःचा बळी दिलेला) असे म्हणतात.

२४ सेनापती किंवा राजकुमार यांनी हजर व्हावे अशा प्रकारचा तह पुरुषांतर (दुसऱ्या मनुष्याच्या द्वारा केलेला) संधी होय; यात स्वतः जावे लागत नसल्यामुळे स्वतःचे रक्षण केले जाते.

२५ राजाने स्वतः एकटयाने अथवा (त्याच्याशिवाय) केवळ त्याच्या सैन्याने (बलवान राजा नसलेल्या) दुसऱ्या ठिकाणी (त्याच्या कामगिरीवर) जावे असा संधी अदृष्टपुरुष (बलवान राजापासून दूर असे पुरुष असलेला) होय. यात सैन्याचे मुख्य व स्वतः राजा यांचे रक्षण केले जाते.

२६ (आत्मामिष आणि पुरुषांतर ह्या) पहिल्या दोन संधींमध्ये मुख्य पुरुषांचा स्त्रियांशी (विवाह) संबंध जुळवून आणावेत, परंतु शेवटच्यात शत्रूचा गुप्तपणे निकाल लावावा. असे हे दंडोपनतसंधी (सैन्य अर्पण करून केलेले तह) होत.

२७–२८ कोश देऊन बाकीच्या प्रकृतींची सुटका करून घेणे हा परिक्रय (विकत घेतलेला) संधी होय. तोच परंतु सवडीप्रमाणे पुष्कळ हप्त्यांनी द्यावयाचा असलेला तो उपग्रह (सवलत असलेला) संधी असे समजावे. देश व काल यांनी (हप्ते) ठरविले गेल्यामुळे ही खंडणी सहायक होते.

२९ सहन होईल इतकी खंडणी भविष्यकाळी द्यावयाची असल्यामुळे आणि विवाहसंबंधामुळे ग्राह्य असा सुद्धा झालेला, (परस्परावरील) विश्वासामुळे एकतेची भावना निर्माण करणारा तो सुवर्णसंधी होय.

**विपरीतः कपालः स्यादत्यादानाभिभाषितः ।**
**पूर्वयोः प्रणयेत्कुप्यं हस्त्यश्वं वा गरान्वितम् ।। ३० ।।**
**तृतीये प्रणयेदर्थं कथयन् कर्मणां क्षयम् ।**
**तिष्ठेच्चतुर्थ इत्येते कोशोपनतसंधयः ।। ३१ ।।**
**भूम्येकदेशत्यागेन शेषप्रकृतिरक्षणम् ।**
**आदिष्टसंधिस्तत्रेष्टो गूढस्तेनोपघातिनः ।। ३२ ।।**
**भूमीनामात्तसाराणां मूलवर्जं प्रणामनम् ।**
**उच्छिन्नसंधिस्तत्रेष्टः परव्यसनकाङ्क्षिणः ।। ३३ ।।**
**फलदानेन भूमीनां मोक्षणं स्यादवक्रयः ।**
**फलातिमुक्तो भूमिभ्यः संधिः स परिदूषणः ।। ३४ ।।**
**कुर्यादवेक्षणं पूर्वौ पश्चिमौ त्वाबलीयसम् ।**
**आदाय फलमित्येते देशोपनतसंधयः ।। ३५ ।।**

३०–३१ ह्याच्या उलट तो कपाल (भिकेचे खापर घ्यावयास लावणारा) संधी; शक्तीच्या पलीकडे खंडणी वसूल केली गेल्यामुळे ही संज्ञा दिली आहे. पहिल्या दोन संधींमध्ये कुप्य (जंगली माल) किंवा विष घातलेले घोडे-हत्ती द्यावेत. तिसऱ्यात (ठरल्याप्रमाणे) द्रव्य द्यावे आणि चौथ्यात आपली कार्ये बुडाली आहेत असे सांगून स्वस्थ रहावे. असे हे कोशोपनत (कोश देऊन केलेले) संधी.

३२ देशाचा काही भाग देऊन बाकीच्या प्रकृतींचे रक्षण करणे हा आदिष्ट संधी, गूढ पुरुष व दरोडेखोर यांच्या द्वारा (शत्रूची) हानी करू इच्छिणाऱ्यांच्या उपयोगाचा.

३३ राजधानी खेरीज करून बाकीचा सर्व प्रदेश त्यातील मौल्यवान पदार्थ काढून घेऊन अर्पण करणे हा उच्छिन्न संधी, शत्रूवर संकट येईल अशी आशा बाळगणाऱ्याला उपयुक्त.

३४ भूमींचे उत्पन्न अर्पण करून त्यांची सुटका करून घेणे हा अवक्रय (भाड्याने घेतलेला) संधी. भूमींचे निःशेष उत्पन्न सोडून देऊन केलेला तो परिदूषण (दूषणावह) संधी.

३५ पहिल्या दोन संधींच्या बाबतीत (योग्य वेळ येण्याची) वाट पहावी; परंतु शेवटच्या दोन संधीत उत्पन्न काढून घेऊन (बाराव्या) आबलीयस अधिकरणातल्या उपायांचा अवलंब करावा. असे हे देशोपनत (देश देऊन केलेले) संधी.

स्वकार्याणां वशेनैते देश काले च भाषिताः ।
आबलीयसिकाः कार्यास्त्रिविधा हीनसन्धयः ।। ३६ ।।

इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे समहीनज्यायसां गुणाभिनिवेशो हीनसंधयश्च तृतीयोऽध्यायः ।
आदित एकशततमः ।

४

[ त्रिशततमं प्रकरणम् – विगृह्यासनम्;
चतुःशततमं प्रकरणम् – संधायासनम्;
पञ्चशततमं प्रकरणम् – विगृह्ययानम्;
षट्छततमं प्रकरणम् – संधाययानम्;
सप्तशततमं प्रकरणम् – संभूयप्रयाणम् ]

संधिविग्रहयोरासनं यानं च व्याख्यातम् । १ ।

स्थानमासनमुपेक्षणं चेत्यासनपर्यायाः । २ । विशेषस्तु – गुणैकदेशे स्थानम्, स्ववृद्धिप्राप्त्यर्थम् आसनम्, उपायानामप्रयोग उपेक्षणम् । ३ ।

अतिसंधानकामयोररिविजिगीष्वोरुपहन्तुमशक्तयोर्विगृह्यासनं संधाय वा। ४ ।

३६ असे हे तीन प्रकारचे हीनबल राजाने करावयाचे संधी, त्याच्या स्वतःच्या कार्यांच्या अनुरोधाने योग्य ठिकाणी व योग्य वेळी करावयास सांगितलेले, आवलीयस स्थितीत करावेत.

चौथा अध्याय

प्रकरण १०३ : विग्रह करून स्वस्थ रहाणे;
प्रकरण १०४ : संधी करून स्वस्थ रहाणे;
प्रकरण १०५ : विग्रह करून चाल करून जाणे;
प्रकरण १०६ : संधी करून चाल करून जाणे;
प्रकरण १०७ : एकजूट करून स्वारी करणे.

१ संधी आणि विग्रह करून स्वस्थ रहाणे व चाल करून जाणे यांचे आता विवरण करावयाचे आहे.

२ स्थान, आसन व उपेक्षण हे एकाच अर्थाचे शब्द आहेत. ३ परंतु त्यांच्यातील भेद असा – (प्रकृतींच्या) गुणांपैकी काही भागच विद्यमान असता, स्थान; स्वतःची वृद्धी करून घेण्यासाठी, आसन; उपायांची योजना न करणे हे उपेक्षण.

४ एकमेकावर मात करू इच्छिणारे अरी आणि विजिगीषू दुसऱ्याचा नाश करू शकत नसले तर त्यांनी विग्रह करून किंवा संधी करून स्वस्थ रहावे.

**यदा वा पश्येत् ' स्वदण्डैर्मित्राटवीदण्डैर्वा समं ज्यायांसं वा कर्शयितुमुत्सहे ' इति तदा कृतबाह्याभ्यन्तरकृत्यो विगृह्यासीत । ५ ।**

**यदा वा पश्येत् ' उत्साहयुक्ता मे प्रकृतयः संहता विवृद्धाः स्वकर्माण्यव्याहताश्चरिष्यन्ति परस्य वा कर्माण्युपहनिष्यन्ति ' इति तदा विगृह्यासीत । ६ ।**

**यदा वा पश्येत् ' परस्यापचरिताः क्षीणा लुब्धाः स्वचक्रस्तेनाटवीव्यथिता वा प्रकृतयः स्वयमुपजापेन वा मामेष्यन्ति; संपन्ना मे वार्त्ता, विपन्ना परस्य, तस्य प्रकृतयो दुर्भिक्षोपहता मामेष्यन्ति; विपन्ना मे वार्त्ता, संपन्ना परस्य, तं मे प्रकृतयो न गमिष्यन्ति, विगृह्य चास्य धान्यपशुहिरण्यान्याहरिष्यामि; स्वपण्योपघातीनि वा परपण्यानि निवर्तयिष्यामि, परवणिक्पथाद्वा सारवन्ति मामेष्यन्ति विगृहीते, नेतरम्; दूष्यामित्राटवीनिग्रहं वा विगृहीतो न करिष्यति, तैरेव वा विग्रहं प्राप्स्यति; मित्रं मे मित्रभाव्यभिप्रयातो बह्वल्पकालं तनुक्षयव्ययमर्थं**

५ जेव्हा असे दिसून येईल की, " माझ्या स्वतःच्या सैन्याने अथवा मित्राच्या व रानटी सैन्याने मी तुल्यबल किंवा बलवत्तर राजाला दुर्बल करण्यास धजेन," तेव्हा बाहेरच्या व (दुर्गाच्या) आतल्या गोष्टींचा बंदोबस्त करून युद्ध पुकारून स्वस्थ रहावे.

६ किंवा जेव्हा असे दिसून येईल की " माझे प्रजाजन उत्साहयुक्त, संघटित भरभराटीत असून आपली कार्ये निर्वेधपणे पार पाडतील किंवा शत्रूच्या कार्यांचा नाश करतील, " तेव्हा विग्रह करून स्वस्थ रहावे.

७ किंवा जेव्हा असे दिसून येईल की, " शत्रूचे प्रजाजन अपरक्त झालेले, दारिद्र्याने गांजलेले, लोभी असलेले किंवा त्याच्या स्वतःच्याच सैन्याने, तस्करांनी अथवा रानटी टोळ्यांनी त्रस्त झालेले, स्वतः होऊन किंवा गुप्त चिथावणीने माझ्या बाजूला येतील; माझ्या देशातील (कृषी आदी) उपजीविकेचे व्यवसाय भरभराटीत आहेत, शत्रूचे व्यवसाय विपन्नावस्थेत आहेत, त्यामुळे दुर्भिक्षाने त्रस्त झालेले त्याचे प्रजाजन मला येऊन मिळतील; माझे वृत्तिव्यवसाय विपन्नावस्थेत आहेत, शत्रूचे भरभराटीत, (विग्रह केल्यास) माझे प्रजाजन त्याला जाऊन मिळणार नाहीत आणि विग्रह करून मी त्याचे धान्य, पशू व द्रव्य हरण करून आणीन; विग्रह केला तरच माझ्या मालाच्या विक्रीच्या आड येणारा शत्रूचा माल परतवून लावू शकेन किंवा शत्रूच्या व्यापारी मार्गाने भारी किंमतीचे पदार्थ माझ्या देशात येतील, एरव्ही नाही; त्याच्याशी विग्रह केला म्हणजे तो त्याचे दूष्य, शत्रू अथवा रानटी टोळ्या यांचा बंदोबस्त करू शकणार नाही किंवा त्यांच्याशीच त्याचा विग्रह सुरू होईल; खऱ्या मित्राचा स्वभाव असलेल्या माझ्या मित्रावर तो चालून गेल्यास त्याला पुष्कळ मोठा, थोड्या वेळात, थोड्या मनुष्यहानीने व खर्चाने लाभ प्राप्त होईल किंवा (मित्राचा) चांगला व सहज घेता येण्यासारखा

**प्राप्स्यति, गुणवतीमादेयां वा भूमिम्; सर्वसंदोहेन वा मामनादृत्य प्रयातुकामः कथं न यायाद्' इति परवृद्धिप्रतिघातार्थं प्रतापार्थं च विगृह्यासीत । ७ । 'तमेव हि प्रत्यावृत्तो ग्रसते' इत्याचार्याः । ८ । नेति कौटिल्यः । ९ । कर्शनमात्रमस्य कुर्यादव्यसनिनः, परवृद्धया तु वृद्धः समुच्छेदनम् । १० । एवं परस्य यातव्योऽस्मै साहाय्यमविनष्टः प्रयच्छेत् । ११ । तस्मात्सर्वसंदोहप्रकृतं विगृह्यासीत । १२ ।**

**विगृह्यासनहेतुप्रातिलोम्ये संधायासीत । १३ ।**

**विगृह्यासनहेतुभिरभ्युच्चितः सर्वसंदोहवर्जं विगृह्य यायात् । १४ ।**

**यदा वा पश्येत् 'व्यसनी परः; प्रकृतिव्यसनं वाऽस्य शेषप्रकृतिभिरप्रतिकार्यम्; स्वचक्रपीडिता विरक्ता वाऽस्य प्रकृतयः कर्शिता निरुत्साहाः परस्पराद्वा भिन्नाः**

मुलुख मिळेल (म्हणून तसे होऊ नये यास्तव); किंवा आपले सर्व सैन्य एकत्रित करून, माझी पर्वा न करता तो स्वारीवर जाऊ पहात असता तो जाणार नाही या उद्देशाने," तेव्हा शत्रूची भरभराट होऊ न देण्यासाठी आणि स्वतःच्या प्रतापाचे दर्शन घडविण्यासाठी युद्ध पुकारून स्वस्थ रहावे. ८ " (सर्व सैन्य एकत्रित केलेला शत्रू) माघारा फिरून त्यालाच (विग्रह करणाऱ्या विजिगीषूलाच) गिळंकृत करील," असा आचार्यांचा आक्षेप आहे. ९ कौटिल्याचे म्हणणे की तसे होणार नाही. १० तो (विजिगीषू) संकटापासून मुक्त असल्यास त्याला (शत्रू) केवळ दुर्बल करील, परंतु त्याच्या शत्रूला जिंकून त्याच्या समृद्धीने अधिक भरभराटीस आल्यास तो (शत्रू) त्याचा (विजिगीषूचा) समूळ उच्छेद करील. ११ याप्रमाणे (विजिगीषूने विग्रह केला तर) शत्रूच्या ज्या दुर्बल शत्रूवर तो चाल करून जाण्याच्या विचारात आहे त्याचा नाश न झाल्यामुळे तो त्याला (विजिगीषूला) मदत करील. १२ म्हणून सर्व सैन्यानिशी स्वारीवर जाण्याच्या तयारीत असणाऱ्या शत्रूशी विग्रह करून स्वस्थ रहावे.

१३ विग्रह करून स्वस्थ रहाण्यासाठी जी निमित्ते सांगितली आहेत त्याच्या उलट निमित्ते उद्भवली म्हणजे संधी करून स्वस्थ रहावे.

१४ विग्रह करून स्वस्थ रहाण्याची वरील कारणे विद्यमान असता त्याची शक्ती वृद्धिंगत झाली तर (शेवटचे) सर्व सैन्यानिशी स्वारीच्या तयारीचे निमित्त खेरीज करून इतर प्रसंगी विग्रह पुकारून चाल करून जावे.

१५ किंवा जेव्हा असे दिसून येईल की, " शत्रू संकटात सापडला आहे; किंवा त्याच्या एका प्रकृतीवर आलेले संकट इतर प्रकृतींच्या द्वारा दूर होणे शक्य नाही; त्याच्या स्वतःच्याच सैन्याने पीडित झालेले अथवा अपरक्त झालेले त्याचे प्रजाजन दुर्बल, उत्साहहीन अथवा आपसात एकजूट नसलेले असल्यामुळ त्यांना प्रलोभन दाखवून वळविणे शक्य आहे; आगी, पूर, रोगराई, साथी अथवा दुष्काळ

**शक्या लोभयितुम्; अग्न्युदकव्याधिमरकदुर्भिक्षनिमित्तं क्षीणयुग्यपुरुषनिचय-रक्षाविधानः परः' इति तदा विगृह्य यायात् । १५ ।**

**यदा वा पश्येत् 'मित्रमाक्रन्दश्च मे शूरवृद्धानुरक्तप्रकृतिः, विपरीतप्रकृतिः परः पार्ष्णिग्राहश्चासारश्च, शक्ष्यामि मित्रेणासारमाक्रन्देन पार्ष्णिग्राहं वा विगृह्य यातुम्' इति तदा विगृह्य यायात् । १६ ।**

**यदा वा फलमेकहार्यमल्पकालं पश्येत् तदा पार्ष्णिग्राहासाराभ्यां विगृह्य यायात् । १७ ।**

**विपर्यये संधाय यायात् । १८ ।**

**यदा वा पश्येत् 'न शक्यमेकेन यातुमवश्यं च यातव्यम्' इति तदा समहीनज्यायोभिः सामवायिकैः संभूय यायाद्, एकत्र निर्दिष्टेनांशेन, अनेकत्रानिर्दिष्टेनांशेन । १९ । तेषामसमवाये दण्डमन्यतमस्मान्निविष्टांशेन याचेत । २० । संभूयाभिगमनेन वा निर्विश्येत, ध्रुवे लाभे निर्दिष्टेनांशेन, अध्रुवे लाभांशेन । २१ ।**

ह्या कारणांमुळे शत्रूच्या (गाड्यांना) जुंपावयाच्या जनावरांचा, माणसांचा, साठ्यांचा आणि किल्लेकोट वगैरेंचा ऱ्हास झाला आहे," तेव्हा विग्रह पुकारून चाल करून जावे.

१६ किंवा जेव्हा असे दिसून येईल की, "माझा समोरच्या बाजूचा मित्र आणि पिछाडीचा मित्र ह्या दोघांचेही प्रजाजन शूर, भरभराटीत आणि अनुरक्त आहेत, समोरचा शत्रू, पिछाडीचा शत्रू व त्याचा मित्र यांचे प्रजाजन याच्या उलट आहेत, तेव्हा मित्राला शत्रूच्या मित्राशी आणि आक्रंदाला पार्ष्णिग्राहाशी लढावयास लावून मी चाल करून जाऊ शकेन," तेव्हा विग्रह पुकारून चाल करून जावे.

१७ किंवा जेव्हा स्वारीचे फल एकाला सहज व थोड्या वेळात मिळण्यासारखे आहे असे दिसेल तेव्हा पिछाडीचा शत्रू व त्याचा मित्र यांच्यावर युद्ध पुकारून चाल करून जावे.

१८ याच्या उलट परिस्थिती असेल तेव्हा संधी करून चाल करून जावे.

१९ किंवा जेव्हा असे दिसून येईल की, "एकट्याने स्वारीवर जाणे शक्य नाही, पण स्वारीवर जाणे तर अवश्य आहे," तेव्हा तुल्यबल, हीनबल अथवा बलवत्तर अशा दोस्त राजांबरोबर मिळून स्वारीवर जावे – एका ठिकाणीच सर्वांनी जावयाचे असल्यास प्राप्तीतील प्रत्येकाचा वाटा अगोदर ठरवून देऊन, अनेक ठिकाणी (निरनिराळ्या राजांनी) जावयाचे असल्यास वाटे अगोदर न ठरविता. २० त्यांच्याशी अशी एकजूट शक्य नसल्यास त्यांच्यापैकी कोणातरी एकाकडून ठराविक वाटा देण्याचे कबूल करून सैन्याची मागणी करावी. २१ किंवा

**अंशो दण्डसमः पूर्वः प्रयाससम उत्तमः ।**
**विलोपो वा यथालाभं प्रक्षेपसम एव वा ॥ २२ ॥**

**इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे विगृह्यासनं संधायासनं विगृह्ययानं संधाययानं संभूयप्रयाणं च चतुर्थोऽध्यायः । आदितो द्विशततमः ।**

**५**

## [अष्टशततमं प्रकरणम् – यातव्यामित्रयोरभिग्रहचिन्ता ; नवशततमं प्रकरणम् – क्षयलोभविरागहेतवः प्रकृतीनाम् ; दशशततमं प्रकरणम् – सामवायिकविपरिमर्शः ]

**तुल्यसामन्तव्यसने यातव्यममित्रं वेत्यमित्रमभियायात्, तत्सिद्धौ यातव्यम् । १ । अमित्रसिद्धौ हि यातव्यः साहाय्यं दद्यान्नामित्रो यातव्यसिद्धौ । २ ।**

**गुरुव्यसनं यातव्यं लघुव्यसनममित्रं वेति 'गुरुव्यसनं सौकर्यतो यायाद्' इत्याचार्याः । ३ । नेति कौटिल्यः । ४ । लघुव्यसनममित्रं यायात् । ५ । लघ्वपि**

(नंतर त्याच्यावरोबर) एकत्र जाण्याचे कबूल करून सैन्य भाड्याने घ्यावे– प्राप्ती निश्चित असता वाटा ठरवून देऊन, अनिश्चित असता वाटा न ठरविता.

२२ सैन्याच्या प्रमाणात प्राप्तीचा वाटा हा कनिष्ठ मार्ग; केलेल्या परिश्रमाच्या अनुरोधाने वाटा देणे हा उत्तम मार्ग. किंवा ज्याला जी लूट मिळेल ती त्याने घ्यावी; किंवा दिलेल्या द्रव्याच्या इतकाच वाटा द्यावा.

### पाचवा अध्याय

### प्रकरण १०८ : यातव्य शत्रू व स्वाभाविक शत्रू यांच्यावरील हल्ल्यासंबंधी विचार

### प्रकरण १०९ : प्रजाजनांचा क्षय, लोभ व अपरक्तता यांची कारणे

### प्रकरण ११० : एकत्रित होणाऱ्या दोस्तांविषयी विचार

१ (संकटात सापडलेला म्हणून) चाल करून जावयास योग्य (यातव्य) राजा आणि (स्वाभाविक) शत्रू ह्या दोन शेजारच्या राजांवरील संकटे सारखीच असता कोणावर स्वारी करावी असा प्रश्न पडला तर शत्रूवर स्वारी करावी, त्याच्यावर जय मिळविल्यावर मग यातव्यावर. २ कारण, शत्रूचा पराभव करण्यास यातव्य मदत करू शकेल, यातव्याचा पराभव करण्यास शत्रू मदत करणार नाही.

३ मोठे संकट असलेला यातव्य व क्षुद्र संकट असलेला शत्रू यांपैकी कोणावर स्वारी करावी ? " (यशप्राप्ती) सुलभ असल्यामुळे ज्याचे संकट मोठे त्याच्यावर स्वारी करावी, " असे आचार्यांचे मत आहे. ४ ते बरोबर नाही असे कौटिल्याचे

**हि व्यसनमभियुक्तस्य कृच्छ्रं भवति । ६ । सत्यं गुर्वपि गुरुतरं भवति । ७ । अनभियुक्तस्तु लघुव्यसनः सुखेन व्यसनं प्रतिकृत्यामित्रो यातव्यमभिसरेत्, पार्ष्णि वा गृह्णीयात् । ८ ।**

**यातव्ययौगपद्ये गुरुव्यसनं न्यायवृत्ति लघुव्यसनमन्यायवृत्ति विरक्तप्रकृतिं वेति विरक्तप्रकृतिं यायात् । ९ । गुरुव्यसनं न्यायवृत्तिमभियुक्तं प्रकृतयोऽनुगृह्णन्ति, लघुव्यसनमन्यायवृत्तिमुपेक्षन्ते, विरक्ता बलवन्तमप्युच्छिन्दन्ति । १० । तस्माद्विरक्तप्रकृतिमेव यायात् । ११ ।**

**क्षीणलुब्धप्रकृतिमपचरितप्रकृतिं वेति 'क्षीणलुब्धप्रकृतिं यायात्, क्षीणलुब्धा हि प्रकृतयः सुखेनोपजापं पीडां वोपगच्छन्ति, नापचरिताः प्रधानावग्रहसाध्याः' इत्याचार्याः । १२ । नेति कौटिल्यः । १३ । क्षीणलुब्धा हि प्रकृतयो भर्तरि**

मत आहे. ५ हलके संकट असलेल्या शत्रूवर स्वारी करावी. ६ ज्याच्यावर हल्ला होतो त्याचे लहान संकट सुद्धा भयानक होते. ७ हे खरे आहे की (हल्ला झाल्यावर) मोठे संकट सुद्धा अधिक मोठे होते. ८ परंतु जर त्याच्यावर हल्ला झाला नाही तर लहान संकट असलेला शत्रू संकटाचे सहज निवारण करून यातव्याच्या मदतीला जाईल किंवा (विजिगीषूच्या) पिछाडीवर हल्ला करील.

९ संकटे एकाच वेळी उपस्थित झाली असता मोठे संकट असलेल्या, न्यायाने वागणाऱ्या राजावर स्वारी करावी, की थोडे संकट असलेल्या अन्यायाने वागणाऱ्या राजावर, की प्रजाजन अपरक्त असलेल्या राजावर असा प्रश्न उपस्थित झाल्यास ज्याचे प्रजाजन त्याच्यावर नाराज असतील त्याच्यावर स्वारी करावी. १० मोठे व्यसन असलेल्या न्यायी राजाला त्याच्यावर हल्ला झाल्यास प्रजाजन पाठिंबा देतात, लहान व्यसन असलेल्या अन्यायी राजाचे प्रजाजन (त्याच्यावर हल्ला झाला असता) तटस्थ रहातात, विरक्त प्रजाजन बलवान राजाचा सुद्धा (त्याच्यावर हल्ला झाल्यास) उच्छेद करतात. ११ यास्तव ज्याचे प्रजाजन असंतुष्ट आहेत अशा राजावर स्वारी करावी.

१२ ज्याचे प्रजाजन क्षीण झालेले व लोभी आहेत आणि ज्याचे प्रजाजन बंडखोर झाले आहेत ह्या दोहोंपैकी कोणावर स्वारी करावी ? "ज्याचे प्रजाजन क्षीण व लुब्ध आहेत त्याच्यावर स्वारी करावी; कारण, क्षीण व लुब्ध प्रजाजन गुप्त सूचनांनी अथवा पीडा झाल्यास सहज विजिगीषूच्या बाजूला येतात; बंडखोर झालेले प्रजाजन तसे येत नाहीत, कारण त्यांच्या पुढाऱ्यांचा निकाल लावून त्यांचा बंदोबस्त करता येतो," असे आचार्यांचे मत आहे. १३ ते बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. १४ कारण, क्षीण व लुब्ध प्रजाजनांचे राजावर प्रेम असल्यास ते त्याचेच हित पाहातील, किंवा (विजिगीषूच्या)

स्निग्धा भर्तृहिते तिष्ठन्ति, उपजापं वा विसंवादयन्ति, अनुरागे सार्वगुण्यमिति । १४ । तस्मादपचरितप्रकृतिमेव यायात् । १५ ।

बलवन्तमन्यायवृत्तिं दुर्बलं वा न्यायवृत्तिमिति बलवन्तमन्यायवृत्तिं यायात् । १६ । बलवन्तमन्यायवृत्तिमभियुक्तं प्रकृतयो नानुगृह्णन्ति, निष्पातयन्ति, अमित्रं वाऽस्य भजन्ते । १७ । दुर्बलं तु न्यायवृत्तिमभियुक्तं प्रकृतयः परिगृह्णन्ति, अनुनिष्पतन्ति वा । १८ ।

अवक्षेपेण हि सतामसतां प्रग्रहेण च ।
अभूतानां च हिंसानामधर्म्याणां प्रवर्तनैः ।। १९ ।।
उचितानां चरित्राणां धर्मिष्ठानां निवर्तनैः ।
अधर्मस्य प्रसङ्गेन धर्मस्यावग्रहेण च ।। २० ।।
अकार्याणां च करणैः कार्याणां च प्रणाशनैः ।
अप्रदानैश्च देयानामदेयानां च साधनैः ।। २१ ।।
अदण्डनैश्च दण्ड्यानामदण्ड्यानां च दण्डनैः ।
अग्राह्याणामुपग्राहैर्ग्राह्याणां चानभिग्रहैः ।। २२ ।।
अनर्थ्यानां च करणैरर्थ्यानां च विघातनैः ।
अरक्षणैश्च चोरेभ्यः स्वयं च परिमोषणैः ।। २३ ।।

गुप्त सूचनांचा अव्हेर करतील, जेथे प्रेम असेल तेथे सर्व गुण असल्याची प्रतीती होते ह्या न्यायाने. १५ म्हणून ज्याचे प्रजाजन बंडखोर आहेत त्याच्यावरच स्वारी करावी.

१६ बलवान पण अन्यायाने वागणारा आणि दुर्बल पण न्यायाने वागणारा यांपैकी अन्यायाने वागणाऱ्या बलवान राजावर स्वारी करावी. १७ अन्यायी बलवान राजावर हल्ला झाला असता त्याचे प्रजाजन त्याच्या मदतीस जात नाहीत, त्याला राज्य सोडून जावयास भाग पाडतात अथवा त्याच्या शत्रूला जाऊन मिळतात. १८ परंतु न्यायाने वागणाऱ्या दुर्बल राजावर हल्ला झाल्यास त्याचे प्रजाजन त्याला सर्वतोपरी साहाय्य करतात किंवा (त्याला राज्य सोडून जावे लागल्यास) त्याच्या मागोमाग जातात.

१९–२६ कारण, सज्जनांचा अवमान केल्याने व दुर्जनांचा सन्मान केल्याने, आणि प्रचलित नसलेल्या अधार्मिक हिंसा सुरू केल्याने व परंपरागत धर्मयुक्त आचारांना प्रतिबंध केल्याने, अधर्मात दंग राहिल्याने व धर्माची गळचेपी केल्याने, करावयास नको असलेली कामे केल्याने व करणे आवश्यक असलेल्या कामांचा नाश केल्याने, जे द्यायला पाहिजे ते न दिल्याने व जे (प्रजेने) द्यावयास नको ते त्यांच्याकडून घेतल्याने, शिक्षेस पात्र असणाऱ्यांना शिक्षा न केल्याने व शिक्षेस पात्र नसणाऱ्यांना शिक्षा केल्याने, ज्यांना पकडायला नको त्यांना पकडल्याने व ज्यांना

पातैः पुरुषकाराणां कर्मणां गुणदूषणैः ।
उपघातैः प्रधानानां मान्यानां चावमाननैः ।। २४ ।।
विरोधनैश्च वृद्धानां वैषम्येणानृतेन च ।
कृतस्याप्रतिकारेण स्थितस्याकरणेन च ।। २५ ।।
राज्ञः प्रमादालस्याभ्यां योगक्षेमवधेन वा ।
प्रकृतीनां क्षयो लोभो वैराग्यं चोपजायते ।। २६ ।।
क्षीणाः प्रकृतयो लोभं लुब्धा यान्ति विरागताम् ।
विरक्ता यान्त्यमित्रं वा भर्तारं घ्नन्ति वा स्वयम् ।। २७ ।।

तस्मात्प्रकृतीनां क्षयलोभविरागकारणानि नोत्पादयेत्, उत्पन्नानि वा सद्यः प्रतिकुर्वीत । २८ ।

क्षीणा लुब्धा विरक्ता वा प्रकृतय इति । २९ । क्षीणाः पीडनोच्छेदनभयात् सद्यः संधिं युद्धं निष्पतनं वा रोचयन्ते । ३० । लुब्धा लोभेनासंतुष्टाः परोपजापं लिप्सन्ते । ३१ । विरक्ताः पराभियोगमभ्युत्तिष्ठन्ते । ३२ ।

पकडावयास पाहिजे त्यांना न पकडल्याने, अनर्थकारक गोष्टी केल्याने व हित-कारक गोष्टींचा नाश केल्याने, चोरांपासून रक्षण न केल्याने व स्वतः प्रजेस लुटल्याने, मानवी प्रयत्न हाणून पाडल्याने, केलेल्या कामाचे चांगले गुण बिघडवून टाकल्याने, प्रधान पुरुषांची हानी केल्याने व माननीयांचा अपमान केल्याने, तसेच वृद्धांना विरोध केल्याने, पक्षपाती वर्तनाने व खोटे बोलण्याने, केलेल्याबद्दल कृतज्ञता न दाखविल्याने व ठरलेल्या गोष्टी न केल्याने, राजाचा हलगर्जीपणा व आळस यांमुळे आणि योगक्षेमाचा नाश झाल्यामुळे – या कारणामुळे प्रजेत क्षय, लोभ व अप्रीती उत्पन्न होतात.

२७ प्रजाजन क्षीण झाले म्हणजे ते लोभी बनतात, लोभी झाले की त्यांचे (राजावरचे)प्रेम उडून जाते. त्यांच्यात अप्रीती उत्पन्न झाली म्हणजे ते शत्रूला जाऊन मिळतात किंवा स्वतःच राजाचा वध करतात.

२८ यास्तव प्रजाजनांत क्षय, लोभ व अप्रीती निर्माण करणारी कारणे उत्पन्न होऊ देऊ नयेत, किंवा उपन्न झालीच तर ताबडतोब त्यांचे निवारण करावे.

२९ क्षीण झालेले, लोभी आणि अपरक्त झालेले प्रजाजन (यांच्यातील भेद). ३० क्षीण झालेले प्रजाजन पीडा होईल किंवा उच्छेद होईल ह्या भीतीने ताबडतोब संधी व्हावा, युद्ध व्हावे अथवा राज्य सोडून जावे हे पसंत करतात. ३१ लोभी प्रजाजन, लोभामुळे असंतुष्ट असल्याकारणाने शत्रूच्या गुप्त सूचनांचा स्वीकार करण्यास तयार होतात. ३२ अपरक्त झालेले प्रजाजन शत्रूने हल्ला केला की बंड करून उठतात.

तासां हिरण्यधान्यक्षयः सर्वोपघाती कृच्छ्रप्रतीकारश्च, युग्यपुरुषक्षयो हिरण्यधान्यसाध्यः । ३३ । लोभ ऐकदेशिको मुख्यायत्तः परार्थेषु शक्यः प्रतिहन्तुमादातुं वा । ३४ । विरागः प्रधानावग्रहसाध्यः । ३५ । निष्प्रधाना हि प्रकृतयो भोग्या भवन्त्यनुपजाप्याश्चान्येषाम्, अनापत्सहास्तु । ३६ । प्रकृतिमुख्यप्रग्रहैस्तु बहुधा भिन्ना गुप्ता भवन्त्यापत्सहाश्च । ३७ ।

सामवायिकानामपि संधिविग्रहकारणान्यवेक्ष्य शक्तिशौचयुक्तैः संभूय यायात् । ३८ । शक्तिमान् हि पार्ष्णिग्रहणे यात्रासाहाय्यदाने वा शक्तः, शुचिः सिद्धौ चासिद्धौ च यथास्थितकारीति । ३९ ।

तेषां ज्यायसैकेन द्वाभ्यां समाभ्यां वा संभूय यातव्यमिति द्वाभ्यां समाभ्यां श्रेयः । ४० । ज्यायसा ह्यवगृहीतश्चरति, समाभ्यामतिसंधानाधिक्ये वा । ४१ । तौ हि सुखौ भेदयितुम्, दुष्टश्चैको द्वाभ्यां नियन्तुं भेदोपग्रहं चोपगन्तुमिति । ४२ ।

३३ त्या प्रजाजनांमध्ये द्रव्य व धान्य यांचा क्षय सर्वांचा नाश करणारा व निवारणाची उपाययोजना करण्यास कठीण असा आहे, (गाड्यांना) जुंपावयाची जनावरे व माणसे यांचा क्षय, द्रव्य व धान्य यांच्यामुळे दूर करता येण्यासारखा आहे. ३४ लोभ प्रजेतील एका अंशापुरताच मर्यादित, मुख्य लोकांच्या ठिकाणी आढळणारा, शत्रूच्या मालमत्तेवर सोडून देऊन तो दूर करणे अथवा स्वतः तो दूर करणे शक्य आहे. ३५ अपरक्तता पुढाऱ्यांचे दमन करून दूर करता येते. ३६ कारण, पुढारी नसलेले प्रजाजन राजा सुखाने उपभोगू शकतो व ते दुसऱ्यांच्या गुप्त सूचनांना प्रतिसाद देत नाहीत; परंतु ते आपत्ती सहन करण्यास असमर्थ होतात. ३७ प्रजाजनांतील पुढाऱ्यांचा मानसन्मान करून त्यांचे अनेक भिन्न गट केले म्हणजे ते (प्रजाजन) सुरक्षित रहातात व आपत्ती सहन करू शकतात.

३८ एक होऊन ज्यांच्या समवेत स्वारीवर जावयाचे त्यांच्या संबंधात सुद्धा (विजिगीषूने) संधी व विग्रह यांच्या कारणांचा नीट विचार करून त्यांच्यापैकी जे शक्तिसंपन्न व शुद्ध आचरणाचे असतील त्यांच्याबरोबर एक होऊन जावे. ३९ कारण, शक्तिसंपन्न राजा पिछाडीवर हल्ला करण्यास आणि स्वारीत मदत करावयास समर्थ असतो, शुद्ध आचरणाचा, कार्यसिद्धी झाली अथवा न झाली तरी ठरले असेल त्याप्रमाणे वागतो.

४० त्यांच्यामध्ये एका अधिक बलवान राजाबरोबर एक होऊन जावे की दोन तुल्यबल राजांबरोबर असा प्रश्न पडल्यास दोन तुल्यबल राजांबरोबर जाणे श्रेयस्कर. ४१ कारण, अधिक बलवान राजाबरोबर गेल्यास त्याच्या दबावाखाली रहावे लागते, दोन तुल्यबल राजांबरोबर गेल्यास (त्यांच्यावर) मात करणे अधिक सोपे होते. ४२ कारण, त्या दोघांत सहज फूट पाडता येते, आणि त्यांच्यापैकी एकाची बुद्धी फिरली तर इतर दोघे त्याचे सहज नियमन करू शकतात आणि (त्याच्यामुळे होणाऱ्या) फाटाफुटीचे निवारण करू शकतात.

**समेनैकेन द्वाभ्यां हीनाभ्यां वेति द्वाभ्यां हीनाभ्यां श्रेयः ।४३। तौ हि द्विकार्यसाधकौ वश्यौ च भवतः ।४४।**

**कार्यसिद्धौ तु –**

**कृतार्थाज्ज्यायसो गूढः सापदेशमपस्रवेत् ।**
**अशुचेः शुचिवृत्तात्तु प्रतीक्षेता विसर्जनात् ॥ ४५ ॥**
**सत्त्रादपसरेद्यत्तः कलत्रमपनीय वा ।**
**समादपि हि लब्धार्थाद्विश्वस्तस्य भयं भवेत् ॥ ४६ ॥**
**ज्यायस्त्वे चापि लब्धार्थः समोऽपि परिकल्पते ।**
**अभ्युच्चितश्चाविश्वास्यो वृद्धिश्चित्तविकारिणी ॥ ४७ ॥**
**विशिष्टादल्पमप्यंशं लब्ध्वा तुष्टमुखो व्रजेत् ।**
**अनंशो वा ततोऽस्याङ्के प्रहृत्य द्विगुणं हरेत् ॥ ४८ ॥**
**कृतार्थस्तु स्वयं नेता विसृजेत्सामवायिकान् ।**
**अपि जीयेत न जयेन्मण्डलेष्टस्तथा भवेत् ॥ ४९ ॥**

**इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे यातव्यामित्रयोरभिग्रहचिन्ता क्षयलोभविरागहेतवः प्रकृतीनां सामवायिकविपरिमर्शश्च पञ्चमोऽध्यायः । आदितः विंशततमः ।**

४३ एका तुल्यबल राजाबरोबर जावे की दोन कमी बलवान राजांबरोबर असा प्रश्न पडल्यास दोन कमी बलवान राजाबरोबर जाणे श्रेयस्कर. ४४ कारण, ते दोन कार्ये पार पाडू शकतात व आपल्या ताब्यात रहातात.

४५ परंतु कार्य सिद्ध झाल्यावर –

ज्याचा कार्यभाग सिद्ध झाला आहे अशा अधिक बलवान राजापासून, तो सत्प्रवृत्त नसल्यास, कोठल्या तरी सबबीवर गुप्तपणे निघून जावे; परंतु तो सत्प्रवृत्त असेल तर तो जावयास रजा देईपर्यंत वाट पहावी.

४६ किंवा अडचणीच्या प्रसंगातून आपल्या स्त्रियांना प्रथम हलवून प्रयत्नपूर्वक निसटून जावे. कारण ज्याचे कार्य सिद्ध झाले आहे अशा तुल्यबल राजापासून सुद्धा त्याच्यावर विश्वास ठेवणाऱ्याला धोका असतो.

४७ आणि कार्यभाग झाल्यावर तुल्यबल राजा सुद्धा अधिक बलवान होतो, आणि त्याची शक्ती वृद्धिगत झाली तर त्याच्यावर विश्वास ठेवण्यास तो पात्र रहात नाही. वृद्धी मनुष्याचे मन पालटविण्यास कारणीभूत होते.

४८ आपल्याहून अधिक शक्तिशाली राजाकडून थोडा हिस्सा मिळाला तरी किंवा काहीच भाग न मिळाला तरीही संतुष्ट आहे असे बाह्यतः दाखवून जावे. नंतर तो तावडीत सापडल्यावर हल्ला करून दुप्पट मिळवावे.

४९ परंतु स्वतः नेत्याचा (विजिगीषूचा) कार्यभाग सिद्ध झाल्यावर त्याने स्वारीवर बरोबर आलेल्या राजांना रजा द्यावी. वेळ पडल्यास स्वतः कमी घ्यावे, अधिक घेऊ नये; त्यायोगे तो राजमंडलात प्रिय होतो.

६

[ एकादशशततमं प्रकरणम् – संहितप्रयाणिकम्;
द्वादशशततमं प्रकरणम् – परिपणितापरिपणितापसृताः संधयः]

विजिगीषुर्द्वितीयां प्रकृतिमेवमतिसंदध्यात् । १ । सामन्तं संहितप्रयाणे योजयेत् 'त्वमितो याहि, अहमितो यास्यामि, समानो लाभः' इति । २ । लाभसाम्ये संधिः, वैषम्ये विक्रमः । ३ ।

संधिः परिपणितश्चापरिपणितश्च । ४ । 'त्वमेतं देशं याहि, अहमिमं देशं यास्मामि' इति परिपणितदेशः । ५ । 'त्वमेतावन्तं कालं चेष्टस्व, अहमेतावन्तं कालं चेष्टिष्ये' इति परिपणितकालः । ६ । 'त्वमेतावत्कार्यं साधय, अहमिदं कार्यं साधयिष्यामि' इति परिपणितार्थः । ७ ।

यदि वा मन्येत 'शैलवननदीदुर्गमटवीव्यवहितं छिन्नधान्यपुरुषवीवधासारमयवसेन्धनोदकमविज्ञातं प्रकृष्टमन्यभावदेशीयं वा सैन्यव्यायामानामलब्धभौमं

सहावा अध्याय

प्रकरण १११ : संधी केलेल्या राजांच्या प्रयाणाविषयी;
प्रकरण ११२ : अटी घालून, अटी न घालता व सोडून गेलेल्यांशी करावयाचे संधी

१ विजिगीषूने (अरी ह्या) दुसऱ्या प्रकृतीवर पुढीलप्रमाणे मात करावी. २ शेजारच्या राजाला (अरीला) संधी करून स्वारीवर जाण्यास उद्युक्त करावे, "तू ह्या दिशेने जा, मी त्या दिशेने जातो; दोघांचाही सारखाच लाभ होईल." ३ उभयतांचा लाभ सारखाच असेल तर संधी करावा; लाभ सारखा नसेल तर युद्ध करावे.

४ संधी अटी घालून केलेला व अटी न घालता केलेला असा असतो. ५ "तू ह्या देशावर स्वारी कर, मी त्या देशावर स्वारी करतो," हा देशासंबंधी अट घालून केलेला संधी. ६ "तू अमुक इतका वेळ कार्य कर, मी अमुक इतका वेळ कार्य करीन," हा कालाविषयी अट असलेला संधी. ७ "तू अमुक इतके कार्य साध्य कर, मी अमुक इतके कार्य साध्य करीन," हा कार्यासंबंधी अट असलेला संधी.

८ त्याला जर असे वाटले की, "पर्वतदुर्ग, वनदुर्ग अथवा नदीदुर्ग असलेल्या, अरण्याच्या पलीकडे असलेल्या, धान्य व माणसे यांचा पुरवठा व मित्राची मदत पोहोचू न शकणाऱ्या, चारा, लाकूडफाटा व पाणी नसलेल्या, माहिती नसलेल्या, दूरवर असलेल्या, इतरांना विरोध करणारी प्रजा असलेल्या अथवा सैन्याच्या

वा देशं परो यास्यति, विपरीतमहम्' इत्येतस्मिन् विशेषे परिपणितदेशं संधिमुपेयात् । ८ ।

यदि वा मन्येत 'प्रवर्षोष्णशीतमतिव्याधिप्रायमुपक्षीणाहारोपभोगं सैन्यव्यायामानां चौपरोधिकं कार्यसाधनानामूनमतिरिक्तं वा कालं परश्चेष्टिष्यते, विपरीतमहम्' इत्येतस्मिन् विशेषे परिपणितकालं संधिमुपेयात् । ९ ।

यदि वा मन्येत 'प्रत्यादेयं प्रकृतिकोपकं दीर्घकालं महाक्षयव्ययमल्पमनर्थानुबन्धमकल्यमधर्म्यं मध्यमोदासीनविरुद्धं मित्रोपघातकं वा कार्यं परः साधयिष्यति, विपरीतमहम्' इत्येतस्मिन् विशेषे परिपणितार्थं संधिमुपेयात् । १० ।

एवं देशकालयोः कालकार्ययोर्देशकार्ययोर्देशकालकार्याणां चावस्थापनात्सप्तविधः परिपणितः । ११ ।

तस्मिन् प्रागेवारभ्य प्रतिष्ठाप्य च स्वकर्माणि परकर्मसु विक्रमेत । १२ ।

हालचालींना योग्य जागा उपलब्ध नसणाऱ्या देशावर शत्रू स्वारी करील व याच्या उलट प्रकारच्या देशावर मी स्वारी करीन," तर अशा विशिष्ट परिस्थितीत देशासंबंधी अटी असलेला संधी करावा.

९ असे जर त्याला वाटले की, "खूप पाऊस, ऊन अथवा थंडी असलेल्या, पुष्कळ व्याधी उत्पन्न करणाऱ्या, आहाराच्या व इतर उपयोगाच्या वस्तूंची कमतरता असणाऱ्या आणि सैन्याच्या हालचालीत विघ्ने उत्पन्न करणाऱ्या, कार्यसिद्धीसाठी अपुरा अथवा अधिक असणाऱ्या वेळी शत्रू कार्य करील व याच्या उलट असणाऱ्या वेळी मी कार्य करीन," तर अशा विशिष्ट परिस्थितीत कालविषयक अटी असलेला संधी करावा.

१० त्याला जर वाटले की, "(त्याच्यापासून) परत घेता येण्यासारखे, प्रजाजनांत क्षोभ माजविणारे, खूप वेळ घेणारे, मोठ्या प्रमाणात वाहने, माणसे व द्रव्य खर्च करावी लागणारे, अगदी क्षुल्लक असणारे, परिणामी अनर्थ उत्पन्न करणारे, हितकारक नसलेले, धर्माशी विरुद्ध असणारे, मध्यम अथवा उदासीन राजाचा विरोध असलेले अथवा त्याच्या स्वतःच्या मित्राची हानी करणारे असे कार्य शत्रू साध्य करील, मी याच्या उलट प्रकारचे कार्य साध्य करीन," तर अशा विशिष्ट परिस्थितीत कार्यासंबंधी अटी असलेला संधी करावा.

११ याप्रमाणे देश व काल, काल व कार्य, देश व कार्य आणि देश, काल व कार्य यांसंबंधी ठरवून केलेले (चार संधी) म्हणून अटी असलेले संधी एकूण सात प्रकारचे होतात.

१२ ह्या (अटी असलेल्या) संधीमध्ये आपली स्वतःची कामे अगोदरच सुरू करून व पार पाडून मग शत्रूच्या कामांवर हल्ला चढवावा.

व्यसनत्वरावमानालस्ययुक्तमज्ञं वा शत्रुमतिसंधातुकामो देशकालकार्याणामनवस्थापनात् 'संहितौ स्वः' इति संधिविश्वासेन परच्छिद्रमासाद्य प्रहरेदित्यपरिपणितः । १३ ।

तत्रैतद्भवति । १४ ।

सामन्तेनैव सामन्तं विद्वानायोज्य विग्रहे ।
ततोऽन्यस्य हरेद्भूमिं छित्त्वा पक्षं समन्ततः ।। १५ ।।

संधेरकृतचिकीर्षा कृतश्लेषणं कृतविदूषणमवशीर्णक्रिया च । १६ । विक्रमस्य प्रकाशयुद्धं कूटयुद्धं तूष्णींयुद्धम् । १७ । इति संधिविक्रमौ । १८ ।

अपूर्वस्य संधेः सानुबन्धैः सामादिभिः पर्येषणं समहीनज्यायसां च यथाबलमवस्थापनमकृतचिकीर्षा । १९ ।

कृतस्य प्रियहिताभ्यामुभयतः परिपालनं यथासंभाषितस्य च निबन्धनस्यानुवर्तनं रक्षणं च 'कथं परस्मान्न भिद्येत' इति कृतश्लेषणम् । २० ।

१३ व्यसन, घाई, मानखंडना व आळस यांनी युक्त असलेल्या अथवा अज्ञानी शत्रूला फसवू इच्छिणाऱ्या विजिगीषूने देश, काल व कार्य ही न ठरविता "आपल्यात संधी आहे" असे म्हणून संधीवर विसंबून ठेवून शत्रूचे मर्मस्थान शोधून त्या ठिकाणी त्याच्यावर हल्ला करावा, हा अटी न ठरविता केलेला संधी होय.

१४ त्यासंबंधात पुढील वचन आहे.

१५ विद्वान राजाने एका शेजारच्या राजाला दुसऱ्या शेजारच्या राजाशी लढाईत गुंतवून, मग त्याच्या बाजूच्या लोकांना चहुकडून त्याच्यापासून तोडून त्याचा प्रदेश बळकावून घ्यावा.

१६ संधीच्या चार अवस्था आहेत. अकृतचिकीर्षा ( न केलेला नवीन संधी करणे), कृतश्लेषण (केलेला संधी पाळणे), कृतविदूषण. (केलेला संधी मोडणे) आणि अवशीर्णक्रिया (मोडलेल्या संधीवर उपाय करणे). १७ युद्धाचे प्रकाशयुद्ध, कूटयुद्ध व गुप्तयुद्ध असे प्रकार आहेत. १८ हे झाले संधी व युद्ध यांचे प्रकार.

१९ नवीन तह करताना सामदानादी उपाय व त्यांचे परिणाम यांचा विचार करणे आणि त्यांच्या बलाच्या अनुरोधाने तुल्यबल, हीनबल व बलवत्तर राजे निर्धारित करणे ह्याला अकृतचिकीर्षा म्हणतात.

२० केलेल्या संधीचे दोघांकडून, प्रिय व हितकर गोष्टी करून, परिपालन आणि कबूल केलेल्या अटीप्रमाणे वागणे, तसेच दोघात फूट पाडली जाणार नाही याची काळजी घेणे हे कृतश्लेषण होय.

परस्यापसंधेयतां दूष्यातिसंधानेन स्थापयित्वा व्यतिक्रमः कृतविदूषणम् ।२१। भृत्येन मित्रेण वा दोषापसृतेन प्रतिसंधानमवशीर्णक्रिया ।२२। तस्यां गतागतश्चतुर्विधः – कारणाद्गतागतो, विपरीतः, कारणाद्गतोऽकारणादागतो, विपरीतश्चेति ।२३।

स्वामिनो दोषेण गतो गुणेनागतः परस्य गुणेन गतो दोषेणागत इति कारणाद्गतागतः संधेयः ।२४।

स्वदोषेण गतागतो गुणमुभयोः परित्यज्य अकारणाद्गतागतः चलबुद्धिरसंधेयः ।२५।

स्वामिनो दोषेण गतः परस्मात्स्वदोषेणागत इति कारणाद्गतोऽकारणादागतः तर्कयितव्यः 'परप्रयुक्तः स्वेन वा दोषेणापकर्तुकामः, परस्योच्छेत्तारममित्रं मे ज्ञात्वा प्रतिघातभयादागतः, परं वा मामुच्छेत्तुकामं परित्यज्यानृशंस्यादागतः' इति ।२६। ज्ञात्वा कल्याणबुद्धिं पूजयेद्, अन्यथाबुद्धिमपकृष्टं वासयेत् ।२७।

२१ (आपल्या) दूष्यांमार्फत फसवणूक करून शत्रू संधी करण्यास अपात्र आहे असे प्रस्थापित करून संधीचे उल्लंघन म्हणजे कृतविदूषण.

२२ दोषामुळे सोडून गेलेल्या नोकराशी अथवा मित्राशी पुन्हा समेट करणे म्हणजे अवशीर्णक्रिया. २३ त्यासंबंधात सोडून जाऊन परत आलेला (भृत्य किंवा मित्र) चार प्रकारचा असतो – योग्य कारणांसाठी गेलेला व आलेला, याच्या उलट असलेला, योग्य कारणांसाठी गेलेला व तशा कारणांवाचून आलेला, आणि याच्या उलट असलेला.

२४ स्वामीच्या दोषामुळे सोडून गेलेला व स्वामीच्या गुणांमुळे परत आलेला किंवा शत्रूच्या गुणांमुळे सोडून गेलेला व त्याच्या दोषामुळे परत आलेला तो योग्य कारणांसाठी गेलेला व आलेला, त्याच्याशी समेट करण्यास हरकत नाही.

२५ (स्वामी व त्याचा शत्रू) दोघांचेही गुण विचारात न घेता स्वतःच्या दोषाने गेलेला व आलेला तो योग्य कारणांशिवाय गेलेला व आलेला; तो चंचलबुद्धीचा म्हणून त्याच्याशी समेट करू नये.

२६ स्वामीच्या दोषामुळे गेलेला व स्वतःच्या दोषामुळे शत्रूकडून आलेला तो योग्य कारणास्तव गेलेला व अयोग्य कारणास्तव आलेला; त्याच्या बाबतीत विचार करावा, "हा शत्रूच्या प्रेरणेवरून अथवा स्वतःच्याच दुष्टतेमुळे मला इजा करण्याच्या उद्देशाने आला आहे काय? माझा शत्रू त्याच्या शत्रूचा निःपात करणारा आहे हे जाणून आपल्या (दोषामुळे स्वतःच्या) विनाशाच्या भीतीने तो आला आहे काय? की शत्रू माझा उच्छेद करू इच्छितो म्हणून त्याला सोडून तो दयाबुद्धीने परत आला आहे काय?" २७ त्याचा उद्देश समजून आल्यावर

**स्वदोषेण गतः परदोषणागत इत्यकारणाद्गतः कारणादागतः तर्कयितव्यः 'छिद्रं मे पूरयिष्यति, उचितोऽयमस्य वासः, परत्रास्य जनो न रमते, मित्रैर्मे संहितः, शत्रुर्भिविगृहीतः, लुब्धक्रूरादाविग्नः शत्रुसंहिताद्वा परस्मात्' इति । २८ । ज्ञात्वा यथाबुद्ध्यवस्थापयितव्यः । २९ ।**

**'कृतप्रणाशः शक्तिहार्निविद्यापण्यत्वमाशानिर्वेदो देशलौल्यमविश्वासो बलवद्विग्रहो वा परित्यागस्थानम्' इत्याचार्याः । ३० । भयमवृत्तिरमर्ष इति कौटिल्यः । ३१ ।**

**इहापकारी त्याज्यः, परापकारी संधेयः, उभयापकारी तर्कयितव्य इति समानम् । ३२ ।**

**असंधेयेन त्ववश्यं संधातव्ये यतः प्रभावस्ततः प्रतिविदध्यात् । ३३ ।**

त्याच्या मनातील हेतू स्वामीचे कल्याण करावे असा असल्यास त्याला सन्मानाने वागवावे, त्याचा हेतू निराळा असल्यास त्याला दूर ठेवावे.

२८ स्वतःच्या दोषामुळे गेलेला व शत्रूच्या दोषामुळे परत आलेला तो अयोग्य कारणाने गेलेला व योग्य कारणास्तव आलेला ; त्याच्या बाबतीत विचार करावा, "हा माझी उणीव भरून काढू शकेल काय ? तो येथीलच राहणारा आहे काय ? त्याच्या माणसांना दुसरीकडे राहणे आवडत नाही काय ? माझ्या मित्रांशी त्याचा संधी आहे काय ? माझ्या शत्रूशी त्याचा विग्रह आहे काय ? लोभी व क्रूर शत्रूच्या भीतीने किंवा त्याच्या शत्रूशी संधी करणाऱ्या शत्रूच्या भीतीने तो परत आला आहे काय ?" २९ हे समजून घेऊन त्याच्या मनातील उद्देशानुसार त्याला वागणूक द्यावी.

३० "केलेल्या कामाचे चीज न होणे, शक्तीचा क्षय, विद्येची विक्री करण्याची तयारी, आशा करावयाच्या बाबतीत निराशा, देशोदेशी फिरण्याची आवड, विश्वासाचा अभाव किंवा बलवान मनुष्याबरोबर तंटा ही नोकरी सोडून जाण्याची निमित्ते होत," असे आचार्यांचे मत आहे. ३१ भीती, उपजीविकेचा अभाव आणि (अन्याय वगैरे) सहन न होणे ही (मूलभूत निमित्ते) असे कौटिल्याचे मत आहे.,

३२ यांपैकी ज्याने आपल्याला अपकार केला असेल त्याचा त्याग करावा, शत्रूला अपकार केला असेल त्याच्याशी संधी करावा, दोघांनाही अपकार करणाऱ्याविषयी वरीलप्रमाणे विचार करावा.

३३ परंतु संधी करावयास योग्य नसणाऱ्याशी संधी करणे आवश्यक असल्यास ज्या बाबतीत तो प्रभावशाली असेल तिच्याबद्दल संरक्षणाची उपाययोजना करावी.

सोपकारं व्यवहितं गुप्तमायुःक्षयादिति ।
वासयेदरिपक्षीयमवशीर्णक्रियाविधौ ।। ३४ ।।
विक्रमयेद्भर्तरि वा सिद्धं वा दण्डचारिणम् ।
कुर्यादमित्राटवीषु प्रत्यन्ते वाऽन्यतः क्षिपेत् ।। ३५ ।।
पण्यं कुर्यादसिद्धं वा सिद्धं वा तेन संवृतम् ।
तस्यैव दोषेणादूष्य परसंधेयकारणात् ।। ३६ ।।
अथ वा शमयेदेनमायत्यर्थमुपांशुना ।
आयत्यां च वधप्रेप्सुं दृष्ट्वा हन्याद्गतागतम् ।। ३७ ।।
अरितोऽभ्यागतो दोषः शत्रुसंवासकारितः ।
सर्पसंवासधर्मित्वान्नित्योद्वेगेन दूषितः ।। ३८ ।।
जायते प्लक्षबीजाशात्कपोतादिव शाल्मलेः ।
उद्वेगजननो नित्यं पश्चादपि भयावहः ।। ३९ ।।

३४ अवशीर्णक्रियेच्या (मोडलेले सांधण्याच्या) संबंधात शत्रुपक्षाकडील मनुष्याला, त्याने आपल्यावर उपकार केला असताही, त्याच्या आयुष्याच्या अंतापर्यंत त्याच्यावर नजर ठेवून आपल्यापासून दूर रहावयास जागा द्यावी.

३५ किंवा त्याला (पूर्वीच्या) स्वामीशी लढावयास लावावे; किंवा त्याची निष्ठा कसास उतरल्यास त्याला सैन्य देऊन शत्रू अथवा रानटी टोळ्या यांच्यावर पाठवावे; किंवा सरहद्दीवर एकीकडे ठेवून द्यावे.

३६ किंवा त्याची निष्ठा सिद्ध न झाल्यास त्याला (त्याच्या पूर्वीच्या स्वामीला) विकून टाकावे, अथवा शत्रूशी संधी करता यावा म्हणून, ज्याची निष्ठा सिद्ध झाली आहे त्याला सुद्धा निष्ठावान नसलेल्याच्याच दोषाचा त्याच्यावर आरोप करून त्याच्याबरोबर (शत्रूला विकून टाकावे)

३७ किंवा भविष्यकाळाचा विचार करून त्याला (शत्रुपक्षाच्या माणसाला) गुप्तपणे नाहीसा करावा आणि जो सोडून जाऊन परत आला आहे तो भविष्यकाळी आपला वध करण्याची इच्छा बाळगून आहे असे दिसल्यास त्याला (उघडपणे) ठार मारावे.

३८ शत्रूकडून आलेला मनुष्य शत्रूबरोबर राहिला असल्याच्या दोषामुळे दूषित झालेला असतो; सापाबरोबर राहण्यासारखे ते असल्यामुळे नेहमी भीती वाटत राहणे हा त्यात दोष असतो.

३९ प्लक्षाचे बी खाणाऱ्या कबूतरापासून शाल्मलीवृक्षाला ज्याप्रमाणे धोका असतो त्याप्रमाणे (शत्रूकडून आलेला मनुष्य) नेहमी भीतिजनक होतो, आणि मागाहून सुद्धा त्याच्यापासून धोका राहतो.

प्रकाशयुद्धं निर्दिष्टे देशे काले च विक्रमः ।
विभीषणमवस्कन्दः प्रमादव्यसनार्दनम् ॥ ४० ॥
एकत्र त्यागघातौ च कूटयुद्धस्य मातृका ।
योगगूढोपजापार्थं तूष्णींयुद्धस्य लक्षणम् ॥ ४१ ॥

इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे संहितप्रयाणिकं परिपणितापरिपणितापसृताश्च संधयः षष्ठोऽध्याय । आदितः चतुःशततमः ।

७

## [ त्रयोदशशतं प्रकरणम् – द्वैधीभाविकाः संधिविक्रमाः ]

विजिगीषुर्द्वितीयां प्रकृतिमेवमुपगृह्णीयात् । १ । सामन्तं सामन्तेन संभूय यायात्, यदि वा मन्येत ' पार्ष्णि मे न ग्रहीष्यति, पार्ष्णिग्राहं वारयिष्यति, यातव्यं नाभिसरिष्यति, बलद्वैगुण्यं मे भविष्यति, वीवधासारौ मे प्रवर्तयिष्यति, परस्य वारयिष्यति, बह्वाबाधे मे पथि कण्टकान्मर्दयिष्यति, दुर्गाटव्यपसारेषु दण्डेन चरिष्यति, यातव्यमविषह्ये दोषे संधौ वा स्थापयिष्यति, लब्धलाभांशो वा शत्रूनन्यान्मे विश्वासयिष्यति ' इति । २ ।

४०–४१ सांगितलेल्या ठिकाणी व सांगितलेल्या वेळी लढणे म्हणजे प्रकाशयुद्ध; भीतीने गाळण उडविणे, अचानक हल्ला करणे, गैरसावध अथवा संकटात असता झोडपणे आणि एके ठिकाणी माघारीची हूल व उलट परतून हल्ला हे कूटयुद्धाचे प्रकार होत. गुप्त उपायांची योजना, गूढ पुरुषांच्या द्वारा (फितुरीचे) सूचन ही गुप्त युद्धाची लक्षणे होत.

### सातवा अध्याय

### प्रकरण ११३ : द्वैधीभावाच्या अवलंबनातील संधी व युद्ध

१ विजिगीषूने (अरी ह्या) द्वितीय प्रकृतीची पुढीलप्रमाणे मदत घ्यावी. २ जर त्याला वाटले की, " (त्याच्याशी एकजूट केल्यामुळे) शत्रू पिछाडीवर हल्ला करणार नाही; पिछाडीच्या शत्रूला (माझ्यावर हल्ला करण्यापासून) परावृत्त करील; मी ज्याच्यावर स्वारी करणार आहे त्याच्या मदतीस जाणार नाही; माझ्याजवळील सैन्य दुप्पट होईल; मला धान्य व माणसे यांचा पुरवठा करील आणि कुमक धाडील; ह्या गोष्टी माझ्या यातव्याला मिळू देणार नाही; पुष्कळ धोके असलेल्या माझ्या मार्गातील काटे ठेचून काढील; (यातव्याने) किल्ल्यात अथवा अरण्यात आश्रय घतला असता सैन्याचा वापर करील; यातव्याला सहन होण्यासारखे नसलेल्या संकटात पाडील अथवा संधी करावयास भाग पाडील; (विजयानंतर) त्याला लाभाचा उचित हिस्सा मिळाल्यामुळे

**द्वैधीभूतो वा कोशेन दण्डं दण्डेन कोशं सामन्तानामन्यतमाल्लिप्सेत । ३ । तेषां ज्यायसोऽधिकेनांशेन समात्समेन हीनाद्धीनेनेति समसंधिः । ४ । विपर्यये विषमसंधिः । ५ । तयोर्विशेषलाभादतिसंधिः । ६ ।**

**व्यसनिनमपायस्थाने सक्तमनर्थिनं वा ज्यायांसं हीनो बलसमेन लाभेन पणेत । ७ । पणितस्तस्यापकारसमर्थो विक्रमेत, अन्यथा संदध्यात् । ८ ।**

**एवंभूतो वा हीनशक्तिप्रतापपूरणार्थं संभाव्यार्थाभिसारी मूलपार्ष्णित्राणार्थं वा ज्यायांसं हीनो बलसमाद्विशिष्टेन लाभेन पणेत । ९ । पणितः कल्याणबुद्धिमनुगृह्णीयात्, अन्यथा विक्रमेत । १० ।**

माझ्या इतर शत्रूंत माझ्याविषयी विश्वास उत्पन्न करील; " तर शेजारच्या अरीबरोबर एकजूट करून (संकटात असलेल्या यातव्य ह्या दुसऱ्या) शेजारच्या राजावर चाल करून जावे.

३ किंवा द्वैधीभावाचा अवलंब करून शेजारच्या राजांपैकी एकाकडून कोश देऊन सैन्य अथवा सैन्य देऊन कोश मिळविण्याचा प्रयत्न करावा. ४ त्यामध्ये बलवत्तर राजाकडून (मोबदल्यात) अधिक हिस्सा देऊन, तुल्यबल राजाकडून तितकाच हिस्सा देऊन आणि हीनबल राजाकडून कमी हिस्सा देऊन (कोशाच्या मोबदल्यात सैन्य अथवा सैन्याच्या मोबदल्यात कोश मिळवावा). हा सम संधी. ५ याच्या उलट (बलवत्तराला सम अथवा हीन, तुल्यबलाला अधिक अथवा हीन आणि हीनबलाला अधिक अथवा सम मोबदला देऊन) तो विषम संधी. ६ ह्या दोन्ही प्रकारांत (विजिगीषूला) विशेष लाभ झाला म्हणजे तो अतिसंधी (मात, फसवणूक) होतो.

७ बलवत्तर राजा संकटात सापडला असता, अपायकारक गोष्ट करण्यात मग्न असता अथवा अनर्थाने युक्त असता हीनबल राजाने सैन्याच्या मोबदल्यात तितक्याच प्रमाणात द्रव्य देऊ करून त्याच्याशी संधीचे बोलणे करावे. ८ संधीचे बोलणे ज्याच्याशी केले तो (बलवत्तर राजा) अपकार करण्यास समर्थ असेल तर त्याने युद्ध करावे, नाहीतर संधी स्वीकारावा.

९ किंवा याच (संकटग्रस्त, अपायमग्न व अनर्थयुक्त) परिस्थितीत असलेल्या हीनबल राजाने आपल्या क्षीण झालेल्या शक्ती व प्रताप भरून काढण्यासाठी, किंवा मिळण्याची संभाव्यता असलेल्या मुलखावर स्वारी करताना आपल्या मूळ राज्याचे व पिछाडीचे रक्षण करण्यासाठी, बलवत्तर राजाशी सैन्याच्या मोबदल्यात अधिक लाभ देऊ करून संधीचे बोलणे करावे. १० ज्याच्याशी संधीचे बोलणे केले त्याने हीनबल राजाच्या मनातील हेतू शुद्ध असल्यास त्याला मदत करावी, नाहीतर लढावे.

जातव्यसनप्रकृतिरन्ध्रमुपस्थितानर्थं वा ज्यायांसं हीनो दुर्गमित्रप्रतिष्टब्धो वा ह्रस्वमध्वानं यातुकामः शत्रुम् अयुद्धमेकान्तसिद्धिं वा लाभमादातुकामो बलसमाद्धीनेन लाभेन पणेत । ११ । पणितस्तस्यापकारसमर्थो विक्रमेत, अन्यथा संदध्यात् । १२ ।

अरन्ध्रव्यसनो वा ज्यायान् दुरारब्धकर्माणं भूयः क्षयव्ययाभ्यां योक्तुकामो दूष्यदण्डं प्रवासयितुकामो दूष्यदण्डमावाहयितुकामो वा पीडनीयमुच्छेदनीयं वा हीनेन व्यथयितुकामः संधिप्रधानो वा कल्याणबुद्धिर्हीनं लाभं प्रतिगृह्णीयात् । १३ । कल्याणबुद्धिना संभूयार्थं लिप्सेत, अन्यथा विक्रमेत । १४ ।

एवं समः सममतिसंदध्यादनुगृह्णीयाद्वा । १५ ।

परानीकस्य प्रत्यनीकं मित्राटवीनां वा, शत्रोर्विभूमीनां देशिकं मूलपार्ष्णित्राणार्थं वा समो बलसमेन लाभेन पणेत । १६ । पणितः कल्याणबुद्धिमनुगृह्णीयात्, अन्यथा विक्रमेत । १७ ।

११ जो संकटात सापडला आहे, प्रजेच्या (क्षय, लोभ, विराग ह्या) दोषांमुळे ज्याची अभेद्यता नष्ट झाली आहे अथवा ज्याच्यावर अनर्थ कोसळू पहात आहे अशा बलवत्तर राजाशी हीनबल राजाने, दुर्गाचा भक्कम आसरा किंवा मित्राचा भक्कम पाठिंबा असता, शत्रूवरील स्वारीसाठी थोडेच अंतर जावयाचे असता, युद्धाशिवायच किंवा निश्चितपणे प्राप्त होण्यासारखा लाभ मिळवू पहात असता, सैन्याच्या प्रमाणात कमी लाभ देऊ करून संधीचे बोलणे करावे. १२ संधी देऊ केलेला (बलवत्तर राजा) अपकार करण्यास समर्थ असल्यास त्याने युद्ध करावे, अन्यथा संधी स्वीकारावा.

१३ छिद्र अथवा संकट नसताही बलवत्तर राजाने, ज्याच्या (स्वारीच्या) कार्याची सुरुवात वाईट झाली आहे अशा हीनबल राजाला, माणसे व द्रव्य यांची अधिक हानी सोसावयास लावण्याच्या हेतूने, आपले निष्ठावान नसलेले सैन्य युद्धात मारले जावे ह्या उद्देशाने अथवा हीनबल राजाशी एकनिष्ठ नसलेले त्याचे सैन्य आपल्याकडे आणण्याच्या उद्देशाने, किंवा हीनबल राजाच्या मार्फत छळण्यास योग्य अथवा उच्छेद करण्यास योग्य अशा आपल्या शत्रूला त्रास देण्याच्या उद्देशाने, किंवा संधीला प्राधान्य देत असल्यामुळे मनात शुद्ध हेतू ठेवून कमी लाभाचा स्वीकार करावा. १४ मनात शुद्ध हेतू असलेल्या (हीनबल) राजाशी एकजूट करून कार्य साध्य करावे, तो तसा नसेल तर युद्ध करावे.

१५ याप्रमाणेच तुल्यबल राजाने तुल्यबल राजावर मात करावी अथवा त्याला मदत करावी.

१६ शत्रूच्या विशिष्ट प्रकारच्या सैन्याशी अथवा त्याच्या मित्रसैन्याशी किंवा अटवीबलाशी लढावयास समर्थ असे, शत्रूला लढावयास अयोग्य अशा जागा

**जातव्यसनप्रकृतिरन्ध्रमनेकविरुद्धमन्यतो लभमानो वा समो बलसमाद्धीनेन लाभेन पणेत । १८ । पणितस्तस्यापकारसमर्थो विक्रमेत, अन्यथा संदध्यात् । १९ ।**

**एवंभूतो वा समः सामन्तायत्तकार्यः कर्तव्यबलो वा बलसमाद्विशिष्टेन लाभेन पणेत । २० । पणितः कल्याणबुद्धिमनुगृह्णीयात् अन्यथा विक्रमेत । २१ ।**

**जातव्यसनप्रकृतिरन्ध्रमभिहन्तुकामः स्वारब्धमेकान्तसिद्धिं वाऽस्य कर्मोपहन्तुकामो मूले यात्रायां वा प्रहर्तुकामो यातव्याद्भूयो लभमानो वा ज्यायांसं हीनं समं वा भूयो याचेत । २२ । भूयो वा याचितः स्वबलरक्षार्थं दुर्धर्षमन्यदुर्गमासारमटवीं वा**

दाखविण्यास समर्थ असे किंवा मूळ राज्य व पिछाडी यांचे रक्षण करण्यासाठी म्हणून सैन्य मागताना तुल्यबल राजाने सैन्याच्या प्रमाणात लाभ देऊ करून संधीचे बोलणे करावे. १७ त्याचे हेतू शुद्ध असल्यास संधी देऊ केलेल्याने त्याला मदत करावी, तो तसा नसेल तर युद्ध करावे.

१८ संकटात सापडलेला अथवा प्रजेच्या दोषांमुळे छिद्र उत्पन्न झालेला किंवा अनेक राजांचा विरोध असलेला असा राजा असता, किंवा दुसरीकडून सैन्य मिळण्याची शक्यता असता तुल्यबल राजाने त्या राजाशी सैन्याच्या प्रमाणापेक्षा कमी लाभ देऊ करून संधीचे बोलणे करावे. १९ ज्याच्याशी हे बोलणे केले तो अपकार करावयास समर्थ असेल तर त्याने युद्ध करावे, नाहीतर त्या संधीस कबूल व्हावे.

२० याच (संकटाच्या व छिद्राच्या) परिस्थितीत असलेल्या तुल्यबल राजाने, त्याचे कार्य शेजारच्या राजावर अवलंबून असता अथवा त्याचे सैन्य तयार करावयाचे असता, सैन्याच्या प्रमाणापेक्षा अधिक लाभ देऊ करून संधीचे बोलणे करावे. २१ त्याचा हेतू शुद्ध असल्यास संधी देऊ केलेल्याने त्याला मदत करावी, अन्यथा लढावे.

२२ बलवत्तर, हीनबल अथवा तुल्यबल (कोणत्याही) राजाकडे तो संकटात सापडला असता किंवा प्रजेच्या दोषांनी दुर्बल झाला असता त्याच्यावर हल्ला करण्याच्या उद्देशाने, चांगली सुरुवात झालेले अथवा निश्चितपणे साध्य होणारे त्याचे कार्य नष्ट करण्याच्या उद्देशाने, त्याच्या मूळ राज्यावर अथवा स्वारीवर हल्ला करण्याच्या उद्देशाने, किंवा त्याच्या यातव्य राजाकडून अधिक (लाभ) मिळत असता, आणखी अधिक लाभाची मागणी करावी. २३ ज्याच्याकडे अधिक मागणी केली आहे त्याने स्वतःचे सैन्य वाचविण्याच्या हेतूने, शत्रूच्या सैन्याच्या द्वारा हल्ला करावयास कठीण असा (यातव्य) शत्रूचा दुर्ग, त्याचे कुमकेचे सैन्य अथवा अटवीबल ही उध्वस्त करण्याच्या उद्देशाने, दूरवरच्या प्रदेशात अथवा दीर्घकाल चालणाऱ्या स्वारीत शत्रूच्या सैन्याला माणसांची व द्रव्याची हानी सोसावयास लावण्याच्या उद्देशाने, अथवा शत्रूच्या सैन्याने

परदण्डेन मर्दितुकामः प्रकृष्टेऽध्वनि काले वा परदण्डं क्षयव्ययाभ्यां योक्तुकामः परदण्डेन वा विवृद्धस्तमेवोच्छेत्तुकामः परदण्डमादातुकामो वा भूयो दद्यात् । २३ ।

ज्यायान् वा हीनं यातव्यापदेशेन हस्ते कर्तुकामः परमुच्छिद्य वा तमेवोच्छेत्तुकामः, त्यागं वा कृत्वा प्रत्यादातुकामो बलसमाद्विशिष्टेन लाभेन पणेत । २४ । पणितस्तस्यापकारसमर्थो विक्रमेत, अन्यथा संदध्यात् । २५ । यातव्यसंहितो वा तिष्ठेत्, दूष्यामित्राटवीदण्डं वाऽस्मै दद्यात् । २६ ।

जातव्यसनप्रकृतिरन्ध्रो वा ज्यायान् हीनं बलसमेन लाभेन पणेत । २७ । पणितस्तस्यापकारसमर्थो विक्रमेत, अन्यथा संदध्यात् । २८ ।

एवंभूतं हीनं ज्यायान् बलसमाद्धीनेन लाभेन पणेत । २९ । पणितस्तस्यापकारसमर्थो विक्रमेत, अन्यथा संदध्यात् । ३० ।

आदौ बुध्येत पणितः पणमानश्च कारणम् ।
ततो वितर्क्योभयतो यतः श्रेयस्ततो व्रजेत् ।। ३१ ।।

इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे द्वैधीभाविकाः संधिविक्रमाः सप्तमोऽध्यायः । आदितः पञ्चशततमः ।

शक्तीत वाढ झाल्यावर त्याचाच उच्छेद करण्याच्या उद्देशाने किंवा शत्रूचे सैन्य बळकावण्याच्या उद्देशाने आणखी अधिक लाभ द्यावा.

२४ बलवत्तर राजाने यातव्य शत्रूवर स्वारी करण्याच्या सबबीवर हीनबल राजाला आपल्या कह्यात आणण्याच्या उद्देशाने, किंवा शत्रूचा उच्छेद केल्यावर त्याचाच (हीनबल राजाचाच) उच्छेद करण्याच्या उद्देशाने, किंवा अगोदर देऊन नंतर परत घेण्याच्या उद्देशाने, सैन्याच्या प्रमाणापेक्षा अधिक लाभ देऊ करून हीनबलाशी संधीचे बोलणे करावे. २५ बोलणे केलेल्यानें, त्याचा अपकार करावयास समर्थ असता, लढावे, अन्यथा संधी करावा. २६ किंवा (बलवत्तराच्या) यातव्याशी संधी करून रहावे अथवा राजद्रोही सैन्य, शत्रुसैन्य किंवा अटवीबल द्यावे.

२७ संकट अथवा प्रजाजनांमुळे छिद्र उत्पन्न झाले असता बलवत्तर राजाने हीनबल राजाला सैन्याच्या बरोबरीचा लाभ देऊ करून संधीचे बोलणे करावे. २८ बोलणे केलेल्याने, त्याचा अपकार करावयास समर्थ असता, लढावे, अन्यथा संधी करावा.

२९ त्या परिस्थितीत असलेल्या हीनबलाशी बलवत्तर राजाने सैन्याच्या प्रमाणापेक्षा कमी लाभ देऊ करून संधीचे बोलणे करावे. ३० त्याचा अपकार करण्यास समर्थ असल्यास हीनबलाने युद्ध करावे, अन्यथा संधी पत्करावा.

३१ ज्याच्याशी संधी करावयाचा तो आणि संधी करणारा यांनी प्रथम दुसऱ्याचे हेतू समजून घ्यावेत. नंतर उभयपक्षी विचार करून जो श्रेयस्कर असेल त्या मार्गाने जावे.

८

**[ चतुर्दशशततमं प्रकरणम् – यातव्यवृत्तिः ;**
**पञ्चदशशततमं प्रकरणम् – अनुग्राह्यमित्रविशेषाः ]**

**यातव्योऽभियास्यमानः संधिकारणमादातुकामो विहन्तुकामो वा सामवायिकानामन्यतमं लाभद्वैगुण्येन पणेत । १ । पणमानः क्षयव्ययप्रवासप्रत्यवायपरोपकारशरीराबाधांश्चास्य वर्णयेत् । २ । प्रतिपन्नमर्थेन योजयेत् । ३ । वैरं वा परैर्ग्राहयित्वा विसंवादयेत् । ४ ।**

**दुरारब्धकर्माणं भूयः क्षयव्ययाभ्यां योक्तुकामः स्वारब्धां वा यात्रासिद्धिं विघातयितुकामो मूले यात्रायां वा प्रहर्तुकामो यातव्यसंहितः पुनर्याचितुकामः प्रत्युत्पन्नार्थकृच्छ्रस्तस्मिन्नविश्वस्तो वा तदात्वे लाभमल्पमिच्छेत्, आयत्यां प्रभूतम् । ५ ।**

**मित्रोपकारममित्रोपघातमर्थानुबन्धमवेक्षमाणः पूर्वोपकारकं कारयितुकामो भूयस्तदात्वे महान्तं लाभमुत्सृज्यायत्यामल्पमिच्छेत् । ६ ।**

## आठवा अध्याय

### प्रकरण ११४ : ज्याच्यावर स्वारी होणार असेल त्याचे वागणे
### प्रकरण ११५ : मदत करावयास योग्य असे मित्र राजांचे प्रकार

१ (संकटात असलेल्या) यातव्य राजावर स्वारी होणार असेल त्यावेळेस त्याने, (एकजूट केलेल्या राजांच्या आपसातील) संधीचे प्रयोजन दूर करण्याच्या उद्देशाने अथवा नष्ट करण्याच्या उद्देशाने, एकजूट केलेल्या राजांपैकी एकाशी दुप्पट लाभ देऊ करून संधीचे बोलणे करावे. २ संधीचे बोलणे करणाऱ्याने माणसांची व द्रव्याची हानी, प्रवासातील दगदग, सिद्धीच्या मार्गातील अडचणी, त्याच्या शत्रूवर होणारा उपकार व त्याच्या शरीराला असणारा धोका यांचे वर्णन करावे. ३ तो कबूल झाल्यास द्रव्य देऊन त्याचा सत्कार करावा. ४ किंवा इतरांशी वैर करावयास लावून त्याला त्यांच्यापासून फोडावे.

५ ज्याच्या कामाची सुरुवात वाईट झाली आहे त्याला आणखी माणसांची व द्रव्याची हानी सोसावयास लावण्याच्या उद्देशाने, किंवा चांगली सुरुवात झालेल्या त्याच्या स्वारीचा बिघाड करावयाच्या उद्देशाने, त्याच्या मूळ राज्यावर किंवा स्वारीवर हल्ला करण्याच्या उद्देशाने, किंवा यातव्य राजाशी संधी करून आणखी मागण्याच्या उद्देशाने, पैशाची अडचण उपस्थित झाली असता अथवा त्याच्यावर विश्वास नसता (ही), तात्कालिक थोडा लाभ स्वीकारून भविष्यकाळी खूप मोठा लाभ मिळविण्याचा बेत आखावा.

६ आपल्या मित्राला होणारा फायदा अथवा शत्रूची होणारी हानी यांच्यापासून लाभ होत असलेला दिसल्यास अथवा ज्याने अगोदर मदत केली त्याला

**दूष्यामित्राभ्यां मूलहरेण वा ज्यायसा विगृहीतं त्रातुकामस्तथाविधमुपकारं कारयितुकामः संबन्धावेक्षी वा तदात्वे चायत्यां च लाभं न प्रतिगृह्णीयात् । ७ ।**

**कृतसंधिरतिक्रमितुकामः परस्य प्रकृतिकर्शनं मित्रामित्रसंधिविश्लेषणं वा कर्तुकामः पराभियोगाच्छङ्कमानो लाभमप्राप्तमधिकं वा याचेत । ८ । तमितरस्तदात्वे चायत्यां च क्रममवेक्षेत । ९ । तेन पूर्वे व्याख्याताः । १० ।**

**अरिविजिगीष्वोस्तु स्वं स्वं मित्रमनुगृह्णतोः शक्यकल्यभव्यारम्भिस्थिरकर्मानुरक्तप्रकृतिभ्यो विशेषः । ११ । शक्यारम्भी विषह्यं कर्मारभते, कल्यारम्भी निर्दोषम्, भव्यारम्भी कल्याणोदयम् । १२ । स्थिरकर्मा नासमाप्य कर्मोपरमते । १३ । अनुरक्तप्रकृतिः सुसहायत्वादल्पेनाप्यनुग्रहेण कार्यं साध-**

आणखी मदत देण्यास प्रवृत्त करण्याच्या उद्देशाने, तात्कालिक होणारा मोठा लाभ सोडून देऊन भविष्यकाळीही अल्प लाभाचीच इच्छा बाळगावी.

७ राजद्रोही व शत्रू यांच्याशी अथवा राज्य बळकावू पाहणाऱ्या बलवत्तर राजाशी लढत असणाऱ्या राजाचा बचाव करण्याच्या उद्देशाने, तशाच प्रकारची मदत आपल्यालाही केली जावी ह्या उद्देशाने अथवा उभयतांमधील संबंध ध्यानात घेऊन वर्तमानकाळी व भविष्यकाळी लाभ स्वीकारू नये.

८ संधी केल्यानंतर त्याचे उल्लंघन करण्याच्या उद्देशाने, शत्रूच्या प्रजाजनांना क्षीण करण्याच्या उद्देशाने अथवा मित्र व अमित्र यांच्यातील संधीत फूट पाडण्याच्या उद्देशाने, (सैन्य मागणाऱ्या) शत्रूच्या (स्वतःवरील) हल्ल्याची भीती वाटत असता, न मिळालेल्या लाभाची किंवा अधिक लाभाची मागणी करावी. ९ तेव्हा (मागणी केलेल्या) दुसऱ्याने वर्तमानकाळी व भविष्यकाळी होणाऱ्या फायद्याचा क्रम विचारात घ्यावा. १० हेच वरील (५-७ ह्या सूत्रांतील) बाबतींतही लागू आहे.

११ परंतु जेव्हा अरी आणि विजिगीषू दोघेही आपापल्या मित्राला मदत करतात तेव्हा त्यांच्यापैकी जो साध्य होणे शक्य असलेले अथवा कल्य (दोषरहित) अथवा भव्य (कल्याणप्रद) कार्य करणाऱ्या, काम दृढपणे करीत राहणाऱ्या अथवा प्रजाजन अनुरक्त असलेल्या मित्राला मदत करतो त्याचा विशेष फायदा होतो (व तो दुसऱ्यावर मात करतो). १२ शक्य असलेले कार्य करणारा झेपेल तसेच काम सुरू करतो, कल्य कार्य करणारा दोषरहित काम करतो, भव्य कार्य करणारा कल्याणप्रद काम करतो. १३ स्थिरकर्मा काम संपविल्याशिवाय थाबत नाही. १४ ज्याची प्रजा अनुरक्त आहे त्याला चांगले सहायक असल्यामुळे तो थोड्या मदतीनेही कार्य साध्य करतो. १५ ते हे मित्र त्यांचे

यति । १४ । त एते कृतार्थाः सुखेन प्रभूतं चोपकुर्वन्ति । १५ । अतः प्रतिलोमा नानुग्राह्याः । १६ ।

तयोरेकपुरुषानुग्रहे यो मित्रं मित्रतरं वाऽनुगृह्णाति सोऽतिसंधत्ते । १७ । मित्रादात्मवृद्धिं हि प्राप्नोति, क्षयव्ययप्रवासपरोपकारानितरः । १८ । कृतार्थश्च शत्रुर्वैगुण्यमेति । १९ ।

मध्यमं त्वनुगृह्णतोर्यो मध्यमं मित्रं मित्रतरं वाऽनुगृह्णाति सोऽतिसंधत्ते । २० । मित्रादात्मवृद्धिं हि प्राप्नोति, क्षयव्ययप्रवासपरोपकारानितरः । २१ । मध्यमश्चेदनुगृहीतो विगुणः स्यादमित्रोऽतिसंधत्ते । २२ । कृतप्रयासं हि मध्यमामित्रमपसृतमेकार्थोपगतं प्राप्नोति । २३ ।

तेनोदासीनानुग्रहो व्याख्यातः । २४ ।

मध्यमोदासीनयोर्बलांशदाने यः शूरं कृतास्त्रं दुःखसहमनुरक्तं वा दण्डं ददाति सोऽतिसंधीयते । २५ । विपरीतोऽतिसंधत्ते । २६ ।

कार्य झाल्यावर सुखाने व खूप मदत (प्रत्युपकारार्थ) देतात. १६ याच्या उलट असणाऱ्यांना मदत करू नये.

१७ ते दोघे (अरी व विजिगीषू) एकाच राजाला मदत करीत असल्यास जो आपल्या मित्राला अथवा अधिक जवळच्या मित्राला मदत करतो तो दुसऱ्यावर मात करतो. १८ कारण, मित्रापासून त्याची स्वतःची भरभराट होते, दुसऱ्याला (ज्याने मित्र नसलेल्याला मदत केली असते त्याला) मनुष्य व द्रव्य यांची हानी, प्रवास व परक्यावर उपकार हे सहन करावे लागतात. १९ आणि त्याचे कार्य झाल्यावर शत्रू शत्रुत्वच दाखवितो.

२० परंतु ते दोघेही मध्यम राजाला मदत करीत असल्यास जो मित्र असलेल्या अथवा अधिक जवळचा मित्र असलेल्या मध्यमाला मदत करतो तो दुसऱ्यावर मात करतो. २१ कारण, मित्र असलेल्या मध्यमापासून त्याचा उत्कर्ष होतो, दुसऱ्याला मनुष्यहानी, द्रव्यहानी, प्रवास व परक्यावर उपकार हे सहन करावे लागतात. २२ मदत मिळाल्यानंतर मध्यम जर उलटला तर शत्रू मात करतो. २३ कारण, (मदत करण्याची) मेहनत घतलेला, मध्यम राजाचा (आता) शत्रु (झालेला) व त्याच्यापासून फुटून निघालेला (विजिगीषू) एकाच ध्येयाने प्रेरित झालेला असा त्याला (शत्रूला) मिळतो.

२४ उदासीन राजाला मदत करण्याच्या बाबतीत हेच विवेचन लागू होते.

२५ मध्यम किंवा उदासीन राजाला काही सैन्य द्यावयाचे असता जो शूर, शस्त्रविद्येत निपुण, कष्ट सहन करण्यास समर्थ अथवा एकनिष्ठ असलेले सैन्य देतो त्याच्यावर मात होते. २६ याच्या उलट वागतो तो मात करतो.

वि (वाय)— ३१७-३०-अ

यत्र तु दण्डः प्रहितस्तं वा चार्थमन्यांश्च साधयति तत्र मौलभृतश्रेणीमित्राटवीबलानामन्यतममुपलब्धदेशकालं दण्डं दद्यात्, अमित्राटवीबलं वा व्यवहितदेशकालम् । २७ ।

यं तु मन्येत 'कृतार्थो मे दण्डं गृह्णीयाद्, अमित्राटव्यभूम्यनृतुषु वा वासयेद्, अफलं वा कुर्याद्' इति, दण्डव्यासङ्गापदेशेन नैनमनुगृह्णीयात् । २८ । एवमवश्यं त्वनुग्रहीतव्ये तत्कालसहमस्मै दण्डं दद्यात् । २९ । आ समाप्तेश्चैनं वासयेद् योधयेच्च बलव्यसनेभ्यश्च रक्षेत् । ३० । कृतार्थाच्च सापदेशमपस्रावयेत् । ३१ । दूष्यामित्राटवीदण्डं वाऽस्मै दद्यात् । ३२ । यातव्येन वा संधायैनमतिसंदध्यात् । ३३ ।

समे हि लाभे संधिः स्याद्विषमे विक्रमो मतः ।
समहीनविशिष्टानामित्युक्ताः संधिविक्रमाः ।। ३४ ।।

इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे यातव्यवृत्तिः अनुग्राह्यमित्रविशेषाश्च अष्टमोऽध्यायः ।
आदितः षट्छततमः ।

२७ परंतु जेथे सैन्य (मदतीसाठी) धाडले असता ते कार्य व शिवाय इतरही कार्ये साध्य करू शकेल तेथे वाडवडिलांपासून आलेले, पगारावर ठेवलेले, श्रेणींचे, मित्राचे व रानटी टोळयांचे या सैन्यप्रकारांपैकी कोणत्याही एक प्रकारचे सैन्य, त्या प्रदेशाशी व त्या ऋतूशी परिचित असलेले असे द्यावे, किंवा दूरवरच्या प्रदेशासाठी व दीर्घ कालासाठी शत्रुबल किंवा अटवीबल द्यावे.

२८ परंतु ज्याच्याविषयी त्याला अशी शंका येईल की, "कार्यभाग झाल्यावर हा माझे सैन्य बळकावून बसेल, किंवा शत्रुबल अथवा अटवीबल यांच्या समवेत किंवा अयोग्य ठिकाणी अथवा अयोग्य वेळी त्याला रहावयास लावील किंवा ते निरुपयोगी करून टाकील," त्याला आपले सैन्य दुसरीकडे गुंतलेले आहे अशी सबब सांगून मदत करू नये. २९ परंतु याप्रमाणे मदत करणे आवश्यकच झाले तर ती वेळ निभावून नेण्यापुरतेच सैन्य त्याला द्यावे. ३० आणि कार्य संपेपर्यंत ते (त्या राजापासून दूर) राहील व लढेल अशी खबरदारी घ्यावी आणि सैन्यावर सामान्यतः येणाऱ्या संकटापासून त्याचा बचाव करावा. ३१ आणि त्याचा कार्यभाग झाल्यावर कोठल्या तरी सबबीवर आपले सैन्य निघून येईल अशी व्यवस्था करावी. ३२ किंवा त्याला दूष्यबल, शत्रुबल अथवा अटवीबल द्यावे. ३३ किंवा त्याच्या यातव्य राजाबरोबर संधी करून त्याच्यावर मात करावी.

३४ जेव्हा लाभ बरोबरीचा असतो तेव्हा संधी, जेव्हा तो कमीअधिक असतो तेव्हा युद्ध (हे धोरण) तुल्यबल, हीनबल व बलवत्तर राजांना श्रेयस्कर. याप्रमाणे संधी व युद्ध यांच्या प्रसंगांचे वर्णन केले आहे.

९

[ षोडशशततमं प्रकरणम् – मित्रहिरण्यभूमिकर्मसंधयः; तत्र मित्रसंधिः हिरण्यसंधिश्च ]

संहितप्रयाणे मित्रहिरण्यभूमिलाभानामुत्तरोत्तरो लाभः श्रेयान् । १ । मित्रहिरण्ये हि भूमिलाभाद्भवतः, मित्रं हिरण्यलाभात् । २ । यो वा लाभः सिद्धः शेषयोरन्यतरं साधयति । ३ ।

'त्वं चाहं च मित्रं लभावहे' इत्येवमादिः समसंधिः । ४ । 'त्वं मित्रम्' इत्येवमादिर्विषमसंधिः । ५ । तयोर्विशेषलाभादतिसंधिः । ६ ।

समसंधौ तु यः संपन्नं मित्रं मित्रकृच्छ्रे वा मित्रमवाप्नोति सोऽतिसंधत्ते । ७ । आपद्धि सौहृदस्थैर्यमुत्पादयति । ८ ।

मित्रकृच्छ्रेऽपि नित्यमवश्यमनित्यं वश्यं वेति 'नित्यमवश्यं श्रेयः, तद्धि अनुपकुर्वदपि नापकरोति' इत्याचार्याः । ९ । नेति कौटिल्यः । १० । वश्यमनित्यं

नववा अध्याय

प्रकरण ११६ : मित्रलाभ, द्रव्यलाभ, भूमिलाभ व कार्यसिद्धी यांसाठी संधी. (१) मित्रलाभासाठी संधी; (२) द्रव्यलाभासाठी संधी

१ संधी करून स्वारीवर निघावयाचे असता मित्र, द्रव्य व भूमी यांच्या लाभांपैकी नंतरनंतरचा लाभ अधिक श्रेयस्कर. २ कारण, भूमीचा लाभ झाल्यावर मित्र व द्रव्य यांचा लाभ सहजगत्या होतो, तसाच द्रव्यलाभानंतर मित्राचा लाभ. ३ किंवा जो लाभ सिद्ध झाला असता इतर दोन लाभांपैकी कोणताही एक साध्य करून देतो तो (लाभ श्रेयस्कर).

४ "तू आणि मी दोघेही मित्राचा लाभ करून घेऊ या," इत्यादी प्रकारचा हा समसंधी. ५ "तू मित्र मिळव, (मी द्रव्य किंवा भूमी मिळवीन)," इत्यादी प्रकारचा हा विषमसंधी. ६ त्या दोन्ही प्रकारांत कोणाचा विशेष लाभ झाल्यास (त्याची दुसऱ्यावर) मात होते.

७ परंतु सम संधीच्या संबंधात ज्याला मित्रगुणांनी संपन्न असा मित्र किंवा अडचणीत असलेला असा मित्र मिळतो तो मात करतो. ८ कारण, आपत्कालात मैत्रीत स्थैर्य उत्पन्न होते.

९ मित्राचा आपत्काल (सारखाच) असताना सुद्धा नेहमी मित्रत्वाने वागणारा पण ताबेदार नसलेला आणि ताबेदार असलेला पण मैत्री सतत न राखणारा ह्या दोहोंपैकी "जो नेहमी मित्रत्वाने वागतो, पण ताब्यात नाही असा मित्र श्रेयस्कर, कारण तो उपकार करीत नसला तरी अपकार करीत नाही,"

श्रेयः । ११ । यावदुपकरोति तावन्मित्रं भवति, उपकारलक्षणं मित्रमिति । १२ ।

वश्ययोरपि महाभोगमनित्यमल्पभोगं वा नित्यमिति 'महाभोगमनित्यं श्रेयः, महाभोगमनित्यमल्पकालेन महदुपकुर्वन्महान्ति व्ययस्थानानि प्रतिकरोति' इत्याचार्याः । १३ । नेति कौटिल्यः । १४ । नित्यमल्पभोगं श्रेयः । १५ । महाभोगमनित्यमुपकारभयादपक्रामति, उपकृत्य वा प्रत्यादातुमीहते । १६ । नित्यमल्पभोगं सातत्यादल्पमुपकुर्वन्महता कालेन महदुपकरोति । १७ ।

गुरुसमुत्थं महन्मित्रं लघुसमुत्थमल्पं वेति 'गुरुसमुत्थं महन्मित्रं प्रतापकरं भवति, यदा चोत्तिष्ठते तदा कार्यं साधयति' इत्याचार्याः । १८ । नेति कौटिल्यः । १९ । लघुसमुत्थमल्पं श्रेयः । २० । लघुसमुत्थमल्पं मित्रं कार्यकालं नातिपातयति दौर्बल्याच्च यथेष्टभोग्यं भवति, नेतरत्प्रकृष्टभौमम् । २१ ।

असे आचार्यांचे मत आहे. १० हे बरोबर नाही, असे कौटिल्याचे मत आहे. ११ मैत्री सतत न राखली तरी ताब्यात असणारा मित्र श्रेयस्कर. १२ जोपर्यंत उपकार करतो तोपर्यंत मित्र, उपकार करणे हेच मैत्रीचे लक्षण.

१३ ताब्यात असलेल्या दोन मित्रांपैकी सुद्धा एक खूप मोठा उपकार करू शकणारा पण अनित्य व दुसरा अल्प उपकार करणारा पण नित्य असे असल्यास, "खूप मदत देऊ शकणारा अनित्य असला तरी श्रेयस्कर; कारण असा मित्र थोडक्या वेळात खूप मोठी मदत करून मोठ्या खर्चाची कामे तडीस नेणे शक्य करतो," असे आचार्यांचे मत आहे. १४ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. १५ कमी उपकार करणारा पण नित्य असणारा मित्र श्रेयस्कर. १६ खूप मदत करू शकणारा पण अनित्य मित्र उपकार करावा लागेल ह्या भीतीने सोडून जातो, किंवा मदत केलीच तर ती परत घेऊ पहातो. १७ कमी मदत देऊ शकणारा पण नित्य असलेला मित्र सतत थोडीथोडी मदत करून मोठ्या कालावधीत खूप मोठी मदत करतो.

१८ मोठे सैन्य (सावकाश) उभे करणारा मोठा मित्र व थोडे सैन्य (झटपट) उभे करणारा लहान मित्र यांपैकी "मोठ्या सैन्याची जमवाजमव करणारा मोठा मित्र दबदबा उत्पन्न करतो आणि सैन्य उभे केले की कार्य सहज साध्य करून देतो," असे आचार्यांचे मत आहे. १९ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. २० झटपट सैन्य उभे करणारा लहान मित्र श्रेयस्कर. २१ झटपट सैन्य गोळा करणारा लहान मित्र कार्य करण्याची वेळ टळू देत नाही आणि दुर्बल असल्यामुळे त्याचा हवा तसा उपयोग करून घेता येतो, तसा त्या दुसऱ्याचा, त्याचा प्रदेश फार दूर असल्यामुळे, करून घेता येत नाही.

विक्षिप्तसैन्यमवश्यसैन्यं वेति 'विक्षिप्तं सैन्यं शक्यं प्रतिसंहर्तुं वश्यत्वाद्' इत्याचार्याः । २२ । नेति कौटिल्यः । २३ । अवश्यसैन्यं श्रेयः । २४ । अवश्यं हि शक्यं सामादिभिर्वश्यं कर्तुम्, नेतरत्कार्यव्यासक्तं प्रतिसंहर्तुम् । २५ ।

पुरुषभोगं हिरण्यभोगं वा मित्रमिति 'पुरुषभोगं मित्रं श्रेयः, पुरुषभोगं मित्रं प्रतापकरं भवति, यदा चोत्तिष्ठते तदा कार्यं साधयति' इत्याचार्याः । २६ । नेति कौटिल्यः । २७ । हिरण्यभोगं मित्रं श्रेयः ।२८ । नित्यो हि हिरण्येन योगः कदाचिद्दण्डेन । २९ । दण्डश्च हिरण्येनान्ये च कामाः प्राप्यन्त इति । ३० ।

हिरण्यभोगं भूमिभोगं वा मित्रमिति 'हिरण्यभोगं गतिमत्त्वात्सर्वव्ययप्रतीकारकरम्' इत्याचार्याः । ३१ । नेति कौटिल्यः । ३२ । मित्रहिरण्ये हि भूमिलाभाद्भुवत इत्युक्तं पुरस्तात् । ३३ । तस्माद्भूमिभोगं मित्रं श्रेय इति । ३४ ।

तुल्ये.पुरुषभोगे विक्रमः क्लेशसहत्वमनुरागः सर्वबललाभो वा मित्रकुलाद्विशेषः । ३५ ।

२२ सैन्य पांगलेले आहे असा आणि सैन्य हुकमतीत नाही असा (मित्र), यांपैकी "पांगलेले सैन्य हुकमतीत असल्यामुळे एकत्र आणता येते," असे आचार्यांचे मत आहे. २३ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. २४ हुकमतीत नसलेले सैन्य श्रेयस्कर. २५ कारण, वश नसलेले सैन्य सामादी उपायांनी वश करून घेता येते, दुसरे पांगलेले सैन्य आपल्या व्यवसायात व्यग्र असल्यामुळे एकत्र करणे शक्य नसते.

२६ मनुष्यांची (सैन्याची) मदत देणारा मित्र व द्रव्याची मदत देणारा मित्र यांपैकी "मनुष्यांची मदत देणारा मित्र श्रेयस्कर, कारण असा मित्र दबदबा उत्पन्न करतो आणि जेव्हा मदतीला येतो तेव्हा कार्य साध्य करून देतो," असे आचार्य म्हणतात. २७ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. २८ द्रव्याची मदत करणारा मित्र श्रेयस्कर. २९ कारण, द्रव्याचा उपयोग नेहमी होतो, सैन्याचा कधीकधीच. ३० आणि द्रव्याने सैन्य व इतरही इच्छित वस्तू प्राप्त होतात.

३१ द्रव्याची मदत देणारा मित्र व जमिनीची मदत देणारा मित्र यांपैकी "द्रव्याची मदत देणारा (श्रेयस्कर), कारण (द्रव्य) गतिमान (हवे तिकडे नेता येण्यासारखे) असल्यामुळे सर्व प्रकारच्या खर्चाची तरतूद करता येते," असे आचार्य म्हणतात. ३२ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ३३ भूमीच्या लाभामुळे मित्र व द्रव्य यांचा लाभ होतो हे मागे (वर सूत्र २ मध्ये) सांगितले आहे. ३४ म्हणून भूमीची मदत देणारा मित्र श्रेयस्कर.

३५ (दोन मित्रांकडची) मनुष्यांची मदत सारखीच असेल तेव्हा पराक्रम, कष्ट सहन करण्याची क्षमता, अनुराग किंवा मित्राकडून सर्व सैन्याचा लाभ यामुळे विशेष फायदा होतो.

तुल्ये हिरण्यभोगे प्रार्थितार्थता प्राभूत्यमल्पप्रयासता सातत्यं च विशेषः । ३६ । तत्रैतद्भवति । ३७ ।

नित्यं वश्यं लघूत्थानं पितृपैतामहं महत् ।
अद्वैध्यं चेति संपन्नं मित्रं षड्गुणमुच्यते ।। ३८ ।।
ऋते यदर्थं प्रणयाद्रक्ष्यते यच्च रक्षति ।
पूर्वोपचितसंबन्धं तन्मित्रं नित्यमुच्यते ।। ३९ ।।
सर्वचित्रमहाभोगं त्रिविधं वश्यमुच्यते ।
एकतोभोग्युभयतः सर्वतोभोगि चापरम् ।। ४० ।।
आदातृ वा दातृपि वा जीवत्यरिषु हिंसया ।
मित्रं नित्यमवश्यं तद्दुर्गाटव्यपसारि च ।। ४१ ।।
अन्यतो विगृहीतं यल्लघुव्यसनमेव वा ।
संधत्ते चोपकाराय तन्मित्रं वश्यमध्रुवम् ।। ४२ ।।
एकार्थेनाथ संबद्धमुपकार्यविकारि च ।
मित्रभावि भवत्येतन्मित्रमद्वैध्यमापदि ।। ४३ ।।

३६ (दोघांकडून) द्रव्याची मदत सारखीच असता पाहिजे असेल ते मिळणे, खूप द्रव्य मिळणे, मेहनत कमी पडणे आणि सतत मिळत रहाणे यांमुळे विशेष फायदा होतो

३७ त्यासंबंधात पुढील वचने आहेत –

३८ सतत मैत्री राखणारा, ताब्यात असलेला, झटपट सैन्य उभे करणारा, वाडवडिलांपासून मैत्री असलेला, मोठा आणि भिन्न प्रयोजन नसलेला ह्या सहा गुणांनी युक्त असा मित्र संपन्न असे म्हणतात.

३९ जो पैशाच्या लालसेने नसून केवळ प्रेमाने रक्षिला जातो व रक्षण करतो आणि ज्या च्याशी पूर्वीपासून संबंध वाढत आले आहेत तो मित्र नित्य असे म्हणतात.

४० वश्य मित्र तीन प्रकारचा, मदतीसाठी सर्व देणारा, विविध प्रकारची मदत देणारा आणि मोठी मदत देणारा, असे म्हणतात. एका बाजूने मदत करणारा, दोन बाजूंनी मदत करणारा व सर्व बाजूंनी मदत करणारा असा आणखी तीन प्रकारचा वश्य मित्र.

४१ मदत देणारा किंवा घेणारा सुद्धा जो मित्र शत्रूंना अपाय करीत रहातो आणि जो दुर्गात किंवा अरण्यात आसरा घेऊ शकतो तो मित्र नित्य परंतु वश्य नसलेला.

४२ दुसरीकडे युद्धात गुंतलेला अथवा अल्पशा संकटात सापडलेला असा सुद्धा जो मित्र मदतीसाठी संधी करतो तो वश्य परंतु अनित्य मित्र.

४३ एकाच उद्दिष्टाने जोडला गेलेला, मदत करणारा व कधी न बदलणारा असा मित्र मैत्रीच्या स्वभावाचा असतो आणि तो आपत्काली सोडून जात नाही.

मित्रभावाद्ध्रुवं मित्रं शत्रुसाधारणाच्चलम् ।
न कस्यचिदुदासीनं द्वयोरुभयभावि तत् ।। ४४ ।।
विजिगीषोरमित्रं यन्मित्रमन्तर्धितां गतम् ।
उपकारेऽनिविष्टं वाऽशक्तं वाऽनुपकारि तत् ।। ४५ ।।
प्रियं परस्य वा रक्ष्यं पूज्यं संबद्धमेव वा ।
अनुगृह्णाति यन्मित्रं शत्रुसाधारणं हि तत् ।। ४६ ।।
प्रकृष्टभौमं संतुष्टं बलवच्चालसं च यत् ।
उदासीनं भवत्येतद्व्यसनादवमानितम् ।। ४७ ।।
अरेर्नेतुश्च यद्वृद्धि दौर्बल्यादनुवर्तते ।
उभयस्याप्यविद्विष्टं विद्यादुभयभावि तत् ।। ४८ ।।
कारणाकारणध्वस्तं कारणाकारणागतम् ।
यो मित्रं समुपेक्षेत स मृत्युमुपगूहति ।। ४९ ।।

**क्षिप्रमल्पो लाभश्चिरान्महानिति वा ' क्षिप्रमल्पो लाभः कार्यदेशकालसंवादकः श्रेयान् ' इत्याचार्याः । ५० । नेति कौटिल्यः । ५१ । चिरादविनिपाती बीजसधर्मा महाँल्लाभः श्रेयान्, विपर्यये पूर्वः । ५२ ।**

४४ (केवळ विजिगीषूशीच) मैत्री असल्यास मित्र ध्रुव होय; शत्रूशी समान (मैत्री) असल्यास मित्र चल होय; कोणाशीच मैत्री नसल्यास उदासीन; दोघांशी मैत्री असल्यास मित्र उभयभावी होय.

४५ (मूळचा) विजिगीषूचा शत्रू असलेला पण बलवान राजांच्या मध्ये सापडल्यामुळे जो मित्र होतो तो, त्याच्यावर पूर्वी उपकार केलेला नसल्यामुळे किंवा तो दुर्बल असल्यामुळे, मदत करीत नाही.

४६ शत्रूला प्रिय असलेला, त्याने रक्षण करावयास योग्य असलेला, त्याला पूज्य असलेला अथवा त्याच्याशी नात्याने जोडलेला असा सुद्धा जो मित्र मदत करतो तो शत्रूशी समान मैत्री असलेला मित्र.

४७ फार दूर प्रदेश असलेला, संतुष्ट, बलवान व आळशी, तसेच (विजिगीषूच्या) संकटामुळे अवमानना झालेला मित्र उदासीन होतो.

४८ दुर्बल असल्यामुळे जो विजिगीषू आणि अरी ह्या दोघांच्याही वृद्धीला अनुकूल होऊन वागतो आणि दोघांचेही शत्रुत्व ओढवून घेत नाही तो उभयभावी मित्र असे समजावे.

४९ योग्य किंवा अयोग्य कारणास्तव सोडून गेलेला आणि योग्य किंवा अयोग्य कारणास्तव परत आलेला अशा मित्राच्या बाबतीत जो खबरदारी घेत नाही तो (साक्षात) मृत्यूला कवटाळतो.

५० ताबडतोब होणारा लहानसा लाभ व कालावधीने होणारा मोठा लाभ यांपैकी "ताबडतोब होणारा लहानसा लाभ कार्य, देश व काल यांच्याशी

**एवं दृष्ट्वा ध्रुवे लाभे लाभांशे च गुणोदयम् ।**
**स्वार्थसिद्धिपरो यायात्संहितः सामवायिकैः ।। ५३ ।।**

**इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे मित्रहिरण्यभूमिकर्मसंधौ मित्रसंधिः हिरण्यसंधिश्च नवमोऽध्यायः आदितः सप्तशततमः ।**

**१०**

## [ षोडशशततमं प्रकरणम् – मित्रहिरण्यभूमिकर्मसंधयः, तत्र भूमिसंधिः ]

**' त्वं चाहं च भूमिं लभावहे ' इति भूमिसंधिः । १ ।**

**तयोर्यः प्रत्युपस्थितार्थः संपन्नां भूमिमवाप्नोति सोऽतिसंधत्ते । २ ।**

**तुल्ये संपन्नालाभे यो बलवन्तमाक्रम्य भूमिमवाप्नोति सोऽतिसंधत्ते । ३ । भूमिलाभं शत्रुकर्शनं प्रतापं च हि प्राप्नोति । ४ । दुर्बलाद्भूमिलाभे सत्यं सौकर्यं भवति । ५ । दुर्बल एव च भूमिलाभः, तत्सामन्तश्च मित्रममित्रभावं गच्छति । ६ ।**

सुसंगत असल्यास श्रेयस्कर," असे आचार्यांचे मत आहे. ५१ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ५२ कालावधीने होणारा मोठा लाभ नष्ट न होण्यासारखा, बीजासारखा (वृक्षात परिणत होणारा) असल्यास श्रेयस्कर; तसा तो नसेल तर तात्काळ होणारा अल्प लाभ श्रेयस्कर.

५३ याप्रमाणे निश्चित असलेल्या लाभामध्ये किंवा लाभाच्या काही भागामध्ये गुणवत्ता असल्याची खात्री करून घेऊन केवळ आपले स्वतःचेच कार्य सिद्ध करण्याच्या उद्देशाने प्रेरित होऊन मित्रराजांशी एकजुटीचा संधी करून स्वारीवर निघावे.

### दहावा अध्याय

### प्रकरण ११६ (पुढे चालू) : (३) भूमिलाभासाठी संधी

१ "तू आणि मी दोघेही भूमीचा लाभ करून घेऊ या" हा भूमीच्या प्राप्तीसाठी संधी.

२ त्या दोघांपैकी ज्याला आवश्यकता उत्पन्न झाली असता (सूत्र ६.१.८ मधील) सर्व गुणांनी संपन्न अशा भूमीचा लाभ होतो तो (दुसऱ्यावर) मात करतो.

३ दोघांनाही सारखाच संपन्न भूमीचा लाभ होत असल्यास जो बलवान राजावर आक्रमण करून प्रदेश मिळवितो तो मात करतो. ४ कारण, त्याला प्रदेशाची प्राप्ती, (बलवान) शत्रूची दुर्बलता आणि स्वतःच्या प्रभावाची वृद्धी इतके फायदे मिळतात. ५ दुर्बल राजापासून प्रदेश जिंकून घेणे सोपे असते हे खरे आहे. ६ परंतु तो भूमीचा लाभ निकृष्ट प्रतीचाच असतो, शिवाय त्याचा शेजारी (पूर्वी) मित्र असलेला आता (सरहद्दी भिडल्यामुळे) शत्रू बनतो.

**तुल्ये बलीयस्त्वे यः स्थितशत्रुमुत्पाट्य भूमिमवाप्नोति सोऽतिसंधत्ते । ७ । दुर्गावाप्तिर्हि स्वभूमिरक्षणममित्राटवीप्रतिषेधं च करोति । ८ ।**

**चलामित्राद्भूमिलाभे शक्यसामन्ततो विशेषः । ९ । दुर्बलसामन्ता हि क्षिप्राप्यायनयोगक्षेमा भवति । १० । विपरीता बलवत्सामन्ता कोशदण्डावच्छेदनी च भूमिर्भवति । ११ ।**

**संपन्ना नित्यामित्रा मन्दगुणा वा भूमिरनित्यामित्रेति 'संपन्ना नित्यामित्रा श्रेयसी भूमिः; संपन्ना हि कोशदण्डौ संपादयति, तौ चामित्रप्रतिघातकौ' इत्याचार्याः । १२ । नेति कौटिल्यः । १३ । नित्यामित्रालाभे भूयान् शत्रुलाभो भवति । १४ । नित्यश्च शत्रुरुपकृते चापकृते च शत्रुरेव भवति, अनित्यस्तु शत्रुरुपकारादनपकाराद्वा शाम्यति । १५ ।**

**यस्या हि भूमेर्बहुदुर्गाश्चोरगणैर्म्लेच्छाटवीभिर्वा नित्याविरहिताः प्रत्यन्ताः सा नित्यामित्रा, विपर्यये त्वनित्यामित्रा । १६ ।**

७ (पराजित होणारे) राजे सारखेच बलवान असल्यास जो दुर्गात संरक्षित शत्रूला उखडून त्याचा प्रदेश मिळवितो तो मात करतो. ८ कारण, दुर्गाची प्राप्ती झाली म्हणजे आपल्या प्रदेशाचे रक्षण आणि शत्रू व रानटी टोळ्या यांचा प्रतिकार करता येतो.

९ दुर्गहीन राजापासून होणाऱ्या भूमीच्या लाभाच्या संबंधात ज्याचा शेजारी दुर्बल आहे अशा राजापासून भूमी मिळविणे विशेष फायदेशीर होते. १० कारण, जिचा शेजारी दुर्बल आहे अशी भूमी लवकरच योगक्षेमाची वृद्धी करण्यास कारणीभूत होते. ११ बलवान शेजारी असलेली भूमी याच्या उलट असते आणि कोश व सैन्य यांच्या ऱ्हासास कारणीभूत होते.

१२ संपन्न परंतु कायमचे शत्रू असलेली आणि कमी गुणांनी युक्त पण कायमचे शत्रू नसलेली, ह्या दोन भूमींपैकी "संपन्न पण कायम शत्रू असलेली भूमी श्रेयस्कर; कारण, संपन्न भूमी कोश व सैन्य संपादन करून देते, आणि त्या दोन गोष्टी शत्रूचा नाश करतात," असे आचार्यांचे मत आहे. १३ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. १४ कायमचे शत्रू असलेल्या भूमीचा लाभ झाल्यास (स्वतःला) आणखी शत्रूंचा लाभ होतो. १५ आणि कायमचा शत्रू, उपकार केला काय किंवा अपकार केला काय, शत्रूच रहातो, परंतु कायमचा नसलेला शत्रू, त्याच्यावर उपकार केल्यास अथवा अपकार न केल्यास, शत्रुत्वापासून परावृत्त होतो.

१६ जिच्या सरहद्दीपलीकडे पुष्कळ दुर्ग आहेत व सरहद्दीवर चोरांच्या टोळ्या अथवा म्लेच्छ रानटी टोळ्या सतत उपद्रव देत असतात ती नित्यामित्रा (कायमचे शत्रू असलेली) भूमी, याच्या उलट ती अनित्यामित्रा.

**अल्पा प्रत्यासन्ना महती व्यवहिता वा भूमिरिति अल्पा प्रत्यासन्ना श्रेयसी । १७ । सुखा हि प्राप्तुं पालयितुमभिसारयितुं च भवति । १८ । विपरीता व्यवहिता । १९ ।**

**व्यवहितयोरपि दण्डधारणाऽऽत्मधारणा वा भूमिरिति आत्मधारणा श्रेयसी । २० । सा हि स्वसमुत्थाभ्यां कोशदण्डाभ्यां धार्यते । २१ । विपरीता दण्ड-धारणा दण्डस्थानम् । २२ ।**

**बालिशात्प्राज्ञाद्वा भूमिलाभ इति बालिशाद्भूमिलाभः श्रेयान् । २३ । सुप्राप्यानुपाल्या हि भवति, अप्रत्यादेया च । २४ । विपरीता प्राज्ञावनुरक्ता । २५ ।**

**पीडनीयोच्छेदनीययोरुच्छेदनीयाद्भूमिलाभः श्रेयान् । २६ । उच्छेदनीयो ह्यन-पाश्रयो दुर्बलापाश्रयो वाऽभियुक्तःकोशदण्डावादायापसर्तुकामः प्रकृतिभिस्त्यज्यते, न पीडनीयो दुर्गमित्रप्रतिष्टब्धः । २७ ।**

१७ लहान परंतु जवळ असलेली भूमी आणि मोठी परंतु दूर असलेली यांपैकी लहान पण जवळ असलेली श्रेयस्कर. १८ कारण, ती मिळविण्यास, रक्षण करण्यास आणि शत्रूविरुद्ध तिची मदत घेण्यास सोपी असते. १९ दूर असलेली भूमी याच्या उलट असते.

२० दूर असलेल्या दोन, एक सैन्याच्या द्वारा ताब्यात रहाणारी आणि दुसरी स्वतःच्याच उद्योगाने ताब्यात रहाणारी, ह्या भूमींपैकी स्वतःच्या उद्योगाने ताब्यात रहाणारी श्रेयस्कर. २१ कारण, तिच्यातूनच निर्माण होणाऱ्या कोशाने व सैन्याने तिला ताब्यात ठेवता येते. २२ सैन्यामुळे ताब्यात रहाणारी याच्या उलट, केवळ लष्करी तळ असतो.

२३ मूर्ख राजापासून भूमीचा लाभ आणि बुद्धिमान राजापासून भूमीचा लाभ यांपैकी मूर्ख राजापासून भूमीचा लाभ श्रेयस्कर. २४ कारण, ती भूमी मिळविण्यास व रक्षण करण्यास सुलभ असते आणि ती परत घेतली जाणे शक्य नसते. २५ बुद्धिमान राजापासूनची भूमी, ती त्याच्यावर अनुरक्त असल्यामुळे, याच्या उलट असते.

२६ पीडा देत रहाण्यास योग्य आणि उच्छेद करण्यास योग्य अशा शत्रूंपैकी उच्छेद करावयास योग्य असलेल्या शत्रूपासून झालेला भूमीचा लाभ श्रेयस्कर २७ कारण, आश्रयस्थान नसलेला अथवा दुर्बल आश्रयस्थान असलेला (आणि म्हणून) उच्छेद करावयास योग्य शत्रू, त्याच्यावर हल्ला झाला असता कोश व सैन्य घेऊन पळून जाऊ लागला तर त्याचे प्रजाजन त्याचा त्याग करतात, दुर्ग किंवा मित्र यांचा भक्कम आधार असलेल्या (आणि म्हणून केवळ) पीडा देण्यास योग्य असलेल्या शत्रूचा (त्याचे प्रजाजन त्याग करीत) नाहीत.

दुर्गप्रतिष्टब्धयोरपि स्थलनदीदुर्गीयाभ्यां स्थलदुर्गीयाद्भूमिलाभः श्रेयान् ।२८। स्थालेयं हि सुरोधावमर्दावस्कन्दमनिःस्राविशत्रु च।२९। नदीदुर्गं तु द्विगुणक्लेशकरम्, उदकं च पारयितव्यं वृत्तिकरं चामित्रस्य ।३०।

नदीपर्वतदुर्गीयाभ्यां नदीदुर्गीयाद्भूमिलाभः श्रेयान् ।३१। नदीदुर्गं हि हस्तिस्तम्भसंक्रमसेतुबंधनौभिः साध्यमनित्यगाम्भीर्यमवस्राव्युदकं च ।३२। पार्वतं तु स्वारक्षं दुरुपरोधि कृच्छ्रारोहणम्, भग्ने चैकस्मिन्न सर्ववधः शिलावृक्षप्रमोक्षश्च महापकारिणाम् ।३३।

निम्नस्थलयोधिभ्यो निम्नयोधिभ्यो भूमिलाभः श्रेयान् ।३४। निम्नयोधिनो ह्युपरुद्धदेशकालाः, स्थलयोधिनस्तु सर्वदेशकालयोधिनः ।३५।

खनकाकाशयोधिभ्यः खनकेभ्यो भूमिलाभः श्रेयान् ।३६। खनका हि खातेन शस्त्रेण चोभयथा युध्यन्ते, शस्त्रेणैवाकाशयोधिनः ।३७।

२८ दुर्गाचा भक्कम आधार असलेले, एकाला भुईकोट किल्ल्याचा व दुसऱ्याला पाणकोट किल्ल्याचा, त्यांपैकी भुईकोट किल्ला असलेल्यापासून भूमीचा लाभ होणे श्रेयस्कर. २९ कारण, भुईकोट किल्ल्याला वेढा घालणे, उध्वस्त करणे व हल्ला चढविणे सोपे असते आणि शत्रूला त्यातून निसटून जाता येत नाही. ३० परंतु पाणकोट किल्ला सर करण्यास दुप्पट श्रम पडतात आणि पाणी पार करावे लागते व त्यातून शत्रूला उपजीविका प्राप्त होते.

३१ नदीदुर्ग असलेला व पर्वतदुर्ग असलेला यांपैकी नदीदुर्ग असलेल्यापासून भूमीचा लाभ श्रेयस्कर. ३२ कारण, नदीदुर्ग हत्ती, लाकडी ओंडक्यांचा पूल, बंधारे किंवा नावा यांच्या सहाय्याने सर करता येतो, पाण्याची खोली सर्वत्र सारखीच नसते आणि पाण्याला दुसरीकडे वाट करून देता येते. ३३ परंतु पर्वतावरील किल्ला रक्षण करण्यास सोपा, वेढा देण्यास कठीण आणि चढण्यास कष्टप्रद असतो, आणि त्याच्या एका भागाला खिंडार पडले तरी सर्व किल्ला उध्वस्त होत नाही, आणि जोराने मारा करणाऱ्यांवर वरून दगड व झाडे यांचा वर्षाव करता येतो.

३४ पाण्यात लढणारे व जमिनीवर लढणारे यांपैकी पाण्यात लढणाऱ्यांपासून भूमीचा लाभ श्रेयस्कर. ३५ कारण, पाण्यात लढणाऱ्यांवर देश व काल यांचे बंधन असते, परंतु जमिनीवर लढणारे सर्व ठिकाणी व सर्व काळी लढू शकतात.

३६ खंदकांतून लढणारे व उघडयावर लढणारे यांपैकी खंदकांतून लढणाऱ्यांपासून भूमीचा लाभ श्रेयस्कर. ३७ कारण, खंदकांतून लढणारे खंदक व शस्त्रे ह्या दोहोंच्या साहाय्याने लढतात, उघडयावर लढणारे फक्त शस्त्रांच्या साहाय्याने.

एवंविधेभ्यः पृथिवीं लभमानोऽर्थशास्त्रवित् ।
संहितेभ्यः परेभ्यश्च विशेषमधिगच्छति ॥ ३८ ॥

इति सप्तमेऽधिकरणे मित्रहिरण्यभूमिकर्मसंधौ भूमिसंधिः दशमोऽध्यायः । आदितोऽष्टशततमः ।

११

[ षोडशशततमं प्रकरणम् – मित्रहिरण्यभूमिकर्मसंधयः,
तत्र अनवसितसंधिः ]

' त्वं चाहं च शून्यं निवेशयावहे ' इत्यनवसितसंधिः । १ ।

तयोर्यः प्रत्युपस्थितार्थो यथोक्तगुणां भूमिं निवेशयति सोऽतिसंधत्ते । २ ।

तत्रापि स्थलमौदकं वेति महतः स्थलादल्पमौदकं श्रेयः, सातत्यादवस्थितत्वाच्च फलानाम् । ३ ।

स्थलयोरपि प्रभूतपूर्वापरसस्यमल्पवर्षपाकमसक्तारम्भं श्रेयः । ४ ।

औदकयोरपि धान्यवापमधान्यवापाच्छ्रेयः । ५ ।

३८ अर्थशास्त्रात पारंगत असलेला राजा अशा प्रकारच्या राजांपासून भूमीचा लाभ करून घेऊन संधी केलेल्या राजांपेक्षा व शत्रूपेक्षा विशेष फायदा मिळवितो.

## अकरावा अध्याय

## प्रकरण ११६ (पुढे चालू) : (३ पुढे चालू) वस्ती नसलेल्या प्रदेशाविषयी संधी

१ " तू आणि मी वस्ती नसलेल्या प्रदेशात वसाहत स्थापू या " हा अनवसित-संधी.

२ त्या दोघांपैकी जो आवश्यकता उत्पन्न झाली असता मागे (सूत्र ६.१.८ मध्ये) सांगितलेल्या गुणांनी युक्त अशा प्रदेशावर वसाहत स्थापतो तो (दुसऱ्यावर) मात करतो.

३ त्यातसुद्धा कोरडवाहू जमीन आणि पाण्याचा भरपूर पुरवठा असलेली जमीन यांपैकी मोठ्या प्रमाणाच्या कोरड्या प्रदेशापेक्षा लहान पण भरपूर पाणी असलेला प्रदेश श्रेयस्कर; कारण तेथे उत्पन्न सतत व ठराविक असे मिळत रहाते.

४ दोन कोरड्या प्रदेशांपैकीसुद्धा ज्यात अगोदरची व नंतरची धान्ये खूप उत्पन्न होतात, थोड्या पावसाने पिके येतात आणि कार्ये अडून रहात नाहीत तो प्रदेश श्रेयस्कर.

५ पाणी भरपूर असलेल्या दोन प्रदेशांपैकीसुद्धा ज्यात धान्य पिकविले जात नाही अशा प्रदेशापेक्षा ज्यात धान्य पिकविले जाते असा प्रदेश श्रेयस्कर.

तयोरल्पबहुत्वे धान्यकान्तादल्पान्महदधान्यकान्तं श्रेयः । ६ । महत्यवकाशे हि स्थाल्याश्चानूप्याश्चौषधयो भवन्ति । ७ । दुर्गादीनि च कर्माणि प्राभूत्येन क्रियन्ते । ८ । कृत्रिमा हि भूमिगुणाः । ९ ।

खनिधान्यभोगयोः खनिभोगः कोशकरः धान्यभोगः कोशकोष्ठागारकरः । १० । धान्यमूला हि दुर्गादीनां कर्मणामारम्भाः । ११ । महाविषयविक्रयो वा खनिभोगः श्रेयान् । १२ ।

'द्रव्यहस्तिवनभोगयोर्द्रव्यवनभोगः सर्वकर्मणां योनिः प्रभूतनिधानक्षमश्च, विपरीतो हस्तिवनभोगः' इत्याचार्याः । १३ । नेति कौटिल्यः । १४ । शक्यं द्रव्यवनमनेकमनेकस्यां भूमौ वापयितुम्, न हस्तिवनम् । १५ । हस्तिप्रधानो हि परानीकवध इति । १६ ।

वारिस्थलपथभोगयोरनित्यो वारिपथभोगः, नित्यः स्थलपथभोगः । १७ ।

६ तशा लहान व मोठ्या प्रदेशांपैकी धान्याला अनुकूल असलेल्या लहान प्रदेशापेक्षा धान्याला अनुकूल नसलेलाही मोठा प्रदेश श्रेयस्कर. ७ कारण, मोठ्या प्रदेशात कोरड्या जमिनीवर उगवणाऱ्या व पाणथळ जमिनीत उगवणाऱ्या वनस्पती असतात. ८ शिवाय, तेथे दुर्ग बांधणे व इतर कार्ये मोठ्या प्रमाणावर करता येतात. ९ कारण, भूमीचे गुण मनुष्यनिर्मित असतात.

१० खाणींचा उपयोग होत असलेला प्रदेश व भरपूर धान्य देणारा प्रदेश यांपैकी खाणींच्या उपयोगाने कोश निर्माण होतो, पण धान्यामुळे कोश व कोठार निर्माण होतात. ११ कारण, दुर्ग बांधणे इत्यादी कार्यांचा आरंभ धान्यावर अवलंबून असतो (म्हणून धान्योपयोगी प्रदेश श्रेयस्कर). १२ किंवा खाणींतील उत्पादनाची मोठ्या प्रमाणात विक्री होत असल्यास खाणींचा उद्योग असलेला प्रदेश श्रेयस्कर.

१३ "द्रव्यवन व हस्तिवन यांचा उपयोग असलेल्या प्रदेशांपैकी द्रव्यवनाचा उपयोग सर्व कार्यांच्या मुळाशी असतो आणि पुष्कळ साठे करू शकतो. हस्तिवनाचा उपयोग याच्या उलट असतो," असे आचार्यांचे मत आहे. १४ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. १५ द्रव्यवने अनेक व अनेक ठिकाणी लावता येतात, हस्तिवन तसे लावता येत नाही. १६ कारण, शत्रुसैन्याचा विध्वंस मुख्यतः हत्तींवर अवलंबून असतो.

१७ जलमार्गाचा उपयोग असलेला प्रदेश व खुष्कीच्या मार्गाचा उपयोग असलेला प्रदेश यांपैकी जलमार्गाचा उपयोग सतत होत नाही, (याउलट) खुष्कीचा मार्ग सतत उपयोगात असतो.

**भिन्नमनुष्या श्रेणीमनुष्या वा भूमिरिति भिन्नमनुष्या श्रेयसी । १८ । भिन्नमनुष्या भोग्या भवति, अनुपजाप्या चान्येषाम्, अनापत्सहा तु । १९ । विपरीता श्रेणीमनुष्या, कोपे महादोषा । २० ।**

**तस्यां चातुर्वर्ण्यनिवेशे सर्वभोगसहत्वादवरवर्णप्राया श्रेयसी, बाहुल्याद्ध्रुवत्वाच्च कृष्याः कर्षकवती, कृष्याश्चान्येषां चारम्भाणां प्रयोजकत्वाद् गोरक्षकवती, पण्यनिचयर्णानुग्रहाद् आढ्यवणिग्वती । २१ ।**

**भूमिगुणानामपाश्रयः श्रेयान् । २२ ।**

**दुर्गापाश्रया पुरुषापाश्रया वा भूमिरिति पुरुषापाश्रया श्रेयसी । २३ । पुरुषवद्धि राज्यम् । २४ । अपुरुषा गौर्वन्ध्येव किं दुहीत । २५ ।**

**महाक्षयव्ययनिवेशां तु भूमिमवाप्तुकामः पूर्वमेव क्रेतारं पणेत दुर्बलमराजबीजिनं निरुत्साहमपक्षमन्यायवृत्तिं व्यसनिनं दैवप्रमाणं यत्किंचनकारिणं वा । २६ ।**

१८ ज्यातील लोक भिन्न भिन्न गटांत विभक्त झाले आहेत असा प्रदेश व ज्यातील लोक एकाच श्रेणीचे सदस्य आहेत असा प्रदेश यांपैकी लोक विभक्त असलेला प्रदेश श्रेयस्कर. १९ कारण, लोक विभक्त असले की त्या प्रदेशाचा उपभोग घेणे सोपे असते आणि त्यात शत्रूकडील भेदनीतीद्वारा फितुरीला अवकाश नसतो, परंतु तसा प्रदेश आपत्काल सहन करू शकत नाही. २० श्रेणीत लोक असलेला प्रदेश याच्या उलट असतो (आपत्काल सहन करू शकतो), परंतु क्षुब्ध झाला तर मोठा धोका संभवतो.

२१ तीत (नव्या वसाहतीत) चार वर्णांचे लोक वसविण्याच्या संबंधात मुख्यतः खालच्या वर्णाच्या लोकांची वस्ती, सर्व प्रकारचे भोग निष्पन्न करीत असल्यामुळ श्रेयस्कर – शेतीच्या प्राचुर्यामुळे आणि निश्चिततेमुळे शेतकऱ्यांची वस्ती असलेला प्रदेश, शेती आणि दुसरीही कार्ये करावयास लावणारी असल्यामुळे गोपालन करणाऱ्यांची वस्ती असलेला प्रदेश, मालांचे साठे व कर्जे यांची मदत देत असल्यामुळे श्रीमंत व्यापाऱ्यांची वस्ती असलेला प्रदेश (श्रेयस्कर).

२२ भूमीच्या गुणांपैकी आसरा देण्यास समर्थ असणे हा गुण श्रेष्ठ.

२३ दुर्गाचा आसरा असलेली भूमी व मनुष्यांचा आसरा असलेली भूमी यांपैकी मनुष्यांचा आसरा असलेली भूमी श्रेयस्कर. २४ कारण, माणसे असली तरच ते राज्य. २५ मनुष्य नसलेली भूमी वांझ गाईप्रमाणे दोहन केले असता काय देईल ?

२६ परंतु जिच्यावर वसाहत करण्यास माणसांची व द्रव्याची मोठी जरूरी भासणार आहे अशी भूमी मिळविण्याची इच्छा असेल तर दुबंल, राजकुलात न जन्मलेला, उत्साहशून्य, पक्षहीन, अन्यायाने वागणारा, व्यसनी, नशिबावर

**महाक्षयव्ययनिवेशायां हि भूमौ दुर्बलो राजबीजी निविष्टः सगन्धाभिः प्रकृतिभिः सह क्षयव्ययेनावसीदति । २७ । बलवानराजबीजी क्षयव्ययभयादसगन्धाभिः प्रकृतिभिस्त्यज्यते । २८ । निरुत्साहस्तु दण्डवानपि दण्डस्याप्रणेता सदण्डः क्षयव्ययेनावभज्यते । २९ । कोशवानप्यपक्षः क्षयव्ययानुग्रहहीनत्वान्न कुतश्चित्प्राप्नोति । ३० । अन्यायवृत्तिर्निविष्टमप्युत्थापयेत् । ३१ । स कथमनिविष्टं निवेशयेत् । ३२ । तेन व्यसनी व्याख्यातः । ३३ । दैवप्रमाणो मानुषहीनो निरारम्भो विपन्नकर्मारम्भो वाऽवसीदति । ३४ । यत्किंचनकारी न किंचिदासादयति । ३५ । स चैषां पापिष्ठतमो भवति । ३६ । 'यत्किंचिदारभमाणो हि विजिगीषोः कदाचिच्छिद्रमासादयेद्' इत्याचार्याः । ३७ । यथा छिद्रं तथा विनाशमप्यासादयेदिति कौटिल्यः । ३८ । तेषामलाभे यथा पार्ष्णिग्राहोपग्रहे वक्ष्यामस्तथा भूमिमवस्थापयेत् । ३९ । इत्यभिहितसंधिः । ४० ।**

हवाला ठेवणारा किंवा मनास येईल ते करणारा अशा राजाबरोबर अगोदरच विक्रीचा करार करावा. २७ कारण, वसाहतीसाठी खूप माणसे व द्रव्य लागणाऱ्या भूमीवर दुर्बल, राजकुलात जन्मलेला राजा वसाहत करावयास गेला तर माणसे आणि द्रव्य यांच्या होणाऱ्या हानीमुळे निष्ठावंत प्रजाजनांसह नाश पावतो. २८ राजकुलात न जन्मलेल्या, बलवान राजाला, क्षय व व्यय यांच्या भीतीने, निष्ठा नसलेले प्रजाजन सोडून जातात. २९ परंतु उत्साहहीन राजा सैन्य असूनही त्याचा उपयोग करीत नसल्याकारणाने क्षय आणि व्यय यांच्यामुळे सैन्यासह मोडून पडतो. ३० ज्याला पक्ष (मनुष्यांचे पाठबळ) नाही तो कोशसंपन्न असला तरी (भूमीवर) क्षय आणि व्यय यांचा अनुग्रह करीत नसल्यामुळे त्याला काहीही मिळत नाही. ३१ अन्यायाने वागणारा झालेली वसाहतसुद्धा उठवून लावील. ३२ तो नवीन वसाहत कशी काय स्थापू शकेल ? ३३ व्यसनी राजाच्या बाबतीतही हेच खरे आहे. ३४ दैवाला प्रमाण मानणारा प्रयत्नहीन असल्याकारणाने त्याची कार्ये सुरूच होत नाहीत किंवा सुरू झाली तरी नष्ट होतात म्हणून तो नाश पावतो. ३५ मनास येईल ते करणारा काहीसुद्धा साध्य करीत नाही. ३६ आणि तो ह्या सर्वांमध्ये कनिष्ठ. ३७ "मनास येईल ते काम करणाऱ्याला कदाचित विजिगीषूचे छिद्र आढळेल," असे आचार्यांचे मत आहे. ३८ ज्याप्रमाणे छिद्र त्याप्रमाणे त्याला (स्वतःचा) विनाशही आढळून येईल असे कौटिल्याचे मत आहे. ३९ ह्यांच्यापैकी कोणी विकत घेणारा न आढळल्यास पिछाडीच्या शत्रूला भूमी देण्याविषयी (पुढे सूत्र ७.१६.१६ मध्ये) जे सांगणार आहोत तशी भूमीची व्यवस्था लावावी. ४० ह्याला अभिहित संधी (कराराचे अथवा विक्रीचे बोलणे करून केलेला तह) असे म्हणतात.

गुणवतीमादेयां वा भूमिं बलवता क्रयेण याचितः संधिमवस्थाप्य दद्यात् । ४१ । इत्यनिभृतसंधिः । ४२ । समेन वा याचितः कारणमवेक्ष्य दद्यात् 'प्रत्यादेया मे भूमिर्वश्या वा; अनया प्रतिबद्धः परो मे वश्यो भविष्यति; भूमिविक्रयाद्वा मित्र-हिरण्यलाभः कार्यसामर्थ्यकरो मे भविष्यति' इति । ४३ । तेन हीनः क्रेता व्याख्यातः । ४४ ।

एवं मित्रं हिरण्यं च सजनामजनां च गाम् ।
लभमानोऽतिसंधत्ते शास्त्रवित्सामवायिकान् ।। ४५ ।।

इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे मित्रहिरण्यभूमिकर्मसंधौ अनवसितसंधिः एकादशोऽध्यायः । आदितो नवशततमः ।

## १२

## [षोडशशततमं प्रकरणम् – मित्रहिरण्यभूमिकर्मसंधयः, तत्र कर्मसंधिः]

'त्वं चाहं च दुर्गं कारयावहे' इति कर्मसंधिः । १ ।

तयोर्यो दैवकृतमविषह्यमल्पव्ययारम्भं दुर्गं कारयति सोऽतिसंधत्ते । २ । तत्रापि स्थलनदीपर्वतदुर्गाणामुत्तरोत्तरं श्रेयः । ३ ।

४१ भूमिगुणांनी युक्त अथवा सहज घेता येण्यासारखी भूमी बलवान राजा विकत मागत असेल तर संधी प्रस्थापित करून ती द्यावी. ४२ हा अनिभृत (उघड सौदा असलेला) संधी. ४३ तुल्यबल राजाने अशी मागणी केली तर (पुढीलप्रमाणे) योग्य कारण विचारात घेऊन द्यावी, "ही जमीन मला सहज परत घेता येईल किंवा माझ्या स्वाधीन आहे; हिच्याशी बांधला गेल्यामुळे शत्रू माझ्या कह्यात राहील; किंवा ही भूमी विकल्यामुळे मला कार्य सिद्धीस नेण्याचे सामर्थ्य देणाऱ्या मित्राचा अथवा द्रव्याचा लाभ होईल." ४४ हीच विचारसरणी विकत मागणारा हीनबल असल्यासही लागू होते.

४५ राजनीतिशास्त्र जाणणारा राजा, याप्रमाणे मित्र, द्रव्य आणि मनुष्य-वस्ती असलेली व नसलेली भूमी प्राप्त करून घेऊन, एकजूट केलेल्या राजांवर मात करतो.

## बारावा अध्याय

### प्रकरण ११६ (पुढे चालू) : (४) कर्मसंधी

१ "तू आणि मी दुर्ग बांधून घेऊ या" हा कर्मसंधी.

२ त्या दोघांपैकी जो निसर्गनिर्मित, हल्ला करावयास अवघड आणि कमी खर्चात बांधून होणारा दुर्ग बांधून घेईल तो (दुसऱ्यावर) मात करतो. ३ त्यातही भुईकोट, पाणकोट व पर्वतावरील किल्ल्यांपैकी नंतरनंतरचा अधिक चांगला.

**सेतुबन्धयोरप्याहार्योदकात्सहोदकः श्रेयान् । ४। सहोदकयोरपि प्रभूतवापस्थानः श्रेयान् । ५।**

**द्रव्यवनयोरपि यो महत्सारवद्द्रव्याटवीकं विषयान्ते नदीमातृकं द्रव्यवनं छेदयति सोऽतिसंधत्ते । ६ । नदीमातृकं हि स्वाजीवमपाश्रयश्चापदि भवति । ७ ।**

**हस्तिवनयोरपि यो बहुशूरमृगं दुर्बलप्रतिवेशमनन्तावक्लेशि विषयान्ते हस्तिवनं बध्नाति सोऽतिसंधत्ते । ८ । तत्रापि 'बहुकुण्ठाल्पशूरयोः अल्पशूरं श्रेयः; शूरेषु हि युद्धम्, अल्पाः शूरा बहूनशूरान् भञ्जन्ति, ते भग्नाः स्वसैन्यावघातिनो भवन्ति' इत्याचार्याः । ९ । नेति कौटिल्यः । १० । कुण्ठा बहवः श्रेयांसः, स्कन्धविनियोगादनेकं कर्म कुर्वाणाः स्वेषामपाश्रयो युद्धे, परेषां दुर्धर्षा विभीषणाश्च । ११ । बहुषु हि कुण्ठेषु विनयकर्मणा शक्यं शौर्यमाधातुं, न त्वेवाल्पेषु शूरेषु बहुत्वमिति । १२ ।**

४ दोन पाटबंधाऱ्यांपैकीसुद्धा ज्यात पाणी दुसरीकडून आणून सोडावे लागते त्यापेक्षा अंगचेच पाणी असलेला पाटबंधारा श्रेयस्कर. ५ अंगचेच पाणी असलेल्या दोन पाटबंधाऱ्यांपैकीसुद्धा ज्यामुळे लागवडीखाली खूप मोठे क्षेत्र उपलब्ध होते तो अधिक चांगला.

६ दोन द्रव्यवनांपैकीसुद्धा ज्याला मोठे, भारी किंमतीची द्रव्ये असलेल्या जंगलांनी युक्त, देशाच्या सरहद्दीवर असलेले आणि नदीच्या पाण्यावर पोसले जाणारे द्रव्यवन तोडावयास उपलब्ध होते तो मात करतो. ७ कारण, नदीच्या पाण्यावर पोसले जाणाऱ्या वनात उपजीविका सुलभ असते व आपत्काली आश्रय घेता येतो.

८ दोन हस्तिवनांपैकीसुद्धा जो पुष्कळ आणि शूर हत्ती असलेले, शेजारी दुर्बल असलेले, (शत्रूंना) खूप तापदायक होणारे असे हस्तिवन देशाच्या सरहद्दीवर उभारतो तो मात करतो. ९ त्यांमध्येसुद्धा "पुष्कळ पण शूर नसलेले हत्ती ज्यात आहेत असे आणि थोडे पण शूर हत्ती असलेले वन यांपैकी थोडे पण शूर हत्ती असलेले वन अधिक चांगले; कारण, युद्ध शूरच करतात, थोडे शूर हत्ती शूर नसलेल्या पुष्कळ हत्तींची फळी फोडतात आणि मग ते फळी फुटलेले हत्ती आपल्याच सैन्याचा घात करतात," असे आचार्यांचे मत आहे. १० हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ११ शूर नसले तरी पुष्कळ हत्ती अधिक चांगले, सैन्यात त्यांचा उपयोग केला असता ते अनेक प्रकारची कामे पार पाडून युद्धात स्वतःच्या सैनिकांना आधारभूत आणि शत्रूच्या सैनिकांना दुर्भेद्य व भीतिप्रद होतात. १२ कारण, शूर नसलेल्या पुष्कळ हत्तींमध्ये शिकविण्याने शौर्य उत्पन्न करता येते, परंतु थोड्या शूर हत्तींची संख्या वाढविता येत नाही.

**खन्योरपि यः प्रभूतसारामवुर्गमार्गामल्पव्ययारम्भां खनिं खानयति, सोऽतिसंधत्ते । १३ । तत्रापि महासारमल्पमल्पसारं वा प्रभूतमिति 'महासारमल्पं श्रेयः, वज्रमणिमुक्ताप्रवालहेमरूप्यधातुर्हि प्रभूतमल्पसारमत्यर्घेण ग्रसते' इत्याचार्याः । १४ । नेति कौटिल्यः । १५ । चिरादल्पो महासारस्य क्रेता विद्यते, प्रभूतः सातत्यादल्पसारस्य । १६ ।**

**एतेन वणिक्पथो व्याख्यातः । १७ । तत्रापि 'वारिस्थलपथयोर्वारिपथः श्रेयान्, अल्पव्ययव्यायामः प्रभूतपण्योदयश्च' इत्याचार्याः । १८ । नेति कौटिल्यः । १९ । संरुद्धगतिरसार्वकालिकः प्रकृष्टभययोर्निनिष्प्रतीकारश्च वारिपथः, विपरीतः स्थलपथः । २० ।**

**वारिपथे तु कूलसंयानपथयोः कूलपथः पण्यपत्तनबाहुल्याच्छ्रेयान्, नदीपथो वा, सातत्याद्विषह्याबाधत्वाच्च । २१ ।**

१३ दोन खाणींपैकी पुष्कळ मौल्यवान धातूंचे उत्पादन करणारी, पोचावयास सुगम मार्ग असलेली व चालवावयास कमी खर्चाची अशी खाण जो सुरू करतो तो मात करतो. १४ त्यांमध्येसुद्धा मौल्यवान परंतु थोडे उत्पादन आणि कमी किमतीचे पण विपुल उत्पादन यांपैकी "मौल्यवान उत्पादन थोडे असले तरी अधिक चांगले, कारण हिरे, रत्ने, मोती, पोवळी, सोने व रुपे यांचे धातू त्यांच्या भारी किमतीमुळे कमी किमतीच्या विपुल उत्पादनाला मागे टाकतात," असे आचार्यांचे मत आहे. १५ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. १६ भारी किमतीच्या वस्तू विकत घेणारे थोडेच व बऱ्याच कालावधीने आढळतात, कमी किमतीच्या वस्तू नेहमी लागणाऱ्या असल्यामुळे त्या विकत घेणारे खूप जण असतात.

१७ हाच विचार व्यापारी मार्गांच्या बाबतीतही लागू होतो. १८ त्यात सुद्धा "जलमार्ग व खुष्कीचा मार्ग यांपैकी जलमार्ग श्रेयस्कर, कारण त्यात खर्च कमी पडतो आणि मेहनतही कमी लागते, शिवाय त्यात माल मोठ्या प्रमाणात उपलब्ध होतो," असे आचार्यांचे मत आहे. १९ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. २० जलमार्गात हालचाली मर्यादित असतात, सर्व ऋतूंत त्याचा वापर करता येत नाही, त्यात खूप धोके असतात आणि संकट आले असता त्याचे निवारण करणे शक्य नसते; खुष्कीचा मार्ग याच्या उलट.

२१ परंतु जलमार्गाच्या संबंधात किनाऱ्याकिनाऱ्याने जाणारा मार्ग व भर समुद्रातून जाणारा मार्ग यांपैकी किनाऱ्याने जाणारा मार्ग पुष्कळ व्यापारी बंदरे असल्यामुळे अधिक चांगला, किंवा नदीतील मार्ग, सतत चालू असल्यामुळे आणि त्यातील संकटे निवारण करता येण्यासारखी असल्यामुळे (चांगला).

स्थलपथेऽपि 'हैमवतो दक्षिणापथाच्छ्रेयान्, हस्त्यश्वगन्धदन्ताजिनरूप्यसुवर्णपण्याः सारवत्तराः' इत्याचार्याः । २२ । नेति कौटिल्यः । २३ । कम्बलाजिनाश्वपण्यवर्जाः शङ्खवज्रमणिमुक्तासुवर्णपण्याश्च प्रभूततरा दक्षिणापथे । २४ ।

दक्षिणापथेऽपि बहुखनिः सारपण्यः प्रसिद्धगतिरल्पव्ययव्यायामो वा वणिक्पथः श्रेयान्, प्रभूतविषयो वा फल्गुपण्यः । २५ ।

तेन पूर्वः पश्चिमश्च वणिक्पथो व्याख्यातः । २६ ।

तत्रापि चक्रपादपथयोश्चक्रपथो विपुलारम्भत्वाच्छ्रेयान्, देशकालसंभावनो वा खरोष्ट्रपथः । २७ । आभ्यामंसपथो व्याख्यातः । २८ ।

परकर्मोदयो नेतुः क्षयो वृद्धिर्विपर्यये ।
तुल्ये कर्मफले स्थानं ज्ञेयं स्वं विजिगीषुणा ॥ २९ ॥
अल्पागमातिव्ययता क्षयो वृद्धिर्विपर्यये ।
समायव्ययता स्थानं कर्मसु ज्ञेयमात्मनः ॥ ३० ॥

२२ खुष्कीच्या मार्गाच्या संबंधातसुद्धा "हिमालयाकडे जाणारा मार्ग दक्षिणेकडे जाणाऱ्या मार्गापेक्षा अधिक चांगला, कारण त्यावरील हत्ती, घोडे, सुगंधी द्रव्ये, हस्तिदंत, कातडी, रुपे, सोने हा माल फार मौल्यवान आहे," असे आचार्यांचे मत आहे. २३ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. २४ कांबळी, कातडी व घोडे खेरीजकरून बाकीचा वरील माल आणि शिवाय शंख, हिरे, रत्ने, मोती, सोने हा माल दक्षिणेकडील मार्गाने खूप मोठ्या प्रमाणात मिळतो.

२५ दक्षिणेकडील मार्गातसुद्धा पुष्कळ खाणी असलेला, मौल्यवान माल असलेला, बिनधोक वाहतुकीचा, कमी खर्चाचा व कमी मेहनत लागणारा असा व्यापारी मार्ग चांगला किंवा मोठ्या प्रमाणात विक्री होणाऱ्या कमी किमतीच्या मालाची वाहतूक करणारा (मार्ग चांगला).

२६ हीच विचारसरणी पूर्वेकडे जाणाऱ्या व पश्चिमेकडे जाणाऱ्या मार्गांनाही लागू होते.

२७ त्यातसुद्धा गाडीचा रस्ता व पायवाट यांपैकी गाडीचा रस्ता, खूप कामे करता येतात म्हणून, अधिक चांगला किंवा देश व काल यांच्या अनुरोधाने संभाव्य असा गाढव व उंट यांच्या वाहतुकीचा मार्ग (चांगला). २८ यांच्यासारखाच (मनुष्यांच्या) खांद्यावरून माल वाहून नेण्यासाठी मार्ग होय.

२९ शत्रूच्या कार्यांची भरभराट म्हणजे विजिगीषूचा ऱ्हास; याच्या उलट म्हणजे त्याची वृद्धी. उभयतांच्या कार्यांचे फल सारखेच असता आपली स्थिती तशीच राहिली आहे असे विजिगीषूने समजावे.

३० उत्पन्न थोडे व खर्च जास्त म्हणजे ऱ्हास; याच्या उलट वृद्धी. कार्यांमध्ये उत्पन्न व खर्च सारखेच असता आपली स्थिती तशीच राहिली आहे असे समजावे.

**तस्मादल्पव्ययारम्भं दुर्गादिषु महोदयम् ।**
**कर्म लब्ध्वा विशिष्टः स्यादित्युक्ताः कर्मसंधयः ।। ३१ ।।**

**इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे मित्रहिरण्यभूमिकर्मसंधौ कर्मसंधिर्द्वादशोऽध्यायः ।**
**आदितो दशशततमः ।**

**१३**

**[ सप्तदशशततमं प्रकरणम् – पार्ष्णिग्राहचिन्ता ]**

**संहत्यारिविजिगीष्वोरमित्रयोः पराभियोगिनोः पार्ष्णि गृह्णतोर्यः शक्तिसंपन्नस्य पार्ष्णि गृह्णाति सोऽतिसंधत्ते । १ । शक्तिसंपन्नो ह्यमित्रमुच्छिद्य पार्ष्णिग्राहमुच्छिन्द्यात्, न हीनशक्तिरलब्धलाभः । २ ।**

**शक्तिसाम्ये यो विपुलारम्भस्य पार्ष्णि गृह्णाति सोऽतिसंधत्ते । ३ । विपुलारम्भो ह्यमित्रमुच्छिद्य पार्ष्णिग्राहमुच्छिन्द्यात्, नाल्पारम्भः सक्तचक्रः । ४ ।**

**आरम्भसाम्ये यः सर्वसंदोहेन प्रयातस्य पार्ष्णि गृह्णाति सोऽतिसंधत्ते । ५ । शून्यमूलो ह्यस्य सुकरो भवति, नैकदेशबलप्रयातः कृतपार्ष्णिप्रतिविधानः । ६ ।**

३१ यास्तव दुर्ग बांधणे इत्यादी कार्यांपैकी कमी खर्चाचे व जास्त उत्पन्नाचे कार्य प्राप्त करून घेऊन विशेष लाभ मिळवावा. याप्रमाणे कार्यांविषयीच्या संधींचे वर्णन केले आहे.

## तेरावा अध्याय

### प्रकरण ११७ : पिछाडीवर हल्ला करण्यासंबंधी विचार

१ विजिगीषू आणि अरी, एकविचाराने, शत्रूंवर चाल करून जाणाऱ्या (आपापल्या) शत्रूच्या पिछाडीवर हल्ला करीत असता त्यांपैकी जो शक्तींनी संपन्न असलेल्या शत्रूच्या पिछाडीवर हल्ला करतो तो (दुसऱ्यावर) मात करतो. २ कारण, शक्तिसंपन्न शत्रू (पार्ष्णिग्रहण न केल्यास) त्याच्या शत्रूचा उच्छेद करून मग पिछाडीच्या शत्रूचा उच्छेद करील, शक्तिहीन शत्रू लाभ मिळविता न आल्याकारणाने तसे करू शकणार नाही.

३ दोघाही शत्रूंची शक्ती सारखीच असल्यास ज्याने जय्यत तयारी करून स्वारी निश्चित केली आहे अशा शत्रूच्या पिछाडीवर हल्ला करणारा मात करतो. ४ कारण, जय्यत तयारी केलेला शत्रू (त्याचे पार्ष्णिग्रहण न केल्यास) त्याच्या शत्रूचा उच्छेद करून नंतर पिछाडीच्या शत्रूचा उच्छेद करील, थोडीच तयारी करणारा शत्रू त्याचे सैन्य अडकून पडल्यामुळे तसे करू शकणार नाही.

५ दोघांची तयारी सारखीच असता आपले सर्व सैन्य बरोबर घेऊन स्वारीवर गेलेल्या शत्रूच्या पिछाडीवर जो हल्ला करतो तो मात करतो. ६ कारण,

**बलोपादानसाम्ये यश्चलामित्रं प्रयातस्य पार्ष्णि गृह्णाति सोऽतिसंधत्ते । ७ । चलामित्रं प्रयातो हि सुखेनावाप्तसिद्धिः पार्ष्णिग्राहमुच्छिन्द्यात्, न स्थितामित्रं प्रयातः । ८ । असौ हि दुर्गप्रतिहतः पार्ष्णिग्राहे च प्रतिनिवृत्तः स्थितेनामित्रेणावगृह्यते । ९ । तेन पूर्वे व्याख्याताः । १० ।**

**शत्रुसाम्ये यो धार्मिकाभियोगिनः पार्ष्णि गृह्णाति सोऽतिसंधत्ते । ११ । धार्मिकाभियोगी हि स्वेषां परेषां च द्वेष्यो भवति, अधार्मिकाभियोगी संप्रियः । १२ । तेन मूलहरतादात्विककदर्याभियोगिनां पार्ष्णिग्रहणं व्याख्यातम् । १३**

**मित्राभियोगिनोः पार्ष्णिग्रहणे त एव हेतवः । १४ ।**

**मित्रममित्रं चाभियुञ्जानयोर्यो मित्राभियोगिनः पार्ष्णि गृह्णाति सोऽतिसंधत्ते**

ज्याच्या मूळ राज्यात सैन्य नाही त्याला जिंकणे सोपे असते, जो सैन्याचा काही भागच बरोबर घेऊन व पिछाडीच्या रक्षणाची तरतूद करून गेला त्याला जिंकणे सोपे नाही.

७ दोघांनीही सारखेच सैन्य जमविले असल्यास दुर्ग नसलेल्या (चल) शत्रूवर चाल करून गेलेल्याच्या पिछाडीवर हल्ला करणारा मात करतो. ८ कारण, चल शत्रूवर चाल करून जाणारा सहज सिद्धी प्राप्त करून घेऊन पिछाडीच्या शत्रूचा उच्छेद करील, दुर्ग असलेल्या (स्थित) शत्रूवर चाल करून जाणारा तसे करू शकणार नाही. ९ कारण दुर्गामुळे अयशस्वी होऊन तो पिछाडीच्या शत्रूवर उलटला तर दुर्गातील त्याचा शत्रू त्याला पायबंद घालील. १० हीच विचारसरणी पूर्वीच्या (हीनशक्ती, अल्पारम्भ व एकदेशबलप्रयात) शत्रूंच्या बाबतीतही लागू होते.

११ उभयतांचे शत्रू सारखेच असल्यास धर्मनिष्ठ राजावर चाल करून जाणाऱ्याच्या पिछाडीवर जो हल्ला करतो तो मात करतो. १२ कारण, धर्मनिष्ठ राजावर स्वारी करणारा त्याच्या स्वतःच्या व इतरांच्या लोकांना तिरस्करणीय होतो, अधार्मिक राजावर स्वारी करणारा त्यांना प्रिय होतो. १३ हीच कसोटी मूलहर (राज्यातील धन उधळून लावणारा), तादात्विक (आलेले उत्पन्न तात्काल खर्चून टाकणारा) व कदर्य (कंजूस) राजांवर स्वारी करणाऱ्याच्या पिछाडीवरील हल्ल्याबाबत लावावी.

१४ स्वतःच्या मित्रावर चाल करून जाणाऱ्या शत्रूच्या पिछाडीवर हल्ला करण्याच्या संबंधात तीच (वरील सर्व) प्रयोजने विचारात घ्यावयाची असतात.

१५ मित्रावर चाल करून जाणारा व शत्रूवर चाल करून जाणारा या दोघांपैकी मित्रावर चाल करून जाणाऱ्याच्या पिछाडीवर जो हल्ला करतो तो

। १५ । मित्राभियोगी हि सुखेनावाप्तसिद्धिः पार्ष्णिग्राहमुच्छिन्द्यात् । १६ । सुकरो हि मित्रेण संधिर्नामित्रेण । १७ ।

मित्रममित्रं चोद्धरतोर्योऽमित्रोद्धारिणः पार्ष्णिं गृह्णाति सोऽतिसंधत्ते । १८ । वृद्धमित्रो ह्यमित्रोद्धारी पार्ष्णिग्राहमुच्छिन्द्यात्, नेतरः स्वपक्षोपघाती । १९ ।

तयोरलब्धलाभापगमने यस्यामित्रो महतो लाभाद्वियुक्तः क्षयव्ययाधिको वा स पार्ष्णिग्राहोऽतिसंधत्ते । २० । लब्धलाभापगमने यस्यामित्रो लाभेन शक्त्या हीनः स पार्ष्णिग्राहोऽतिसंधत्ते, यस्य वा यातव्यः शत्रोर्विग्रहापकारसमर्थः स्यात् । २१ ।

पार्ष्णिग्राहयोरपि यः शक्यारम्भबलोपादानाधिकः स्थितशत्रुः पार्श्वस्थायी वा सोऽतिसंधत्ते । २२ । पार्श्वस्थायी हि यातव्याभिसारो मूलाबाधकश्च भवति, मूलाबाधक एव पश्चात्स्थायी । २३ ।

मात करतो. १६ कारण, मित्रावर चालून जाणारा (त्याचे पार्ष्णिग्रहण न केल्यास) (मित्राबरोबर संधी करून) कार्य सुखाने साध्य करील व मग पार्ष्णिग्राहाचा उच्छेद करील. १७ कारण, मित्राशी संधी करणे सोपे आहे, शत्रूशी नाही.

१८ मित्राचा उच्छेद करणारा व शत्रूचा उच्छेद करणारा या दोघांपैकी शत्रूचा उच्छेद करणाऱ्याच्या पिछाडीवर जो हल्ला करतो तो मात करतो. १९ कारण, शत्रूचा उच्छेद करणाऱ्याला (त्याचे पार्ष्णिग्रहण न केल्यास) अधिक मित्राचा लाभ होऊन नंतर तो पिछाडीवरील शत्रूचा उच्छेद करील, दुसरा, स्वतःच्याच पक्षाचा नाश करणारा, तसे करू शकणार नाही.

२० दोघांचेही शत्रू लाभ न होता परतले असता ज्याच्या शत्रूला मोठ्या लाभापासून वंचित व्हावे लागले किंवा ज्याची माणसांची व द्रव्याची अधिक हानी झाली तो पिछाडीचा शत्रू मात करतो. २१ लाभ होऊन ते परतले असता ज्याच्या शत्रूला कमी लाभ झालेला असतो अथवा ज्याच्या शत्रूची शक्ती कमी झालेली असते तो पिछाडीचा शत्रू मात करतो, किंवा ज्याच्या शत्रूचा यातव्य (ज्याच्यावर त्याने स्वारी केली आहे तो) त्या शत्रूला विग्रहात अपकार करण्यास समर्थ असेल तो (पार्ष्णिग्राह मात करतो).

२२ दोन पिछाडीच्या शत्रूंपैकीसुद्धा जो शक्य असलेल्या कार्यासाठी अधिक सैन्याची जमवाजमव करू शकतो अथवा जो दुर्गात भक्कम पाय रोवून अथवा शत्रूच्या बाजूवर असतो तो पार्ष्णिग्राह मात करतो. २३ कारण, बाजूवर असलेला पार्ष्णिग्राह ज्याच्यावर स्वारी झाली आहे त्याच्या मदतीला जाऊ शकतो व शत्रूच्या राज्याची हानी करू शकतो, पिछाडीला असलेला पार्ष्णिग्राह फक्त राज्याची हानी करू शकतो.

पार्ष्णिग्राहास्त्रयो ज्ञेयाः शत्रोश्चेष्टानिरोधकाः ।
सामन्तः पृष्ठतो वर्गः प्रतिवेशौ च पार्श्वयोः ।। २४ ।।
अरेर्नेतुश्च मध्यस्थो दुर्बलोऽन्तर्धिरुच्यते ।
प्रतिघातो बलवतो दुर्गाटव्यपसारवान् ।। २५ ।।

मध्यमं त्वरिविजिगीष्वोर्लिप्समानयोर्मध्यमस्य पार्ष्णिं गृहणतोर्लब्धलाभापगमने यो मध्यमं मित्राद्वियोजयत्यमित्रं च मित्रमाप्नोति सोऽतिसंधत्ते । २६ । संधेयश्च शत्रुरुपकुर्वाणो, न मित्रं मित्रभावादुत्क्रान्तम् । २७ । तेनोदासीनलिप्सा व्याख्याता । २८ ।

'पार्ष्णिग्रहणाभियानयोस्तु मन्त्रयुद्धादभ्युच्चयः । २९ । व्यायामयुद्धे हि क्षयव्ययाभ्यामुभयोरवृद्धिः । ३० । जित्वाऽपि हि क्षीणदण्डकोशः पराजितो भवति' इत्याचार्याः । ३१ । नेति कौटिल्यः । ३२ । सुमहताऽपि क्षयव्ययेन शत्रुविनाशोऽभ्युपगन्तव्यः । ३३ ।

२४ शत्रूच्या हालचालींना प्रतिबंध करणारे तीन प्रकारचे पार्ष्णिग्राह असतात असे समजावे, एक पिछाडीला असलेला शेजारच्या राजांचा वर्ग आणि दोन बाजूंवर असलेले दोघे शेजारी.

२५ अरी आणि विजिगीषू यांच्या मध्ये असलेल्या दुर्बल राजाला अंतर्धि असे म्हणतात. दुर्ग अथवा अरण्य यात आश्रय घेणे शक्य असल्यास तो बलवान राजाला प्रतिबंध करू शकतो.

२६ परंतु मध्यम राजावर ताबा मिळविण्याच्या उद्देशाने त्याच्या पिछाडीवर हल्ला करणारे अरी व विजिगीषू यांपैकी, मध्यम राजा आपला लाभ मिळवून परतला असता, जो त्या मध्यमाला (पार्ष्णिग्रहण करणाऱ्या) त्याच्या (पूर्वीच्या) मित्रापासून फोडतो व (पूर्वी) शत्रू असलेल्या मध्यमाला (त्याचे पार्ष्णिग्रहण न केल्यामुळे) मित्र म्हणून मिळवितो तो मात करतो. २७ आणि उपकार करणारा शत्रू संधी करण्यास योग्य असतो, मैत्रीचा त्याग केलेला मित्र (संधी करण्यास योग्य) नाही. २८ उदासीन राजावर ताबा मिळविण्याच्या संबंधात हाच विचार लागू होतो.

२९ "परंतु पिछाडीवर हल्ला करणे व पुढे चाल करून जाणे ह्या दोहोंमध्ये मंत्रयुद्धाने अभ्युन्नती होते. ३० कारण, सैन्यव्यापाराने केलेल्या युद्धात मनुष्यहानी व द्रव्यहानी यांमुळे दोघांच्याही वृद्धीचा नाश होतो. ३१ कारण, जिंकल्यानंतर सुद्धा, सैन्य व कोश ह्यांचा ऱ्हास झालेला असल्यामुळे तो लढणारा (वस्तुतः) पराजितच होतो," असे आचार्यांचे मत आहे. ३२ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ३३ खूप मोठी मनुष्यहानी व द्रव्यहानी सोसावी लागली तरी शत्रूचा निःपात केलाच पाहिजे.

तुल्ये क्षयव्यये यः पुरस्ताद्दूष्यबलं घातयित्वा निःशल्यः पश्चाद्वश्यबलो युध्येत सोऽतिसंधत्ते । ३४ । द्वयोरपि पुरस्ताद्दूष्यबलघातिनोर्यो बहुलतरं शक्तिमत्तरमत्यन्तदूष्यं च घातयेत् सोऽतिसंधत्ते । ३५ । तेनामित्राटवीबलघातो व्याख्यातः । ३६ ।

पार्ष्णिग्राहोऽभियोक्ता वा यातव्यो वा यदा भवेत् ।
विजिगीषुस्तदा तत्र नेत्रमेतत्समाचरेत् ।। ३७ ।।
पार्ष्णिग्राहो भवेन्नेता शत्रोर्मित्राभियोगिनः ।
विग्राह्य पूर्वमाक्रन्दं पार्ष्णिग्राहाभिसारिणा ।। ३८ ।।
आक्रन्देनाभियुञ्जानः पार्ष्णिग्राहं निवारयेत् ।
तथाऽऽक्रन्दाभिसारेण पार्ष्णिग्राहाभिसारिणम् ।। ३९ ।।
अरिमित्रेण मित्रं च पुरस्तादवघट्टयेत् ।
मित्रमित्रमरेश्चापि मित्रमित्रेण वारयेत् ।। ४० ।।

३४ उभयतांची मनुष्यहानी व द्रव्यहानी सारखीच असल्यास जो आपल्या दूष्य (राजनिष्ठ नसलेल्या) सैन्याला प्रथम लढावयास लावून त्यांचा घात करवील आणि नंतर कंटकरहित होऊन वश असलेल्या सैन्याने लढेल तो मात करतो. ३५ हे दोघेही प्रथम आपापल्या दूष्य सैन्यांचा घात करवून घेत असल्यास जो खूप मोठ्या अथवा अधिक शक्तिमान अथवा अतिशय दूष्य सैन्याचा घात करवितो तो मात करतो. ३६ शत्रुबल व अटवीबल यांच्या घाताच्या संबंधात असेच समजावे.

३७ विजिगीषू जेव्हा पार्ष्णिग्राह होईल अथवा कोणावर हल्ला चढवील अथवा त्याच्यावर कोणी चाल करून येईल तेव्हा त्या (निरनिराळ्या) परिस्थितींत त्याने पुढीलप्रमाणे नेत्याच्या धोरणाचा अवलंब करावा.

३८ आपल्या मित्रावर स्वारी करणाऱ्या शत्रूच्या पिछाडीवर नेत्याने हल्ला करावा, पण तत्पूर्वी त्या शत्रूचा जो पार्ष्णिग्राह (स्वतः नेता) त्याच्या मदतीस जाणाऱ्याकरवी (म्हणजे नेत्याच्या पिछाडीच्या मित्राकरवी) शत्रूच्या आक्रंदाला (म्हणजे शत्रूच्या पिछाडीच्या मित्राला म्हणजेच नेत्याच्या पार्ष्णिग्राहाला) युद्धात गुंतवून ठेवावे.

३९ जेव्हा (पुढे) स्वारी करावयाची असेल तेव्हा नेत्याने आपल्या आक्रंदाकरवी (पिछाडीच्या मित्राकरवी) आपल्या पार्ष्णिग्राहाला (पिछाडीच्या शत्रूला) पायबंद घालावा, तसेच आक्रंदाच्या पिछाडीच्या मित्राकरवी पार्ष्णिग्राहाच्या पिछाडीच्या मित्राला पायबंद घालावा;

४० आणि पुढच्या बाजूला (जिकडे त्याने शत्रूवर स्वारी केली आहे तिकडे) त्याने आपल्या मित्राला अरीच्या मित्राशी लढावयास लावावे आणि आपल्या मित्रमित्रामार्फत अरीच्या मित्रमित्राला पायबंद घालावा.

मित्रेण ग्राहयेत्पार्ष्णिमभियुक्तोऽभियोगिनः ।
मित्रमित्रेण चाक्रन्दं पार्ष्णिग्राहान्निवारयेत् ।। ४१ ।।
एवं मण्डलमात्मार्थं विजिगीषुर्निवेशयेत् ।
पृष्ठतश्च पुरस्ताच्च मित्रप्रकृतिसंपदा ।। ४२ ।।
कृत्स्ने च मण्डले नित्यं दूतान् गूढांश्च वासयेत् ।
मित्रभूतः सपत्नानां हत्वा हत्वा च संवृतः ।। ४३ ।।
असंवृतस्य कार्याणि प्राप्तान्यपि विशेषतः ।
निःसंशयं विपद्यन्ते भिन्नप्लव इवोदधौ ।। ४४ ।।

इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे पार्ष्णिग्राहचिन्ता त्रयोदशोऽध्यायः । आदितः एकादशशततमः ।

१४

[ अष्टादशशततमं प्रकरणम् – हीनशक्तिपूरणम् ]

सामवायिकैरेवमभियुक्तो विजिगीषुर्यस्तेषां प्रधानस्तं ब्रूयात् 'त्वया मे संधिः, इदं हिरण्यम्, अहं च मित्रम्, द्विगुणा ते वृद्धिः, नार्हस्यात्मक्षयेण

४१ जेव्हा त्याच्यावर हल्ला होईल तेव्हा आपल्या मित्राला हल्ला करणाऱ्याच्या पिछाडीवर हल्ला करावयास लावावे आणि आपल्या मित्र-मित्रामार्फत (शत्रूच्या) पार्ष्णिग्राहापासून (म्हणजे स्वतःच्या मित्रापासून) (शत्रूच्या) आक्रंदाला (पिछाडीच्या मित्राला, म्हणजे अरिमित्राला) दूर ठेवावे.

४२ याप्रमाणे विजिगीषूने मित्र ह्या प्रकृतीच्या संपन्नतेच्या साह्याने मंडलाची पुढच्या बाजूला आणि मागच्या बाजूला योजना स्वतःच्याच हिताच्या दृष्टीने करावी.

४३ आणि सर्व राजमंडलात आपले दूत आणि गूढ पुरुष यांची स्थापना करावी; आपल्या वैऱ्यांशी मित्रभाव दाखवून गुप्तपणे त्यांच्यावर प्रहार करीत जावे.

४४ जो गुप्तपणे व्यवहार करीत नाही त्याची कार्ये विशेष प्रकारे सिद्ध झाली तरी, फुटलेली नाव समुद्रात नाश पावते त्याप्रमाणे, नाश पावतात यात शंका नाही.

## चौदावा अध्याय

### प्रकरण ११८ : क्षीण झालेल्या शक्तींचे संवर्धन

१ एकजूट करून अनेक राजांनी याप्रमाणे त्याच्यावर हल्ला केला असता विजिगीषूने त्यांच्यापैकी जो मुख्य त्याला म्हणावे, "तुझ्याशी मी तह करतो; ही खंडणी देतो व मी तुझा मित्र होतो, याप्रमाणे तुझा दुहेरी फायदा होईल; स्वतःची हानी करून घेऊन मित्राचे सोंग घेणाऱ्या ह्या तुझ्या शत्रूंची तू वृद्धी

मित्रमुखानमित्रान् वर्धयितुम्, एते हि वृद्धास्त्वामेव परिभविष्यन्ति' इति । १ । भेदं वा ब्रूयात् 'अनपकारो यथाहमेतैः संभूयाभियुक्तस्तथा त्वामप्येते संहितबलाः स्वस्थं व्यसने वाऽभियोक्ष्यन्ते, बलं हि चित्तं विकरोति, तदेषां विघातय' इति । २ । भिन्नेषु प्रधानमुपगृह्य हीनेषु विक्रमयेत्, हीनाननुग्राह्य वा प्रधाने, यथा वा श्रेयोऽभिमन्येत तथा । ३ । वैरं वा परैर्ग्राहयित्वा विसंवादयेत् । ४ ।

फलभूयस्त्वेन वा प्रधानमुपजाप्य संधिं कारयेत् । ५ । अथोभयवेतनाः फलभूयस्त्वं दर्शयन्तः सामवायिकान् 'अतिसंहिताः स्थ' इत्युद्दूषयेयुः । ६ । दुष्टेषु संधिं दूषयेत् । ७ । अथोभयवेतना भूयो भेदमेषां कुर्युः 'एवं तद् यदस्माभिर्दर्शितम्' इति । ८ । भिन्नेष्वन्यतमोपग्रहेण चेष्टेत । ९ ।

प्रधानाभावे सामवायिकानामुत्साहयितारं स्थिरकर्माणमनुरक्तप्रकृतिं लोभाद्भयाद्वा संघातमुपागतं विजिगीषोर्भीतं राज्यप्रतिसंबद्धं मित्रं चलामित्रं वा

करून द्यावीस हे योग्य नाही; कारण, ह्यांची शक्ती वाढली की ते तुझाच पाडाव करतील." २ किंवा फूट पाडण्याच्या उद्देशाने त्याला म्हणावे, "ज्याप्रमाणे मी काही अपकार केला नसता ह्या राजांनी एक होऊन माझ्यावर हल्ला केला आहे त्याप्रमाणे सैन्याची एकजूट केलेले हे राजे तू स्वस्थ (गैरसावध) अथवा संकटात असता तुझ्यावरसुद्धा हल्ला करतील. कारण, बळ आले की मन विचलित होते; ते त्यांचे बळ नष्ट करून टाक." ३ त्यांच्यात फूट पडली म्हणजे प्रधान राजास मदत करून त्याला दुर्बल राजांशी लढावयास लावावे किंवा दुर्बल राजांस मदत करून त्यांना प्रधानाशी लढावयास लावावे किंवा जसे श्रेयस्कर वाटेल तसे करावे. ४ किंवा त्याला इतरांशी वैर करावयास लावून त्यांच्यात बेबनाव घडवून आणावा.

५ किंवा प्रधान राजाला गुप्तपणे अधिक लाभ देऊ करून तह करून घ्यावा. ६ मग उभयवेतन हेरांनी एकजूट केलेल्या राजांच्या निदर्शनास प्रधानाचा अधिक लाभ आणून त्यांना म्हणावे, "तुमची फसगत झाली आहे" व याप्रमाणे त्यांचे मन दूषित करावे. ७ त्यांचे मन दूषित झाले म्हणजे त्याने (विजिगीषूने) तहाचा भंग करावा (व सामवायिकांना तहात कबूल केलेले काही देऊ नये). ८ मग उभयवेतन हेरांनी त्यांच्यात पुन्हा भेदाचे बीज पेरावे, "आम्ही जे तुम्हाला म्हणत होतो त्याचा हा पुरावा (प्रधानाला जास्त दिल्यामुळे तो तुम्हाला काही देत नाही)." ९ फूट पडली म्हणजे एका बाजूला मदत करून कार्यभाग साधावा.

१० त्यांच्यात कोणी मुख्य नसेल तर त्यांच्यापैकी एकत्रित होऊन स्वारी करावयास प्रोत्साहित करणारा, चिकाटीने कार्य पार पाडणारा, प्रजाजनांचे प्रेम असलेला, लोभामुळे अथवा भीतीमुळे त्यांना येऊन मिळालेला, विजिगीषूला

**पूर्वानुत्तराभावे साधयेत् – उत्साहयितारमात्मनिसर्गेण, स्थिरकर्माणं सान्त्वप्रणिपातेन, अनुरक्तप्रकृतिं कन्यादानयापनाभ्यां, लुब्धमंशद्वैगुण्येन, भीतमेभ्यः कोशदण्डानुग्रहेण, स्वतो भीतं विश्वास्य प्रतिभूप्रदानेन, राज्यप्रतिसंबद्धमेकीभावोपगमनेन, मित्रमुभयतः प्रियहिताभ्याम् उपकारत्यागेन वा, चलामित्रमवधृतमनपकारोपकाराभ्याम् । १० । यो वा यथाऽयोगं भजेत तं तथा साधयेत्, सामदानभेददण्डैर्वा यथाऽऽपत्सु व्याख्यास्यामः । ११ ।**

**व्यसनोपघातत्वरितो वा कोशदण्डाभ्यां देशे काले कार्ये वाऽवधृतं संधिमुपेयात् । १२ । कृतसंधिर्हीनमात्मानं प्रतिकुर्वीत । १३ । पक्षे हीनो बन्धुमित्रपक्षं कुर्वीत, दुर्गमविषह्यं वा । १४ । दुर्गमित्रप्रतिष्टब्धो हि स्वेषां परेषां च पूज्यो भवति । १५ । मन्त्रशक्तिहीनः प्राज्ञपुरुषोपचयं विद्यावृद्धसंयोगं वा कुर्वीत । १६ । तथा हि सद्यः श्रेयः प्राप्नोति । १७ । प्रभावहीनः प्रकृतियोगक्षेमसिद्धौ यतेत । १८ ।**

भीत असणारा, राज्याशी संबंध असलेला, मित्र आणि दुर्ग नसलेला शत्रू यांपैकी नंतरचा राजा नसल्यास अगोदरच्या राजास वश करून घ्यावे – प्रोत्साहित करणाऱ्याला आत्मसमर्पणाने शरण जाऊन, चिकाटीने कार्य पार पाडणाऱ्याला सामोपचाराने व पाया पडून, प्रजेचे प्रेम असलेल्याला विवाहात कन्या देऊन व घेऊन, लोभी राजाला दुप्पट हिस्सा देऊन, त्यांच्यापासून भीती वाटणाऱ्याला कोश व सैन्य यांची मदत करून, आपली स्वतःची भीती वाटणाऱ्याला विश्वास उत्पन्न करून व जामीन देऊन, राज्याशी संबंध असलेल्याला त्याच्याशी एकरूप होऊन, मित्राला उभयतांना प्रिय व हितकर असणाऱ्या गोष्टी करून अथवा (पूर्वी मिळालेल्या) मदतीचा त्याग करून आणि (दुर्ग नसलेल्या) चल शत्रूला अपकार न करणे व उपकार करणे यांनी आपलेसे करून घेऊन, ११ किंवा जो राजा ज्या उपायाने त्यांच्यातून फुटून निघेल त्या उपायाने त्याला वश करून घ्यावे अथवा आपत्तींवरील प्रकरणात (अध्याय ९.५–७ मध्ये) सांगणार आहोत त्याप्रमाणे साम, दान, भेद व दंड यांचा उपयोग करून (वश करून घ्यावे).

१२ किंवा संकटामुळे होत असलेली हानी पाहून त्याला घाई झाली असेल तर त्याने कोश व सैन्य अमुक ठिकाणी, अमुक वेळी किंवा अमुक कार्यासाठी देण्याचे कबूल करून (सामवायिकांशी) तह करावा. १३ तह केल्यानंतर ज्याची आपल्यात उणीव असेल त्यावर उपाययोजना करावी. १४ जर त्याच्या पक्षात कोणी नसतील तर बांधव व मित्र ह्यांचा आपल्या बाजूला पक्ष बनवावा किंवा अभेद्य असा किल्ला बनवावा. १५ कारण, दुर्ग किंवा मित्र ह्यांचा भक्कम आधार असलेल्या राजाचा त्याची स्वतःची व इतरांची माणसे मान राखतात. १६ मंत्रशक्तीची त्याच्याकडे वाण असल्यास त्याने बुद्धिमान माणसे संग्रही ठेवावीत किंवा विद्यावृद्ध माणसांशी संपर्क ठेवावा. १७ कारण, तसे केल्याने त्याचे तात्काल कल्याण होते. १८ प्रभावशक्तीची उणीव असल्यास

जनपदः सर्वकर्मणां योनिः, ततः प्रभावः । १९ । तस्य स्थानमात्मनश्चापदि दुर्गम् । २० । सेतुबन्धः सस्यानां योनिः । २१ । नित्यानुषक्तो हि वर्षगुणलाभः सेतुवापेषु । २२ । वणिक्पथः परातिसंधानस्य योनिः । २३ । वणिक्पथेन हि दण्डगूढपुरुषातिनयनं शस्त्रावरणयानवाहनक्रयश्च क्रियते, प्रवेशो निर्णयनं च । २४ । खनिः संग्रामोपकरणानां योनिः, द्रव्यवनं दुर्गकर्मणां यानरथयोश्च, हस्तिवनं हस्तिनाम्, गवाश्वखरोष्ट्राणां च व्रजः । २५ । तेषामलाभे बन्धुमित्रकुलेभ्यः समार्जनम् । २६ । उत्साहहीनः श्रेणीप्रवीरपुरुषाणां चोरगणाटविकम्लेच्छजातीनां परापकारिणां गूढपुरुषाणां च यथालाभमुपचयं कुर्वीत । २७ ।

परमिश्राप्रतीकारमाबलीयसं वा परेषु प्रयुञ्जीत । २८ ।

एवं पक्षेण मन्त्रेण द्रव्येण च बलेन च ।
संपन्नः प्रतिनिर्गच्छेत्परावग्रहमात्मनः ।। २९ ।।

इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे हीनशक्तिपूरणं चतुर्दशोऽध्यायः । आदितो द्वादशशततमः ।

प्रजाजनांचे योगक्षेम साधण्यासाठी प्रयत्न करावा. १९ जनपद हे सर्व कार्यांचे मूळ उद्‌गमस्थान; त्या कार्यांपासून (कोश व दंड ह्या स्वरूपाचा) प्रभाव उत्पन्न होतो. २० त्या प्रभावाचे आणि आपत्काली त्याचे स्वतःचे वास्तव्याचे ठिकाण दुर्ग होय. २१ पांटबंधारे हे धान्यांचे उद्‌गमस्थान. २२ कारण, कालव्यांनी होणाऱ्या शेतीपासून उत्तम पावसाने होणाऱ्या लाभाइतकाच लाभ सतत वर्षभर होत रहातो. २३ व्यापारी मार्ग शत्रूवर मात करण्याच्या कामी उपयोगी पडतात. २४ कारण, व्यापारी मार्गाने सैन्य व गूढ पुरुष (शत्रूच्या मुलखात) घुसविता येतात आणि शस्त्रे, चिलखते, गाड्या, घोडे यांची खरेदी आणि आयात व निर्यात करता येतात. २५ खाणी युद्धोपयोगी उपकरणांचे उत्पत्तिस्थान, द्रव्यवन दुर्गबांधणीच्या कामाचे आणि गाड्या व रथ यांचे उत्पत्तिस्थान, हस्तिवन हत्तींचे उत्पत्तिस्थान आणि व्रज (जनावरांचे कळप) गाई, घोडे, गाढवे व उंट यांचे उत्पत्तिस्थान. २६ ह्या गोष्टी साध्य होण्यासारख्या नसतील तेव्हा त्या बांधव व मित्र यांच्याकडून मिळविण्याचा प्रयत्न करावा. २७ त्याच्यात उत्साहशक्तीची उणीव असल्यास श्रेणींतील शूर पुरुष, चोरांच्या टोळ्या, रानटी टोळ्या, म्लेच्छ जातींचे लोक आणि शत्रूला अपाय करणारे गूढ पुरुष यांचा मिळतील त्याप्रमाणे संग्रह करावा.

२८ किंवा त्याने (सामवायिक) शत्रूंच्या विरुद्ध (अध्याय ९.६ मध्ये सांगणार असलेल्या) परमिश्रा आपत्तीवरील उपायांची अथवा (१२ व्या) आबलीयस अधिकरणातील उपायांची योजना करावी.

२९ याप्रमाणे पक्षाच्या, मंत्रशक्तीच्या, द्रव्याच्या आणि सैन्याच्या बाबतीत समृद्ध होऊन शत्रूंनी केलेल्या आपल्या गळचेपीचा बीमोड करण्यासाठी चाल करून जावे.

१५

[ एकोनविंशतिशततमं प्रकरणम् – बलवता विगृह्योपरोधहेतवः;
विंशतिशततमं प्रकरणम् – दण्डोपनतवृत्तम् ]

दुर्बलो राजा बलवताऽभियुक्तस्तद्विशिष्टबलमाश्रयेत यमितरो मन्त्रशक्त्या नातिसंदध्यात् । १ । तुल्यमन्त्रशक्तीनामायत्तसंपदो वृद्धसंयोगाद्वा विशेषः । २ ।

विशिष्टबलाभावे समबलैस्तुल्यबलसंघैर्वा बलवतः संभूय तिष्ठेद् यान्न मन्त्रप्रभावशक्तिभ्यामतिसंदध्यात् । ३ । तुल्यमन्त्रप्रभावशक्तीनां विपुलारम्भतो विशेषः । ४ ।

समबलाभावे हीनबलैः शुचिभिरुत्साहिभिः प्रत्यनीकभूतैर्बलवतः संभूय तिष्ठेद् यान्न मन्त्रप्रभावोत्साहशक्तिभिरतिसंदध्यात् । ५ । तुल्योत्साहशक्तीनां स्वयुद्धभूमिलाभाद्विशेषः । ६ । तुल्यभूमीनां स्वयुद्धकाललाभाद्विशेषः । ७ । तुल्यदेशकालानां युग्यशस्त्रावरणतो विशेषः । ८ ।

पंधरावा अध्याय

प्रकरण ११९ : बलवान राजाशी विग्रह करून किल्ल्याचा आश्रय घेण्याचे उद्देश ;

प्रकरण १२० : सैन्य देऊन शरण गेलेल्या राजाची वागणूक

१ बलवान राजाने स्वारी केली असता दुर्बल राजाने त्या बलवान राजाहून अधिक बलवान असलेल्या राजाचा आश्रय घ्यावा, ज्याच्यावर तो बलवान राजा आपल्या मंत्रशक्तीने मात करू शकणार नाही. २ मंत्रशक्तीच्या बाबतीत सारखेच असलेल्या राजांमध्ये त्यांच्या ताब्यातील माणसांची (मंत्री आदींची) गुणसंपन्नता किंवा त्यांचा विद्यावृद्धांशी संपर्क यामुळे वरचढपणा येतो.

३ (बलवान राजापेक्षा) अधिक बलवान राजाच्या अभावी बलवान राजाइतकेच बल असलेल्या राजांशी अथवा समान बल असलेल्या संघांशी एकजूट करून रहावे, ज्यांच्यावर तो बलवान राजा मंत्रशक्ती व प्रभावशक्ती यांच्या जोरावर मात करू शकणार नाही. ४ मंत्रशक्ती व प्रभावशक्ती समान असलेल्या राजांमध्ये पुष्कळ कार्ये करीत राहिल्यामुळे वरचढपणा येतो.

५ तुल्यबल राजांच्या अभावी शुद्ध आचरणाच्या, उत्साहयुक्त आणि बलवान राजाच्या विरोधी असलेल्या हीनबल राजांबरोबर एकजूट करून रहावे, ज्यांच्यावर तो बलवान राजा मंत्रशक्ती, प्रभावशक्ती आणि उत्साहशक्ती यांच्याद्वारा मात करू शकणार नाही. ६ उत्साहशक्ती सारखीच असलेल्या राजांमध्ये ज्याला त्याच्या युद्धप्रकाराला अनुकूल जागा उपलब्ध होते तो वरचढ होतो. ७ सारखीच अनुकूल जागा मिळालेल्यांमध्ये ज्याला त्याच्या युद्धप्रकाराला अनुकूल ऋतू उपलब्ध होतो तो वरचढ होतो. ८ भूमी व ऋतू

**सहायाभावे दुर्गमाश्रयेत यत्रामित्रः प्रभूतसैन्योऽपि भक्तयवसेन्धनोदकोपरोधं न कुर्यात् स्वयं च क्षयव्ययाभ्यां युज्येत । ९ । तुल्यदुर्गाणां निचयापसारतो विशेषः । १० । निचयापसारसंपन्नं हि मनुष्यदुर्गमिच्छेदिति कौटिल्यः । ११ ।**

**तदेभिः कारणैराश्रयेत – 'पार्ष्णिग्राहमासारं मध्यममुदासीनं वा प्रतिपादयिष्यामि; सामन्ताटविकतत्कुलीनापरुद्धानामन्यतमेनास्य राज्यं हारयिष्यामि घातयिष्यामि वा; कृत्यपक्षोपग्रहेण वाऽस्य दुर्गे राष्ट्रे स्कन्धावारे वा कोपं समुत्थापयिष्यामि; शस्त्राग्निरसप्रणिधानैरौपनिषदिकैर्वा यथेष्टमासन्नं हनिष्यामि; स्वयमधिष्ठितेन वा योगप्रणिधानेन क्षयव्ययमेनमुपनेष्यामि; क्षयव्ययप्रवासोपतप्ते वाऽस्य मित्रवर्गे सैन्ये वा क्रमेणोपजापं प्राप्स्यामि; वीवधासारप्रसारवधेन वाऽस्य स्कन्धावारावग्रहं करिष्यामि; दण्डोपनयेन वाऽस्य रन्ध्रमुत्थाप्य सर्वसंदोहेन प्रहरिष्यामि; प्रतिहतोत्साहेन वा यथेष्टं संधिमवाप्स्यामि;**

दोन्ही अनुकूल असलेल्यांमध्ये गाडीस जुंपावयाची जनावरे, शस्त्रे व चिलखते यांच्यामुळे वरचढपणा येतो.

९ मदत करणाऱ्या राजांच्या अभावी दुर्गाचा आश्रय घ्यावा, जेथे शत्रूजवळ कितीही मोठे सैन्य असले तरी तो अन्नसामुग्री, गवतचारा, लाकूडफाटा व पाणी यांचा पुरवठा तोडू शकणार नाही आणि त्याला स्वतःला मनुष्यहानी व द्रव्यहानी सोसावी लागेल. १० सारखेच अभेद्य असलेल्या दुर्गांमध्ये (धान्यादींचे) साठे आणि (संकटकाली) आसरा यांमुळे वरचढपणा येतो. ११ साठे आणि आसरा यांनी समृद्ध असलेला व (रक्षण करावयास) माणसे असलेला दुर्ग पसंत करावा असे कौटिल्याचे मत आहे.

१२ त्या दुर्गाचा पुढील कारणांसाठी आश्रय घ्यावा – "येथून मी माझ्या पिछाडीचा शत्रू, त्याचा मित्र, मध्यम राजा अथवा उदासीन राजा यांना माझ्या बाजूला वळवीन; शत्रूचा शेजारी राजा, रानटी टोळीचा प्रमुख, त्याच्या घराण्यातील गादीवर हक्क सांगणारा आणि त्याच्या मर्जीतून उतरलेला राजपुत्र यांच्यापैकी एकाला त्याचे राज्य काबीज करावयास अथवा त्याचा विध्वंस करावयास लावीन; किंवा त्याच्या संभाव्य फितुरांना माझ्या बाजूला घेऊन त्यांच्याकरवी त्याच्या दुर्गात, राष्ट्रात अथवा सैन्याच्या छावणीत बंडाचा उठाव करीन; किंवा तो जवळ आला म्हणजे मला पाहिजे त्याप्रमाणे शस्त्र, अग्नि किंवा विष यांच्या उपयोगाने अथवा गुह्य प्रयोगांच्या द्वारा त्याला ठार करीन; किंवा (मी) स्वतः उपयोगात आणलेल्या गुह्य प्रयोगाच्या द्वारा त्याची मनुष्यहानी व द्रव्यहानी घडवून आणीन; किंवा मनुष्यहानी, द्रव्यहानी व प्रवास यांनी त्रस्त झालेल्या त्याच्या मित्रवर्गात अथवा सैन्यात हळूहळू बेदिली उत्पन्न करीन; किंवा त्याचा पुरवठा, सैन्याची कुमक आणि अन्नपाणी वगैरे

**मयि प्रतिबद्धस्य वा सर्वतः कोपाः समुत्थास्यन्ति; निरासारं वाऽस्य मूलं मित्राटवीदण्डैरुद्घातयिष्यामि; महतो वा देशस्य योगक्षेममिहस्थः पालयिष्यामि; स्वविक्षिप्तं मित्रविक्षिप्तं वा मे सैन्यमिहस्थस्यैकस्थमविषह्यं भविष्यति; निम्नखातरात्रियुद्धविशारदं वा मे सैन्यं पथ्याबाधमुक्तमासन्ने कर्म करिष्यति; विरुद्धदेशकालमिहागतो वा स्वयमेव क्षयव्ययाभ्यां न भविष्यति; महाक्षयव्ययाभिगम्योऽयं देशो दुर्गाटव्यपसारबाहुल्यात्, परेषां व्याधिप्रायः सैन्यव्यायामानामलब्धभौमश्च, तमापद्गतः प्रवेक्ष्यति, प्रविष्टो वा न निर्गमिष्यति' इति । १२ ।**

**'कारणाभावे बलसमुच्छ्रये वा परस्य दुर्गमुन्मुच्यापगच्छेत् । १३ । अग्निपतङ्गवदमित्रे वा प्रविशेत् । १४ । अन्यतरसिद्धिर्हि त्यक्तात्मनो भवति' इत्याचार्याः । १५ । नेति कौटिल्यः । १६ । संधेयतामात्मनः परस्य चोपलभ्य**

शोधणाऱ्या तुकड्या यांचा नाश करून त्याच्या छावणीतील सैन्याचा कोंडमारा करीन; किंवा थोडे सैन्य देऊन त्याच्यात छिद्र उत्पन्न केल्यावर माझ्या सर्व सैन्यानिशी त्याच्यावर प्रहार करीन; किंवा त्याचा उत्साहभंग झाला म्हणजे त्याच्याशी मला पाहिजे तसा तह करून घेईन; किंवा माझ्यावरील युद्धात तो गुंतला असता सर्वत्र त्याच्याविरुद्ध बंडाळी माजेल; किंवा त्याच्या राज्याला कुमक येणे शक्य नसता मी ते राज्य मित्राच्या सैन्यामार्फत अथवा रानटी सैन्यामार्फत उध्वस्त करून टाकीन; किंवा मी येथे (दुर्गात) राहून माझ्या मोठ्या प्रदेशाच्या योगक्षेमाची काळजी वाहू शकेन; किंवा माझे स्वतःचे पांगलेले सैन्य अथवा मित्राचे पांगलेले सैन्य मी येथे असल्यामुळे एके ठिकाणी गोळा होऊन अजिक्य होईल; किंवा पाण्यात अथवा खंदकातून अथवा रात्रीच्या वेळी लढण्यात पटाईत असलेले माझे सैन्य प्रवासातील धोक्यांपासून मुक्त होऊन शत्रू जवळ आला की आपला पराक्रम दाखवील; किंवा येथे प्रतिकूल प्रदेशात अथवा प्रतिकूल ऋतूत आला असता मनुष्यहानी व द्रव्यहानी यामुळे तो स्वतःच खचून जाईल; हा प्रदेश मोठी मनुष्यहानी व द्रव्यहानी सोसूनच आक्रमण करता येण्यासारखा आहे, कारण त्यात दुर्ग व अरण्ये यांसारखी आसऱ्याची ठिकाणे पुष्कळ आहेत, शत्रूंना यात रोगराई होईल आणि सैन्याच्या हालचालींना योग्य भूमी आढळणार नाही, या प्रदेशात तो आपत्कालीच प्रवेश करील किंवा एकदा प्रवेश केल्यावर बाहेर पडू शकणार नाही."

१३ "यांपैकी कोणतेही कारण नसल्यास किंवा शत्रूचे सैन्य खूप मोठे असल्यास दुर्गाचा त्याग करून निघून जावे. १४ किंवा अग्नीवर पतंग झडप घालतो त्याप्रमाणे शत्रूवर तुटून पडावे. १५ कारण, जीविताची आशा ज्याने सोडली आहे त्याला (जय व स्वर्ग यांपैकी) कोणत्या तरी एकाची प्राप्ती

**संदधीत । १७ । विपर्यये विक्रमेण संधिमपसारं वा लिप्सेत । १८ । संधेयस्य वा दूतं प्रेषयेत् । १९ । तेन वा प्रेषितमर्थमानाभ्यां सत्कृत्य ब्रूयात् 'इदं राज्ञः पण्यागारम्, इदं देवीकुमाराणाम् देवीकुमारवचनात्, इदं राज्यमहं च त्वदर्पणः' इति । २० ।**

**लब्धसंश्रयः समयाचारिकवद्भर्तरि वर्तेत । २१ । दुर्गादीनि च कर्माणि आवाहविवाहपुत्राभिषेकाश्वपण्यहस्तिग्रहणसत्त्रयात्राविहारगमनानि चानुज्ञातः कुर्वीत । २२ । स्वभूम्यवस्थितप्रकृतिसंधिमुपघातमपसृतेषु वा सर्वमनुज्ञातः कुर्वीत । २३ ।**

**दुष्टपौरजानपदो वा न्यायवृत्तिरन्यां भूमिं याचेत । २४ । दूष्यवदुपांशुदण्डेन वा प्रतिकुर्वीत । २५ । उचितां वा मित्राद्भूमिं दीयमानां न प्रतिगृह्णीयात् । २६ ।**

**मन्त्रिपुरोहितसेनापतियुवराजानामन्यतममदृश्यमाने भर्तरि पश्येत्, यथाशक्ति चोपकुर्यात् । २७ ।**

होतेच," असे आचार्यांचे मत आहे. १६ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. १७ आपण व शत्रू यांत तह होण्यासारखा आहे असे आढळून आल्यास तह करावा. १८ तसे नसल्यास युद्ध करून तहाचे बोलणे करावे किंवा आसरा शोधावा. १९ ज्याच्याशी संधी होण्यासारखा आहे त्याच्याकडे दूत पाठवावा. २० किंवा त्याने दूत पाठविला असल्यास त्याचा द्रव्य व मानसन्मान यांनी सत्कार करून म्हणावे, " ह्या वस्तू राजाला भेटीदाखल, ह्या माझी राणी व पुत्र यांच्याकडून त्याची राणी व पुत्र यांना भेटीदाखल, हे माझे राज्य व मी स्वतः तुला अर्पण करतो."

२१ (बलवान राजाचा) आश्रय मिळाल्यावर धन्याशी (अध्याय ५.५ मध्ये सांगितल्याप्रमाणे) राजदरबारी पाळावयाच्या आचारांचे पालन करावे. २२ आणि दुर्ग बांधणे इत्यादी कार्ये व विवाहात कन्या देणे व घेणे, पुत्राला (युवराज म्हणून) अभिषेक करणे, घोडे विकत घेणे, हत्ती पकडणे, दीर्घ यज्ञसत्र करणे, जत्रा भरविणे अथवा विहार करण्यास जाणे ह्या गोष्टी परवानगी घेऊन कराव्यात. २३ आपल्या राज्यात राहिलेल्या (अमात्यादी) प्रकृतींशी काही करार करणे अथवा सोडून गेलेल्यांना शासन करणे हे सर्व परवानगी घेऊन करावे.

२४ किंवा त्याचे शहरांतील व बाहेरच्या प्रदेशातील प्रजाजन त्याचा द्रोह करीत असतील तर दुसरी भूमी मागावी व तेथे न्यायाने वागावे. २५ किंवा त्यांचा राजद्रोह्यांप्रमाणे गुप्तपणे निकाल लावावा. २६ भूमी योग्य (चांगली) असली तरी आपल्या मित्राकडून काढून आपल्याला देण्यात येणाऱ्या भूमीचा स्वीकार करू नये.

२७ धन्याची भेट होत नसल्यास त्याचा मंत्री, पुरोहित, सेनापती व युवराज यांच्यापैकी कोणाची तरी भेट घ्यावी आणि शक्त्यनुसार त्याला नजराणा द्यावा.

दैवतस्वस्तिवाचनेषु तत्परा आशिषो वाचयेत् । २८ । सर्वत्रात्मनिसर्गं गुणं ब्रूयात् । २९ ।

संयुक्तबलवत्सेवी विरुद्धः शङ्कितादिभिः ।
वर्तेत दण्डोपनतो भर्तर्येवमवस्थितः ॥ ३० ॥

इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे बलवता विगृह्योपरोधहेतवः दण्डोपनतवृत्तं च पञ्चदशोऽध्यायः । आदितस्त्रयोदशशततमः ।

१६

[ एकविंशतिशततमं प्रकरणम् – दण्डोपनायिवृत्तम् ]

अनुज्ञातसंधिपणोद्वेगकरं बलवान् विजिगीषमाणो यतः स्वभूमिः स्वर्तुवृत्तिश्च स्वसैन्यानाम्, अदुर्गापसारः शत्रुरपार्ष्णिरनासारश्च, ततो यायात् । १ । विपर्यये कृतप्रतीकारो यायात् । २ ।

सामदानाभ्यां दुर्बलानुपनमयेत्, भेददण्डाभ्यां बलवतः । ३ । नियोगविकल्पसमुच्चयैश्चोपायानामनन्तरैकान्तराः प्रकृतीः साधयेत् । ४ ।

२८ देवतांच्या पूजेच्या व स्वस्तिवाचनाच्या प्रसंगी अधिपतीच्याच कल्याणासाठी प्रार्थना करवाव्यात. २९ आणि सर्वदा आपण शरण आलो ही चांगली गोष्ट असे म्हणावे.

३० बलाने (जिंकलेल्या व) शरण आलेल्या राजाने याप्रमाणे स्वामीशी, त्याच्याशी एकनिष्ठ असणाऱ्या बलवान अधिकाऱ्यांची मर्जी राखून आणि निष्ठेविषयी संशय असलेले वगैरे यांना विरोध दर्शवून, सातत्याने वागावे.

## सोळावा अध्याय

### प्रकरण १२१ : बलाने शरण यावयास लावणाऱ्या राजाची वागणूक

१ संमती दिलेल्या तहाच्या अटी मोडणाऱ्या राजाला जिंकण्याच्या उद्देशाने बलवान राजाने, जिकडे आपल्या सैन्याला अनुकूल भूमी, अनुकूल ऋतू आणि अन्नपुरवठा उपलब्ध असेल आणि जेथे शत्रूला दुर्गाचा आसरा नसेल आणि जेथे त्याला मजबूत पिछाडी नसेल व कोणाकडून कुमक येण्याची शक्यता नसेल तिकडे कूच करावे. २ याच्या उलट स्थिती असल्यास योग्य उपाययोजना करून मग निघावे.

३ जे दुर्बल असतील त्यांना साम व दान या उपायांनी शरण यावयास लावावे, बलवान असतील त्यांना भेद व दंड या उपायांनी. ४ आणि ह्या उपायांच्या निश्चितपणे एकाच्याच अथवा वैकल्पिक रीतीने अथवा सर्व मिळून केलेल्या उपयोगाच्या द्वारा राजमंडलातील शेजारचे व त्यांच्या पलीकडचे राजे यांना वश करावे.

**ग्रामारण्योपजीविव्रजवणिक्पथानुपालनमुज्झितापसृतापकारिणां चार्पणमिति सान्त्वमाचरेत् । ५ । भूमिद्रव्यकन्यादानमभयस्य चेति दानमाचरेत् । ६ । सामन्ताटविकतत्कुलीनापरुद्धानामन्यतमोपग्रहेण कोशदण्डभूमिदाययाचनमिति भेदमाचरेत् । ७ । प्रकाशकूटतूष्णींयुद्धदुर्गलम्भोपायैरमित्रप्रग्रहणमिति दण्डमाचरेत् । ८ ।**

**एवमुत्साहवतो दण्डोपकारिणः स्थापयेत्, स्वप्रभाववतः कोशोपकारिणः, प्रज्ञावतो भूम्युपकारिणः । ९ ।**

**तेषां पण्यपत्तनग्रामखनिसंजातेन रत्नसारफल्गुकुप्येन द्रव्यहस्तिवनव्रजसमुत्थेन यानवाहनेन वा यद्बहुश उपकरोति तच्चित्रभोगम् । १० । यद्दण्डेन कोशेन वा महदुपकरोति तन्महाभोगम् । ११ । यद्दण्डकोशभूमीभिरुपकरोति तत्सर्वभोगम् । १२ ।**

५ त्याच्या गावांत व अरण्यांत राहणाऱ्यांच्या उपजीविकेसाठी जनावरांचे कळप व व्यापारी मार्ग सुरक्षित ठेवणे आणि त्याचे काढून टाकलेले, सोडून गेलेले आणि अपकार केलेले लोक ह्यांना त्याच्या स्वाधीन करून देणे – याप्रमाणे सान्त्व अथवा साम याचा उपयोग करावा. ६ भूमी, द्रव्य आणि कन्या देणे, तसेच अभय देणे – याप्रमाणे दानाचा उपयोग करावा. ७ त्याच्या शेजारचा राजा, रानटी टोळीचा मुख्य, राजकुलातील गादीवर हक्क सांगणारा आणि मर्जीतून उतरलेला राजपुत्र यांच्यापैकी कोणत्याही एकाची बाजू घेऊन कोश, सैन्य, भूमी किंवा वारसाहक्काने आलेली संपत्ती यांची मागणी करणे – याप्रमाणे भेदाचा उपयोग करावा. ८ उघड युद्ध, डावपेचाचे युद्ध अथवा गुप्त युद्ध, यांनी किंवा (तेराव्या अधिकरणातील) दुर्ग हस्तगत करण्याच्या उपायांनी शत्रूला स्वाधीन करून घेणे – याप्रमाणे दंडाचा उपयोग करावा.

९ याप्रमाणे (जिंकलेल्या राजांपैकी) जे उत्साहशक्तीने संपन्न असतील त्यांचा आपल्या सैन्याच्या अभिवृद्धीसाठी उपयोग करून घ्यावा, जे प्रभावशक्तीने संपन्न असतील त्यांचा कोशाच्या अभिवृद्धीसाठी आणि जे प्रज्ञावान (मंत्रशक्तिसंपन्न) असतील त्यांचा भूमीच्या अभिवृद्धीसाठी उपयोग करून घ्यावा.

१० त्यांच्यापैकी जो बंदरे, गावे आणि खाणी यांत निष्पन्न होणारी रत्ने, भारी व हलक्या किमतीचे पदार्थ व जंगलातील उत्पन्न यांचे अथवा द्रव्यवन, हस्तिवन आणि जनावरांचे कळप यांपासून मिळणारे यान व वाहन यांचे पुष्कळ प्रकारे सहाय्य देतो तो चित्रभोग (मित्र). ११ जो कोश अथवा सैन्य यांचे मोठ्या प्रमाणात सहाय्य देतो तो महाभोग (मित्र). १२ जो सैन्य, कोश व भूमी ह्या तिहींचे सहाय्य देतो तो सर्वभोग (मित्र).

यदमित्रमेकतः प्रतिकरोति तदेकतोभोगि । १३ । यदमित्रमासारं चोभयतः प्रतिकरोति तदुभयतोभोगि । १४ । यदमित्रासारप्रतिवेशाटविकान् सर्वतः प्रतिकरोति तत्सर्वतोभोगि । १५ ।

पार्ष्णिग्राहश्चाटविकः शत्रुमुख्यः शत्रुर्वा भूमिदानसाध्यः कश्चिदासाद्येत, निर्गुणया भूम्यैनमुपग्राहयेत्, अप्रतिसंबद्धया दुर्गस्थम्, निरुपजीव्ययाऽऽटविकम्, प्रत्यादेयया तत्कुलीनं शत्रोः, अपच्छिन्नया शत्रोरपरुद्धम्, नित्यामित्रया श्रेणीबलम्, बलवत्सामन्तया संहतबलम्, उभाभ्यां युद्धे प्रतिलोमम्, अलब्धव्यायामयोत्साहिनम्, शून्ययाऽरिपक्षीयम्, कर्शितयाऽपवाहितम्, महाक्षयव्ययनिवेशया गतप्रत्यागतम्, अनपाश्रयया प्रत्यपसृतम्, परेणाऽनधिवास्यया स्वयमेव भर्तारमुपग्राहयेत् । १६ ।

तेषां महोपकारं निर्विकारं चानुवर्तयेत् । १७ । प्रतिलोममुपांशुना साधयेत । १८ । उपकारिणमुपकारशक्त्या तोषयेत् । १९ । प्रयासतश्चार्थमानौ

१३ जो शत्रूचे एका बाजूलाच निवारण करतो तो एकतोभोगी (मित्र). १४ जो शत्रू व त्याचा मित्र यांचे दोन बाजूनी निवारण करतो तो उभयतोभोगी (मित्र). १५ जो शत्रू, त्याचा मित्र, शेजारचा राजा व रानटी टोळीचा मुख्य यांचे सर्व बाजूंनी निवारण करतो ती सर्वतोभोगी (मित्र).

१६ आणि जर कोणी पिछाडीवर हल्ला करणारा – रानटी टोळीचा मुख्य, शत्रूचा मोठा अधिकारी अथवा शत्रू स्वतः – भूमी देऊन वश करून घेता येण्यासारखा आढळेल तर भूमिगुणांनी रहित अशी भूमी देऊन त्याला वश करावे, तो दुर्गात असेल तर त्याला लागून नसलेली अशी भूमी देऊन, रानटी टोळीच्या मुख्याला जिच्यावर उपजीविका करता येणार नाही अशी भूमी देऊन, शत्रूच्या कुलातील गादीवर हक्क सांगणाऱ्याला (स्वतःला) परत घेण्यास सुलभ असलेली भूमी देऊन, शत्रूच्या मर्जीतून उतरलेल्या पुत्राला (शत्रूपासून) बळकावलेली भूमी देऊन, श्रेणीबल असलेल्याला कायमचे शत्रू असलेली भूमी देऊन, एकजूट झालेले सैन्य असलेल्याला शेजारी बलवान राजे असलेली भूमी देऊन, युद्धात प्रतिकार करणाऱ्याला ह्या दोन्ही प्रकारची भूमी देऊन, उत्साहयुक्त असलेल्याला सैन्याच्या हालचालींना अवकाश नाही अशी भूमी देऊन, शत्रुपक्षाच्या माणसाला वस्ती नसलेली भूमी देऊन, शत्रूकडून फूस लावून आणलेल्याला क्षीण झालेली भूमी देऊन, शत्रूकडे जाऊन पुन्हा परत आलेल्याला वसाहत करण्यास खूप माणसे व द्रव्य खर्ची पडतील अशी भूमी देऊन, शत्रुपक्ष सोडून आपल्याकडे आलेल्याला आसऱ्याचे ठिकाण नसलेली भूमी देऊन (आणि) दुसरा कोणी तेथे रहाणे शक्य नसलेली भूमी स्वतः तिच्या धन्यासच देऊन त्याला वश करावे.

१७ त्यांच्यापैकी जो खूप मोठा उपकारकर्ता असेल आणि ज्याची निष्ठा अढळ असेल त्याला पूर्ववत राहू द्यावे. १८ जो विरोध करीत असेल त्याचा

**कुर्याद्, व्यसनेषु चानुग्रहम् । २० । स्वयमागतानां यथेष्टदर्शनं प्रतिविधानं च कुर्यात् । २१ । परिभवोपघातकुत्सातिवादांश्चैषु न प्रयुञ्जीत । २२ । दत्त्वा चाभयं पितेवानुगृह्णीयात् । २३ ।**

**यश्चास्यापकुर्यात् तद्दोषमभिविख्याप्य प्रकाशमेनं घातयेत् । २४ । परोद्वेगकारणाद्वा दाण्डकर्मिकवच्चेष्टेत । २५ । न च हतस्य भूमिद्रव्यपुत्रदारानभिमन्येत । २६ । कुल्यानप्यस्य स्वेषु पात्रेषु स्थापयेत् । २७ । कर्मणि मृतस्य पुत्रं राज्ये स्थापयेत् । २८ ।**

**एवमस्य दण्डोपनताः पुत्रपौत्राननुवर्तन्ते । २९ ।**

**यस्तूपनतान् हत्वा बद्ध्वा वा भूमिद्रव्यपुत्रदारानभिमन्येत तस्योद्विग्नं मण्डलमभावायोत्तिष्ठते । ३० । ये चास्यामात्याः स्वभूमिष्वायत्तास्ते चास्योद्विग्ना मण्डलमाश्रयन्ते । ३१ । स्वयं वा राज्यं प्राणान् वाऽस्याभिमन्यन्ते । ३२ ।**

गुप्तपणे निकाल लावावा. १९ उपकारकर्त्याला शक्त्यनुसार प्रत्युपकार करून संतुष्ट ठेवावे. २० आणि त्याच्या मेहनतीच्या अनुरोधाने त्याला अर्थसहाय्य देऊन मानसन्मान करावा आणि संकटकाली त्याला मदत करावी. २१ त्यांच्यापैकी जे आपण होऊन भेटीसाठी येतील त्यांना त्यांच्या इच्छेप्रमाणे भेट घेऊ देऊन त्यांचे स्वागत करावे. २२ आणि त्यांच्यासंबंधात अपमानाचे, झोंबणारे, निंदेचे किंवा दोष देणारे शब्द वापरू नयेत. २३ आणि त्यांना अभय देऊन पित्याप्रमाणे त्यांचा सांभाळ करावा.

२४ आणि ज्याने त्याच्यावर काही अपकार केला असेल त्याचा तो अपराध जाहीर करून त्याचा उघडपणे वध करावा. २५ किंवा इतरांना धसका बसू नये या कारणास्तव (अध्याय ५.१ मधील) दांडकर्मिक प्रकरणात सांगितलेल्या गुप्त प्रकारांचा अवलंब करावा. २६ आणि ठार केलेल्या राजाची भूमी, द्रव्य पुत्र अथवा भार्या यांचा अभिलाष करू नये. २७ आणि त्याच्या कुलातील माणसांनासुद्धा त्यांच्या योग्यतेनुसार स्थान द्यावे. २८ त्याचे कार्य करीत असता मृत्यू आलेल्या राजाच्या पुत्राला त्याच्या गादीवर बसवावे.

२९ याप्रमाणे तो वागल्यास बळाने शरण आलेले राजे त्याच्या पुत्रपौत्रांशीसुद्धा एकनिष्ठ रहातील.

३० परंतु जो शरण आलेल्यांना ठार मारून अथवा बंधनात ठेवून त्यांची भूमी, धन, पुत्र किंवा भार्या यांची अभिलाषा करील त्याचा निःपात करण्यासाठी राजमंडल संतप्त होऊन उठते. ३१ आणि जे अमात्य त्यांच्या स्वतःच्या राज्यात असून त्याच्या (सार्वभौम राजाच्या) आज्ञेत असतात ते त्याच्या भीतीने मंडलाच्या आश्रयास जातात. ३२ किंवा ते खुद्द त्याचे राज्य अथवा प्राण, घेण्याचा विचार करतात.

स्वभूमिषु च राजानस्तस्मात्साम्नाऽनुपालिताः ।
भवन्त्यनुगुणा राज्ञः पुत्रपौत्रानुवर्तिनः ।। ३३ ।।

इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे दण्डोपनायिवृत्तं षोडशोऽध्यायः । आदितः चतुर्दशशततमः ।

१७

[ द्वाविंशतिशततम प्रकरणम् – संधिकर्म;
त्रयोविंशतिशततमं प्रकरणम् – समाधिमोक्षः ]

शमः संधिः समाधिरित्येकोऽर्थः । १ । राज्ञां विश्वासोपगमः शमः संधिः समाधिरिति । २ ।

'सत्यं शपथो वा चलः संधिः, प्रतिभूः प्रतिग्रहो वा स्थावरः' इत्याचार्याः । ३ । नेति कौटिल्यः । ४ । सत्यं शपथो वा परत्रेह च स्थावरः संधिः, इहार्थ एव प्रतिभूः प्रतिग्रहो वा बलापेक्षः । ५ ।

'संहिताः स्मः' इति सत्यसंधाः पूर्वे राजानः सत्येन संदधिरे । ६ । तस्याति-क्रमे शपथेन अग्न्युदकसीताप्राकारलोष्टहस्तिस्कन्धाश्वपृष्ठरथोपस्थशस्त्ररत्न-

३३ म्हणून त्यांच्या त्यांच्या देशातच सामोपचाराने सांभाळ केलेले राजे अधिराजाशी एकनिष्ठ होऊन त्याच्या पुत्रपौत्रांशीही तसेच रहातात.

## सतरावा अध्याय

## प्रकरण १२२ : संधी करण्याचे कार्य;
## प्रकरण १२३ : ओलीस ठेवलेल्याची सुटका

१ शांतता, तह आणि ओलीस ठेवणे ह्या गोष्टी एकच होत. २ राजां-मध्ये परस्पर विश्वास उत्पन्न करणे हे शांतता, तह व ओलीस ठेवणे यांचे प्रयोजन आहे.

३ "वचन देणे अथवा शपथ घेणे हा चल (स्थिर नसणारा) संधी, जामीन किंवा ओलीस घेणे हा स्थिर संधी," असे आचार्यांचे मत आहे. ४ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ५ वचन देऊन किंवा शपथ घेऊन केलेला संधी इहलोकी व परलोकी स्थिर असतो, जामीन किंवा ओलीस देऊन केलेला, उभयतांच्या बळाच्या अनुरोधाने असल्यामुळे, फक्त इहलोकीच उपयुक्त होतो.

६ "आपल्यात संधी आहे" असे म्हणून पूर्वीचे सत्यवचनी राजे वचन देऊन संधी करीत. ७ त्याचा भंग होईल अशी भीती वाटल्यास ते शपथपूर्वक अग्नी, पाणी, नांगरलेली जमीन, तटावरील ढेकूळ, हत्तीचे गंडस्थळ, घोड्याची पाठ, रथातील आसन, शस्त्र, रत्न, बी, गंध, रस, सोने अथवा धन यांना स्पर्श

बीजगन्धरससुवर्णहिरण्यान्यालेभिरे 'हन्युरेतानि त्यजेयुश्चैनं यः शपथमतिक्रामेत्' इति । ७ ।

शपथातिक्रमे महतां तपस्विनां मुख्यानां वा प्रातिभाव्यबन्धः प्रतिभूः । ८ । तस्मिन् यः परावग्रहसमर्थान् प्रतिभुवो गृह्णाति, सोऽतिसंधत्ते । ९ । विपरीतोऽतिसंधीयते । १० ।

बन्धुमुख्यप्रग्रहः प्रतिग्रहः । ११ । तस्मिन् यो दूष्यामात्यं दूष्यापत्यं वा ददाति, सोऽतिसंधत्ते । १२ । विपरीतोऽतिसंधीयते । १३ । प्रतिग्रहग्रहणविश्वस्तस्य हि परश्छिद्रेषु निरपेक्षः प्रहरति । १४ ।

अपत्यसमाधौ तु कन्यापुत्रद्राने ददत्तु कन्यामतिसंधत्ते । १५ । कन्या ह्यदायादा परेषामेवार्थायाक्लेश्या च । १६ । विपरीतः पुत्रः । १७ ।

पुत्रयोरपि यो जात्यं प्राज्ञं शूरं कृतास्त्रमेकपुत्रं वा ददाति सोऽतिसंधीयते । १८ । विपरीतोऽतिसंधत्ते । १९ । जात्यादजात्यो हि लुप्तदायादसंतानत्वादाधातुं श्रेयान्,

करीत व म्हणत, " जो ही शपथ मोडील त्याला हे पदार्थ मारून टाकोत आणि त्याचा त्याग करून निघून जावोत.'

८ शपथ मोडण्याची भीती असता मोठे लोक, तपस्वी अथवा मुख्य पुरुष यांच्या जामीनकीचे केलेले बंधन म्हणजे प्रतिभू अथवा जामीन. ९ त्या संबंधात जो शत्रूचे नियमन करण्यास समर्थ असे जामीन घेतो तो मात करतो. १० याच्या उलट असे जामीन न मिळालेल्यावर मात होते.

११ (राजाचा) नातेवाईक अथवा मुख्य अधिकारी ठेवून घेणे म्हणजे ओलीस घेणे. १२ त्या संबंधात जो द्रोह करणारा अमात्य अथवा द्रोह करणारे अपत्य ओलीस देतो तो मात करतो. १३ याच्या उलट देणाऱ्यावर मात होते. १४ कारण, ओलीस घेतल्यामुळे निर्धास्त झालेल्यावर शत्रू छिद्र सापडताच (ओलीसाला काय होईल याची) पर्वा न करता प्रहार करतो.

१५ परंतु अपत्य ओलीस द्यावयाचे असता कन्या व पुत्र यांच्यापैकी जो आपली कन्या ओलीस देतो तो मात करतो. १६ कारण, कन्या ही गादीची वारस नसते, ती (केव्हातरी) परक्यांच्याकडेच जाणार असते आणि तिला क्लेश दिले जात नाहीत. १७ पुत्र याच्या उलट असतो.

१८ दोन पुत्रांपैकीसुद्धा जो औरस, बुद्धिमान, शूर, शस्त्रास्त्रकुशल व एकुलता एक असलेला पुत्र ओलीस देतो त्याच्यावर मात होते. १९ याच्या उलट असलेला पुत्र देणारा मात करतो. २० कारण, औरस पुत्रापेक्षा अनौरस पुत्र ओलीस ठेवणे, त्याच्यात वारसाहक्काच्या सातत्याचा लोप झालेला असल्या-मुळे, अधिक चांगले; बुद्धिमान मुलापेक्षा निर्बुद्ध मुलगा देणे, त्याच्यात मंत्रशक्तीचा अभाव असल्यामुळे, अधिक चांगले; शूर मुलापेक्षा भेकड मुलगा देणे, त्याच्यात

प्राज्ञादप्राज्ञो मन्त्रशक्तिलोपात्, शूरादशूर उत्साहशक्तिलोपात्, कृतास्त्रादकृतास्त्रः प्रहर्तव्यसंपल्लोपात्, एकपुत्रादनेकपुत्रो निरपेक्षत्वात् । २० ।

जात्यप्राज्ञयोर्जात्यमप्राज्ञमैश्वर्यप्रकृतिरनुवर्तते, प्राज्ञमजात्यं मन्त्राधिकारः । २१ । मन्त्राधिकारेऽपि वृद्धसंयोगाज्जात्यः प्राज्ञमतिसंधत्ते । २२ ।

प्राज्ञशूरयोः प्राज्ञमशूरं मतिकर्मणां योगोऽनुवर्तते, शूरमप्राज्ञं विक्रमाधिकारः । २३ । विक्रमाधिकारेऽपि हस्तिनमिव लुब्धकः प्राज्ञः शूरमतिसंधत्ते । २४ ।

शूरकृतास्त्रयोः शूरमकृतास्त्रं विक्रमव्यवसायोऽनुवर्तते, कृतास्त्रमशूरं लक्ष्यलम्भाधिकारः । २५ । लक्ष्यलम्भाधिकारेऽपि स्थैर्यप्रतिपत्त्यसंमोषैः शूरः कृतास्त्रमतिसंधत्ते । २६ ।

बह्वेकपुत्रयोर्बहुपुत्र एकं दत्त्वा शेषप्रतिष्टब्धः संधिमतिक्रामति, नेतरः । २७ । पुत्रसर्वस्वदाने संधिश्चेत्पुत्रफलतो विशेषः । २८ । समफलयोः शक्तप्रजननतो

उत्साहशक्ती नसल्यामुळे, अधिक चांगले; शस्त्रास्त्रनिपुण मुलापेक्षा शस्त्रास्त्रनिपुण नसलेला मुलगा देणे, त्याच्यात लढण्यातील कौशल्य नसल्यामुळे, अधिक चांगले; एकुलत्या एक मुलापेक्षा एकुलता एक नसलेला मुलगा ओलीस ठेवणे अधिक चांगले, कारण त्याच्यावरच पुढील सर्व अपेक्षा केंद्रित झालेल्या नसतात.

२१ औरस पुत्र व बुद्धिमान पुत्र यांपैकी बुद्धिमान नसलेल्या अशाही औरस पुत्राच्या ठिकाणी ऐश्वर्याने वागण्याचा स्वभाव वंशपरंपरेने आलेला असतो, अनौरस पण बुद्धिमान पुत्राजवळ मंत्रशक्ती उपजत असते. २२ मंत्रशक्तीच्या संबंधातसुद्धा विद्यावृद्धांशी सपर्क ठेवून औरस पुत्र प्राज्ञ पुत्रापेक्षा वरचढ होतो (म्हणजे प्राज्ञ मुलगा ओलीस देणे श्रेयस्कर).

२३ बुद्धिमान व शूर यांपैकी शूर नसलेल्या प्राज्ञ मुलात बुद्धीची कामे करण्याची शक्ती असते, प्रज्ञाहीन पण शूर मुलात पराक्रम करण्याची हिम्मत असते. २४ पराक्रम दाखविण्याच्या संबंधातसुद्धा शिकारी हत्तीवर मात करतो त्याप्रमाणे बुद्धिमान शूरावर मात करतो (म्हणजे शूर पुत्र देणे श्रेयस्कर).

२५ शूर व शस्त्रास्त्रनिपुण यांपैकी निपुण नसलेल्या शूर मुलाच्या अंगी पराक्रम करण्याची ताकद आलेली असते, शूर नसलेल्या निपुण मुलात लक्ष्याचा अचूक वेध करण्याचे कसब असते. २६ अचूक वेध करण्याच्या संबंधातसुद्धा स्थैर्य, समजूत आणि हलगर्जीपणाचा अभाव यांमुळे शूर शस्त्रास्त्रनिपुणावर मात करतो (म्हणजे कृतास्त्र मुलगा देणे अधिक चांगले).

२७ पुष्कळ पुत्र असलेला राजा व एकुलता एक पुत्र असलेला राजा यांपैकी पुष्कळ पुत्र असलेला राजा एक पुत्र ओलीस देऊन इतर पुत्रांच्या आधारावर तह मोडू शकतो, एकुलता एक पुत्र असलेला राजा तसे करू शकत नाही. २८ आपले सर्वस्व असलेला (एकुलता एक) पुत्र देऊनच संधी होत असेल तर पुत्राला अपत्य

विशेषः । २९ । शक्तप्रजननयोरप्युपस्थितप्रजननतो विशेषः । ३० । शक्तिमत्येकपुत्रे तु लुप्तपुत्रोत्पत्तिरात्मानमादध्यात्, न चैकपुत्रमिति । ३१ ।

अभ्युच्चीयमानः समाधिमोक्षं कारयेत् । ३२ ।

कुमारासन्नाः सत्रिणः कारुशिल्पिव्यञ्जनाः कर्माणि कुर्वाणाः सुरुङ्गया रात्रावुपखानयित्वा कुमारमपहरेयुः । ३३ ।

नटनर्तकगायनवादकवाग्जीवनकुशीलवप्लवकसौभिका वा पूर्वप्रणिहिताः परमुपतिष्ठेरन् । ३४ । ते कुमारं परंपरयोपतिष्ठेरन् । ३५ । तेषामनियतकालप्रवेशस्थाननिर्गमनानि स्थापयेत् । ३६ । ततस्तद्व्यञ्जनो वा रात्रौ प्रतिष्ठेत । ३७ । तेन रूपाजीवा भार्याव्यञ्जनाश्च व्याख्याताः । ३८ । तेषां वा तूर्यभाण्डफेलां गृहीत्वा निर्गच्छेत् । ३९ ।

सूदारालिकस्नापकसंवाहकास्तरककल्पकप्रसाधकोदकपरिचारकैर्वा द्रव्यवस्त्रभाण्डफेलाशयनासनसंभोगैर्निर्ह्रियेत । ४० ।

झालेले असल्यास श्रेयस्कर. २९ (दोन राजांच्या अशा दोन पुत्रांना) सारखीच अपत्ये असल्यास (राजात) प्रजननशक्ती असण्याने विशेष फायदा होतो. ३० अशी प्रजननशक्ती असलेल्या दोन राजांपैकीसुद्धा ज्याची पुत्रोत्पत्ती जवळ आली आहे त्याला विशेष लाभ होतो. ३१ परंतु शक्तिसंपन्न एकच पुत्र असता पुत्रोत्पत्ती करण्यास असमर्थ असलेल्या राजाने स्वतः ओलीस म्हणून जावे, पण एकुलत्या एक पुत्राला केव्हाही ओलीस देऊ नये.

३२ आपल्या शक्तींची अभिवृद्धी झाली म्हणजे ओलीस ठेवलेल्याची सुटका करून घ्यावी.

३३ राजपुत्राच्या जवळ कारागीर व कलाकार यांच्या वेषात कामे करणाऱ्या सत्री हेरांनी रात्री एक भुयारी मार्ग खणून त्याने राजपुत्राला घेऊन जावे.

३४ किंवा अगोदरपासूनच त्या राज्यात ठेवलेल्या नट, नर्तक, गायक, वादक, कथाकार, कुशीलव, डोंबारी, खेळ दाखविणारे यांच्या रूपातील हेरांनी शत्रूची सेवा करावी. ३५ त्यांनी एकामागून एक राजपुत्राच्या सेवेस जावे. ३६ त्याने त्यांचे येणे, थांबणे व जाणे यांच्याबाबतीत वेळेचे बंधन असणार नाही अशी व्यवस्था करून घ्यावी. ३७ नंतर त्यांच्यापैकी एकाचा वेष घेऊन रात्री बाहेर पडावे. ३८ वेश्या आणि राजपुत्राच्या भार्या म्हणवून घेणाऱ्या स्त्रियांचाही असाच उपयोग करून घ्यावा. ३९ किंवा त्यांचा (नटनर्तकादींचा) वाद्ये वगैरे सामानाचा पेटारा घेऊन (राजपुत्राने) बाहेर पडावे.

४० किंवा आचारी, वाढप्ये, स्नानगृहातील सेवक, संवाहन करणारे, बिछाना करणारे, न्हावी, वस्त्रालंकार चढविणारे किंवा पाणक्ये यांच्या वेषातील हेरांनी वापरावयाचे सामान, वस्त्रे इत्यादी पदार्थांचे पेटारे, पलंग किंवा आसने यांच्या समवेत त्याला बाहेर घेऊन जावे.

परिचारकच्छद्मना वा किंचिदरूपवेलायामादाय निर्गच्छेत्, सुरुङ्गामुखेन वा निशोपहारेण । ४१ । तोयाशये वा वारुणं योगमातिष्ठेत् । ४२ ।

वैदेहकव्यञ्जना वा पक्वान्नफलव्यवहारेणारक्षिषु रसमुपचारयेयुः । ४३ । दैवतोपहारश्राद्धप्रहवणनिमित्तमारक्षिषु मदनयोगयुक्तमन्नपानं रसं वा प्रयुज्यापगच्छेत्, आरक्षकप्रोत्साहनेन वा । ४४ ।

नागरककुशीलवचिकित्सकापूपिकव्यञ्जना वा रात्रौ समृद्धगृहाण्यादीपयेयुः । ४५ । वैदेहकव्यञ्जना वा पण्यसंस्थामादीपयेयुः । ४६ । अन्यद्वा शरीरं निक्षिप्य स्वगृहमादीपयेद् अनुपातभयात् । ४७ । ततः संधिच्छेदखातसुरुङ्गाभिरपगच्छेत् । ४८ ।

काचकुम्भभाण्डभारव्यञ्जनो वा रात्रौ प्रतिष्ठेत । ४९ ।

मुण्डजटिलानां प्रवासनान्यनुप्रविष्टो वा रात्रौ तद्व्यञ्जनः प्रतिष्ठेत, विरूपव्याधिकरणारण्यचरच्छद्मनामन्यतमेन वा । ५० ।

४१ किंवा नोकराचा वेष घेऊन राजपुत्राने रूप स्पष्ट दिसत नाही अशा वेळेला काहीतरी घेऊन बाहेर पडावे अथवा रात्री बली देण्याच्या मिषाने सुरुंगाच्या (भुयाराच्या) मार्गातून निघून जावे. ४२ किंवा जलाशयात वारुण योगाने (पाण्यातून दूरवर सूर मारून) निसटून जावे.

४३ किंवा व्यापाऱ्यांच्या वेषातील हेरांनी, शिजविलेले अन्न, फळे यांचा व्यापार करीत असता, पहारेकऱ्यांना विषप्रयोग करावा. ४४ किंवा राजपुत्राने देवतांना उपहार देण्याच्या, श्राद्धाच्या अथवा सहलीच्या निमित्ताने पहारेकऱ्यांना गुंगी आणणारे द्रव्य अथवा विष असलेले अन्नपाणी देऊन निघून जावे किंवा रक्षकांना वश करून घेऊन निघून जावे.

४५ खुशालचेंडू, कुशीलव, वैद्य किंवा पक्वान्न विकणारे यांच्या वेषातील हेरांनी श्रीमंत लोकांच्या घरांस आगी लावाव्यात. ४६ किंवा व्यापारी वेषातील हेरांनी बाजारपेठेला आग लावून द्यावी. ४७ किंवा आपला पाठलाग होऊ नये म्हणून राजपुत्राने दुसरे एक शरीर आत टाकून आपल्या घराला आग लावावी. ४८ मग भिंतीतील भगदाडातून, खणलेल्या चरावाटे अथवा भुयारी मार्गाने निघून जावे.

४९ किंवा कावडीतील हंडयांतून सामानाचे बोजे नेणाऱ्याच्या वेषात रात्री बाहेर पडावे.

५० किंवा मुंडन केलेल्या अथवा जटाधारी संन्याशांच्या मुक्कामाच्या ठिकाणी जाऊन रात्री त्यांच्यासारख्याच वेषात बाहेर पडावे, किंवा रूप बदलणे, रोग जडलेला दाखविणे व रानटी मनुष्यासारखे दिसणे यांपैकी एखाद्या उपायाचा अवलंब करून (बाहेर पडावे).

प्रेतव्यञ्जनो वा गूढैर्निर्ह्रियेत । ५१ । प्रेतं वा स्त्रीवेषेणानुगच्छेत् । ५२ ।

वनचरव्यञ्जनाश्चैनमन्यतो यान्तमन्यतोऽपदिशेयुः । ५३ । ततोऽन्यतो गच्छेत् । ५४ । चक्रचराणां वा शकटवाटैरपगच्छेत् । ५५ । आसन्ने चानुपाते सत्त्रं वा गृह्णीयात् । ५६ । सत्त्राभावे हिरण्यं रसविद्धं वा भक्ष्यजातमुभयतःपन्थानमुत्सृजेत् । ५७ । ततोऽन्यतोऽपगच्छेत् । ५८ । गृहीतो वा सामादिभिरनुपातमतिसंदध्यात्, रसविद्धेन वा पथ्यदनेन । ५९ ।

वारुणयोगाग्निदाहेषु वा शरीरमन्यदाधाय शत्रुमभियुञ्जीत 'पुत्रो मे त्वया हतः' इति । ६० ।

उपात्तच्छन्नशस्त्रो वा रात्रौ विक्रम्य रक्षिषु ।<br>
शीघ्रपातैरपसरेद्गूढप्रणिहितैः सह ॥ ६१ ॥

इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे संधिकर्म समाधिमोक्षः च सप्तदशोऽध्यायः ।<br>
आदितः पञ्चदशशततमः ।

५१ अथवा गूढ पुरुषांनी त्याला प्रेत म्हणून न्यावे. ५२ किंवा त्याने स्त्रीवेषात प्रेतयात्रेत सामील होऊन निसटावे.

५३ आणि वनचरांच्या वेषातील हेरांनी राजपुत्र एका दिशेने गेला असता पाठलाग करणाऱ्यांना दुसरीच दिशा दाखवावी. ५४ मग त्याने निराळ्याच दिशेने जावे. ५५ किंवा गाडीवानांच्या गाड्यांच्या समूहाबरोबर निघून जावे. ५६ आणि पाठलाग करणारे जवळ येऊन ठेपले तर अडचणीच्या ठिकाणी लपून रहावे. ५७ लपून रहाण्यासारखे ठिकाण न आढळल्यास वाटेत दोन्ही बाजूला द्रव्य किंवा विषयुक्त अन्नपदार्थ ठेवावे. ५८ नंतर दुसऱ्या मार्गाने निघून जावे. ५९ किंवा पकडला गेलाच तर सामादी उपायांनी अथवा विषमिश्रित शिदोरीने पाठलाग करणाऱ्यांवर मात करावी.

६० वारुणयोगात (जलाशयात सूर मारून) निसटताना किंवा आग लावून निसटताना दुसरे शरीर तेथे ठेवावे आणि मग (राजपुत्राच्या पित्याने) "तू माझ्या मुलाला मारले आहेस" असा शत्रूवर आरोप करावा.

६१ किंवा गुप्तपणे आणलेली शस्त्रे घेऊन रात्री पहारेकऱ्यांवर हल्ला करावा आणि गूढ पुरुषांच्या समवेत शीघ्र गतीच्या वाहनांनी निघून जावे.

## १८

### [ चतुर्विशतिशततमं प्रकरणम् – मध्यमचरितम्; पञ्चविंशतिशततमं प्रकरणम् – उदासीनचरितम्; षड्विंशतिशततमं प्रकरणम् – मण्डलचरितम् ]

मध्यमस्यात्मा तृतीया पञ्चमी च प्रकृती प्रकृतयः । १ । द्वितीया चतुर्थी षष्ठी च विकृतयः । २ ।

तच्चेदुभयं मध्यमोऽनुगृह्णीयात्, विजिगीषुर्मध्यमानुलोमः स्यात् । ३ । न चेदनुगृह्णीयात्, प्रकृत्यनुलोमः स्यात् । ४ ।

मध्यमश्चेद्विजिगीषोर्मित्रं मित्रभावि लिप्सेत, मित्रस्यात्मनश्च मित्राण्युत्थाप्य मध्यमाच्च मित्राणि भेदयित्वा मित्रं त्रायेत । ५ । मण्डलं वा प्रोत्साहयेत् 'अतिप्रवृद्धोऽयं मध्यमः सर्वेषां नो विनाशायाभ्युत्थितः, संभूयास्य यात्रां विहनाम' इति । ६ । तच्चेन्मण्डलमनुगृह्णीयात्, मध्यमावग्रहेणात्मानमुपबृंहयेत्

## अठरावा अध्याय

### प्रकरण १२४ : मध्यम राजाशी वागणूक; प्रकरण १२५ : उदासीन राजाशी वागणूक; प्रकरण १२६ : राजमंडलाशी वागणूक

१ मध्यम राजाच्या संबंधात तो स्वतः (म्हणजे विजिगीषू) आणि तिसरी व पाचवी प्रकृती (म्हणजे मित्र व मित्रमित्र) ह्या मैत्रीच्या प्रकृती. २ दुसरी, चौथी आणि सहावी प्रकृती (म्हणजे अरी, अरिमित्र आणि अरिमित्रमित्र) ह्या विरोधी प्रकृती.

३ मध्यम जर ह्या दोन्ही बाजूंना साह्य करीत असेल तर विजिगीषूने मध्यमाच्या कलाने वागावे. ४ जर तो साह्य करीत नसेल तर त्याने आपल्या (तीन) प्रकृतींचेच हित पहावे.

५ मैत्रीची भावना असणाऱ्या विजिगीषूच्या मित्रावर जर मध्यम राजा ताबा मिळवू पहात असेल तर विजिगीषूने त्या मित्राचे मित्र व आपले स्वतःचे मित्र यांना उठवून आणि मध्यम व त्याचे मित्र यांच्यात फूट पाडून आपल्या मित्राचे रक्षण करावे. ६ किंवा राजमंडलाला मध्यमाविरुद्ध चिथवावे, "अतिबलाढ्य झालेला हा मध्यम राजा आपणा सर्वांचाच नाश करावयास उठला आहे. आपण एक होऊन त्याची मोहीम अयशस्वी करू या." ७ जर मंडलाने तशी मदत केली तर मध्यमाच्या पराभवाने विजिगीषूने स्वतःचे सामर्थ्य वाढवून

।७। न चेदनुगृह्णीयात्, कोशदण्डाभ्यां मित्रमनुगृह्य ये मध्यमद्वेषिणो राजानः परस्परानुगृहीता वा बहवस्तिष्ठेयुः, एकसिद्धौ वा बहवः सिध्येयुः, परस्पराद्वा शङ्किता नोत्तिष्ठेरन्, तेषां प्रधानमेकमासन्नं वा सामदानाभ्यां लभेत ।८। द्विगुणो द्वितीयम्, त्रिगुणस्तृतीयम् ।९। एवमभ्युच्चितो मध्यममवगृह्णीयात् ।१०। देशकालातिपत्तौ वा संधाय मध्यमेन मित्रस्य साचिव्यं कुर्यात्, दूष्येषु वा कर्मसंधिम् ।११।

कर्शनीयं वाऽस्य मित्रं मध्यमो लिप्सेत, प्रतिस्तम्भयेदेनम् 'अहं त्वा त्रायेय' इति आ कर्शनात् ।१२। कर्शितमेनं त्रायेत ।१३।

उच्छेदनीयं वाऽस्य मित्रं मध्यमो लिप्सेत, कर्शितमेनं त्रायेत मध्यमवृद्धिभयात् ।१४। उच्छिन्नं वा भूम्यनुग्रहेण हस्ते कुर्याद् अन्यत्रापसारभयात् ।१५।

घ्यावे. ८ जर मंडल तशी मदत करणार नसेल तर त्याने आपल्या मित्राला द्रव्य व सैन्य यांची मदत करून मध्यमाशी शत्रुत्व करणारे जे राजे पुष्कळ असून परस्परांच्या मदतीस जाणारे असतील किंवा ज्यांच्यापैकी एकाला वश केले असता पुष्कळ वश होण्यासारखे असतील किंवा जे एकमेकांच्या भीतीने (मध्यमा-विरुद्ध) उठाव करीत नसतील अशा मध्यमाच्या शत्रूंपैकी एकाला – त्यांच्यातील मुख्याला किंवा आपल्या संन्निध असणाऱ्याला – साम आणि दान या उपायांनी आपल्या बाजूस वळवून घ्यावे. ९ याप्रमाणे दुप्पट झाल्यावर दुसऱ्याला वळवावे, तिप्पट झाल्यावर तिसऱ्याला. १० याप्रमाणे बळ वाढले म्हणजे मध्यम राजाचा पाडाव करावा. ११ किंवा देश व काल यांच्याबाबतीत उशीर होत असल्यास मध्यमाशी तह करून मित्राला मदत करावी किंवा (मध्यमाच्या) द्रोह करणाऱ्या अधिकाऱ्यांशी कार्यसंपादनासाठी संधी करावा.

१२ दुर्बल करण्यास योग्य अशा विजिगीषूच्या मित्रावर जर मध्यम राजा ताबा मिळवू पहात असेल तर "मी तुझे रक्षण करीन" असे म्हणत तो दुबळा होईपर्यंत (आश्वासन व) धीर देत रहावे. १३ तो दुबळा झाला म्हणजे त्याचे रक्षण करावे.

१४ उच्छेद करावयास योग्य अशा विजिगीषूच्या मित्रावर जर मध्यम ताबा मिळवू पहात असेल तर मध्यमाची शक्ती वाढेल ह्या भीतीने मित्र दुर्बल झाला म्हणजे त्याचे रक्षण करावे. १५ जर त्याचा उच्छेद झाला असेल तर तो दुसऱ्या कोणाच्या आश्रयाला जाईल ह्या भीतीने त्याला भूमी देऊन स्वाधीन करून घ्यावे.

**कर्शनीयोच्छेदनीययोश्चेन्मित्राणि मध्यमस्य साचिव्यकराणि स्युः, पुरुषान्तरेण संधीयेत । १६ । विजिगीषोर्वा तयोर्मित्राण्यवग्रहसमर्थानि स्युः, संधिमुपेयात् । १७ ।**

**अमित्रं वाऽस्य मध्यमो लिप्सेत, संधिमुपेयात् । १८ । एवं स्वार्थश्च कृतो भवति मध्यमस्य प्रियं च । १९ ।**

**मध्यमश्चेत् स्वमित्रं मित्रभावि लिप्सेत, पुरुषान्तरेण संदध्यात् । २० । सापेक्षं वा 'नार्हसि मित्रमुच्छेत्तुम्' इति वारयेत् । २१ । उपेक्षेत वा 'मण्डलमस्य कुप्यतु स्वपक्षवधात्' इति । २२ ।**

**अमित्रमात्मनो वा मध्यमो लिप्सेत, कोशदण्डाभ्यामेनमदृश्यमानोऽनुगृह्णीयात् । २३ ।**

**उदासीनं वा मध्यमो लिप्सेत, अस्मै साहाय्यं दद्याद् 'उदासीनाद्भिद्यताम्' इति । २४ । मध्यमोदासीनयोर्यो मण्डलस्याभिप्रेतस्तमाश्रयेत । २५ ।**

१६ कर्शनीय मित्राचे किंवा उच्छेदनीय मित्राचे मित्र जर मध्यमाला साहाय्य करीत असतील तर (मित्राचा सेनापती अथवा कुमार ओलीस ठेवावयास लावून ७.३.२४ मधील) पुरुषांतर संधी घडवून आणावा. १७ किंवा त्या दोन मित्रांचे मित्र विजिगीषूचा पाडाव करण्यास समर्थ असतील तर त्याने (मध्यमाशी) संधी करावा.

१८ जर मध्यम विजिगीषूच्या शत्रूला ताब्यात घेऊ पहात असेल तर विजिगीषूने त्याच्याशी संधी करावा. १९ यामुळे स्वार्थही साधतो आणि मध्यमाच्या मनासारखेही होते.

२० मध्यम जर मैत्रीची भावना असणाऱ्या आपल्या स्वतःच्या मित्रावर ताबा घेऊ पहात असेल तर (त्याच्या सेनापतीला अथवा कुमाराला ओलीस देऊन) पुरुषांतर संधी करावा. २१ किंवा मध्यमाला जर त्याच्याविषयी आदर असेल तर "स्वतःच्या मित्राचा उच्छेद करणे चांगले नाही" असे म्हणून त्याला परावृत्त करावे. २२ किंवा स्वपक्षाच्या नाशामुळे याला मंडळाचा कोप स्वतःवर ओढवून घेऊ द्यावा ह्या विचाराने स्वस्थ बसावे.

२३ मध्यम आपल्या स्वतःच्या शत्रूला ताब्यात घेऊ पहात असेल तर त्याला (शत्रूला) गुप्तपणे द्रव्याची व सैन्याची मदत करावी.

२४ मध्यम उदासीन राजाला कह्यात आणू पहात असेल तर उदासीनापासून तो फुटून निघावा या उद्देशाने त्याला (मध्यमाला) मदत द्यावी. २५ मध्यम आणि उदासीन यांच्यापैकी जो मंडलाला प्रिय असेल त्याच्या आश्रयास जावे.

**मध्यमचरितेनोदासीनचरितं व्याख्यातम् । २६ ।**

**उदासीनश्चेन्मध्यमं लिप्सेत, यतः शत्रुमतिसंदध्यात् मित्रस्योपकारं कुर्याद् उदासीनं वा दण्डोपकारिणं लभेत ततः परिणमेत । २७ ।**

**एवमुपबृह्यात्मानमरिप्रकृतिं कर्शयेन्मित्रप्रकृतिं चोपगृह्णीयात् । २८ ।**

**सत्यप्यमित्रभावे तस्यानात्मवान्नित्यापकारी शत्रुः शत्रुसंहितः पार्ष्णिग्राहो वा व्यसनी यातव्यो व्यसने वा नेतुरभियोक्ता इत्यरिभाविनः, एकार्थाभिप्रयातः पृथगर्थाभिप्रयातः संभूययात्रिकः संहितप्रयाणिकः स्वार्थाभिप्रयातः सामुत्थायिकः कोशदण्डयोरन्यतरस्य क्रेता विक्रेता वा द्वैधीभाविक इति मित्रभाविनः, सामन्तो बलवतः प्रतिघातोऽन्तर्धिः प्रतिवेशो वा बलवतः पार्ष्णिग्राहो वा स्वयमुपनतः प्रतापोपनतो वा दण्डोपनत इति भृत्यभाविनः सामन्ताः । २९ । तैर्भूम्येकान्तरा व्याख्याताः । ३० ।**

२६ मध्यमाच्या बाबतीत वागावयाच्या पद्धतीप्रमाणेच उदासीनाच्या बाबतीत वागावे.

२७ उदासीन जर मध्यमावर ताबा मिळवू पहात असेल तर जेणेकरून आपल्या शत्रूवर मात करता येईल अथवा मित्रावर उपकार करता येईल अथवा उदासीनाकडून स्वतःला सैन्याची मदत मिळविता येईल तसे वागावे.

२८ याप्रमाणे स्वतःची शक्ती वृद्धिगत करून अरिप्रकृतीला दुर्बल करावे आणि मित्रप्रकृतीला सहाय्य करावे.

२९ जरी (सर्व शेजारच्या राजांत) शत्रुत्वाची भावना असते तरी आत्मगुणहीन व नेहमी अपकार करणारा पुढील शत्रू अथवा त्या शत्रूशी दोस्ती केलेला पिछाडीचा शत्रू, संकटात असल्यामुळे स्वारी करणे सुलभ असलेला अथवा विजिगीषू संकटात असता त्याच्यावर हल्ला करणारा, हे शत्रुत्वाची भावना असणारे सामन्त; एकाच उद्दिष्टासाठी प्रयाण करणारा, स्वतंत्र उद्दिष्टासाठी प्रयाण करणारा, एकजूट करून स्वारी करणारा, संधी करून प्रयाण करणारा, (विजिगीषूच्या) स्वतःच्या उद्दिष्टासाठी प्रयाण करणारा, त्याच्याबरोबर उठाव करणारा, द्वैधीभावाचा आश्रय करून कोश व सैन्य यांच्यापैकी एक विकत घेणारा किंवा विकणारा हे मैत्रीची भावना असणारे सामन्त; बलवान राजाचा त्याला अडथळा करणारा, मध्ये असलेला अथवा बाजूला असलेला शेजारी, किंवा बलवान राजाचा पिछाडीचा शत्रू, आणि स्वतः होऊन अथवा युद्धानंतर बळामुळे शरण आलेला, हे आश्रिताची भावना असलेले सामन्त. ३० एक राज्य सोडून पलीकडे असलेल्या राजांच्या संबंधातही असेच समजावे.

तेषां शत्रुविरोधे यन्मित्रमेकार्थतां व्रजेत् ।
शक्त्या तदनुगृह्णीयाद्विषहेत यया परम् ॥ ३१ ॥
प्रसाध्य शत्रुं यन्मित्रं वृद्धं गच्छेदवश्यताम् ।
सामन्तैकान्तराभ्यां तत्प्रकृतिभ्यां विरोधयेत् ॥ ३२ ॥
तत्कुलीनापरुद्धाभ्यां भूमिं वा तस्य हारयेत् ।
यथा वाऽनुग्रहापेक्षं वश्यं तिष्ठेत्तथाचरेत् ॥ ३३ ॥
नोपकुर्यादमित्रं वा गच्छेद्यदतिकर्शितम् ।
तदहीनमवृद्धं च स्थापयेन्मित्रमर्थवित् ॥ ३४ ॥
अर्थयुक्त्या चलं मित्रं संधिं यदुपगच्छति ।
तस्यापगमने हेतुं विहन्यान्न चलेद्यथा ॥ ३५ ॥
अरिसाधारणं यद्वा तिष्ठेत्तदरितः शठम् ।
भेदयेद्भिन्नमुच्छिन्द्यात्ततः शत्रुमनन्तरम् ॥ ३६ ॥

३१ त्यांच्यापैकी शत्रूशी विरोध उद्भवला असता जो मित्र त्याच उद्दिष्टाने प्रेरित होईल त्याला शक्त्यनुसार मदत करावी ज्यायोगे तो शत्रूचा मुकाबला करू शकेल.

३२ शत्रूवर जय मिळवून बलाढ्य झालेला जो मित्र हुकमतीत रहाणार नसेल त्याच्याशी त्याचा शेजारी राजा आणि एक राज्य सोडून पलीकडचा राजा यांचा संघर्ष उत्पन्न करावा.

३३ किंवा त्याच्या कुलातील गादीवर हक्क सांगणारा पुरुष अथवा मर्जीतून उतरलेला राजपुत्र यांना त्याचे राज्य हरण करावयास उद्युक्त करावे, किंवा तसे वागावे की ज्यायोगे मदतीच्या अपेक्षेने तो हुकमतीत राहील.

३४ अतिशय दुर्बल झाल्यामुळे जो मित्र मदत करणार नाही किंवा शत्रूला जाऊन मिळेल त्याला अर्थशास्त्र जाणणाऱ्या विजिगीषूने फार दुर्बल नाही आणि फार बलाढ्य नाही अशा स्थितीत ठेवावे.

३५ जो अस्थिर मित्र स्वतःच्या उद्दिष्टासाठी संधी करतो त्याचे मैत्रीचा त्याग करण्याचे जे कारण ते नाहीसे करावे, ज्यायोगे तो सोडून जाणार नाही.

३६ किंवा जो मित्र (त्याच्याशी आणि) शत्रूशी सारखीच दोस्ती ठेवून असेल त्या लबाड मित्राला शत्रूपासून फोडावे, फुटला म्हणजे त्याचा उच्छेद करावा आणि त्यानंतर शत्रूचा उच्छेद करावा.

उदासीनं च यत्तिष्ठेत्सामन्तैस्तद्विरोधयेत् ।
ततो विग्रहसंतप्तमुपकारे निवेशयेत् ।। ३७ ।।
अमित्रं विजिगीषुं च यत्संचरति दुर्बलम् ।
तद्बलेनानुगृह्णीयाद्यथा स्यान्न पराङ्मुखम् ।। ३८ ।।
अपनीय ततोऽन्यस्यां भूमौ वा संनिवेशयेत् ।
निवेश्य पूर्वं तत्रान्यद्दण्डानुग्रहहेतुना ।। ३९ ।।
अपकुर्यात्समर्थं वा नोपकुर्याद्यदापदि ।
उच्छिन्द्यादेव तन्मित्रं विश्वस्याङ्कमुपस्थितम् ।। ४० ।।
मित्रव्यसनतो वाऽरिरुत्तिष्ठेद्योऽनवग्रहः ।
मित्रेणैव भवेत्साध्यश्छादितव्यसनेन सः ।। ४१ ।।
अमित्रव्यसनान्मित्रमुत्थितं यद्विरज्यति ।
अरिव्यसनसिद्ध्या तच्छत्रुणैव प्रसिध्यति ।। ४२ ।।

३७ आणि जो मित्र तटस्थ राहील त्याच्याशी त्याच्या शेजारच्या राजांचा संघर्ष उत्पन्न करावा. नंतर युद्धाने तो जेरीस आला की त्याच्यावर उपकार करून ठेवावा.

३८ जो मित्र दुर्बल असल्यामुळे विजिगीषू व त्याचा शत्रू ह्या दोघांकडेही (मदतीसाठी) जातो त्याला सैन्य देऊन मदत करावी, ज्यायोगे तो त्याच्याकडे पाठ फिरविणार नाही.

३९ किंवा (अशा दुर्बल मित्राला) त्याच्या राज्यातून हलवून दुसऱ्या प्रदेशात प्रतिष्ठापित करावे; त्याआगोदर त्या मित्राच्या राज्यात दुसऱ्या मित्राची, त्याने सैन्याची मदत केली होती या कारणास्तव, स्थापना करून ठेवावी.

४० जो मित्र अपकार करतो किंवा सामर्थ्य असूनही आपत्काली सहाय्य करीत नाही त्या मित्राचा, विश्वास ठेवून तो आपल्या तावडीत आला म्हणजे, उच्छेद केलाच पाहिजे.

४१ किंवा जेव्हा मित्रावर संकट आल्याकारणाने शत्रू नियंत्रण नाहीसे झाल्यामुळे उठाव करतो तेव्हा त्या मित्राचे संकट दूर करून त्या मित्राच्या मार्फतच त्याला वठणीवर आणता येईल.

४२ शत्रूवर संकट आल्यामुळे उठाव केलेला जो मित्र त्याच्याशी फटकून वागतो, तो शत्रूच्या संकटाचे निवारण केल्यावर त्या शत्रूच्या मार्फतच ताळ्यावर आणता येतो.

वृद्धिं क्षयं च स्थानं च कर्शनोच्छेदनं तथा ।
सर्वोपायान् समादध्यादेतान् यश्चार्थशास्त्रवित् ।। ४३ ।।
एवमन्योन्यसंचारं षाड्गुण्यं योऽनुपश्यति ।
स बुद्धिनिगलैर्बद्धैरिष्टं क्रीडति पार्थिवैः ।। ४४ ।।

इति षाड्गुण्ये सप्तमेऽधिकरणे मध्यमचरितम् उदासीनचरितम् मण्डलचरितम् च अष्टादशोऽध्यायः । आदितः षोडशशततमः ।

एतावता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य षाड्गुण्यम् सप्तममधिकरणं समाप्तम् ।

४३ आणि जो अर्थशास्त्र जाणतो त्या राजाने आपली वृद्धी, क्षय आणि स्थान, तसेच (शत्रूला) दुर्बल करणे आणि उच्छेद करणे ह्या सर्व उपायांची योजना करावी.

४४ याप्रमाणे परस्परांशी संबद्ध असलेली ही सहा धोरणे जो नीट ध्यानात घेतो तो बुद्धिरूप साखळदंडाने जखडलेल्या (मंडलातील) राजांना हवे तसे लीलया खेळवितो.

सातवे अधिकरण समाप्त

# व्यसनाधिकारिकम् – अष्टममधिकरणम्

१

## [ सप्तविंशतिशततमं प्रकरणम् – प्रकृतिव्यसनवर्गः ]

व्यसनयौगपद्ये सौकर्यतो यातव्यं रक्षितव्यं वेति व्यसनचिन्ता । १ ।

दैवं मानुषं वा प्रकृतिव्यसनमनयापनयाभ्यां संभवति । २ । गुणप्रातिलोम्यमभावः प्रदोषः प्रसङ्गः पीडा वा व्यसनम् । ३ । व्यस्यत्येनं श्रेयस इति व्यसनम् । ४ ।

'स्वाम्यमात्यजनपददुर्गकोशदण्डमित्रव्यसनानां पूर्वं पूर्वं गरीयः' इत्याचार्याः । ५ ।

नेति भारद्वाजः । ६ । 'स्वाम्यमात्यव्यसनयोरमात्यव्यसनं गरीयः । ७ । मन्त्रो मन्त्रफलावाप्तिः कर्मानुष्ठानमायव्ययकर्म दण्डप्रणयनममित्राटवीप्रतिषेधो

## आठवे अधिकरण – संकटांविषयी

### पहिला अध्याय

### प्रकरण १२७ : राज्याच्या सात प्रकृतींवरील संकटे

१ (विजिगीषू व अरी यांवर) संकटे एकाच वेळी गुदरली असता स्वारीवर जाणे सुकर आहे की आपले रक्षण करीत स्वस्थ रहाणे सुकर (असा प्रश्न उपस्थित होतो) म्हणून संकटांचा विचार (आवश्यक होतो).

२ राज्याच्या प्रकृतीवरील दैवकृत अथवा मनुष्यकृत संकट दुर्दैवामुळे अथवा चुकीच्या धोरणामुळे उद्भवते. ३ प्रकृतीच्या गुणांची विपर्यस्तता, (प्रकृतीचा) अभाव, (प्रकृतीत) मोठा दोष उत्पन्न होणे, अत्यासक्ती अथवा पीडा म्हणजे व्यसन अथवा संकट. ४ त्याच्या श्रेयापासून मनुष्याला दूर लोटून देते ते व्यसन (अशी व्यसन शब्दाची व्युत्पत्ती आहे).

५ "स्वामी, अमात्य, जनपद, दुर्ग, कोश, सैन्य आणि मित्र यांच्यावरील संकटांपैकी अगोदरअगोदरचे संकट अधिक भयावह," असे आचार्यांचे मत आहे.

६ भारद्वाजाच्या मते हे बरोबर नाही. ७ "स्वामी आणि अमात्य या दोघांवरील संकटांपैकी अमात्यावरील संकट अधिक धोक्याचे. ८ सल्लामसलत करणे, सल्लामसलतीचे फल म्हणून निर्णय घेणे, कार्याची अंमलबजावणी, उत्पन्न व खर्च यांची व्यवस्था करणे, अपराध्यांना शासन करणे, शत्रू व रानटी टोळ्या

राज्यरक्षणं व्यसनप्रतीकारः कुमाररक्षणमभिषेकश्च कुमाराणामायत्तममात्येषु । ८ । तेषामभावे तदभावः, छिन्नपक्षस्येव राज्ञश्चेष्टानाशश्च । ९ । व्यसनेषु चासन्नः परोपजापः । १० । वैगुण्ये च प्राणाबाधः प्राणान्तिकचरत्वाद्राज्ञः' इति । ११ ।

नेति कौटिल्यः । १२ । मन्त्रिपुरोहितादिभृत्यवर्गमध्यक्षप्रचारं पुरुषद्रव्यप्रकृतिव्यसनप्रतीकारमेधनं च राजैव करोति । १३ । व्यसनिषु वाऽमात्येष्वन्यानव्यसनिनः करोति । १४ । पूज्यपूजने दूष्यावग्रहे च नित्ययुक्तस्तिष्ठति । १५ । स्वामी च संपन्नः स्वसंपद्भिः प्रकृतीः संपादयति । १६ । स यच्छीलस्तच्छीलाः प्रकृतयो भवन्ति, उत्थाने प्रमादे च तदायत्तत्वात् । १७ । तत्कूटस्थानीयो हि स्वामीति । १८ ।

'अमात्यजनपदव्यसनयोर्जनपदव्यसनं गरीयः' इति विशालाक्षः ।.१९ । 'कोशो दण्डः कुप्यं विष्टिर्वाहनं निचयाश्च जनपदादुत्तिष्ठन्ते । २० । तेषामभावो जनपदाभावे, स्वाम्यमात्ययोश्चानन्तरः' इति । २१ ।

यांचा प्रतिकार करणे, राज्याचे संरक्षण करणे, संकटावर उपाययोजना करणे, राजपुत्रांचे रक्षण व राजपुत्रांस अभिषेक ह्या सर्व गोष्टी अमात्यांवर अवलंबून आहेत. ९ अमात्य नसतील तर ह्या गोष्टी होणार नाहीत आणि पंख कापलेल्या पक्ष्याप्रमाणे राजाचा सर्व कारभार बंद पडेल. १० आणि अमात्य संकटात असले की शत्रूच्या फितुरीच्या सूचनांना चांगलाच वाव मिळतो. ११ आणि ते विरुद्ध झाल्यास त्यांच्यापासून राजाच्या जीविताला धोका असतो, कारण ते राजाच्या जवळपास वावरत असतात."

१२ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. १३ मंत्री, पुरोहित आदी नोकरवर्ग नेमणे, खातेप्रमुखांना काम सोपवून देणे, पुरुषप्रकृती व द्रव्यप्रकृती यांच्यावरील संकटांचे निवारण करणे व त्यांना समृद्ध करणे या गोष्टी राजाच करतो. १४ आणि अमात्य जर संकटात (किंवा व्यसनाधीन) असतील तर तो दुसरे व्यसनमुक्त अमात्य नेमतो. १५ पूज्य असलेल्यांचा सन्मान करणे आणि दूष्य असलेल्यांचा निग्रह करणे याबाबतीत तोच सदा दक्ष रहातो. १६ आणि सर्व गुणांनी संपन्न असलेला राजा (अमात्यादी) प्रकृतींनासुद्धा त्यांच्या त्यांच्या विशिष्ट गुणांनी संपन्न करतो. १७ त्याचे जसे शील असेल तसेच त्यांचेही शील असते, कारण उद्यमशील रहाण्यात अथवा हलगर्जीपणा करण्यात ते त्याच्यावर नजर ठेवून वागतात. १८ कारण राजा हा त्या प्रकृतींच्या शिखरस्थानी आहे.

१९ "अमात्य व जनपद यांच्यावरील संकटांपैकी जनपदावरील संकट अधिक धोकादायक," असे विशालाक्षाचे मत आहे. २० खजिना, सैन्य, जंगली माल, मजूर, वाहने आणि (धान्यादीचे) साठे हे सर्व जनपदापासून

**नेति कौटिल्यः । २२ । अमात्यमूलाः सर्वारम्भाः – जनपदस्य कर्मसिद्धयः स्वतः परतश्च योगक्षेमसाधनं व्यसनप्रतीकारः शून्यनिवेशोपचयौ दण्डकरानुग्रहश्चेति । २३ ।**

**'जनपददुर्गव्यसनयोर्दुर्गव्यसनम्' इति पाराशराः । २४ । 'दुर्गे हि कोशदण्डोत्पत्तिरापदि स्थानं च जनपदस्य । २५ । शक्तिमत्तराश्च पौरा जानपदेभ्यो नित्याश्चापदि सहाया राज्ञः । २६ । जानपदास्त्वमित्रसाधारणाः' इति । २७ ।**

**नेति कौटिल्यः । २८ । जनपदमूला दुर्गकोशदण्डसेतुवार्त्तारम्भाः । २९ । शौर्यं स्थैर्यं दाक्ष्यं बाहुल्यं च जानपदेषु । ३० । पर्वतान्तर्द्वीपाश्च दुर्गा नाध्युष्यन्ते जनपदाभावात् । ३१ । कर्षकप्राये तु दुर्गव्यसनम्, आयुधीयप्राये तु जनपदे जनपदव्यसनमिति । ३२ ।**

प्राप्त होतात. २१ जनपद नसेल तर ह्या गोष्टीही असणार नाहीत आणि त्यानंतर स्वामी व अमात्य हेसुद्धा (असणार नाहीत)."

२२ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. २३ सर्व कार्ये अमात्यांवर अवलंबून असतात – जनपदातील कार्ये यशस्वीपणे पार पाडणे, स्वत:कडून व इतरांकडून त्याच्या योगक्षेमाचे संपादन करणे, त्याच्यावरील संकटांचे निवारण करणे, वस्ती नसलेल्या जागी वसाहत स्थापणे व तिची भरभराट करणे आणि दंड व कर यांची वसुली करणे (ही कार्ये).

२४ "जनपद व दुर्ग यांच्यावरील संकटांपैकी दुर्गावरील संकट अधिक धोकादायक," असे पाराशरांचे मत आहे. २५ "कारण, कोश व सैन्य यांची उत्पत्ती दुर्गात होते आणि आपत्काली तेथेच जनपदातील लोकांना आश्रयस्थान मिळते. २६ आणि जनपदातील लोकांपेक्षा शहरातील लोक अधिक शक्तिमान असतात आणि (राजभक्तीत) स्थिर राहून आपत्काली राजास मदत करतात. २७ याउलट जनपदातील लोक (आपत्काली) शत्रूच्या बाजूसही जातात."

२८ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. २९ दुर्ग, कोश, सैन्य, पाटबंधारे आणि (कृषि, गोरक्षण आणि वाणिज्य ही) वृत्तिसाधने ह्या सर्व कार्यांचा उगम जनपदात आहे. ३० शौर्य, स्थैर्य, दक्षता आणि विपुल संख्येत उपलब्धी हे गुण जनपदातील लोकांत असतात. ३१ आणि पर्वतावरील दुर्ग व बेटातील दुर्ग यात वस्ती नसते, कारण तेथे जनपदाचा अभाव असतो. ३२ तथापि, जनपदात जर मुख्यतः शेतकऱ्यांची वस्ती असेल तर दुर्गावरील संकट (अधिक गंभीर), परंतु तेथे मुख्यतः लढवय्यांची वस्ती असेल तर जनपदावरील संकट (अधिक गंभीर).

'दुर्गकोशव्यसनयोः कोशव्यसनम्' इति पिशुनः । ३३ । 'कोशमूलो हि दुर्गसंस्कारो दुर्गरक्षणं जनपदमित्रामित्रनिग्रहो देशान्तरितानामुत्साहनं दण्डबलव्यवहारश्च । ३४ । दुर्गः कोशादुपजाप्यः परेषाम् । ३५ । कोशमादाय च व्यसने शक्यमपयातुं, न दुर्गम्.' इति । ३६ ।

नेति कौटिल्यः । ३७ । दुर्गार्पणः कोशो दण्डस्तूष्णींयुद्धं स्वपक्षनिग्रहो दण्डबलव्यवहार आसारप्रतिग्रहः परचक्राटवीप्रतिषेधश्च । ३८ । दुर्गाभावे च कोशः परेषाम् । ३९ । दृश्यते हि दुर्गवतामनुच्छित्तिरिति । ४० ।

'कोशदण्डव्यसनयोर्दण्डव्यसनम्' इति कौणपदन्तः । ४१ । 'दण्डमूलो हि मित्रामित्रनिग्रहः परदण्डोत्साहनं स्वदण्डप्रतिग्रहश्च । ४२ । दण्डाभावे च ध्रुवः कोशविनाशः । ४३ । कोशाभावे च शक्यः कुप्येन भूम्या परभूमिस्वयंग्राहेण वा दण्डः पिण्डयितुं, दण्डवता च कोशः । ४४ । स्वामिनश्चासन्नवृत्तित्वादमात्यसधर्मा दण्डः' इति । ४५ ।

३३ "दुर्ग व कोश यांच्यावरील संकटांपैकी कोशावरील संकट जास्त गंभीर," असे पिशुनाचे मत आहे. ३४ "कारण, दुर्गाची (बांधणी व) दुरुस्ती, दुर्गाचे रक्षण, जनपद, मित्र व शत्रू यांचा निग्रह, दुसऱ्या देशातील लोकांना प्रोत्साहित करणे आणि सैन्याच्या बळाचा वापर ह्या गोष्टींचा उगम कोशात होतो. ३५ आणि कोशामुळे शत्रू दुर्गात फितुरी उत्पन्न करू शकतात. ३६ आणि संकटकाळी कोश घेऊन पळून जाता येते, दुर्ग घेऊन नाही."

३७ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ३८ कोश, सैन्य, गुप्त युद्ध, आपल्या पक्षातील लोकांचे दमन, सैन्याच्या बळाचा वापर, मदतीला येणाऱ्या सैन्याचा स्वीकार आणि परचक्र व रानटी टोळ्या यांना प्रतिकार करणे ह्या गोष्टी दुर्गावर अवलंबून आहेत. ३९ आणि दुर्ग नसेल तर कोश शत्रूच्या हाती जातो. ४० कारण ज्यांना दुर्गाचे संरक्षण आहे त्यांचा उच्छेद होत नाही असे दिसून येते.

४१ "कोश व सैन्य यांवरील संकटांपैकी सैन्यावरील संकट अधिक गंभीर," असे कौणपदंताचे मत आहे. ४२ "कारण मित्र व शत्रू यांचे दमन, (आपल्याजवळील) शत्रुबलाला लढण्यास प्रोत्साहित करणे आणि स्वतःच्या सैन्याला कुमक ह्या गोष्टी सैन्यावर अवलंबून आहेत. ४३ आणि सैन्य नसेल तर कोशाचा नाश निश्चित होईल. ४४ आणि कोश नसल्यास कुप्य अथवा भूमी देऊन किंवा शत्रूची जमीन ज्याला जी घेता येईल ती त्याने घ्यावी अशी परवानगी दिल्यास सैन्य जमा करता येते आणि सैन्य असल्यावर कोश गोळा करता येतो. ४५ आणि राजाच्या सन्निध रहात असल्यामुळे सैन्याचे (प्राणाला धोक्याच्या बाबतीत) अमात्यांशी साधर्म्य आहे."

**नेति कौटिल्यः । ४६ । कोशमूलो हि दण्डः । ४७ । कोशाभावे दण्डः परं गच्छति, स्वामिनं वा हन्ति । ४८ । सर्वाभियोगकरश्च कोशो धर्मकामहेतुः । ४९ । देशकालकार्यवशेन तु कोशदण्डयोरन्यतरः प्रमाणीभवति । ५० । लम्भपालनो हि दण्डः कोशस्य, कोशः कोशस्य दण्डस्य च भवति । ५१ । सर्वद्रव्यप्रयोजकत्वात्कोशव्यसनं गरीय इति । ५२ ।**

**'दण्डमित्रव्यसनयोर्मित्रव्यसनम्' इति वातव्याधिः । ५३ । 'मित्रमभृतं व्यवहितं च कर्म करोति, पार्ष्णिग्राहमासारममित्रमाटविकं च प्रतिकरोति, कोशदण्डभूमिभिश्चोपकरोति व्यसनावस्थायोगम्' इति । ५४ ।**

**नेति कौटिल्यः । ५५ । दण्डवतो मित्रं मित्रभावे तिष्ठति, अमित्रो वा मित्रभावे । ५६ । दण्डमित्रयोस्तु साधारणे कार्ये सारतः स्वयुद्धदेशकाललाभाद्विशेषः । ५७ । शीघ्राभियाने त्वमित्राटविकानभ्यन्तरकोपे च न मित्रं विद्यते । ५८ । व्यसनयौगपद्ये परवृद्धौ च मित्रमर्थयुक्तौ तिष्ठति । ५९ ।**

४६ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ४७ कारण, सैन्याचे मूळ कोशात आहे. ४८ कोश नसेल तर सैन्य शत्रूला जाऊन मिळते किंवा राजाला ठार मारते. ४९ आणि सर्व कार्ये साध्य करणारा असल्यामुळे कोश, धर्म व काम यांच्या सिद्धीस कारणीभूत होतो. ५० तथापि, देश, काल व कार्य यांच्या अनुरोधाने कोश किंवा सैन्य अधिक प्रभावी ठरते. ५१ सैन्य कोश मिळवून देते व त्याचे पालन करते, आणि कोश, कोश व सैन्य दोन्ही मिळवूनदेऊन त्यांचे पालन करतो. ५२ सर्व प्रकारचे पदार्थ मिळविण्यास कारणीभूत होत असल्यामुळे कोशावरील संकट अधिक गंभीर.

५३ "सैन्य व मित्र यांच्यावरील संकटांपैकी मित्रावरील संकट अधिक गंभीर," असे वातव्याधीचे मत आहे. ५४ "मित्र पगार न घेता व दूर राहून काम करतो, पिछाडीचा शत्रू, त्याचा मित्र, पुढचा शत्रू आणि रानटी टोळ्या यांचा प्रतिकार करतो आणि संकटाच्या प्रसंगी सोडून न जाता कोश, सैन्य व भूमी यांचे साहाय्य देतो."

५५ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ५६ आपल्याकडे सैन्य असले तरच मित्र मित्र म्हणून रहातो आणि शत्रूसुद्धा मैत्री करतो. ५७ परंतु एखादे कार्य सैन्याकडून अथवा मित्राकडून सारखेच होण्यासारखे असते तेव्हा त्यांची उत्कृष्टता आणि त्यांच्या युद्धप्रकाराला अनुकूल अशा देशाचा व ऋतूचा लाभ यांमुळे विशेष फायदा होतो. ५८ परंतु ज्यावेळेस शत्रू व रानटी टोळ्या यांच्याविरुद्ध मोहिमेवर निघावयाची घाई असते त्यावेळेस आणि अंतर्गत बंडाळीविरुद्ध मित्र उपयोगी पडत नाही. ५९ (विजिगीषू व अरी) दोघे एकाच वेळी संकटात असता आणि शत्रूची अभिवृद्धी झाली असता मित्र स्वतःच्याच हिताविषयी दक्ष रहातो.

इति प्रकृतिव्यसनसंप्रधारणमुक्तम् । ६० ।

प्रकृत्यवयवानां तु व्यसनस्य विशेषतः ।
बहुभावोऽनुरागो वा सारो वा कार्यसाधकः ।। ६१ ।।
द्वयोस्तु व्यसने तुल्ये विशेषो गुणतः क्षयात् ।
शेषप्रकृतिसाद्गुण्यं यदि स्यान्नाविधेयकम् ।। ६२ ।।
शेषप्रकृतिनाशस्तु यत्रैकव्यसनाद्भवेत् ।
व्यसनं तद्गरीयः स्यात्प्रधानस्येतरस्य वा ।। ६३ ।।

इति व्यसनाधिकारिकेऽष्टमेऽधिकरणे प्रकृतिव्यसनवर्गः प्रथमोऽध्यायः ।
आदितः सप्तदशशततमः ।

२

## [ अष्टाविंशतिशततमं प्रकरणम् – राजराज्ययोर्व्यसनचिन्ता ]

राजा राज्यमिति प्रकृतिसंक्षेपः । १ ।

राज्ञोऽभ्यन्तरो बाह्यो वा कोप इति । २ । अहिभयादभ्यन्तरः कोपो बाह्यकोपात्पापीयान्, अन्तरमात्यकोपश्चान्तःकोपात् । ३ । तस्मात्कोशदण्डशक्तिमात्मसंस्थां कुर्वीत । ४ ।

६० याप्रमाणे प्रकृतीवरील संकटांच्या गांभीर्याविषयी निर्णय सांगितला आहे.

६१ परंतु संकटाच्या विशिष्ट स्वरूपाच्या अनुरोधाने प्रकृतीच्या अवयवांचे संख्याधिक्य अथवा एकनिष्ठता अथवा उत्कृष्टता यांच्यामुळे कार्य सिद्ध होऊ शकते.

६२ परंतु जेव्हा दोन प्रकृतीवरील संकट सारखेच गंभीर असते तेव्हा त्यांच्या गुणांच्या ऱ्हासाच्या अनुरोधाने (गांभीर्य कमीअधिक ठरून) त्यांच्यातील फरक कळतो; परंतु त्यावेळी बाकीच्या प्रकृतींची गुणवत्ता मात्र निरुपयोगी झालेली नसली पाहिजे.

६३ परंतु जेथे एका प्रकृतीवरील संकटामुळे इतर प्रकृतींचा नाश होतो तेथे ते संकट – राजावरील असो किंवा इतर प्रकृतीवरील असो – अधिक गंभीर होते.

## दुसरा अध्याय

### प्रकरण १२८ : राजा व राज्य यांवरील संकटांचा विचार

१ राजा आणि त्याचे राज्य (शासन) यात सर्व प्रकृती सामावलेल्या आहेत.

२ राजाला आतल्या अधिकाऱ्यांची बंडाळी व बाहेरच्या अधिकाऱ्यांची बंडाळी यांच्यापासून भय असते. ३ सापापासून असलेल्या भीतीसारखे असल्यामुळे आतल्या अधिकाऱ्यांची बंडाळी बाहेरच्या अधिकाऱ्यांच्या बंडाळीपेक्षा

**'द्वैराज्यवैराज्ययोर्द्वैराज्यमन्योन्यपक्षद्वेषानुरागाभ्यां परस्परसंघर्षेण वा विनश्यति, वैराज्यं तु प्रकृतिचित्तग्रहणापेक्षि यथास्थितमन्यैर्भुज्यते' इत्याचार्याः । ५ ।**

**नेति कौटिल्यः । ६ । पितापुत्रयोर्भ्रात्रोर्वा द्वैराज्यं तुल्ययोगक्षेममात्यावग्रहं वर्तयति । ७ । वैराज्यं तु जीवतः परस्याच्छिद्य 'नैतन्मम' इति मन्यमानः कर्शयति, अपवाहयति, पण्यं वा करोति, विरक्तं वा परित्यज्यापगच्छतीति । ८ ।**

**अन्धश्चलितशास्त्रो वा राजेति 'अशास्त्रचक्षुरन्धो यत्किंचनकारी दृढाभिनिवेशी परप्रणेयो वा राज्यमन्यायेनोपहन्ति, चलितशास्त्रस्तु यत्र शास्त्राच्चलितमतिर्भवति शक्यानुनयो भवति' इत्याचार्याः । ९ ।**

**नेति कौटिल्यः । १० । अन्धो राजा शक्यते सहायसंपदा यत्र तत्र वा पर्यवस्थापयितुम् । ११ । चलितशास्त्रस्तु शास्त्रादन्यथाभिनिविष्टबुद्धिरन्यायेन राज्यमात्मानं चोपहन्तीति । १२ ।**

अधिक भयंकर, आणि राजवाड्यातील अमात्यांची बंडाळी आतल्या अधिकाऱ्यांच्या बंडाळीपेक्षा अधिक भयंकर. ४ यास्तव राजाने कोशशक्ती व सैन्यशक्ती आपल्या स्वतःच्या ताब्यात ठेवल्या पाहिजेत.

५ "द्वैराज्य (दोघे मिळून करीत असलेले राज्य) आणि वैराज्य (दुसऱ्याच्या देशावर केले जाणारे परक्याचे राज्य) यांपैकी द्वैराज्य एकमेकांच्या पक्षातील द्वेष व अनुराग यामुळे किंवा दोघांतील संघर्षामुळे नाश पावते, परंतु वैराज्य प्रजाजनांचे मन जिंकण्याच्या उद्देशाने दुसऱ्यांकडून (परकीयांकडून) पूर्वीप्रमाणेच चालविले जाते," असे आचार्यांचे मत आहे.

६ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ७ पिता व पुत्र या दोघांचे अथवा दोन भावांचे द्वैराज्य योगक्षेम सारखाच चालवून आणि अमात्यांना ताब्यात ठेवून टिकून राहू शकते. ८ परंतु वैराज्यात जिवंत असलेल्या दुसऱ्याचे राज्य बळकावून "हे माझे नाही" असे मानणारा परकी राजा देशाची दुर्दशा करतो, तेथील संपत्तीचे अपहरण करतो किंवा तो देश कोणाला तरी विकून टाकतो किंवा लोक विरुद्ध झाले तर सोडून निघून जातो.

९ शास्त्राची दृष्टी नसलेला अंध राजा व शास्त्राचे पालन न करणारा राजा यांपैकी "शास्त्राची दृष्टी नसलेला आंधळा राजा, वाटेल तसे वागणारा, हट्टी अथवा दुसऱ्याच्या कलाने चालणारा, अन्यायाने वागून राज्याचा विनाश करतो, परंतु शास्त्राप्रमाणे न वागणाऱ्या राजाची, ज्या बाबतीत तो शास्त्राला सोडून वागतो त्या बाबतीत, समजूत घालणे शक्य असते," असे आचार्यांचे मत आहे.

१० हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ११ शास्त्रदृष्टी नसलेल्या राजाला उत्तम प्रतीचे मदतनीस योग्य त्या मार्गाने जाण्यास लावू शकतात.

**व्याधितो नवो वा राजेति 'व्याधितो राजा राज्योपघातममात्यमूलं प्राणाबाधं वा राज्यमूलमवाप्नोति, नवस्तु राजा स्वधर्मानुग्रहपरिहारदानमानकर्मभिः प्रकृतिरञ्जनोपकारैश्चरति' इत्याचार्याः । १३ ।**

**नेति कौटिल्यः । १४ । व्याधितो राजा यथाप्रवृत्तं राजप्रणिधिमनुवर्तयति । १५ । नवस्तु राजा बलावर्जितं 'ममेदं राज्यम्' इति यथेष्टमनवग्रहश्चरति । १६ । सामुत्थायिकैरवगृहीतो वा राज्योपघातं मर्षयति । १७ । प्रकृतिष्वरूढः सुखमुच्छेत्तुं भवतीति । १८ । व्याधिते विशेषः पापरोग्यपापरोगी च । १९ । नवेऽप्यभिजातोऽनभिजात इति । २० ।**

**दुर्बलोऽभिजातो बलवाननभिजातो राजेति 'दुर्बलस्याभिजातस्योपजापं दौर्बल्यापेक्षाः प्रकृतयः कृच्छ्रेणोपगच्छन्ति, बलवतश्चानभिजातस्य बलापेक्षाः सुखेन' इत्याचार्याः । २१ ।**

१२ परंतु शास्त्र न जुमानणारा राजा शास्त्राच्या विरुद्ध वागण्याचा दृढ निश्चय करून राज्याचा व स्वतःचा विनाश करून घेतो.

१३ व्याधिग्रस्त राजा व नवीन राजा यांपैकी "व्याधिग्रस्त राजाला अमात्यांकडून होणारा राज्याचा विनाश सहन करावा लागतो किंवा राज्यकारभाराच्या दगदगीमुळे त्याच्या स्वतःच्या प्राणाला धोका उद्‌भवतो, परंतु नवीन राजा प्रजाजनांना खूष करणारी व हितकर असणारी, स्वधर्माचे पालन, अनुग्रह करणे, सूट देणे, देणग्या देणे, मानसन्मान करणे ही कामे करतो," असे आचार्यांचे मत आहे.

१४ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. १५ व्याधिग्रस्त राजा पूर्वीपासून चालत आलेली राजाची कर्तव्ये तशीच चालू ठेवतो. १६ परंतु नवीन राजा बळाच्या जोरावर मिळविलेले "हे राज्य माझे आहे" असे मानून मनाला येईल तसे अनियंत्रितपणे वागतो. १७ किंवा बंडातील त्याच्या सहकाऱ्यांच्या दाबाखाली असल्यास राज्याचा होत असलेला विनाश निमूटपणे सहन करतो. १८ प्रजाजनांत बद्धमूल न झाल्यामुळे त्याचा उच्छेद सहज करता येतो. १९ व्याधिग्रस्त राजाच्या संबंधात पापरोगाने पीडित असलेला व पापरोगाने पीडित नसलेला असा भेद आहे. २० नवीन राजाच्या संबंधातसुद्धा उच्च कुळात जन्मलेला व उच्च कुळात न जन्मलेला असा भेद आहे.

२१ दुर्बल पण उच्च कुळात जन्मलेला आणि बलवान पण हीन कुळात जन्मलेला यांपैकी "प्रजाजन उच्च कुळातील दुर्बल राजाचे म्हणणे त्याची दुर्बलता लक्षात घेऊन मोठ्या कष्टाने ऐकतात, पण हीन कुलातील बलवान राजाचे म्हणणे त्याचे बळ लक्षात घेऊन सहज ऐकतात," असे आचार्यांचे मत आहे.

**नेति कौटिल्यः । २२ । दुर्बलमभिजातं प्रकृतयः स्वयमुपनमन्ति, जात्यमैश्वर्यं प्रकृतिरनुवर्तत इति । २३ । बलवतश्चानभिजातस्योपजापं विसंवादयन्ति, अनुरागे सार्वगुण्यम् इति । २४ । प्रयासवधात् सस्यवधो मुष्टिवधात्पापीयान्, निराजीवत्वाद् अवृष्टिरतिवृष्टितः । २५ ।**

**द्वयोर्द्वयोर्व्यसनयोः प्रकृतीनां बलाबलम् ।**
**पारंपर्यक्रमेणोक्तं याने स्थाने च कारणम् ।। २६ ।।**

**इति व्यसनाधिकारिकेऽष्टमेऽधिकरणे राजराज्ययोर्व्यसनचिन्ता द्वितोयोऽध्यायः ।**
**आदितोऽष्टादशशततमः ।**

**३**

**[ एकोनत्रिंशच्छततमं प्रकरणम् – पुरुषव्यसनवर्गः ]**

**अविद्याविनयः पुरुषव्यसनहेतुः । १ । अविनीतो हि व्यसनदोषान्न पश्यति । २ । तानुपदेक्ष्यामः । ३ ।**

**कोपजस्त्रिवर्गः, कामजश्चतुर्वर्गः । ४ । तयोः कोपो गरीयान् । ५ । सर्वत्र हि कोपश्चरति । ६ । प्रायशश्च कोपवशा राजानः प्रकृतिकोपैर्हताः श्रूयन्ते, कामवशाः क्षयनिमित्तमरिव्याधिभिरिति । ७ ।**

२२ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. २३ प्रजाजन उच्च कुळातील राजाला तो दुर्बल असला तरी स्वतः होऊन वश होतात, उच्चकुलीन राजात राज्य करण्यास आवश्यक असलेले गुण उपजतच असतात म्हणून. २४ आणि ते हीनकुलीन बलवान राजाच्या म्हणण्याप्रमाणे वागत नाहीत, जेथे प्रेम असते तेथे सर्व गुण विद्यमान असतात. २५ मेहनत फुकट जात असल्यामुळे पेरणीच्या नाशापेक्षा उगवलेल्या धान्याचा नाश अधिक वाईट, उपजीविका उपलब्ध होत नसल्यामुळे अनावृष्टी अतिवृष्टीपेक्षा अधिक वाईट.

२६ प्रकृतीच्या संकटांची गंभीरता आणि तिचा अभाव ह्यांचे विवेचन, पारंपरिक क्रमाला अनुसरून (एका वेळेस) दोन दोन प्रकृतींचा विचार करून मोहिमेवर निघावे की स्वस्थ बसावे हे ठरविण्यासाठी, केले आहे.

## तिसरा अध्याय

### प्रकरण १२९ : मनुष्याची व्यसने

१ विद्यांच्या अध्ययनाने सुसंस्कृत न होणे हे मनुष्य व्यसनी होण्यास कारणीभूत होते. २ कारण, विनीत न झालेल्या मनुष्याला व्यसनामधले दोष दिसत नाहीत. ३ ते दोष आम्ही आता दाखवून देतो.

४ क्रोधापासून तीन व्यसने उद्भवतात, कामापासून चार. ५ त्या दोहोंपैकी क्रोध हा अधिक भयंकर. ६ कारण, क्रोधाचा प्रभाव सर्वत्र असतो. ७ आणि

**नेति भारद्वाजः । ८ । 'सत्पुरुषाचारः कोपो वैरयातनमवज्ञावधो भीतमनुष्यता च । ९ । नित्यश्च कोपेन संबन्धः पापप्रतिषेधार्थः । १० । कामः सिद्धिलाभः सान्त्वं त्यागशीलता संप्रियभावश्च । ११ । नित्यश्च कामेन संबन्धः कृतकर्मणः फलोपभोगार्थः' इति । १२ ।**

**नेति कौटिल्यः । १३ । द्वेष्यता शत्रुवेदनं दुःखासङ्गश्च कोपः । १४ । परिभवो द्रव्यनाशः पाटच्चरद्यूतकारलुब्धकगायनवादकैश्चानर्थ्यैः संयोगः कामः । १५ । तयोः परिभवाद्द्वेष्यता गरीयसी । १६ । परिभूतः स्वैः परैश्चावगृह्यते, द्वेष्यः समुच्छिद्यत इति । १७ । द्रव्यनाशाच्छत्रुवेदनं गरीयः । १८ । द्रव्यनाशः कोशाबाधकः, शत्रुवेदनं प्राणाबाधकमिति । १९ । अनर्थ्यसंयोगाद्दुःखसंयोगो गरीयान् । २० । अनर्थ्यसंयोगो मुहूर्तप्रतीकारो, दीर्घक्लेशकरो दुःखानामासङ्ग इति । २१ । तस्मात्कोपो गरीयान् । २२ ।**

क्रोधाच्या अधीन झालेले राजे बहुतकरून प्रजाजनांच्या प्रक्षोभामुळे ठार झाले असल्याचे आणि कामाच्या अधीन झालेले राजे क्षयामुळे शत्रू आणि व्याधी यांच्याकडून मारले गेले असल्याचे आपण ऐकतो.

८ "हे बरोबर नाही," असे भारद्वाजाचे मत आहे. ९ "क्रोध सत्पुरुषाच्या आचरणात आवश्यक, वैराचा बदला घेणे, अपमानाचा सूड उगवणे आणि मनुष्यांना भीती वाटावयास लावणे (हे शक्य करणारा) असा आहे. १० आणि दुष्प्रवृत्तींचे निर्दालन करण्यासाठी क्रोधाचा अवलंब नेहमी करावा लागतो. ११ काम हा यशाची प्राप्ती करून देणारा, सांत्वनपर वृत्तीचा, त्याग करण्याच्या स्वभावाचा आणि लोकांना प्रिय होणारा असा आहे. १२ आणि केलेल्या कामाच्या फलाच्या उपभोगासाठी कामाशी संबंध नेहमी आवश्यक असतो."

१३ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. १४ क्रोध म्हणजे द्वेषास पात्र होणे, शत्रू मिळविणे आणि दुःखाची संगत होय. १५ काम म्हणजे मानहानी, द्रव्यहानी आणि चोर, जुगारी, शिकारी, गाणारे व वाजविणारे ह्या अनर्थकारक मंडळींची संगत. १६ त्यांपैकी मानहानीपेक्षा द्वेषास पात्र होणे अधिक वाईट. १७ मानहानी झालेला मनुष्य स्वतःच्या लोकांकडून व इतरांकडून अव्हेरिला जातो, द्वेषास पात्र झालेल्याचा समूळ उच्छेद होतो. १८ द्रव्यहानीपेक्षा शत्रू करणे अधिक भयंकर. १९ द्रव्यनाशामुळे कोशाला धोका उत्पन्न होतो, शत्रू केला तर प्राणाला धोका उत्पन्न होतो. २० अनर्थकारक माणसांच्या संगतीपेक्षा दुःखाची संगत अधिक वाईट. २१ अनर्थकारक माणसांची संगत क्षणात सोडून देता येते, दुःखाची सोबत दीर्घ काळपर्यंत क्लेश देत रहाते. २२ म्हणून क्रोध (कामापेक्षा) अधिक भयंकर.

**वाक्पारुष्यमर्थदूषणं दण्डपारुष्यमिति । २३ ।**

**'वाक्पारुष्यार्थदूषणयोर्वाक्पारुष्यं गरीयः' इति विशालाक्षः । २४ । 'परुषमुक्तो हि तेजस्वी तेजसा प्रत्यारोहति । २५ । दुरुक्तशल्यं हृदि निखातं तेजःसंदीपनमिन्द्रियोपतापि च' इति । २६ ।**

**नेति कौटिल्यः । २७ । अर्थपूजा वाक्छल्यमपहन्ति, वृत्तिविलोपस्त्वर्थदूषणम् । २८ । अदानमादानं विनाशः परित्यागो वाऽर्थस्येत्यर्थदूषणम् । २९ ।**

**'अर्थदूषणदण्डपारुष्ययोरर्थदूषणं गरीयः' इति पाराशराः । ३० । 'अर्थमूलौ धर्मकामौ । ३१ । अर्थप्रतिबद्धश्च लोको वर्तते । ३२ । तस्योपघातो गरीयान्' इति । ३३ ।**

**नेति कौटिल्यः । ३४ । सुमहताऽप्यर्थेन न कश्चन शरीरविनाशमिच्छेत् । ३५ । दण्डपारुष्याच्च तमेव दोषमन्येभ्यः प्राप्नोति । ३६ ।**

२३ वचनाची कठोरता, मालमत्तेचे नुकसान करणे आणि दंडाची कठोरता (ही तीन क्रोधज व्यसने).

२४ "कठोर वचन व मालमत्तेचे नुकसान यांपैकी कठोर वचन अधिक वाईट," असे विशालाक्षाचे मत आहे. २५ कारण, तेजस्वी मनुष्याला जर कोणी कठोरपणे बोलले तर तो जोराने प्रतिकार करतो. २६ कठोर वचनाचे शल्य अंतःकरणात रुतून तेजस्वितेला पेटून उठावयास लावते आणि इंद्रियांना तापदायक होते."

२७ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. २८ द्रव्य देऊन केलेला सत्कार वचनाचे शल्य काढून टाकतो, परंतु मालमत्तेचे नुकसान म्हणजे उपजीविकेचाच अभाव. २९ (देणे अवश्य असलेले) न देणे, (एखाद्याच्या मालकीची वस्तू) घेणे, ती नष्ट करणे अथवा टाकून देणे ह्या गोष्टी म्हणजे अर्थदूषण (मालमत्तेचे नुकसान).

३० "अर्थदूषण आणि दंडपारुष्य यापैकी अर्थदूषण अधिक वाईट," असे पाराशरांचे मत आहे. ३१ "कारण, धर्म व काम हे अर्थावर अवलंबून असतात. ३२ आणि सर्व जग अर्थाशी निगडित आहे. ३३ म्हणून त्याचा विनाश अधिक वाईट."

३४ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ३५ कितीही मोठी रक्कम असली तरी ती घेऊन आपल्या शरीराचा नाश करून घेण्यास कोणीही राजी होणार नाही. ३६ आणि दंडपारुष्यामुळे दुसऱ्यांकडून तेच (शरीरनाश) होण्याची भीती असते.

इति कोपजस्त्रिवर्गः ।३७। कामजस्तु मृगया द्यूतं स्त्रियः पानमिति चतुर्वर्गः ।३८।

तस्य 'मृगयाद्यूतयोर्मृगया गरीयसी' इति पिशुनः ।३९। 'स्तेनामित्रव्याल-दावप्रस्खलनभयदिङ्मोहाः क्षुत्पिपासे च प्राणाबाधस्तस्याम् ।४०। द्यूते तु जितमेवाक्षविदुषा यथा जयत्सेनदुर्योधनाभ्याम्' इति ।४१।

नेति कौटिल्यः ।४२। तयोरप्यन्यतरपराजयोऽस्तीति नलयुधिष्ठिराभ्यां व्याख्यातम् ।४३। तदेव विजितद्रव्यमामिषं वैरानुबन्धश्च ।४४। सतोऽर्थस्य विप्रतिपत्तिरसतश्चार्जनमप्रतिभुक्तनाशो मूत्रपुरीषधारणबुभुक्षादिभिश्च व्याधि-लाभ इति द्यूतदोषाः ।४५। मृगयायां तु व्यायामः श्लेष्मपित्तमेदः-स्वेदनाशश्चले स्थिते च काये लक्ष्यपरिचयः कोपभयस्थानेषु च मृगाणां चित्तज्ञानमनित्ययानं चेति ।४६।

'द्यूतस्त्रीव्यसनयोः कैतवव्यसनम्' इति कौणपदन्तः ।४७। 'सातत्येन हि निशि प्रदीपे मातरि च मृतायां दीव्यत्येव कितवः ।४८। कृच्छ्रे च प्रतिपृष्टः

३७ अशी ही तीन क्रोधज व्यसने. ३८ परंतु मृगया, द्यूत, स्त्रिया आणि मद्यपान ही चार कामज व्यसने.

३९ त्यामध्ये "मृगया व द्यूत यांपैकी मृगया अधिक वाईट," असे पिशुनाचे मत आहे. ४० "मृगयेत चोर, शत्रू, हिंस्त्र प्राणी, दावाग्नी, अडखळून पडणे, वाट चुकणे, आणि भूकतहान यांच्यामुळे जीविताला धोका असतो. ४१ परंतु द्यूतात ते खेळण्यात कुशल असलेल्यांचा जयच होतो, जसा तो जयत्सेन व दुर्योधन यांचा झाला.

४२ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ४३ द्यूतात दोघांपैकी एकजण हरतो हे नल व युधिष्ठिर यांच्या उदाहरणाने दाखवून दिले आहे. ४४ आणि तेच जिंकलेले द्रव्य आमिष होऊन (इतरांच्या लोभास कारणीभूत होते व) कायमचे वैर उत्पन्न करते. ४५ असलेल्या द्रव्याविषयी (राहील की जाईल) अशी अनिश्चितता, नसलेले द्रव्य मिळविणे, उपभोग न घेताच हरवून बसणे आणि मलमूत्रधारण, भूक (मारणे) इत्यादीमुळे रोग जडणे हे द्यूतातील दोष होत. ४६ परंतु मृगयेत व्यायाम घडतो, कफ, पित्त, मेद आणि घाम (फार येणे) हे विकार नाहीसे होतात, स्थिर व चल शरीरावर नेम धरून मारण्याचा अभ्यास होतो, पशूंना क्रोध आला असता, भय वाटत असता आणि ते स्वस्थ असता त्यांच्या चित्ताच्या विकारांचे ज्ञान होते; शिवाय, मृगयेवर कायमचे जाण होत नाही.

४७ "द्यूत आणि स्त्रिया या दोन व्यसनांपैकी द्यूताचे व्यसन अधिक वाईट," असे कौणपदंताचे मत आहे. ४८ "कारण, जुगारी सतत, रात्रीसुद्धा दिव्याच्या

**कुप्यति । ४९ । स्त्रीव्यसने तु स्नानप्रतिकर्मभोजनभूमिषु भवत्येव धर्मार्थपरिप्रश्नः । ५० । शक्या च स्त्री राजहिते नियोक्तुम्, उपांशुदण्डेन व्याधिना वा व्यावर्तयितुमवस्रावयितुं वा ' इति । ५१ ।**

**नेति कौटिल्यः । ५२ । सप्रत्यादेयं द्यूतं निष्प्रत्यादेयं स्त्रीव्यसनम् । ५३ । अदर्शनं कार्यनिर्वेदः कालातिपातनादनर्थो धर्मलोपश्च तन्त्रदौर्बल्यं पानानुबन्धश्चेति । ५४ ।**

**' स्त्रीपानव्यसनयोः स्त्रीव्यसनम् ' इति वातव्याधिः । ५५ । ' स्त्रीषु हि बालिश्यमनेकविधं निशान्तप्रणिधौ व्याख्यातम् । ५६ । पाने तु शब्दादीनामिन्द्रियार्थानामुपभोगः प्रीतिदानं परिजनपूजनं कर्मश्रमवधश्च ' इति । ५७ ।**

**नेति कौटिल्यः । ५८ । स्त्रीव्यसने भवत्यपत्योत्पत्तिरात्मरक्षणं चान्तदरिषु, विपर्ययो वा बाह्येषु, अगम्येषु सर्वोच्छित्तिः । ५९ । तदुभयं पानव्यसने । ६० ।**

उजेडात, तिकडे आई मेली असली तरी, खेळतच रहातो. ४९ आणि अडचणीच्या वेळी त्याला काही विचारले तर तो रागावतो. ५० परंतु स्त्रीव्यसनामध्ये स्नान, प्रसाधन, भोजन या प्रसंगी धर्म व अर्थ यासंबंधी विचारणा करता येतेच. ५१ आणि स्त्रीचा राजाला हितकर अशा कामात उपयोग करून घेता येतो किंवा तिला गुप्त शासनाच्या द्वारा अथवा व्याधीच्या द्वारा दूर करणे अथवा निघून जावयास लावणे शक्य असते."

५२ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ५३ द्यूतापासून मनुष्याला परावृत्त करता येते, स्त्रीव्यसनापासून परावृत्त करता येत नाही. ५४ (राजाचे) दर्शन न होणे, काम करण्याचा कंटाळा, दिरंगाईमुळे अनर्थ व धर्माचा लोप, राज्यकारभारात शिथिलता आणि मद्यपानाची सवय जडणे (हे दोष स्त्रीव्यसनामुळे उत्पन्न होतात).

५५ "स्त्रीव्यसन व मद्यपान यांपैकी स्त्रीव्यसन अधिक वाईट," असे वातव्याधीचे मत आहे. ५६ "कारण, स्त्रियांच्या ठिकाणी असलेल्या विविध प्रकारच्या मूर्खतेचा (आणि त्यामुळे उद्भवणाऱ्या संकटाचा) निशांतप्रणिधि प्रकरणात निर्देश केला आहे. ५७ परंतु मद्यपानात शब्दादी इंद्रियविषयांचा उपभोग घेता येतो, प्रेमाने दान करता येते, परिजनांचा सत्कार करता येतो आणि कामामुळे आलेला शीण घालवता येतो."

५८ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ५९ स्त्रीव्यसनात स्त्रिया जर त्याच्या भार्यांपैकी असतील तर अपत्योत्पत्ती होते व स्वतःचे रक्षणही होते, त्या स्त्रिया बाहेरच्या असतील तर याच्या उलट (अपत्योत्पत्तीचा व आत्मरक्षणाचा अभाव) घडते, त्या समागमास निषिद्ध असतील तर सर्वनाश होतो. ६० मद्यपानाच्या व्यसनात हे दोन्ही (विपर्यय आणि सर्वनाश) घडून

पानसंपत् – संज्ञानाशोऽनुन्मत्तस्योन्मत्तत्वमप्रेतस्य प्रेतत्वं कौपीनदर्शनं श्रुतप्रज्ञाप्राणवित्तमित्रहानिः सद्भिर्वियोगोऽनर्थ्यसंयोगस्तन्त्रीगीतनैपुण्येषु चार्थघ्नेषु प्रसङ्ग इति । ६१ ।

द्यूतमद्ययोर्द्यूतम् । ६२ । एकेषां पणनिमित्तो जयः पराजयो वा प्राणिषु निश्चेतनेषु वा पक्षद्वैधेन प्रकृतिकोपं करोति । ६३ । विशेषतश्च संघानां संघधर्मिणां च राजकुलानां द्यूतनिमित्तो भेदस्तन्निमित्तो विनाश इत्यसत्प्रग्रहः पापिष्ठतमो व्यसनानां तन्त्रदौर्बल्यादिति । ६४ ।

असतां प्रग्रहः कामः कोपश्चावग्रहः सताम् ।
व्यसनं दोषबाहुल्यादत्यन्तमुभयं मतम् ।। ६५ ।।
तस्मात्कोपं च कामं च व्यसनारम्भमात्मवान् ।
परित्यजेन्मूलहरं वृद्धसेवी जितेन्द्रियः ।। ६६ ।।

इति व्यसनाधिकारिकेऽष्टमेऽधिकरणे पुरुषव्यसनवर्गस्तृतीयोऽध्यायः । आदित एकोनविंशतिशततमः ।

येतात. ६१ मद्यपानाचे 'गुण' पुढीलप्रमाणे आहेत – शुद्ध हरपणे, वेडा नसताही वेड्यासारखे वागणे, मेलेला नसताही प्रेतवत पडणे, गुह्य अवयव उघडे पडू देणे, विद्वत्ता, बुद्धी, जीवित, वित्त आणि मित्र गमावणे, सज्जनांपासून ताटातूट, अनर्थकारक माणसांची संगत आणि द्रव्याचा नाश करणाऱ्या वीणावादन, गायन यात नैपुण्य मिळविण्याचा नाद.

६२ द्यूत व मद्य यांपैकी द्यूत (अधिक वाईट). ६३ लावलेल्या पणामुळे – प्राण्यांच्या शर्यतीवर अथवा निर्जीव फाशांनी – एका बाजूचा होणारा जय अथवा पराजय दोन पक्ष उत्पन्न करून प्रजेत प्रक्षोभ माजवितो. ६४ विशेषतः संघांच्या बाबतीत आणि संघांसारखे असलेल्या राजकुलांच्या बाबतीत द्यूतामुळे त्यांच्यात फाटाफूट होते व त्यामुळे त्यांचा नाश होतो; म्हणून दुर्जनांना उपकारक असणारे हे द्यूत सर्व व्यसनांमध्ये अत्यंत वाईट आहे. कारण, त्याने राज्यकारभारात शिथिलता येते.

६५ काम म्हणजे दुर्जनांना जवळ करणे आणि क्रोध म्हणजे सज्जनांचा निग्रह करणे. त्यांच्यापासून असंख्य दोष उत्पन्न होत असल्याकारणाने ते दोन्ही अंत नसणारी संकटे होत असे मानण्यात आले आहे.

६६ यास्तव आत्मगुणसंपन्न राजाने विद्यावृद्धांच्या सेवेत राहून व इंद्रियांचे दमन करून व्यसनांच्या मुळाशी असलेले व मूळ राज्याचा नाश करणारे क्रोध व काम यांचा त्याग करावा.

## ४

## [ त्रिंशच्छततमं प्रकरणम् – पीडनवर्गः ; एकत्रिंशच्छततमं प्रकरणम् – स्तम्भवर्गः ; द्वात्रिंशच्छततमं प्रकरणम् – कोशसङ्गवर्गः ]

दैवपीडनम् – अग्निरुदकं व्याधिर्दुर्भिक्षं मरक इति । १ ।

'अग्न्युदकयोरग्निपीडनमप्रतिकार्यं सर्वदाहि च, शक्यापगमनं तार्याबाधमुदकपीडनम्' इत्याचार्याः । २ । नेति कौटिल्यः । ३ । अग्निर्ग्राममर्धग्रामं वा दहति, उदकवेगस्तु ग्रामशतप्रवाहीति । ४ ।

'व्याधिदुर्भिक्षयोर्व्याधिः प्रेतव्याधितोपसृष्टपरिचारकव्यायामोपरोधेन कर्माण्युपहन्ति, दुर्भिक्षं पुनरकर्मोपघाति हिरण्यपशुकरदायि च' इत्याचार्याः । ५ । नेति कौटिल्यः । ६ । एकदेशपीडनो व्याधिः शक्यप्रतीकारश्च, सर्वदेशपीडनं दुर्भिक्षं प्राणिनामजीवनायेति । ७ । तेन मरको व्याख्यातः । ८ ।

## चौथा अध्याय

## प्रकरण १३० : पीडादायक गोष्टी ; प्रकरण १३१ : अडथळे ; प्रकरण १३२ : कोशाला अटकाव

१ आगी, पूर, रोग, दुष्काळ आणि रोगाची साथ ह्या दैवी पीडा होत.

२ "आग आणि पूर यांपैकी आगीच्या पीडेचे निवारण करणे शक्य नसते आणि ती सर्व जाळून टाकते, पुराच्या संकटापासून दूर जाता येते आणि त्याच्या धोक्यापासून बचाव करता येतो," असे आचार्यांचे मत आहे. ३ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ४ आगीमुळे गाव किंवा अर्धे गाव जळून जाते, परंतु पुराच्या वेगाने शेकडो गावे वाहून जातात.

५ "रोग आणि दुष्काळ यांपैकी रोगामुळे मृत्यू पावलेल्या, व्याधिग्रस्त झालेल्या आणि क्षीण झालेल्या कामगारांच्या उद्योगात व्यत्यय येऊन कार्याची हानी होते, याउलट दुष्काळात कामे बंद पडत नाहीत आणि द्रव्य व पशू या स्वरूपात कर मिळतच रहातो," असे आचार्यांचे मत आहे. ६ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ७ व्याधीमुळे देशाच्या एका भागालाच पीडा होते आणि त्याच्यावर उपचार करणे शक्य असते, परंतु दुष्काळामुळे सबंध देशाला पीडा होऊन प्राण्यांचे जीवनच नष्ट होण्याचा प्रसंग येतो. ८ हेच (दुष्काळासंबंधीचे विधान) महामारीलाही लागू आहे.

'क्षुद्रकमुख्यक्षययोः क्षुद्रकक्षयः कर्मणामयोगक्षेमं करोति, मुख्यक्षयः कर्मानुष्ठानोपरोधधर्मा' इत्याचार्याः । ९ । नेति कौटिल्यः । १० । शक्यः क्षुद्रकक्षयः प्रतिसंधातुं बाहुल्यात्क्षुद्रकाणाम्, न मुख्यक्षयः । ११ । सहस्रेषु हि मुख्यो भवत्येको न वा सत्त्वप्रज्ञाधिक्यात्तदाश्रयत्वात्क्षुद्रकाणामिति । १२ ।

'स्वचक्रपरचक्रयोः स्वचक्रमतिमात्राभ्यां दण्डकराभ्यां पीडयत्यशक्यं च वारयितुम्, परचक्रं तु शक्यं प्रतियोद्धुमपसारेण संधिना वा मोक्षयितुम्' इत्याचार्या. । १३ । नेति कौटिल्यः । १४ । स्वचक्रपीडनं प्रकृतिपुरुषमुख्योपग्रहविघाताभ्यां शक्यते वारयितुमेकदेशं वा पीडयति, सर्वदेशपीडनं तु परचक्रं विलोपघातदाहविध्वंसनापवाहनैः पीडयतीति । १५ ।

'प्रकृतिराजविवादयोः प्रकृतिविवादः प्रकृतीनां भेदकः पराभियोगानावहति, राजविवादस्तु प्रकृतीनां द्विगुणभक्तवेतनपरिहारकरो भवति' इत्याचार्याः । १६ । नेति कौटिल्यः । १७ । शक्यः प्रकृतिविवादः प्रकृतिमुख्योपग्रहेण कलहस्थाना-

९ "सामान्य मनुष्यांची हानी व मुख्य मनुष्यांची हानी यांपैकी सामान्य मनुष्यांच्या हानीमुळे कामे नष्ट होतात, मुख्य मनुष्यांच्या हानीमुळे कामात अडथळा येतो (इतकेच)," असे आचार्यांचे मत आहे. १० हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ११ सामान्य मनुष्यांची हानी भरून काढणे शक्य असते, कारण सामान्य माणसे खूप असतात; मुख्य माणसांची हानी भरून काढता येत नाही. १२ कारण हजारात एखादा मुख्य आढळतो किंवा आढळतही नाही, कारण त्यासाठी सत्त्व व बुद्धी ही अधिक प्रमाणात आवश्यक असतात आणि सामान्य माणसे त्यांच्यावर अवलंबून असतात.

१३ "स्वतःच्या सैन्याचा उपद्रव व शत्रूच्या सैन्याची स्वारी यांपैकी स्वतःचे सैन्य प्रमाणाबाहेर दंड व कर लादून छळते व त्याचे निवारण करणे शक्य नसते, परंतु शत्रुसैन्याशी युद्धाने मुकाबला करता येतो आणि पलायन करून अथवा तह करून त्यापासून सुटका करून घेता येते," असे आचार्यांचे मत आहे. १४ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. १५ स्वतःच्या सैन्याकडून होणाऱ्या पीडेचे निवारण त्यातील अधिकाऱ्यांच्या पुढाऱ्यांना वश करून घेऊन अथवा ठार मारून करता येते किंवा देशाच्या काही भागालाच त्याचा उपद्रव होतो, परंतु शत्रूच्या सैन्यापासून सर्व देशाला उपद्रव होतो, ते लुटालुट, ठार मारणे, जाळपोळ, विध्वंस, पळवून नेणे या गोष्टींमुळे अत्यंत हानिकारक होते.

१६ "प्रजाजनांतील कलह व राजकुटुंबातील कलह यांपैकी प्रजाजनांतील कलहामुळे लोकांत दुफळी होऊन शत्रूच्या हल्ल्याला आमंत्रण दिल्यासारखे होते, परंतु राजकुलातील कलहामुळे लोकांना दुप्पट शिधा, पगार व करात सूट यांचा लाभ होतो," असे आचार्यांचे मत आहे. १७ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे

पनयनेन वा वारयितुम् । १८ । विवदमानास्तु प्रकृतयः परस्परसंघर्षेणोपकुर्वन्ति । १९ । राजविवादस्तु पीडनोच्छेदनाय प्रकृतीनां द्विगुणव्यायामसाध्य इति । २० ।

'देशराजविहारयोर्देशविहारस्त्रैकाल्येन कर्मफलोपघातं करोति, राजविहारस्तु कारुशिल्पिकुशीलववाग्जीवनरूपाजीवावैदेहकोपकारं करोति' इत्याचार्याः । २१ । नेति कौटिल्यः । २२ । देशविहारः कर्मश्रमवधार्थमल्पं भक्षयति भक्षयित्वा च भूयः कर्मसु योगं गच्छति, राजविहारस्तु स्वयं वल्लभैश्च स्वयंग्राहप्रणयपण्यागारकार्योपग्रहैः पीडयतीति । २३ ।

'सुभगाकुमारयोः कुमारः स्वयं वल्लभैश्च स्वयंग्राहप्रणयपण्यागारकार्योपग्रहैः पीडयति, सुभगा विलासोपभोगेन' इत्याचार्याः । २४ । नेति कौटिल्यः । २५ । शक्यः कुमारो मन्त्रिपुरोहिताभ्यां वारयितुम्, न सुभगा बालिश्यादनर्थ्यजनसंयोगाच्चेति । २६ ।

मत आहे. १८ प्रजेतील कलह त्यांच्या पुढाऱ्यांना वश करून घेऊन अथवा तंट्याचे कारण दूर करून मिटविता येतो. १९ शिवाय, कलह करणारे लोक आपसातील संघर्षामुळे राजाचा फायदाच करून देतात. २० परंतु राजकुलातील व्यक्तींमधील कलह प्रजेच्या पीडेस व नाशास कारणीभूत होतो आणि तो मिटविण्यासाठी दुप्पट श्रम पडतात.

२१ "प्रजाजनांचा क्रीडाविहार आणि राजाचा क्रीडाविहार यांपैकी लोकांची क्रीडा तिन्ही काळातील कर्मफलाचा नाश करते, परंतु राजाची क्रीडा कारागीर, कलाकार, कुशीलव, कथाकार, वेश्या, व्यापारी यांना हितावह होते," असे आचार्यांचे मत आहे. २२ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. २३ कामामुळे होणारा शीण घालविण्यासाठी लोकांनी केलेल्या क्रीडाविहाराला फार थोडा खर्च येतो आणि तो झाल्यावर ते पुन्हा कामाला लागतात, परंतु राजाच्या विहारात तो स्वतः व त्याचे आवडते लोक यांच्या जे ज्याच्या हाती लागेल ते त्याने घेणे, मागणी करणे, देणग्या उपटणे, कर्मफल बळकावणे या वर्तणुकीमुळे लोक हैराण होतात.

२४ "राजाची आवडती राणी व राजपुत्र यांपैकी राजपुत्र स्वतः व प्रीतीतील माणसांमार्फत जे ज्याला मिळेल ते त्याने घेणे, मागणी करणे, देणग्या उपटणे, कामाचे फळ बळकावणे या प्रकारांनी प्रजेला हैराण करतो, आवडती राणी विलासाच्या उपभोगामुळे (जेवढा त्रास देईल तेवढाच)," असे आचार्यांचे म्हणणे आहे. २५ ते बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. २६ मंत्री व पुरोहित यांच्यामार्फत राजपुत्राला आवरता येते, तिच्या मूर्खपणामुळे आणि अनर्थकारक माणसांच्या संगतीमुळे आवडत्या राणीला आवरता येत नाही..

'श्रेणीमुख्ययोः श्रेणी बाहुल्यादनवग्रहा स्तेयसाहसाभ्यां पीडयति, मुख्यः कार्यानुग्रहविघाताभ्याम्' इत्याचार्याः । २७ । नेति कौटिल्यः । २८ । सुव्यावर्त्या श्रेणी समानशीलव्यसनत्वात्, श्रेणीमुख्यैकदेशोपग्रहेण वा । २९ । स्तम्भयुक्तो मुख्यः परप्राणद्रव्योपघाताभ्यां पीडयतीति । ३० ।

'संनिधातृसमाहर्त्रोः संनिधाता कृतविदूषणात्ययाभ्यां पीडयति, समाहर्ता करणाधिष्ठितः प्रदिष्टफलोपभोगी भवति' इत्याचार्याः । ३१ । नेति कौटिल्यः । ३२ । संनिधाता कृतावस्थमन्यैः कोशप्रवेश्यं प्रतिगृह्णाति, समाहर्ता तु पूर्वमर्थमात्मनः कृत्वा पश्चाद्राजार्थं करोति प्रणाशयति वा, परस्वादाने च स्वप्रत्ययश्चरतीति । ३३ ।

'अन्तपालवैदेहकयोरन्तपालश्चोरप्रसर्गदेयात्यादानाभ्यां वणिक्पथं पीडयति, वैदेहकास्तु पण्यप्रतिपण्यानुग्रहैः प्रसाधयन्ति' इत्याचार्याः । ३४ । नेति कौटिल्यः । ३५ । अन्तपालः पण्यसंपातानुग्रहेण वर्तयति, वैदेहकास्तु संभूय पण्यानामुत्कर्षापकर्षं कुर्वाणाः पणे पणशतं कुम्भे कुम्भशतमित्याजीवन्ति । ३६ ।

२७ "श्रेणी आणि मुख्य अधिकारी यांपैकी श्रेणीचे सदस्य पुष्कळ असल्यामुळे तिच्यावर नियंत्रण ठेवता येत नाही म्हणून ती चोरी व दरोडा यांनी त्रास देते, मुख्य अधिकारी कार्यावर अनुग्रह आणि त्याचे नुकसान दोन्ही करतो," असे आचार्यांचे मत आहे. २८ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. २९ सदस्यांचे शील व व्यसने सारखीच असल्यामुळे श्रेणीची पीडा टाळणे सोपे आहे, किंवा तिचा मुख्य अथवा काही भाग वश करून घेऊन (पीडा टाळता येईल). ३० गर्वाने ताठ झालेला मुख्य दुसऱ्यांचे प्राण व मालमत्ता यांचा नाश करून पीडा देतो.

३१ "संनिधाता व समाहर्ता यांपैकी संनिधाता केलेल्या कामात दोष काढून व दंड बसवून पीडा देतो, समाहर्ता अधिकाऱ्यांवर देखरेख करणारा असून नेमून दिलेल्या फलाचाच उपभोग घेतो," असे आचार्यांचे मत आहे. ३२ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ३३ संनिधाता दुसऱ्यांनी खात्री करून दिलेलेच कोशांत घ्यावयाचे पदार्थ स्वीकारतो, परंतु समाहर्ता प्रथम आपल्यासाठी वसुली करून मग सरकारी वसुली करतो किंवा ती नष्ट होऊ देतो, आणि दुसऱ्याची मालमत्ता घेण्याच्या बाबतीत तो स्वतःच्याच निर्णयानुसार वागतो.

३४ " (सरहद्दीवरील दुर्गातील) अंतपाल आणि व्यापारी यांपैकी अंतपाल चोरांना मोकळीक देऊन आणि खूप जकात वसूल करून व्यापारीमार्गाला पीडा देतो, परंतु व्यापारी मालाची आयात व निर्यात करून तो (मार्ग) भरभराटीस आणतात," असे आचार्यांचे मत आहे. ३५ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ३६ अंतपाल मालाच्या वाहतुकीस सहाय्य करून (मार्ग) चालू

**अभिजातोपरुद्धा भूमिः पशुव्रजोपरुद्धा वेति 'अभिजातोपरुद्धा भूमिः महाफलाऽप्यायुधीयोपकारिणी न क्षमा मोक्षयितुं व्यसनाबाधभयात्, पशुव्रजोपरुद्धा तु कृषियोग्या क्षमा मोक्षयितुम् । ३७ । विवीतं हि क्षेत्रेण बाध्यते' इत्याचार्याः । ३८ । नेति कौटिल्यः । ३९ । अभिजातोपरुद्धा भूमिरत्यन्तमहोपकाराऽपि क्षमा मोक्षयितुम् व्यसनाबाधभयात्, पशुव्रजोपरुद्धा तु कोशवाहनोपकारिणी न क्षमा मोक्षयितुम्, अन्यत्र सस्यवापोपरोधादिति । ४० ।**

**'प्रतिरोधकाटविकयोः प्रतिरोधका रात्रिसत्त्रचराः शरीराक्रमिणो नित्याः शतसहस्रापहारिणः प्रधानकोपकाश्च, व्यवहिताः प्रत्यन्तारण्यचराश्चाटविकाः प्रकाशा दृश्याश्चरन्ति, एकदेशघातकाश्च' इत्याचार्याः । ४१ । नेति कौटिल्यः । ४२ । प्रतिरोधकाः प्रमत्तस्यापहरन्ति, अल्पाः कुण्ठाः सुखा ज्ञातुं ग्रहीतुं च, स्वदेशस्थाः प्रभूता विक्रान्ताश्चाटविकाः प्रकाशयोधिनोऽपहर्तारो हन्तारश्च देशानां राजसधर्माण इति । ४३ ।**

ठेवतो, पण व्यापारी संगनमत करून मालाच्या किंमतीत चढउतार करतात व एका पणावर शंभर पण, एका कुंभावर शंभर कुंभ इतका नफा मिळवितात.

३७ महान कुलातील मनुष्याने अडवून ठेवलेली भूमी व जनावरांनी व्यापलेली भूमी यांपैकी "मोठ्या कुळातील माणसाने अडवलेली भूमी, खूप उत्पन्न देणारी असली तरी सैनिक पुरविणारी असल्याकारणाने त्याच्याकडून सोडवून घेणे योग्य नाही, कारण त्यात संकट ओढवण्याचा धोका आहे, परंतु पशूंच्या कळपांनी व्यापलेली शेतीस योग्य जमीन सोडवून घेणे योग्य आहे. ३८ कारण, शेतीपुढे गुरेचराईच्या जमिनीला हटावे लागते," असे आचार्यांचे मत आहे. ३९ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ४० मोठ्या कुळातील माणसाने अडवलेली भूमी खूप मोठे उत्पन्न देणारी असली तरी सोडवून घेणे इष्ट आहे, अन्यथा संकट कोसळण्याचा धोका आहे, परंतु पशूंच्या कळपांनी व्यापलेली जमीन कोश व वाहने यांचा पुरवठा करीत असल्यामुळे सोडवणे इष्ट नाही; याला अपवाद धान्यपेरणीला प्रतिबंध करणाऱ्या चराईच्या जमिनीचा.

४१ "दरोडेखोर व रानटी लोक यांपैकी दरोडेखोर रात्रीच्या आडोशाने काम करतात, शरीरावर हल्ला करतात, नेहमी वावरतात, लाखो पण द्रव्य लुटून नेतात आणि देशातील मोठ्या असामींना प्रक्षुब्ध करतात, रानटी लोक दूर सरहद्दीवरील प्रदेशात वावरतात, उघडपणे सर्वांच्या देखत फिरतात आणि देशाच्या एका भागाचीच हानी करतात," असे आचार्यांचे मत आहे. ४२ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ४३ दरोडेखोर गैरसावध लोकांनाच लुटतात, संख्येने थोडे, शक्तिहीन, ओळखण्यास व पकडण्यास सोपे असतात, याउलट रानटी लोक त्यांच्या स्वतःच्या प्रदेशात रहातात, संख्येने पुष्कळ आणि

मृगहस्तिवनयोः मृगाः प्रभूताः प्रभूतमांसचर्मोपकारिणो मन्दग्रासावक्लेशिनः सुनियम्याश्च । ४४ । विपरीता हस्तिनो गृह्यमाणा दुष्टाश्च देशविनाशायेति । ४५ ।

स्वपरस्थानीयोपकारयोः स्वस्थानीयोपकारो धान्यपशुहिरण्यकुप्योपकारो जानपदानामापद्यात्मधारणः । ४६ । विपरीतः परस्थानीयोपकारः । ४७ ।

इति पीडनानि ।

आभ्यन्तरो मुख्यस्तम्भो बाह्योऽमित्राटवीस्तम्भः । ४८ । इति स्तम्भवर्गः ।

ताभ्यां पीडनैर्यथोक्तैश्च पीडितः, सक्तो मुख्येषु, परिहारोपहतः, प्रकीर्णो, मिथ्यासंहृतः, सामन्ताटवीहृत इति कोशसङ्गवर्गः । ४९ ।

पीडनानामनुत्पत्तावुत्पन्नानां च वारणे ।
यतेत देशवृद्ध्यर्थं नाशे च स्तम्भसङ्गयोः ॥ ५० ॥

इति व्यसनाधिकारिकेऽष्टमेऽधिकरणे पीडनवर्गः स्तम्भवर्गः कोशसङ्गवर्गः चतुर्थोऽध्यायः ।
आदितो विंशतिशततमः ।

शूर असतात, ते उघडपणे युद्ध करतात, ते देश बळकावतात व त्यांचा विध्वंस करतात, त्यांचे राजाशी साधर्म्य आहे.

४४ मृगांचे वन व हत्तींचे वन यांपैकी हरीण पुष्कळ असतात, पुष्कळ मांस व चामडी पुरवितात, त्यांच्या खाण्याच्या बाबतीत फार कमी त्रास होतो व त्यांना ताब्यात ठेवणे सोपे असते. ४५ हत्ती याच्या उलट असतात आणि पकडले जात असता व चवताळले म्हणजे देशाचा नाश करतात.

४६ (दुष्काळात वगैरे) आपल्या स्थानीय शहराला केलेली मदत व दुसऱ्याच्या स्थानीयाला केलेली मदत यांपैकी आपल्या स्थानीयाला केलेली मदत (म्हणजे) स्वदेशातील लोकांना धान्य, पशू, द्रव्य व कुप्य यांची मदत आपत्काळी त्यांचे शरीरधारण करते. ४७ शत्रूच्या स्थानीयाला केलेली मदत याच्या उलट असते.

हा झाला पीडाकारक गोष्टींचा विचार.

४८ मुख्य अधिकाऱ्यांनी केलेला अडथळा तो अंतर्गत आणि शत्रू किंवा रानटी टोळ्या यांनी केलेला अडथळा तो बाह्य. असे हे अडथळे होत.

४९ त्या दोन प्रकारच्या अडथळ्यांनी आणि वर सांगितलेल्या पीडनांनी पीडित झालेला (कोश), मुख्य अधिकाऱ्यांनी लाटलेला, सूट दिल्यामुळे घटलेला, इकडेतिकडे विखुरलेला, चुकीने गोळा केलेला; शेजारचे राजे किंवा रानटी टोळ्या यांनी लुटलेला असे हे कोशाला प्रतिबंध होण्याचे प्रकार आहेत.

५० देशाची भरभराट व्हावी यासाठी राजाने पीडा उत्पन्न होऊ नयेत म्हणून, आणि उत्पन्न झाल्याच तर त्या दूर करण्यासाठी आणि अडथळे व कोशप्रतिबंध नष्ट करण्यासाठी प्रयत्न केले पाहिजेत.

५

[ त्रयस्त्रिंशच्छततमं प्रकरणम् – बलव्यसनवर्गः ;
चतुस्त्रिंशच्छततमं प्रकरणम् – मित्रव्यसनवर्गः ]

बलव्यसनानि – अमानितं, विमानितम्, अभृतं, व्याधितं, नवागतं, दूरायातं, परिश्रान्तं, परिक्षीणं, प्रतिहतं, हताग्रवेगम्, अनृतुप्राप्तम्, अभूमिप्राप्तम्, आशानिर्वेदि, परिसृप्तं, कलत्रगर्भि, अन्तःशल्यं, कुपितमूलं, भिन्नगर्भम्, अपसृतम्, अतिक्षिप्तम्, उपनिविष्टं, समाप्तम्, उपरुद्धं, परिक्षिप्तं, छिन्नधान्यपुरुषवीवधं, स्वविक्षिप्तं, मित्रविक्षिप्तं, दूष्ययुक्तं, दुष्टपार्ष्णिग्राहं, शून्यमूलम्, अस्वामिसंहतं, भिन्नकूटम्, अन्धम् इति । १ ।

तेषाममानितविमानितयोरमानितं कृतार्थमानं युध्येत, न विमानितमन्तःकोपम् । २ ।

## पाचवा अध्याय

### प्रकरण १३३ : सैन्याच्या संबंधातील संकटे ;
### प्रकरण १३४ : मित्राच्या संबंधातील संकटे

१ सैन्यावरील संकटे पुढीलप्रमाणे आहेत – गौरव न केलेले (सैन्य), अपमान झालेले, पगार न मिळालेले, रोगग्रस्त झालेले, नवीन आलेले, दूरचा प्रवास करून आलेले, थकलेले, रोडावलेले, भंग पावलेले, पहिल्या हल्ल्यात (वीर) ठार झालेले, प्रतिकूल ऋतूत सापडलेले, प्रतिकूल भूमीवर आलेले, निराशेने खिन्न झालेले, (मुख्य) सोडून गेलेले, स्त्रिया आत असलेले, शल्य आत असलेले, मूळ प्रक्षुब्ध असलेले, आत फाटाफूट असलेले, पळून आलेले, पांगापांग झालेले, शत्रुसैन्याजवळ तळ असलेले, शत्रुसैन्याशी एकजूट केलेले, मार्ग अडविलेले, सर्व बाजूंनी घेरलेले, धान्याचा पुरवठा तुटलेले, सैनिकांचा पुरवठा बंद झालेले, स्वतःच्या राज्यात पांगलेले, मित्राच्या राज्यात पांगलेले, दूष्य माणसांनी युक्त असलेले, पिछाडीवर हल्ल्याची भीती असलेले, मूळ राज्य सैन्यविरहित असलेले, नेता नसलेले, नेता नष्ट झालेले आणि मार्गदर्शनाशिवाय असलेले.

२ त्यांच्यामध्ये गौरव न केलेले व अपमान झालेले ह्या दोन प्रकारच्या सैन्यांपैकी गौरव न केलेले, द्रव्य देऊन त्याचा सत्कार केल्यास, लढू शकेल, अपमानित झालेले मनात तेढ असल्यामुळे लढणार नाही.

अभृतव्याधितयोरभृतं तदात्वकृतवेतनं युध्येत, न व्याधितमकर्मण्यम् । ३ ।

नवागतदूरायातयोर्नवागतमन्यत उपलब्धदेशमनवमिश्रं युध्येत, न दूरायातमायतगतपरिक्लेशम् । ४ ।

परिश्रान्तपरिक्षीणयोः परिश्रान्तं स्नानभोजनस्वप्नलब्धविश्रामं युध्येत, न परिक्षीणमन्यत्राहवे क्षीणयुग्यपुरुषम् । ५ ।

प्रतिहतहताग्रवेगयोः प्रतिहतमग्रपातभग्नं प्रवीरपुरुषसंहतं युध्येत, न हताग्रवेगमग्रपातहतप्रवीरम् । ६ ।

अनृत्वभूमिप्राप्तयोरनृतुप्राप्तं यथर्तुयुग्यशस्त्रावरणं युध्येत, नाभूमिप्राप्तमवरुद्धप्रसारव्यायामम् । ७ ।

आशानिर्वेदिपरिसृप्तयोराशानिर्वेदि लब्धाभिप्रायं युध्येत, न परिसृप्तमपसृतमुख्यम् । ८ ।

३ पगार न मिळालेले व व्याधिग्रस्त यांपैकी पगार न मिळालेले तात्काळ पगार चुकता केला तर लढू शकेल, व्याधिग्रस्त काम करण्यास निरुपयोगी झाल्यामुळे लढू शकणार नाही.

४ नवीन आलेले व दूरचा प्रवास करून आलेले यांपैकी नवीन आलेले सैन्य दुसऱ्यांकडून त्या भूमीची माहिती मिळवून (अगोदर तेथे असलेल्या) नवीन नसलेल्या सैन्यासमवेत लढू शकेल, दूरच्या प्रवासाने थकलेले लढू शकणार नाही.

५ थकलेले व रोडावलेले यांपैकी थकलेले स्नान, भोजन व झोप यांनी ताजेतवाने होऊन लढू शकेल, दुसरीकडील युद्धात वाहने व माणसे मारली गेल्यामुळे रोडावलेले लढू शकणार नाही.

६ भंगलेले व पहिल्या हल्ल्यात वीर पुरुष कामास आलेले यांपैकी पहिल्या हल्ल्यात भंगलेले शूर पुरुषांच्या नेतृत्वाखाली लढू शकेल, पहिल्या हल्ल्यात शूर योद्धे कामास आले तर ते लढू शकणार नाही.

७ प्रतिकूल ऋतूत सापडलेले व प्रतिकूल भूमीवर आलेले यांपैकी प्रतिकूल ऋतूत सापडलेले त्या ऋतूला अनुरूप अशी वाहने, शस्त्रे व आवरणे यांच्या साहाय्याने लढू शकेल, प्रतिकूल भूमीवर आलेले लढू शकणार नाही, कारण त्याच्या पसरण्याला व हालचालींना अडथळा होतो.

८ निराशेने खिन्न झालेले व मुख्य सोडून गेलेले यांपैकी निराशेने खिन्न झालेले त्याची इच्छा पूर्ण केल्यास लढू शकेल, ज्यातील मुख्य त्याला सोडून गेले आहेत ते लढू शकणार नाही.

कलत्रगर्भ्यन्तःशल्ययोः कलत्रगर्भ उन्मुच्य कलत्रं युध्येत, नान्तःशल्यमन्तरमित्रम् । ९ ।

कुपितमूलभिन्नगर्भयोः कुपितमूलं प्रशमितकोपं सामादिभिर्युध्येत, न भिन्नगर्भमन्योन्यस्माद्भिन्नम् । १० ।

अपसृतातिक्षिप्तयोरपसृतमेकराज्यातिक्रान्तं मन्त्रव्यायामाभ्यां सत्त्रमित्रापाश्रयं युध्येत, नातिक्षिप्तमनेकराज्यातिक्रान्तं बह्वाबाधत्वात् । ११ ।

उपनिविष्टसमाप्तयोरुपनिविष्टं पृथग्यानस्थानमतिसंधायारिं युध्येत, न समाप्तमरिणैकस्थानयानम् । १२ ।

उपरुद्धपरिक्षिप्तयोरुपरुद्धमन्यतो निष्क्रम्योपरोद्धारं प्रतियुध्येत, न परिक्षिप्तं सर्वतः प्रतिरुद्धम् । १३ ।

छिन्नधान्यपुरुषवीवधयोः छिन्नधान्यमन्यतो धान्यमानीय जङ्गमस्थावराहारं वा युध्येत, न छिन्नपुरुषवीवधमनभिसारम् । १४ ।

९ आत स्त्रिया असलेले व आत शल्य असलेले यांपैकी स्त्रिया आत असलेले स्त्रियांना सोडून देऊन लढू शकेल; शल्य आत असलेले, शत्रू आत असल्यामुळे, लढू शकणार नाही.

१० मूळ प्रक्षुब्ध असलेले व आत फाटाफूट असलेले यांपैकी मूळ प्रक्षुब्ध झालेल्याचा प्रक्षोभ सामादी उपायांनी शमविल्यास ते लढू शकेल, आत फाटाफूट असलेले परस्परातील फुटीमुळे लढू शकणार नाही.

११ पळून आलेले व पांगापांग झालेले यांपैकी एका राज्यात पळून आलेले (दुर्गासारख्या) बिकट जागेचा अथवा मित्राचा आसरा घेऊन कारस्थानांनी व हालचालींनी लढू शकेल, पांगापांग झालेले अनेक राज्यांत गेलेले असल्यामुळे लढू शकणार नाही, कारण त्यात पुष्कळ धोके आहेत.

१२ शत्रुसैन्याजवळ तळ असलेले व शत्रुसैन्याशी एक झालेले यांपैकी जवळ तळ असलेले, दोघांचे मुक्काम व कूच निरनिराळे असल्यामुळे शत्रूला फसवून लढू शकेल, शत्रूशी एक झालेले, मुक्काम व कूच एकत्र असल्यामुळे लढू शकणार नाही.

१३ मार्ग अडविलेले व सर्व बाजूंनी घेरलेले यांपैकी मार्ग अडविलेले दुसरीकडून निघून जाऊन अडविणाऱ्याचा मुकाबला करू शकेल, सर्व बाजूंनी घेरलेले तसे करू शकणार नाही.

१४ धान्यपुरवठा बंद झालेले व सैनिकांचा पुरवठा बंद झालेले यांपैकी धान्यपुरवठा बंद झालेले दुसरीकडून धान्य आणून अथवा मांसाहार व शाकाहार करून लढू शकेल, सैनिकांचा पुरवठा बंद झालेले, कुमक न मिळाल्याने लढू शकणार नाही.

**स्वविक्षिप्तमित्रविक्षिप्तयोः स्वविक्षिप्तं स्वभूमौ विक्षिप्तं सैन्यमापदि शक्यमावाहयितुं, न मित्रविक्षिप्तं विप्रकृष्टदेशकालत्वात् । १५ ।**

**दूष्ययुक्तदुष्टपार्ष्णिग्राहयोर्दूष्ययुक्तमाप्तपुरुषाधिष्ठितमसंहतं युध्येत, न दुष्टपार्ष्णिग्राहं पृष्ठाभिघातत्रस्तम् । १६ ।**

**शून्यमूलास्वामिसंहतयोः शून्यमूलं कृतपौरजानपदारक्षं सर्वसंदोहेन युध्येत, नास्वामिसंहतं राजसेनापतिहीनम् । १७ ।**

**भिन्नकूटान्धयोर्भिन्नकूटमन्याधिष्ठितं युध्येत, नान्धमदेशिकम् । इति । १८ ।**

**दोषशुद्धिर्बलावापः सत्त्रस्थानातिसंहितम् ।**
**संधिश्चोत्तरपक्षस्य बलव्यसनसाधनम् ।। १९ ।।**
**रक्षेत्स्वदण्डं व्यसने शत्रुभ्यो नित्यमुत्थितः ।**
**प्रहरेद्दण्डरन्ध्रेषु शत्रूणां नित्यमुत्थितः ।। २० ।।**

१५ स्वतःच्या राज्यात पांगलेले व मित्राच्या राज्यात पांगलेले यांपैकी स्वतःच्या राज्यात पांगलेले सैन्य, आपल्या राज्यात असल्यामुळे, आपत्काली गोळा करणे शक्य आहे, मित्राच्या राज्यात पांगलेले, दूर असल्यामुळे व वेळ लागणार असल्यामुळे, गोळा करणे शक्य नाही.

१६ आत दूष्य असलेले व पिछाडीवर हल्ल्याची भीती असलेले यांपैकी दूष्ययुक्त सैन्य विश्वासू अधिकाऱ्यांच्या हाताखाली (इतर विभागांपासून) स्वतंत्र ठेवल्यास लढू शकेल, पिछाडीवर हल्ल्याची भीती असलेले त्या भीतीमुळे लढू शकणार नाही.

१७ मूळ राज्य सैन्यविरहित असलेले व स्वामीवाचून असलेले यांपैकी मूळ राज्य सैन्यविरहित असलेले, पुरवासी व जनपदनिवासी यांच्यामार्फत राज्याच्या संरक्षणाची व्यवस्था करून एकत्रित झालेल्या सर्व सैन्यानिशी लढू शकेल, स्वामिविरहित, राजा किंवा सेनापती यांच्यापासून ताटातूट झालेले लढू शकणार नाही.

१८ नेता नष्ट झालेले व मार्गदर्शन नसलेले यांपैकी नेता कामास आलेले दुसऱ्याच्या नेतृत्वाखाली लढू शकेल, मार्गदर्शनाशिवाय असलेले, आंधळे, लढू शकणार नाही.

१९ दोष काढून टाकणे, सैन्याचे बळ वाढविणे, दुर्गम ठिकाणी आसरा घेणे व फसविणे, आणि वरचढ पक्षाशी संधी करणे हे सैन्यावरील संकटे दूर करण्याचे उपाय होत.

२० राजाने नेहमी उद्यमशील राहून संकटाच्या वेळी आपल्या सैन्याचे शत्रूंपासून रक्षण करावे. तसेच नेहमी उद्यमशील राहून शत्रूंच्या सैन्याच्या मर्मस्थानी त्याच्यावर हल्ला चढवावा.

यतोनिमित्तं व्यसनं प्रकृतीनामवाप्नुयात् ।
प्रागेव प्रतिकुर्वीत तन्निमित्तमतन्द्रितः ॥ २१ ॥
अभियातं स्वयं मित्रं संभूयान्यवशेन वा ।
परित्यक्तमशक्त्या वा लोभेन प्रणयेन वा ॥ २२ ॥
विक्रीतमभियुञ्जाने संग्रामे वाऽपवर्तिना ।
द्वैधीभावेन वाऽमित्रं यास्यता वाऽन्यमन्यतः ॥ २३ ॥
पृथग्वा सहयाने वा विश्वासेनातिसंहितम् ।
भयावमानालस्यैर्वा व्यसनान्न प्रमोक्षितम् ॥ २४ ॥
अवरुद्धं स्वभूमिभ्यः समीपाद्वा भयाद्गतम् ।
आच्छेदनाददानाद्वा दत्त्वा वाऽप्यवमानितम् ॥ २५ ॥
अत्याहारितमर्थं वा स्वयं परमुखेन वा ।
अतिभारे नियुक्तं वा भङक्त्वा परमुपस्थितम् ॥ २६ ॥
उपेक्षितमशक्त्या वा प्रार्थयित्वा विरोधितम् ।
कृच्छ्रेण साध्यते मित्रं सिद्धं चाशु विरज्यति ॥ २७ ॥

२१ ज्या कारणामुळे प्रकृतींवर संकट येण्याचा संभव आहे त्या कारणावर जागरूक राहून, उपाययोजना अगोदरच करून ठेवावी.

२२–२७ ज्या मित्रावर स्वतः होऊन अथवा दुसऱ्या कोणाच्या दबावामुळे एकजूट करून (विजिगीषू) चाल करून जातो; किंवा ज्या मित्राचा, शक्ती नसल्यामुळे, लोभामुळे अथवा (दुसऱ्यावरील) प्रेमामुळे, त्याग केला आहे; किंवा ज्या मित्रावर हल्ला झाला असता विजिगीषू युद्धातून अंग काढून घेऊन, अथवा स्वतः द्वैधीभावाचा अवलंब करून दुसऱ्या दिशेला दुसऱ्या शत्रूवर स्वारी करण्याच्या उद्देशाने, (ज्या मित्राला) त्याच्यावर हल्ला करणाऱ्याला विकला आहे; किंवा ज्या मित्राने विश्वास ठेऊन स्वतंत्रपणे अथवा एकत्र स्वारी केली असता (विजिगीषूने) त्याची फसवणूक केली आहे; किंवा ज्या मित्राची (दुसऱ्या कोणाच्या) भीतीमुळे, त्याला तुच्छ लेखल्यामुळे अथवा आळसामुळे संकटातून सुटका केली नाही; किंवा जो मित्र त्याच्या स्वतःच्या राज्यात जाताना अडविला गेला असता भीतीने विजिगीषूपासून निघून गेला आहे; ज्या मित्राचा, त्याच्यापासून बळजबरीने काही घेतल्यामुळे अथवा काही न दिल्यामुळे अथवा काही दिल्यामुळेसुद्धा, अपमान झाला आहे; किंवा ज्या मित्रापासून स्वतः किंवा दुसऱ्यामार्फत खूप धन उकळले आहे; किंवा ज्या मित्राला अति भारी कामगिरी सांगितली असता त्यात मोडून पडून जो शत्रूला जाऊन मिळाला आहे; किंवा ज्या मित्राची त्याच्या शक्तिहीनतेमुळे उपेक्षा केल्यानंतर (तो शक्तिसंपन्न झाल्यावर त्याची) मनधरणी करून ज्याचा विरोध ओढवून घेतला आहे –

कृतप्रयासं मान्यं वा मोहान्मित्रममानितम् ।
मानितं वा न सदृशं शक्तितो वा निवारितम् ।। २८ ।।
मित्रोपघातत्रस्तं वा शङ्कितं वाऽरिसंहितात् ।
दूष्यैर्वा भेदितं मित्रं साध्यं सिद्धं च तिष्ठति ।। २९ ।।
तस्मान्नोत्पादयेदेनान् दोषान्मित्रोपघातकान् ।
उत्पन्नान् वा प्रशमयेद्गुणैर्दोषोपघातिभिः ।। ३० ।।

इति व्यसनाधिकारिकेऽष्टमेऽधिकरणे बलव्यसनवर्गः मित्रव्यसनवर्गः पञ्चमोऽध्यायः। आदित एकविंशतिशततमः ।

एतावंता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य व्यसनाधिकारिकम् अष्टममधिकरणं समाप्तम् ।

असा मित्र आपल्या बाजूला मोठ्या कष्टाने वळविता येतो आणि तो वळला तरी लवकरच नाराज होतो.

२८–२९ ज्या मित्राने आपल्यासाठी मेहनत घेतली आहे किंवा जो सन्माननीय आहे तरीही मूर्खपणामुळे ज्याचा सन्मान केला नाही किंवा ज्याला त्याच्या योग्यतेप्रमाणे मान दिला नाही, किंवा ज्या मित्राला त्यांची शक्ती वाढविण्यापासून परावृत्त केले आहे, किंवा जो मित्र (दुसऱ्या) मित्राला (विजिगीषूने) केलेल्या इजेमुळे भ्याला आहे, किंवा जो मित्र शत्रूशी संधी केलेल्या विजिगीषूबद्दल संशयित झाला आहे, किंवा ज्याला दूष्य लोकांनी विजिगीषूपासून फोडला आहे – असा मित्र आपल्या बाजूला वळविता येतो आणि वळून आल्यानंतर दृढ मैत्रीत रहातो.

३० म्हणून मैत्रीत बिघाड आणणारे हे दोष उत्पन्न होऊ देऊ नयेत, किंवा ते उत्पन्न झालेच तर दोष दूर करणाऱ्या गुणांनी ते काढून टाकावेत.

आठवे अधिकरण समाप्त

# अभियास्यत्कर्म – नवममधिकरणम्

१

[पञ्च त्रिंशच्छततमं प्रकरणम् – शक्तिदेशकालबलाबलज्ञानम्;
षट्त्रिंशच्छततमं प्रकरणम् – यात्राकालाः]

विजिगीषुरात्मनः परस्य च बलाबलं शक्तिदेशकालयात्राकालबलसमुद्दानकालपश्चात्कोपक्षयव्ययलाभापदां ज्ञात्वा विशिष्टबलो यायात्, अन्यथाऽऽसीत ।१।

'उत्साहप्रभावयोरुत्साहः श्रेयान् ।२। स्वयं हि राजा शूरो बलवानरोगः कृतास्त्रो दण्डद्वितीयोऽपि शक्तः प्रभाववन्तं राजानं जेतुम् ।३। अल्पोऽपि चास्य दण्डस्तेजसा कृत्यकरो भवति ।४। निरुत्साहस्तु प्रभाववान् राजा विक्रमाभिपन्नो नश्यति' इत्याचार्याः ।५।

## नववे अधिकरण – मोहिमेवर जाण्याची तयारी

### पहिला अध्याय

### प्रकरण १३५ : शक्ती, देश व काल यांच्या बलाबलाचे ज्ञान;
### प्रकरण १३६ : मोहिमेसाठी योग्य काल

१ विजिगीषूने आपल्या स्वतःच्या आणि शत्रूच्या शक्ती, देश व काल, मोहिमेचा काल, सैन्य उभारण्याचा काल, पिछाडीला धोका, वाहनांची, माणसांची व द्रव्याची हानी, संभाव्य लाभ आणि आपत्ती ह्या सर्वांचे बलाबल विचारात घेऊन शत्रूपेक्षा वरचढ असल्यास स्वारीवर निघावे, नाहीतर स्वस्थ रहावे.

२ "उत्साहशक्ती व प्रभावशक्ती यांपैकी उत्साहशक्ती श्रेष्ठ. ३ कारण, राजा स्वतः शूर, बलवान, निरोगी, शस्त्रविद्येत निपुण असला तर केवळ सैन्याच्या साहाय्याने प्रभावशक्तीने (कोश व सैन्य यांनी) संपन्न असलेल्या राजावर विजय मिळवू शकतो. ४ त्याचे थोडेसेही सैन्य पराक्रमामुळे आपला कार्यभाग साधते. ५ परंतु उत्साह नसलेला राजा प्रभावशक्तीने युक्त असूनही (शत्रूच्या) पराक्रमापुढे हार खाऊन नाश पावतो," असे आचार्यांचे मत आहे.

नेति कौटिल्यः । ६ । प्रभाववानुत्साहवन्तं राजानं प्रभावेनातिसंधत्ते तद्विशिष्टमन्यं राजानमावाह्य भृत्वा क्रीत्वा प्रवीरपुरुषान् । ७ । प्रभूतप्रभावहयहस्तिरथोपकरणसंपन्नश्चास्य दण्डः सर्वत्राप्रतिहतश्चरति । ८ । उत्साहवतश्च प्रभाववन्तो जित्वा क्रीत्वा च स्त्रियो बालाः पङ्गवोऽन्धाश्च पृथिवीं जिग्युरिति । ९ ।

'प्रभावमन्त्रयोः प्रभावः श्रेयान् । १० । मन्त्रशक्तिसंपन्नो हि वन्ध्यबुद्धिरप्रभावो भवति । ११ । मन्त्रकर्म चास्य निश्चितमप्रभावो गर्भधान्यमवृष्टिरिवोपहन्ति' इत्याचार्याः । १२ ।

नेति कौटिल्यः । १३ । मन्त्रशक्तिः श्रेयसी । १४ । प्रज्ञाशास्त्रचक्षुर्हि राजाऽल्पेनापि प्रयत्नेन मन्त्रमाधातुं शक्तः परानुत्साहप्रभाववतश्च सामादिभिर्योगोपनिषद्भ्यां चातिसंधातुम् । १५ ।

एवमुत्साहप्रभावमन्त्रशक्तीनामुत्तरोत्तराधिकोऽतिसंधत्ते । १६ ।

६ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ७ प्रभावसंपन्न राजा उत्साहवान राजावर, प्रभावाच्या बळावर त्यात (उत्साहशक्तीत) अधिक संपन्न असलेल्या दुसऱ्या राजाला आवाहन करून, शूरवीर पुरुष भाडयाने अथवा विकत घेऊन, मात करतो. ८ आणि प्रचंड सामर्थ्य, घोडे, हत्ती, रथ इत्यादी साधनांनी संपन्न असे त्याचे सैन्य कोठेही अटकाव न होता सर्वत्र जाऊ शकते. ९ आणि प्रभावशक्तीने संपन्न असणाऱ्यांनी – स्त्रिया, मुले, पांगळे व आंधळे यांनीसुद्धा – उत्साहवान राजांना जिंकून आणि विकत घेऊन पृथ्वी जिंकून घेतली आहे.

१० "प्रभावशक्ती व मंत्रशक्ती यात प्रभावशक्ती श्रेष्ठ. ११ कारण मंत्रशक्तिसंपन्न राजा प्रभावहीन असेल तर त्याचे शहाणपण वांझ (निरुपयोगी) ठरते. १२ आणि प्रभावाचा अभाव त्याच्या मंत्रशक्तीचा, अवर्षण पेरलेल्या धान्याचा नाश करते त्याप्रमाणे, नाश करून टाकतो," असे आचार्यांचे मत आहे.

१३ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. १४ मंत्रशक्तीच श्रेष्ठ. १५ कारण, बुद्धी व शास्त्र ह्या दोन नेत्रांचा उपयोग करणारा राजा थोडयाही प्रयत्नाने मंत्रद्वारा योग्य निर्णय घेण्यास समर्थ होतो आणि सामादी उपाय तसेच गुप्त व गुह्य प्रयोग यांच्या द्वारा उत्साह व प्रभाव यांनी युक्त असलेल्या शत्रूंवर मात करतो.

१६ याप्रमाणे उत्साह, प्रभाव व मंत्र या तीन शक्तींपैकी जो नंतरनंतरच्या शक्तीने अधिक संपन्न असतो तो इतरांवर मात करतो.

देशः पृथिवी ।१७। तस्यां हिमवत्समुद्रान्तरमुदीचीनं योजनसहस्रपरिमाणं तिर्यक् चक्रवर्तिक्षेत्रम् । १८ । तत्रारण्यो ग्राम्यः पार्वत औदको भौमः समो विषम इति विशेषाः । १९ । तेषु यथास्वबलवृद्धिकरं कर्म प्रयुञ्जीत । २० । यत्रात्मनः सैन्यव्यायामानां भूमिः, अभूमिः परस्य, स उत्तमो देशः, विपरीतोऽधमः, साधारणो मध्यमः । २१ ।

कालः शीतोष्णवर्षात्मा । २२ । तस्य रात्रिरहः पक्षो मास ऋतुरयनं संवत्सरो युगमिति विशेषाः । २३ । तेषु यथास्वबलवृद्धिकरं कर्म प्रयुञ्जीत । २४ । यत्रात्मनः सैन्यव्यायामानामृतुः, अनृतुः परस्य, स उत्तमः कालः, विपरीतोऽधमः, साधारणो मध्यमः । २५ ।

'शक्तिदेशकालानां तु शक्तिः श्रेयसी' इत्याचार्याः । २६ । शक्तिमान् हि निम्नस्थलवतो देशस्य शीतोष्णवर्षवतश्च कालस्य शक्तः प्रतीकारे भवति । २७ । 'देशः श्रेयान्' इत्येके । २८ । 'स्थलगतो हि श्वा नक्रं विकर्षति, निम्नगतो नक्रः श्वानम्' इति । २९ । 'कालः श्रेयान्' इत्येके । ३० । 'दिवा काकः कौशिकं

१७ देश म्हणजे ही पृथ्वी. १८ तिच्यात हिमवान पर्वत व समुद्र ह्यांच्या दरम्यान उत्तरेकडील एक हजार योजने तिरकस असलेला प्रदेश म्हणजे चक्रवर्ती राजाच्या पराक्रमाचे क्षेत्र. १९ त्यात अरण्य, गाव, पर्वत, पाणथळ जमीन, कोरडी जमीन, सपाट जमीन, उंचसखल जमीन असे निरनिराळे प्रकार आहेत. २० त्या प्रदेशांत ज्यायोगे त्याच्या स्वतःच्या सामर्थ्यात वाढ होईल अशी कामे करावीत. २१ जेथे आपल्या स्वतःच्या सैन्याच्या हालचालींना सोयीची जागा असते व शत्रूला गैरसोयीची तों देश उत्तम, याच्या उलट असलेला तो कनिष्ठ, उभयतांना सारखाच सोयीगैरसोयीचा तो मध्यम.

२२ काल म्हणजे हिवाळा, उन्हाळा व पावसाळा. २३ रात्र, दिवस, पंधरवडा, महिना, ऋतू, अयन, संवत्सर, युग हे त्याचे विभाग. २४ त्या विभागांत ज्यायोगे त्याच्या स्वतःच्या सामर्थ्यात वाढ होईल अशी कामे करावीत. २५ जेव्हा आपल्या स्वतःच्या सैन्याच्या हालचालींना अनुकूल वेळ असते व शत्रूला प्रतिकूल तो काल उत्तम, याच्या उलट तो कनिष्ठ, उभयतांना सारखाच अनुकूल वा प्रतिकूल तो मध्यम.

२६ "शक्ती, देश व काल यांपैकी शक्ती श्रेष्ठ," असे आचार्यांचे मत आहे. २७ "कारण, शक्तिसंपन्न राजा, पाणथळ जमीन व कोरडी जमीन, तसेच थंडी, ऊन व पाऊस असलेले काल यांच्या प्रतिकूलतेवर उपाययोजना करू शकतो." २८ "देश श्रेष्ठ," असे काहींचे म्हणणे आहे. २९ "कारण, कोरडया जमिनीवर कुत्रा मगरीला ओढतो, पाण्यात मगर कुत्र्याला." ३० "काल श्रेष्ठ," असे इतर काहींचे म्हणणे आहे. ३१ "दिवसा कावळा घुबडाला मारतो,

हन्ति, रात्रौ कौशिकः काकम्' इति । ३१ । नेति कौटिल्यः । ३२ । परस्परसाधका हि शक्तिदेशकालाः । ३३ ।

तैरभ्युच्चितस्तृतीयं चतुर्थं वा दण्डस्यांशं मूले पार्ष्ण्यां प्रत्यन्ताटवीषु च रक्षा विधाय कार्यसाधनसहं कोशदण्डं चादाय क्षीणपुराणभक्तमगृहीतनवभक्तमसंस्कृतदुर्गममित्रं वार्षिकं चास्य सस्यं हैमनं च मुष्टिमुपहन्तुं मार्गशीर्षीं यात्रां यायात् । ३४ । हैमनं चास्य सस्यं वासन्तिकं च मुष्टिमुपहन्तुं चैत्रीं यात्रां यायात् । ३५ । क्षीणतृणकाष्ठोदकमसंस्कृतदुर्गममित्रं वासन्तिकं चास्य सस्यं वार्षिकीं च मुष्टिमुपहन्तुं ज्येष्ठामूलीयां यात्रां यायात् । ३६ ।

अत्युष्णमल्पयवसेन्धनोदकं वा देशं हेमन्ते यायात् । ३७ । तुषारदुर्दिनमगाधनिम्नप्रायं गहनतृणवृक्षं वा देशं ग्रीष्मे यायात् । ३८ । स्वसैन्यव्यायामयोग्यं परस्यायोग्यं वर्षति यायात् । ३९ ।

रात्री घुबड कावळघाला." ३२ हे सर्व बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ३३ कारण, शक्ती, देश व काल हे परस्परांचे (पूरक व) सिद्धिकारक आहेत.

३४ ह्या तिहींच्या बाबतीत (शत्रूहून) वरचढ असला म्हणजे सैन्याचा एकतृतीयांश अथवा एकचतुर्थांश भाग मूळ राज्य, पिछाडी व सरहद्दीवरील रानटी टोळया यांच्या बंदोबस्तासाठी मागे ठेवून, कार्य सिद्ध करण्यास समर्थ असा कोश व सैन्य बरोबर घेऊन, शत्रूचे जुने धान्याचे साठे संपुष्टात आले असता, नवीन धान्याचा संग्रह केला नसता व त्याच्या किल्ल्याची डागडुजी झालेली नसता, वर्षाऋतूत पेरण्या होऊन शेतात उभे असलेले धान्याचे पीक व हिवाळयात होणाऱ्या पेरण्या नष्ट करण्याच्या उद्देशाने, मार्गशीर्ष महिन्यात त्याच्यावर स्वारी करून जावे. ३५ हेमन्त ऋतत पेरून तयार झालेले त्याचे धान्य व वसंत ऋतूतील पेरण्या नष्ट करण्याच्या उद्देशाने चैत्र महिन्यात स्वारीवर निघावे. ३६ जेव्हा शत्रूचे गवत, लाकूडफाटा व पाणी कमी झाले असतील, त्याच्या दुर्गाची डागडुजी झाली नसेल तेव्हा वसंत ऋतूत पेरण्या होऊन तयार झालेले धान्य व वर्षाऋतूतील पेरण्या नष्ट करण्याच्या उद्देशाने ज्येष्ठ महिन्यात स्वारीवर निघावे.

३७ अतिशय उष्ण असलेल्या किंवा ज्यात गवत, जळण व पाणी कमी आहे अशा देशावर हेमंत ऋतूत स्वारी करावी. ३८ सतत हिमवर्षाव होत असणाऱ्या, मुख्यतः खूप खोल पाणी असलेल्या अथवा दाट गवत व झाडी असलेल्या देशावर ग्रीष्म ऋतूत स्वारी करावी. ३९ आपल्या सैन्याच्या हालचालींना अनुकूल व शत्रूला प्रतिकूल अशा देशावर पाऊस पडत असता स्वारी करावी.

मार्गशीर्षी तैषीं चान्तरेण दीर्घकालां यात्रां यायात्, चैत्रीं वैशाखीं चान्तरेण मध्यमकालां, ज्येष्ठामूलीयामाषाढीं चान्तरेण ह्रस्वकालाम्, उपोषिष्यन्व्यसने चतुर्थीम् । ४० । व्यसनाभियानं विगृह्ययाने व्याख्यातम् । ४१ ।

प्रायशश्चाचार्याः 'परव्यसने यातव्यम्' इत्युपदिशन्ति । ४२ । शक्त्युदये यातव्यमनैकान्तिकत्वाद्व्यसनानामिति कौटिल्यः । ४३ । यदा वा प्रयातः कर्शयितुमुच्छेत्तुं वा शक्नुयादमित्रं तदा यायात् । ४४ ।

अत्युष्णोपक्षीणे काले हस्तिबलप्रायो यायात् । ४५ । हस्तिनो ह्यन्तःस्वेदाः कुष्ठिनो भवन्ति । ४६ । अनवगाहमानास्तोयमपिबन्तश्चान्तरवक्षाराच्चान्धीभवन्ति । ४७ । तस्मात्प्रभूतोदके देशे वर्षति च हस्तिबलप्रायो यायात् । ४८ । विपर्यये खरोष्ट्राश्वबलप्रायो देशमल्पवर्षपङ्कम् । ४९ । वर्षति मरुप्रायं चतुरङ्गबलो यायात् । ५० ।

४० मार्गशीर्षी पौर्णिमा व पौषी पौर्णिमा यांच्या दरम्यानच्या काळात लांब मुदतीच्या मोहिमेवर निघावे, चैत्री व वैशाखी पौर्णिमांच्या दरम्यानच्या काळात मध्यम मुदतीच्या मोहिमेवर, ज्येष्ठी व आषाढी पौर्णिमांच्या दरम्यानच्या काळात अल्प मुदतीच्या मोहिमेवर, शत्रू संकटात असल्यास त्याला नेस्तनाबूत करण्याच्या उद्देशाने केव्हाही चौथ्या मोहिमेवर निघावे. ४१ शत्रू संकटात असता करावयाच्या स्वारीचे वर्णन (अध्याय ७.४ मध्ये) 'विगृह्य यान' या प्रकरणात केले आहे.

४२ सामान्यपणे शत्रू संकटात असता चाल करून जावे असे आचार्य सांगतात. ४३ कौटिल्याचे म्हणणे असे की शक्तिसंपन्न झाल्यावरच स्वारी करावी, कारण संकटाबद्दल काही निश्चिती नाही. ४४ किंवा जेव्हा स्वारी केली असता शत्रूला दुर्बल करता येईल अथवा त्याचा उच्छेद करता येईल तेव्हा स्वारी करावी.

४५ फार उष्णता कमी झाली असेल अशा वेळी मुख्यतः हत्तींचे सैन्य घेऊन निघावे. ४६ कारण, (अति उष्णतेने) हत्तींना घाम फुटून त्यांना कुष्ठरोग होतो. ४७ आणि पाण्यात डुबता न आले व प्यावयास पाणी न मिळाले तर ते आतील स्रावाने आंधळे होतात. ४८ म्हणून पुष्कळ पाणी असलेल्या देशात आणि पाऊस पडत असेल तेव्हा मुख्यतः हत्तींचे सैन्य घेऊन निघावे. ४९ याच्या उलट स्थिती असता, थोडा पाऊस व चिखल असलेल्या देशात गाढव, उंट व घोडे हे मुख्यतः असलेले सैन्य घेऊन निघावे. ५० मुख्यतः वाळवंट असलेल्या प्रदेशात पाऊस पडत असता चारही प्रकारच्या सैन्यानिशी निघावे.

**समविषमनिम्नस्थलह्रस्वदीर्घवशेन वाऽध्वनो यात्रां विभजेत् । ५१ ।**
**सर्वा वा ह्रस्वकालाः स्युर्यातव्याः कार्यलाघवात् ।**
**दीर्घाः कार्यगुरुत्वाद्वा वर्षावासः परत्र च ।। ५२ ।।**

**इत्यभियास्यत्कर्मणि नवमेऽधिकरणे शक्तिदेशकालबलाबलज्ञानं यात्राकालाः प्रथमोऽध्यायः ।**
**आदितो द्वाविंशतिशततमः ।**

**२**

## [ सप्तत्रिंशच्छततमं प्रकरणम् – बलोपादानकालाः ; अष्टत्रिंशच्छततमं प्रकरणम् – संनाहगुणाः ; एकोनचत्वारिंशच्छततमं प्रकरणम् – प्रतिबलकर्म ]

**मौलभृतकश्रेणीमित्रामित्राटवीबलानां समुद्दानकालाः । १ ।**

**मूलरक्षणादतिरिक्तं मौलबलम् ; अत्यावापयुक्ता वा मौला मूले विकुर्वीरन् ; बहुलानुरक्तमौलबलः सारबलो वा प्रतियोद्धा, व्यायामेन योद्धव्यम् ; प्रकृष्टेऽध्वनि**

५१ मोहिमेची आखणी मार्गाच्या सपाटीच्या अथवा उंचसखलपणाच्या अनुरोधाने, पाणथळ अथवा कोरडा प्रदेश यांच्या अनुरोधाने आणि कमी अथवा अधिक अंतराच्या अनुरोधाने करावी.

५२ कार्य थोडे असल्यास सर्व मोहिमा अल्प मुदतीच्या कराव्यात, किंवा कार्य मोठे असल्यास दीर्घ मुदतीच्या कराव्यात आणि वर्षा ऋतूत मुक्काम शत्रूच्या मुलखात करावा.

### दुसरा अध्याय

### प्रकरण १३७ : विविध प्रकारचे सैन्य उभारण्यास योग्य काल ; प्रकरण १३८ : सैन्याच्या सज्जीकरणाची श्रेष्ठाश्रेष्ठता ; प्रकरण १३९ : शत्रुसैन्याला यथोचित मुकाबला

१ वंशपरंपरेने आलेले सैन्य, पगारी सैन्य, श्रेणीबद्ध सैन्य, मित्राचे सैन्य, शत्रूचे सैन्य आणि रानटी टोळ्यांचे सैन्य यांचा उपयोग करण्याचे योग्य काल (पुढीलप्रमाणे) :

२ मूळ राज्याच्या रक्षणासाठी आवश्यक असलेल्या सैन्याहून अधिक मौलबल असेल तेव्हा, मौलबलात पुष्कळ दूष्य असल्यामुळे ते मागे ठेवल्यास उपद्रवकारक होण्याचा संभव असेल तेव्हा, शत्रूकडे पुष्कळ एकनिष्ठ मौलबल किंवा बलाढ्य सैन्य असल्यामुळे रणांगणावर लढावे लागणार असेल तेव्हा, दूरच्या प्रयाणात अथवा दीर्घ कालावधीत वाहने, माणसे व द्रव्य यांची हानी

काले वा क्षयव्ययसहत्वान्मौलानाम्; बहुलानुरक्तसंपाते च यातव्यस्योपजापभयादन्यसैन्यानां भृतादीनामविश्वासे; बलक्षये वा सर्वसैन्यानाम् – इति मौलबलकालः । २ ।

'प्रभूतं मे भृतबलमल्पं च मौलबलम्'; 'परस्याल्पं विरक्तं वा मौलबलं, फल्गुप्रायमसारं वा भृतसैन्यम्'; 'मन्त्रेण योद्धव्यमल्पव्यायामेन'; 'ह्रस्वो देशः कालो वा तनुक्षयव्ययः'; 'अल्पावापं शान्तोपजापं विश्वस्तं वा मे सैन्यम्'; 'परस्याल्पः प्रसारो हन्तव्यः' – इति भृतबलकालः । ३ ।

'प्रभूतं मे श्रेणीबलं, शक्यं मूले यात्रायां चाधातुम्'; 'ह्रस्वः प्रवासः, श्रेणीबलप्रायः प्रतियोद्धा मन्त्रव्यायामाभ्यां प्रतियोद्धुकामः'; दण्डबलव्यवहारः – इति श्रेणीबलकालः । ४ ।

'प्रभूतं मे मित्रबलं शक्यं मूले यात्रायां चाधातुम्;' 'अल्पः प्रवासो मन्त्रयुद्धाच्च भूयो व्यायामयुद्धम्'; 'मित्रबलेन वा पूर्वमटवीं नगरस्थानमासारं वा

मौलबलच सोसू शकते म्हणून तेव्हा, पुष्कळ राजनिष्ठ सैन्य एकत्रित झाले तरी ज्याच्यावर स्वारी करावयाची त्याच्या गुप्त कारवायांना पगारी वगैरे इतर सैन्ये बळी पडण्याचा संभव असल्यामुळे त्यांच्यावर विश्वास ठेवता येत नसेल तेव्हा, किंवा इतर सर्व सैन्यांचे सामर्थ्य घटले असेल तेव्हा – हे मौलबलाच्या उपयोगाचे काल.

३ (जेव्हा असे वाटेल की,) "मजजवळ पगारी सैन्य भरपूर आहे, मौलबल थोडे; (किंवा) शत्रूकडे मौलबल थोडे किंवा निष्ठेपासून ढळलेले आणि पगारी सैन्य मुख्यतः कमकुवत अथवा निःसार आहे; मंत्रयुद्ध (अधिक) करावयाचे आहे, रणांगणावरील युद्ध कमी; थोडेच अंतर जावयाचे आहे किंवा मोहिमेला फार वेळ लागणार नाही आणि वाहने, माणसे व द्रव्य यांची हानी फार कमी होईल; माझ्या सैन्यात दूष्य कमी आहेत, शत्रूच्या गुप्त कारवाया चालत नाहीत, म्हणून सैन्यावर विश्वास ठेवावयास हरकत नाही; शत्रूच्या अल्पशाच हल्ल्याचा बीमोड करावयाचा आहे," तेव्हा पगारी सैन्याच्या उपयोगाचे काल.

४ "माझ्याकडे श्रेणीबल भरपूर आहे, मूळ राज्याच्या रक्षणासाठी ठेवता येईल आणि मोहिमेवर नेता येईल" (असे वाटेल तेव्हा); "प्रवास थोडा आहे आणि शत्रूकडे मुख्यतः श्रेणीबल असल्यामुळे तो मंत्रयुद्ध आणि रणांगणावरील युद्ध दोहोंचा उपयोग करू इच्छितो" (असे वाटेल तेव्हा) ; सैन्याच्या बळाचा वापर करावयाचा असेल तेव्हा – हे श्रेणीबलाच्या उपयोगाचे काल.

५ (जेव्हा असे वाटेल की,) "माझ्याकडे मित्राचे सैन्य भरपूर आहे, काही राज्यरक्षणासाठी ठेऊन बाकीचे बरोबर नेणे शक्य आहे; प्रवास थोडा आहे आणि मंत्रयुद्धापेक्षा रणांगणावर युद्ध अधिक होईल; किंवा मित्राच्या सैन्याला

**योधयित्वा पश्चात्स्वबलेन योधयिष्यामि'; 'मित्रसाधारणं वा मे कार्यम्'; 'मित्रायत्ता वा मे कार्यसिद्धिः'; 'आसन्नमनुग्राह्यं वा मे मित्रम्'; 'अत्यावापं वाऽस्य सादयिष्यामि' – इति मित्रबलकालः।५।**

**'प्रभूतं मे शत्रुबलं, शत्रुबलेन योधयिष्यामि नगरस्थानमटवीं वा, तत्र मे श्ववराहयोः कलहे चण्डालस्येवान्यतरसिद्धिर्भविष्यति'; 'आसाराणामटवीनां वा कण्टकमर्दनमेतत्करिष्यामि';– अत्युपचितं वा कोपभयान्नित्यमासन्नमरिबलं वासयेद्, अन्यत्राभ्यन्तरकोपशङ्कायाः – शत्रुयुद्धावरयुद्धकालश्च – इत्यमित्रबल-कालः।६।**

**तेनाटवीबलकालो व्याख्यातः।७। मार्गदेशिकम्; परभूमियोग्यम्; अरियुद्ध-प्रतिलोमम्; अटवीबलप्रायः शत्रुर्वा, 'बिल्वं बिल्वेन हन्यताम्'; अल्पः प्रसारो हन्तव्यः – इत्यटवीबलकालः।८।**

प्रथम रानटी सैन्याशी अथवा शत्रूच्या राजधानीजवळ अथवा त्याच्या मदतीस आलेल्या सैन्याशी लढावयास लावून मागाहून मी स्वतःच्या सैन्याने लढेन; किंवा माझे आणि मित्राचे उद्दिष्ट एकच आहे; किंवा माझे कार्य सिद्ध होणे मित्रावर अवलंबून आहे; किंवा माझा मित्र अगदी जवळचा, मदत करण्यालायक आहे; किंवा त्याच्या सैन्यात मोठ्या प्रमाणात असलेल्या दूष्य सैनिकांचा नाश घडवून आणीन," तेव्हा मित्रसैन्याच्या उपयोगाचे काल.

६ (जेव्हा असे वाटेल की,) "मजजवळ शत्रुसैन्य भरपूर आहे, त्याच्या साहाय्याने मी शत्रूच्या नगराजवळ अथवा त्याच्या रानटी सैन्याशी युद्ध करीन, त्यात कोणाचीही सरशी झाली तरी, कुत्रा व डुक्कर यांच्या भांडणात चांडालाचा होतो तसा, माझा फायदाच होईल; किंवा ह्या सैन्याचा उपयोग मदतीस आलेल्या सैन्यांतील अथवा रानटी सैन्यांतील उपद्रवकारकांना चिरडून टाकण्या-साठी करीन ;" – किंवा शत्रुबल खूप मोठे झाले असल्यास बंडाळीची भीती असते म्हणून त्याचा तळ नेहमी राजाच्या संनिध ठेवावा, फक्त आतील (मंत्री, सेनापती आदी) अधिकाऱ्यांच्या बंडाळीची भीती असल्यास असे करू नये; – आणि आपल्या युद्धाची वेळ शत्रूच्या युद्धाच्या वेळेनंतर मागाहून असेल तेव्हा; – हे शत्रुबलाच्या उपयोगाचे काल.

७ अटवीबलाच्या संबंधातही शत्रुबलाप्रमाणेच समजावे. ८ मार्ग दाख-विण्यास उपयुक्त असते तेव्हा; शत्रूच्या भूमीवरील लढाईसाठी योग्य असेल तेव्हा; शत्रूच्या युद्धपद्धतीला तोंड देण्यास समर्थ असेल तेव्हा; शत्रूजवळ मुख्यतः अटवीबलच असेल तेव्हा बेलफळ बेलफळानेच फोडावे ह्या उद्देशाने; शत्रूचा अल्पसा हल्ला परतवावयाचा असेल तेव्हा – हे रानटी टोळयांच्या सैन्याच्या उपयोगाचे (आणखी) काल.

सैन्यमनेकमनेकस्थमुक्तमनुक्तं वा विलोपार्थं यदुत्तिष्ठति तदौत्साहिकम् - अभक्तवेतनं विलोपविष्टिप्रतापकरं भेद्यं परेषाम्, अभेद्यं तुल्यदेशजातिशिल्पप्रायं संहतं महत् । ९ ।

इति बलोपादानकालाः ।

तेषां कुप्यभृतममित्राटवीबलं विलोपभृतं वा कुर्यात् । १० । अमित्रस्य वा बलकाले प्रत्युत्पन्ने शत्रुबलमवगृह्णीयात्, अन्यत्र वा प्रेषयेत्, अफलं वा कुर्यात्, विक्षिप्तं वा वासयेत्, काले वाऽतिक्रान्ते विसृजेत् । ११ ।

परस्य चैतद्बलसमुद्दानं विघातयेत्, आत्मनः संपादयेत् । १२ ।

पूर्वं पूर्वं चैषां श्रेयः संनाहयितुम् । १३ । तद्भावभावित्वान्नित्यसत्कारानुगमाच्च मौलबलं भृतबलाच्छ्रेयः । १४ । नित्यानन्तरं क्षिप्रोत्थायि वश्यं च भृतबलं श्रेणीबलाच्छ्रेयः । १५ । जानपदमेकार्थोपगतं तुल्यसंघर्षामर्षसिद्धिलाभं च श्रेणीबलं मित्रबलाच्छ्रेयः । १६ । अपरिमितदेशकालमेकार्थोपगमाच्च मित्रबलम-

९ एका हुकमतीखाली नसलेले, अनेक ठिकाणांहून आलेले जे सैन्य, सांगितले असता अथवा सांगितले नसताही, लूट करण्यास सिद्ध होते ते 'औत्साहिक' सैन्य; त्याला भोजन व पगार दिला जात नाही, ते लूट, वेठबिगारीची कामे करते व प्रताप गाजविते, पण शत्रू त्याला सहज फोडू शकतो; तथापि त्यात मुख्यत्वे एकाच देशातील, एकाच जातीचे किंवा एकाच धंद्याचे लोक असतील, त्यांच्यात एकजूट असेल व ते प्रमाणाने मोठे असेल तर फुटणार नाही.

याप्रमाणे निरनिराळ्या सैन्यांचे उपयोग करण्याचे काल सांगितले आहेत.

१० त्यांपैकी शत्रुसैन्याला व अटवीबलाला पगारादाखल कुप्य (जंगली माल) द्यावा अथवा लूट द्यावी. ११ किंवा जेव्हा शत्रूला सैन्याचा उपयोग करण्याचा प्रसंग येईल तेव्हा (आपल्याजवळील) शत्रुसैन्य दाबून ठेवावे, किंवा ते दुसरीकडे पाठवून द्यावे, किंवा ते निकामी करून टाकावे, अथवा त्याची पांगापांग करावी अथवा शत्रूच्या कार्याची वेळ निघून गेल्यावर ते पाठवावे.

१२ आणि ही सैन्ये उभी करण्याचे शत्रूचे प्रयत्न हाणून पाडावेत, आपले यशस्वी करावेत.

१३ आणि ह्या (सहा प्रकारच्या) सैन्यांपैकी अगोदरअगोदरचे सैन्य सज्ज करणे अधिक चांगले. १४ परंपरागत सैन्य भावनेने राजाशी एकरूप असल्यामुळे आणि त्याचा नेहमी सत्कार होत असल्यामुळे पगारी सैन्यापेक्षा ते अधिक चांगले. १५ नेहमी संनिध असणारे, लवकर तयार होणारे आणि ताब्यात रहाणारे म्हणून पगारी सैन्य श्रेणीबलापेक्षा अधिक चांगले. १६ स्वदेशातील असलेले, एकाच उद्दिष्टाने प्रेरित असलेले आणि संघर्ष, राग, सिद्धी, व लाभ या बाबतीत

मित्रबलाच्छ्रेयः । १७ । आर्याधिष्ठितममित्रबलमटवीबलाच्छ्रेयः । १८ । तदुभयं विलोपार्थम् । १९ । अविलोपे व्यसने च ताभ्यामहिभयं स्यात् । २० ।

'ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्रसैन्यानां तेजःप्राधान्यात्पूर्वं पूर्वं श्रेयः संनाहयितुम्' इत्याचार्याः । २१ । नेति कौटिल्यः । २२ । प्रणिपातेन ब्राह्मणबलं परोऽभिहारयेत् । २३ । प्रहरणविद्याविनीतं तु क्षत्रियबलं श्रेयः, बहुलसारं वा वैश्यशूद्रबलमिति । २४ ।

तस्मादेवंबलः परः, तस्यैतत्प्रतिबलमिति बलसमुद्दानं कुर्यात् । २५ । हस्तियन्त्रशकटगर्भकुन्तप्रासहाटकवेणुशल्यवद् हस्तिबलस्य प्रतिबलम् । २६ । तदेव पाषाणलगुडावरणाङ्कुशकचग्रहणीप्रायं रथबलस्य प्रतिबलम् । २७ । तदेवाश्वानां प्रतिबलम्, वर्मिणो वा हस्तिनोऽश्वा वा वर्मिणः । २८ । कवचिनो रथा आवरणिनः पत्तयश्च चतुरङ्गबलस्य प्रतिबलम् । २९ ।

राजाशी समानता असलेले श्रेणीबल मित्राच्या सैन्यापेक्षा अधिक चांगले. १७ देश व काल यांच्यासंबंधात नियंत्रण नसलेले आणि एकाच उद्दिष्टाने प्रेरित असलेले मित्राचे सैन्य शत्रुबलापेक्षा अधिक चांगले. १८ आर्य सेनापतीच्या हुकमतीखाली असलेले शत्रुबल अटवीबलापेक्षा अधिक चांगले. १९ ह्या दोन्ही सैन्यांचा लूट मिळावी हाच उद्देश असतो. २० लूट मिळाली नाही आणि एखादे संकट आले तर सापाप्रमाणे ह्या दोहोंपासून धोका असतो.

२१ "ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांच्या सैन्यांपैकी अगोदरअगोदरचे सज्ज करणे, तेजाच्या प्राधान्यामुळे, अधिक चांगले," असे आचार्यांचे मत आहे. २२ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. २३ शत्रू प्रणिपात करून ब्राह्मण सैन्याला आपल्याकडे वळवून घेऊ शकेल. २४ शस्त्रविद्येत पारंगत असलेले क्षत्रिय सैन्य अधिक चांगले किंवा पुष्कळ बळ असलेले वैश्य व शूद्र यांचे सैन्य (अधिक चांगले).

२५ म्हणून शत्रूचे सैन्य अमुक प्रकारचे आहे, त्याच्याशी मुकाबला करण्यास समर्थ अमुक सैन्य आहे, असा विचार करून सैन्य उभारावे. २६ हत्ती, यंत्रे व शकट मध्यभागी असलेले आणि कुंत, प्रास, हाटक, वेणू आणि शल्य यांनी सुसज्ज असलेले सैन्य हत्तींच्या सैन्याचा मुकाबला करू शकते. २७ तसेच परंतु दगड, काठ्या, चिलखते, अंकुश व कचग्रहणी यांनी मुख्यत्वेकरून सज्ज असलेले सैन्य रथांच्या सैन्याचा मुकाबला करण्यास समर्थ असते. २८ तेच घोडदळाचा मुकाबला करू शकते, किंवा चिलखत असलेले हत्ती अथवा चिलखत असलेले घोडे (घोडदळाचा मुकाबला करू शकतात). २९ कवच असलेले रथ आणि चिलखत घातलेले पायदळ चारही प्रकारच्या सैन्याचा मुकाबला करू शकतात.

**एवं बलसमुद्दानं परसैन्यनिवारणम् ।**
**विभवेन स्वसैन्यानां कुर्यादङ्गविकल्पशः ।। ३० ।।**

इत्यभियास्यत्कर्मणि नवमेऽधिकरणे बलोपादानकालाः संनाहगुणाः प्रतिबलकर्म द्वितीयोऽध्यायः। आदितस्त्रयोविंशतिशततमः ।

३

**[ चत्वारिंशच्छततमं प्रकरणम् – पश्चात्कोपचिन्ता ;**
**एकचत्वारिंशच्छततमं प्रकरणम् – बाह्याभ्यन्तरप्रकृतिकोपप्रतीकारः ]**

**अल्पः पश्चात्कोपो महान् पुरस्ताल्लाभ इति अल्पः पश्चात्कोपो गरीयान् । १ । अल्पं पश्चात्कोपं प्रयातस्य दूष्यामित्राटविका हि सर्वतः समेधयन्ति, प्रकृतिकोपो वा । २ । लब्धमपि च महान्तं पुरस्ताल्लाभमेवंभूते भृत्यमित्रक्षयव्यया ग्रसन्ते । ३ । तस्मात्सहस्रैकीयः पुरस्ताल्लाभस्यायोगः शतैकीयो वा पश्चात्कोप इति न यायात् । ४ । सूचीमुखा ह्यनर्था इति लोकप्रवादः । ५ ।**

**पश्चात्कोपे सामदानभेददण्डान् प्रयुञ्जीत । ६ । पुरस्ताल्लाभे सेनापतिं कुमारं वा दण्डचारिणं कुर्वीत । ७ । बलवान् वा राजा पश्चात्कोपावग्रहसमर्थः पुरस्ताल्लाभमादातुं यायात् । ८ ।**

३० याप्रमाणे आपल्या सैन्याच्या सामर्थ्याच्या अनुरोधाने आणि सैन्याच्या (चार प्रकारच्या) विविध अंगांना अनुसरून, शत्रूच्या सैन्याचे निवारण करू शकेल अशी आपल्या सैन्याची उभारणी करावी.

## तिसरा अध्याय

## प्रकरण १४० : पिछाडीच्या संभाव्य बंडाचा विचार;
## प्रकरण १४१ : बाह्य आणि आभ्यंतर प्रकृतींच्या बंडावर उपाययोजना

१ पिछाडीचा थोडा प्रक्षोभ व पुढच्या बाजूला होणारा मोठा लाभ यांपैकी पिछाडीचा थोडा उपद्रव अधिक भयंकर. २ पाठीमागे थोडा उपद्रव असताही प्रयाण केले तर दूष्य, शत्रू व रानटी लोक तो सर्व बाजूंनी वाढवितात, किंवा प्रकृतींचे बंड (तो उपद्रव वाढविते). ३ आणि असे झाले म्हणजे पुढच्या बाजूला मोठा लाभ प्राप्त झाला तरी नोकर, मित्र, वाहनांची, मनुष्यांची व द्रव्याची हानी हे तो लाभ खाऊन टाकतात. ४ यास्तव पाठीमागे उपद्रव असता पुढच्या बाजूचा लाभ हजारात किंवा (फार तर) शंभरात एक या प्रमाणात असतो म्हणून प्रयाण करू नये. ५ अनर्थ हे सुईच्या टोकाप्रमाणे असतात अशी म्हण प्रचलित आहे.

६ पिछाडीला बंड उद्भवल्यास साम, दान, भेद व दंड याचा प्रयोग करावा. ७ पुढच्या लाभासाठी सेनापतीला किंवा राजपुत्राला सैन्य बरोबर देऊन

अभ्यन्तरकोपशङ्कायां शङ्कितानादाय यायात्, बाह्यकोपशङ्कायां वा पुत्रदारमेषाम् । ९ । अभ्यन्तरावग्रहं कृत्वा शून्यपालमनेकबलवर्गमनेकमुख्यं च स्थापयित्वा यायात्, न वा यायात् । १० । अभ्यन्तरकोपो बाह्यकोपात्पापीयानित्युक्तं पुरस्तात् । ११ ।

मन्त्रिपुरोहितसेनापतियुवराजानामन्यतमकोपोऽभ्यन्तरकोपः । १२ । तमात्मदोषत्यागेन परशक्त्यपराधवशेन वा साधयेत् । १३ । महापराधेऽपि पुरोहिते संरोधनमवस्रावणं वा सिद्धिः, युवराजे संरोधनं निग्रहो वा गुणवत्यन्यस्मिन् सति पुत्रे । १४ ।

पुत्रं भ्रातरमन्यं वा कुल्यं राज्यग्राहिणमुत्साहेन साधयेत्, उत्साहाभावे गृहीतानुवर्तनसंधिकर्मभ्याम् अरिसंधानभयात् । १५ । अन्येभ्यस्तद्विधेभ्यो वा भूमिदानैर्विश्वासयेदेनम् । १६ । तद्विशिष्टं स्वयंग्राहं दण्डं वा प्रेषयेत्, सामन्ताटविकान् वा,

पाठवावे. ८ किंवा राजा बलवान व पिछाडीचे बंड मोडून काढण्यास समर्थ असल्यास त्याने स्वतःच पुढचा लाभ हस्तगत करण्यासाठी जावे.

९ आभ्यंतर अधिकाऱ्यांच्या बंडाची भीती असल्यास संशयितांना आपल्याबरोबर घेऊन जावे, बाह्य अधिकाऱ्यांच्या बंडाची भीती असल्यास त्यांच्या बायकामुलांना बरोबर न्यावे. १० आभ्यंतर बंडाळीचा बीमोड करून आणि शून्यपाल (राजा नसताना राज्याची व्यवस्था पहाणारा) नेमून, तसेच अनेक अधिकाऱ्यांच्या ताब्यात निरनिराळचा प्रकारच्या सैन्याच्या तुकडचा पाठीमागे ठेवून मग निघावे, किंवा निघूही नये. ११ बाह्य अधिकाऱ्यांच्या बंडापेक्षा आतील अधिकाऱ्यांचे बंड अधिक भयंकर हे मागे (सूत्र ८.२.३ मध्ये) सांगितले आहे.

१२ मंत्री, पुरोहित, सेनापती व युवराज यांच्यापैकी एकाची बंडाळी म्हणजे आभ्यंतर अधिकाऱ्यांचे बंड. १३ आपल्यातील दोष काढून टाकून अथवा बंडास उद्युक्त होणाऱ्याचे सामर्थ्य व त्याचा अपराध यांच्या अनुरोधाने ते बंड मोडून काढावे. १४ पुरोहिताचा अपराध मोठा असला तरी बंदिवास अथवा हद्दपारी असेच शासन करावे, युवराजाला बंदिवास अथवा, दुसरा सद्गुणी पुत्र असल्यास, वध अशी शिक्षा करावी.

१५ पुत्र, भाऊ अथवा दुसरा राजकुलातील पुरुष यांपैकी कोणी राज्य बळकावले असेल तर आपल्या उत्साहशक्तीच्या जोरावर त्याचे दमन करावे; उत्साह नसेल तर, तो शत्रूला जाऊन मिळेल ह्या भीतीने, त्याने बळकावलेले त्याच्याकडे राहू देऊन व त्याच्याशी तह करून नमते घ्यावे. १६ किंवा त्याच्यासारख्या दुसऱ्यांना जमिनी देऊन त्याच्यात विश्वास उत्पन्न करावा. १७ किंवा (त्याच्याविरुद्ध) त्याच्याहून अधिक बलवान असलेले व ज्याला जे मिळेल ते

तैर्विगृहीतमतिसंदध्यात् । १७ । अपरुद्धादानं पारग्रामिकं वा योगमातिष्ठेत् । १८ । एतेन मन्त्रिसेनापती व्याख्यातौ । १९ ।

मन्त्र्यादिवर्जानामन्तरमात्यानामन्यतमकोपोऽन्तरमात्यकोपः । २० । तत्रापि यथार्हमुपायान् प्रयुञ्जीत । २१ ।

राष्ट्रमुख्यान्तपालाटविकदण्डोपनतानामन्यतमकोपो बाह्यकोपः । २२ । तमन्योन्येनावग्राहयेत् । २३ । अतिदुर्गप्रतिष्टब्धं वा सामन्ताटविकतत्कुलीनापरुद्धानामन्यतमेनावग्राहयेत् । २४ । मित्रेणोपग्राहयेद्वा यथा नामित्रं गच्छेत् । २५ ।

अमित्राद्वा सत्त्री भेदयेदेनम् – ' अयं त्वा योगपुरुषं मन्यमानो भर्तर्येव विक्रमयिष्यति, अवाप्तार्थो दण्डचारिणममित्राटविकेषु कृच्छ्रे वा प्रयासे योक्ष्यति, विपुत्रदारमन्ते वा वासयिष्यति । २६ । प्रतिहतविक्रमं त्वां भर्तरि पण्यं करिष्यति, त्वया

त्याने घ्यावे अशी परवानगी असलेले सैन्य, अथवा शेजारचा मांडलिक अथवा रानटी सैन्याचा मुख्य यांना पाठवावे, त्यांच्याशी तो लढत असता त्याचा निकाल लावावा. १८ किंवा मर्जीतून उतरलेल्या राजपुत्राबाबतचे (१.१८.१३-१६ मधील) उपाय अथवा (अध्याय १३.१ मधील) शत्रूचे शहर काबीज करण्यासंबंधीचे उपाय योजावेत. १९ मंत्री व सेनापती यांच्या बंडाच्या बाबतीत असेच वागावे.

२० मंत्री वगैरे वगळता इतर (दौवारिक, आंतर्वंशिक आदी राजवाड्यातील) आतील अमात्यांपैकी कोणाचे बंड म्हणजे अंतरमात्याचे बंड. २१ त्याबाबतीतसुद्धा पात्रतेनुसार उपाय योजावेत.

२२ राष्ट्रातील मुख्य अधिकारी, सरहद्दीवरील दुर्गाचा मुख्य, रानटी टोळ्यांचा मुख्य व बळाने शरण आणलेला मांडलिक यांपैकी एखाद्याचे बंड म्हणजे बाह्य अधिकाऱ्याचे बंड. २३ त्यांना एकमेकाविरुद्ध उठवून ते मोडून काढावे. २४ किंवा तो दुर्गात घट्ट पाय रोवून असेल तर मांडलिक राजा, रानटी टोळ्यांचा मुख्य, त्याच्या कुलातील राज्यावर हक्क सांगणारा किंवा त्याच्या मर्जीतून उतरलेला पुत्र यांच्याकरवी त्याचे दमन करावे. २५ किंवा मित्रामार्फत त्याला आपल्या बाजूस वळवावे, ज्यायोगे तो शत्रूस जाऊन मिळणार नाही.

२६ किंवा गुप्त हेराने त्या बंडखोराला शत्रूपासून फोडावे, " हा (शत्रू) तुला गुप्त हेर समजून तुझ्या राजाविरुद्ध लढावयास लावील, ते कार्य सिद्धीस गेले की तो तुला सैन्य देऊन त्याच्या शत्रूविरुद्ध, रानटी टोळ्यांविरुद्ध अथवा अवघड कामगिरीवर पाठवील किंवा बायकामुलांपासून तुझी ताटातूट करून तुला सरहद्दीवर रहावयास लावील. २७ तुला (तुझ्या राजाविरुद्धच्या युद्धात) यश मिळाले नाही तर तो तुला तुझ्या राजाला विकून टाकील किंवा तुला

**वा संधिं कृत्वा भर्तारमेव प्रसादयिष्यति । २७ । मित्रमुपकृष्टं वाऽस्य गच्छ ' इति । २८ । प्रतिपन्नमिष्टाभिप्रायैः पूजयेत् । २९ । अप्रतिपन्नस्य संश्रयं भेदयेद् ' असौ ते योगपुरुषः प्रणिहितः ' इति । ३० । सत्त्री चैनमभित्यक्तशासनैर्घातयेत्, गूढपुरुषैर्वा । ३१ । सहप्रस्थायिनो वाऽस्य प्रवीरपुरुषान् यथाभिप्रायकरणेनावाहयेत् । ३२ । तेन प्रणिहितान् सत्त्री ब्रूयात् । ३३ । इति सिद्धिः । ३४ ।**

**परस्य चैनान् कोपानुत्थापयेत्, आत्मनश्च शमयेत् । ३५ ।**

**यः कोपं कर्तुं शमयितुं वा शक्तस्तत्रोपजापः कार्यः । ३६ । यः सत्यसंधः शक्तः कर्मणि फलावाप्तौ चानुग्रहीतुं विनिपाते च त्रातुं तत्र प्रतिजापः कार्यः, तर्कयितव्यश्च कल्याणबुद्धिरुताहो शठ इति । ३७ ।**

**शठो हि बाह्योऽभ्यन्तरमेवमुपजपति – ' भर्तारं चेद्धत्वा मां प्रतिपादयिष्यति शत्रुवधो भूमिलाभश्च मे द्विविधो लाभो भविष्यति, अथ वा शत्रुरेनमाहनिष्यतीति**

स्वाधीन करण्याच्या बोलीवर तह करून तो राजाचीच मर्जी संपादन करील. २८ तेव्हा तुझ्या राजाच्या उत्कृष्ट मित्राकडे तू जा. " २९ जर तो कबूल झाला तर त्याची इच्छापूर्ती करून त्याचा सत्कार करावा. ३० जर कबूल झाला नाही तर ज्याच्याकडे त्याने आश्रय घेतला असेल त्या शत्रूला भेद करण्यासाठी सांगावे, " तो तुझ्याविरुद्ध कारवाई करण्यासाठी नेमलेला गूढ पुरुष आहे." ३१ आणि त्या गुप्त हेराने वधाची शिक्षा झालेल्या माणसांच्या हातात मिळालेल्या पत्रांच्या आधारावर त्याला ठार केले जाईल अशी व्यवस्था करावी, किंवा गूढ पुरुषांमार्फत त्याचा खून करावा. ३२ किंवा त्याच्याबरोबर निघून गेलेल्या शूर पुरुषांना त्यांची इच्छा पूर्ण करून (राजाने) आपल्याकडे वळवून घ्यावे. ३३ (ते गेले म्हणजे) गुप्त हेराने तेसुद्धा तुझ्याविरुद्ध त्या राजाने नेमलेले गूढ पुरुष होते असे शत्रूला सांगावे. ३४ याप्रमाणे कार्य सिद्ध करता येते.

३५ अशा प्रकारची बंडे शत्रूच्या राज्यात उभी करावीत आणि आपल्या राज्यातील शमवावीत.

३६ जो बंड करण्यास व ते शमविण्यास समर्थ असेल त्यालाच बंड करण्याचे गुप्त आवाहन करावे. ३७ जो दिलेले वचन पाळतो आणि काम करताना व त्याचे फल मिळविताना मदत करण्यास आणि काम असफल झाल्यास रक्षण करण्यास समर्थ आहे त्याच्याच बंडाच्या आवाहनाला प्रतिसाद द्यावा, आणि त्याच्याबद्दल तर्क करावा – हा (बंडाचे आवाहन करणारा) सद्बुद्धीने प्रेरित झाला आहे की हा शठ आहे याविषयी.

३८ बाहेरचा बंडखोर शठ असेल तर तो पुढील हेतूंनी आतील अधिकाऱ्याला बंडास चिथावणी देतो – " राजाला ठार मारून ह्याने जर मला

हतबन्धुपक्षस्तुल्यदोषदण्डेनोद्विग्नश्च मे भूयानकृत्यपक्षो भविष्यति, तद्विधे वाऽन्यस्मिन्नपि शङ्कितो भविष्यति, अन्यमन्यं चास्य मुख्यमभित्यक्तशासनेन घातयिष्यामि ' इति । ३८ ।

अभ्यन्तरो वा शठो बाह्यमेवमुपजपति – ' कोशमस्य हरिष्यामि, दण्डं वाऽस्य हनिष्यामि, दुष्टं वा भर्तारमनेन घातयिष्यामि, प्रतिपन्नं बाह्यममित्राटविकेषु विक्रमयिष्यामि " चक्रमस्य सज्यताम्, वैरमस्य प्रसज्यताम्, ततः स्वाधीनो मे भविष्यति, ततो भर्तारमेव प्रसादयिष्यामि, स्वयं वा राज्यं ग्रहीष्यामि", बद्ध्वा वा बाह्यभूमिं भर्तृभूमिं चोभयमवाप्स्यामि, विरुद्धं वाऽऽवाहयित्वा बाह्यं विश्वस्तं घातयिष्यामि, शून्यं वाऽस्य मूलं हरिष्यामि ' इति । ३९ ।

कल्याणबुद्धिस्तु सहजीव्यर्थमुपजपति । ४० । कल्याणबुद्धिना संदधीत, शठं ' तथा ' इति प्रतिगृह्यातिसंदध्यात् । इति । ४१ ।

राजा म्हणून मान्यता मिळवून दिली तर (माझ्या) शत्रूचा वध व भूमीचा लाभ असा माझा दुहेरी फायदा होईल; किंवा (माझा) शत्रू (म्हणजे राजा) ह्याला ठार मारील म्हणजे त्या मारलेल्या अधिकाऱ्याचे बांधव आणि त्याच्यासारखाच अपराध केलेला असल्यामुळे शिक्षेला भ्यालेले इतर लोक मोठ्या संख्येने माझ्या बाजूला येतील व फितूर होण्याचा संभव उत्पन्न होणार नाही; किंवा शत्रूला त्याच्यासारख्या दुसऱ्या अधिकाऱ्याचाही संशय येईल, मग मी वध्य माणसां-जवळील पत्राच्या साह्याने त्याच्या एक एक अधिकाऱ्याला ठार करवीन."

३९ किंवा शठ असलेला आतील बंडखोर बाहेरच्याला पुढील हेतूंनी गुप्त आवाहन करतो –" मी ह्याचा कोश पळवीन किंवा ह्याच्या सैन्याचा नाश करीन, किंवा ह्याच्याकरवी दुष्ट राजाचा वध करवीन; बाहेरचा मनुष्य बंडात सामील झाला तर मी त्याला शत्रूविरुद्ध किंवा रानटी टोळचांविरुद्ध लढावयास लावीन 'ह्याचे सैन्य अडकून पडू दे, ह्याचे राजाशी वैर होऊ दे, तेव्हा तो माझ्या तावडीत सापडेल, मग मी राजाचीच मर्जी संपादन करीन किंवा स्वतःच राज्य बळकावीन ' (ह्या उद्देशाने) ; किंवा ह्या बाह्याला बंधनात टाकून मी त्याची भूमी व राजाची भूमी दोन्ही मिळवीन; किंवा बाहेरच्याने (राजाला) विरोध केल्यावर मी त्याला बोलावून घेईन आणि तो विश्वास टाकून आला की त्याचा वध करवीन किंवा त्याचे शून्य झालेले (तो नसलेले) राज्य बळकावीन."

४० परंतु सद्बुद्धीने प्रेरित झालेला बंडखोर आपल्याबरोबर असणाऱ्यांच्या हितासाठी बंडाचे गुप्त आवाहन करतो. ४१ सद्बुद्धीने प्रेरित असेल त्याच्याशी करार करावा, शठ असेल त्याला ' बरे आहे, तसे करू या ' असे म्हणून फसवावे.

एवमुपलभ्य –

परे परेभ्यः स्वे स्वेभ्यः स्वे परेभ्यः स्वतः परे ।
रक्ष्याः स्वेभ्यः परेभ्यश्च नित्यमात्मा विपश्चिता ॥ ४२ ॥

इत्यभियास्यत्कर्मणि नवमेऽधिकरणे पश्चात्कोपचिन्ता बाह्याभ्यन्तरप्रकृतिकोपप्रतीकारः तृतीयोऽध्यायः । आदितः चतुर्विंशतिशततमः ।

४

[ द्विचत्वारिंशच्छततमं प्रकरणम् – क्षयव्ययलाभविपरिमर्शः ]

युग्यपुरुषापचयः क्षयः । १ । हिरण्यधान्यापचयो व्ययः । २ । ताभ्यां बहुगुणविशिष्टे लाभे यायात् । ३ ।

आदेयः प्रत्यादेयः प्रसादकः प्रकोपको ह्रस्वकालस्तनुक्षयोऽल्पव्ययो महान् वृद्ध्युदयः कल्यो धर्म्यः पुरोगश्चेति लाभसंपत् । ४ ।

सुप्राप्यानुपाल्यः परेषामप्रत्यादेय इत्यादेयः । ५ । विपर्यये प्रत्यादेयः । ६ । तमाददानस्तत्रस्थो वा विनाशं प्राप्नोति । ७ ।

यदि वा पश्येत् 'प्रत्यादेयमादाय कोशदण्डनिचयरक्षाविधानान्यवस्रावयिष्यामि; खनिद्रव्यहस्तिवनसेतुबन्धवणिक्पथानुद्धृतसारान् करिष्यामि; प्रकृतीरस्य

४२ हे सर्व विचारात घेऊन –

शहाण्या राजाने परकीयांचे परकीयांपासून, स्वकीयांचे स्वकीयांपासून, स्वकीयांचे परकीयांपासून, परकीयांचे स्वकीयांपासून आणि आपले स्वतःचे स्वकीयांपासून व परकीयांपासून नेहमी रक्षण केले पाहिजे.

## चौथा अध्याय

### प्रकरण १४२ : क्षय, व्यय आणि लाभ यांसंबंधी विचार

१ वाहने आणि मनुष्य यांची हानी म्हणजे क्षय. २ द्रव्य आणि धान्य यांची हानी म्हणजे व्यय. ३ संभाव्य लाभ ह्या दोहोंपेक्षा पुष्कळ गुणांमुळे अधिक असेल तरच प्रयाण करावे.

४ आदेय, प्रत्यादेय, प्रसादक, प्रकोपक, ह्रस्वकाल, तनुक्षय, अल्पव्यय, महान, वृद्ध्युदय, कल्य, धर्म्य आणि पुरोग हे लाभाचे गुण होत.

५ प्राप्त करून घेण्यास व रक्षण करण्यास सोपा आणि शत्रूंना परत न घेता येण्यासारखा लाभ तो आदेय लाभ. ६ याच्या उलट असलेला तो प्रत्यादेय. ७ तसा लाभ घेणारा किंवा तेथे जाऊन रहाणारा नाश पावतो.

८ किंवा त्याला जर असे दिसून आले की, "प्रत्यादेय (परत घेता येण्यासारखा) लाभ घेऊन मी तेथील शत्रूचा कोश, सैन्य, धान्यादींचे साठे, संरक्षणाची

कर्शयिष्यामि, अपवाहयिष्यामि, आयोगेनाराधयिष्यामि वा, ताः परं प्रतियोगेन कोपयिष्यति; प्रतिपक्षे वाऽस्य पण्यमेनं करिष्यामि, मित्रमपरुद्धं वाऽस्य प्रतिपादयिष्यामि; मित्रस्य स्वस्य वा देशस्य पीडामत्रस्थस्तस्करेभ्यः परेभ्यश्च प्रतिकरिष्यामि; मित्रमाश्रयं वाऽस्य वैगुण्यं ग्राहयिष्यामि, तदमित्रविरक्तं तत्कुलीनं प्रतिपत्स्यते; सत्कृत्य वाऽस्मै भूमिं दास्यामि इति संहितसमुत्थितं मित्रं मे चिराय भविष्यति' इति प्रत्यादेयमपि लाभमाददीत । ८ ।

इत्यादेयप्रत्यादेयौ व्याख्यातौ । ९ ।

अधार्मिकाद्धार्मिकस्य लाभो लभ्यमानः स्वेषां परेषां च प्रसादको भवति । १० । विपरीतः प्रकोपक इति । ११ ।

मन्त्रिणामुपदेशाल्लाभोऽलभ्यमानः कोपको भवति 'अयमस्माभिः क्षयव्ययौ ग्राहितः' इति । १२ । दूष्यमन्त्रिणामनादराल्लाभो लभ्यमानः कोपको भवति 'सिद्धार्थोऽयमस्मान् विनाशयिष्यति' इति । १३ । विपरीतः प्रसादकः । १४ ।

व्यवस्था नाहिशी करीन; त्याच्या खाणी, द्रव्यवन, हस्तिवन, पाटबंधारे, व्यापारी मार्ग यांतील मौल्यवान चिजा काढून नेईन; त्याच्या प्रजाजनांना दुर्बल करीन किंवा तेथून हलवीन किंवा योग्य उपायांनी वश करून घेईन, नंतर शत्रू विरुद्ध उपाय योजून त्यांच्यात प्रक्षोभ उत्पन्न करील; किंवा हा लाभ मी त्याच्या शत्रूला विकून टाकीन, किंवा त्याच्या मित्राला अथवा त्याच्या मर्जीतून उतरलेल्या पुत्राला देऊन टाकीन; किंवा ह्या देशात राहून माझ्या मित्राच्या अथवा स्वतःच्या देशाला दरोडेखोर आणि शत्रू यांच्यापासून होणाऱ्या त्रासावर उपाययोजना करीन; त्याचा मित्र किंवा ज्याच्या आश्रयाला तो गेला आहे तो राजा यांना त्याच्यातील वैगुण्य दाखवून देईन, मग तो (मित्र अथवा संश्रय) शत्रूविषयी विरक्त होऊन त्याच्या कुळातील हक्क सांगणाऱ्याला राजा म्हणून मान्यता देईल; किंवा त्या शत्रूलाच सत्कारपूर्वक त्याची ही भूमी परत करीन, ज्यायोगे तो माझा कायमचा जोडलेला व एकजुटीने वागणारा मित्र होईल," तर प्रत्यादेय लाभसुद्धा घ्यावा.

९ याप्रमाणे आदेय लाभ व प्रत्यादेय लाभ यांविषयी सांगितले.

१० धर्मनिष्ठ नसलेल्या राजापासून धर्मनिष्ठ राजाला होणारा लाभ स्वदेशातील व परदेशातील लोकांना प्रसादक (संतोषकारक) होतो. ११ याच्या उलट होणारा प्रकोपक (क्षोभ उत्पन्न करणारा) होतो.

१२ मंत्र्यांनी सल्ला दिला असता ज्या लाभाची प्राप्ती होत नाही तो लाभ (मंत्र्यांमध्ये) "आम्ही ह्याला क्षय व व्यय (निष्कारण) सहन करावयास लावले आहे" (या विचाराने) क्षोभ उत्पन्न करतो. १३ दूष्य मंत्र्यांचा सल्ला झुगारून जो लाभ मिळविला जातो तो (त्या दूष्य मंत्र्यांना) "राजाचे कार्य

इति प्रसादककोपकौ व्याख्यातौ । १५ ।

गमनमात्रसाध्यत्वाद्ह्रस्वकालः । १६ । मन्त्रसाध्यत्वात्तनुक्षयः । १७ । भक्तमात्रव्ययत्वादल्पव्ययः । १८ । तदात्ववैपुल्यान्महान् । १९ । अर्थानुबन्धकत्वाद् वृद्ध्युदयः । २० । निराबाधकत्वात्कल्यः । २१ । प्रशस्तोपादानाद्धर्म्यः । २२ । सामवायिकानामनिर्बन्धगामित्वात्पुरोगः । इति । २३ ।

तुल्ये लाभे देशकालौ शक्त्युपायौ प्रियाप्रियौ जवाजवौ सामीप्यविप्रकर्षौ तदात्वानुबन्धौ सारत्वसातत्ये बाहुल्यबाहुगुण्ये च विमृश्य बहुगुणयुक्तं लाभमाददीत । २४ ।

लाभविघ्नाः – कामः कोपः साध्वसं कारुण्यं ह्रीरनार्यभावो मानः सानुक्रोशता परलोकापेक्षा धार्मिकत्वमत्यागित्वं दैन्यमसूया हस्तगतावमानो दौरात्म्यमविश्वासो भयमप्रतीकारः शीतोष्णवर्षाणामाक्षम्यं मङ्गलतिथिनक्षत्रेष्टित्वम् इति । २५ ।

सिद्ध झाल्यावर तो आमचा नाश करील" (या विचाराने) बंडास प्रवृत्त करतो. १४ याच्या उलट असणारा लाभ प्रसादक होतो.

१५ याप्रमाणे प्रसादक लाभ व कोपक लाभ यांविषयी सांगितले.

१६ केवळ चालून गेल्याने हस्तगत होणारा लाभ ऱ्हस्वकाल लाभ. १७ मंत्रशक्तीच्या जोरावर प्राप्त होणारा लाभ तनुक्षय (वाहनांची व मनुष्यांची हानी अल्प होते असा). १८ केवळ अन्नपाण्याचा खर्च होत असल्यामुळे लाभाला अल्पव्यय म्हणतात. १९ वर्तमानकाळी विपुल प्रमाणात असल्यामुळे लाभ महान होतो. २० भविष्यकाळीही फायदे होत रहात असल्यामुळे लाभ वृद्ध्युदय (वाढ होत रहाणारा) होतो. २१ ज्यात धोका नाही तो लाभ कल्य (निरोगी). २२ प्रशंसनीय उपायांनी प्राप्त होणारा लाभ धर्म्य (धर्माला अनुसरून होणारा). २३ एकत्र मोहिमेवर आलेल्या राजांकडून विरोध न होता प्राप्त होणारा लाभ पुरोग (पुढे जाणारा, अधिक असणारा).

२४ (दोन मोहिमांपासून) लाभ सारखाच होणार असता देश व काल, शक्ती व योजावयाचे उपाय, लाभाची प्रियता व अप्रियता, तो मिळविण्यात शीघ्रता व तिचा अभाव, तो जवळ असणे व दूर असणे, वर्तमानकाळी मिळणे व भविष्यकाळी टिकून रहाणे, मौल्यवान असणे व कायमचा ताब्यात येणे, आणि संख्येने अधिक व गुणांनी अधिक या गोष्टी विचारात घेऊन अनेक गुणांनी युक्त असलेला लाभ घ्यावा.

२५ लाभाच्या मार्गातील विघ्ने – काम, क्रोध, घावरटपणा, कारुण्यशीलता, भिडस्तपणा, अनार्यता, अभिमान, दयेची वृत्ती, परलोकाची चिंता, धर्मपरता, त्याग न करण्याची वृत्ती, दीनता, असूया, हातात असलेल्याबद्दल

नक्षत्रमति पृच्छन्तं बालमर्थोऽतिवर्तते ।
अर्थो ह्यर्थस्य नक्षत्रं किं करिष्यन्ति तारकाः ।। २६ ।।
नाधनाः प्राप्नुवन्त्यर्थान्नरा यत्नशतैरपि ।
अर्थैरर्थाः प्रबध्यन्ते गजाः प्रतिगजैरिव ।। २७ ।।

इत्यभियास्यत्कर्मणि नवमेऽधिकरणे क्षयव्ययलाभविपरिमर्शः चतुर्थोऽध्यायः ।
आदितः पञ्चविंशतिशततमः ।

५

## [ त्रिचत्वारिंशच्छततमं प्रकरणम् – बाह्याभ्यन्तराश्चापदः ]

संध्यादीनामयथोद्देशावस्थापनमपनयः । १ । तस्मादापदः संभवन्ति । २ ।

बाह्योत्पत्तिरभ्यन्तरप्रतिजापा, अभ्यन्तरोत्पत्तिर्बाह्यप्रतिजापा, बाह्योत्पत्तिर्बाह्यप्रतिजापा, अभ्यन्तरोत्पत्तिरभ्यन्तरप्रतिजापा – इत्यापदः । ३ ।

अनादराची भावना, दुष्टपणा, गैरविश्वास, भीती, प्रतिकार न करण्याची वृत्ती, थंडी, ऊन व पाऊस सहन करण्याची असमर्थता, आणि शुभ तिथी व नक्षत्र पहाण्याची सवय.

२६ नक्षत्रांचा अतोनात विचार करीत बसणाऱ्या मूर्ख मनुष्यापासून संपत्ती दूर जाते. संपत्ती हेच संपत्ती प्राप्त करून देणारे नक्षत्र आहे. आकाशातील तारका तेथे काय करणार ?

२७ धन नसलेल्या माणसांना, शेकडो यत्न केले तरी, संपत्तीचा लाभ होत नाही. पाळलेल्या हत्तींच्या द्वारा ज्याप्रमाणे रानटी हत्ती बांधून आणले जातात त्याप्रमाणे अर्थानेच अर्थाची प्राप्ती होते.

## पाचवा अध्याय

### प्रकरण १४३ : बाह्य व आभ्यंतर आपत्ती

१ संधी आदी सहा धोरणांची (शास्त्रात) सांगितल्याप्रमाणे योजना न करणे म्हणजे अपनय (चुकीचे धोरण). २ त्यापासून आपत्ती उद्‌भवतात.

३ बाहेरच्या माणसांनी उत्पन्न केलेली व आतील माणसांनी प्रतिसाद दिलेली, आतील माणसांनी उत्पन्न केलेली व बाहेरच्यांनी प्रतिसाद दिलेली, बाहेरच्यांनी उत्पन्न केलेली व इतर बाहेरच्यांनी प्रतिसाद दिलेली आणि आतील माणसांनी उत्पन्न केलेली व इतर आतील माणसांनी प्रतिसाद दिलेली – अशा चार प्रकारच्या आपत्ती आहेत.

**यत्र बाह्या अभ्यन्तरानुपजपन्ति, अभ्यन्तरा वा बाह्यान्, तत्रोभययोगे प्रतिजपतः सिद्धिर्विशेषवती । ४ । सुव्याजा हि प्रतिजपितारो भवन्ति, नोपजपितारः । ५ । तेषु प्रशान्तेषु नान्याञ्छक्नुयुरुपजपितुमुपजपितारः । ६ । कृच्छ्रोपजापा हि बाह्यानामभ्यन्तरास्तेषामितरे वा । ७ । महतश्च प्रयत्नस्य वधः परेषाम्, अर्थानुबन्धश्चात्मन इति । ८ ।**

**अभ्यन्तरेषु प्रतिजपत्सु सामदाने प्रयुञ्जीत । ९ । स्थानमानकर्म सान्त्वम् । १० । अनुग्रहपरिहारौ कर्मस्वायोगो वा दानम् । ११ । बाह्येषु प्रतिजपत्सु भेददण्डौ प्रयुञ्जीत । १२ । सत्त्रिणो मित्रव्यञ्जना वा बाह्यानां चारमेषां ब्रूयुः 'अयं वो राजा दूष्यव्यञ्जनैरतिसंधातुकामः, बुध्यध्वम्' इति । १३ । दूष्येषु वा दूष्यव्यञ्जनाः प्रणिहिता दूष्यान्बाह्यैर्भेदयेयुः, बाह्यान् वा दूष्यैः । १४ । दूष्याननुप्रविष्टा वा तीक्ष्णाः शस्त्ररसाभ्यां हन्युः । १५ । आहूय वा बाह्यान् घातयेयुः । १६ ।**

४ जेव्हा बाहेरचे आतल्यांना (बंडाची) गुप्त सूचना करतात किंवा आतले बाहेरच्यांना तेव्हा दोन्ही बाजूंचे संगनमत होते अशा समयी, प्रतिसाद देणाऱ्यां-विरुद्ध (उपाययोजना व) सिद्धी अधिक लाभदायक. ५ कारण प्रतिसाद देणारे फार धूर्त असतात, सुचविणारे तसे असत नाहीत. ६ त्यांचे दमन झाले म्हणजे सुचविणारे इतरांना तशी गुप्त सूचना करू शकणार नाहीत. ७ कारण आतल्यांना प्रोत्साहित करणे बाहेरच्यांना कठीण असते किंवा बाहेरच्यांना प्रोत्साहित करणे आतल्यांना कठीण असते. ८ आणि (प्रतिसाद देणाऱ्यांचे) दमन झाले म्हणजे दुसऱ्यांचे (सूचित करणाऱ्यांचे) मोठे प्रयत्न निष्फल होतात आणि आपल्याला (म्हणजे राजाला) फायदा होत रहातो.

९ प्रतिसाद देणारे जेव्हा आतील अधिकारी असतील तेव्हा साम व दान यांचा उपयोग करावा. १० मोठी जागा देणे व सन्मान करणे हा सामोपचार होय. ११ मदत करणे व सूट देणे आणि कामगिरीवर नेमणूक करणे हे दान होय. १२ प्रतिसाद देणारे बाहेरचे असतील तेव्हा भेद व दंड यांचा उपयोग करावा. १३ बाहेरच्यांशी मैत्रीचे सोंग करणाऱ्या हेरांनी आपण गुप्तपणे मिळविलेली बातमी म्हणून त्यांना सांगावे, "हा राजा दूष्य म्हणून ढोंग करणाऱ्यांच्या द्वारा तुम्हाला फसवू पहात आहे; सावध असा." १४ किंवा दूष्य असणाऱ्या (आतील) अधिकाऱ्यांकडे नेमलेल्या, दूष्य असल्याचे ढोंग करणाऱ्या हेरांनी त्यांना बाहेरच्यांपासून फोडावे किंवा बाहेरच्यांना त्यांच्यापासून. १५ किंवा तीक्ष्ण हेरांनी (बाहेरच्या) दूष्यांकडे प्रवेश मिळवून शस्त्राने अथवा विषाने ठार करावे. १६ किंवा बाहेरच्यांना (राजधानीत) बोलावून घेऊन त्यांचा वध करावा.

**यत्र बाह्या बाह्यानुपजपन्ति, अभ्यन्तरानभ्यन्तरा वा, तत्रैकान्तयोग उपजपितुः सिद्धिर्विशेषवती । १७ । दोषशुद्धौ हि दूष्या न विद्यन्ते । १८ । दूष्यशुद्धौ हि दोषः पुनरन्यान् दूषयति । १९ ।**

**तस्माद्बाह्येषूपजपत्सु भेददण्डौ प्रयुञ्जीत । २० । सत्त्रिणो मित्रव्यञ्जना वा ब्रूयुः 'अयं वो राजा स्वयमादातुकामः, विगृहीताः स्थानेन राज्ञा, बुध्यध्वम्' इति । २१ । प्रतिजपितुर्वा दूतदण्डाननुप्रविष्टास्तीक्ष्णाः शस्त्ररसादिभिरेषां छिद्रेषु प्रहरेयुः । २२ । ततः सत्त्रिणः प्रतिजपितारमभिशंसेयुः । २३ ।**

**अभ्यन्तरानभ्यन्तरेषूपजपत्सु यथार्हमुपायं प्रयुञ्जीत । २४ । तुष्टलिङ्गमतुष्टं विपरीतं वा साम प्रयुञ्जीत । २५ । शौचसामर्थ्यापदेशेन व्यसनाभ्युदयावेक्षणेन वा प्रतिपूजनमिति दानम् । २६ । मित्रव्यञ्जनो वा ब्रूयादेतान् 'चित्तज्ञानार्थमुपधास्यति वो राजा, तदस्याख्यातव्यम्' इति । २७ । परस्पराद्वा भेदयेदेनान् 'असौ चासौ च वो राजन्येवमुपजपति' । इति भेदः । २८ । दाण्डकर्मिकवच्च दण्डः । २९ ।**

१७ जेव्हा बाहेरचे (इतर) बाहेरच्यांना गुप्त सूचना करतात अथवा आतले (इतर) आतल्यांना तेव्हा, एकाच बाजूकडे संगनमत होते अशा समयी, सूचित करणाऱ्याविरुद्ध (उपाययोजना व) सिद्धी अधिक लाभदायक. १८ कारण दोष दूर केला म्हणजे दूष्य शिल्लक रहात नाही. १९ परंतु दूष्य नाहीसे केले तर दोष पुन्हा दुसऱ्यांना दूषित करतो.

२० म्हणून प्रोत्साहित करणारे बाह्य असतील तेव्हा भेद व दंड यांचा उपयोग करावा. २१ मैत्रीचे सोंग करणाऱ्या हेरांनी त्यांना म्हणावे, "हा राजा तुम्हाला पकडू पहात आहे, त्याचा तुमच्याशी विग्रह सुरू आहे; सावध असा." २२ किंवा तीक्ष्ण हेरांनी प्रतिसाद देणाऱ्याच्या दूताच्या सैन्यात प्रवेश मिळवून शस्त्र, रस इत्यादींनी प्रोत्साहित करणाऱ्यांवर संधी मिळेल त्याप्रमाणे प्रहार करावा. २३ नंतर हेरांनी प्रतिसाद देणाऱ्यांवर त्यासंबंधाचा आरोप ठेवावा.

२४ आतील अधिकारी आतील अधिकाऱ्यांना प्रोत्साहित करीत असतील तेव्हा योग्य ते उपाय योजावेत. २५ असंतुष्ट असून बाहेरून संतोष दाखविणारा व याच्याउलट संतुष्ट असून असंतोषाची चिन्हे दाखविणारा यांच्यावर सामोपचाराचा प्रयोग करावा. २६ राजनिष्ठा किंवा सामर्थ्य यांचा गौरव करण्याच्या सबबीवर अथवा संकटकाली किंवा समारंभाच्या वेळी आठवण ठेऊन काही देणे म्हणजे दान. २७ किंवा मैत्रीचे सोंग आणणाऱ्या हेराने त्यांना म्हणावे, "तुमचे मन जाणून घेण्यासाठी हा राजा तुमची परीक्षा पहाणार आहे; तुम्ही मन मोकळे करून त्याला सांगावे." २८ किंवा त्यांना एकमेकापासून फोडावे, "अमका अमका राजाला तुमच्याविषयी गुप्तपणे काही सुचवीत

**एतासां चतसृणामापदामभ्यन्तरामेव पूर्वं साधयेत् । ३० । अहिभयादभ्यन्तर-कोपो बाह्यकोपात्पापीयानित्युक्तं पुरस्तात् । ३१ ।**

**पूर्वां पूर्वां विजानीयाल्लघ्वीमापदमापदाम् ।**
**उत्थितां बलवद्भ्यो वा गुर्वीं लघ्वीं विपर्यये ।। ३२ ।।**

**इत्यभियास्यत्कर्मणि नवमेऽधिकरणे बाह्याभ्यन्तराश्चापदः पञ्चमोऽध्यायः ।**
**आदितः षड्विंशतिशततमः ।**

**६**

**[ चतुश्चत्वारिंशच्छततमं प्रकरणम् – दूष्यशत्रुसंयुक्ताः (आपदः) ]**

**दूष्येभ्यः शत्रुभ्यश्च द्विविधा शुद्धा । १ ।**

**दूष्यशुद्धायां पौरेषु जानपदेषु वा दण्डवर्जानुपायान् प्रयुञ्जीत । २ । दण्डो हि महाजने क्षेप्तुमशक्यः । ३ । क्षिप्तो वा तं चार्थं न कुर्यात्, अन्यं चानर्थमुत्पादयेत् । ४ । मुख्येषु त्वेषां दाण्डकर्मिकवच्चेष्टेत । ५ ।**

आहे." २९ आणि (अध्याय ५.१ मधील) दांडकर्मिक प्रकरणातल्याप्रमाणे दंडाचा उपयोग करावा.

३० ह्या चार आपत्तींपैकी आतील अधिकाऱ्यांच्या आपत्तीवरच प्रथम उपाययोजना करावी. ३१ सर्पासारखा धोका असल्यामुळे बाहेरच्या क्षोभापेक्षा आतील क्षोभ अधिक भयंकर हे मागे (८.२.८ मध्ये) सांगितले आहे.

३२ ह्या आपत्तींमध्ये अगोदरअगोदरची आपत्ती कमी भयंकर असे समजावे. किंवा बलिष्ठ माणसाने उत्पन्न केलेली असलेली आपत्ती अधिक भयंकर, याच्या-उलट असलेली कमी भयंकर असे समजावे.

## [सहावा अध्याय

## प्रकरण १४४ : राजद्रोही व शत्रू यांच्याशी संबद्ध आपत्ती

१ राजद्रोह्यांपासून येणारी व शत्रूंपासून येणारी अशी दोन प्रकारची शुद्ध आपत्ती.

२ राजद्रोह्यांमुळे येणाऱ्या शुद्ध आपत्तीत नगरवासी किंवा जनपदनिवासी लोकांच्या विरुद्ध दंडखेरीजकरून इतर उपाय योजावेत. ३ कारण, मोठ्या जनसमुदायावर दंडाचा प्रयोग करणे शक्य नसते. ४ आणि जरी त्याचा उपयोग केला तरी त्यामागील हेतू सिद्धीस जाणार नाही व दुसराच अनर्थ उद्भवेल. ५ परंतु त्यांच्या पुढाऱ्यांच्या बाबतीत दांडकर्मिक (अध्याय ५.१) प्रकरणात सांगितल्याप्रमाणे वागावे.

**शत्रुशुद्धायां यतः शत्रुः प्रधानः कार्यो वा ततः सामादिभिः सिद्धिं लिप्सेत ।६। स्वामिन्यायत्ता प्रधानसिद्धिः, मन्त्रिष्वायत्ताऽऽयत्तसिद्धिः, उभयायत्ता प्रधानायत्तसिद्धिः ।७।**

**दूष्यादूष्याणामामिश्रितत्वादामिश्रा ।८। आमिश्रायामदूष्यतः सिद्धिः ।९। आलम्बनाभावे ह्यालम्बिता न विद्यन्ते ।१०।**

**मित्रामित्राणामेकीभावात्परमिश्रा ।११। परमिश्रायां मित्रतः सिद्धिः ।१२। सुकरो हि मित्रेण संधिः, नामित्रेणेति ।१३। मित्रं चेन्न संधिमिच्छेदभीक्ष्णमुपजपेत् ।१४। ततः सत्त्रिभिरमित्राद्भेदयित्वा मित्रं लभेत ।१५। मित्रसंघस्य वा योऽन्तस्थायी तं लभेत ।१६। अन्तस्थायिनि लब्धे मध्यस्थायिनो भिद्यन्ते ।१७। मध्यस्थायिनं वा लभेत ।१८। मध्यस्थायिनि लब्धे नान्तस्थायिनः संहन्यन्ते ।१९।**

**यथा चैषामाश्रयभेदस्तानुपायान् प्रयुञ्जीत ।२०।**

६ (केवळ) शत्रूंमुळे येणाऱ्या शुद्ध आपत्तीत जसा शत्रू – मुख्य असो की त्याच्यावर अवलंबून असणारा (सेनापती, मंत्री आदी) असो – असेल तशी सामादी उपायांच्या द्वारा त्याच्यावर सिद्धी मिळविण्याची योजना करावी. ७ मुख्य शत्रूवर सिद्धी मिळविणे राजाच्या स्वाधीन असते, त्याच्या आश्रितांवर सिद्धी मिळविणे मंत्र्यांच्या हाती असते आणि (शत्रू व त्याचा आश्रित ह्या) दोघांवर सिद्धी मिळविणे (राजा व मंत्री ह्या) दोघांवर अवलंबून असते.

८ राजद्रोही व राजद्रोही नसलेले हे एक झाल्यामुळे उद्‌भवणारी ती आमिश्रा आपत्ती. ९ आमिश्रा आपत्तीत राजद्रोही नसलेल्यांच्या द्वारा सिद्धी मिळवावी. १० कारण आधार नसला म्हणजे त्या आधारावर अवलंबून असणारेही असत नाहीत.

११ मित्र व शत्रू एक झाल्यामुळे उद्‌भवणारी ती परमिश्रा आपत्ती. १२ परमिश्रा आपत्तीत मित्राच्या द्वारा सिद्धी मिळवावी. १३ कारण, मित्राशी संधी करणे सोपे असते, शत्रूशी नाही. १४ मित्र जर संधी करण्यास तयार नसेल तर त्याला वारंवार गुप्तपणे आवाहन करीत रहावे. १५ नंतर हेरांच्या द्वारा शत्रूपासून फोडून मित्राला वश करून घ्यावे. १६ किंवा एकत्रित झालेल्या (परस्पर) मित्रांमध्ये जो टोकाला असेल त्याला वश करून घ्यावे. १७ टोकाचा वश झाला म्हणजे मध्ये असलेले एकमेकापासून फुटून निघतात. १८ किंवा मध्ये असलेल्या राजाला वश करून घ्यावे. १९ मध्ये असलेला वश झाला म्हणजे टोकाला असलेल्यांची एकजूट टिकून रहात नाही.

२० आणि ज्यायोगे त्यांचा आधारभूत असलेला राजा त्यांच्यापासून फुटून निघेल असे उपाय योजावेत.

**धार्मिकं जातिकुलश्रुतवृत्तस्तवेन संबन्धेन पूर्वेषां त्रैकाल्योपकारानपकाराभ्यां वा सान्त्वयेत् । २१ । निवृत्तोत्साहं विग्रहश्रान्तं प्रतिहतोपायं क्षयव्ययाभ्यां प्रवासेन चोपतप्तं शौचेनान्यं लिप्समानमन्यस्माद्वा शङ्कमानं मैत्रीप्रधानं वा कल्याणबुद्धिं साम्ना साधयेत् । २२ ।**

**लुब्धं क्षीणं वा तपस्विमुख्यावस्थापनापूर्वं दानेन साधयेत् । २३ । तत्पञ्चविधम् – देयविसर्गो गृहीतानुवर्तनमात्तप्रतिदानं स्वद्रव्यदानमपूर्वं परस्वेषु स्वयंग्राहदानं च । २४ । इति दानकर्म । २५ ।**

**परस्परद्वेषवैरभूमिहरणशङ्कितमतोऽन्यतमेन भेदयेत् । २६ । भीरुं वा प्रतिघातेन 'कृतसंधिरेष त्वयि कर्म करिष्यति, मित्रमस्य निसृष्टं, संधौ वा नाभ्यन्तरः' इति । २७ ।**

२१ (आधारभूत राजा) धर्मनिष्ठ असल्यास त्याची जात, कुल, विद्वत्ता आणि आचरण यांची स्तुती करून पूर्वजांच्या स्नेहसंबंधाची आठवण देऊन आणि तिन्ही काळांतील उपकारक्रिया व अपकारापासून निवृत्ती यांचे वचन देऊन सामोपचाराने त्याला वश करावे. २२ ज्याचा उत्साह मावळला आहे, युद्धाने जो थकला आहे, ज्याचे (सामादी) उपाय निष्फल झाले आहेत, क्षय आणि व्यय यांमुळे तसेच प्रवासामुळे जो मेटाकुटीस आला आहे, स्वतःच्या निष्ठेने ज्याला दुसरा मित्र मिळविण्याची इच्छा आहे, किंवा ज्याला दुसऱ्या कोणाची भीती वाटते किंवा जो मैत्रीला प्राधान्य देणारा असून सद्‌बुद्धीने प्रेरित झाला असेल त्याला सामोपचाराने वळवावे.

२३ तो लोभी असेल किंवा दुर्बल झाला असेल तर तपस्वी किंवा एखादा मुख्य यांच्यामार्फत प्रथम हमी देऊन दानाने त्याला वश करावे. २४ ते दान पाच प्रकारचे आहे – येणे असलेल्याची सूट देणे, जे त्याने घेतले असेल त्याला मान्यता देणे, जे आपण घेतले असेल ते परत करणे, स्वतःचे द्रव्य नव्याने देणे आणि दुसऱ्यांच्या वस्तू हाताला लागतील तशा घेण्याची परवानगी देणे. २५ हा दानाचा उपाय.

२६ परस्परांमधील द्वेषाने अथवा वैराने अथवा आपल्या भूमीच्या संभाव्य हरणाने जो भ्याला असेल त्याला भीतीच्या ह्या तीन कारणापैकी एकाच्या आधारे इतरांपासून फोडावे. २७ किंवा जो भेकड असेल त्याला बदला घेतला जाण्याचा धाक दाखवावा, " हा राजा इतर शत्रूबरोबर तह करून तुझ्याविरुद्ध काम चालवील; (तहाची बोलणी करण्याचा) त्याच्या मित्राला अधिकार दिला आहे; तहाच्या बोलण्यातसुद्धा तुझा समावेश नाही. "

**यस्य वा स्वदेशादन्यदेशाद्वा पण्यानि पण्यागारतयाऽऽगच्छेयुः तानि अस्य 'यातव्याल्लब्धानि' इति सत्त्रिणश्चारयेयुः । २८ । बहुलीभूते शासनमभित्यक्तेन प्रेषयेत् 'एतत्ते पण्यं पण्यागारं वा मया ते प्रेषितम्, सामवायिकेषु विक्रमस्व, अपगच्छ वा, ततः पणशेषमवाप्स्यसि' इति । २९ । ततः सत्त्रिणः परेषु ग्राहयेयुः 'एतदरिप्रदत्तम्' इति । ३० ।**

**शत्रुप्रख्यातं वा पण्यमविज्ञातं विजिगीषुं गच्छेत् । ३१ । तदस्य वैदेहकव्यञ्जनाः शत्रुमुख्येषु विक्रीणीरन् । ३२ । ततः सत्त्रिणः परेषु ग्राहयेयुः 'एतत्पण्यमरिप्रदत्तम्' इति । ३३ ।**

**महापराधानर्थमानाभ्यामुपगृह्य वा शस्त्ररसाग्निभिरमित्रे प्रणिदध्यात् । ३४ । अथैकममात्यं निष्पातयेत् । ३५ । तस्य पुत्रदारमुपगृह्य रात्रौ हतमिति ख्यापयेत् । ३६ । अथामात्यः शत्रोस्तानेकैकशः प्ररूपयेत् । ३७ । ते चेद्यथोक्तं कुर्युर्न चैनान् ग्राहयेत् । ३८ । अशक्तिमतो वा ग्राहयेत् । ३९ । आप्तभावोपगतो**

२८ ज्याला स्वदेशातून किंवा परदेशातून काही वस्तू भेटीदाखल मिळाल्या असतील त्याच्याबद्दल गुप्त हेरांनी "आपण ज्याच्यावर चाल करून जाणार आहोत त्याच्याकडून ह्या वस्तू मिळाल्या आहेत," अशी 'बातमी' पसरावी. २९ ती बातमी सगळीकडे पसरली की वध्य मनुष्याच्या हाती पत्र पाठवावे, "ह्या वस्तू मी तुला भेट म्हणून पाठविल्या आहेत; तुझ्याबरोबरच्या राजांवर हल्ला कर किंवा त्यांना सोडून निघून जा; नंतर ठरलेल्या रकमेपैकी बाकीचे तुला मिळेल." ३० नंतर हेरांनी इतरांना "हा माल शत्रूने दिलेला आहे" हे पटवून द्यावे.

३१ किंवा (एखाद्या) शत्रूची म्हणून प्रसिद्ध असलेली वस्तू कोणाला नकळत विजिगीषूकडे जाईल अशी व्यवस्था करावी. ३२ व्यापारी वेषातील हेरांनी त्याची म्हणून ती वस्तू शत्रूंच्या मुख्यांना विकावी. ३३ नंतर हेरांनी "ही वस्तू शत्रूला भेट म्हणून दिली होती" असे इतरांना पटवून द्यावे.

३४ किंवा मोठा गुन्हा केलेल्या गुन्हेगारांना द्रव्य देऊन व त्यांचा सत्कार करून शत्रूवर शस्त्र, विष किंवा अग्नी यांचा प्रयोग करण्यासाठी त्याच्या देशात पाठवून द्यावे. ३५ नंतर (विश्वासातील) एका अमात्याला सोडून जावयास सांगावे. ३६ त्याच्या बायकामुलांना रक्षणाखाली घेऊन रात्री ते मारले गेले अशी अफवा पसरवावी. ३७ नंतर अमात्याने त्या गुन्हेगारांपैकी एक एक शत्रूच्या नजरेस आणून द्यावे. ३८ त्यांनी जर त्यांना सांगितल्याप्रमाणे (शत्रूला ठार) केले तर त्यांना पकडावयास लावू नये. ३९ किंवा ज्यांना ते शक्य झाले नसेल ते पकडले जातील असे करावे. ४० याप्रमाणे शत्रूचा विश्वास संपादन केल्यावर त्याला (कटातील)मुख्य राजापासून स्वतःचे रक्षण करण्या-

**मुख्यावस्यात्मानं रक्षणीयं कथयेत् । ४० । अथामित्रशासनं मुख्योपघाताय प्रेषितमुभयवेतनो ग्राहयेत् । ४१ ।**

**उत्साहशक्तिमतो वा प्रेषयेत् 'अमुष्य राज्यं गृहाण, यथास्थितो नः संधिः' इति । ४२ । ततः सत्त्रिणः परेषु ग्राहयेयुः । ४३ ।**

**एकस्य स्कन्धावारं वीवधमासारं वा घातयेयुः । ४४ । इतरेषु मैत्रीं ब्रुवाणाः 'त्वमेतेषां घातयितव्यः' इत्युपजपेयुः । ४५ ।**

**यस्य वा प्रवीरपुरुषो हस्ती हयो वा म्रियेत गूढपुरुषैर्हन्येत ह्रियेत वा सत्त्रिणः परस्परोपहतं ब्रूयुः । ४६ । ततः शासनमभिशस्तस्य प्रेषयेत् 'भूयः कुरु ततः पणशेषमवाप्स्यसि' इति । ४७ । तदुभयवेतना ग्राहयेयुः । ४८ ।**

**भिन्नेष्वन्यतमं लभेत । ४९ । तेन सेनापतिकुमारदण्डचारिणो व्याख्याताः । ५० । सांघिकं च भेदं प्रयुञ्जीत । ५१ । इति भेदकर्म । ५२ ।**

साठी सावध रहाण्यास सांगावे. ४१ नंतर शत्रूचे पत्र त्या मुख्याचा घात करण्याविषयी पाठविलेले, उभयवेतन हेराने मुख्याच्या हाती पडेल अशी व्यवस्था करावी.

४२ किंवा उत्साहशक्तीने संपन्न राजाला पत्र धाडावे, "अमुक अमुक राजाचे राज्य घे; ठरल्याप्रमाणे आपला तह आहे." ४३ नंतर हेरांनी ते शत्रूंच्या हाती पडण्याची तजवीज करावी.

४४ एका राजाचा सैन्याचा तळ, धान्यादीचा पुरवठा अथवा येणारी कुमक यांचा नाश करावा. ४५ नंतर इतरांशी मैत्री असल्याचे सांगणाऱ्या हेरांनी "हे तुझा घात करणार आहेत" असे गुप्तपणे सुचवावे.

४६ किंवा जर कोणाचा शूर योद्धा, हत्ती अथवा घोडा मेला असेल, गूढ पुरुषांनी मारला असेल अथवा पळवून नेला असेल तर हेरांनी ते एकमेकाचे कृत्य आहे असे सांगावे. ४७ नंतर ज्याच्यावर आळ घेतला गेला असेल त्याला पत्र पाठवावे, "आणखी असेच कर; नंतर ठरलेल्यापैकी बाकीचे तुला मिळेल." ४८ उभयवेतन हेरांनी ते इतरांच्या हाती पडेल असे करावे.

४९ (यांपैकी एखाद्या उपायाने) फाटाफूट झाली म्हणजे त्यांच्यापैकी एकास आपल्या बाजूला वळवून घ्यावे. ५० (स्वतः राजे न येता) सेनापती किंवा राजपुत्र सैन्य घेऊन आले असता भेदाचे असेच उपाय योजावेत. ५१ आणि (अकराव्या अधिकरणात सांगितल्याप्रमाणे) संघातील फाटाफुटीसारखी फूट पाडावी. ५२ हा झाला भेदाचा उपाय.

तीक्ष्णमुत्साहिनं व्यसनिनं स्थितशत्रुं वा गूढपुरुषाः शस्त्राग्निरसादिभिः साधयेयुः, सौकर्यतो वा तेषामन्यतमः । ५३ । तीक्ष्णो ह्येकः शस्त्ररसाग्निभिः साधयेत् । ५४ । अयं सर्वसंदोहकर्म विशिष्टं वा करोति । ५५ ।

इत्युपायचतुर्वर्गः । ५६ । पूर्वः पूर्वश्चास्य लघिष्ठः । ५७ । सान्त्वमेकगुणम् । ५८ । दानं द्विगुणं सान्त्वपूर्वम् । ५९ । भेदस्त्रिगुणः सान्त्वदानपूर्वः । ६० । दण्डश्चतुर्गुणः सान्त्वदानभेदपूर्वः । ६१ ।

इत्यभियुञ्जानेषूक्तम् । ६२ । स्वभूमिष्ठेषु तु त एवोपायाः । ६३ । विशेषस्तु । ६४ । स्वभूमिष्ठानामन्यतमस्य पण्यागारैरभिज्ञातान् दूतमुख्यानभीक्ष्णं प्रेषयेत् । ६५ । त एनं संधौ परहिंसायां वा योजयेयुः । ६६ । अप्रतिपद्यमानं 'कृतो नः संधिः' इत्यावेदयेयुः । ६७ । तमितरेषामुभयवेतनाः संक्रामयेयुः 'अयं वो राजा दुष्टः' इति । ६८ ।

यस्य वा यस्माद्भयं वैरं द्वेषो वा तं तस्माद्भेदयेयुः 'अयं ते शत्रुणा संधत्ते, पुरा

५३ जो शत्रू क्रूर, उत्साहयुक्त, व्यसनी (किंवा संकटात सापडलेला) अथवा दुर्गात घट्ट पाय रोवलेला असेल त्याला गूढ पुरुषांनी शस्त्र, अग्नी, विष इत्यादींनी नष्ट करावे, किंवा करण्यास सोपे असल्यामुळे त्यांच्यापैकी एका गूढ पुरुषाने हे करावे. ५४ कारण, एकटा तीक्ष्ण शस्त्र, विष, अग्नी यांनी हे करू शकेल. ५५ सर्व सैन्य मिळून जे काम करते ते किंवा त्याहून अधिक काम हा (तीक्ष्ण हेर एकटा) करतो.

५६ हा चार उपायांचा समुदाय. ५७ त्यांच्यात नंतरनंतरच्यापेक्षा अगोदर-अगोदरचा उपाय योजण्यास अधिक सोपा. ५८ साम एकपट असते. ५९ दान दुप्पट असते, कारण सामोपचार अगोदर योजलेला असतो. ६० भेद तिप्पट, कारण साम व दान अगोदर योजलेले असतात. ६१ दंड चौपट, कारण साम, दान व भेद हे अगोदर योजलेले असतात.

६२ शत्रूंनी हल्ला केला असता काय करावे ते येथवर सांगितले. ६३ परंतु (चाल करून न येता) ते आपापल्या राज्यांत असले तरी तेच उपाय योजावेत. ६४ परंतु विशेष उपाय पुढीलप्रमाणे. ६५ आपापल्या राज्यांत असलेल्या शत्रूंपैकी एकाकडे सर्वांना माहीत असलेल्या मुख्य अधिकाऱ्यांना भेटी घेऊन दूत म्हणून वारंवार पाठवावे. ६६ त्यांनी त्या शत्रूला संधी करण्यास अथवा दुसऱ्या शत्रूचा घात करण्यास प्रवृत्त करावे. ६७ तो कबूल न झाला तरी त्यांनी 'आमचा तह झाला आहे' असे घोषित करावे. ६८ उभयवेतन हेरांनी ते दुसऱ्यांना कळवून म्हणावे, "हा तुमचा राजा फितूर झाला आहे."

६९ किंवा जर एका शत्रूला दुसऱ्या शत्रूची भीती वाटत असेल, त्याचे त्याच्याशी वैर असेल अथवा तो त्याचा द्वेष करीत असेल तर त्याला त्याच्यापासून फोडावे, "हा राजा तुझ्या शत्रूबरोबर संधी करीत आहे, लवकरच तुला तो

त्वामतिसंधत्ते, क्षिप्रतरं संधीयस्व, निग्रहे चास्य प्रयतस्व ' इति । ६९ । आवाह-विवाहाभ्यां वा कृत्वा संयोगमसंयुक्तान् भेदयेत् । ७० ।

सामन्ताटविकतत्कुलीनापरुद्धैश्चैषां राज्यानि घातयेत्, सार्थव्रजाटवीर्वा, दण्डं वाऽभिसृतम् । ७१ । परस्परापाश्रयाश्चैषां जातिसंघाश्छिद्रेषु प्रहरेयुः, गूढाश्चाग्निरसशस्त्रेण । ७२ ।

वीतंसगिलवच्चारीन् योगैराचरितैः शठः ।
घातयेत्परमिश्रायां विश्वासेनामिषेण च ।। ७३ ।।

इत्यभियास्यत्कर्मणि नवमेऽधिकरणे दूष्यशत्रुसंयुक्ताः (आपदः) षष्ठोऽध्यायः ।
आदितः सप्तविंशतिशततमः ।

७

[ पञ्चचत्वारिंशच्छततमं प्रकरणम्–अर्थानर्थसंशययुक्ताः (आपदः) ;
षट्चत्वारिंशच्छततमं प्रकरणम् – तासामुपायविकल्पजाः सिद्धयः ]

कामादिरुत्सेकः स्वाः प्रकृतीः कोपयति, अपनयो बाह्याः । १ । तदुभयमासुरी वृत्तिः । २ । स्वजनविकारः कोपः । ३ ।

फसवील, तूच अगदी त्वरित संधी कर आणि त्याचा निग्रह करण्याचा प्रयत्न कर." ७० किंवा कन्यास्वीकाराने अथवा कन्यादानाने विवाहसंबंध प्रस्थापित करून ज्यांच्याशी असे संबंध प्रस्थापित झाले नाहीत त्यांच्यापासून त्याला फोडावे.

७१ आणि शेजारचा राजा, अटवीमुख्य, त्याच्या कुलातील गादीवर हक्क सांगणारा आणि मर्जीतून उतरलेला राजपुत्र यांच्यामार्फत त्यांच्या राज्यांचा नाश करावा अथवा व्यापाऱ्यांचे तांडे, गुरांचे कळप, अरण्ये यांचा अथवा मदतीला आलेला सैन्याचा विध्वंस करावा. ७२ आणि परस्परांशी संबद्ध असलेल्या जातीच्या संघांनी त्यांच्या मर्मस्थानी प्रहार करावा आणि गूढ पुरुषांनी अग्नी, विष व शस्त्र यांचा प्रयोग करावा.

७३ आणि परमिश्रा आपत्ती आली असता राजाने शठ होऊन (पक्ष्यांमध्ये विश्वास उत्पन्न करण्यासाठी फासेपारध्यांनी) पांघरलेल्या कपड्याप्रमाणे आणि (पक्ष्यांना आकर्षित करण्यासाठी) ठेवलेल्या आमिषाप्रमाणे विश्वास उत्पन्न करून व प्रलोभन दाखवून शत्रूंचा गूढ उपायांच्या योजनेने घात करावा.

## सातवा अध्याय

### प्रकरण १४५ : अर्थ, अनर्थ व संशय यांनी युक्त अशा आपत्ती ; प्रकरण १४६ : (चार) उपायांच्या वैकल्पिक योजनेने त्या आपत्तींचे निवारण

१ कामादी विकारांचा अतिरेक स्वतःच्या प्रजाजनात प्रक्षोभ उत्पन्न करतो, चुकीच्या धोरणाचा अवलंब शत्रूंना उत्तेजित करतो. २ त्या दोन्ही गोष्टी

**परवृद्धिहेतुषु आपदर्थोऽनर्थः संशय इति । ४ ।**

**योऽर्थः शत्रुवृद्धिमप्राप्तः करोति, प्राप्तः प्रत्यादेयः परेषां भवति, प्राप्यमाणो वा क्षयव्ययोदयो भवति, स भवत्यापदर्थः । ५ । यथा सामन्तानामामिषभूतः सामन्तव्यसनजो लाभः, शत्रुप्रार्थितो वा स्वभावाधिगम्यो लाभः, पश्चात्कोपेन पार्ष्णिग्राहेण वा विगृहीतः पुरस्ताल्लाभः, मित्रोच्छेदेन संधिव्यतिक्रमेण वा मण्डलविरुद्धो लाभः इत्यापदर्थः । ६ ।**

**स्वतः परतो वा भयोत्पत्तिरित्यनर्थः । ७ ।**

**तयोः अर्थो न वेति, अनर्थो न वेति, अर्थोऽनर्थ इति, अनर्थोऽर्थ इति संशयः । ८ । शत्रुमित्रमुत्साहयितुमर्थो न वेति संशयः । ९ । शत्रुबलमर्थमानाभ्यामावाहयितुमनर्थो न वेति संशयः । १० । बलवत्सामन्तां भूमिमादातुमर्थोऽनर्थ इति संशयः**

म्हणजे असुरांसारखे वागणे होय. ३ स्वतःच्या लोकांच्या चित्तात विकार उत्पन्न होणे म्हणजे कोप.

४ शत्रूची अभिवृद्धी करणाऱ्या कारणांमध्ये आपद्रूप अर्थ, अनर्थ व संशय ह्या गोष्टी होत.

५ जो अर्थ आपण मिळविला नाही तर शत्रूची अभिवृद्धी करतो, जो आपण प्राप्त करून घेतल्यानंतर शत्रूंना सहज परत घेता येण्यासारखा असतो, किंवा जो मिळवीत असता माणसांची व द्रव्याची खूप हानी होते तो आपत्तीच्या स्वरूपाचा अर्थ. ६ उदाहरणार्थ, एका सामंताच्या संकटामुळे प्राप्त होणे शक्य असलेला व इतर सामंतांचा त्याच्यावर डोळा असलेला लाभ (आपण न घेतल्यास व दुसऱ्या कोणी सामंताने घेतल्यास त्या सामंत शत्रूची अभिवृद्धी करणारा), किंवा शत्रूला पाहिजे असलेला व स्वभावतःच त्याला सहज घेता येण्यासारखा लाभ (आपण घेतला तर), पाठीमागे होणाऱ्या बंडाळीमुळे अथवा पिछाडीच्या शत्रूमुळे धोक्यात येणारा पुढच्या बाजूचा लाभ, (आपल्या) मित्राचा उच्छेद केल्यामुळे अथवा तहाचा भंग केल्यामुळे राजमंडलाचा विरोध असणारा लाभ – हे आपत्तीच्या स्वरूपाचे अर्थ होत.

७ स्वतःच्या माणसांकडून अथवा शत्रूंकडून उत्पन्न होणारा धोका म्हणजे अनर्थ.

८ त्या दोहोंच्या संबंधात " हा अर्थ आहे की नाही?", " हा अनर्थ आहे की नाही ?", हा अर्थ अनर्थ आहे का ?", " हा अनर्थ अर्थ आहे का ?" असा चार प्रकारचा संशय होय. ९ शत्रूच्या मित्राला (त्याच्याविरुद्ध) प्रोत्साहित करणे हा अर्थ आहे की नाही या स्वरूपाचा संशय. १० शत्रूच्या सैन्याला द्रव्य देऊन व सत्कार करून आपल्याकडे बोलावणे हा अनर्थ आहे की नाही या स्वरूपाचा संशय. ११ बलाढ्य शेजारी असलेला देश घेणे हा अर्थ अनार्थाच्या स्वरूपाचा

**। ११ । ज्यायसा संभूययानमनर्थोऽर्थ इति संशयः । १२ । तेषामर्थसंशयमुपगच्छेत् । १३ ।**

**अर्थोऽर्थानुबन्धः, अर्थो निरनुबन्धः, अर्थोऽनर्थानुबन्धः, अनर्थोऽर्थानुबन्धः, अनर्थो निरनुबन्धः, अनर्थोऽनर्थानुबन्धः इत्यनुबन्धषड्वर्गः । १४ । शत्रुमुत्पाट्य पार्ष्णिग्राहादानमर्थोऽर्थानुबन्धः । १५ । उदासीनस्य दण्डानुग्रहः फलेन अर्थो निरनुबन्धः । १६ । परस्यान्तरुच्छेदनमर्थोऽनर्थानुबन्धः । १७ । शत्रुप्रतिवेशस्यानुग्रहः कोशदण्डाभ्यामनर्थोऽर्थानुबन्धः । १८ । हीनशक्तिमुत्साह्य निवृत्तिरनर्थो निरनुबन्धः । १९ । ज्यायांसमुत्थाप्य निवृत्तिरनर्थोऽनर्थानुबन्धः । २० । तेषां पूर्वः पूर्वः श्रेयानुपसंप्राप्तुम् । २१ ।**

**इति कार्यावस्थापनम् । २२ ।**

**समन्ततो युगपदर्थोत्पत्तिः समन्ततोऽर्थापद् भवति । २३ । सैव पार्ष्णिग्राहविगृहीता समन्ततोऽर्थसंशयापद् भवति । २४ । तयोर्मित्राक्रन्दोपग्रहात्सिद्धिः ।२५ ।**

आहे का असा संशय. १२ बलवत्तर राजाशी एकजूट करून प्रयाण करणे हा अनर्थ अर्थाच्या स्वरूपाचा आहे का असा संशय. १३ यांपैकी अर्थाशी संबद्ध असलेल्या संशयाच्या प्रसंगी कार्यान्वित व्हावे.

१४ ज्यापासून दुसरा अर्थ निष्पन्न होतो असा अर्थ, ज्याचा पुढे काही परिणाम होत नाही असा अर्थ, ज्यापासून अनर्थ निष्पन्न होतो असा अर्थ, ज्यापासून अर्थ निष्पन्न होतो असा अनर्थ, ज्याचा पुढे काही परिणाम होत नाही असा अनर्थ आणि ज्यापासून दुसरा अनर्थ निष्पन्न होतो असा अनर्थ – असे सहा प्रकारचे अनुबंध (होणारे परिणाम). १५ शत्रूला उखडून टाकल्यानंतर पिछाडीच्या शत्रूला जिंकणे हा दुसरा अर्थ निष्पन्न करणारा अर्थ. १६ उदासीन राजाला सैन्याची मदत देऊन मोबदल्यात झालेला लाभ हा नंतर काही परिणाम न करणारा अर्थ. १७ शत्रूचा अंतर्धि असलेल्या राजाचा उच्छेद हा परिणामी अनर्थ उत्पन्न करणारा अर्थ. १८ शत्रूच्या शेजाऱ्याला द्रव्याची व सैन्याची मदत देणे हा परिणामी अर्थ उत्पन्न करणारा अनर्थ. १९ हीनशक्ती राजाला प्रोत्साहित करून नंतर काही न करणे हा काही परिणाम न करणारा अनर्थ. २० बलवत्तर राजाला प्रोत्साहित केल्यावर स्वस्थ रहाणे हा दुसरा अनर्थ उत्पन्न करणारा अनर्थ. २१ यांपैकी क्रमशः अगोदरअगोदरच्या प्रसंगी कार्य हाती घेणे श्रेयस्कर.

२२ याप्रमाणे कार्याची उपादेयता व अनुपादेयता निर्धारित केली.

२३ सर्व बाजूंनी एकाच वेळेस अर्थ उत्पन्न होतात ती समन्ततोऽर्था (सर्व बाजूंना अर्थ असणारी) आपत्ती. २४ ती, ज्यावेळेस पिछाडीच्या शत्रूच्या

**समन्ततः शत्रुभ्यो भयोत्पत्तिः समन्ततोऽनर्थापद् भवति । २६ । सैव मित्र-विगृहीता समन्ततोऽनर्थसंशयापद् भवति । २७ । तयोश्चलामित्राक्रन्दोपग्रहा-त्सिद्धिः, परमिश्राप्रतीकारो वा । २८ ।**

**इतो लाभ इतरतो लाभ इत्युभयतोऽर्थापद्भवति । २९ । तस्यां समन्ततोऽर्थायां च लाभगुणयुक्तमर्थमादातुं यायात् । ३० । तुल्ये लाभगुणे प्रधानमासन्नमनति-पातिनमूनो वा येन भवेत्तमादातुं यायात् । ३१ ।**

**इतोऽनर्थ इतरतोऽनर्थ इत्युभयतोऽनर्थापत् । ३२ । तस्यां समन्ततोऽनर्थायां च मित्रेभ्यः सिद्धिं लिप्सेत । ३३ । मित्राभावे प्रकृतीनां लघीयस्यैकतोऽनर्थां साध-येत्, उभयतोऽनर्थां ज्यायस्या, समन्ततोऽनर्थां मूलेन प्रतिकुर्यात् । ३४ । अशक्ये सर्वमुत्सृज्यापगच्छेत् । ३५ । दृष्टा हि जीवतः पुनरावृत्तिर्यथा सुयात्रोदयना-भ्याम् । ३६ ।**

धोक्याने युक्त होते तेव्हा, समन्ततोऽर्थसंशया आपत्ती होते. २५ त्याप्रसंगी मित्र व आक्रंद यांच्या साहाय्याने सिद्धी मिळवावी.

२६ सर्व बाजूंनी शत्रूंपासून संकट उत्पन्न होते तेव्हा समन्ततोऽनर्था आपत्ती होते. २७. तिला मित्राने पायबंद घातला म्हणजे ती समन्ततोऽनर्थसंशया आपत्ती होते. २८. त्याप्रसंगी दुर्गविहीन शत्रू व मित्र यांचे साहाय्य घेऊन सिद्धी मिळवावी किंवा (अध्याय ९.६ मध्ये सांगितलेले) परमिश्रा आपत्ती-वरील उपाय योजावेत.

२९ इकडे लाभ, तिकडे लाभ असे असल्यास उभयतोऽर्था आपत्ती होते. ३० ती उत्पन्न झाली असता तसेच समन्ततोऽर्था आपत्ती उत्पन्न झाली असता लाभाच्या (आदेय, प्रसादक इत्यादी) गुणांनी युक्त असलेला लाभ घेण्यास जावे. ३१ लाभाचे गुण समान असल्यास जो महत्त्वाचा (मुख्य), जवळचा, वेळ दवडता कामा नये असा अथवा ज्याची त्याच्यामध्ये कमतरता असेल तो घेण्यासाठी जावे.

३२ इकडे अनर्थ, तिकडे अनर्थ असे असल्यास उभयतोऽनर्था आपत्ती होते. ३३ ती उत्पन्न झाली असता तसेच समन्ततोऽनर्था आपत्तीच्या प्रसंगी मित्रांच्या साहाय्याने सिद्धी मिळविण्याचा प्रयत्न करावा. ३४ मित्र नसल्यास प्रकृतींपैकी कमी महत्त्वाची प्रकृती अर्पण करून एका बाजूच्या अनर्थाचे निवारण करावे, दोन बाजूंना अनर्थ असल्यास जास्त महत्त्वाची प्रकृती अर्पण करून, मूळ राज्य अर्पण करून सर्व बाजूंनी येणाऱ्या अनर्थांचे निवारण करावे. ३५ निवारण शक्य नसल्यास सर्वांचा त्याग करून निघून जावे. ३६ कारण जिवंत असल्यास सुयात्र (नल) व उदयन यांच्याप्रमाणे पुन्हा राज्यावर परत येता येते.

**इतो लाभ इतरतो राज्याभिमर्श इत्युभयतोऽर्थानर्थापद् भवति । ३७ । तस्यामनर्थसाधको योऽर्थस्तमादातुं यायात् । ३८ । अन्यथा हि राज्याभिमर्शं वारयेत् । ३९ । एतया समन्ततोऽर्थानर्थापद् व्याख्याता । ४० ।**

**इतोऽनर्थ इतरतोऽर्थसंशय इत्युभयतोऽनर्थार्थसंशया । ४१ । तस्यां पूर्वमनर्थं साधयेत्, तत्सिद्धावर्थसंशयम् । ४२ । एतया समन्ततोऽनर्थार्थसंशया व्याख्याता । ४३ ।**

**इतोऽर्थ इतरतोऽनर्थसंशय इत्युभयतोऽर्थानर्थसंशयापद् । ४४ । एतया समन्ततोऽर्थानर्थसंशया व्याख्याता । ४५ । तस्यां पूर्वां पूर्वां प्रकृतीनामनर्थसंशयान्मोक्षयितुं यतेत । ४६ । श्रेयो हि मित्रमनर्थसंशये तिष्ठन् न दण्डः, दण्डो वा न कोश इति । ४७ । समग्रमोक्षणाभावे प्रकृतीनामवयवान्मोक्षयितुं यतेत । ४८ । तत्र पुरुषप्रकृतीनां बहुलमनुरक्तं वा तीक्ष्णलुब्धवर्जम्, द्रव्यप्रकृतीनां सारं महोपकारं वा । ४९ । संधिनाऽऽसनेन द्वैधीभावेन वा लघूनि, विपर्ययैर्गुरूणि । ५० ।**

३७ इकडे लाभ, तिकडे राज्यावर हल्ला असे असल्यास उभयतोऽर्थानर्था आपत्ती होते. ३८ तशा प्रसंगी जो लाभ अनर्थाचे निवारण करील तो घेण्यास जावे. ३९ तसा लाभ नसल्यास प्रथम राज्यावरील हल्ल्याचे निवारण करावे. ४० समन्ततोऽर्थानर्था आपत्तीच्या प्रसंगीही असेच वागावे.

४१ इकडे अनर्थ, तिकडे अर्थाविषयी संशय असे असल्यास उभयतोऽनर्थार्थसंशया आपत्ती होते. ४२ त्या प्रसंगी प्रथम अनर्थाचे निवारण करावे, ते झाले म्हणजे मग संशययुक्त अर्थ घेण्याचा प्रयत्न करावा. ४३ समन्ततोऽनर्थार्थसंशया आपत्तीच्या प्रसंगीही असेच वागावे.

४४ इकडे अर्थ, तिकडे अनर्थाचा संशय असे असल्यास उभयतोऽर्थानर्थसंशया आपत्ती होते. ४५ तिच्याप्रमाणेच समन्ततोऽर्थानर्थसंशया आपत्ती असते. ४६. ह्याप्रसंगी प्रकृतींपैकी अगोदरअगोदरच्या प्रकृतीला अनर्थाच्या संशयापासून मुक्त करण्याचा प्रयत्न करावा. ४७ कारण, सैन्य अनर्थसंशयात रहाण्यापेक्षा मित्र अनर्थसंशयात रहाणे अधिक चांगले, कोशापेक्षा सैन्य अनर्थसंशयात रहाणे अधिक चांगले. ४८ संपूर्ण प्रकृतीची मुक्तता शक्य नसल्यास प्रकृतींच्या अवयवांची मुक्तता करण्याचा प्रयत्न करावा. ४९ त्यात पुरुषप्रकृतींमध्ये, क्रूर व लोभी वर्ज्य करून, संख्येने जास्त असलेले किंवा राजनिष्ठ असलेले यांची आणि द्रव्यप्रकृतींमध्ये मौल्यवान किंवा अधिक उपयोगी यांची (मुक्तता करण्याचा प्रयत्न करावा). ५० संधी, आसन किंवा द्वैधीभाव ह्या धोरणांचा अवलंब करून कमी महत्त्वाच्या आणि यांच्या उलट असलेल्या धोरणांनी

क्षयस्थानवृद्धीनां चोत्तरोत्तरं लिप्सेत । ५१ । प्रातिलोम्येन वा क्षयादीनामायत्यां विशेषं पश्येत् । ५२ ।

इति देशावस्थापनम् । ५३ ।

एतेन यात्रादिमध्यान्तेष्वर्थानर्थसंशयानामुपसंप्राप्तिर्व्याख्याता । ५४ । निरन्तरयोगित्वाच्चार्थानर्थसंशयानां यात्रादावर्थः श्रेयानुपसंप्राप्तुं पार्ष्णिग्राहासारप्रतिघाते क्षयव्ययप्रवासप्रत्यादेये मूलरक्षणेषु च भवति । ५५ । तथाऽनर्थः संशयो वा स्वभूमिष्ठस्य विषह्यो भवति । ५६ । एतेन यात्रामध्येऽर्थानर्थसंशयानामुपसंप्राप्तिर्व्याख्याता । ५७ । यात्रान्ते तु कर्शनीयमुच्छेदनीयं वा कर्शयित्वोच्छिद्य वाऽर्थः श्रेयानुपसंप्राप्तुं नानर्थः संशयो वा पराबाधभयात् । ५८ । सामवायिकानामपुरोगस्य तु यात्रामध्यान्तगोऽनर्थः संशयो वा श्रेयानुपसंप्राप्तुमनिर्बन्धगामित्वात् । ५९ ।

जांस्त महत्त्वाच्या (प्रकृती व त्यांचे अवयव) यांची मुक्तता करावी. ५१ क्षय, स्थान व वृद्धी यांपैकी नंतरनंतरची स्थिती प्राप्त करण्यास झटावे. ५२ किंवा क्षय, स्थान व वृद्धी यांच्या उलटा क्रम स्वीकारून भविष्यकाळी विशेष लाभ मिळवावा.

५३ याप्रमाणे आपत्तींचा त्या येणाऱ्या दिशांच्या संबंधात विचार झाला.

५४ हीच विचारसरणी मोहिमेचा प्रारंभ, मोहिमेचा मध्य व मोहिमेचा शेवट ह्याप्रसंगी प्राप्त होणाऱ्या अर्थ, अनर्थ व संशय यांनाही लागू पडते. ५५ आणि अर्थ, अनर्थ व संशय हे तात्काल परिणाम करीत असल्यामुळे मोहिमेच्या प्रारंभी अर्थ प्राप्त करून घेणे श्रेयस्कर, पिछाडीचा शत्रू व त्याचा मित्र यांचे नियंत्रण करण्यास, माणसांची व द्रव्याची हानी व प्रवासाचे श्रम यांची भरपाई करण्यास आणि मूळ राज्याचे रक्षण करण्यास (तो अर्थ) उपयुक्त होतो. ५६ त्याचप्रमाणे (मोहिमेच्या प्रारंभी) राजा आपल्याच देशात असता अनर्थ किंवा संशय सहन करणे शक्य होते. ५७ याचप्रमाणे मोहिमेच्या मध्यावर अर्थाची प्राप्ती व अनर्थ व संशय यांचे निवारण श्रेयस्कर. ५८ परंतु मोहिमेच्या शेवटी दुर्बल करणे आवश्यक असलेल्याला दुर्बल करून अथवा उच्छेद करणे आवश्यक असलेल्याचा उच्छेद करून अर्थ सिद्ध करणे श्रेयस्कर, अनर्थ किंवा संशय प्राप्त होणे श्रेयस्कर नाही, कारण त्यात शत्रूपासून धोका उत्पन्न होण्याचे भय असते. ५९ परंतु एकजूट करून स्वारी करणऱ्यांमध्ये पुढारी नसलेल्या राजाला मोहिमेच्या मध्यावर किंवा अंती येणारा अनर्थ अथवा संशय यांची प्राप्ती श्रेयस्कर, कारण ते (त्यावेळेस त्याच्यापुरतेच) मर्यादित न रहाता सर्वांना सारखेच (धोकादायक) असतात.

**अर्थो धर्मः काम इत्यर्थत्रिवर्गः । ६० । तस्य पूर्वः पूर्वः श्रेयानुपसंप्राप्तुम् । ६१ । अनर्थोऽधर्मः शोक इत्यनर्थत्रिवर्गः । ६२ । तस्य पूर्वः पूर्वः श्रेयान् प्रतिकर्तुम् । ६३ । अर्थोऽनर्थ इति, धर्मोऽधर्म इति, कामः शोक इति संशयत्रिवर्गः । ६४ । तस्योत्तरपक्षसिद्धौ पूर्वपक्षः श्रेयानुपसंप्राप्तुम् । ६५ ।**

**इति कालावस्थापनम् । ६६ ।**

**इत्यापदः ।**

**तासां सिद्धिः । ६७ ।–**

**पुत्रभ्रातृबन्धुषु सामदानाभ्यां सिद्धिरनुरूपा, पौरजानपददण्डमुख्येषु दानभेदाभ्यां, सामन्ताटविकेषु भेददण्डाभ्याम् । ६८ । एषाऽनुलोमा, विपर्यये प्रतिलोमा । ६९ ।**

**मित्रामित्रेषु व्यामिश्रा सिद्धिः । ७० । परस्परसाधका ह्युपायाः । ७१ ।**

**शत्रोः शङ्कितामात्येषु सान्त्वं प्रयुक्तं शेषप्रयोगं निवर्तयति, दूष्यामात्येषु दानं, संघातेषु भेदः, शक्तिमत्सु दण्ड इति । ७२ ।**

६० अर्थ, धर्म व काम हे तीन अर्थ होत. ६१ त्यांपैकी अगोदरअगोदरचा प्राप्त करणे अधिक चांगले. ६२ अनर्थ, अधर्म व दुःख हे तीन अनर्थ होत. ६३ त्यांपैकी अगोदरअगोदरच्याचे प्रथम निवारण करणे अधिक चांगले. ६४ हा अर्थ आहे की अनर्थ, हा धर्म आहे की अधर्म, हे सुख आहे की दुःख हे तीन संशय होत. ६५ त्यात (दोन पर्यायांपैकी) दुसऱ्या पर्यायाचे निवारण केल्यावर पहिला पर्याय प्राप्त करणे अधिक चांगले.

६६ हा आपत्तींचा कालाच्या दृष्टीने विचार झाला. येथे आपत्तींच्या निर्देशाची समाप्ती होते.

६७ त्या आपत्तींवर उपाययोजना –

६८ मुलगा, भाऊ व बांधव यांच्या संबंधात साम व दान यांच्या प्रयोगाने सिद्धी मिळविणे उचित, शहरवासी, जनपदनिवासी व सैन्य यांच्यातील मुख्यांच्या संबंधात दान व भेद यांच्या प्रयोगाने, सामंत व अटवीमुख्य यांच्या संबंधात भेद व दंड यांच्या प्रयोगाने (सिद्धी मिळविणे उचित). ६९ ही उपाययोजना स्वाभाविक, याच्या उलट ती अस्वाभाविक.

७० मित्र व शत्रू एक झाले असता मिश्र उपायांचा उपयोग करावा. ७१ कारण हे चार उपाय परस्परांच्या सिद्धीस सहायभूत होतात.

७२ शत्रूच्या, राजनिष्ठेविषयी संशय असलेल्या अमात्यांच्या बाबतीत सामोपचाराचा प्रयोग केला असता इतर उपायांचा उपयोग करण्याचे कारण पडत नाही, त्याच्या राजद्रोही अमात्यांच्या बाबतीत दानाचा, एकजूट केलेल्या

गुरुलाघवयोगाच्चापदां नियोगविकल्पसमुच्चया भवन्ति । ७३ । ' अनेनैवोपायेन नान्येन ' इति नियोगः । ७४ । ' अनेन वाऽन्येन वा ' इति विकल्पः । ७५ । ' अनेनान्येन च ' इति समुच्चयः । ७६ ।

तेषामेकयोगाश्चत्वारस्त्रियोगाश्च, द्वियोगाः षट्, एकश्चतुर्योगः । ७७ । इति पञ्चदशोपायाः । ७८ । तावन्तः प्रतिलोमाः । ७९ ।

तेषामेकेनोपायेन सिद्धिरेकसिद्धिः, द्वाभ्यां द्विसिद्धिः, त्रिभिस्त्रिसिद्धिः, चतुर्भिश्चतुःसिद्धिरिति । ८० । धर्ममूलत्वात्कामफलत्वाच्चार्थस्य धर्मार्थकामानुबन्धा याऽर्थस्य सिद्धिः सा सर्वार्थसिद्धिः । ८१ ।

इति सिद्धयः ।

दैवादग्निरुदकं व्याधिः प्रमारो विद्रवो दुर्भिक्षमासुरी सृष्टिरित्यापदः । ८२ । तासां दैवतब्राह्मणप्रणिपाततः सिद्धिः । ८३ ।

शत्रूंच्या बाबतीत भेदाचा आणि शक्तिसंपन्नांच्या बाबतीत दंडाचा (प्रयोग केल्यास इतर उपाय अनावश्यक होतात).

७३ आणि आपत्तींच्या कमीअधिक गंभीरतेनुसार उपायांचे नियोग, विकल्प आणि समुच्चय हे प्रकार संभवतात. ७४ " ह्याच उपायाने, दुसऱ्या उपायाने नाही " हा नियोग (मर्यादित करणे). ७५ " ह्या उपायाने किंवा दुसऱ्या उपायाने " हा विकल्प. ७६ " ह्या आणि दुसऱ्याही उपायाने " हा समुच्चय.

७७ त्यांच्या एकेकटयाच्या उपयोगाचे चार प्रकार, तसेच तीन उपायांच्या संयुक्त उपयोगाचे चार प्रकार, दोन उपायांच्या संयुक्त उपयोगाचे सहा प्रकार आणि चारांच्या एकत्र उपयोगाचा एक प्रकार. ७८ याप्रमाणे पंधरा प्रकार. ७९ तितकेच प्रकार अस्वाभाविक उपयोगाचेही होतात.

८० त्यांच्यामध्ये एका उपायाने होणारी सिद्धी ती एकसिद्धी, दोन उपायांनी होणारी ती द्विसिद्धी, तीन उपायांनी होणारी ती त्रिसिद्धी आणि चार उपायांनी होणारी ती चतुःसिद्धी. ८१ अर्थ हा धर्माचे मूळ असल्यामुळे आणि काम हे त्याचे फल असल्यामुळे धर्म, अर्थ व काम यांचा सतत लाभ करून देणारी जी अर्थाची सिद्धी ती सर्वार्थसिद्धी.

हा झाला आपत्तींवरील उपाययोजनेचा विचार.

८२ दैवामुळे आगी, पूर, रोगराई, महामारी, अचानक पळापळ, दुष्काळ आणि (मूषिकसर्पादी किंवा भूतपिशाचादी) आसुरी सृष्टी ह्या आपत्ती उद्भवतात. ८३ त्यांच्यावर देवतांची पूजा व ब्राह्मणांना वंदन हे उपाय योजावेत.

**अतिवृष्टिरवृष्टिर्वा सृष्टिर्वा याऽऽसुरी भवेत् ।**
**तस्यामाथर्वणं कर्म सिद्धारम्भाश्च सिद्धयः ।। ८४ ।।**

**इत्यभियास्यत्कर्मणि नवमेऽधिकरणे अर्थानर्थसंशययुक्ताः (आपदः) तासामुपायविकल्पजाः सिद्धयः सप्तमोऽध्यायः । आदितः अष्टाविंशतिशततमः ।**

**एतावता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य अभियास्यत्कर्म नवममधिकरणं समाप्तम् ।**

८४ अतिवृष्टी किंवा अवर्षण किंवा जी आसुरी सृष्टी असेल तिच्यावर अथर्ववेदात सांगितलेले क्रियाकर्म आणि सिद्ध पुरुषांनी केलेली कर्मे हे उपाय होत.

नववे अधिकरण समाप्त

# सांग्रामिकम् – दशममधिकरणम्

१

[सप्तचत्वारिंशच्छततमं प्रकरणम् – स्कन्धावारनिवेशः]

वास्तुकप्रशस्ते वास्तुनि नायकवर्धकिमौहूर्तिकाः स्कन्धावारं, वृत्तं दीर्घं चतुरश्रं वा भूमिवशेन वा, चतुर्द्वारं षट्पथं नवसंस्थानं मापयेयुः खातवप्रसालद्वाराट्टालकसंपन्नं भये स्थाने च । १ ।

मध्यमस्योत्तरे नवभागे राजवास्तुकं धनुःशतायाममर्धविस्तारं, पश्चिमार्धे तस्यान्तःपुरम् । २ । अन्तर्वंशिकसैन्यं चान्ते निविशेत । ३ । पुरस्तादुपस्थानम् दक्षिणतः कोशशासनकार्यकरणानि, वामतो राजौपवाह्यानां हस्त्यश्वरथानां स्थानम् । ४ ।

अतो धनुःशतान्तराश्चत्वारः शकटमेथीप्रततिस्तम्भसालपरिक्षेपाः । ५ । प्रथमे पुरस्तान्मन्त्रिपुरोहितौ, दक्षिणतः कोष्ठागारं महानसं च, वामतः कुप्या-

## दहावे अधिकरण – संग्रामाविषयी

### पहिला अध्याय

### प्रकरण १४७ : सैन्याची छावणी

१ वास्तुशास्त्रज्ञांनी पसंत केलेल्या जागी सैन्याचा नायक, सुतार व मुहूर्त पहाणारे यांनी सैन्याची छावणी – वर्तुळाकार, लंबचौरस अथवा चौरस अथवा जागा जशी असेल तशा आकाराची, चार दरवाजे, सहा रस्ते आणि नऊ विभाग असलेली अशी – आखून घ्यावी, खंदक, तट, भित, दरवाजे व बुरूज यांनी संपन्न अशी, धोक्याच्या प्रसंगी व मुक्काम करावयाचा असेल तेव्हा (उभारावी).

२ मधल्या भागाच्या उत्तरेकडील नवव्या भागात शंभर धनुष्ये लांब व त्याच्या निम्मे रुंद राजासाठी वास्तू उभारावी, त्याच्या पश्चिमेकडील अर्ध्या भागात राजवाडा ठेवावा. ३ आणि त्याच्या सरहद्दीवर राजनिवासाचे रक्षण करणाऱ्या सैन्याचा तळ ठेवावा. ४ राजाच्या वास्तूच्या पुढच्या बाजूला दरबाराची जागा, उजवीकडे कोश, आज्ञापत्रलेखन व कार्ये ठरवून देणे यांच्या जागा, डावीकडे राजाच्या खास उपयोगाचे हत्ती, घोडे व रथ यांच्या जागा.

५ ह्याच्यापलीकडे शंभर शंभर धनुष्यांच्या अंतरावर गाड्या, काटेरी झुडपे, खांब व भित यांची चार कुंपणे उभारावीत. ६ पहिल्या कुंपणाच्या आत

युधागारम् । ६ । द्वितीये मौलभृतानां स्थानमश्वरथानां सेनापतेश्च । ७ । तृतीये हस्तिनः श्रेण्यः प्रशास्ता च । ८ । चतुर्थे विष्टिर्नायको मित्रामित्राटवीबलं स्वपुरुषाधिष्ठितम् । ९ । वणिजो रूपाजीवाश्चानुमहापथम् । १० ।

बाह्यतो लुब्धकश्वगणिनः सतूर्याग्नयः, गूढाश्चारक्षाः । ११ ।

शत्रूणामापाते कूपकूटावपातकण्टकिनीश्च स्थापयेत् । १२ ।

अष्टादशवर्गाणामारक्षविपर्यासं कारयेत् । १३ । दिवायामं च कारयेद-पसर्पज्ञानार्थम् । १४ ।

विवादसौरिकसमाजद्यूतवारणं च कारयेत्, मुद्रारक्षणं च । १५ ।

सेनानिवृत्तमायुधीयमशासनं शून्यपालो बध्नीयात् । १६ ।

पुरस्तादध्वनः सम्यक्प्रशास्ता रक्षणानि च ।
यायाद्वर्धकिविष्टिभ्यामुदकानि च कारयेत् ॥ १७ ॥

इति सांग्रामिके दशमेऽधिकरणे स्कन्धावारनिवेशः प्रथमोऽध्यायः । आदित एकोनत्रिंशच्छततमः ।

पुढच्या बाजूला मंत्री आणि पुरोहित यांच्या जागा, उजवीकडे कोठारे व मुद-पाकखाना, डावीकडे कुप्यगृह आणि शस्त्रागार. ७ दुसऱ्या कुंपणाच्या आत पिढीजाद व पगारी सैन्यांची जागा, घोडे व रथ यांचे तबेले आणि सेनापतीची जागा. ८ तिसऱ्यात हत्ती, श्रेणीबल व प्रशास्ता यांच्या जागा. ९ चौथ्या विभागात मजूर, सैन्याचा नायक आणि त्यांच्या त्यांच्या अधिकाऱ्यांच्या हुकमतीखाली मित्रबल, शत्रुबल व अटवीबल यांचे स्थान. १० हमरस्त्याच्या बाजूला व्यापारी व वेश्या यांचे स्थान असावे.

११ छावणीच्या बाहेरच्या बाजूला वाद्ये व अग्नी जवळ असलेले फासेपारधी व कुत्र्यांनी शिकार करणारे, तसेच गुप्त रक्षक ठेवलेले असावेत.

१२ शत्रू येण्याचा संभव असलेल्या मार्गात (झाकलेल्या) विहिरी, झाकलेले खड्डे आणि काटेरी तारा ठेवून द्याव्यात.

१३ अठरा समूहांवरील पहारेकरी वरचेवर बदलावेत. १४ आणि शत्रूच्या हेरांची माहिती व्हावी यासाठी दिवसासुद्धा पहारे बसवावेत.

१५ विवाद, मद्यपान, मेळावे व जुगार यांना बंदी करावी, आणि मुद्रेने दिलेल्या परवान्याशिवाय आतबाहेर जाऊ नये ह्या नियमाची अंमलबजावणी करावी.

१६ सैन्यातून लेखी परवानगीशिवाय परत आलेल्या सैनिकाला शून्यपालाने (राजाच्या गैरहजेरीत राज्यकारभार पहाणाऱ्या अधिकाऱ्याने) अटक करावी.

१७ प्रशास्त्याने कूच करण्याच्या मार्गावर पुढे जावे आणि मजूर व सुतार यांच्या द्वारा सैन्याच्या रक्षणाची उत्तम सोय करून ठेवावी, तसेच जागजागी पाण्याची सोय करावी.

## २

## [ अष्टचत्वारिंशच्छततमं प्रकरणम् – स्कन्धावारप्रयाणम्; एकोनपञ्चाशच्छततमं प्रकरणम् – बलव्यसनावस्कन्दकालरक्षणम् ]

**ग्रामारण्यानामध्वनि निवेशान् यवसेन्धनोदकवशेन परिसंख्याय स्थानासनगमनकालं च यात्रां यायात् । १ । तत्प्रतीकारद्विगुणं भक्तोपकरणं वाहयेत् । २ । अशक्तो वा सैन्येष्वायोजयेत्, अन्तरेषु वा निचिनुयात् । ३ ।**

**पुरस्तान्नायकः, मध्ये कलत्रं स्वामी च, पार्श्वयोरश्वा बाहूत्सारः, चक्रान्तेषु हस्तिनः प्रसारवृद्धिर्वा, पश्चात्सेनापतिर्यायात् निविशेत । ४ ।**

**सर्वतो वनाजीवः प्रसारः । ५ । स्वदेशादन्वायतिर्वीवधः । ६ । मित्रबलमासारः । ७ । कलत्रस्थानमपसारः । ८ ।**

**पुरस्तादभ्याघाते मकरेण यायात्, पश्चाच्छकटेन, पार्श्वयोर्वज्रेण, समन्ततः सर्वतोभद्रेण, एकायने सूच्या । ९ ।**

### दुसरा अध्याय

### प्रकरण १४८ : सैन्याचे कूच;

### प्रकरण १४९ : संकटाच्या व हल्ल्याच्या वेळी सैन्याचे रक्षण

१ मार्गातील गावे व अरण्ये यांत करावयाचे मुक्काम गवत, लाकूडफाटा व पाणी हे उपलब्ध होतील त्या अनुरोधाने निश्चित करून आणि स्थान (दीर्घ मुक्काम), आसन (थोडा मुक्काम) व गमन (फक्त रात्रीचा मुक्काम) यांचा हिशोब करून मग स्वारीवर निघावे. २ स्वारीवर जितके अन्नधान्य व इतर सामुग्री लागेल त्याच्या दुप्पट बरोबर वाहून नेण्याची व्यवस्था करावी. ३ किंवा ते शक्य नसल्यास सैन्यांवरच ते काम सोपवावे किंवा वाटेत अंतराअंतरावर साठे करून ठेवावेत.

४ सर्वात पुढे नायक, मध्यभागी स्त्रिया व राजा, दोन बाजूला घोडेस्वार, बाहूंनी हल्ला परतविण्यासारखे, सैन्याच्या सभोवती हत्ती किंवा दाणागोटा मिळविणाऱ्या तुकड्या, पाठीमागे सेनापतीने कूच करावे आणि (मुक्कामाच्या वेळी) तळ ठेवावा.

५ सर्व बाजूंनी वनांतून उपजीविका मिळविण्याला प्रसार म्हणतात ६ स्वदेशातून धान्यादीचा पुरवठा होत रहाणे याला 'वीवध' म्हणतात. ७ मित्राच्या सैन्याला आसार (कुमक) म्हणतात. ८ स्त्रिया असतात ते ठिकाण अपसार (पिछेहाटीनंतर आसरा).

९ पुढच्या बाजूला हल्ला अपेक्षित असता मकरव्यूहाची रचना करून कूच करावे, पिछाडीला अपेक्षित असल्यास शकटव्यूहाने, दोन्ही बाजूंनी अपेक्षित

**पथिद्वैधीभावे स्वभूमितो यायात् । १० । अभूमिष्ठानां हि स्वभूमिष्ठा युद्धे प्रतिलोभा भवन्ति । ११ ।**

**योजनमधमा, अध्यर्धं मध्यमा, द्वियोजनमुत्तमा, संभाव्या वा गतिः । १२ ।**

**आश्रयकारी संपन्नघाती पार्ष्णिरासारो मध्यम उदासीनो वा प्रतिकर्तव्यः, संकटो मार्गः शोधयितव्यः, कोशो दण्डो मित्रामित्राटवीबलं विष्टिर्ऋतुर्वा प्रतीक्ष्याः, कृतदुर्गकर्मनिचयरक्षाक्षयः क्रीतबलनिर्वेदो मित्रबलनिर्वेदश्चा-गमिष्यति, उपजपितारो वा नातित्वरयन्ति, शत्रुरभिप्रायं वा पूरयिष्यति, इति शनैर्यायात्; विपर्यये शीघ्रम् । १३ ।**

**हस्तिस्तम्भसंक्रमसेतुबन्धनौकाष्ठवेणुसंघातैरलाबुचर्मकरण्डदृतिप्लवगण्डिका-वेणिकाभिश्चोदकानि तारयेत् । १४ । तीर्थाभिग्रहे हस्त्यश्वैरन्यतो रात्रावुत्तार्य सत्वं गृह्णीयात् । १५ ।**

असता वज्रव्यूहाने, सर्व बाजूंनी अपेक्षित असता सर्वतोभद्रव्यूहाने, एका मनुष्याने जाण्याइतकीच वाट असल्यास सूचीव्यूहाने कूच करावे.

१० दोन मार्ग असल्यास स्वतःला अनुकूल असलेल्या प्रदेशातून जावे. ११ कारण, अनुकूल भूमीवर असलेले सैनिक अनुकूल भूमीवर नसलेल्यांना लढाईत पराभूत करतात.

१२ (दिवसाला) एक योजन कूच कनिष्ठ, दीड योजन मध्यम, दोन योजने उत्तम, किंवा संभवनीय असेल त्याप्रमाणे वेग ठेवावा.

१३ (शत्रूला) आश्रय देण्यास समर्थ अथवा (आपण नसताना आपला) समृद्ध देश उध्वस्त करण्यास समर्थ असा पिछाडीचा शत्रू, त्याचा मित्र, मध्यम राजा किंवा उदासीन राजा यांचा बंदोबस्त करावयाचा आहे; कठीण मार्गातील अडथळे दूर करावयाचे आहेत; कोश, सैन्य, मित्रबल, शत्रुबल, अटवीबल, मजूर किंवा अनुकूल ऋतू यांची वाट पहाणे आवश्यक आहे; (शत्रूचा) बांधलेला दुर्ग, केलेले साठे व रक्षणाच्या तरतुदी यांचा ऱ्हास होईल, त्याच्या विकत घेतलेल्या सैन्यात व मित्राच्या सैन्यात विषण्णता पसरेल (असे वाटेल तेव्हा); शत्रुसैन्यात फितुरी माजविणारे (आपले) हेर आपले काम त्वरेने करीत नाहीत (असे वाटेल तेव्हा); किंवा शत्रू आपल्या मनासारखे वागेल (असे वाटेल तेव्हा) – याप्रसंगीं सावकाश कूच करावे, यांच्या उलट प्रसंगीं जलद कूच करावे.

१४ हत्ती, लाकडी ओंडक्यांचा पूल, बंधारा, नावा, लाकडांचे व बांबूंचे तराफे, भोपळे, चामड्याने मढवलेले करंडे, पखाली, होड्या, झाडांची खोडे आणि दोरखंड यांच्या साहाय्याने सैन्य नदीपार करावे. १५ नदीवरील उताराची जागा शत्रूच्या ताब्यात असल्यास हत्ती व घोडे यांच्या साहाय्याने दुसऱ्या ठिकाणाहून रात्री सैन्य पलीकडे नेऊन अकस्मात छापा घालावा.

अनुदके चक्रिचतुष्पदं चाध्वप्रमाणेन शक्त्योदकं वाहयेत् । १६ ।

दीर्घकान्तारमनुदकं यवसेन्धनोदकहीनं वा कृच्छ्राध्वानमभियोगप्रस्कन्नं क्षुत्पिपासाऽध्वक्लान्तं पङ्कतोयगम्भीराणां वा नदीदरीशैलानामुद्यानापयाने व्यासक्तमेकायनमार्गे शैलविषमे संकटे वा बहुलीभूतं निवेशे प्रस्थिते विसंनाहं भोजनव्यासक्तमायतगतपरिश्रान्तमवसुप्तं व्याधिमरकदुर्भिक्षपीडितं व्याधितपत्त्यश्वद्विपमभूमिष्ठं वा बलव्यसनेषु वा स्वसैन्यं रक्षेत् परसैन्यं चाभिहन्यात् । १७ ।

एकायनमार्गप्रयातस्य सेनानिश्चारग्रासाहारशय्याप्रस्तारग्निनिधानध्वजायुधसंख्यानेन परबलज्ञानम् । १८ । तदात्मनो गूहयेत् । १९ ।

पार्वतं वनदुर्गं वा सापसारप्रतिग्रहम् ।
स्वभूमौ पृष्ठतः कृत्वा युध्येत निविशेत च ।। २० ।।

इति सांग्रामिके दशमेऽधिकरणे स्कन्धावारप्रयाणम् बलव्यसनावस्कन्दकालरक्षणम्
द्वितीयोऽध्यायः । आदितस्त्रिशच्छततमः ।

१६ पाणी उपलब्ध नाही अशा ठिकाणी बैलगाड्या व जनावरे यांच्याकरवी त्यांच्या शक्तीप्रमाणे व कापावयाचे असलेल्या अंतराच्या अनुरोधाने पाणी वाहून नेण्याची व्यवस्था करावी.

१७ सैन्य मोठ्या अरण्यातून जात असेल, पाणी नसलेल्या किंवा गवत, इंधन व पाणी नसलेल्या बिकट मार्गाने जात असेल, शत्रूच्या हल्ल्यामुळे विखुरले असेल, भूक, तहान व प्रवास यांनी म्लान झाले असेल, चिखल व खोल पाणी असलेल्या नद्या, दऱ्या व पर्वत यांतून पलीकडे जाण्यात गुंतले असेल, एकच मनुष्य जाऊ शकणाऱ्या वाटेवर, डोंगराळ प्रदेशात अथवा अरुंद जागी दाटीवाटीने गोळा झाले असेल, मुक्कामाच्या ठिकाणी अथवा कूच करताना चिलखताशिवाय असेल, भोजन करण्यात गुंतले असेल, लांबच्या प्रवासामुळे थकून गेले असेल, निद्रा घेत असेल, रोगराई, महामारी, दुष्काळ यांनी गांजून गेले असेल, पदाती, घोडे अथवा हत्ती व्याधिग्रस्त झाले असतील किंवा सैन्य अनुकूल भूमीवर नसेल – या सर्व प्रसंगीं, तसेच (८.५.१–१८ मध्ये निर्देशिलेल्या) सैन्यावरील संकटांच्या प्रसंगीं आपल्या सैन्याच्या रक्षणाची काळजी घ्यावी, तसे प्रसंग शत्रुसैन्यावर आले असता त्याच्यावर हल्ला चढवावा.

१८ एका मनुष्यापुरतीच वाट असलेल्या मार्गाने गेलेल्या सैन्याचे कूच, त्याचे दाणावारा, अन्नपाणी, पसरलेले बिछाने, पेटवलेल्या चुली, ध्वज आणि आयुधे ह्यांची गणना करून शत्रूचे सैन्य किती असेल याचा अंदाज बांधावा. १९ आपल्या सैन्याच्या बाबतीत ह्या सर्व गोष्टी लपवून ठेवाव्यात.

२० पळून जावे लागल्यास जेथे आश्रय घेता येईल आणि जेथे राखीव सैन्य ठेवले असेल असा पर्वतदुर्ग किंवा वनदुर्ग पिछाडीला राहील याची काळजी घेऊन स्वतःला अनुकूल भूमीवर युद्ध करावे आणि तळ ठोकावा.

३

[ पञ्चाशच्छततमं प्रकरणम् – कूटयुद्धविकल्पाः;
एकपञ्चाशच्छततमं प्रकरणम् – स्वसैन्योत्साहनम्;
द्विपञ्चाशच्छततमं प्रकरणम् – स्वबलान्यबलव्यायोगः ]

बलविशिष्टः कृतोपजापः प्रतिविहितर्तुः स्वभूम्यां प्रकाशयुद्धमुपेयात् । १ । विपर्यये कूटयुद्धम् । २ ।

बलव्यसनावस्कन्दकालेषु परमभिहन्यात्, अभूमिष्ठं वा स्वभूमिष्ठः, प्रकृतिप्रग्रहो वा स्वभूमिष्ठम् । ३ ।

दूष्यामित्राटवीबलैर्वा भङ्गं दत्त्वा विभूमिप्राप्तं हन्यात् । ४ ।

संहतानीकं हस्तिभिर्भेदयेत् । ५ ।

पूर्वं भङ्गप्रदानेनानुप्रलीनं भिन्नमभिन्नः प्रतिनिवृत्य हन्यात् । ६ ।

## तिसरा अध्याय

### प्रकरण १५० : कूटयुद्धाचे विविध प्रकार;
### प्रकरण १५१ : आपल्या सैन्याचे प्रोत्साहन;
### प्रकरण १५२ : आपले सैन्य आणि शत्रुसैन्य यांचा मुकाबला

१ अधिक सैन्य असेल तेव्हा, फितुरीचे यत्न केले असतील तेव्हा, ऋतूविषयी खबरदारी घेतली असेल तेव्हा, आपल्याला अनुकूल भूमी असेल तेथे उघड युद्ध करावे. २ याच्या उलट स्थिती असेल तेव्हा युद्धाचे डावपेच लढवावेत.

३ सैन्यावरील संकटांच्या प्रसंगी आणि (१०.२.१७ मधील) हल्ला चढविण्यास योग्य प्रसंगी शत्रूवर हल्ला चढवावा, किंवा आपण अनुकूल भूमीवर असून तो प्रतिकूल भूमीवर असता, अथवा तो त्याला अनुकूल भूमीवर असला तरी प्रकृतींचा जोरदार पाठिंबा असल्यास (त्याच्यावर हल्ला चढवावा).

४ किंवा आपल्या दूष्य सैन्याच्या, शत्रुसैन्याच्या अथवा रानटी सैन्याच्या द्वारा आपल्या सैन्याची फळी फुटली असे दाखवून (पाठलाग करणारा) शत्रू प्रतिकूल भूमीवर आला की त्याच्यावर मारा करावा.

५ शत्रूच्या सैन्याची फळी भक्कम असल्यास हत्तींच्या द्वारा ती फोडावी.

६ अगोदर फळी फुटल्याचे भासवून मग पाठलाग करणारे शत्रूचे सैन्य विखुरले की स्वतःच्या एकसंध सैन्यानिशी परत फिरून त्याच्यावर मारा करावा.

पुरस्तादभिहत्य प्रचलं विमुखं वा पृष्ठतो हस्त्यश्वेनाभिहन्यात् ।७। पृष्ठतोऽभिहत्य प्रचलं विमुखं वा पुरस्तात्सारबलेनाभिहन्यात् ।८। ताभ्यां पार्श्वाभिघातौ व्याख्यातौ ।९। यतो वा दूष्यफल्गुबलं ततोऽभिहन्यात् ।१०।

पुरस्ताद्विषमायां पृष्ठतोऽभिहन्यात् ।११। पृष्ठतो विषमायां पुरस्तादभिन्यात् ।१२। पार्श्वतो विषमायामितरतोऽभिहनात् ।१३।

दूष्यामित्राटवीबलैर्वा पूर्वं योधयित्वा श्रान्तमश्रान्तः परमभिहन्यात् ।१४।

दूष्यबलेन वा स्वयं भङ्गं दत्त्वा 'जितम्' इति विश्वस्तमविश्वस्तः सत्त्रापाश्रयोऽभिहन्यात् ।१५।

सार्थव्रजस्कन्धावारसंवाहविलोपप्रमत्तमप्रमत्तोऽभिहन्यात् ।१६।

फल्गुबलावच्छन्नसारबलो वा परवीराननुप्रविश्य हन्यात् ।१७।

गोग्रहणेन श्वापदवधेन वा परवीरानाकृष्य सत्त्रच्छन्नोऽभिहन्यात् ।१८।

७ शत्रुसैन्याच्या आघाडीवर हल्ला करून ते डगमगू लागले किंवा त्याने पाठ फिरविली तर हत्ती व घोडे यांनी त्याच्या पिछाडीवर हल्ला चढवावा. ८ पिछाडीवर हल्ला करून ते डगमगले किंवा पळू लागले तर त्याच्या आघाडीवर उत्तम प्रतीच्या सैन्याने मारा करावा. ९ असेच बगलेवरील हल्ल्यांच्या बाबतीत समजावे. १० किंवा ज्या ठिकाणी शत्रूचे दूष्य अथवा कमजोर सैन्य असेल त्या ठिकाणावर हल्ला चढवावा.

११ (शत्रूच्या) आघाडीवर जमीन उंचसखल असल्यास पिछाडीवर हल्ला करावा. १२ पिछाडीला उंचसखल असल्यास आघाडीवर हल्ला करावा. १३ एका बाजूला उंचसखल असल्यास दुसऱ्या बाजूने हल्ला चढवावा.

१४ आपल्या दूष्यबलाशी, शत्रुबलाशी अथवा अटवीबलाशी शत्रूच्या सैन्याला प्रथम लढावयास लावून ते दमले म्हणजे ताज्या सैन्यानिशी त्याच्यावर हल्ला चढवावा.

१५ किंवा दूष्यबलाच्या उपयोगाने स्वतःच्या सैन्याची फळी फुटल्याचे भासवून 'जिंकलो' ह्या कल्पनेने निर्धास्त राहिलेल्या शत्रूवर, स्वतः सावध राहून, दबा धरून मारा करावा.

१६ व्यापारी तांडे, गुरांचे कळप, छावणी, वाहतूक, हे लुटण्यात शत्रुसैन्य गाफील असता स्वतः सावध राहून त्याच्यावर हल्ला करावा.

१७ किंवा उत्कृष्ट सैन्य कमकुवत सैन्याच्या आड दडवून शत्रूच्या शूर वीर सैनिकांत घुसवावे व त्यांना मारावे.

१८ गाई पळवून नेण्यासाठी अथवा हिंस्र प्राण्यांची शिकार करण्यासाठी शत्रूच्या शूर वीरांना फुस लावून दबा धरून बसलेल्या ठिकाणापासून त्यांना मारावे.

रात्रावभवस्कन्देन जागरयित्वा निद्राक्लान्तानवसुप्तान् वा दिवा हन्यात् । १९ ।

सपादचर्मकोशैर्वा हस्तिभिः सौप्तिकं दद्यात् । २० ।

अहःसंनाहपरिश्रान्तानपराह्णेऽभिहन्यात् । २१ ।

शुष्कचर्मवृत्तशर्कराकोशकैर्गोमहिषोष्ट्रयूथैर्वा त्रस्नुभिरकृतहस्त्यश्वं भिन्नमभिन्नः प्रतिनिवृत्तं हन्यात् । २२ ।

प्रतिसूर्यवातं वा सर्वमभिहन्यात् । २३ ।

धान्वनवनसंकटपङ्कशैलनिम्नविषमनावो गावः शकटव्यूहो नीहारो रात्रिरिति सत्त्राणि । २४ ।

पूर्वे च प्रहरणकालाः कूटयुद्धहेतवः । २५ ।

संग्रामस्तु निर्दिष्टदेशकालो धर्मिष्ठः । २६ । संहत्य दण्डं ब्रूयात् 'तुल्यवेतनोऽस्मि, भवद्भिः सह भोग्यमिदं राज्यम्, मयाभिहितैः परोऽभिहन्तव्यः, इति । २७ ।

१९ रात्री हल्ला करून शत्रुसैन्याला जागे ठेवल्यावर ते झोपेने पेंगले असता अथवा झोपले असता दिवसा हल्ला करावा.

२० किंवा पायांना चामड्याची खोळ घातलेल्या हत्तींनी रात्रीचा हल्ला करावा.

२१ दिवसभर चिलखत वगैरे धारण केल्यामुळे दमलेल्यांवर दुपारी हल्ला करावा.

२२ गोल खडे आत असलेल्या वाळलेल्या चामड्याच्या पिशव्या बांधलेले गाईंचे, म्हशींचे किंवा उंटांचे (त्या खड्यांच्या आवाजाने) भेदरलेले कळप शत्रुसैन्यात सोडल्यामुळे त्यातील हत्ती व घोडे उधळून निकामी झाले व ते भंगले व त्याने पाठ फिरविली म्हणजे स्वतः अभंग राहून मारा करावा.

२३ सूर्याकडे किंवा वाऱ्याकडे तोंड असलेल्या सर्व प्रकारच्या सैन्यावर हल्ला चढवावा.

२४ वाळवंट, अरण्य, निरुंद जागा, चिखल, पर्वत, दलदल, उंचसखल प्रदेश, होड्या, गाई, शकटव्यूह, धुके आणि रात्र ही दबा धरून बसण्याची ठिकाणे.

२५ आणि मागे (१०.२.१७ मध्ये सांगितलेली) हल्ला करण्याची निमित्ते युद्धाचे डावपेच लढविण्यासही निमित्तभूत होतात.

२६ परंतु देश व काल यांचा अगोदर निर्दिष्ट करून केलेले उघड युद्ध धर्मयुद्ध होय. २७ सैनिकांना एकत्र बोलावून राजाने त्यांना म्हणावे, "तुमच्यासारखाच मीही पगारी नोकर आहे; हे (शत्रूचे) राज्य तुमच्या बरोबरच उपभोगावयाचे आहे; माझ्या सांगण्यावरून तुम्ही शत्रूचा नाश करावा."

वेदेष्वप्यनुश्रूयते समाप्तदक्षिणानां यज्ञानामवभृथेषु 'सा ते गतिर्या शूराणाम्' इति । २८ । अपीह श्लोकौ भवतः । २९ । –

'यान् यज्ञसंघैस्तपसा च विप्राः स्वर्गैषिणः पात्रचयैश्च यान्ति ।
क्षणेन तानप्यतियान्ति शूराः प्राणान् सुयुद्धेषु परित्यजन्तः ।। ३० ।।
'नवं शरावं सलिलस्य पूर्णं सुसंस्कृतं दर्भकृतोत्तरीयम् ।
तत्तस्य मा भून्नरकं च गच्छेद्यो भर्तृपिण्डस्य कृते न युध्येत् ।। ३१ ।।' इति ।

मन्त्रिपुरोहिताभ्यामुत्साहयेद्योधान् व्यूहसंपदा । ३२ । कार्तान्तिकादिश्चास्य वर्गः सर्वज्ञदैवतसंयोगख्यापनाभ्यां स्वपक्षमुद्धर्षयेत्, परपक्षं चोद्वेजयेत् । ३३ ।

'श्वो युद्धम्' इति कृतोपवासः शस्त्रवाहनं चानुशयीत । ३४ । अथर्वभिश्च जुहुयात् । ३५ । विजययुक्ताः स्वर्गीयाश्चाशिषो वाचयेत् । ३६ । ब्राह्मणेभ्यश्चात्मानमतिसृजेत् । ३७ ।

२८ वेदातसुद्धा, यज्ञात ऋत्विजांना दक्षिणा दिल्यानंतर शेवटच्या अवभृथस्नानाच्या प्रसंगी म्हटले आहे, "शूरांना जी गती प्राप्त होते ती तुला (यजमानाला) प्राप्त होईल." २९ यासंबंधात पुढील दोन श्लोकसुद्धा आहेत –

३० "स्वर्गाची प्राप्ती व्हावी म्हणून केलेल्या अनेक यज्ञांनी, तपाने आणि सुपात्री दानांनी ब्राह्मण ज्या लोकांप्रत जातात त्यांच्याही पलीकडे चांगल्या (उद्दिष्टासाठी केलेल्या) युद्धात प्राणत्याग करणारे शूर योद्धे एका क्षणात जातात."

३१ "धन्याच्या अन्नास जागून जो त्याच्यासाठी लढणार नाही त्याला (उत्तरक्रियेतील) अभिमंत्रित केलेला, पाण्याने भरलेला, वर दर्भाचे आच्छादन असलेला, नवीन घडा प्राप्त न होवो, आणि तो नरकात जावो."

३२ मंत्री आणि पुरोहित यांच्याद्वारा व्यूहाची उत्कृष्टता दाखवून सैनिकांना उत्साहित करावे. ३३ आणि भविष्यवेत्ते वगैरे त्याच्या लोकांनी राजा सर्वज्ञ आहे व त्याचा देवतांशी संपर्क आहे असे जाहीर करून आपल्या सैन्यात उत्साह उत्पन्न करावा व शत्रूच्या सैन्यात घबराट उत्पन्न करावा.

३४ दुसऱ्या दिवशी युद्ध होणार असेल तेव्हा आदल्या दिवशी उपास करून राजाने रात्री आपली शस्त्रे व वाहने यांच्या बाजूला झोपावे. ३५ आणि अथर्ववेदातील मंत्रांनी होम करावा. ३६ विजयासाठी व स्वर्गप्राप्तीसाठी प्रार्थना करवून घ्याव्यात. ३७ आणि स्वतःला ब्राह्मणांच्या रक्षणाखाली सोपवून द्यावे.

शौर्यशिल्पाभिजनानुरागयुक्तमर्थमानाभ्यामविसंवादितमनीकगर्भं कुर्वीत ।३८। पितृपुत्रभ्रातृकाणामायुधीयानामध्वजं मुण्डानीकं राजस्थानम् ।३९। हस्ती रथो वा राजवाहनमश्वानुबन्धः ।४०। यत्प्रायसैन्यो यत्र वा विनीतः स्यात्तधिरोहयेत् ।४१। राजव्यञ्जनो व्यूहाधिष्ठानमायोज्यः ।४२।

सूतमागधाः शूराणां स्वर्गमस्वर्गं भीरूणां जातिसंघकुलकर्मवृत्तस्तवं च योधानां वर्णयेयुः ।४३। पुरोहितपुरुषाः कृत्याभिचारं ब्रूयुः यन्त्रिकवर्धकिमौहूर्तिकाः स्वकर्मसिद्धिमर्सिद्धि परेषाम् ।४४।

सेनापतिरर्थमानाभ्यामभिसंस्कृतमनीकमाभाषेत – 'शतसाहस्रो राजवधः, पञ्चाशत्साहस्रः सेनापतिकुमारवधः, दशसाहस्रः प्रवीरमुख्यवधः, पञ्चसाहस्रो हस्तिरथवधः, साहस्रोऽश्ववधः, शत्यः पत्तिमुख्यवधः, शिरो विंशतिकं, भोगद्वैगुण्यं स्वयंग्राहश्च।' इति ।४५। तदेषां दशवर्गाधिपतयो विद्युः ।४६।

३८ शूर, युद्धकलेत निपुण, कुलीन व राजनिष्ठ आणि द्रव्य व मानसन्मान यांच्याबाबतीत नाराज नसलेले योद्धे सैन्याच्या मध्यभागी ठेवावेत. ३९ पिता, पुत्र व भाऊ या नात्यांनी एककांमेशी जोडलेल्या सैनिकांचे, ध्वजाशिवाय असलेले (आणि म्हणून) 'बोडके' पथक हे राजाचे स्थान. ४० पाठीमागे घोडेस्वार असलेला हत्ती किंवा रथ हे राजाचे वाहन. ४१ मुख्यत: ज्या प्रकारचे सैन्य असेल किंवा जे चालविण्यात तो शिकून तरबेज झाला असेल त्या वाहनावर (राजाने) स्वार व्हावे. ४२ राजासारखाच दिसणाऱ्या दुसऱ्या मनुष्याची व्यूहाच्या मुख्य भागात योजना करावी.

४३ सूत आणि मागध यांनी शूरांना होणारी स्वर्गप्राप्ती, भित्र्यांना स्वर्गप्राप्तीचा अभाव आणि सैनिकांची जात, संघ, कुल, कार्ये आणि स्वभाव यांची स्तुती हे सर्व वर्णन करून सांगावे. ४४ पुरोहिताच्या माणसांनी जादूटोणा व मंत्रतंत्राचे प्रयोग केलेले असल्याचे सांगावे, यंत्रे तयार करणारे, सुतार आणि मुहूर्त पहाणारे यांनी आपली कार्ये सिद्धीस जातील व शत्रूची जाणार नाहीत हे पटवून द्यावे.

४५ द्रव्य व मानसन्मान यांनी सत्कार केलेल्या सैन्याला सेनापतीने जाहीर करावे, "राजाच्या वधाबद्दल एक लक्ष पण (बक्षीस देण्यात येईल), सेनापती किंवा राजपुत्र यांच्या वधाबद्दल पन्नास हजार, शूरांमधील मुख्याच्या वधाबद्दल दहा हजार, हत्तीवरील किंवा रथावरील योद्धयाच्या वधाबद्दल पाच हजार, घोडेस्वाराच्या वधाबद्दल एक हजार, पायदळावरील मुख्याच्या वधाबद्दल शंभर, एकेका सैनिकाच्या वधाबद्दल वीस वीस पण देण्यात येतील; शिवाय पगार दुप्पट मिळेल आणि जे ज्याच्या हाती लागेल ते त्याला ठेवता येईल." ४६ दहा दहा सैनिकांच्या तुकडयांवरील अधिकाऱ्यांनी याविषयीच्या त्यांच्या पराक्रमांची नोंद ठेवावी.

चिकित्सकाः शस्त्रयन्त्रागदस्नेहवस्त्रहस्ताः स्त्रियश्चान्नपानरक्षिण्यः पुरुषाणामुद्धर्षणीयाः पृष्ठतस्तिष्ठेयुः । ४७ ।

अदक्षिणामुखं पृष्ठतःसूर्यमनुलोमवातमनीकं स्वभूमौ व्यूहेत । ४८ । परभूमिव्यूहे चाश्वांश्चारयेयुः । ४९ ।

यत्र स्थानं प्रजवश्चाभूमिर्व्यूहस्य तत्र स्थितः प्रजवितश्चोभयथा जीयेत । ५० । विपर्यये जयति, उभयथा स्थाने प्रजवे च । ५१ ।

समा विषमा व्यामिश्रा वा भूमिरिति पुरस्तात्पार्श्वाभ्यां पश्चाच्च ज्ञेया । ५२ । समायां दण्डमण्डलव्यूहाः, विषमायां भोगासंहतव्यूहाः, व्यामिश्रायां विषमव्यूहाः । ५३ ।

विशिष्टबलं भङ्क्त्वा संधिं याचेत । ५४ । समबलेन याचितः संदधीत । ५५ । हीनमनुहन्यात्, न त्वेव स्वभूमिप्राप्तं त्यक्तात्मानं वा । ५६ ।

४७ शस्त्रे, यंत्रे, औषधे, तेले व पट्टया घेतलेले वैद्य आणि अन्नपाण्याचे रक्षण करणाऱ्या व सैनिकांना उत्तेजित करणाऱ्या स्त्रिया यांनी पाठीमागच्या बाजूस रहावे.

४८ सैन्याची व्यूहात रचना स्वतःला अनुकूल जागेवर अशा रीतीने करावी की ते दक्षिणाभिमुख असणार नाही, सूर्य पाठीमागे असेल आणि वाऱ्याची दिशा अनुकूल असेल. ४९ आणि शत्रूला अनुकूल जागेवर व्यूह रचावयाचा असता (त्याने तेथे येऊ नये म्हणून त्याच्या सैन्यावर) घोडदळ सोडावे.

५० जेथे व्यूहाला स्थिर रहाण्याला व जलद हालचाली करावयाला अनुकूल जागा नाही तेथे स्थिर राहिला तरी आणि जलद हालचाली केल्या तरी दोन्ही प्रसंगी तो पराभूत होतो. ५१ याच्याउलट स्थिती असता स्थिरतेत व जलद हालचालीत दोन्ही प्रसंगी तो जिंकतो.

५२ जागा सपाट, उंचसखल आणि मिश्र अशी असते म्हणून पुढच्या बाजूला, दोन्ही बाजूंना आणि पाठीमागे ती कशा प्रकारची आहे हे जाणून घ्यावे. ५३ सपाट जागी दंड व मंडल प्रकारचे व्यूह रचावेत, उंचसखल जागी भोग व असंहत प्रकारचे, मिश्र जागी सारखे नसलेले व्यूह रचावेत.

५४ आपल्याहून बलवान शत्रूचे सैन्य मोडून काढल्यावर तहाचे बोलणे करावे. ५५ तुल्यबल राजाने (सैन्य पराभूत झाले असता) तहाचे बोलणे केले तर तह करावा. ५६ हीनबल राजावर (त्याचे सैन्य दुभंगले असता) प्रहार करीत रहावे, परंतु तो आपल्या देशात जाऊन पोचला असेल किंवा जिवावर उदार झाला असेल तर तसे मुळीच करू नये.

पुनरावर्तमानस्य निराशस्य च जीविते ।
अधार्यो जायते वेगस्तस्माद्भग्नं न पीडयेत् ।। ५७ ।।

इति सांग्रामिके दशमेऽधिकरणे कूटयुद्धविकल्पाः, स्वसैन्योत्साहनम्, स्वबलान्यबलव्यायोगः तृतीयोऽध्यायः । आदित एकत्रिंशच्छततमः ।

४

[ त्रिपञ्चाशच्छततमं प्रकरणम् – युद्धभूमयः;
चतुष्पञ्चाशच्छततमं प्रकरणम् – पत्त्यश्वरथहस्तिकर्माणि ]

स्वभूमिः पत्त्यश्वरथद्विपानामिष्टा युद्धे निवेशे च । १ । धान्वनवननिम्नस्थलयोधिनां खनकाकाशदिवारात्रियोधिनां च पुरुषाणां नादेयपार्वतानूपसारसानां च हस्तिनामश्वानां च यथास्वमिष्टा युद्धभूमयः कालाश्च । २ ।

समा स्थिराऽभिकाशा निरुत्खातिन्यचक्रखुराऽनक्षग्राहिण्यवृक्षगुल्मव्रततीस्तम्भकेदारश्वभ्रवल्मीकसिकतापङ्कभङ्गुरा दरणहीना च रथभूमिः, हस्त्यश्वयोर्मनुष्याणां च समे विषमे हिता युद्धे निवेशे च । ३ । अण्वश्मवृक्षा ह्रस्वलङ्घनीय-

५७ ज्याने जिवाची आशा सोडली आहे व जो रणांगणावर परतला आहे त्याची धडक थोपवून धरता येत नाही; म्हणून भग्न झालेल्याला आणखी पीडा देऊ नये.

## चौथा अध्याय

### प्रकरण १५३ : युद्धास योग्य भूमी;
### प्रकरण १५४ : पदाती, घोडे, रथ आणि हत्ती यांचे कार्य

१ पदाती, घोडे, रथ व हत्ती यांना युद्धासाठी व मुक्काम करण्यासाठी त्यांना अनुकूल अशी जागा असणे इष्ट आहे. २ मरुभूमी, अरण्य, पाणी व कोरडी जमीन यावर लढणाऱ्या तसेच खंदकांतून, उघड्यावर, दिवसा व रात्री लढण्याची संवय असणाऱ्या सैनिकांसाठी, आणि नदीकाठच्या प्रदेशातील, पर्वतावरील, दलदलीच्या प्रदेशातील आणि सरोवराकाठच्या प्रदेशातील हत्तींच्यासाठी आणि घोड्यांसाठी त्यांना त्यांना अनुकूल अशी युद्धभूमी आणि ऋतू असणे इष्ट आहे.

३ सपाट (उंचसखल नसलेली), घट्ट (मऊ नसलेली), स्वच्छपणे दिसणारी, उखडली न जाणारी, जिच्यात चाके व खूर रुतत नाही अशी, आस न पकडणारी, झाडे, झुडपे, वेली, खोडे, ओली शेतजमीन, खड्डे, वारुळे, रेती व चिखल हे जिच्यात विखुरलेले नाहीत अशी आणि भेगा न पडलेली अशी जागा रथांसाठी अनुकूल होय; हत्ती, घोडे व मनुष्य यांनासुद्धा नेहमीच्या प्रसंगी व अडचणीच्या

श्वभ्रा मन्ददरणदोषा चाश्वभूमिः । ४ । स्थूलस्थाण्वश्मवृक्षव्रततीवल्मीकगुल्मा पदातिभूमिः । ५ । गम्यशैलनिम्नविषमा मर्दनीयवृक्षा छेदनीयव्रतती पङ्कभङ्गुरा दरणहीना च हस्तिभूमिः । ६ ।

अकण्टकिन्यबहुविषमा प्रत्यासारवतीति पदातीनामतिशयः । ७ । द्विगुणप्रत्यासारा कर्दमोदकखञ्जनहीना निःशर्करेति वाजिनामतिशयः । ८ । पांसुकर्दमोदकनलशराधानवती श्वदंष्ट्रहीना महावृक्षशाखाघातवियुक्तेति हस्तिनामतिशयः । ९ । तोयाशयापाश्रयवती निरुत्खातिनी केदारहीना व्यावर्तनसमर्थेति रथानामतिशयः । १० ।

उक्ता सर्वेषां भूमिः । ११ । एतया सर्वबलनिवेशा युद्धानि च व्याख्यातानि भवन्ति । १२ ।

भूमिवासवनविचयोऽविषमतोयतीर्थवातरश्मिग्रहणं वीवधासारयोर्घातो रक्षा वा विशुद्धिः स्थापना च बलस्य प्रसारवृद्धिर्बाहूत्सारः पूर्वप्रहारो व्यावेशनं

प्रसंगी, युद्ध करण्यासाठी व मुक्काम करण्यासाठी हितकर होय. ४ लहान दगड व झाडे असलेली, सहज उडी मारून जाता येण्यासारखे लहान खड्डे असलेली आणि भेगांचा सौम्य दोष असलेली जमीन घोड्यांसाठी योग्य. ५ मोठी खोडे, मोठे दगड, वृक्ष, लता, वारुळे व झुडपे असलेली जमीन पदातीसाठी योग्य. ६ जाता येण्यासारखे पर्वत, पाणी आणि उंचसखल प्रदेश असलेली, तुडवता येण्यासारखे वृक्ष व तोडता येण्यासारख्या वेली असलेली, मधूनमधून चिखल असलेली व भेगा नसलेली जमीन हत्तींसाठी योग्य.

७ काटे नसलेली, फार उंचसखल नसलेली आणि पिछेहाटीस जागा असलेली अशी जमीन पदातीसाठी उत्तम. ८ पिछेहाटीस दुप्पट जागा असलेली, चिखल, पाणी व दलदल नसलेली आणि वाळू नसलेली जमीन घोड्यांसाठी उत्तम. ९ धूळ, चिखल, पाणी, बोरू व लव्हाळे यांनी युक्त, श्वदंष्ट्र (गोखरू) वनस्पतीने विरहित आणि झाडांच्या मोठमोठ्या फांद्यांचा अडथळा नसलेली जमीन हत्तींसाठी उत्तम. १० पाण्याच्या आणि आसऱ्याच्या सोयी असलेली, न उखडली जाणारी, ओल्या शेतजमिनीने विरहित आणि वळण्यास सुलभ अशी जमीन रथांसाठी उत्तम.

११ सर्व प्रकारच्या सैन्यांना योग्य भूमी कोणती ते सांगितले. १२ ह्यानेच सर्व प्रकारच्या सैन्यांसाठी मुक्कामाच्या व युद्धाच्या जागा कोणत्या ते स्पष्ट होईल.

१३ युद्धभूमी, मुक्कामाची जागा व अरण्ये यांची पहाणी करणे, अनुकूल असे पाणी, नदीवरील उतार, वारा आणि सूर्य हे मिळविणे, (शत्रूचा) पुरवठा व सैन्याची कुमक नष्ट करणे व (आपला) पुरवठा व कुमक यांचे रक्षण करणे,

व्यावेधनमाश्वासो ग्रहणं मोक्षणं मार्गानुसारविनिमयः कोशकुमाराभिहरणं जघनकोटचभिघातो हीनानुसारणमनुयानं समाजकर्मेत्यश्वकर्माणि । १३ ।

पुरोयानमकृतमार्गवासतीर्थकर्म बाहूत्सारस्तोयतरणावतरणे स्थानगमनावतरणं विषमसंबाधप्रवेशोऽग्निदानशमनमेकाङ्गविजयो भिन्नसंधानमभिन्नभेदनं व्यसने त्राणमभिघातो विभीषिका त्रासनमौदार्यं ग्रहणं मोक्षणं सालद्वाराट्टालकभञ्जनं कोशवाहनापवाहनमिति हस्तिकर्माणि । १४ ।

स्वबलरक्षा चतुरङ्गबलप्रतिषेधः संग्रामे ग्रहणं मोक्षणं भिन्नसंधानमभिन्नभेदनं त्रासनमौदार्यं भीमघोषश्चेति रथकर्माणि । १५ ।

सर्वदेशकालशस्त्रवहनं व्यायामश्चेति पदातिकर्माणि । १६ ।

शिबिरमार्गसेतुकूपतीर्थशोधनकर्म यन्त्रायुधावरणोपकरणग्रासवहनमायोधनाच्च प्रहरणावरणप्रतिविद्धापनयनमिति विष्टिकर्माणि । १७ ।

सैन्याचे शुद्धीकरण व स्थिरीकरण, वनातून उपजीविका मिळविण्यासाठी स्वाऱ्या करणे, बगलेवरील हल्ले परतविणे, प्रथम हल्ला करणे, शत्रुसैन्यात घुसणे, त्याची फळी तोडणे, (आपल्या सैन्याला) धीर देणे, (शत्रुसैनिक )पकडणे, (आपल्या सैनिकांची) सुटका करणे, पाठलाग करणाऱ्या शत्रुसैन्याच्या पिछाडीला जाऊन त्याचा पाठलाग करणे, कोश व राजपुत्र यांचे हरण करणे, पिछाडीवर व टोकावर हल्ला करणे, दुर्बल झालेल्या सैन्याचा पाठलाग करणे, रक्षणासाठी सोबत जाणे, सैन्य एकत्रित करणे – ही घोडदळाची कामे.

१४ आघाडीला कूच करणे, रस्ते, मुक्कामाची जागा व पाण्यावरील उतार नसलेले तयार करणे, बगलेवरील हल्ला परतविणे, पाणी ओलांडणे व पाण्यात उतरणे, एके ठिकाणी रहाणे, पुढे जाणे व उतरणे, अडचणीच्या व गर्दी झालेल्या ठिकाणी प्रवेश करणे, आगी लावणे व विझविणे, (हत्ती ह्या) एकाच अंगाने विजय मिळविणे, फुटलेली सैन्याची फळी जोडणे, न फुटलेली फोडणे, संकटसमयी रक्षण करणे, हल्ला चढविणे, भीती उत्पन्न करणे, घबराट पसरविणे, सैन्यात भव्यपणा आणणे, पकडणे, सुटका करणे, तट, वेशी व बुरूज पाडणे, कोश आणणे व घेऊन जाणे – ही हत्तींची कामे.

१५ स्वतःच्या सैन्याचे रक्षण, युद्धात चतुरंग सेनेचा मुकाबला करणे, पकडणे, सुटका करणे, फुटलेली फळी जोडणे, न फुटलेली फोडणे, घबराट पसरविणे, भव्यपणा आणणे आणि भयंकर आवाज करणे – ही रथांची कामे.

१६ सर्व ठिकाणी व सर्व ऋतूत शस्त्रधारण करणे व लढणे – ही पायदळाची कामे.

१७ शिबिरे, रस्ते, पूल, विहिरी, पाण्यावरील उतार साफ करणे, यंत्रे, शस्त्रे, चिलखते, अवजारे व घास घेऊन जाणे आणि रणांगणावरून शस्त्रे, चिलखते व जखमी सैनिक यांना घेऊन येणे – ही मजूरवर्गाची कामे.

कुर्याद्गवाश्वव्यायोगं रथेष्वल्पहयो नृपः ।
खरोष्ट्रशकटानां वा गर्भमल्पगजस्तथा ॥ १८ ॥

इति सांग्रामिके दशमेऽधिकरणे युद्धभूमयः पत्त्यश्वरथहस्तिकर्माणि चतुर्थोऽध्यायः ।
आदितः द्वात्रिंशच्छततमः ।

५

## [ पञ्चपञ्चाशच्छततमं प्रकरणम् – पक्षकक्षोरस्यानां बलाग्रतो व्यूहविभागः;
## षट्पञ्चाशच्छततमं प्रकरणम् – सारफल्गुबलविभागः;
## सप्तपञ्चाशच्छततमं प्रकरणम् – पत्त्यश्वरथहस्तियुद्धानि ]

पञ्चधनुःशतापकृष्टं दुर्गमवस्थाप्य युद्धमुपेयात्, भूमिवशेन वा । १ । विभक्तमुख्यामचक्षुर्विषये मोक्षयित्वा सेनां सेनापतिनायकौ व्यूहेयाताम् । २ । शमान्तरं पत्तिं स्थापयेत्, त्रिशमान्तरमश्वम्, पञ्चशमान्तरं रथं हस्तिनं वा । ३ । द्विगुणान्तरं त्रिगुणान्तरं वा व्यूहेत । ४ । एवं यथासुखमसंबाधं युध्येत । ५ ।

१८ जर घोडे थोडे असतील तर राजाने (काही) रथांना बैल व (काहींना) घोडे जोडावेत. तसेच हत्ती थोडे असल्यास गाढव व उंट यांच्या गाड्या सैन्याच्या मध्यभागी ठेवाव्यात.

## पाचवा अध्याय

### प्रकरण १५५ : सैन्याच्या संख्येच्या अनुरोधाने त्याची पक्ष, कक्ष व उरस्य ह्या व्यूहविभागांत रचना;
### प्रकरण १५६ : श्रेष्ठ व कनिष्ठ सैन्याची यथोचित योजना;
### प्रकरण १५७ : पदाती, घोडे, रथ व हत्ती यांचे युद्धाचे प्रकार

१ पाचशे धनुष्ये दूर अंतरावर, किंवा जशी जमीन असेल त्याप्रमाणे, एक भक्कम संरक्षण असलेली (राखीव सैन्यासाठी) जागा तयार ठेऊन मग लढाईत उतरावे.

२ शत्रूला दिसणार नाही अशा ठिकाणी मुख्य सेनेला (राखीव सैन्यापासून) अलग करून सेनापती व नायक यांनी अधिकाऱ्यांच्या हाताखाली निरनिराळे विभाग देऊन व्यूहाची रचना करावी.

३ दोन पदातींमध्ये एक शम (चौदा अंगुले) अंतर ठेवावे, दोन घोडेस्वारांमध्ये तीन शम आणि दोन रथ किंवा दोन हत्ती यांमध्ये पाच शम अंतर ठेवावे. ४ किंवा ह्याच्या दुप्पट अथवा तिप्पट अंतर मध्ये ठेवून व्यूहाची रचना करावी. ५ असे केल्याने दाटी न होता मोकळेपणाने लढता येईल.

**पञ्चारत्नि धनुः । ६ । तस्मिन् धन्विनं स्थापयेत्, त्रिधनुष्यश्वम्, पञ्चधनुषि रथं हस्तिनं वा । ७ ।**

**पञ्चधनुरनीकसंधिः पक्षकक्षोरस्यानाम् । ८ ।**

**अश्वस्य त्रयः पुरुषाः प्रतियोद्धारः । ९ । पञ्चदश रथस्य हस्तिनो वा, पञ्च चाश्वाः । १० । तावन्तः पादगोपा वाजिरथद्विपानां विधेयाः । ११ ।**

**त्रीणि त्रिकाण्यनीकं रथानामुरस्यं स्थापयेत्, तावत्कक्षं पक्षं चोभयतः । १२ । पञ्चचत्वारिंशद् एवं रथा रथव्यूहे भवन्ति, द्वे शते पञ्चविंशतिश्चाश्वाः, षट्छतानि पञ्चसप्ततिश्च पुरुषाः प्रतियोद्धारः, तावन्तः पादगोपाः । १३ ।**

**एष समव्यूहः । १४ । तस्य द्विरथोत्तरा वृद्धिरा एकविंशतिरथादिति । १५ । एवमोजा दश समव्यूहप्रकृतयो भवन्ति । १६ ।**

**पक्षकक्षोरस्यानां मिथो विषमसंख्याने विषमव्यूहः । १७ । तस्यापि द्विरथोत्तरा वृद्धिरा एकविंशतिरथादिति । १८ । एवमोजा दश विषमव्यूहप्रकृतयो भवन्ति । १९ ।**

६ पाच अरत्नी ( १२० अंगुले ) म्हणजे एक धनू. ७ तितक्या अंतरावर धनुर्धारी पदातीला ठेवावे, तीन धनू (३६० अंगुले) अंतरावर घोडेस्वाराला, पाच धनू अंतरावर रथाला किंवा हत्तीला.

८ व्यूहाच्या पक्ष (पंख), कक्ष (बगल) आणि उरस्य (छाती) ह्या विभागांमधील अंतर (प्रत्येकी) पाच धनू असावे.

९ घोडेस्वारासाठी तीन पदाती पुढे लढणारे म्हणून ठेवावेत. १० रथ किंवा हत्ती यांच्यासाठी पंधरा पदाती व पाच घोडेस्वार (पुढे लढणारे ठेवावेत). ११ घोडे, रथ व हत्ती यांच्यासाठी तितकेच पदाती (पाठीमागे) पादरक्षक म्हणून ठेवावेत.

१२ तीन तीन रथांचे तीन गट उरस्य-विभाग म्हणून स्थापन करावेत, तितकेच गट दोन्ही बाजूला पक्ष व कक्ष या विभागांत स्थापन करावेत. १३ याप्रमाणे रथव्यूहात पंचेचाळीस रथ, दोनशे पंचवीस घोडेस्वार, सहाशे पंच्याहत्तर पुढे लढणारे पदाती आणि तितकेच पादरक्षक पदाती होतात.

१४ हा सम व्यूह (सर्व विभागांत सारखीच संख्या असलेला व्यूह) होय. १५ त्यात (तीन रथांत) दोन दोन रथांची भर घालीत एकवीस रथांपर्यंत संख्या वाढविता येते. १६ याप्रमाणे (३, ५, ७, . . .१९, २१ ह्या) विषम संख्या असलेले सम व्यूहाचे दहा भेद होतात.

१७ पक्ष, कक्ष व उरस्य ह्या विभागांत (रथ आदींची) भिन्न भिन्न संख्या ठेवल्यास विषम व्यूह होतो. १८ त्याच्या संबंधातसुद्धा दोन दोन रथांची भर घालीत संख्या एकवीस रथांपर्यंत वाढविता येते. १९ याप्रमाणे विषम संख्या असलेले दहा प्रकार विषम व्यूहाचे मूळ होतात.

अतः सैन्यानां व्यूहशेषमावापः कार्यः । २० । रथानां द्वौ त्रिभागावङ्गेष्वावापयेत्, शेषमुरस्यं स्थापयेत् । २१ । एवं त्रिभागोनो रथानामावापः कार्यः । २२ । तेन हस्तिनामश्वानामावापो व्याख्यातः । २३ । यावदश्वरथद्विपानां युद्धसंबाधनं न कुर्यात्तावदावापः कार्यः । २४ ।

दण्डबाहुल्यमावापः । २५ । पत्तिबाहुल्यं प्रत्यावापः । २६ । एकाङ्गबाहुल्यमन्वावापः । २७ । दूष्यबाहुल्यमत्यावापः । २८ ।

परावापात्प्रत्यावापाच्चा चतुर्गुणादाऽष्टगुणादिति वा विभवतः सैन्यानामावापः कार्यः । २९ ।

रथव्यूहेन हस्तिव्यूहो व्याख्यातः । ३० ।

व्यामिश्रो वा हस्तिरथाश्वानाम् – चक्रान्तेषु हस्तिनः पार्श्वयोरश्वा रथा उरस्ये । ३१ । हस्तिनामुरस्यं रथानां कक्षावश्वानां पक्षाविति मध्यभेदी । ३२ । विपरीतोऽन्तभेदी । ३३ ।

हस्तिनामेव तु शुद्धः – सांनाह्यानामुरस्यम् औपवाह्यानां जघनं व्यालानां कोटयाविति । ३४ ।

२० व्यूहरचना करून शिल्लक राहिलेले सैन्य त्यात भरीस घालावे. २१ त्यातील रथांपैकी दोन-तृतीयांश (बाहेरच्या) विभागांत घालावे, बाकीचे उरस्य म्हणून ठेवावे. २२ याप्रमाणे (मूळ संख्येच्या) एक-तृतीयांशाने कमी इतकी रथांची भर घालावी. २३ याप्रमाणेच हत्तींची व घोड्यांची भर घालण्याविषयी समजावे. २४ घोडे, रथ व हत्ती यांना युद्ध करताना दाटी होणार नाही अशा बेताने भर घालावी.

२५ सैन्याची विपुलता म्हणजे आवाप. २६ पायदळाची विपुलता म्हणजे प्रत्यावाप. २७ एकाच अंगाची विपुलता म्हणजे अन्वावाप. २८ दूष्य सैनिकांचे आधिक्य म्हणजे अत्यावाप.

२९ शत्रूच्या आवापाच्या आणि प्रत्यावापाच्या चौपटीपर्यंत किंवा आठपटीपर्यंत, आपल्याकडे सैन्य असेल त्याप्रमाणे, भर घालावी.

३० रथांच्या व्यूहासारखाच हत्तींचा व्यूह समजावा.

३१ किंवा हत्ती, रथ व घोडे यांचा संमिश्र व्यूह रचावा – सैन्याच्या टोकाला (पक्ष) हत्ती, बगलेत (कक्ष) अश्व व उरस्यात रथ. ३२ हत्तींचे उरस्य, रथांचे कक्ष व अश्वांचे पक्ष हा मध्यभेदी व्यूह. ३३ याच्याउलट (उरस्यात अश्व, पक्षात हत्ती) अंतभेदी व्यूह.

३४ परंतु केवळ हत्तींचाच शुद्ध हस्तिव्यूह असा – लढाऊ हत्तींचे उरस्य बसावयाच्या हत्तींचे जघन (कक्ष) आणि दुष्ट हत्तींची दोन टोके (पक्ष).

अश्वव्यूहो – वर्मिणामुरस्यं शुद्धानां कक्षपक्षाविति । ३५ ।

पत्तिव्यूहः – पुरस्तादावरणिनः पृष्ठतो धन्विनः । ३६ । इति शुद्धाः । ३७ ।

पत्तयः पक्षयोरश्वाः पार्श्वयोः हस्तिनः पृष्ठतो रथाः पुरस्तात्, परव्यूहवशेन वा विपर्यासः । ३८ । इति द्व्यङ्गबलविभागः । ३९ । तेन त्र्यङ्गबलविभागो व्याख्यातः । ४० ।

दण्डसंपत् सारबलं पुंसाम् । ४१ । हस्त्यश्वयोर्विशेषः कुलं जातिः सत्त्वं वयःस्थता प्राणो वर्ष्म जवस्तेजः शिल्पं स्थैर्यमुदग्रता विधेयत्वं सुव्यञ्जनाचारतेति । ४२ ।

पत्त्यश्वरथद्विपानां सारत्रिभागमुरस्यं स्थापयेत्, द्वौ त्रिभागौ कक्षं पक्षं चोभयतः, अनुलोममनुसारम्, प्रतिलोमं तृतीयसारम्, फल्गु प्रतिलोमम् । ४३ । एवं सर्वमुपयोगं गमयेत् । ४४ ।

फल्गुबलमन्तेष्ववधाय वेगाभिहूलिको भवति । ४५ ।

३५ अश्वांचा शुद्ध व्यूह असा – चिलखत घातलेल्यांचे उरस्य, न घातलेल्यांचे कक्ष व पक्ष.

३६ पायदळाचा शुद्ध व्यूह – आघाडीवर चिलखत घातलेले, पाठीमागे धनुर्धारी. ३७ हे झाले शुद्ध व्यूह.

३८ पायदळ दोन पक्षांमध्ये, घोडे दोन बाजूला, हत्ती पाठीमागच्या बाजूला, रथ आघाडीवर, किंवा शत्रूच्या व्यूहाच्या अनुरोधाने यांची उलटापालट करून रचना करावी. ३९ ही सैन्याच्या दोन अंगांची रचना. ४० सैन्याच्या तीन अंगांची रचना अशीच समजावी.

४१ (सूत्र ६.१.११ मध्ये सांगितलेले) सैन्याचे उत्कृष्ट गुण म्हणजे मनुष्यांच्या बाबतीत उत्कृष्ट सैन्य. ४२ हत्ती व घोडे यांच्याबाबतीत विशेष आवश्यक गुण – कुल, जात, सत्त्व, तारुण्य, सामर्थ्य, धिप्पाडपणा, वेग, तेज, शिक्षण, स्थैर्य, भव्यता, आज्ञाधारकता आणि उत्तम लक्षणांनी व उत्तम आचरणाने युक्त असणे.

४३ पायदळ, घोडे, रथ व हत्ती यांच्या उत्कृष्ट सैन्यापैकी एक-तृतीयांश उरस्य म्हणून ठेवावे, दोन-तृतीयांश दोन्ही बाजूला कक्ष व पक्ष म्हणून, दुय्यम दर्जाचे सैन्य त्याच्या पाठीमागे, तिसऱ्या दर्जाचे उलट दिशेला (म्हणजे उत्कृष्ट सैन्याच्या पुढे), कमकुवत सैन्य उलट दिशेला (म्हणजे सर्वांच्या पुढे). ४४ याप्रमाणे सर्व सैन्य उपयोगात आणावे.

४५ कमकुवत सैन्य (आघाडीवर) टोकाला ठेवल्याने वेगाची चढाई थोपवून धरता येते.

**सारबलमग्रतः कृत्वा कोटीष्वनुसारं कुर्यात्, जघने तृतीयसारं, मध्ये फल्गुबलम् । ४६ । एवमेतत्सहिष्णु भवति । ४७ ।**

**व्यूहं तु स्थापयित्वा पक्षकक्षोरस्यानामेकेन द्वाभ्यां वा प्रहरेत्, शेषैः प्रतिगृह्णीयात् । ४८ ।**

**यत्परस्य दुर्बलं वीतहस्त्यश्वं दूष्यामात्यं कृतोपजापं वा तत्प्रभूतसारेणाभिहन्यात् । ४९ । यद्वा परस्य सारिष्ठं तद्द्विगुणसारेणाभिहन्यात् । ५० । यदङ्गमल्पसारमात्मनस्तद्बहुनोपचिनुयात् । ५१ । यतः परस्यापचयस्ततोऽभ्याशे व्यूहेत, यतो वा भयं स्यात् । ५२ ।**

**अभिसृतं परिसृतमतिसृतमपसृतमुन्मथ्यावधानं बलयो गोमूत्रिका मण्डलं प्रकीर्णिका व्यावृत्तपृष्ठमनुवंशमग्रतः पार्श्वाभ्यां पृष्ठतो भग्नरक्षा भग्नानुपात इत्यश्वयुद्धानि । ५३ ।**

**प्रकीर्णिकावर्जान्येतान्येव चतुर्णामङ्गानां व्यस्तसमस्तानां वा घातः, पक्षकक्षोरस्यानां च प्रभञ्जनमवस्कन्दः सौप्तिकं चेति हस्तियुद्धानि । ५४ ।**

४६ उत्कृष्ट सैन्य आघाडीवर ठेवून दुसऱ्या दर्जाचे पक्षांत, तिसऱ्या दर्जाचे कक्षांत आणि कमकुवत सैन्य मध्ये ठेवावे. ४७ असे हे सैन्य प्रतिकार करण्यास समर्थ होते.

४८ परंतु व्यूहाची रचना केल्यावर पक्ष, कक्ष आणि उरस्य यांपैकी एका किंवा दोन विभागांनी प्रथम हल्ला करावा, बाकीच्यांनी नंतर त्याला जोर देण्यास जावे.

४९ शत्रूचे जे सैन्य दुर्बल, हत्ती व घोडे मारले गेलेले, दूष्य अधिकाऱ्यांनी युक्त किंवा फितुरीला प्रोत्साहित केलेले असेल त्याच्यावर भरपूर उत्कृष्ट सैन्यानिशी हल्ला चढवावा. ५० किंवा शत्रूचे जे सर्वांत उत्तम सैन्य असेल त्याच्यावर दुप्पट उत्तम सैन्याने मारा करावा. ५१ आपल्या सैन्याच्या ज्या अंगात उत्तम सैन्य कमी असेल त्यात पुष्कळ (उत्तम) सैन्याची भर घालावी. ५२ जेथे शत्रू कमकुवत झाला असेल त्या ठिकाणाजवळ व्यूह रचावा, किंवा जिकडून धोका असेल तिकडे (व्यूह रचावा).

५३ सरळ चाल करून जाणे, चोहो बाजूंनी चाल करून जाणे, घुसून पलीकडे जाणे, माघारी फिरणे, शत्रूचा बीमोड करून एकत्र रहाणे, दोन बाजूंनी घेरणे, नागमोडी चाल, सर्व बाजूंनी घेरणे, उधळून लावणे, मागे फिरून परत येणे, भग्न झालेल्या सैन्याच्या फळीचे आघाडीला, बाजूंनी व पिछाडीला रक्षण करणे, भग्न झालेल्या सैन्याचा पाठलाग करणे – हे घोडेस्वारांचे युद्ध करण्याचे प्रकार होत.

५४ उधळून लावण्याखेरीज हेच सर्व प्रकार, (शिवाय) स्वतंत्र असलेल्या किंवा एकत्र असलेल्या चारही प्रकारच्या सैन्याचा नाश करणे, पक्ष, कक्ष आणि

उन्मथ्यावधानवर्जान्येतान्येव स्वभूमावभियानापयानस्थितयुद्धानीति रथयुद्धानि । ५५ ।

सर्वदेशकालप्रहरणमुपांशुदण्डश्चेति पत्तियुद्धानि । ५६ ।

एतेन विधिना व्यूहानोजान् युग्मांश्च कारयेत् ।
विभवो यावदङ्गानां चतुर्णां सदृशो भवेत् ।। ५७ ।।
द्वे शते धनुषां गत्वा राजा तिष्ठेत्प्रतिग्रहे ।
भिन्नसंघातनं तस्मान्न युध्येताप्रतिग्रहः ।। ५८ ।।

इति सांग्रामिके दशमेऽधिकरणे पक्षकक्षोरस्यानां बलाग्रतो व्यूहविभागः सारफल्गुबलविभागः पत्त्यश्वरथहस्तियुद्धानि पञ्चमोऽध्यायः । आदितः त्रयस्त्रिंशच्छततमः ।

## ६

## [ अष्टपञ्चाशच्छततमं प्रकरणम् – दण्डभोगमण्डलासंहतव्यूहव्यूहनम्; एकोनषष्टिशततमं प्रकरणम् – तस्य प्रतिव्यूहस्थापनम् ]

पक्षावुरस्यं प्रतिग्रह इत्यौशनसो व्यूहविभागः । १ । पक्षौ कक्षावुरस्यं प्रतिग्रह इति बार्हस्पत्यः । २ ।

उरस्य हे मोडून टाकणे, हल्ला करणे आणि झोपले असता छापा घालणे – हे हत्तींचे लढण्याचे प्रकार.

५५ बीमोड करून एकत्र रहाणे ह्या प्राकाराशिवाय हेच सर्व प्रकार, (शिवाय) त्यांना योग्य असलेल्या भूमीवर पुढे जाऊन, मागे येऊन व एके ठिकाणीच राहून लढणे – हे रथांचे युद्ध करण्याचे प्रकार.

५६ सर्व ठिकाणी व सर्व काळी शस्त्र चालविणे आणि गुप्तपणे वध करणे – हे पदातीचे लढण्याचे प्रकार होत.

५७ या पद्धतीप्रमाणे विषमसंख्या असलेल्या आणि समसंख्या असलेल्या व्यूहांची, ज्यायोगे चारही अंगांच्या सामर्थ्याचा यथोचित उपयोग होईल अशी, रचना करावी.

५८ दोनशे धनुष्ये अंतरावर पाठीमागे राखीव सैन्याबरोबर राजाने रहावे; त्यापासून भग्न झालेले सैन्य पुन्हा एकत्रित करता येते; राखीव सैन्य मागे असल्याशिवाय लढू नये.

## सहावा अध्याय

## प्रकरण १५८ : दंड, भोग, मंडल व असंहत ह्या व्यूहांची रचना; प्रकरण १५९ : त्यांना शह देणाऱ्या प्रतिव्यूहांची योजना

१ दोन पक्ष (पंख), उरस्य (छाती) आणि परिग्रह (राखीव सैन्य) ही औशनसांची व्यूहाची विभागणी. २ दोन पक्ष, दोन कक्ष (बगल), उरस्य

**प्रपक्षकक्षोरस्या उभयोः दण्डभोगमण्डलासंहताः प्रकृतिव्यूहाः । ३ । तत्र तिर्यग्वृत्तिर्दण्डः । ४ । समस्तानामन्वावृत्तिर्भोगः । ५ । सरतां सर्वतोवृत्तिर्मण्डलः । ६ । स्थितानां पृथगनीकवृत्तिरसंहतः । ७ ।**

**पक्षकक्षोरस्यैः समं वर्तमानो दण्डः । ८ । स कक्षातिक्रान्तः प्रदरः । ९ । स एव पक्षकक्षाभ्यां प्रतिक्रान्तो दृढकः । १० । स एवातिक्रान्तः पक्षाभ्यामसह्यः । ११ । पक्षाववस्थाप्योरस्यातिक्रान्तः श्येनः । १२ । विपर्यये चापं चापकुक्षिः प्रतिष्ठः सुप्रतिष्ठश्च । १३ । चापपक्षः संजयः । १४ । स एवोरस्यातिक्रान्तो विजयः । १५ । स्थूलकर्णपक्षः स्थूणाकर्णः । १६ । द्विगुणपक्षस्थूणो विशालविजयः । १७ । त्र्यभिक्रान्तपक्षश्चमूमुखः । १८ । विपर्यये झषास्यः । १९ । ऊर्ध्वराजिर्दण्डः सूची । २० । द्वौ दण्डौ वलयः । २१ । चत्वारो दुर्जयः । २२ । इति दण्डव्यूहाः । २३ ।**

**पक्षकक्षोरस्यैर्विषमं वर्तमानो भोगः । २४ । स सर्पसारी गोमूत्रिका वा । २५ ।**

आणि प्रतिग्रह ही बार्हस्पत्यांची विभागणी. ३ उभयतांच्या मते पक्ष, कक्ष व उरस्य असलेले दंड, भोग, मंडल व असंहत हे चार मूलभूत व्यूहप्रकार होत. ४ त्यांपैकी तिरपा जाणारा तो दंडव्यूह. ५ सर्व विभागांचे एकामागून एक जाणे हा भोगव्यूह. ६ पुढे सरकत असणाऱ्या विभागांचे सर्व बाजूंनी युद्धासाठी सिद्ध असणे हा मंडलव्यूह. ७ स्वतःच्या ठिकाणीच असलेल्या विभागांचे स्वतंत्रपणे युद्धास तयार रहाणे म्हणजे असंहतव्यूह.

८ पक्ष, कक्ष व उरस्य यांनी समान लष्करी हालचाल करणारा तो दंडव्यूह. ९ त्यात दोन्ही कक्ष पुढे गेले म्हणजे प्रदर व्यूह होतो. १० त्यातच पक्ष व कक्ष मागे आले म्हणजे दृढक व्यूह होतो. ११ त्यातच पक्ष पुढे गेले म्हणजे असह्य व्यूह होतो. १२ पक्ष स्थिर ठेवून उरस्याने पुढे जाणारा तो श्येन व्यूह. १३ ह्या चार व्यूहांत (पुढे व मागे ह्या प्रक्रिया) उलट असल्यास अनुक्रमे चाप, चापकुक्षि प्रतिष्ठ आणि सुप्रतिष्ठ हे व्यूह होतात. १४ चापाच्या आकृतीचे पक्ष असले म्हणजे संजय व्यूह होतो. १५ त्यातच उरस्य पुढे गेले म्हणजे विजय व्यूह होतो. १६ मोठ्या कानाच्या आकाराचे पक्ष असलेला तो स्थूणाकर्ण व्यूह. १७ स्थूणाकर्णाच्या दुप्पट पक्ष असलेला तो विशालविजय व्यूह. १८ तिप्पट पक्ष पुढे गेले असता चमूमुख व्यूह होतो. १९ याच्याउलट (तिप्पट पक्ष मागे आले असता) झषास्य व्यूह होतो. २० सरळ रेषेत असलेला दंड व्यूह म्हणजे सूची व्यूह. २१ असे दोन दंड म्हणजे वलय व्यूह. २२ चार दंड म्हणजे दुर्जय व्यूह. २३ हे दंडव्यूहाचे प्रकार होत.

२४ पक्ष, कक्ष व उरस्य यांची समान गती नसली म्हणजे भोगव्यूह होतो. २५ तो सर्पाप्रमाणे सरपटत जाणारा किंवा गोमूत्राप्रमाणे नागमोडी वळणाने

**स युग्मोरस्यो दण्डपक्षः शकटः । २६ । विपर्यये मकरः । २७ । हस्त्यश्वरथैर्व्यतिकीर्णः शकटः पारिपतन्तकः । २८ । इति भोगव्यूहाः । २९ ।**

**पक्षकक्षोरस्यानामेकीभावे मण्डलः । ३० । स सर्वतोमुखः सर्वतोभद्रः । ३१ । अष्टानीको दुर्जयः । ३२ । इति मण्डलव्यूहाः । ३३ ।**

**पक्षकक्षोरस्यानामसंहतादसंहतः । ३४ । स पञ्चानीकानामाकृतिस्थापनाद्वज्रो गोधा वा । ३५ । चतुर्णामुद्धानकः काकपदी वा । ३६ । त्रयाणामर्धचन्द्रकः कर्कटकशृङ्गी वा । ३७ । इत्यसंहतव्यूहाः । ३८ ।**

**रथोरस्यो हस्तिकक्षोऽश्वपृष्ठोऽरिष्टः । ३९ । पत्तयोऽश्वा रथा हस्तिनश्चानुपृष्ठमचलः । ४० । हस्तिनोऽश्वा रथाः पत्तयश्चानुपृष्ठमप्रतिहतः । ४१ ।**

**तेषां प्रदरं दृढकेन घातयेत्, दृढकमसह्येन, श्येनं चापेन, प्रतिष्ठं सुप्रतिष्ठेन, संजयं विजयेन, स्थूणाकर्णं विशालविजयेन, पारिपतन्तकं सर्वतोभद्रेण । ४२ । दुर्जयेन सर्वान् प्रतिव्यूहेत । ४३ ।**

जाणारा असतो. २६ त्यात दुप्पट उरस्य असलेला व दंडाकृती पक्ष असलेला तो शकट व्यूह. २७ याच्याउलट (दुप्पट पक्ष व दंडाकृती उरस्य) मकर व्यूह. २८ शकटव्यूहात हत्ती, घोडे व रथ हे मिश्र झाले म्हणजे पारिपतंतक व्यूह होतो. २९ हे भोगव्यूहाचे प्रकार होत.

३० पक्ष, कक्ष व उरस्य एक होतात तो मंडलव्यूह. ३१ सर्व बाजूला मुख असलेला तो सर्वतोभद्र व्यूह. ३२ आठ सैन्यविभाग असलेला तो दुर्जय. ३३ हे मंडलव्यूहाचे प्रकार.

३४ पक्ष, कक्ष व उरस्य हे वेगवेगळे राहिले म्हणजे असंहतव्यूह होतो. ३५ त्या पाच विभागांच्या रचनेत होणाऱ्या आकृतीने वज्र अथवा गोधा (घोरपड) हे व्यूह होतात. ३६ चार विभागांच्या रचनेने उद्धानक (चूल) अथवा काकपदो (कावळ्याचा पाय) ह्या आकृतींच्या नावाचे व्यूह होतात. ३७ तीन विभागांनी अर्धचंद्रक अथवा कर्कटकशृंगी (खेकड्याच्या शिंगासारखा) व्यूह होतात. ३८ हे असंहतव्यूहाचे प्रकार.

३९ रथ उरस्यात, हत्ती कक्षांमध्ये आणि घोडे पिछाडीला हा अरिष्ट व्यूह. ४० पायदळ, घोडे, रथ व हत्ती एकामागे एक हा अचल व्यूह. ४१ हत्ती, घोडे, रथ आणि पायदळ एकामागे एक हा अप्रतिहत व्यूह.

४२ ह्या व्यूहांपैकी प्रदर व्यूहाचा दृढक व्यूहाने भेद करावा, दृढक व्यूहाचा असह्य व्यूहाने, श्येन व्यूहाचा चाप व्यूहाने, प्रतिष्ठ व्यूहाचा सुप्रतिष्ठ व्यूहाने, संजय व्यूहाचा विजय व्यूहाने, स्थूणाकर्ण व्यूहाचा विशालविजय व्यूहाने, पारिपतंतक व्यूहाचा सर्वतोभद्र व्यूहाने भेद करावा. ४३ सर्व प्रकारच्या व्यूहांना शह देण्यासाठी दुर्जय व्यूहाची योजना करावी.

पत्त्यश्वरथद्विपानां पूर्वं पूर्वमुत्तरेण घातयेत्, हीनाङ्गमधिकाङ्गेन चेति । ४४ ।

अङ्गदशकस्यैकः पतिः पतिकः पतिकदशकस्यैकः सेनापतिः, तद्दशकस्यैको नायक इति । ४५ । स तूर्यघोषध्वजपताकाभिर्व्यूहाङ्गानां संज्ञाः स्थापयेदङ्गविभागे संघाते स्थाने गमने व्यावर्तने प्रहरणे च । ४६ ।

समे व्यूहे देशकालसारयोगात्सिद्धिः । ४७ ।

यन्त्रैरुपनिषद्योगैस्तीक्ष्णैर्व्यासक्तघातिभिः ।
मायाभिर्देवसंयोगैः शकटैर्हस्तिभीषणैः ॥ ४८ ॥
दूष्यप्रकोपैर्गोयूथैः स्कन्धावारप्रदीपनैः ।
कोटीजघनघातैर्वा दूतव्यञ्जनभेदनैः ॥ ४९ ॥
'दुर्गं दग्धं हृतं वा ते कोपः कुल्यः समुत्थितः ।
शत्रुराटविको वे' ति परस्योद्वेगमाचरेत् ॥ ५० ॥

४४ पायदळ, घोडे, रथ व हत्ती यांपैकी अगोदरअगोदरच्या अंगाचा नंतरनंतरच्या अंगाने नाश करावा, जे अंग कमी असेल त्याचा भरपूर मोठ्या अंगाने नाश करावा.

४५ दहादहांच्या तुकडीवरील एका अधिकाऱ्याला पतिक ही संज्ञा आहे, दहा पतिकांवरील एक अधिकारी सेनापती आणि दहा सेनापतींवरील मुख्य नायक. ४६ त्याने वाद्यांचे आवाज, (मोठे) ध्वज, (लहान) पताका यांच्या साह्याने व्यूहातील निरनिराळ्या विभागांना विभाग पाडण्यासाठी, एकत्र येण्यासाठी, मुक्काम करण्यासाठी, कूच करण्यासाठी, मागे फिरण्यासाठी आणि चढाई करण्यासाठी, विशिष्ट खुणा ठरवून द्याव्यात.

४७ दोन्ही सैन्यांचे व्यूह सारखेच असता अनकूल देश व काळ आणि सैन्याची उत्कृष्टता यामुळे जय प्राप्त होतो.

४८–५० यंत्रांच्या द्वारा, गुह्य प्रयोग करून, दुसऱ्या कामात गुंतलेल्यांना (गैरसावध असलेल्यांना) ठार मारणाऱ्या तीक्ष्ण हेरांच्या द्वारा, जादूच्या प्रयोगाने, (राजाचा) देवतांशी संपर्क असल्याचा भास निर्माण करून, गाड्यांच्या द्वारा, हत्तींमुळे भीती उत्पन्न करून, दूष्य अधिकाऱ्यांना चिथावणी देऊन, गाईंचे कळप व्यूहात सोडून देऊन, छावणीला आग लावून, पुढच्या टोकांवर आणि पिछाडीवर एकदम मारा करून, बातमीदारांचे सोंग आणणाऱ्या हेरांकरवी "तुझा दुर्ग जाळून टाकला आहे किंवा सर केला आहे; तुझ्या कुलातील माणसाने बंड उभारले आहे; तुझा शत्रू अथवा रानटी लोकांचा मुख्य तुझ्याविरुद्ध उठला आहे" अशा बातम्या पसरवून, शत्रुसैन्यात घबराट उत्पन्न करावा.

एकं हन्यान्न वा हन्यादिषुः क्षिप्तो धनुष्मता ।
प्राज्ञेन तु मतिः क्षिप्ता हन्याद्गर्भगतानपि ।। ५१ ।।

इति सांग्रामिके दशमेऽधिकरणे दण्डभोगमण्डलासंहतव्यूहव्यूहनम्, तस्य प्रतिव्यूहस्थापनम् षष्ठोऽध्यायः । आदितश्चतुस्त्रिंशच्छततमः ।

**एतावता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य सांग्रामिकं दशममधिकरणं समाप्तम् ।**

५१ धनुर्धारी मनुष्याने सोडलेला बाण फार तर एक मनुष्य ठार करील किंवा तोसुद्धा ठार करणार नाही. परंतु बुद्धिमान मनुष्याने लढविलेली युक्ती गर्भातील बालकांनासुद्धा ठार करील.

दहावे अधिकरण समाप्त

# संघवृत्तम् – एकादशमधिकरणम्

१

[ षष्टिशततमं प्रकरणम् – भेदोपादानानि;
एकषष्टिशततमं प्रकरणम् – उपांशुदण्डाः ]

संघलाभो दण्डमित्रलाभानामुत्तमः । १ । संघा हि संहतत्वादधृष्याः परेषाम् । २ ।ताननुगुणान् भुञ्जीत सामदानाभ्याम्, विगुणान् भेददण्डाभ्याम् । ३ ।

काम्बोजसुराष्ट्रक्षत्रियश्रेण्यादयो वार्त्ताशस्त्रोपजीविनः । ४ । लिच्छिविकवृजिकमल्लकमद्रककुकुरकुरुपाञ्चालादयो राजशब्दोपजीविनः । ५ ।

सर्वेषामासन्नाः सत्रिणः संघानां परस्परन्यङ्गद्वेषवैरकलहस्थानान्युपलभ्य क्रमाभिनीतं भेदमुपचारयेयुः 'असौ त्वा विजल्पति' इति । ६ । एवमुभयतोबद्धरोषाणां विद्याशिल्पद्यूतवैहारिकेष्वाचार्यव्यञ्जना बालकलहानुत्पादयेयुः । ७ ।

## अकरावे अधिकरण
## संघांच्या बाबतीत धोरण
### पहिला अध्याय
### प्रकरण १६० : फूट पाडण्याचे प्रकार;
### प्रकरण १६१ : गुप्त वधांचे प्रकार

१ सैन्याची प्राप्ती व मित्रांचा लाभ यांपेक्षा संघाचा लाभ होणे उत्तम. २ कारण, संघामध्ये एकजूट असल्यामळे शत्रू त्यांना काही करू शकत नाहीत. ३ जे मैत्रीने वागणारे असतील त्यांना सामोपचाराने व दानाने अंकित करून घ्यावे, जे विरोध करतील त्यांना भेद व दंड यांनी स्वाधीन करून घ्यावे.

४ कांबोज, सुराष्ट्र, क्षत्रिय, श्रेणी आदी संघ (कृषी, पशुपालन व व्यापार यांचा) व्यवसाय (आणि प्रसंग पडल्यास) शस्त्रधारण करणारे होत. ५ लिच्छिविक, वजिक, मल्लक, मद्रक, कुकुर, कुरु, पांचाल आदी संघांचे मुख्य 'राजा' ह्या शब्दाने संबोधिले जातात.

६ सर्व संघमुख्यांच्या संबंधात त्यांच्या सन्निध असणाऱ्या हेरांनी एकमेकांची व्यंगे, परस्पर द्वेष, वैर, भांडण यांची माहिती काढून, हळूहळू त्यांचा आपल्यावर विश्वास बसेल असे करून त्यांच्यात फूट पाडावी, "अमुक अमुक तुझी निंदानालस्ती करीत आहे." ७ याप्रमाणे दोघांमध्ये परस्पराबद्दल क्रोध उत्पन्न

वेशशौण्डिकेषु वा प्रतिलोमप्रशंसाभिः संघमुख्यमनुष्याणां तीक्ष्णाः कलहानुत्पादयेयुः, कृत्यपक्षोपग्रहेण वा । ८ ।

कुमारकान् विशिष्टच्छन्दिकया हीनच्छन्दिकानुत्साहयेयुः । ९ । विशिष्टानां चैकपात्रं विवाहं वा हीनेभ्यो वारयेयुः । १० । हीनान् वा विशिष्टैरेकपात्रे विवाहे वा योजयेयुः । ११ । अवहीनान् वा तुल्यभावोपगमने कुलतः पौरुषतः स्थानविपर्यासतो वा । १२ ।

व्यवहारमवस्थितं वा प्रतिलोमस्थापनेन निशामयेयुः । १३ । विवादपदेषु वा द्रव्यपशुमनुष्याभिघातेन रात्रौ तीक्ष्णाः कलहानुत्पादयेयुः । १४ । सर्वेषु च कलहस्थानेषु हीनपक्षं राजा कोशदण्डाभ्यामुपगृह्य प्रतिपक्षवधे योजयेत् । १५ । भिन्नानपवाहयेद्वा । १६ । भूमौ चैषां पञ्चकुलीं दशकुलीं वा कृष्यायां निवेशयेत् । १७ । एकस्था हि शस्त्रग्रहणसमर्थाः स्युः । १८ । समवाये चैषामत्ययं स्थापयेत् । १९ ।

केल्यावर आचार्य म्हणून काम करणाऱ्या हेरांनी विद्या, कला, जुगार, खेळ इत्यादींच्या संबंधात लहान मुलांत भांडणे निर्माण करावीत.

८ किंवा तीक्ष्ण हेरांनी वेश्यागृहात अथवा दारूच्या गुत्त्यात प्रतिस्पर्ध्याच्या गुणांचे वर्णन करून संघमुख्यांच्या अनुयायांमध्ये भांडणे लावून द्यावीत, अथवा जे फितूर होण्यासारखे असतील त्यांची बाजू घेऊन (भांडणे लावावीत).

९ संघमुख्यांच्या ज्या मुलांना कमी सुखसोयी उपलब्ध असतील त्यांना अधिक सुखसोयींसाठी भडकवावे. १० वरच्या दर्जाच्या माणसांचे खालच्या दर्जाच्या माणसांबरोबर रोटीव्यवहार किंवा बेटीव्यवहार होऊ देऊ नये. ११ किंवा खालच्या दर्जाच्या लोकांना वरच्या दर्जाच्या लोकांबरोबर सहभोजन किंवा विवाह करण्यास चिथवावे. १२ किंवा अगदी खालच्या लोकांना कुल, पराक्रम किंवा स्थानाचा दर्जा या बाबतीत बरोबरीची मागणी करण्यास चिथावणी द्यावी.

१३ किंवा (दोन पक्षांमध्ये) अगोदर ठरलेला व्यवहार, त्याच्या उलट असलेला व्यवहार प्रस्थापित करून, निष्फळ करावा. १४ किंवा दोन पक्षांमध्ये विवाद चालू असता तीक्ष्ण हेरांनी रात्री जिनसा, पशू, मनुष्ये यांचे नुकसान करून भांडणे उपस्थित करावीत. १५ आणि भांडणाच्या सर्व प्रसंगीं राजाने कमजोर पक्षाला द्रव्य व सैन्य यांचे साहाय्य देऊन प्रतिपक्षाच्या वधाला उद्युक्त करावे. १६ किंवा जे फुटले असतील त्यांना आपल्या राज्यात घेऊन जावे. १७ आणि त्यांची पाचपाच कुटुंबे किंवा दहादहा कुटुंबे शेतीस योग्य जमिनीवर स्थापन करावीत. १८ कारण, सर्वांना एके ठिकाणी राहू दिल्यास ते सशस्त्र उठाव करू शकतील. १९ आणि एकत्र जमल्याबद्दल त्यांना दंड ठरवून द्यावा.

राजशब्दिभिरवरुद्धमवक्षिप्तं वा कुल्यमभिजातं राजपुत्रत्वे स्थापयेत् । २० । कार्तान्तिकादिश्चास्य वर्गो राजलक्षण्यतां संघेषु प्रकाशयेत् । २१ । संघमुख्यांश्च धर्मिष्ठानुपजपेत् 'स्वधर्मममुष्य राज्ञः पुत्रे भ्रातरि वा प्रतिपद्यध्वम्' इति । २२ । प्रतिपन्नेषु कृत्यपक्षोपग्रहार्थमर्थं दण्डं च प्रेषयेत् । २३ । विक्रमकाले शौण्डिक-व्यञ्जनाः पुत्रदारप्रेतापदेशेन 'नैषेचनिकम्' इति मदनरसयुक्तान्मद्यकुम्भाञ्छतशः प्रयच्छेयुः । २४ ।

चैत्यदैवतद्वाररक्षास्थानेषु च सत्रिणः समयकर्मनिक्षेपं सहिरण्याभिज्ञान-मुद्राणि हिरण्यभाजनानि च प्ररूपयेयुः । २५ । दृश्यमानेषु च संघेषु 'राजकीयाः' इत्यावेदयेयुः । २६ । अथावस्कन्दं दद्यात् । २७ ।

संघानां वा वाहनहिरण्ये कालिके गृहीत्वा संघमुख्याय प्रख्यातं द्रव्यं प्रयच्छेत् । २८ । तदेषां याचिते 'दत्तममुष्मै मुख्याय' इति ब्रूयात् । २९ ।

एतेन स्कन्धावाराटवीभेदो व्याख्यातः । ३० ।

२० राजा शब्दाने ओळखले जाणाऱ्या संघमुख्यांच्या मर्जीतून उतरलेल्या अथवा टाकून दिलेल्या त्यांच्या कुळातील जातिवंत पुत्राला राजपुत्र म्हणून मान्यता द्यावी. २१ आणि ज्योतिषी वगैरे हेरांनी तो राजाच्या लक्षणांनी युक्त आहे असे संघात प्रकाशित करावे. २२ आणि संघात जे धार्मिक वृत्तीचे मुख्य असतील त्यांना गुप्तपणे सुचवावे, "अमुक राजाच्या (संघमुख्याच्या) मुलाच्या अथवा भावाच्या बाबतीत तुम्ही आपले (राजपुत्रविषयक) कर्तव्य पार पाडले पाहिजे." २३ ते कबूल झाले म्हणजे फितूर होण्यासारख्या पक्षाच्या मदतीसाठी द्रव्य आणि सैन्य पाठवावे. २४ युद्धाच्या वेळी दारू विकणाऱ्यांच्या वेषातील हेरांनी मुलगा किंवा बायको मेल्याचे निमित्त सांगून उत्तरक्रियेतील दान म्हणून गुंगी आणणाऱ्या द्रव्याने मिश्र केलेल्या दारूचे शेकडो कुंभ (सैनिकांस) द्यावेत.

२५ आणि सत्री हेरांनी चैत्य किंवा देऊळ यांच्या दाराजवळ अथवा संरक्षित ठिकाणी करारानुसार (संघमुख्यांना लाच म्हणून) ठेवलेले राजाच्या मुद्रेने अंकित द्रव्याचे हंडे संघमुख्यांना वर्णन करून सांगावे. २६ आणि ते (द्रव्य घेण्यासाठी) कोणी संघमुख्य आले की ते राजाच्या पक्षाचे आहेत असे जाहीर करावे. २७ नंतर (त्यांच्या रक्षणासाठी म्हणून) राजाने संघावर हल्ला करावा.

२८ किंवा संघाचे वाहन किंवा द्रव्य थोड्या दिवसासाठी उसने घेऊन त्यातील एखादी प्रख्यात वस्तू एका संघमुख्याला द्यावी. २९ संघाने उसने परत मागितले असता "अमुक संघमुख्याला दिले" असे सांगावे.

३० याचप्रमाणे छावणीत व रानटी टोळ्यांत फूट पाडावी.

**संघमुख्यपुत्रमात्मसंभावितं वा सत्त्री ग्राहयेत् ' अमुष्य राज्ञः पुत्रस्त्वम्, शत्रु-भयादिह न्यस्तोऽसि ' इति । ३१ । प्रतिपन्नं राजा कोशदण्डाभ्यामुपगृह्य संघेषु विक्रमयेत् । ३२ । अवाप्तार्थस्तमपि प्रवासयेत् । ३३ ।**

**बन्धकीपोषकाः प्लवकनटनर्तकसौभिका वा प्रणिहिताः स्त्रीभिः परमरूप-यौवनाभिः संघमुख्यानुन्मादयेयुः । ३४ । जातकामानामन्यतमस्य प्रत्ययं कृत्वाऽन्यत्र गमनेन प्रसभहरणेन वा कलहानुत्पादयेयुः । ३५ । कलहे तीक्ष्णाः कर्म कुर्युः ' हतोऽयमित्थं कामुकः ' इति । ३६ । विसंवादितं वा मर्षयमाणमभिसृत्य स्त्री ब्रूयात् ' असौ मां मुख्यस्त्वयि जातकामां बाधते, तस्मिञ्जीवति नेह स्थास्यामि ' इति घातमस्य प्रयोजयेत् । ३७ । प्रसह्यापहृता वा वनान्ते क्रीडागृहे वाऽपहर्तारं रात्रौ तीक्ष्णेन घातयेत्, स्वयं वा रसेन । ३८ । ततः प्रकाशयेत् ' अमुना मे प्रियो हतः ' इति । ३९ ।**

**जातकामं वा सिद्धव्यञ्जनः सांवदनिकीभिरौषधीभिः संवास्य रसेनातिसंधायापगच्छेत् । ४० । तस्मिन्नपक्रान्ते सत्त्रिणः परप्रयोगमभिशंसेयुः । ४१ ।**

३१ किंवा स्वतः फार मोठे आहोत अशी कल्पना करून बसलेल्या संघ-मुख्याच्या मुलाला सत्री हेराने सुचवावे, " तू त्या राजाचा मुलगा आहेस; शत्रूच्या भीतीने तुला येथे ठेवले आहे. " ३२ त्याला ते पटले म्हणजे राजाने द्रव्य व सैन्य यांची मदत देऊन त्याला संघाबरोबर लढावयास लावावे. ३३ कार्य-भाग झाल्यावर त्याचासुद्धा वध करावा.

३४ कुंटणखाने चालविणारे किंवा कोल्हाटी, नट, नर्तक, खेळ करणारे इत्यादी व्यवसाय करणाऱ्या हेरांनी संघमुख्यांना अतिशय सुंदर व तरुण स्त्रियांच्या नादी लावून वेडेपिसे बनवावे. ३५ त्यांचा काम प्रबल झाला म्हणजे एकामध्ये प्रेमाविषयी विश्वास उत्पन्न करून तिने दुसऱ्याकडे जावे; अशा रीतीने किंवा बळजबरीने पळवून नेल्याने त्यांच्यात तंटे उत्पन्न करावेत. ३६ कलह चालू झाला म्हणजे तीक्ष्ण हेरांनी आपले काम करून म्हणावे, " ह्या लंपट मुख्याचा खून झाला आहे. " ३७ किंवा प्रेमात हार खावी लागली असताही ते सहन करणाऱ्या मुख्याकडे जाऊन त्या स्त्रीने म्हणावे, " माझे तुझ्यावर प्रेम असता तो अमुक मुख्य मला त्रास देत आहे; तो जिवंत असेपर्यंत मी येथे रहाणार नाही, " आणि याप्रमाणे त्याच्या वधास प्रवृत्त करावे. ३८ किंवा तिला बळजबरीने पळवून नेले असता उपवनात किंवा क्रीडागृहात पळवून नेणाऱ्याचा तिने रात्री तीक्ष्ण हेरामार्फत खून करावा किंवा स्वतः विष देऊन (खून करावा). ३९ नंतर तिने जाहीर करावे, " अमक्याने माझ्या प्रियकराचा खून केला आहे. "

४० किंवा सिद्ध वेषातील हेराने कामविह्वल झालेल्या मुख्यामध्ये वशीकरण करणाऱ्या औषधांनी स्वतःविषयी विश्वास उत्पन्न करून नंतर त्याला विष

आढ्यविधवा गूढाजीवा योगस्त्रियो वा दायनिक्षेपार्थं विवदमानाः संघमुख्यानुन्मादयेयुः, अदितिकौशिकस्त्रियो नर्तकीगायना वा । ४२ । प्रतिपन्नान् गूढवेश्मसु रात्रिसमागमप्रविष्टांस्तीक्ष्णा हन्युर्बद्ध्वा हरेयुर्वा । ४३ ।

सत्त्री वा स्त्रीलोलुपं संघमुख्यं प्ररूपयेत् 'अमुष्मिन् ग्रामे दरिद्रकुलमपसृतम्, तस्य स्त्री राजार्हा, गृहाणैनाम्' इति । ४४ । गृहीतायामर्धमासानन्तरं सिद्धव्यञ्जनो दूष्यः संघमुख्यमध्ये प्रक्रोशेत् 'असौ मे मुख्यो भार्यां स्नुषां भगिनीं दुहितरं वाऽधिचरति' इति । ४५ । तं चेत्संघो निगृह्णीयात्, राजैनमुपगृह्य विगुणेषु विक्रमयेत् । ४६ । अनिगृहीते सिद्धव्यञ्जनं रात्रौ तीक्ष्णाः प्रवासयेयुः । ४७ । ततस्तद्व्यञ्जनाः प्रक्रोशेयुः 'असौ ब्रह्महा ब्राह्मणीजारश्च' इति । ४८ ।

कार्तान्तिकव्यञ्जनो वा कन्यामन्येन वृतामन्यस्य प्ररूपयेत् 'अमुष्य कन्या राजपत्नी राजप्रसविनी च भविष्यति, सर्वस्वेन प्रसह्य वैनां लभस्व' इति । ४९ । अलभ्यमानायां परपक्षमुद्धर्षयेत् । ५० । लब्धायां सिद्धः कलहः । ५१ ।

देऊन त्याचा घात करावा आणि निघून जावे. ४१ तो निघून गेल्यावर हेरांनी दुसऱ्या मुख्याने विषप्रयोग केला असल्याचे सांगावे.

४२ श्रीमंत विधवा म्हणून किंवा गुप्त व्यवसाय करणारी स्त्री म्हणून रहाणाऱ्या स्त्री हेरांनी (अनुक्रमे) वारसा हक्काविषयी किंवा ठेवीविषयी कज्जा उभा करून संघमुख्यांना आपल्यासाठी वेडे करावे किंवा अदितीकौशिक स्त्रियांनी अथवा नाचगाणे करणाऱ्या स्त्रियांनी (तसे करावे). ४३ ते तयार होऊन समागमासाठी रात्री गुप्त घरात आले असता तीक्ष्ण हेरांनी त्यांना ठार करावे अथवा पकडून पळवून न्यावे.

४४ किंवा स्त्रीलंपट संघमुख्याला सत्री हेराने वर्णन करून सांगावे, " अमुक गावात एका दरिद्री कुटुंबाचा मुख्य त्यांना टाकून निघून गेला आहे. त्याची पत्नी राजाला योग्य अशी आहे. तिला घेऊन ये. " ४५ त्याने तिला आणली म्हणजे पंधरा दिवसानंतर सिद्धाच्या वेषातील दूष्य असलेल्या हेराने त्या संघाच्या मुख्यांकडे तक्रार करावी, " अमुक मुख्याने माझ्या पत्नीवर, सुनेवर, बहिणीवर अथवा मुलीवर अत्याचार केला आहे. " ४६ संघाने जर त्याला शासन केले तर राजाने त्याची बाजू घेऊन त्याला विरोधी मुख्यांबरोबर लढावयास लावावे. ४७ जर संघाने त्याला शासन केले नाही तर तीक्ष्ण हेरांनी त्या सिद्ध वेषातील हेराचा रात्री खून करावा. ४८ नंतर सिद्ध वेषातील इतर हेरांनी आक्रोश करावा, "अमुक मुख्याने ब्रह्महत्या केली आहे आणि त्याने ब्राह्मण स्त्रीशी जारकर्म केले आहे."

४९ किंवा ज्योतिषाच्या वेषातील हेराने एखाद्या मुलीचा एका मुख्याशी विवाह ठरला असता दुसऱ्या मुख्याकडे वर्णन करून सांगावे, " अमक्या अमक्याची

भिक्षुकी वा प्रियभार्यं मुख्यं ब्रूयात् ' असौ ते मुख्यो यौवनोत्सिक्तो भार्यायां मां प्राहिणोत्, तस्याहं भयाल्लेख्यमाभरणं गृहीत्वाऽऽगतास्मि, निर्दोषा ते भार्या, गूढमस्मिन्प्रतिकर्तव्यम्, अहमपि तावत्प्रतिपत्स्यामि ' इति । ५२ ।

एवमादिषु कलहस्थानेषु स्वयमुत्पन्ने वा कलहे तीक्ष्णैरुत्पादिते वा हीनपक्षं राजा कोशदण्डाभ्यामुपगृह्य विगुणेषु विक्रमयेदपवाहयेद्वा । ५३ ।

संघेष्वेवमेकराजो वर्तेत । ५४ । संघाश्चाप्येवमेकराजादेतेभ्योऽतिसंधानेभ्यो रक्षयेयुः । ५५ ।

संघमुख्यश्च संघेषु न्यायवृत्तिर्हितः प्रियः ।
दान्तो युक्तजनस्तिष्ठेत्सर्वचित्तानुवर्तकः ॥ ५६ ॥

इति संघवृत्ते एकादशेऽधिकरणे भेदोपादानानि उपांशुदण्डाश्च प्रथमोऽध्यायः । आदितः पञ्चविंशच्छततमः ।

एतावता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य संघवृत्तम् एकादशमधिकरणं समाप्तम् ।

मुलगी राजपत्नी किंवा राजमाता होणार आहे. सर्वस्व देऊन किंवा बळजबरीने तिला प्राप्त करून घे." ५० तिची प्राप्ती होण्यासारखी नसेल तर दुसऱ्या पक्षाला चिथवावे. ५१ जर प्राप्ती झाली तर त्यांचे भांडण ठरलेलेच आहे.

५२ किंवा भिक्षुकी वेषातील हेर स्त्रीने ज्याला आपली पत्नी अति प्रिय आहे अशा मुख्याला म्हणावे, "अमुक अमुक मुख्याने तारुण्याने मदोन्मत्त होऊन तुझ्या भार्येकडे मला पाठविले आहे. त्याच्या भीतीने मी हे पत्र व दागिने घेऊन आले आहे. तुझ्या पत्नीचा यात काही दोष नाही. त्याचा समाचार गुप्तपणे घेतला पाहिजे. तोपर्यंत मी (तुझ्या पत्नीच्या वतीने) स्वीकृती कळविते."

५३ ह्या व इतर प्रकारांनी उत्पन्न केलेल्या कलहाच्या प्रसंगी अथवा त्यांच्यात आपोआप उत्पन्न झालेल्या किंवा तीक्ष्ण हेरांनी घडवून आणलेल्या भांडणात राजाने कमकुवत पक्षाला द्रव्य व सैन्य यांची मदत देऊन विरोधी पक्षाबरोबर लढावयास लावावे अथवा त्यांना आपल्या राज्यात घेऊन जावे.

५४ एकच असलेल्या राजाने संघांच्या बाबतीत याप्रमाणे धोरण ठेवावे. ५५ आणि संघांनीसुद्धा एक असलेल्या राजाने केलेल्या कपटकृत्यांपासून आपले संरक्षण होईल याविषयी दक्ष असावे.

५६ आणि संघमुख्याने संघसदस्यांशी न्यायाने वागून, त्यांना हितकर व प्रिय होईल अशी वागणूक ठेवावी, इंद्रिये ताब्यात ठेऊन आणि सर्वांच्या मनासारखे करून लोकांची निष्ठा प्राप्त करून घ्यावी.

अकरावे अधिकरण समाप्त

# आबलीयसम् – द्वादशमधिकरणम्

१

[ द्विषष्टिशततमं प्रकरणम् – दूतकर्म ]

'बलीयसाऽभियुक्तो दुर्बलः सर्वत्रानुप्रणतो वेतसधर्मा तिष्ठेत् । १ । इन्द्रस्य हि स प्रणमति यो बलीयसो नमति ' इति भारद्वाजः । २ ।

'सर्वसंदोहेन बलानां युध्येत । ३ । पराक्रमो हि व्यसनमपहन्ति । ४ । स्वधर्मश्चैष क्षत्रियस्य, युद्धे जयः पराजयो वा ' इति विशालाक्षः । ५ ।

नेति कौटिल्यः । ६ । सर्वत्रानुप्रणतः कुलैडक इव निराशो जीविते बसति । ७ । युध्यमानश्चाल्पसैन्यः समुद्रमिवाऽप्लवोऽवगाहमानः सीदति । ८ । तद्विशिष्टं तु राजानमाश्रितो दुर्गमविषह्यं वा चेष्टेत । ९ ।

त्रयोऽभियोक्तारो धर्मलोभासुरविजयिन इति । १० । तेषामभ्यवपत्त्या धर्मविजयी तुष्यति । ११ । तमभ्यवपद्येत, परेषामपि भयात् । १२ । भूमिद्रव्यहरणेन

## बारावे अधिकरण – बलहीन राजाविषयी

### पहिला अध्याय

### प्रकरण १६२ : दूताची कामगिरी

१ "बलवत्तर राजाने हल्ला केला असता दुर्बल राजाने सर्व बाबतीत नमते घेऊन वेतासारखी वृत्ती धारण करावी. २ जो अधिक बलवान राजापुढे नमतो, तो इंद्रापुढे नमतो, " असे भारद्वाजाचे मत आहे.

३ "त्याने आपले सर्व सैन्य एकत्र करून लढावे. ४ कारण, पराक्रम करूनच संकटाचा नाश करता येतो. ५ आणि युद्ध करणे हा क्षत्रियाचा स्वधर्मच आहे, युद्धात जय होवो अथवा पराजय होवो, " असे विशालाक्षाचे मत आहे.

६ हे बरोबर नाही असे कौटिल्याचे मत आहे. ७ सर्व बाबतीत नमते घेणारा राजा आपल्या कळपातून सुटून एकटा पडलेल्या मेंढ्याप्रमाणे जीविताविषयी निराश होऊन रहातो. ८ आणि थोडेच सैन्य असताही युद्धात उतरणारा राजा होडीशिवाय समुद्रात उडी घेणाऱ्या मनुष्याप्रमाणे बुडून जातो. ९ त्याने हल्ला करणाऱ्या राजापेक्षा अधिक बलवान राजाच्या आश्रयास जाऊन किंवा अभेद्य किल्ल्याचा आश्रय घेऊन कारवाई करावी.

१० हल्ला करणारे राजे तीन प्रकारचे असतात – धर्मविजयी, लोभविजयी आणि असुरविजयी. ११ त्यांपैकी शरण गेल्याने धर्मविजयी संतुष्ट होतो.

लोभविजयी तुष्यति । १३ । तमर्थेनाभ्यवपद्येत । १४ । भूमिद्रव्यपुत्रदारप्राण-हरणेनासुरविजयी । १५ । तं भूमिद्रव्याभ्यामुपगृह्याग्राह्यः प्रतिकुर्वीत । १६ ।

तेषामन्यतममुत्तिष्ठमानं संधिना मन्त्रयुद्धेन कूटयुद्धेन वा प्रतिव्यूहेत । १७ । शत्रुपक्षमस्य सामदानाभ्याम्, स्वपक्षं भेददण्डाभ्याम् । १८ । दुर्गं राष्ट्रं स्कन्धावारं वाऽस्य गूढाः शस्त्ररसाग्निभिः साधयेयुः । १९ । सर्वतः पार्ष्णिमस्य ग्राहयेत् । २० । अटवीभिर्वा राज्यं घातयेत्, तत्कुलीनापरुद्धाभ्यां वा हारयेत् । २१ । अपकारान्तेषु चास्य दूतं प्रेषयेत् । २२ । अनपकृत्य वा संधानम् । २३ ।

तथाप्यभिप्रयान्तं कोशदण्डयोः पादोत्तरमहोरात्रोत्तरं वा संधिं याचेत । २४ । स चेद्दण्डसंधिं याचेत, कुण्ठमस्मै हस्त्यश्वं दद्याद्, उत्साहितं वा गरयुक्तम् । २५ । पुरुषसंधिं याचेत, दूष्यामित्राटवीबलमस्मै दद्याद् योगपुरुषाधिष्ठितम् । २६ ।

१२ त्याला शरण जावे, इतर राजांची भीती वाटत असताही (त्याने हल्ला केलेला नसला तरी त्याला शरण जावे). १३ भूमी व द्रव्य मिळवून लोभ-विजयी संतुष्ट होतो. १४ त्याला धन देऊन शरण जावे. १५ भूमी, द्रव्य, बायकामुले व प्राण यांचे हरण करूनच असुरविजयी संतुष्ट होतो. १६ त्याला भूमी व द्रव्य अर्पण करून स्वतः त्याच्या तावडीत न सापडता प्रतिकार करण्याची योजना आखावी.

१७ त्या तिघांपैकी कोणी आपल्याविरुद्ध उठाव केला तर संधी (तह), मंत्रयुद्ध (कारस्थान रचणे) किंवा कूटयुद्ध (गुप्त रीतीने हत्या) यांच्या द्वारा प्रतिकाराची योजना करावी. १८ त्याच्या शत्रुपक्षातील लोकांना साम व दान यांनी आपल्या बाजूला वळवून घ्यावे, त्याच्या स्वतःच्या पक्षातील लोकांना भेद व दंड यांचा उपयोग करून. १९ त्याचा दुर्ग, राष्ट्र किंवा सैन्याची छावणी यांचा गुप्त हेरांनी शस्त्र, अग्नी किंवा विष यांच्या प्रयोगाने नाश करावा. २० सर्व बाजूंनी त्याच्या पिछाडीवर हल्ला करावयास उद्युक्त करावे. २१ किंवा रानटी टोळ्यांमार्फत त्याचे राज्य उध्वस्त करवावे अथवा त्याच्या गादीवर हक्क सांगणाऱ्या त्याच्या वंशातील पुरुषाला अथवा त्याच्या मर्जीतून उतरलेल्या राजपुत्राला त्याचे राज्य बळकावण्यास लावावे. २२ आणि अशा प्रकारे त्याला इजा केल्यानंतर (तहाची बोलणी करण्यासाठी) दूताला पाठवावे. २३ अथवा इजा न करताही तहाचे बोलणे करावे.

२४ इतके केल्यानंतरही तो पुढे चाल करून येत राहिला तर द्रव्य व सैन्य हे एकचतुर्थांशाने किंवा एक दिवसाने वाढवीत जाऊन तहाचे बोलणे करावे. २५ त्याने जर सैन्य देण्याचे कबूल करून तहाचे बोलणे केले तर निरुपयोगी झालेले हत्ती व घोडे द्यावेत किंवा तडफदार असलेल्यांना विष चारून मग द्यावेत. २६ सैनिक असलेले सैन्य द्यावयाचे असेल तर गुप्त अधिकाऱ्यांच्या

**तथा कुर्याद् यथोभयविनाशः स्यात् । २७ । तीक्ष्णबलं वाऽस्मै दद्याद् यदवमानितं विकुर्वीत, मौलमनुरक्तं वा यदस्य व्यसनेऽपकुर्यात् । २८ । कोशसंधिं याचेत, सारमस्मै दद्याद् यस्य क्रेतारं नाधिगच्छेत्, कुप्यमयुद्धयोग्यं वा । २९ । भूमिसंधिं याचेत, प्रत्यादेयां नित्यामित्रामनपाश्रयां महाक्षयव्ययनिवेशां वाऽस्मै भूमिं दद्यात् । ३० । सर्वस्वेन वा राजधानीवर्जं संधिं याचेत बलीयसः । ३१ ।**

**यत्प्रसह्य हरेदन्यस्तत्प्रयच्छेदुपायतः ।**
**रक्षेत्स्वदेहं न धनं का ह्यनित्ये धने दया ।। ३२ ।।**

**इत्याबलीयसे द्वादशेऽधिकरणे दूतकर्म प्रथमोऽध्यायः । आदितः षट्त्रिंशच्छततमः ।**

## २

## [ त्रिषष्टिशततमं प्रकरणम् – मन्त्रयुद्धम् ;
## चतुःषष्टिशततमं प्रकरणम् – सेनामुख्यवधः (प्रथमो भागः) ]

**स चेत्संधौ नावतिष्ठेत, ब्रूयादेनम् – " इमे शत्रुषड्वर्गवशगा राजानो विनष्टाः, तेषामनात्मवतां नार्हसि मार्गमनुगन्तुम् । १ । धर्ममर्थं चावेक्षस्व । २ । मित्रमुखा**

हुकमतीखाली दूष्य सैनिक, शत्रुबल व अटवीबल द्यावे. २७ असे करावे की ज्यायोगे दोघांचा (शत्रूचा व आपल्या दूष्यबल वगैरेचा) नाश होईल. २८ किंवा क्रूर प्रकृतीचे सैन्य द्यावे की जे अपमान झाला तर तावडतोब प्रतिकार करील; किंवा पिढीजात, राजनिष्ठ सैन्य द्यावे की जे तो संकटात सापडला म्हणजे त्याला अपाय करील. २९ कोश देऊन संधी करावयाचा असल्यास भारी किमतीच्या वस्तू द्याव्यात की ज्या विकत घेईल असा कोणी आढळणार नाही, अथवा युद्धास निरुपयोगी असे जंगलातील उत्पादन द्यावे. ३० भूमी देऊन संधी करावयाचा असल्यास सहज परत घेता येण्यासारखी, शेजारी नेहमी शत्रू असलेली, (दुर्गासारखे) आश्रयस्थान नसलेली अथवा वसाहतीसाठी खूप क्षय व व्यय लागणारी अशी भूमी त्याला द्यावी. ३१ किंवा राजधानी खेरीज करून बाकीचे सर्व देऊन बलवत्तर राजाकडे तहाची मागणी करावी.

३२ जे बळाच्या जोरावर दुसरा बळकावू शकेल ते उपायांच्या योजनेने आपण होऊन द्यावे. आपल्या देहाचे रक्षण करावे, द्रव्याचे करण्याचे कारण नाही. कारण, अनित्य असलेल्या धनाबद्दल माया का दाखवावी ?

## दुसरा अध्याय
## प्रकरण १६३ : मंत्रयुद्ध;
## प्रकरण १६४ : शत्रुसेनेतील मुख्य अधिकाऱ्यांचा वध

१ तो जर संधी करण्यास तयार न झाला तर त्याला म्हणावे, " (कामक्रोधादी) षड्रिपूंच्या आहारी गेलेल्या ह्या सर्व राजांचा नाश झाला आहे;

ह्यमित्रास्ते ये त्वा साहसमधर्ममर्थातिक्रमं च ग्राहयन्ति । ३ । शूरैस्त्यक्तात्मभिः सह योद्धुं साहसम्, जनक्षयमुभयतः कर्तुमधर्मः, दृष्टमर्थं मित्रमदुष्टं च त्यक्तुमर्थातिक्रमः । ४ । मित्रवांश्च स राजा, भूयश्चैतेनार्थेन मित्राण्युद्योजयिष्यति यानि त्वा सर्वतोऽभियास्यन्ति । ५ । न च मध्यमोदासीनयोर्मण्डलस्य वा परित्यक्तः, भवांस्तु परित्यक्तः यस्त्वा समुद्युक्तमुपप्रेक्षन्ते 'भूयः क्षयव्ययाभ्यां युज्यताम्, मित्राच्च भिद्यताम्, अथैनं परित्यक्तमूलं सुखेनोच्छेत्स्यामः' इति । ६ । स भवान्नार्हति मित्रमुखानाममित्राणां श्रोतुम्, मित्राण्युद्वेजयितुममित्रांश्च श्रेयसा योक्तुम्, प्राणसंशयमनर्थं चोपगन्तुम्" इति यच्छेत् । ७ ।

तथापि प्रतिष्ठमानस्य प्रकृतिकोपमस्य कारयेद् यथा संघवृत्ते व्याख्यातं योगवामने च । ८ । तीक्ष्णरसदप्रयोगं च । ९ । यदुक्तमात्मरक्षितके रक्ष्यं तत्र तीक्ष्णान् रसदांश्च प्रयुञ्जीत । १० ।

त्या आत्मगुणरहित राजांच्याच मार्गाने जाणे तुला शोभत नाही. २ धर्म आणि अर्थ यांच्याकडेसुद्धा तू लक्ष दिले पाहिजे. ३ हे जे राजे तुला हे साहसाचे, अधर्मयुक्त व अर्थाची हानी करणारे कार्य करावयास लावीत आहेत ते मित्राचा मुखवटा धारण करणारे खरोखरीचे शत्रू आहेत. ४ प्राणाची पर्वा न करता लढणाऱ्या (माझ्या) शूर सैनिकांशी युद्ध करणे हे साहसकर्म आहे; दोन्ही बाजूंच्या मनुष्यांचा संहार करणे हा अधर्म आहे; स्पष्ट दिसत असलेला लाभ आणि काहीही दोष नसलेला मित्र यांचा त्याग करणे यात स्वतःच्या अर्थाची हानी आहे. ५ शिवाय, त्या (दुर्बल) राजाला मित्रांचे सहाय्य आहे, आणि (तुला देऊ केलेल्या) ह्या द्रव्याने तो आणखी मित्रांना उद्युक्त करील आणि ते तुझ्यावर सर्व बाजूंनी हल्ला चढवितील. ६ आणि मध्यम व उदासीन राजा किंवा राजमंडल यांनी त्याला टाकून दिले आहे असेही नाही, उलट त्यांनी तुलाच टाकून दिले आहे, कारण तू युद्धास सिद्ध झाला असता ते 'ह्याची आणखी मनुष्यहानी व द्रव्यहानी होऊ द्या आणि मित्रापासून ह्याला फुटून पडू द्या, मग त्याचे मूळ राज्य सोडून तो गेला की त्याचा सहज उच्छेद करू' ह्या विचाराने स्वस्थ बसून पहात राहिले आहेत. ७ तेव्हा मित्रत्वाचा बुरखा पांघरलेल्या शत्रूंचे तू ऐकावे, मित्रांना भीती वाटायला लावावी आणि शत्रूंचा फायदा करून द्यावा, तसेच आपला प्राण संकटात घालावा व अनर्थ ओढवून घ्यावा हे योग्य नाही." याप्रमाणे थोपविण्याचा प्रयत्न करावा.

८ यावरही तो स्वारीवर निघालाच तर (अकराव्या अधिकरणातील) संघवृत्तात आणि (अध्याय १३.२ मधील) योगवामन (गुप्त उपायांनी शहराबाहेर आणणे) ह्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणे त्याच्या प्रकृतींत प्रक्षोभ माजवावा. ९ आणि तीक्ष्ण व विष देणाऱ्या हेरांचा उपयोग करावा.

बन्धकीपोषकाः परमरूपयौवनाभिः स्त्रीभिः सेनामुख्यानुन्मादयेयुः । ११ । बहूनामेकस्यां द्वयोर्वा मुख्ययोः कामे जाते तीक्ष्णाः कलहानुत्पादयेयुः । १२ । कलहे पराजितपक्षं परत्रापगमने यात्रासाहाय्यदाने वा भर्तुर्याजयेयुः । १३ । कामवशान्वा सिद्धव्यञ्जनाः सांवदनिकीभिरोषधीभिरतिसंधानाय मुख्येषु रसं दापयेयुः । १४ ।

वैदेहकव्यञ्जनो वा राजमहिष्याः सुभगायाः प्रेष्यामासन्नां कामनिमित्तमर्थेनाभिवृष्य परित्यजेत् । १५ । तस्यैव परिचारकव्यञ्जनोपदिष्टः सिद्धव्यञ्जनः सांवदनिकीमोषधीं दद्यात् 'वैदेहकशरीरेऽवधातव्या' इति । १६ । सिद्धे सुभगाया अप्येनं योगमुपदिशेत् 'राजशरीरेऽवधातव्या' इति । १७ । ततो रसेनातिसंदध्यात् । १८ ।

कार्तान्तिकव्यञ्जनो वा महामात्रं 'राजलक्षणसंपन्नं' क्रमाभिनीतं ब्रूयात् । १९ । भार्यामस्य भिक्षुकी 'राजपत्नी राजप्रसविनी वा भविष्यसि' इति । २० । भार्याव्यञ्जना वा महामात्रं ब्रूयात् 'राजा किल मामवरोधयिष्यति

१० (अध्याय १.२१ मधील) आत्मरक्षितक प्रकरणात ज्या बाबतीत खबरदारी घ्यावयास सांगितले आहे त्या ठिकाणी तीक्ष्ण व रसद यांची योजना करावी.

११ कुंटणखाने चालविणाऱ्यांनी अतिशय सुंदर व तरुण स्त्रियांचे सैन्यातील मुख्यांना वेड लावावे. १२ एकाच स्त्रीवर पुष्कळ किंवा दोन मुख्यांचे मन गेले म्हणजे तीक्ष्ण हेरांनी त्यांच्यात भांडण लावून द्यावे. १३ भांडणात जो पक्ष हरेल त्याला दुसरीकडे निघून जाण्यास किंवा त्यांच्या धन्यास (दुर्बल राजास) युद्धास सहाय्य करण्यास प्रवृत्त करावे. १४ किंवा मुख्यांमध्ये जे कामाच्या आहारी गेले असतील त्यांना सिद्धवेषातील हेरांनी वशीकरण औषधांच्या बरोबर, त्यांचा घात करण्यासाठी, विष देववावे.

१५ किंवा व्यापाऱ्याच्या वेषातील हेराने राजाच्या आवडत्या राणीच्या मर्जीतील दासीवर प्रेमानिमित्त म्हणून देणग्यांचा वर्षाव करावा आणि मग तिचा त्याग केल्यासारखे करावे. १६ त्याच व्यापाऱ्याचा नोकर म्हणून बहाणा करणाऱ्या हेराने शिफारस केलेल्या सिद्ध हेराने त्या दासीला वशीकरण औषध देऊन सांगावे "हे त्या व्यापाऱ्याच्या देहाला लाव." १७ (व्यापाऱ्याचे प्रेम पुन्हा जडल्यामुळे) यश मिळाले म्हणजे आवडत्या राणीलासुद्धा तोच प्रयोग करावयास उद्युक्त करावे "राजाच्या देहाला हे लाव." १८ नंतर विष देऊन घात करावा.

१९ किंवा ज्योतिषाच्या वेषातील हेराने मोठ्या अधिकाऱ्याचा हळूहळू विश्वास संपादन केल्यानंतर "तू राजाच्या लक्षणांनी संपन्न आहेस" असे त्याला सांगावे. २० भिक्षुकीवेषातील हेर स्त्रीने त्याच्या पत्नीला "तू राजपत्नी किंवा राजमाता होणार आहेस" असे सांगावे. २१ किंवा पत्नी म्हणून

तवान्तिकाय पत्नलेख्यमाभरणं चेदं परिव्राजिकयाऽऽहृतम्' इति ।२१। सूदारालिकव्यञ्जनो वा रसप्रयोगार्थं राजवचनमर्थं चास्य लोभनीयमभिनयेत् ।२२। तदस्य वैदेहकव्यञ्जनः प्रतिसंदध्यात्, कार्यसिद्धिं च ब्रूयात् ।२३। एवमेकेन द्वाभ्यां त्रिभिरित्युपायैरेकैकमस्य महामात्रं विक्रमायापगमनाय वा योजयेत् । इति । २४।

दुर्गेषु चास्य शून्यपालासन्नाः सत्रिणः पौरजानपदेषु मैत्रीनिमित्तम् आवेदयेयुः – 'शून्यपालेनोक्ता योधाश्चाधिकरणस्थाश्च "कृच्छ्रगतो राजा जीवन्नागमिष्यति, न वा; प्रसह्य वित्तमार्जयध्वम्, अमित्रांश्च हत" इति'।२५। बहुलीभूते तीक्ष्णाः पौरान्निशास्वाहारयेयुः, मुख्यांश्चाभिहन्युः 'एवं क्रियन्ते ये शून्यपालस्य न शुश्रूषन्ते' इति ।२६। शून्यपालस्थानेषु च सशोणितानि शस्त्रवित्तबन्धनान्युत्सृजेयुः ।२७। ततः सत्रिणः 'शून्यपालो घातयति विलोपयति च' इत्यावेदयेयुः। २८। एवं जानपदान् समाहर्तुर्भेदयेयुः । २९।

वावरणाऱ्या हेर स्त्रीने मोठ्या अधिकाऱ्याला म्हणावे, "राजा मला त्याच्या अंतःपुरात ठेवू पहातो; एका परिव्राजिकेने हे पत्र व दागिने तुझ्याकडे आणले आहेत." २२ किंवा आचारी किंवा वाढपी यांच्या वेषातील हेराने (मोठ्या अधिकाऱ्याला) विषप्रयोग करण्याविषयी (त्याच्या) राजाची सूचना आणि त्यासाठी प्रलोभन म्हणून दिलेले द्रव्य यांविषयी त्याला सांगावे. २३ व्यापाऱ्याच्या वेषातील हेराने ह्या बातमीला दुजोरा द्यावा आणि (विष-प्रयोगाचे) कार्य सिद्ध होईल असे म्हणावे. २४ याप्रमाणे एक, दोन अथवा तीन उपायांनी त्याच्या एक एक मोठ्या अधिकाऱ्याला त्याच्याशी लढावयास अथवा त्याला सोडून जावयास प्रवृत्त करावे.

२५ आणि त्याच्या दुर्गामध्ये शून्यपालाच्या (राजाच्या गैरहजेरीत राज्यकारभार पहाणाऱ्या अधिकाऱ्याच्या) जवळ असणाऱ्या हेरांनी नगरवासी आणि जनपदनिवासी यांच्यामध्ये (त्यांच्यावरील) मैत्रीसाठी म्हणून अशी बातमी पसरवावी "शून्यपालाने सैनिकांना व खात्यातील अधिकाऱ्यांना सांगितले आहे 'राजाची परिस्थिती फार कठीण आहे; तो जिवंत परत येईल किंवा येणारसुद्धा नाही; जबरीने धन मिळवा आणि तुमच्या वैऱ्यांना मारा." २६ ही अफवा पसरल्यानंतर तीक्ष्ण हेरांनी नगरातील रहिवाश्यांना रात्री लुटावे आणि "जे शून्यपालाला जुमानीत नाहीत त्यांना ही शिक्षा आहे" असे म्हणत मुख्य अधिकाऱ्यांना ठार करावे. २७ आणि शून्यपालाच्या वावरण्याच्या ठिकाणी रक्ताने माखलेली शस्त्रे, पैसे आणि बांधावयाचे दोर ठेवून द्यावेत. २८ नंतर हेरांनी "शून्यपाल लोकांना ठार मारीत आहे व त्यांना लुबाडीत आहे" असे सांगत सुटावे. २९ याचप्रमाणे जनपदातील लोक व समाहर्ता

**समाहर्तृपुरुषांस्तु ग्राममध्येषु रात्रौ तीक्ष्णा हत्वा ब्रूयुः 'एवं क्रियन्ते ये जनपदमधर्मेण बाधन्ते' इति । ३० । समुत्पन्ने दोषे शून्यपालं समाहर्तारं वा प्रकृतिकोपेन घातयेयुः । ३१ । तत्कुलीनमपरुद्धं वा प्रतिपादयेयुः । ३२ ।**

**अन्तःपुरपुरद्वारं द्रव्यधान्यपरिग्रहान् ।**
**दहेयुस्तांश्च हन्युर्वा ब्रूयुरस्यार्तवादिनः ।। ३३ ।।**

**इत्याबलीयसे द्वादशेऽधिकरणे मन्त्रयुद्धं सेनामुख्यवधः (प्रथमो भागः) च द्वितीयोऽध्यायः । आदितः सप्तत्रिंशच्छततमः ।**

## ३

## [ चतुःषष्टिशततमं प्रकरणम् – सेनामुख्यवधः (द्वितीयो भागः) ; पञ्चषष्टिशततमं प्रकरणम् – मण्डलप्रोत्साहनम् ]

**राज्ञो राजवल्लभानां चासन्नाः सत्त्रिणः पत्त्यश्वरथद्विपमुख्यानां 'राजा क्रुद्धः' इति सुहृद्विश्वासेन मित्रस्थानीयेषु कथयेयुः । १ । बहुलीभूते तीक्ष्णाः कृतरात्रिचारप्रतीकारा गृहेषु 'स्वामिवचनेनागम्यताम्' इति ब्रूयुः । २ ।**

यांत वितुष्ट आणावे. ३० विशेषेकरून तीक्ष्ण हेरांनी गावांमध्ये रात्री समाहर्त्याच्या हाताखालील माणसांचा खून करून म्हणावे, "जे जनपदाला अधर्माने छळतात त्यांना ही शिक्षा आहे." ३१ याप्रमाणे त्यांचा दोष प्रस्थापित केल्यावर प्रजाजनांतील प्रक्षोभाने शून्यपाल अथवा समाहर्ता यांचा वध घडवून आणावा. ३२ त्याच्या कुलातील गादीवर हक्क सांगणाऱ्याला अथवा मर्जीतून उतरलेल्या राजपुत्राला राजा म्हणून प्रजेची मान्यता मिळवावी.

३३ त्यांनी राजप्रासादाला, नगराच्या वेशींना, पदार्थांच्या व धान्याच्या कोठारांना आगी लावाव्यात आणि तेथील अधिकाऱ्यांना ठार करावे व ते कृत्य त्याचे (शून्यपालाचे अथवा समाहर्त्याचे) असल्याचे दुःखाचा आक्रोश करीत सांगावे.

## तिसरा अध्याय

## प्रकरण १६४ : (पुढे चालू) ;
## प्रकरण १६५ : शत्रुविरुद्ध राजमंडलाचे प्रोत्साहन

१ राजाच्या आणि राजवल्लभांच्या (त्याच्या खास मर्जीतील माणसांच्या) सन्निध वावरणाऱ्या हेरांनी पदाती, घोडदळ, रथ व हत्ती या सेनेच्या अंगांवरील मुख्यांचे मित्र असणाऱ्या मनुष्यांना, मित्र म्हणून विश्वास दाखवून, सांगावे की, राजा त्या मुख्यांवर संतप्त झाला आहे. २ ह्या अफवा पसरल्या म्हणजे तीक्ष्ण हेरांनी, रात्रीच्या बाहेर फिरण्यातील धोक्याविषयी खबरदारी घेऊन, त्या मुख्यांच्या घरी जाऊन म्हणावे, "राजाचा हुकूम आहे; चला." ३ घरा-

**तान् निर्गच्छत एवाभिहन्युः, 'स्वामिसंदेशः' इति चासन्नान् ब्रूयुः । ३ । ये चाप्रवासितास्तान् सत्त्रिणो ब्रूयुः 'एतत्तद् यदस्माभिः कथितम्, जीवितुकामेनापक्रान्तव्यम्' इति । ४ ।**

**येभ्यश्च राजा याचितो न ददाति तान् सत्त्रिणो ब्रूयुः – 'उक्तः शून्यपालो राज्ञा "अयाच्यमर्थमसौ चासौ च मा याचते, मया प्रत्याख्याताः शत्रुसंहिताः; तेषामुद्धरणे प्रयतस्व" इति'। ५ । ततः पूर्ववदाचरेत् । ६ । येभ्यश्च राजा याचितो ददाति तान् सत्त्रिणो ब्रूयुः – 'उक्तः शून्यपालो राज्ञा "अयाच्यमर्थमसौ चासौ च मा याचते, तेभ्यो मया सोऽर्थो विश्वासार्थं दत्तः, शत्रुसंहिताः, तेषामुद्धरणे प्रयतस्व" इति'। ७ । ततः पूर्ववदाचरेत् । ८ । ये चैनं याच्यमर्थं न याचन्ते तान् सत्त्रिणो ब्रूयुः – 'उक्तः शून्यपालो राज्ञा "याच्यमर्थमसौ चासौ च मा न याचते, किमन्यत् स्वदोषशङ्कितत्वात्, तेषामुद्धरणे प्रयतस्व" इति'। ९ । ततः पूर्ववदाचरेत् । १० ।**

बाहेर पडत असतानाच त्यांना ठार करावे आणि जवळ असतील त्यांना म्हणावे, "हा राजाचाच (आम्हाला) संदेश होता." ४ ज्यांना ठार मारण्यात आले नसेल त्यांना सत्री हेरांनी म्हणावे, "आम्ही तुम्हाला सांगत होतो त्याचे हे पहा प्रत्यंतर; ज्याला आपला जीव वाचवावयाचा असेल त्याने येथून निघून जावे हे उत्तम."

५ राजाकडे काही मागितले असता त्याने ज्या अधिकाऱ्यांना ते दिले नाही त्यांना सत्री हेरांनी म्हणावे, "राजाने शून्यपालाला कळविले आहे, 'अमूक अमूक अधिकारी माझ्याकडे मागणे योग्य नसलेल्या गोष्टीची मागणी करीत आहेत; मी ती देण्याचे नाकारल्यावर त्यांनी शत्रूशी संगनमत केले आहे; त्यांचा काटा काढून टाकण्याचा प्रयत्न कर.'" ६ नंतर पूर्वीप्रमाणेच (वर २–४ मध्ये सांगितल्याप्रमाणे) करावे. ७ आणि ज्यांना मागितलेली वस्तू राजाने दिली असेल त्यांना सत्री हेरांनी म्हणावे, "राजाने शून्यपालाला कळविले आहे, 'अमुक अमुक अधिकाऱ्यांनी मागणे योग्य नसलेल्या गोष्टीची माझ्याकडे मागणी केली; विश्वास उत्पन्न करण्यासाठी मी त्यांना ती दिली आहे; त्यांचे शत्रूशी संगनमत आहे; त्यांचा काटा काढून टाकण्याचा प्रयत्न कर.'" ८ नंतर पूर्वीप्रमाणेच करावे. ९ आणि जे मागणे योग्य असलेलाही पदार्थ राजाकडे मागत नाहीत त्यांना सत्री हेरांनी म्हणावे, "राजाने शून्यपालाला कळविले आहे, 'अमुक अमुक अधिकारी मागणे योग्य असलेल्या गोष्टीची माझ्याकडे मागणी करीत नाहीत. दुसरे काय कारण असणार? स्वतःच्या (राजद्रोहाच्या) अपराधामुळे ते भयभीत झाले असणार. त्यांचा काटा काढून टाकण्याचा प्रयत्न कर.'" १० नंतर पूर्वीप्रमाणेच वागावे.

एतेन सर्वः कृत्यपक्षो व्याख्यातः । ११ ।

प्रत्यासन्नो वा राजानं सत्त्री ग्राहयेत् 'असौ चासौ च ते महामात्रः शत्रुपुरुषैः संभाष्यते' इति । १२ । प्रतिपन्ने दूष्यानस्य शासनहरान् दर्शयेत् 'एतत्तत्' इति । १३ ।

सेनामुख्यप्रकृतिपुरुषान् वा भूम्या हिरण्येन वा लोभयित्वा स्वेषु विक्रमयेदप-वाहयेद्वा । १४ ।

योऽस्य पुत्रः समीपे दुर्गे वा प्रतिवसति तं सत्त्रिणोपजापयेत् 'आत्मसंपन्न-तरस्त्वं पुत्रः, तथाप्यन्तर्हितः, तत्किमुपेक्षसे विक्रम्य गृहाण, पुरा त्वा युवराजो विनाशयति' इति । १५ ।

तत्कुलीनमपरुद्धं वा हिरण्येन प्रतिलोभ्य ब्रूयात् 'अन्तर्बलं प्रत्यन्तस्कन्धमन्तं वाऽस्य प्रमृद्नीहि' इति । १६ । आटविकानर्थमानाभ्यामुपगृह्य राज्यमस्य घातयेत् । १७ ।

११ फितूर होणे संभाव्य असलेल्या सर्व लोकांच्या बाबतीत हेच उपाय योजावेत.

१२ किंवा राजाच्या सन्निध वावरणाऱ्या सत्री हेराने राजाला असे समजावून द्यावे की, "तुझ्या अमुक अमुक मोठ्या अधिकाऱ्यावरोबर शत्रूची माणसे बोलणी करीत आहेत." १३ त्यावर विश्वास बसला की (दुर्बल राजाकडून त्या अधिकाऱ्यासाठी) पत्र घेऊन येणारे दूष्य त्याला दाखवावेत आणि म्हणावे, "हे पहा मी काय सांगत होतो त्याचे प्रत्यंतर."

१४ किंवा सेनेतील अधिकाऱ्यांपैकी जे मुख्य मुख्य असतील त्यांना भूमीची अथवा द्रव्याची लालूच दाखवून आपल्याच लोकांविरुद्ध लढावयास प्रवृत्त करावे किंवा त्यांना आपल्या राज्यात घेऊन जावे.

१५ किंवा त्या (बलवत्तर) राजाचा जो पुत्र जवळच्या प्रदेशात अथवा दुर्गात रहात.असेल त्याला सत्री हेरामार्फत गुप्तपणे सूचित करावे, "तू (युव-राजापेक्षा) आत्मगुणांनी अधिक संपन्न असा पुत्र आहेस, तथापि तुला बाजूला सारण्यात आले आहे; तर तू गप्प का राहिला आहेस? लढ आणि राज्य काबीज कर, नाहीतर युवराज लवकरच तुला खतम करील."

१६ त्याच्या कुलातील गादीवर हक्क सांगणाऱ्याला अथवा मर्जीतून उतरलेल्या राजपुत्राला द्रव्याची लालूच दाखवून म्हणावे, "राज्यात ठेवलेले सैन्य अथवा सरहद्दीवरील सैन्य अथवा सरहद्दीवरील किल्ला यांचा विध्वंस करून टाक." १७ रानटी टोळ्यांना द्रव्य व सैन्य यांचे साहाय्य देऊन त्याच्या राज्याचा नाश करावयास लावावे.

पार्ष्णिग्राहं वाऽस्य ब्रूयात् 'एष खलु राजा मामुच्छिद्य त्वामुच्छेत्स्यति, पार्ष्णिमस्य गृहाण, त्वयि निवृत्तस्याहं पार्ष्णि ग्रहीष्यामि' इति । १८ । मित्राणि वाऽस्य ब्रूयात् 'अहं वः सेतुः, मयि विभिन्ने सर्वानेष वो राजा प्लावयिष्यति, संभूय वाऽस्य यात्रां विहनाम' इति । १९ । तत्संहतानामसंहतानां च प्रेषयेत् 'एष खलु राजा मामुत्पाटद्य भवत्सु कर्म करिष्यति, बुध्यध्वम्, अहं वः श्रेयानभ्युपपत्तुम्' इति । २० ।

मध्यमस्य प्रहिणुयादुदासीनस्य वा पुनः ।
यथासन्नस्य मोक्षार्थं सर्वस्वेन तदर्पणम् ।। २१ ।।

इत्याबलीयसे द्वादशेऽधिकरणे सेनामुख्यवधः (द्वितीयो भागः) मण्डलप्रोत्साहनं च तृतीयोऽध्यायः । आदितः अष्टात्रिंशच्छततमः ।

४

## [ षट्षष्टिशततमं प्रकरणम् – शस्त्राग्निरसप्रणिधयः; सप्तषष्टिशततमं प्रकरणम् – वीवधासारप्रसारवधः ]

ये चास्य दुर्गेषु वैदेहकव्यञ्जनाः ग्रामेषु गृहपतिकव्यञ्जनाः, जनपदसंधिषु

१८ किंवा पिछाडीवरील त्याच्या शत्रूला निरोप पाठवावा, "हा राजा माझा उच्छेद केल्यावर तुझा उच्छेद करणार आहे; तेव्हा तू ह्याच्या पिछाडीवर हल्ला कर. त्याने जर उलटून तुझ्यावर हल्ला केला तर मी त्याच्या पिछाडीवर हल्ला करीन." १९ किंवा त्याच्या मित्रांना निरोप पाठवावा, "मी तुम्हाला तारणारा बांध आहे. मी मोडून पडलो तर तुम्हा सर्वांना हा राजा बुडवून टाकील. आपण एकजूट करून त्याच्या ह्या मोहिमेस प्रतिबंध करू या." २० किंवा त्याच्याशी एकजूट केलेल्या व एकजूट न केलेल्या राजांना पत्र पाठवावे, "मला उखडून टाकल्यावर हा राजा तुमच्याविरुद्ध कारवाई करणार आहे. सावध व्हा. माझ्या मदतीला येणे हेच तुम्हाला श्रेयस्कर आहे."

२१ संकटापासून स्वतःची सुटका करून घेण्यासाठी (दुर्बल राजाने), जो जसा जवळ असेल त्याप्रमाणे मध्यम राजाकडे अथवा उदासीन राजाकडे, आपले सर्वस्व त्याला अर्पण करण्याचे ठरवून, दूत पाठवावा.

## चौथा अध्याय

## प्रकरण १६६ : शस्त्र, अग्नी व विष यांचा गुप्त प्रयोग; प्रकरण १६७ : रसद, कुमक व खाद्यान्वेषण करणाऱ्या तुकड्या यांचा नाश

१ आणि त्याच्या दुर्गामध्ये जे व्यापारी वेषातील हेर असतील, त्याच्या गावांमध्ये गृहस्थ वेषातील हेर असतील आणि त्याच्या जनपदाच्या सरहद्दीच्या

गोरक्षकतापसव्यञ्जनाः, ते सामन्ताटविकतत्कुलीनापरुद्धानां पण्यागारपूर्वं प्रेषयेयुः 'अयं देशो हार्यः' इति । १ । आगतांश्चैषां दुर्गे गूढपुरुषानर्थमानाभ्यामभिसत्कृत्य प्रकृतिच्छिद्राणि प्रदर्शयेयुः । २ । तेषु तैः सह प्रहरेयुः । ३ ।

स्कन्धावारे वाऽस्य शौण्डिकव्यञ्जनः पुत्रमभित्यक्तं स्थापयित्वाऽवस्कन्दकाले रसेन प्रवासयित्वा 'नैषेचनिकम्' इति मदनरसयुक्तान् मद्यकुम्भाञ्छतशः प्रयच्छेत् । ४ । शुद्धं वा मद्यं पाद्यं वा मद्यं दद्यादेकमहः, उत्तरं रससिद्धं प्रयच्छेत् । ५ । शुद्धं वा मद्यं दण्डमुख्येभ्यः प्रदाय मदकाले रससिद्धं प्रयच्छेत् । ६ ।

दण्डमुख्यव्यञ्जनो वा पुत्रमभित्यक्तमिति समानम् । ७ ।

पाक्वमांसिकौदनिकशौण्डिकापूपिकव्यञ्जना वा पण्यविशेषमवघोषयित्वा परस्परसंघर्षेण कालिकं समर्घतरमिति वा परानाहूय रसेन स्वपण्यान्यपचारयेयुः । ८ ।

ठिकाणी गोपालक व तापस यांच्या वेषातील हेर असतील त्यांनी शेजारचा राजा, रानटी टोळयांचा प्रमुख, गादीवर हक्क सांगणारा त्याच्या कुलातील कोणी किंवा मर्जीतून उतरलेला राजपुत्र यांना अगोदर नजराणा पाठवून निरोप धाडावा, "हा देश सहज घेता येण्यासारखा आहे." २ आणि त्यांचे गूढ पुरूष दुर्गात आले की त्यांचा धन व मानसन्मान यांनी सत्कार करून त्यांना प्रकृतींची मर्मस्थाने दाखवावीत. ३ त्यांच्यासह त्या मर्मस्थानांवर प्रहार करावा.

४ किंवा दारूचा विक्रय करणाऱ्या हेराने त्याच्या छावणीत वधाची शिक्षा झालेल्या गुन्हेगाराला आपला पुत्र म्हणून प्रस्थापित करून हल्ल्याच्या वेळेस त्याला विषप्रयोगाने मारून मृताच्या उत्तरक्रियेसाठी म्हणून बेहोष करणाऱ्या द्रव्याने युक्त शेकडो मद्यकुंभ द्यावेत. ५ एक दिवस शुद्ध मद्य किंवा पाव भाग मिश्रण असलेले मद्य द्यावे, नंतर विषयुक्त मद्य द्यावे. ६ किंवा सैन्यातील मुख्य अधिकाऱ्यांना शुद्ध मद्य देऊन त्यांच्यावर अंमल चढला म्हणजे विषयुक्त मद्य द्यावे.

७ शत्रुसैन्यात अधिकारी म्हणून असलेल्या हेराने वधाची शिक्षा झालेल्याला पुत्र म्हणून – इत्यादी सर्व वरीलप्रमाणेच.

८ किंवा शिजविलेले मांस विकणारे, शिजविलेला भात विकणारे, दारू विकणारे, चपात्या विकणारे यांच्या वेषातील हेरांनी माल उत्कृष्ट असल्याची घोषणा करीत, एकमेकांशी चढाओढ करून, "हे उधार देतो, हे अधिक स्वस्त आहे," असे म्हणून शत्रुसैनिकांना आकर्षित करावे आणि विषमिश्रित करून विकावे.

सुराक्षीरदधिसर्पिस्तैलानि वा तद्व्यवहर्तृहस्तेषु गृहीत्वा स्त्रियो बालाश्च रसयुक्तेषु स्वभाजनेषु परिकिरेयुः । ९ । 'अनेनार्घेण, विशिष्टं वा भूयो दीयताम्' इति तत्रैवावाकिरेयुः । १० । एतान्येव वैवेहकव्यञ्जनाः, पण्यविक्रयेणाहर्तारो वा । ११ ।

हस्त्यश्वानां विधायवसेषु रसमासन्ना दद्युः । १२ । कर्मकरव्यञ्जना वा रसाक्तं यवसमुदकं वा विक्रीणीरन् । १३ ।

चिरसंसृष्टा वा गोवाणिजका गवामजावीनां वा यूथान्यवस्कन्दकालेषु परेषां मोहस्थानेषु प्रमुञ्चेयुः, अश्वखरोष्ट्रमहिषादीनां दुष्टांश्च । १४ । तद्व्यञ्जना वा चुच्छुन्दरीशोणिताक्ताक्षान् । १५ । लुब्धकव्यञ्जना वा व्यालमृगान् पञ्जरेभ्यः प्रमुञ्चेयुः, सर्पग्राहा वा सर्पानुग्रविषान्, हस्तिजीविनो वा हस्तिनः । १६ । अग्निजीविनो वाऽग्निमवसृजेयुः । १७ ।

गूढपुरुषा वा विमुखान् पत्त्यश्वरथद्विपमुख्यानभिहन्युः, आदीपयेयुर्वा मुख्यावासान् । १८ । दूष्यामित्राटविकव्यञ्जनाः प्रणिहिताः पृष्ठाभिघातमवस्कन्द-

९ स्त्रिया व मुले यांनी मद्य, दूध, दही, तूप किंवा तेल ते विकणाऱ्यांकडून विकत घेऊन स्वतःच्या विषयुक्त भांड्यांत ओतून घ्यावे. १० "आम्हाला ह्या (कमी) किमतीला द्या," किंवा "ह्याच्यापेक्षा चांगले दुसरे द्या," असे म्हणून ते परत दुकानदाराच्या भांड्यात ओतून द्यावे. ११ त्याच वस्तू व्यापारीवेषातील हेरांनी अथवा माल विकण्यासाठी आणणाऱ्यांनी विकाव्या.

१२ हत्ती व घोडे यांच्या आसपास वावरणाऱ्या हेरांनी त्यांच्या शिध्यात, गवतात वगैरे विष कालवावे. १३ किंवा कामगारांच्या वेषातील हेरांनी विषाने माखलेले गवत किंवा पाणी विकावे.

१४ पुष्कळ काळपर्यंत छावणीत व्यवहार करणाऱ्या गाईबैलांची खरेदी-विक्री करणाऱ्या हेरांनी हल्ला होण्याच्या वेळेस गाईंचे किंवा शेळ्यामेंढ्यांचे कळप शत्रुसैनिकांचा गोंधळ उडेल अशा ठिकाणी सोडून द्यावेत, तसेच दुष्ट झालेले घोडे, गाढव, उंट, म्हशी इत्यादींचेही कळप सोडून द्यावेत. १५ किंवा त्याच वेषातील हेरांनी चिचुंद्रीचे रक्त डोळ्यांना माखले आहे अशी जनावरे सोडून द्यावीत. १६ किंवा फासेपारध्यांच्या वेषातील हेरांनी हिंस्र पशूंना पिंजऱ्यांतून मोकळे सोडावे, किंवा साप पकडणाऱ्यांनी अत्यंत विषारी साप सोडून द्यावेत, किंवा हत्तींचे माहूत वगैरेंनी हत्ती सोडून द्यावेत. १७ किंवा आपल्या व्यवसायात अग्नी वापरणाऱ्यांनी आग लावून द्यावी.

१८ किंवा पदाती, घोडे, रथ व हत्ती या विभागांवरील मुख्य अधिकारी युद्धाकडे पाठ फिरवून माघार घेत असता गूढ पुरुषांनी त्यांना ठार करावे किंवा त्या मुख्यांच्या डेऱ्यांना आगी लावून द्याव्यात. १९ (दुर्बल राजाचे) दूष्य

प्रतिग्रहं वा कुर्युः । १९ । वनगूढा वा प्रत्यन्तस्कन्धमुपनिष्कृष्याभिहन्युः, एकायने वीवधासारप्रसारान् वा । २० । ससंकेतं वा रात्रियुद्धे भूरितूर्यमाहत्य ब्रूयुः 'अनुप्रविष्टाः स्मो, लब्धं राज्यम्' इति । २१ ।

राजावासमनुप्रविष्टा वा संकुलेषु राजानं हन्युः । २२ । सर्वतो वा प्रयातमेनं म्लेच्छाटविकदण्डचारिणः सत्त्रापाश्रयाः स्तम्भवाटापाश्रया वा हन्युः । २३ । लुब्धकव्यञ्जना वाऽवस्कन्दसंकुलेषु गूढयुद्धहेतुभिरभिहन्युः । २४ । एकायने वा शैलस्तम्भवाटखञ्जनान्तरुदके वा स्वभूमिबलेनाभिहन्युः । २५ । नदीसरस्तटाकसेतुबन्धभेदवेगेन वा प्लावयेयुः । २६ । धान्वनवनदुर्गनिम्नदुर्गस्थं वा योगाग्निधूमाभ्यां नाशयेयुः । २७ । संकटगतमग्निना, धान्वनगतं धूमेन, निधानगतं रसेन, तोयावगाढं ,दुष्टग्राहैरुदकचरणैर्वा तीक्ष्णाः साधयेयुः, आदीप्तावासान्निष्पतन्तं वा । २८ ।

सैन्य, शत्रुसैन्य, रानटी सैन्य असा बहाणा करणाऱ्या सैन्याने शत्रूच्या सैन्यात राहून त्याची पिछाडी उध्वस्त करावी किंवा युद्धाच्या वेळेस (दुर्बल राजाला) साहाय्य करावे. २० किंवा अरण्यात दडून बसलेल्या सैनिकांनी सरहद्दीवरील शत्रूच्या सैन्याला पुढे यावयास लावून त्याचा नाश करावा किंवा एकच मनुष्य जाऊ शकेल अशा मार्गावर शत्रूची रसद, कुमक व खाद्यान्वेषण करणाऱ्या तुकड्या यांचा नाश करावा. २१ किंवा अगोदर ठरविलेल्या खुणेप्रमाणे रात्रीच्या युद्धाच्या वेळी सैनिकांनी (शत्रूच्या राज्यात) खूप वाद्ये वाजवून घोषित करावे, "आम्ही आत आलो आहोत. राज्य आमच्या ताब्यात आले आहे."

२२ किंवा राजाच्या निवासस्थानात प्रवेश करून सैनिकांनी गोंधळ माजून होणाऱ्या गर्दीत राजाला ठार करावे. २३ किंवा तो पळून जात असता म्लेच्छ रानटी सैनिकांनी सर्व बाजूंनी दबा धरून राहून किंवा झाडांच्या बुंध्यांच्या कुंपणाआड दडून त्याला ठार करावे. २४ किंवा फासेपारधी हेरांनी हल्ल्याच्या धामधुमीत गुप्त प्रहार करण्याची संधी साधून त्याला मारावे. २५ किंवा तो एका माणसानेच जाण्यास योग्य असलेल्या वाटेवर, पर्वतावर, कुंपणाआड, दलदलीच्या प्रदेशात किंवा पाण्यात असता, स्वतः अनुकूल भूमीवर राहून त्याच्यावर वार करावा. २६ किंवा नदी, सरोवर, तलाव यांतील बांध फोडून पाण्याच्या प्रवाहात त्याला बुडवावे. २७ किंवा तो वाळवंटातील दुर्ग, वनदुर्ग अथवा जलदुर्ग यात असल्यास विषारी धूर व अग्नी यांनी त्याचा नाश करावा. २८ तीक्ष्ण हेरांनी तो अरुंद अडचणीच्या जागी असल्यास अग्नीने, वाळवंटात असल्यास धुराने, राहत्या ठिकाणी असल्यास विषाने, पाण्यात उतरला असल्यास दुष्ट मगरींनी किंवा पाण्यात चालणाऱ्या मनुष्यांच्या द्वारा त्याला मारावे किंवा आग लागलेल्या घरातून तो बाहेर पडत असता मारावे.

योगवामनयोगाभ्यां योगेनान्यतमेन वा।
अमित्रमतिसंदध्यात्सक्तमुक्तासु भूमिषु ।। २९ ।।

इत्याबलीयसे द्वादशेऽधिकरणे शस्त्राग्निरसप्रणिधयः वीवधासारप्रसारवधश्च चतुर्थोऽध्यायः। आदित एकोनचत्वारिंशच्छततमः।

५

[ अष्टषष्टिशततमं प्रकरणम् – योगातिसंधानम्;
एकोनसप्ततिशततमं प्रकरणम् – दण्डातिसंधानम्;
सप्ततिशततमं प्रकरणम् – एकविजयः ]

दैवतेज्यायां यात्रायाममित्रस्य बहूनि पूजागमस्थानानि भक्तितः। १। तत्रास्य योगमुब्जयेत् । २ । देवतागृहप्रविष्टस्योपरि यन्त्रमोक्षणेन गूढभित्तिं शिलां वा पातयेत् । ३ । शिलाशस्त्रवर्षमुत्तमागारात्, कपाटमवपातितं वा, भित्तिप्रणिहितमेकदेशबद्धं वा परिघं मोक्षयेत् । ४ । देवतादेहध्वजप्रहरणानि वाऽस्योपरिष्टात्पातयेत् । ५ । स्थानासनगमनभूमिषु वाऽस्य गोमयप्रदेहेन गन्धोदकप्रसेकेन वा रसमतिचारयेत्, पुष्पचूर्णोपहारेण वा । ६ । गन्धप्रतिच्छन्नं वाऽस्य तीक्ष्णं

२९ (अध्याय १३.२ मधील) शहराबाहेर काढण्याच्या युक्त्यांनी व (पुढील अध्यायातील) गुप्त उपायांनी किंवा कोणत्याही एका गुप्त उपायाने वर निर्दिष्ट केलेल्या ठिकाणी अडकून पडलेल्या शत्रूचा घात करावा.

पाचवा अध्याय

प्रकरण १६८ : गुप्त उपायांनी शत्रूवर मात करणे;
प्रकरण १६९ : बळाने शत्रूवर मात करणे;
प्रकरण १७० : एकट्या राजाचे विजयसंपादन

१ एखाद्या देवतेच्या उत्सवातील जत्रेच्या वेळेस शत्रूची भक्ती असल्यास तो तेथे पूजा करण्यासाठी येण्याचे पुष्कळ प्रसंग उद्भवतात. २ त्याप्रसंगी त्याच्यावर गुप्त उपायांचा प्रयोग करावा. ३ तो देवळात शिरला म्हणजे यंत्राच्या साह्याने सुटी करून गुप्त भिंत किंवा शिळा वरून त्याच्या अंगावर पाडावी. ४ वरच्या मजल्यावरून त्याच्यावर दगडांचा व शस्त्रांचा वर्षाव करावा किंवा दरवाजाची फळी त्याच्यावर पाडावी किंवा भिंतीत ठेवलेला व अर्धवट अडकवलेला अडसर पाडावा. ५ देवतेच्या मूर्तीच्या हातातील ध्वज किंवा शस्त्रे त्याच्यावर वरून पाडावीत. ६ तो उभा रहाणार असलेल्या, बसणार असलेल्या किंवा जाणार असलेल्या जमिनीवर शेणाने सारवताना अथवा सुगंधी पाणी शिंपडताना विषाचा उपयोग करावा किंवा फुलांचे चूर्ण

धूममतिनयेत् ।७। शूलकूपमवपातनं वा शयनासनस्याधस्ताद्यन्त्रबद्धतलमेनं कीलमोक्षणेन प्रवेशयेत् ।८।

प्रत्यासन्ने वाऽमित्रे जनपदाज्जनमवरोधक्षममतिनयेत् ।९। दुर्गाच्चानवरोधक्षममपनयेत्, प्रत्यादेयमरिविषयं वा प्रेषयेत् ।१०। जनपदं चैकस्थं शैलवननदीदुर्गेष्वटवीव्यवहितेषु वा पुत्रभ्रातृपरिगृहीतं स्थापयेत् ।११। उपरोधहेतवो दण्डोपनतवृत्ते व्याख्याताः ।१२।

तृणकाष्ठमा योजनाद्दाहयेत् ।१३। उदकानि च दूषयेत्, अवस्रावयेच्च ।१४। कूपकूटावपातकण्टकिनीश्च बहिरुब्जयेत् ।१५।

सुरुङ्गाममित्रस्थाने बहुमुखीं कृत्वा निचयमुख्यानभिहारयेत्, अमित्रं वा ।१६। परप्रयुक्तायां वा सुरुङ्गायां परिखामुदकान्तिकीं खानयेत्, कूपशालामनुसालं वा ।१७। तोयकुम्भान् कांस्यभाण्डानि वा शङ्कास्थानेषु स्थापयेत् खाताभिज्ञा-

प्रसाद म्हणून देताना विषाचा उपयोग करावा. ७ किंवा सुगंधमिश्रित विषारी धूर त्याच्यावर सोडावा. ८ किंवा पलंगाच्या अथवा आसनाच्या खालील जमिनीत बसवलेल्या यंत्रातील अडसर काढून, खालच्या, सूळ असलेल्या, विहिरीत अथवा खड्डयात पाडावे.

९ अथवा शत्रू जवळ येऊन ठेपला असता जनपदातील जे लोक वेढ्यात तग धरू शकतील त्यांना किल्ल्यात घेऊन यावे. १० आणि किल्ल्यातील जे लोक वेढा सहन करू शकणार नाहीत त्यांना तेथून हलवावे किंवा सहज परत घेता येण्यासारख्या, शत्रूच्या ताब्यात असलेल्या प्रदेशात पाठवून द्यावे. ११ आणि जनपदातील लोकांना पर्वतदुर्ग, वनदुर्ग किंवा नदीदुर्ग यात किंवा अरण्याच्या पलीकडे असलेल्या प्रदेशात एके ठिकाणी जमवून आपला मुलगा अथवा भाऊ यांच्या रक्षणाखाली ठेवून द्यावे. १२ दुर्गात आश्रय घेऊन रहाण्याची कारणे दंडोपनतवृत्त प्रकरणात (सूत्र ७.१५.१२ मध्ये; वस्तुतः त्या अगोदरच्या "बलवता विगृह्योपरोधहेतवः" ह्या प्रकरणात) सांगितली आहेत.

१३ दुर्गाच्या सभोवार एक योजन अंतरापर्यंत गवत व लाकूडफाटा जाळून टाकावा. १४ आणि पाण्याचे तलाव दूषित करावेत आणि बांध फोडून पाणी वाहून जाऊ द्यावे. १५ दुर्गाच्या बाहेरच्या प्रदेशात विहिरी, गुप्त खड्डे, काटेरी तारा ठेवाव्यात.

१६ शत्रू असलेल्या ठिकाणापर्यंत बाहेर येण्यासाठी अनेक तोंडे असलेला भुयारी मार्ग करून साठे व मुख्य अधिकारी यांना पळवून आणावे किंवा शत्रूलाच पळवून आणावे. १७ किंवा शत्रूने भुयारी मार्ग केला असल्यास पाणी लागेपर्यंत खंदक खणावा किंवा तटाला लागून विहीर खणावी. १८ भुयार करीत

**नार्थम् । १८ । ज्ञाते सुरुङ्गापथे प्रतिसुरुङ्गां कारयेत् । १९ । मध्ये भित्त्वा धूममुदकं वा प्रयच्छेत् । २० ।**

**प्रतिविहितदुर्गो वा मूले दायादं कृत्वा प्रतिलोमामस्य दिशं गच्छेत्, यतो वा मित्रैर्बन्धुभिराटविकैर्वा संसृज्येत परस्यामित्रैर्दूष्यैर्वा महद्भिः, यतो वा गतोऽस्य मित्रैर्वियोगं कुर्यात् पार्ष्णिं वा गृह्णीयात् राज्यं वाऽस्य हारयेत् वीवधासारप्रसारान् वा वारयेत्, यतो वा शक्नुयादाक्षिकवदपक्षेपेणास्य प्रहर्तुम्, यतो वा स्वं राज्यं त्रायेत मूलस्योपचयं वा कुर्यात् । २१ । यतः संधिमभिप्रेतं लभेत ततो वा गच्छेत् । २२ ।**

**सहप्रस्थायिनो वाऽस्य प्रेषयेयुः 'अयं ते शत्रुरस्माकं हस्तगतः, पण्यं विप्रकारं वाऽपदिश्य हिरण्यमन्तःसारबलं च प्रेषय यस्यैनमर्पयेम बद्धं प्रवासितं वा' इति । २३ । प्रतिपन्ने हिरण्यं सारबलं चाददीत । २४ ।**

असल्याचा संशय असेल अशा ठिकाणी खणण्याची माहिती मिळविण्यासाठी पाण्याने भरलेले हंडे किंवा काशाची भांडी ठेवावीत. १९ माहिती मिळाल्यावर उलट भुयार करावे. २० मध्येच शत्रूचे भुयार फोडून त्यात धूर अथवा पाणी सोडून द्यावे.

२१ किंवा दुर्गाच्या संरक्षणाची तजवीज करून आणि नातेवाइकांवर मूळ राज्य सोपवून शत्रू असेल त्याच्याविरुद्ध दिशेला जावे, किंवा जिकडे मित्र, बांधव अथवा रानटी टोळ्यांचा मुख्य यांची गाठ पडेल अथवा शत्रूचे प्रबल शत्रू किंवा बलवान राजद्रोही यांची गाठ पडेल तिकडे जावे, किंवा जिकडे गेले असता त्याच्या मित्रांना त्याच्यापासून दूर ठेवता येईल अथवा त्याच्या पिछाडीवर हल्ला करता येईल अथवा त्याचे राज्य काबीज करता येईल अथवा त्याची रसद, कुमक व दाणागोटा जमविणाऱ्या तुकड्या यांना प्रतिबंध करता येईल तिकडे जावे, किंवा जिकडून फसवणारा डाव टाकणाऱ्या जुगाऱ्याप्रमाणे त्याला फसवून त्याच्यावर प्रहार करता येईल, किंवा जिकडून स्वतःच्या राज्याचे रक्षण करता येईल अथवा मूळ राज्याची अभिवृद्धी करता येईल तिकडे जावे. २२ किंवा जिकडे अभिप्रेत असलेला तह मिळण्याचा संभव असेल तिकडे जावे.

२३ किंवा दुर्बल राजाबरोबर बाहेर पडलेल्या लोकांनी शत्रूला निरोप पाठवावा, "हा तुझा शत्रू आमच्या हाती सापडला आहे; माल विकत घेण्याचे अथवा इजा करावयाचे निमित्त सांगून तू आमच्याकडे द्रव्य व उत्कृष्ट सैनिक असलेले सैन्य पाठवून दे म्हणजे आम्ही ह्याला बांधून किंवा ठार करून त्या सैन्याच्या स्वाधीन करू." २४ तो कबूल झाला तर द्रव्य व उत्कृष्ट सैन्य आपल्या ताब्यात घ्यावे.

अन्तपालो वा दुर्गसंप्रदानेन बलैकदेशमतिनीय विश्वस्तं घातयेत् । २५ । जनपदमेकस्थं वा घातयितुममित्रानीकमावाह्येत् । २६ । तदवरुद्धदेशमतिनीय विश्वस्तं घातयेत् । २७ ।

मित्रव्यञ्जनो वा बाह्यस्य प्रेषयेत् 'क्षीणमस्मिन् दुर्गे धान्यं स्नेहाः क्षारो लवणं वा, तदमुष्मिन् देशे काले च प्रवेक्ष्यति, तदुपगृहाण' इति । २८ । ततो रसविद्धं धान्यं स्नेहं क्षारं लवणं वा दूष्यामित्राटविकाः प्रवेशयेयुः, अन्ये वाऽभित्यक्ताः । २९ । तेन सर्वभाण्डवीवधग्रहणं व्याख्यातम् । ३० ।

संधिं वा कृत्वा हिरण्यैकदेशमस्मै दद्यात्, विलम्बमानः शेषम् । ३१ । ततो रक्षाविधानान्यवस्रावयेत् । ३२ । अग्निरसशस्त्रैर्वा प्रहरेत् । ३३ । हिरण्यप्रतिग्राहिणो वाऽस्य वल्लभाननुगृह्णीयात् । ३४ ।

परिक्षीणो वाऽस्मै दुर्गं दत्त्वा निर्गच्छेत् । ३५ । सुरुङ्गया कुक्षिप्रदरेण वा प्राकारभेदेन निर्गच्छेत् । ३६ ।

२५ किंवा सरहद्दीवरील दुर्गाच्या अधिकाऱ्याने दुर्ग हवाली करून देण्याच्या मिषाने शत्रुसैन्याचा काही भाग आत आणून ते निर्धास्त असता त्यांची कत्तल करावी.

२६ किंवा एके जागी गोळा केलेल्या जनपदातील लोकांना मारण्यासाठी म्हणून शत्रूच्या सैन्याला बोलवावे. २७ त्याला संरक्षित ठिकाणी नेऊन ते निर्धास्त असता त्याची कत्तल करावी.

२८ किंवा मित्र असल्याचा बहाणा करणाऱ्या हेराने (वेढा देणाऱ्या) बाहेरच्या शत्रूला निरोप पाठवावा, "ह्या दुर्गातील धान्य, तूप-तेल, गूळ वगैरे किंवा मीठ संपले आहे; नवीन साठा अमुक ठिकाणी व अमुक वेळेला आत येणार आहे. तो तू पकड." २९ मग दूष्य सैनिक, शत्रुसैन्यातील अथवा रानटी सैन्यातील सैनिक किंवा वधाची शिक्षा झालेले गुन्हेगार यांनी विषमिश्रित धान्य, तेल-तूप, गूळ वगैरे किंवा मीठ घेऊन यावे. ३० सर्व प्रकारचे पदार्थ व रसद यांच्या बाबतीतही असेच करावे.

३१ किंवा शत्रूशी तह करून खंडणीचा काही भाग त्याला द्यावा, बाकीचा देण्यास विलंब लावावा. ३२ नंतर (शत्रूच्या राज्यातील) संरक्षणाची व्यवस्था ढिली करून टाकावी. ३३ किंवा अग्नी, विष आणि शस्त्रे ही उपयोगात आणावीत. ३४ किंवा खंडणी घेण्यासाठी आलेल्या त्याच्या आवडत्या अधिकाऱ्यांना खूष करावे.

३५ किंवा अगदीच शक्तिहीन झाला तर दुर्ग शत्रूच्या हवाली करून निघून जावे. ३६ भुयारी मार्गाने अथवा तटाच्या बाजूला खिडार पाडून त्यातून निघून जावे.

रात्रावक्स्कन्दं दत्त्वा सिद्धस्तिष्ठेत्, असिद्धः पार्श्वेनापगच्छेत् । ३७ । पाषण्डच्छद्मना मन्दपरिवारो निर्गच्छेत् । ३८ । प्रेतव्यञ्जनो वा गूढैर्निर्ह्रियेत । ३९ । स्त्रीवेषधारी वा प्रेतमनुगच्छेत् । ४० । दैवतोपहारश्राद्धप्रहवणेषु वा रसविद्धमन्नपानमवसृज्य । ४१ ।

कृतोपजापो दूष्यव्यञ्जनैर्निष्पत्य गूढसैन्योऽभिहन्यात् । ४२ ।

एवं गृहीतदुर्गो वा प्राश्यप्राशं चैत्यमुपस्थाप्य दैवतप्रतिमाच्छिद्रं प्रविश्यासीत, गूढभित्तिं वा, दैवतप्रतिमायुक्तं वा भूमिगृहम् । ४३ । विस्मृते सुरुङ्गया रात्रौ राजावासमनुप्रविश्य सुप्तममित्रं हन्यात् । ४४ । यन्त्रविश्लेषणं वा विश्लेष्याधस्तादवपातयेत् । ४५ । रसाग्नियोगेनावलिप्तं गृहं जतुगृहं वाऽधिशयानममित्रमादीपयेत् । ४६ । प्रमदवनविहाराणामन्यतमे वा विहारस्थाने प्रमत्तं भूमिगृहसुरुङ्गागूढभित्तिप्रविष्टास्तीक्ष्णा हन्युः, गूढप्रणिहिता वा रसेन । ४७ । स्वपतो वा निरुद्धे देशे गूढाः स्त्रियः सर्परसाग्निधूमानुपरि मुञ्चेयुः । ४८ ।

३७ (बाहेरील शत्रूच्या छावणीवर) रात्री हल्ला करून यशस्वी झाला तर दुर्गातच रहावे, अयशस्वी झाल्यास युक्तीने बाहेर पडावे. ३८ पाखंडी साधूच्या वेषात थोडे लोक बरोबर घेऊन बाहेर पडावे. ३९ किंवा गूढ पुरुषांनी त्याला प्रेत म्हणून वाहून न्यावे. ४० किंवा स्त्रीवेष धारण करून त्याने प्रेतयात्रेबरोबर जावे. ४१ किंवा देवतांना बली देणे, श्राद्ध, उत्सव यांसारख्या प्रसंगी विषमिश्रित अन्नपाणी ठेवून (निघून जावे).

४२ शत्रूने फितुरीचे प्रयत्न केले असता (शत्रूला) राजद्रोही म्हणून वाटणाऱ्या अधिकाऱ्यांसह बाहेर पडून गुप्त असलेल्या सैन्याने त्याच्यावर हल्ला चढवावा.

४३ किंवा याप्रमाणे त्याचा दुर्ग शत्रूने काबीज केला तर भरपूर अन्नपाणी असलेले चैत्यगृह उभारून त्यातील देवतेच्या मूर्तीच्या आतील पोकळ जागेत, गुप्त भिंतीत अथवा प्रवेशद्वाराच्या ठिकाणी देवतेची मूर्ती असलेल्या तळघरात लपून रहावे. ४४ शत्रूला आपली विस्मृती झाली म्हणजे भुयारी मार्गाने रात्री राजाच्या शयनगृहात प्रवेश करून शत्रू झोपला असता त्याला ठार करावे. ४५ किंवा यंत्राने सुटा होणारा खोलीचा एखादा भाग सुटा करून तो त्याच्यावर पाडावा. ४६ किंवा विषयुक्त, पेट घेणाऱ्या द्रव्याने लिंपलेल्या घरात अथवा लाक्षागृहात शत्रू झोपला असता त्याला आग लावून द्यावी. ४७ प्रमदवन, क्रीडागृह यांसारख्या ठिकाणी तो गैरसावध असता तळघर, भुयारी मार्ग, गुप्त भित यांतून प्रवेश करून तीक्ष्ण हेरांनी त्याला ठार मारावे किंवा तेथे नेमणूक केलेल्या गूढ पुरुषांनी त्याच्यावर विषप्रयोग करावा. ४८ किंवा सुरक्षित

**प्रत्युत्पन्ने वा कारणे यद्यदुपपद्येत तत्तदमित्रेऽन्तःपुरगते गूढसंचारः प्रयुञ्जीत । ४९ । ततो गूढमेवापगच्छेत्, स्वजनसंज्ञां च प्ररूपयेत् । ५० ।**

**द्वाःस्थान् वर्षधरांश्चान्यान्निगूढोपहितान् परे ।**
**तूर्यसंज्ञाभिराहूय द्विषच्छेषाणि घातयेत् । ५१ ।**

**इत्याबलीयसे द्वादशेऽधिकरणे योगातिसंधानं दण्डातिसंधानम् एकविजयश्च पञ्चमोऽध्यायः । आदितश्चत्वारिंशच्छततमः ।**

**एतावता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य आबलीयसम् द्वादशमधिकरणं समाप्तम् ।**

ठिकाणी तो झोपला असता गूढ स्त्रीहेरांनी त्याच्यावर साप, विषारी अग्नी किंवा धूर सोडावा.

४९ किंवा संधी आली असता जे जे उपयुक्त होण्यासारखे असेल त्या सर्वांचा आपल्या राजवाड्यात रहाणाऱ्या शत्रूवर, स्वतः गुप्त रीतीने संचार करून, प्रयोग करावा. ५० नंतर गुप्तपणेच तेथून जावे आणि आपल्या पक्षातील लोकांना खुणा निश्चित करून द्याव्यात.

५१ द्वारपाल, खोजे आणि शत्रूच्या ठिकाणी नेमलेले इतर गूढ पुरुष यांना वाद्यांच्या खुणांनी बोलावून घेऊन शिल्लक राहिलेल्या शत्रुपक्षीयांचा घात करावा.

बारावे अधिकरण समाप्त

# दुर्गलम्भोपायः -- त्रयोदशमधिकरणम्

१

## [एकसप्ततिशततमं प्रकरणम् – उपजापः]

विजिगीषुः परग्राममवाप्तुकामः सर्वज्ञदैवतसंयोगख्यापनाभ्यां स्वपक्षमुद्धर्षयेत् परपक्षं चोद्वेजयेत ।१।

सर्वज्ञख्यापनं तु – गृहगुह्यप्रवृत्तिज्ञानेन प्रत्यादेशो मुख्यानाम्, कण्टकशोधनापसर्पावगमेन प्रकाशनं राजद्विष्टकारिणाम्, विज्ञाप्योपायनख्यापनमदृष्टसंसर्गविद्यासंज्ञादिभिः, विदेशप्रवृत्तिज्ञानं तदहरेव गृहकपोतेन मुद्रासंयुक्तेन । २ ।

दैवतसंयोगख्यापनं तु – सुरुङ्गामुखेनाग्निचैत्यदैवतप्रतिमाच्छिद्रानुप्रविष्टैरग्निचैत्यदैवतव्यञ्जनैः संभाषणं पूजनं च, उदकादुत्थितैर्वा नागवरुणव्यञ्जनैः

# तेरावे अधिकरण – दुर्ग काबीज करण्याचे उपाय

## पहिला अध्याय

## प्रकरण १७१ : राजद्रोहास प्रोत्साहन

१ शत्रूची तटाच्या आत असलेली राजधानी काबीज करावयाची असल्यास विजिगीषूने आपले सर्वज्ञत्व आणि आपला देवतांशी असलेला संपर्क या गोष्टी जाहीर करून स्वतःच्या लोकांना उल्लसित करावे व शत्रूच्या लोकांना घाबरवून सोडावे.

२ सर्वज्ञत्व पुढीलप्रमाणे प्रकाशित करावे – मुख्य अधिकाऱ्यांच्या घरातील गुप्त वातमी (हेरांमार्फत) मिळवून त्यांना ती कळविणे; गुन्हेगारांचा तपास करणाऱ्या गुप्त अधिकाऱ्यांकडून कळलेली राजद्रोही लोकांची कृत्ये उघडकीस आणणे; इतरांना न दिसतील अशा संसर्गविद्येतील खुणा इत्यादींच्या साहाय्याने कोणी करणार असलेली विनंती अथवा देणार असलेला नजराणा अगोदर जाहीर करणे; मोहोरबंद पत्र आणणाऱ्या पाळीव कबुतरामुळे परदेशातील वातमी त्याच दिवशी कळणे.

३ देवतांशी संपर्क असल्याचे पुढीलप्रमाणे दाखवावे – भुयारी मार्गाने अग्निचैत्यातील देवतेच्या प्रतिमेच्या आत शिरलेल्या व तेथील देवतेचे सोंग

**संभाषणं पूजनं च, रात्रावन्तरुदके समुद्रवालुकाकोशं प्रणिधायाग्निमालादर्शनम्, शिलाशिक्यावगृहीते प्लवके स्थानम्, उदकबस्तिना जरायुणा वा शिरोऽवगूढनासः पृषतान्त्रकुलीरनक्रशिशुमारोद्रवसाभिर्वा शतपाक्यं तैलं नस्तः प्रयोगः । ३ । तेन रात्रिगणश्चरति । ४ । इत्युदकचरणानि । ५ । तैर्वरुणनागकन्यावाक्यक्रिया संभाषणं च, कोपस्थानेषु मुखादग्निधूमोत्सर्गः । ६ ।**

**तदस्य स्वविषये कार्तान्तिकनैमित्तिकमौहूर्तिकपौराणिकेक्षणिकगूढपुरुषाः साचिव्यकरास्तद्दर्शिनश्च प्रकाशयेयुः । ७ । परस्य विषये दैवतदर्शनं दिव्यकोशदण्डोत्पत्तिं चास्य ब्रूयुः । ८ । दैवतप्रश्ननिमित्तवायसाङ्गविद्यास्वप्नमृगपक्षिव्याहारेषु चास्य विजयं ब्रूयुः, विपरीतममित्रस्य । ९ । सदुन्दुभिमुल्कां च परस्य नक्षत्रे दर्शयेयुः । १० ।**

घेणाऱ्या गूढ पुरुषांशी संभाषण करणे आणि त्यांची पूजा करणे; किंवा पाण्यातून वर आलेल्या नाग व वरुण यांचे सोंग घेतलेल्या गूढ पुरुषांशी संभाषण करणे व त्यांची पूजा करणे; रात्री पाण्याच्या आत समुद्रातील वाळूचे कोश ठेवून अग्नींची माळा दाखविणे; दगड आत असलेल्या शिक्यांनी स्थिर केलेल्या नावेवर उभे रहाणे (व पाण्यावर उभे असल्याचे भासविणे); जलचर प्रांण्यांच्या बस्तीने अथवा प्राण्याच्या गर्भ-वेष्टनाने नाक खेरीज करून डोके झाकून घेऊन, नाकाला ठिपक्याठिपक्याच्या हरिणाचे आतडे अथवा खेकडा, मगर, जलकपी व पाणमांजर यांची चरबी यांत शंभर वेळा उकळलेले तेल लावावे. ४ त्या प्रकाराने रात्री (पाण्यात) हिंडणाऱ्यांचा भास उत्पन्न करता येतो. ५ हे पाण्यात संचार करणारे (देवदेवता इत्यादी). ६ त्यांच्याद्वारा वरुण व नागकन्या यांचे भाषण व (मनुष्यांशी) संभाषण करावे, क्रोधाच्या प्रसंगी मुखावाटे अग्नी व धूर सोडावा.

७ भविष्य कथन करणारे, शकुन सांगणारे, मुहूर्त पहाणारे, पौराणिक, प्रश्न पहाणारे आणि गुप्त हेर, तसेच ते अद्भुतदर्शन घडविण्यात मदत करणारे व ते पहाणारे यांनी (राजाच्या सर्वज्ञतेची व दैवतसंयोगाची) ही हकीकत त्याच्या स्वतःच्या देशात पसरवावी. ८ शत्रूच्या देशात त्यांनी विजिगीषूला देवतांचे दर्शन होत असल्याचे व दिव्य कोश व दिव्य सैन्य प्राप्त झाले असल्याचे सांगावे. ९ आणि देवतांना लावलेला कौल, विचारलेला प्रश्न, शकुन, कावळ्याचे उड्डाण, अंगविद्या, पडलेले स्वप्न, पशुपक्ष्यांचे आवाज या गोष्टींचा अर्थ सांगताना विजिगीषूचा विजय होईल, शत्रूचा पराजय असे सांगावे. १० आणि शत्रूच्या जन्मनक्षत्राच्या दिवशी उल्कापात होत असल्याचे नगारे वाजवून लोकांच्या निदर्शनास आणावे.

**परस्य मुख्यान्मित्रत्वेनोपदिशन्तो दूतव्यञ्जनाः स्वामिसत्कारं ब्रूयुः, स्वपक्षबलाधानं परपक्षप्रतिघातं च । ११ । तुल्ययोगक्षेमममात्यानामायुधीयानां च कथयेयुः । १२ । तेषु व्यसनाभ्युदयावेक्षणमपत्यपूजनं च प्रयुञ्जीत । १३ ।**

**तेन परपक्षमुत्साहयेद् यथोक्तं पुरस्तात् । १४ । भूयश्च वक्ष्यामः । १५ । साधारणगर्दभेन दक्षान्, लकुटशाखाहननाभ्यां दण्डचारिणः, कुलैडकेन चोद्विग्नान्, अशनिवर्षेण विमानितान्, विदुलेनावकेशिना वायसपिण्डेन कैतवजमेघेनेति विहताशान्, दुर्भगालंकारेण द्वेषिणेति पूजाफलान्, व्याघ्रचर्मणा मृत्युकूटेन चोपहितान्, पीलुविखादनेन करकयोष्ट्र्या गर्दभीक्षीराभिमन्थनेनेति ध्रुवापकारिण इति । १६ ।**

११ दूताच्या स्वरूपात जाणाऱ्या हेरांनी शत्रूच्या मुख्य अधिकाऱ्यांना मैत्रीच्या नात्याने बोलता बोलता धन्याला (विजिगीषूला) त्यांच्याविषयी आदर असल्याचे, आपल्या स्वतःच्या पक्षाचे बळ वाढले असल्याचे आणि शत्रुपक्षाची हानी झाली असल्याचे सांगावे. १२ आणि अमात्य व सैनिक यांचा योगक्षेम स्वतःच्या बरोबरीने होणार असल्याचे सांगावे. १३ त्यांच्या संकटाच्या प्रसंगी तसेच अभ्युदयाच्या वेळी त्यांच्याकडे लक्ष असू द्यावे आणि त्यांच्या मुलाबाळांना खूष करावे.

१४ याप्रमाणे शत्रुपक्षातील लोकांना प्रोत्साहित करावे; कसे ते आम्ही मागे (अध्याय १.१४ मध्ये) सांगितले आहे. १५ पुन्हा आणखी प्रकार सांगतो. १६ आपल्या कामात दक्ष असणाऱ्यांना साध्या गाढवाप्रमाणे तुम्ही राबता असे सांगून (प्रोत्साहित करावे); सैन्यातील अधिकाऱ्यांना फळ पाडण्यासाठी फांद्यावर मारावयाच्या काठीसारखे तुम्ही आहात (फळ तुम्हाला न मिळता राजाला मिळते) असे सांगून; जे भयभीत झाले असतील त्यांना कळपातून सुटून एकटा पडलेल्या मेंढ्यासारखे तुमचे जीवन आहे (केव्हा तुम्हाला पकडून कापतील त्याचा नेम नाही) असे सांगून; ज्यांचा अपमान झाला आहे त्यांना तुमच्यावर हा वज्राघातांचा पाऊसच पडला आहे असे सांगून; ज्यांचा आशाभंग झाला आहे त्यांना (शत्रू) फळ न देणाऱ्या वेतासारखा (त्याने दिलेली वस्तू म्हणजे) कावळ्यासाठी ठेवलेला श्राद्धातील पिंड, (शत्रू) जादूने निर्माण केलेल्या मेघासारखा (ज्याच्यापासून पावसाची आशा करता येत नाही) असे सांगून; ज्यांना सन्मानपूर्वक फळ मिळाले असेल त्यांना नावडत्या पत्नीला अलंकाराने सजविणाऱ्या, तिचा द्वेष करणाऱ्या नवऱ्यासारखा (शत्रू आहे) असे सांगून; ज्यांच्या निष्ठेची गुप्तपणे परीक्षा घेतली आहे त्यांना (शत्रू) वाघासारखा मृत्यूचा सापळा आहे असे सांगून; जे नेहमी अपकार करतात त्यांना (त्यांचे प्रयत्न) पीलुवृक्षाचे फळ खाण्यासारखे, गारांसारखे,

प्रतिपन्नानर्थमानाभ्यां योजयेत् । १७ । द्रव्यभक्तच्छिद्रेषु चैनान् द्रव्यभक्तदानैरनुगृह्णीयात् । १८ । अप्रतिगृह्णतां स्त्रीकुमारालंकारानभिहरेयुः । १९ ।

दुर्भिक्षस्तेनाटव्युपघातेषु च पौरजानपदानुत्साहयन्तः सत्रिणो ब्रूयुः 'राजानमनुग्रहं याचामहे; निरनुग्रहाः परत्र गच्छामः' इति । २० ।

तथेति प्रतिपन्नेषु द्रव्यधान्यपरिग्रहैः ।
साचिव्यं कार्यमित्येतदुपजापाद्भुतं महत् ।। २१ ।।

इति दुर्गलम्भोपाये त्रयोदशेऽधिकरणे उपजापः प्रथमोऽध्यायः । आदित एकचत्वारिंशच्छततमः ।

२

[ द्विसप्ततिशततमं प्रकरणम् – योगवामनम् ]

मुण्डो जटिलो वा पर्वतगुहावासी चतुर्वर्षशतायुर्ब्रुवाणः प्रभूतजटिलान्तेवासी नगराभ्याशे तिष्ठेत् । १ । शिष्याश्चास्य मूलफलोपगमनैरमात्यान् राजानं च

उंटिणीसारखे, गाढविणीचे दूध घुसळण्यासारखे (व्यर्थ) आहेत असे सांगून (शत्रूविरुद्ध प्रोत्साहित करावे).

१७ ते कबूल झाले .म्हणजे त्यांना द्रव्य द्यावे व त्यांचा सन्मान करावा. १८ आणि त्यांना द्रव्याची किंवा अन्नाची अडचण पडली असता द्रव्य व अन्न देऊन मदत करावी. १९ ते जर मदत स्वतः स्वीकारीत नसतील तर त्यांच्या बायकामुलांना अलंकार नेऊन द्यावेत.

२० दुष्काळ, दरोडेखोर किंवा रानटी टोळ्या यांनी गांजलेल्या शहरातील आणि जनपदातील प्रजाजनांना उत्साहित करून हेरांनी त्यांना म्हणावे, " राजाकडे आपण मदत मागू या. मदत मिळाली नाही तर आपण दुसरीकडे जाऊ."

२१ " बरे आहे " असे म्हणून ते कबूल झाले म्हणजे द्रव्य व धान्य देऊन त्यांच्या मदतीस जावे. असे हे राजद्रोह पसरविण्याचे मोठे अद्‌भुत कार्य आहे.

## दुसरा अध्याय

### प्रकरण १७२ : गूढ उपायांनी शत्रूस दुर्गाबाहेर येण्यास प्रवृत्त करणे

१ पर्वताच्या गुहेत वास करणाऱ्या मुंडन केलेल्या किंवा जटाधारी साधूने आपण चारशे वर्षे वयाचे आहोत असा दावा करून पुष्कळ जटाधारी शिष्यांसह नगराच्या जवळपास मुक्काम करावा. २ आणि त्याच्या शिष्यांनी कंदमुळे व

भगवद्दर्शनाय योजयेयुः । २ । समागतश्च राज्ञा पूर्वराजदेशाभिज्ञानानि कथयेत्, 'शते शते च वर्षाणां पूर्णेऽहमग्निं प्रविश्य पुनर्बालो भवामि, तदिह भवत्समीपे चतुर्थमग्निं प्रवेक्ष्यामि, अवश्यं मे भवान्मानयितव्यः, त्रीन् वरान् वृणीष्व' इति । ३ । प्रतिपन्नं ब्रूयात् 'सप्तरात्रमिह सपुत्रदारेण प्रेक्षाप्रहवणपूर्वं वस्तव्यम्' इति । ४ । वसन्तमवस्कन्देत । ५ ।

मुण्डो वा जटिलो वा स्थानिकव्यञ्जनः प्रभूतजटिलान्तेवासी बस्तशोणितदिग्धां वेणुशलाकां सुवर्णचूर्णेनावलिप्य वल्मीके निदध्याद् उपजिह्विकानुसरणार्थम्, स्वर्णनालिकां वा । ६ । ततः सत्त्री राज्ञः कथयेत् 'असौ सिद्धः पुष्पितं निधिं जानाति' इति । ७ । स राज्ञा पृष्टः 'तथा' इति ब्रूयात्, तच्चाभिज्ञानं दर्शयेत्, भूयो वा हिरण्यमन्तराधाय । ८ । ब्रूयाच्चैनम् 'नागरक्षितोऽयं निधिः प्रणिपातसाध्यः' इति । ९ । प्रतिपन्नं ब्रूयात् 'सप्तरात्रम्' इति समानम् । १० ।

फळे प्रसाद म्हणून अमात्य आणि राजा यांच्याकडे घेऊन जाऊन त्यांना साधूच्या भेटीचे आमंत्रण द्यावे. ३ आणि राजाचे आगमन होऊन त्याची भेट झाली म्हणजे पूर्वी होऊन गेलेल्या राजांच्या व त्यांच्या देशांच्या खाणाखुणा पटवन देऊन म्हणावे, "शंभर शंभर वर्षे पूर्ण झाली म्हणजे मी अग्नीत प्रवेश करून पुन्हा अर्भक होतो. आता या ठिकाणी तुझ्या समक्ष चौथ्यांदा मी अग्नीत प्रवेश करणार आहे. त्यासमयी मला तुझा अवश्य सन्मान केला पाहिजे. तू तीन वर मागून घे." ४ त्याने ते कबूल केले म्हणजे त्याला म्हणावे, "तू येथे बायकामुलांसह सात दिवस नाटके व उत्सव साजरा करीत राहिले पाहिजे." ५ तो तेथे रहात असताना (विजिगीषूने) त्याच्यावर हल्ला करावा.

६ किंवा भूमिगत द्रव्याचे ज्ञान असल्याचा दावा करणाऱ्या मुंडित किंवा जटाधारी साधूच्या वेषातील हेराने बोकडाच्या रक्ताने माखलेला वेळूचा तुकडा वर सोन्याचे चूर्ण लिपून वारुळात, मुंग्या तेथपर्यंत जाव्यात या उद्देशाने, ठेऊन द्यावा, किंवा सोन्याची नळी (तेथे ठेऊन द्यावी). ७ नंतर हेराने राजाला सांगावे, "त्या सिद्ध पुरुषाला पुष्प आलेल्या भूमिगत निधीचे ज्ञान आहे." ८ राजाने त्याला विचारल्यावर त्याने होय म्हणून सांगावे आणि खात्री पटविणारे ते चिन्ह (वेळूचा तुकडा अथवा सोन्याची नळी) त्याला दाखवावे, अथवा आणखी द्रव्य आत ठेऊन (त्याला दाखवावे). ९ आणि त्याला म्हणावे, "नाग ह्या निधीचे रक्षण करीत आहे, तो पूजाअर्चा आदीनेच प्राप्त होईल." १० तो कबूल झाला म्हणजे "सात दिवस" इत्यादी सांगून वरच्याप्रमाणेच करावे.

स्थानिकव्यञ्जनं वा रात्रौ तेजनाग्नियुक्तमेकान्ते तिष्ठन्तं सत्रिणः क्रमाभिनीतं राज्ञः कथयेयुः 'असौ सिद्धः सामेधिकः' इति । ११ । तं राजा यमर्थं याचेत तमस्य करिष्यमाणः 'सप्तरात्रम्' इति समानम् । १२ ।

सिद्धव्यञ्जनो वा राजानं जम्भकविद्याभिः प्रलोभयेत् । १३ । तं राजेति समानम् । १४ ।

सिद्धव्यञ्जनो वा देशदेवतामभ्यर्हितामाश्रित्य प्रहवणैरभीक्ष्णं प्रकृतिमुख्यानभिसंवास्य क्रमेण राजानमतिसंदध्यात् । १५ ।

जटिलव्यञ्जनमन्तरुदकवासिनं वा सर्वश्वेतं तटसुरुङ्गाभूमिगृहापसरणं वरुणं नागराजं वा सत्रिणः क्रमाभिनीतं राज्ञः कथयेयुः । १६ । तं राजेति समानम् । १७ ।

जनपदान्तेवासी सिद्धव्यञ्जनो वा राजानं शत्रुदर्शनाय योजयेत् । १८ । प्रतिपन्नं बिम्बं कृत्वा शत्रुमावाहयित्वा निरुद्धे देशे घातयेत् । १९ ।

११ किंवा भूमिगत निधीचे ज्ञान असणाऱ्या सिद्धाच्या वेषातील हेर रात्री अंगाला प्रज्वलित अग्नीचा भास उत्पन्न करणारे द्रव्य लावून एकांत ठिकाणी रहात असता हेरांनी त्याच्याविषयी हळूहळू विश्वास उत्पन्न करून राजाला सांगावे, " तो सिद्ध पुरुष समृद्धी देतो." १२ त्याच्याकडे ज्या गोष्टीच्या प्राप्तीची मागणी राजा करील ती प्राप्त करून देण्यासाठी त्याला " सात दिवस " इत्यादी सांगून वरच्याप्रमाणेच करावे.

१३ किंवा सिद्धाच्या वेषातील हेराने जादूच्या विद्यांनी राजाला भुलवावे. १४ त्याच्याकडे ज्या गोष्टीची मागणी राजा इत्यादी वरीलप्रमाणेच.

१५ किंवा सिद्धाच्या वेषातील हेराने त्या देशातील सर्वांना पूज्य असलेल्या देवतेच्या देवळात आसरा मिळवून वारंवार भरविलेल्या उत्सवांत मुख्य मुख्य अधिकाऱ्यांना आकर्षित करून क्रमाने राजाचा विश्वासघात करावा.

१६ किंवा जटाधारी साधूच्या वेषातील, सर्व शरीर सफेद केलेला हेर, किनाऱ्याखालच्या भुयारात अथवा तळघरात ये-जा करता येण्यासारख्या जलाशयात रहात असता इतर हेरांनी तो वरुण किंवा नागराज आहे असे राजाला, हळूहळू विश्वास उत्पन्न करून, पटवावे. १७ त्याच्याकडे ज्या गोष्टीची मागणी राजा इत्यादी वरीलप्रमाणे.

१८ किंवा जनपदाच्या सरहद्दीवर वस्ती करून राहिलेल्या सिद्ध वेषातील हेराने राजाला शत्रूच्या दर्शनास उद्युक्त करावे. १९ तो कबूल झाला म्हणजे शत्रूची (म्हणजे विजिगीषूची) प्रतिकृती करून त्याला त्यात उपस्थित होण्याचे आवाहन करावे आणि आडबाजूच्या ठिकाणी (प्रतिकृतीचे निमित्त करून) राजाला ठार करावे.

अश्वपण्योपयाता वैदेहकव्यञ्जनाः पण्योपायननिमित्तमाहूय राजानं पण्यपरीक्षायामासक्तमश्वव्यतिकीर्णं वा हन्युः, अश्वैश्च प्रहरेयुः । २० ।

नगराभ्याशे वा चैत्यमारुह्य रात्रौ तीक्ष्णाः कुम्भेषु नालीन् वा विदुलानि धमन्तः 'स्वामिनो मुख्यानां वा मांसानि भक्षयिष्यामः, पूजा नो वर्तताम्' इत्यव्यक्तं ब्रूयुः । २१ । तदेषां नैमित्तिकमौहूर्तिकव्यञ्जनाः ख्यापयेयुः । २२ । मङ्गल्ये वा ह्रदे तटाकमध्ये वा रात्रौ तेजनतैलाभ्यक्ता नागरूपिणः शक्तिमुसलान्ययोमयानि निष्पेषयन्तस्तथैव ब्रूयुः । २३ । ऋक्षचर्मकञ्चुकिनो वाऽग्निधूमोत्सर्गयुक्ता रक्षोरूपं वहन्तस्त्रिरपसव्यं नगरं कुर्वाणाः श्वसृगालवाशितान्तरेषु तथैव ब्रूयुः । २४ । चैत्यदैवतप्रतिमां वा तेजनतैलेनाभ्रपटलच्छन्नेनाग्निना वा रात्रौ प्रज्वाल्य तथैव ब्रूयुः । २५ । तदन्ये ख्यापयेयुः । २६ ।

दैवतप्रतिमानामभ्यर्हितानां वा शोणितेन प्रस्रावमतिमात्रं कुर्युः । २७ । तदन्ये देवरुधिरसंस्रावे संग्रामे पराजयं ब्रूयुः । २८ ।

२० घोड्यांचा व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्यांच्या वेषातील हेरांनी घोडे विकण्यासाठी म्हणून किंवा भेट देण्यासाठी म्हणून राजाला आमंत्रण करावे आणि घोड्यांची परीक्षा करण्यात तो गर्क असता किंवा घोड्यांमध्ये मिसळून गेला असता त्याला ठार करावे आणि (नंतर) घोड्यांकडून त्याला तुडवावे.

२१ किंवा नगराजवळील चैत्यवृक्षावर चढून तीक्ष्ण हेरांनी रात्री मातीच्या घड्यांत वेळूमधून अथवा नळ्यांतून फुंकर मारीत "राजाचे किंवा मुख्य अधिकाऱ्यांचे मांस आम्ही खाणार आहोत; आमची पूजा सुरू करा" असे अस्फुटपणे बोलावे. २२ त्यांचे ते बोलणे शकुन सांगणारे व मुहूर्त सांगणारे यांच्या वेषातील हेरांनी प्रकट करून सांगावे. २३ किंवा प्रज्वलित अग्नीचा भास उत्पन्न करणारे तेल अंगाला लावलेल्या व नागाचे रूप धारण केलेल्या हेरांनी रात्री पवित्र सरोवरात अथवा तलावामध्ये लोखंडी कांबी व मुसळे आपटीत त्याचप्रमाणे म्हणावे. २४ किंवा अस्वलाचे कातडे पांघरलेल्या, मुखावाटे अग्नी व धूर सोडणाऱ्या, राक्षसाचे रूप धारण करणाऱ्या हेरांनी शहराच्या भोवती तीनदा डावीकडे प्रदक्षिणा घालीत, कुत्रे व कोल्हे यांच्या ओरडण्याच्या मध्ये मध्ये त्याचप्रमाणे म्हणावे. २५ किंवा देवळातील देवतेच्या मूर्तीला प्रज्वलित अग्नीचा भास उत्पन्न करणाऱ्या तेलाने अथवा अभ्रकाच्या थराखाली लपविलेल्या अग्नीने प्रज्वलित करून तसेच म्हणावे. २६ इतर हेरांनी ते प्रकट करावे.

२७ किंवा सर्वांना पूज्य असलेल्या देवतांच्या मूर्तीतून खूप रक्त वाहात जाण्याची व्यवस्था करावी. २८ इतरांनी देवाच्या अंगातून रक्त आले की युद्धात पराजय होतो असे सांगावे.

संधिरात्रिषु श्मशानप्रमुखे वा चैत्यमूर्ध्वंभक्षितैर्मनुष्यैः प्ररूपयेयुः ।२९। ततो रक्षोरूपी मनुष्यकरं याचेत ।३०। यश्चात्र शूरवादिकोऽन्यतमो वा द्रष्टुमागच्छेत्तमन्ये लोहमुसलैर्हन्युः, यथा रक्षोभिर्हत इति ज्ञायेत ।३१। तदद्भुतं राज्ञस्तद्दर्शिनः सत्त्रिणश्च कथयेयुः ।३२। ततो नैमित्तिकमौहूर्तिकव्यञ्जनाः शान्तिं प्रायश्चित्तं ब्रूयुः 'अन्यथा महदकुशलं राज्ञो देशस्य च' इति ।३३। प्रतिपन्नम् 'एतेषु सप्तरात्रमेकैकमन्त्रबलिहोमं स्वयं राज्ञा कर्तव्यम्' इति ब्रूयुः ।३४। ततः समानम् ।३५।

एतान् वा योगानात्मनि दर्शयित्वा प्रतिकुर्वीत परेषामुपदेशार्थम् ।३६। ततः प्रयोजयेद्योगान् ।३७।

योगदर्शनप्रतीकारेण वा कोशाभिसंहरणं कुर्यात् ।३८।

हस्तिकामं वा नागवनपाला हस्तिना लक्षण्येन प्रलोभयेयुः ।३९। प्रतिपन्नं गहनमेकायनं वाऽतिनीय घातयेयुः, बद्ध्वा वाऽपहरेयुः ।४०। तेन मृगयाकामो व्याख्यातः ।४१।

२९ किंवा पर्वाच्या (अमावास्येच्या) रात्री स्मशानातील प्रमुख ठिकाणी असलेल्या चैत्यात उभे असताच मनुष्य खाल्ले जातात असे वर्णन करून सांगावे. ३० नंतर राक्षसाच्या रूपातील हेराने मनुष्याची बळी म्हणून मागणी करावी. ३१ आणि जो स्वतःस शूर म्हणविणारा किंवा दुसरा कोणी ते पाहण्यासाठी येईल त्याला इतरांनी लोखंडी मुसळांनी ठार करावे, ज्यामुळे राक्षसांनी त्याला मारले आहे असे लोकांना वाटेल. ३२ तो चमत्कार पाहणाऱ्या लोकांनी व हेरांनी राजाला सांगावे. ३३ मग शकुन पहाणारे व मुहूर्त पाहणारे यांच्या वेषातील हेरांनी शान्तिकर्म व प्रायश्चित्त करावयास सांगावे, "नाहीतर राजावर व देशावर मोठी आपत्ती येईल." ३४ ते करावयास तो तयार झाला म्हणजे "ह्या विधींमध्ये सात दिवस स्वतः राजाने एक एक मंत्राने होम करून बळी दिला पाहिजे" असे सांगावे. ३५ नंतरचे वरच्याप्रमाणेच.

३६ किंवा ह्या युक्त्यांचा स्वतःवर प्रयोग करून घेऊन त्यांचे (शांतिकर्माने वगैरे) यशस्वी रीतीने निवारण केल्याचे दाखवावे – शत्रूंची खात्री पटविण्यासाठी. ३७ नंतर शत्रूवर त्या युक्त्यांचा प्रयोग करावा.

३८ किंवा गुप्त दैवी चमत्कारांच्या निवारणाने कोशसंचय करावा.

३९ किंवा हत्ती पकडण्याची इच्छा करणाऱ्या राजाला हस्तिवनातील रक्षकांनी उत्तम लक्षणांनी युक्त अशा हत्तीचे प्रलोभन दाखवावे. ४० तो तयार झाला म्हणजे त्याला दाट जंगलात किंवा एकच माणूस जाईल अशा वाटेवर नेऊन ठार करावे किंवा बंदिवान करून न्यावे. ४१ मृगयेची हौस असलेल्या राजाच्या बाबतीतही असेच करावे.

द्रव्यस्त्रीलोलुपमाढ्यविधवाभिर्वा परमरूपयौवनाभिः स्त्रीभिर्दायनिक्षेपार्थमुपनीताभिः सत्त्रिणः प्रलोभयेयुः । ४२ । प्रतिपन्नं रात्रौ सत्त्रच्छन्नाः समागमे शस्त्ररसाभ्यां घातयेयुः । ४३ ।

सिद्धप्रव्रजितचैत्यस्तूपदैवतप्रतिमानामभीक्ष्णाभिगमनेषु वा भूमिगृहसुरुङ्गागूढभित्तिप्रविष्टास्तीक्ष्णाः परमभिहन्युः । ४४ ।

येषु देशेषु याः प्रेक्षाः प्रेक्षते पार्थिवः स्वयम् ।
यात्राविहारे रमते यत्र क्रीडति वाऽम्भसि ।। ४५ ।।
धिगुक्त्यादिषु सर्वेषु यज्ञप्रहवणेषु वा ।
सूतिकाप्रेतरोगेषु प्रीतिशोकभयेषु वा ।। ४६ ।।
प्रमादं याति यस्मिन् वा विश्वासात्स्वजनोत्सवे ।
यत्रास्यारक्षिसंचारो दुर्दिने संकुलेषु वा ।। ४७ ।।
विप्रस्थाने प्रदीप्ते वा प्रविष्टे निर्जनेऽपि वा ।
वस्त्राभरणमाल्यानां फेलाभिः शयनासनैः ।। ४८ ।।
मद्यभोजनफेलाभिस्तूर्यैर्वाऽभिगताः सह ।
प्रहरेयुर्रिं तीक्ष्णाः पूर्वप्रणिहितैः सह ।। ४९ ।।

४२ द्रव्यलोभी किंवा स्त्रीलंपट शत्रुराजाला हेरांनी त्याच्याकडे वारसासंबंधी अथवा ठेवीसंबंधी तक्रार करण्यासाठी नेलेल्या श्रीमंत विधवांचे अथवा अतिशय सुंदर व तरुण स्त्रियांचे प्रलोभन दाखवावे. ४३ तो मोहित झाला म्हणजे समागमाच्या प्रसंगी लपून बसलेल्या हेरांनी त्याचा शस्त्र किंवा विष यांनी घात करावा.

४४ किंवा सिद्ध पुरुष, संन्यासी, चैत्य किंवा स्तूप यांतील देवतेची मूर्ती यांच्या भेटीस शत्रू वारंवार जात असल्यास तळघर, भुयारी मार्ग किंवा गुप्त भिंत यांत दडून बसलेल्या तीक्ष्ण हेरांनी शत्रूला ठार करावे.

४५–५० ज्या ठिकाणी राजा स्वतः दृश्य नाटय पहात बसला असेल किंवा उत्सवाच्या अथवा सहलीच्या प्रसंगी मौज करीत असेल किंवा जलक्रीडा करीत असेल (त्या ठिकाणी), तो दुसऱ्यांचा धिक्कार करीत असेल अशा सर्व प्रसंगी, किंवा यज्ञाच्या अथवा वनविहाराच्या प्रसंगी, प्रसूती, मृत्यू अथवा व्याधी या प्रसंगी, प्रेमाच्या, शोकाच्या व भीतीच्या प्रसंगी, किंवा त्याच्या स्वतःच्या नातेवाइकांच्या समारंभात तो गाफील असेल त्या समयी, जेथे तो शरीररक्षकाशिवाय फिरत असेल त्या ठिकाणी, पाऊस पडत असता अथवा मनुष्यांची गर्दी जमली असता, तो वाट चुकला असता किंवा कोठे आग लागली असता अथवा मनुष्य नसलेल्या ठिकाणी तो गेला असता, वस्त्रे, अलंकार, फुले यांचे पेटारे, बिछाने, आसने, मद्याची व अन्नाची भांडी किंवा वाद्ये ही घेऊन येणाऱ्या

यथैव प्रविशेयुश्च द्विषतः सत्त्रहेतुभिः ।
तथैव चापगच्छेयुरित्युक्तं योगवामनम् ।। ५० ।।

इति दुर्गलम्भोपाये त्रयोदशेऽधिकरणे योगवामनम् द्वितीयोऽध्यायः ।
आदितो द्विचत्वारिंशच्छततमः ।

३

## [ त्रिसप्ततिशततमं प्रकरणम् – अपसर्पप्रणिधिः ]

**श्रेणीमुख्यमाप्तं निष्पातयेत् । १ । स परमाश्रित्य पक्षापदेशेन स्वविषयात्साचिव्यकरसहायोपादानं कुर्वीत । २ । कृतापसर्पोपचयो वा परमनुमान्य स्वामिनो दूष्यग्रामं वीतहस्त्यश्वं दूष्यामात्यं दण्डमाक्रन्दं वा हत्वा परस्य प्रेषयेत् । ३ । जनपदैकदेशं श्रेणीमटवीं वा सहायोपादानार्थं संश्रयेत । ४ । विश्वासमुपगतः स्वामिनः प्रेषयेत् । ५ । ततः स्वामी हस्तिबन्धनमटवीघातं वाऽपदिश्य गूढमेव प्रहरेत् । ६ । एतेनामात्याटविका व्याख्याताः । ७ ।**

तीक्ष्ण हेरांनी तेथे अगोदरच नेमून ठेवलेल्या हेरांसह शत्रूवर शस्त्र चालवावे. आणि ज्याप्रमाणे त्यांनी शत्रूवर गुप्तपणे हल्ला करण्याच्या (वर सांगितलेल्या) प्रसंगी ते आत आले असतील त्याप्रमाणेच (पेटारे, बिछाने वगैरे घेऊन) त्यांनी निघून जावे. याप्रमाणे शत्रूला युक्तीने नगराबाहेर काढण्याविषयी सांगितले.

## तिसरा अध्याय

### प्रकरण १७३ : गुप्त हेरांची योजना

१ विश्वासपात्र अशा एखाद्या श्रेणीबलावरील मुख्याला आपल्याला सोडून (शत्रूला मिळण्यासाठी म्हणून) जाण्यास सांगावे. २ त्याने शत्रूच्या आश्रयास राहून आपला पक्ष वाढविण्याचे निमित्त करून आपल्या देशातून मदत करण्यासाठी सहाय्यक गोळा करावेत. ३ याप्रमाणे गूढ पुरुष गोळा केल्यानंतर शत्रूची परवानगी घेऊन आपल्या राजाचे राजद्रोही गाव, ज्यात हत्ती व घोडे नाहीत व ज्यातील अधिकारी दूष्य आहेत असे त्याचे सैन्य अथवा त्याच्या मित्राचे तसले सैन्य यांचा नाश करून शत्रूला कळवावे. ४ (शत्रूच्या) जनपदाच्या एका प्रदेशात, श्रेणीबलात अथवा अटवीबलात, मदत मिळविण्याच्या उद्देशाने आश्रय घ्यावा. ५ त्याच्याविषयी (शत्रूला) विश्वास वाटू लागला म्हणजे त्याने आपल्या राजाला निरोप पाठवावा. ६ नंतर राजाने हत्ती पकडण्याच्या मिषाने अथवा रानटी टोळ्यांचा नाश करण्याच्या मिषाने गुप्तपणेच (शत्रूच्या त्या जनपदावर वगैरे) हल्ला करावा. ७ असाच उपयोग अमात्य व रानटी टोळीचा नायक यांचाही करून घ्यावा.

**शत्रुणा मैत्रीं कृत्वाऽमात्यानवक्षिपेत् । ८ । ते तच्छत्रोः प्रेषयेयुः 'भर्तारं नः प्रसादय ' इति । ९ । स यं दूतं प्रेषयेत्, तमुपालभेत 'भर्ता ते माममात्यैर्भेदयति, न च पुनरिहागन्तव्यम्' इति । १० । अथैकममात्यं निष्पातयेत् । ११ । स परमाश्रित्य योगापसर्पापरक्तदूष्यानशक्तिमतः स्तेनाटविकानुभयोपघातकान् वा परस्योपहरेत् । १२ । आप्तभावोपगतः प्रवीरपुरुषोपघातमस्योपहरेद् अन्तपालमाटविकं दण्डचारिणं वा 'दृढमसौ चासौ च ते शत्रुणा संधत्ते' इति । १३ । अथ पश्चादभित्यक्तशासनैरेनान् घातयेत् । १४ ।**

**दण्डबलव्यवहारेण वा शत्रुमुद्योज्य घातयेत् । १५ ।**

**कृत्यपक्षोपग्रहेण वा परस्यामित्रं राजानमात्मन्यपकारयित्वाऽभियुञ्जीत । १६ । ततः परस्य प्रेषयेत् 'असौ ते वैरी ममापकरोति, तमेहि संभूय हनिष्यावः, भूमौ हिरण्ये वा ते परिग्रहः' इति । १७ । प्रतिपन्नमभिसत्कृत्यागतमवस्कन्देन**

८ शत्रूशी मैत्री करून काही अमात्यांना काढून टाकावे. ९ त्यांनी शत्रूला निरोप पाठवावा, "आमचा धनी आमच्यावर पुन्हा प्रसन्न होईल असे करावे." १० तो जो दूत पाठवील त्याची (विजिगीषूने) निर्भर्त्सना करावी "तुझा धनी माझे अमात्य व मी यांत वितुष्ट आणू पहात आहे. पुन्हा येथे येता कामा नये." ११ नंतर त्यांपैकी एका अमात्यास शत्रूला जाऊन मिळावयास सांगावे. १२ त्याने शत्रूकडे आश्रय मिळवून (आपल्या राज्यातील) राजद्रोही झालेले गुप्त हेर, राजाबद्दल प्रेम नसलेले व राजद्रोही माणसे – बलवान नसतील असे, किंवा उभय देशांना संत्रस्त करणारे दरोडेखोर व रानटी टोळ्यांचे नायक ह्यांना शत्रूच्या निदर्शनास आणावे. १३ त्याचा विश्वास संपादन केल्यावर त्याच्या मोठमोठ्या अधिकाऱ्यांचे – अंतपाल, अटवीमुख्य अथवा सेनापती यांचे – दुष्कृत्य त्याच्या निदर्शनास आणावे, "अमुक अमुक खात्रीने तुझ्या शत्रूशी संधान बांधीत आहे." १४ नंतर वध्य पुरुषांच्या हाती सापडलेल्या पत्रांच्या साहाय्याने त्यांचा घात करवावा.

१५ किंवा सैन्याच्या बळाचा उपयोग करण्यास शत्रूला प्रोत्साहित करून त्याचा घात करावा.

१६ किंवा फितूर होण्यासारख्या लोकांना आपल्या बाजूला घेऊन त्यामुळे शत्रूचा शत्रू असलेल्या राजाला आपल्याला इजा करावयास लावून त्याच्यावर स्वारी करावी. १७ नंतर आपल्या शत्रूला निरोप पाठवावा, "हा तुझा शत्रू मला उपद्रव देत आहे. तू ये, आपण दोघे मिळून त्याचा निकाल लावू. त्याच्या भूमीत किंवा संपत्तीत तुझा हिस्सा राहील." १८ तो कबूल झाल्यावर त्याचा

**प्रकाशयुद्धेन वा शत्रुणा घातयेत् । १८ । अभिविश्वासनार्थं भूमिदानपुत्राभिषेकरक्षापदेशेन वा ग्राहयेत् । १९ । अविषह्यमुपांशुदण्डेन वा घातयेत् । २० । स चेद्दण्डं दद्यान्न स्वयमागच्छेत्तमस्य वैरिणा घातयेत् । २१ । दण्डेन वा प्रयातुमिच्छेन्न विजिगीषुणा तथाप्येनमुभयतः संपीडनेन घातयेत् । २२ । अविश्वस्तो वा प्रत्येकशो यातुमिच्छेद्राज्यैकदेशं वा यातव्यस्यादातुकामः, तथाऽप्येनं वैरिणा सर्वसंदोहेन वा घातयेत् । २३ । वैरिणा वा सक्तस्य दण्डोपनयेन मूलमन्यतो हारयेत् । २४ ।**

**शत्रुभूम्या वा मित्रं पणेत, मित्रभूम्या वा शत्रुम् । २५ । ततः शत्रुभूमिलिप्सायां मित्रेणात्मन्यपकारयित्वाऽभियुञ्जीत – इति समानाः पूर्वेण सर्व एव योगाः । २६ । शत्रुं वा मित्रभूमिलिप्सायां प्रतिपन्नं दण्डेनानुगृह्णीयात् । २७ । ततो मित्रगतमतिसंदध्यात् । २८ ।**

मानसन्मान करावा आणि तो (सैन्यासह) आला म्हणजे शत्रूकडून त्याच्यावर अचानक हल्ला करवून अथवा उघड युद्धात ठार करावयास लावावे. १९ (ठार न होता त्यानेच शत्रूचा पराभव केला तर) त्याच्यात विश्वास उत्पन्न करण्यासाठी भूमी देण्याचे, त्याच्या पुत्राला अभिषेक करण्याचे अथवा रक्षण देण्याचे निमित्त करून त्याला पकडावे. २० तो सापडण्यासारखा नसल्यास त्याचा गुप्त रीतीने वध करावा. २१ त्याने जर (मिळून करावयाच्या स्वारीसाठी) स्वतः न येता सैन्य पाठविले तर त्या सैन्याचा शत्रूकडून नाश करवावा. २२ विजिगीषूबरोबर न जाता त्याच्या सैन्याबरोबरच तो जाऊ इच्छीत असेल तरी (आपले सैन्य व शत्रूच्या शत्रूचे सैन्य ह्या) दोहोंच्या मध्ये त्याला पकडून त्याचा घात करावा. २३ किंवा (विजिगीषूवर) विश्वास नसल्यामुळे तो स्वतंत्रपणे जाऊ इच्छित असेल किंवा ज्याच्यावर स्वारी करावयाची त्याच्या राज्याचा काही भाग बळकावू पहात असेल तरीही त्याचा (त्याच्या) शत्रूकरवी घात करावा अथवा (स्वतः) सर्व सैन्य एकत्र करून त्याचा नाश करावा. २४ किंवा तो त्याच्या शत्रूशी लढण्यात गुंतला असता दुसरीकडून त्याच्या राज्यात सैन्य नेऊन ते काबीज करून घ्यावे.

२५ किंवा शत्रूची भूमी देऊ करून मित्राशी करार करावा अथवा मित्राची भूमी देऊ करून शत्रूशी. २६ नंतर शत्रूची भूमी घेण्यास जात असता मित्राला आपल्याला इजा करावयास लावून त्याच्यावर स्वारी करावी, इत्यादी सर्व युक्त्या पूर्वीप्रमाणेच कराव्यात. २७ किंवा मित्राची भूमी घेण्यास शत्रू तयार झाल्यास त्याला सैन्याची मदत करावी. २८ मग तो मित्रावर स्वारी करीत असता त्याला फसवावे.

कृतप्रतिविधानो वा व्यसनमात्मनो दर्शयित्वा मित्रेणामित्रमुत्साहयित्वाऽऽत्मानमभियोजयेत् । २९ । ततः संपीडनेन घातयेत्, जीवग्राहेण वा राज्यविनिमयं कारयेत् । ३० ।

मित्रेणाश्रितश्चेच्छत्रुरग्राह्ये स्थातुमिच्छेत् सामन्तादिभिर्मूलमस्य हारयेत् । ३१ । दण्डेन वा त्रातुमिच्छेत् तमस्य घातयेत् । ३२ ।

तौ चेन्न भिद्येयातां प्रकाशमेवान्योन्यभूम्या पणेत । ३३ । ततः परस्परं मित्रव्यञ्जना वा उभयवेतना वा दूतान् प्रेषयेयुः 'अयं ते राजा भूमिं लिप्सते शत्रुसंहितः' इति । ३४ । तयोरन्यतरो जाताशङ्कारोषः, पूर्ववच्चेष्टेत । ३५ ।

दुर्गराष्ट्रदण्डमुख्यान् वा कृत्यपक्षहेतुभिरभिविख्याप्य प्रव्राजयेत् । ३६ । ते युद्धावस्कन्दावरोधव्यसनेषु शत्रुमतिसंदध्युः । ३७ । भेदं वाऽस्य स्ववर्गेभ्यः कुर्युः । ३८ । अभित्यक्तशासनैः प्रतिसमानयेयुः । ३९ ।

लुब्धकव्यञ्जना वा मांसविक्रयेण द्वाःस्था दौवारिकापाश्रयाश्चोराभ्यागमं परस्य द्विस्त्रिरिति निवेद्य लब्धप्रत्यया भर्तुरनीकं द्विधा निवेश्य ग्रामवधेऽवस्कन्दे

२९ किंवा संकटनिवारणाची तजवीज करून ठेवून आपल्यावर संकट आले आहे असे दाखवावे आणि त्याकारणाने शत्रूला मित्राकडून उत्साहित करून आपल्यावर (शत्रूची) स्वारी ओढवून घ्यावी. ३० नंतर (मित्र व आपण ह्या) दोहोंच्या मध्ये पकडून त्याला ठार करावे किंवा त्याला जिवंत पकडून त्याच्या राज्याच्या बदल्यात त्याला जीवदान द्यावे.

३१ त्याच्या मित्राने आश्रय दिल्यामुळे शत्रू दुर्गम ठिकाणी जाऊन बसल्यास शेजारचे राजे वगैरेंना त्याचे राज्य घेण्यास उद्युक्त करावे. ३२ किंवा तो राज्याचे रक्षण सैन्याने करू पहात असेल तर त्या त्याच्या सैन्याचा नाश करावा.

३३ (शत्रू व त्याचा मित्र ह्या) दोघांत जर फूट पडत नसेल तर उघडपणेच एकाची भूमी दुसऱ्याला देण्याचा करार करावा. ३४ नंतर मित्रत्वाचा बहाणा करणाऱ्या हेरांनी अथवा उभय राज्यांत पगार घेणाऱ्या हेरांनी एकाकडे किंवा दुसऱ्याकडे निरोप पाठवावा, "हा राजा तुझी भूमी बळकावू पहात आहे, त्याने शत्रूशी संधान बांधले आहे." ३५ त्यांच्यापैकी कोणी एक साशंक अथवा क्रुद्ध झाला तर पूर्वीप्रमाणेच वागावे.

३६ किंवा दुर्गावरील, राष्ट्रातील अथवा सैन्यातील मुख्य अधिकाऱ्यांना, ते फितूर होणाऱ्या पक्षातले आहेत ह्या कारणास्तव असे जाहीर करून, हद्दपार करावे. ३७ त्यांनी युद्ध, हल्ला, वेढा किंवा संकट अशा प्रसंगी शत्रूला फसवावे. ३८ किंवा त्यांनी शत्रूपासून आपल्यासारख्याच त्याच्या अधिकाऱ्यांना फोडावे. ३९ वध्य माणसांच्या हातातील पत्रांनी कारस्थानाला दुजोरा मिळवावा.

४० किंवा फासेपारध्याच्या वेषातील हेरांनी, वेशीजवळ तेथील पहारेकऱ्यांच्या परवानगीने मांस विक्रयासाठी रहात असता शत्रूला दरोडेखोर येत

च द्विषतो ब्रूयुः 'आसन्नश्चोरगणः, महांश्चाक्रन्दः, प्रभूतं सैन्यमागच्छतु' इति । ४० । तदर्पयित्वा ग्रामघातदण्डस्य, सैन्यमितरदादाय रात्रौ दुर्गद्वारेषु ब्रूयुः 'हतश्चोरगणः, सिद्धयात्रमिदं सैन्यमागतम्, द्वारमपाव्रियताम्' इति । ४१ । पूर्वप्रणिहिता वा द्वाराणि दद्युः । ४२ । तैः सह प्रहरेयुः । ४३ ।

कारुशिल्पिपाषण्डकुशीलववैदेहकव्यञ्जनानायुधीयान् वा परदुर्गे प्रणिदध्यात् । ४४ । तेषां गृहपतिकव्यञ्जनाः काष्ठतृणधान्यपण्यशकटैः प्रहरणावरणान्यभिहरेयुः, देवध्वजप्रतिमाभिर्वा । ४५ । ततस्तद्व्यञ्जनाः प्रमत्तवधमवस्कन्दप्रतिग्रहमभिप्रहरणं पृष्ठतः शङ्खदुन्दुभिशब्देन वा 'प्रविष्टम्' इत्यावेदयेयुः । ४६ । प्राकारद्वाराट्टालकदानमनीकभेदं घातं वा कुर्युः । ४७ ।

सार्थगणवासिभिरातिवाहिकैः कन्यावाहिकैरश्वपण्यव्यवहारिभिरुपकरणहारकैर्धान्यक्रेतृविक्रेतृभिर्वा प्रव्रजितलिङ्गिभिर्दूतैश्च दण्डातिनयनम्; संधिकर्म विश्वासनार्थम् । ४८ । इति राजापसर्पाः । ४९ ।

असल्याचे दोन तीन वेळा सांगून त्यांचा विश्वास संपादन केल्यावर, आपल्या स्वामीचे सैन्य दोन भागांत – एक गावाचा विध्वंस करण्यासाठी व दुसरा (दुर्गावर) हल्ला करण्यासाठी – विभागून शत्रूच्या लोकांना म्हणावे, "दरोडेखोरांची टोळी जवळ आली आहे; मोठाच आरडाओरडा चालू आहे; भरपूर सैन्य येऊ द्या." ४१ ते आल्यावर त्याला गावाच्या विध्वंसासाठी ठेवलेल्या सैन्याच्या स्वाधीन करावे आणि दुसरे सैन्य घेऊन रात्री दुर्गाच्या दरवाज्यापाशी म्हणावे, "दरोडेखोरांना ठार केले आहे, मोहिमेत यशस्वी झालेले सैन्य परत आले आहे, दरवाजा उघडा." ४२ किंवा अगोदरपासून आत असलेल्या हेरांनी दरवाजा उघडावा. ४३ त्यांच्यासह आतील सैनिकांवर हल्ला चढवावा.

४४ किंवा कारागीर, कलाकार, पाखंडी साधू, नटनर्तकादी आणि व्यापारी यांच्या वेषात आपल्या सैनिकांना शत्रूच्या दुर्गात रहावयास लावावे. ४५ गृहस्थवेषातील हेरांनी त्यांना लाकडे, गवत, धान्य व इतर माल वाहून नेणाऱ्या गाड्यांतून किंवा देवतांचे ध्वज व मूर्ती यांतून शस्त्रे व चिलखते नेऊन द्यावीत. ४६ नंतर त्यांच्याच वेषातील हेरांनी गाफील शत्रुसैनिकांची हत्या, (विजिगीषूच्या) हल्ल्याला मदत, पाठीमागच्या बाजूने हल्ला (ह्या गोष्टी कराव्यात), आणि शंख किंवा नगारे वाजवून (विजिगीषूचे) सैन्य आत आले आहे" असे घोषित करावे. ४७ त्यांनी तटाचे दरवाजे, बुरूज (विजिगीषूला) मोकळे करून द्यावेत, शत्रुसैन्याची फळी तोडावी किंवा त्याचा नाश करावा.

४८ व्यापारी तांड्यांच्या समूहाबरोबर जाणारे संरक्षक दल, कन्या पतिगृही जाताना तिच्या रक्षणार्थ जाणारे सैनिक, घोड्यांचा व्यापार करणारे, हत्यारांची

एत एवाटवीनामपसर्पाः कण्टकशोधनोक्ताश्च । ५० । व्रजमटव्यासन्नमपसर्पाः सार्थं वा चोरैर्घातयेयुः । ५१ । कृतसंकेतमन्नपानं चात्र मदनरसविद्धं वा कृत्वाऽपगच्छेयुः । ५२ । गोपालकवैदेहकाश्च ततश्चोरान् गृहीतलोप्त्रभारान् मदनरसविकारकालेऽवस्कन्दयेयुः । ५३ । संकर्षणदैवतीयो वा मुण्डजटिलव्यञ्जनः प्रहवणकर्मणा मदनरसयोगेनातिसंदध्यात् । ५४ । अथावस्कन्दं दद्यात् । ५५ । शौण्डिकव्यञ्जनो वा दैवतप्रेतकार्योत्सवसमाजेष्वाटविकान् सुराविक्रयोपायननिमित्तं मदनरसयोगेनातिसंदध्यात् । ५६ । अथावस्कन्दं दद्यात् । ५७ ।

ग्रामघातप्रविष्टां वा विक्षिप्य बहुधाऽटवीम् ।
घातयेदिति चोराणामपसर्पाः प्रकीर्तिताः ॥ ५८ ॥

इति दुर्गलम्भोपाये त्रयोदशेऽधिकरणे अपसर्पप्रणिधिः तृतीयोऽध्यायः ।
आदितस्त्रिचत्वारिंशच्छततमः ।

ने-आण करणारे, धान्याची खरेदी-विक्री करणारे, संन्याश्याची चिन्हे धारण करणारे आणि दूत यांच्या द्वारा सैनिकांना दुर्गात प्रवेश मिळवावा, आणि तसे करीत असता शत्रूला विश्वास वाटावा म्हणून त्याच्याशी तह करावा. ४९ हे झाले राजाविरुद्ध गुप्त हेरांच्या योजनेचे वर्णन.

५० रानटी टोळ्यांच्या संबंधात अशाच प्रकारच्या हेरांची आणि (चौथ्या) कंटकशोधन अधिकरणात सांगितलेल्या हेरांची योजना करावी. ५१ हेरांनी अरण्याच्या जवळ असलेल्या गुरांच्या कळपाचा अथवा व्यापारी तांड्याचा दरोडेखोरांमार्फत नाश करावा. ५२ अगोदर ठरल्याप्रमाणे तेथे ठेवण्यात येणारे अन्नपाणी बेशुद्ध करणाऱ्या रसाने मिश्रित करून निघून जावे. ५३ नंतर कळपाचे रक्षक आणि तांड्यातील व्यापारी यांनी माल लुटून घेतलेल्या दरोडेखोरांवर, ते बेशुद्ध झाले असता, हल्ला करावयास लावावे. ५४ किंवा संकर्षण (बलराम) देवतेचा भक्त असल्याचा वहाणा करणाऱ्या मुंड अथवा जटाधारी साधूच्या वेषातील हेराने उत्सवाच्या निमित्ताने दारूत मदनरस मिसळून (दरोडेखोरांना) फसवावे. ५५ नंतर त्यांच्यावर हल्ला करावा. ५६ किंवा मद्यविक्रय करणाऱ्याच्या वेषातील हेराने देवतांचे उत्सव, प्रेतकार्य, मेळावे या प्रसंगी दारू विकण्याच्या किंवा भेट देण्याच्या निमित्ताने (अरण्यातील टोळ्यांना) मदनरसाच्या मिश्रणाने फसवावे. ५७ नंतर त्यांच्यावर हल्ला करावा.

५८ किंवा गाव लुटण्यासाठी आत शिरलेल्या रानटी टोळ्यांची अनेक प्रकारची पांगापांग करून त्यांचा नाश करावा. याप्रमाणे दरोडेखोरांच्या संबंधात करावयाची हेरांची योजना वर्णन करून सांगितली.

४

[ चतुःसप्ततिशततमं प्रकरणम् – पर्युपासनकर्म;
पञ्चसप्ततिशततमं प्रकरणम् – अवमर्दः ]

कर्शनपूर्वं पर्युपासनकर्म । १ ।

जनपदं यथानिविष्टमभये स्थापयेत् । २ । उत्थितमनुग्रहपरिहाराभ्यां निवेशयेत्, अन्यत्रापसरतः । ३ । संग्रामादन्यस्यां भूमौ निवेशयेत्, एकस्यां वा वासयेत् । ४ । न ह्यजनो जनपदो राज्यमजनपदं वा भवतीति कौटिल्यः । ५ ।

विषमस्थस्य मुष्टिं सस्यं वा हन्याद्, वीवधप्रसारौ च । ६ ।

प्रसारवीवधच्छेदान्मुष्टिसस्यवधादपि ।
वमनाद्गूढघाताच्च जायते प्रकृतिक्षयः ॥ ७ ॥

'प्रभूतगुणवद्धान्यकुप्ययन्त्रशस्त्रावरणविष्टिरश्मिसमग्रं मे सैन्यम्, ऋतुश्च पुरस्तात्, अपर्तुः परस्य, व्याधिदुर्भिक्षनिचयरक्षाक्षयः क्रीतबलनिर्वेदो मित्रबलनिर्वेदश्च' इति पर्युपासीत । ८ ।

चौथा अध्याय

प्रकरण १७४ : वेढा देण्याचे कार्य;
प्रकरण १७५ : हल्ला करून दुर्ग काबीज करणे

१ अगोदर शत्रूला दुर्बल करून मग दुर्गाला वेढा द्यावा.

२ जनपदातील लोकांची जशी वस्ती असेल तशी राहू देऊन त्यांना अभय द्यावे. ३ जनपदातील लोकांनी आपले स्थान सोडले असेल तर त्यांना मदत व करात सूट देऊन वसावयास लावावे; याला अपवाद निघून दुसरीकडे जाणाऱ्यांचा ४ संग्राम होणार असलेल्या ठिकाणाहून दुसरीकडे त्यांना वसवावे किंवा सर्वांना एके ठिकाणी रहावयास लावावे. ५ कारण लोकवस्ती असल्याशिवाय जनपद होत नाही किंवा जनपदाशिवाय राज्य होत नाही असे कौटिल्याचे म्हणणे आहे.

६ शत्रू दुर्गम किल्ल्यात जाऊन बसला असेल तर त्याच्या पेरण्या व उगवलेले धान्य यांचा नाश करावा, तसेच रसदेचा आणि दाणागोटा शोधणाऱ्या तुकड्यांचा नाश करावा.

७ दाणागोटा शोधणाऱ्या तुकड्या व रसद बंद पाडली, पेरण्या व उगवलेले धान्य यांचा नाश केला, लोकांना दुसरीकडे हलविले आणि (मुख्यांचा) गुप्तपणे वध केला म्हणजे प्रकृती क्षीण होतात.

८ "भरपूर व उत्कृष्ट प्रकारचे धान्य, कुप्य, यंत्रे, शस्त्रे, चिलखते, मजूर व दोर यांचा परिपूर्ण साठा माझ्या सैन्याजवळ आहे; ऋतू मला अनुकूल व शत्रूला प्रतिकूल आहे; रोगराई व दुष्काळ ह्यांनी त्याची कोठारे व संरक्षणाची

कृत्वा स्कन्धावारस्य रक्षां वीवधासारयोः पथश्च, परिक्षिप्य दुर्गं खातसालाभ्यां, दूषयित्वोदकम्, अवस्राव्य परिखाः संपूरयित्वा वा, सुरुङ्गाबलकुटिकाभ्यां वप्रप्राकारौ हारयेत्, दारं च गुडेन । ९ । निम्नं वा पांसुमालयाऽऽच्छादयेत् । १० । बहुलारक्षं यन्त्रैर्घातयेत् । ११ । निष्किरादुपनिष्कृष्याश्वैश्च प्रहरेयुः । १२ । विक्रमान्तरेषु च नियोगविकल्पसमुच्चयैश्चोपायानां सिद्धिं लिप्सेत । १३ ।

दुर्गवासिनः श्येनकाकनप्तृभासशुकसारिकोलूककपोतान् ग्राहयित्वा पुच्छेष्वग्नियोगयुक्तान् परदुर्गे विसृजेत् । १४ । अपकृष्टस्कन्धावारादुच्छ्रितध्वजधन्वारक्षो वा मानुषेणाग्निना परदुर्गमादीपयेत् । १५ । गूढपुरुषाश्चान्तर्दुर्गपालका नकुलवानरबिडालशुनां पुच्छेष्वग्नियोगमाधाय काण्डनिचयरक्षाविधानवेश्मसु विसृजेयुः । १६ । शुष्कमत्स्यानामुदरेष्वग्निमाधाय वल्लूरे वा वायसोपहारेण वयोभिर्हारयेयुः । १७ ।

तजवीज ह्यांचा ऱ्हास झाला आहे; त्याने विकत घेतलेले सैन्य व मित्राचे सैन्य कंटाळून गेले आहे," (असे वाटेल) तेव्हा दुर्गाला वेढा द्यावा.

९ सैन्याच्या छावणीच्या आणि रसद व कुमक येणाऱ्या मार्गांच्या संरक्षणाची तजवीज करून, खंदक व तटाची भिंत यांच्या बाजूने दुर्गाच्या सभोवार सैन्य ठेऊन, शत्रूचा पाण्याचा पुरवठा दूषित करून, खंदकातील पाणी वाहून जावयास लावून अथवा तो (मातीने) भरून टाकून, भुयार आणि सैन्याचा हल्ला यांच्या साहाय्याने तट आणि त्यावरील भिंत ही हस्तगत करावीत आणि खिडार चिलखती हत्तींच्या साहाय्याने (हस्तगत करावे). १० किंवा खोल खड्डे मातीने भरून काढावेत. ११ ज्या भागाचे रक्षण पुष्कळ सैनिक करीत असतील त्याचा यंत्रांनी विध्वंस करावा. १२ बाहेर येण्याच्या मार्गातून सैनिकांना खेचून अश्वांच्या द्वारा त्यांच्यावर मारा करावा. १३ आणि लढायांमधील मध्यंतरीच्या काळात चार उपायांच्या निश्चित, वैकल्पिक आणि समुच्चित योजनेने कार्यसिद्धी करून घेण्याचे प्रयत्न करावेत.

१४ दुर्गात नेहमी असणारे ससाणे, कावळे, नप्तृ, भास, पोपट, सारिका, घुबड व कबूतर यांना पकडावयास लावून त्यांच्या शेपटांस ज्वालाग्राही पदार्थ लावुन शत्रूच्या दुर्गात सोडून द्यावे. १५ किंवा (किल्ल्यापासून) दूर असलेल्या छावणीतून उंच ध्वज व धनुष्य यांच्या रक्षणाखाली मनुष्यांच्या हाडातून मंथन करून काढलेल्या अग्नीने शत्रूच्या दुर्गाला आग लावावी. १६ आणि दुर्गाच्या आत रक्षक म्हणून राहिलेल्या गुप्त हेरांनी मुंगूस, वानर, मांजरे व कुत्री यांच्या शेपटांना ज्वालाग्राही पदार्थ लावून बाणांचे साठे व संरक्षणाची व्यवस्था असलेल्या ठिकाणी सोडून द्यावेत. १७ सुक्या माशांच्या पोटात अथवा सुक्या मांसात अग्नी ठेऊन काकबली म्हणून देऊन पक्ष्यांमार्फत तो दुर्गात घेऊन जाऊ द्यावा.

सरलदेवदारुपूतितृणगुग्गुलुश्रीवेष्टकसर्जरसलाक्षागुलिकाः खरोष्ट्राजावीनां लेण्डं चाग्निधारणम् । १८ ।

प्रियालचूर्णमवल्गुजमषीमधूच्छिष्टमश्वखरोष्ट्रगोलेण्डमित्येष क्षेप्योऽग्नियोगः । १९ ।

सर्वलोहचूर्णमग्निवर्णं वा कुम्भीसीसत्रपुचूर्णं वा पारिभद्रकपलाशपुष्पकेशमषीतैलमधूच्छिष्टकश्रीवेष्टकयुक्तोऽग्नियोगो विश्वासघाती वा । २० । तेनावलिप्तः शणत्रपुसवल्कवेष्टितो बाण इत्यग्नियोगः । २१ ।

न त्वेव विद्यमाने पराक्रमेऽग्निमवसृजेत् । २२ । अविश्वास्यो ह्यग्निर्दैवपीडनं च, अप्रतिसंख्यातप्राणिधान्यपशुहिरण्यकुप्यद्रव्यक्षयकरः । २३ । क्षीणनिचयं चावाप्तमपि राज्यं क्षयायैव भवति । २४ ।

इति पर्युपासनकर्म ।

' सर्वारम्भोपकरणविष्टिसंपन्नोऽस्मि, व्याधितः पर उपधाविरुद्धप्रकृतिरकृतदुर्गकर्मनिचयो वा, निरासारः सासारो वा पुरा मित्रैः संधत्ते ' इत्यवमर्दकालः । २५ ।

१८ सरल, देवदारु, पूतितृण, गुग्गूळ, सर्ज झाडाचा चीक व लाख यांच्या गोळ्या व गाढव, उंट, बकऱ्या व मेंढ्या यांच्या लेंड्या यात अग्नी बराच वेळ रहातो.

१९ प्रियालाचे चूर्ण, अवल्गुजाची काजळी व मेण, अश्व, गाढव, उंट व बैल यांचे शेण हे दुरून फेकावयाचे अग्निमिश्रण.

२० किंवा अग्नीच्या वर्णाचे सर्व धातूंचे चूर्ण अथवा कुंभी, शिसे व कथील यांचे चूर्ण, पारिभद्रक व पलाश यांच्या फुलांची व केशाची राख, तेल, मेण, श्रीवेष्टक यांनी युक्त केले म्हणजे विश्वासघात करणारे अग्निमिश्रण होते. २१ ते बाणाला चोपडले आणि वर सण, त्रपुस व वल्क यांचे वेष्टन केले म्हणजे तो अग्निबाण होतो.

२२ परंतु जोपर्यंत युद्ध करणे शक्य आहे तोपर्यंत अग्नी केव्हाही सोडू नये. २३ कारण अग्नीचा भरवसा धरता येत नाही आणि ती एक दैवी आपत्ती आहे, असंख्य प्राणी, धान्य, पशू, द्रव्य, कुप्य व इतर पदार्थ यांचा तो नाश करतो. २४ आणि साठे संपुष्टात आले असल्यास राज्य मिळाले तरी ते ऱ्हासासच कारणीभूत होते.

हे झाले दुर्गाला वेढा देण्याचे कार्य.

२५ " सर्व प्रकारच्या कामासाठी आवश्यक ती उपकरणे व कामगार यांचा माझ्याकडे भरपूर साठा आहे, शत्रू व्याधिग्रस्त आहे, निष्ठेविषयीच्या गुप्त परीक्षांमुळे प्रकृती त्याच्याविरुद्ध आहेत, त्याचे दुर्गाचे आणि साठा करण्याचे

स्वयमग्नौ जाते समुत्थापिते वा प्रहवणे प्रेक्षानीकदर्शनसङ्गसौरिककलहेषु नित्ययुद्धश्रान्तबले बहुलयुद्धप्रतिविद्धप्रेतपुरुषे जागरणक्लान्तसुप्तजने दुर्दिने नदीवेगे वा नीहारसंप्लवे वाऽवमृद्नीयात् । २६ ।

स्कन्धावारमुत्सृज्य वा वनगूढः शत्रुं निष्क्रान्तं घातयेत् । २७ ।

मित्रासारमुख्यव्यञ्जनो वा संरुद्धेन मैत्रीं कृत्वा दूतमभित्यक्तं प्रेषयेत् – 'इदं ते छिद्रम्, इमे दूष्याः'; 'संरोद्धुर्वा छिद्रम्, अयं ते कृत्यपक्षः' इति । २८ । तं प्रतिदूतमादाय निर्गच्छन्तं विजिगीषुर्गृहीत्वा दोषमभिविख्याप्य प्रवास्यापगच्छेत् । २९ । ततो मित्रासारव्यञ्जनो वा संरुद्धं ब्रूयात् 'मां त्रातुमुपनिर्गच्छ, मया वा सह संरोद्धारं जहि' इति । ३० । प्रतिपन्नमुभयतः संपीडनेन घातयेत्,

काम झालेले नाही, त्याला कुमक येण्यासारखी नाही किंवा कुमक येण्यासारखी असून लवकरच त्याचे मित्र त्याला येऊन मिळतील," (असे वाटेल) तेव्हा तो दुर्गावर हल्ला चढवून काबीज करण्याचा काल.

२६ आग आपोआप लागली असता अथवा लावली असता, उत्सव समारंभ चालू असता, नाटक वगैरे पहाण्यात सैनिक गुंतले असता, मद्यपानानंतर कलह चालू असता, एकसारखे युद्ध करून सैनिक थकले असता, पुष्कळ वेळ चाललेल्या युद्धात सैनिक जखमी झाले असता अथवा ठार झाले असता, जागरणामुळे ते म्लान झाले असता किंवा झोपी गेले असता, पावसाळी हवा असता अथवा नदीला पूर आला असता अथवा धुक्यामुळे सर्व एक झाले असता, दुर्गावर हल्ला चढवावा.

२७ अथवा छावणी सोडून जाऊन वनात दडून रहावे व शत्रू बाहेर आला की त्याला ठार करावे.

२८ (शत्रूच्या) मित्रांपैकी अथवा मदतीस येणाऱ्यांपैकी मुख्य असल्याचा बहाणा करणाऱ्या राजाने दुर्गात अडकून पडलेल्या शत्रूशी मैत्री दाखवून वधाची शिक्षा झालेल्या मनुष्याला त्याच्याकडे दूत म्हणून पाठवावे, "ह्या ठिकाणी तुझे मर्मस्थान आहे, हे तुझे अधिकारी राजद्रोही आहेत," किंवा "वेढा घालणाऱ्याचे हे मर्मस्थान आहे, हे त्याचे लोक फितूर होण्यासारखे आहेत." २९ शत्रूकडील दूत बरोबर घेऊन तो (दुर्गातून) बाहेर पडत असता विजिगीषूने त्याला पकडून त्याचा अपराध जाहीर करून त्याला ठार करावे आणि तेथून जावे. ३० त्यावर मित्र किंवा आसार म्हणविणाऱ्याने वेढ्यात पडलेल्याला निरोप पाठवावा, "मला वाचविण्यासाठी बाहेर ये," किंवा "आपण दोघे मिळून वेढा घालणाऱ्याचा निकाल लावू." ३१ कबूल होऊन तो बाहेर आला म्हणजे (तो मित्र म्हणविणारा व आपण ह्या) दोघांच्या कैचीत पकडून त्याला

जीवग्राहेण वा राज्यविनिमयं कारयेत् । ३१ । नगरं वाऽस्य प्रमृद्नीयात् । ३२ । सारबलं वाऽस्य वमयित्वाऽभिहन्यात् । ३३ ।

तेन दण्डोपनताटविका व्याख्याताः । ३४ । दण्डोपनताटविकयोरन्यतरो वा संरुद्धस्य प्रेषयेत् – 'अयं संरोद्धा व्याधितः, पार्ष्णिग्राहेणाभियुक्तः, छिद्रमन्यदुत्थितम्, अन्यस्यां भूमावपयातुकामः' इति । ३५ । प्रतिपन्ने संरोद्धा स्कन्धावारमादीप्यापयायात् । ३६ । ततः पूर्ववदाचरेत् । ३७ ।

पण्यसंपातं वा कृत्वा पण्येनैनं रसविद्धेनातिसंदध्यात् । ३८ ।

आसारव्यञ्जनो वा संरुद्धस्य दूतं प्रेषयेत् – 'मया बाह्यमभिहतमुपनिर्गच्छाभिहन्तुम्' इति । ३९ । प्रतिपन्नं पूर्ववदाचरेत् । ४० ।

मित्रं बन्धुं वाऽपदिश्य योगपुरुषाः शासनमुद्राहस्ताः प्रविश्य दुर्गं ग्राहयेयुः । ४१ ।

ठार करावे किंवा जिवंत पकडून राज्याच्या बदल्यात त्याला जीवदान द्यावे. ३२ किंवा त्याचे (दुर्ग असलेले) नगर उध्वस्त करून टाकावे. ३३ किंवा त्याच्या उत्कृष्ट सैन्याला बाहेर यावयास लावून त्याचा फडशा पाडावा.

३४ ह्याचप्रमाणे विजिगीषूला शरण आलेला (मांडलिक) व रानटी सैन्याचा मुख्य (आटविक) ह्यांनी दुर्गात कोंडलेल्या शत्रूला फसवावे. ३५ मांडलिक व आटविक यांच्यापैकी कोणीतरी दुर्गातील शत्रूला निरोप पाठवावा, " वेढा देऊन बसलेला हा राजा व्याधिग्रस्त झाला आहे, पिछाडीच्या शत्रूने ह्याच्यावर हल्ला केला आहे, ह्याच्यावर दुसरे संकट येऊन मर्मस्थान उत्पन्न झाले आहे, हा दुसऱ्या ठिकाणी निघून जाण्याच्या विचारात आहे." ३६ त्याला ते खरे वाटले म्हणजे वेढा घालणाऱ्या विजिगीषूने छावणीला आग लावून देऊन निघून जावे. ३७ नंतर पूर्वीप्रमाणेच वागावे.

३८ किंवा माल एकत्रित करून तो विषमिश्रित करावा आणि (तो शत्रूच्या हाती लागेल अशी व्यवस्था करून) त्या मालाने शत्रूला फसवावे.

३९ किंवा मदतीस येणारा मित्र म्हणविणाऱ्या राजाने दुर्गातील राजाकडे दूत पाठवावा, " बाहेर असलेल्या ह्या शत्रूवर मी हल्ला करून जर्जर केले आहे, तू बाहेर येऊन ह्याचा निकाल लावून टाक." ४० तो कबूल झाला म्हणजे पूर्वीप्रमाणेच वागावे.

४१ (किल्ल्यातील) मित्र किंवा नातेवाईक यांना भेटण्याचे निमित्त करून गूढ पुरुषांनी मोहोरबंद परवानगी जवळ बाळगून किल्ल्यात प्रवेश करावा व तो सर करण्यास मदत करावी.

आसारव्यञ्जनो वा संरुद्धस्य प्रेषयेत् – 'अमुष्मिन् देशे काले च स्कन्धावारमभिहनिष्यामि, युष्माभिरपि योद्धव्यम्' इति । ४२ । प्रतिपन्नं यथोक्तमभ्याघातसंकुलं दर्शयित्वा रात्रौ दुर्गान्निष्क्रान्तं घातयेत् । ४३ ।

यद्वा मित्रमावाहयेद् आटविकं वा, तमुत्साहयेत् 'विक्रम्य संरुद्धे भूमिमस्य प्रतिपद्यस्व' इति । ४४ । विक्रान्तं प्रकृतिभिर्दूष्यमुख्योपग्रहेण वा घातयेत्, स्वयं वा रसेन 'मित्रघातकोऽयम्' इत्यवाप्तार्थः । ४५ । विक्रमितुकामं वा मित्रव्यञ्जनः परस्याभिशंसेत् । ४६ । आप्तभावोपगतः प्रवीरपुरुषानस्योपघातयेत् । ४७ ।

संधिं वा कृत्वा जनपदमेनं निवेशयेत् । ४८ । निविष्टमस्य जनपदमविज्ञातो हन्यात् । ४९ ।

अपकारयित्वा दूष्याटविकेषु वा बलैकदेशमतिनीय दुर्गमवस्कन्देन हारयेत् । ५० ।

४२ किंवा मदतीस येणारा मित्र म्हणविणाऱ्या राजाने दुर्गातील शत्रूला निरोप पाठवावा, " मी अमुक ठिकाणी व अमुक वेळेला शत्रूच्या छावणीवर हल्ला करणार आहे. तू सुद्धा लढाईत सामील हो." ४३ तो कबूल झाला म्हणजे सांगितल्याप्रमाणे हल्ल्याची दंगल दाखवून रात्री तो किल्ल्यातून बाहेर पडला म्हणजे त्याचा घात करावा.

४४ किंवा (शत्रूच्या) मित्राला अथवा अटवीमुख्याला बोलावून त्याला प्रोत्साहित करावे, " दुर्गात अडकून पडलेल्या राजाच्या प्रदेशावर हल्ला करून तो घेऊन टाक." ४५ त्याने हल्ला केला म्हणजे प्रजाजनांकडून अथवा त्याच्याशी एकनिष्ठ नसलेल्या त्याच्या मुख्यांना हाताशी धरून त्यांच्याकडून त्याचा वध करवावा, अथवा स्वतः त्याच्यावर विषप्रयोग करावा व " हा (शत्रू) मित्रघातक आहे " (असे भासवून इतर मित्रांना त्याच्यापासून दूर ठेवण्याचे) आपले कार्य साधावे. ४६ किंवा तो मित्र अथवा आटविक शत्रूच्या प्रदेशावर चढाई करण्याच्या तयारीत असता मित्र म्हणविणाऱ्या राजाने शत्रूला ते सांगावे. ४७ त्याच्या विश्वासास पात्र झाल्यानंतर त्याने (बनावट पत्रांच्या साहाय्याने) त्याच्या शूर योद्ध्यांचा वध करावयास लावावे.

४८ अथवा त्याच्याशी तह करून त्याला (पूर्वीसारखीच) जनपदाची वस्ती करू द्यावी. ४९ त्याचे जनपद पुन्हा वसले की कोणाला समजणार नाही अशा रीतीने ते उध्वस्त करावे.

५० (आपल्या) दूष्यबलाविरुद्ध अथवा अटवीबलाविरुद्ध शत्रूला लढावयास लावून सैन्याचा एक भाग आत नेऊन अचानक हल्ल्याने दुर्ग सर करावा.

**दूष्यामित्राटविकद्वेष्यप्रत्यपसृताश्च कृतार्थमानसंज्ञाचिह्नाः परदुर्गमवस्कन्देयुः ।५१।**

**परदुर्गमवस्कन्द्य स्कन्धावारं वा पतितपराङमुखाभिपन्नमुक्तकेशशस्त्रभयविरूपेभ्यश्चाभयमयुध्यमानेभ्यश्च दद्युः ।५२।**

**परदुर्गमवाप्य विशुद्धशत्रुपक्षं कृतोपांशुदण्डप्रतीकारमन्तर्बहिश्च प्रविशेत् ।५३।**

**एवं विजिगीषुरमित्रभूमिं लब्ध्वा मध्यमं लिप्सेत, तत्सिद्धावुदासीनम् ।५४। एष प्रथमो मार्गः पृथिवीं जेतुम् ।५५।**

**मध्यमोदासीनयोरभावे गुणातिशयेनारिप्रकृतीः साधयेत्, तत उत्तराः प्रकृती. ।५६। एष द्वितीयो मार्गः ।५७।**

**मण्डलस्याभावे शत्रुणा मित्रं मित्रेण वा शत्रुमुभयतः संपीडनेन साधयेत् ।५८। एष तृतीयो मार्गः ।५९।**

५१ आणि दूष्यबल, शत्रुबल, अटवीबल, मर्जीतून उतरलेले अधिकारी, शत्रूला सोडून त्याला येऊन मिळालेले यांचा द्रव्य व मानसन्मानाने सत्कार करून व त्यांच्याशी संज्ञा व खुणा ठरवून त्यांना शत्रूच्या दुर्गावर हल्ला करावयास पाठवावे.

५२ शत्रूच्या दुर्गावर अथवा सैन्यावर हल्ला करताना जे खाली पडले असतील, ज्यांनी रणांगणाकडे पाठ फिरविली असेल, जे शरण आले असतील, ज्यांचे केस मोकळे असतील, ज्यांनी शस्त्रे टाकून दिली असतील, भीतीने ज्यांचे रूप पार पालटले असेल त्यांना, तसेच जे युद्धात भाग घेत नाहीत त्यांना अभय द्यावे.

५३ शत्रूचा किल्ला जिंकून घेतल्यानंतर त्याच्या पक्षातील सर्व लोकांना बाहेर घालवून देऊन आणि आत व बाहेर गुप्त वधापासूनच्या बचावाची पूर्ण तजवीज करून मग दुर्गात प्रवेश करावा.

५४ याप्रमाणे शत्रूचा देश जिंकल्यावर विजिगीषूने मध्यम राजाचा देश जिंकण्याचा प्रयत्न करावा, तो मिळाल्यावर उदासीन राजाचा. ५५ पृथ्वीवर सार्वभौमत्व मिळविण्याचा हा पहिला मार्ग.

५६ मध्यम व उदासीन असे कोणी राजे नसतील तर गुणांच्या उत्कृष्टतेने अरि ह्या संज्ञेने ओळखल्या जाणाऱ्या प्रकृतींना जिंकावे, त्यानंतर इतर (मित्र) प्रकृतींना. ५७ हा दुसरा मार्ग.

५८ राजमंडलच नसेल तर शत्रू व आपण ह्यात मित्राला अथवा मित्र व आपण ह्यात शत्रूला दोन्ही बाजूंनी कैचीत पकडून विजय संपादन करावा ५९ हा तिसरा मार्ग.

शक्यमेकं वा सामन्तं साधयेत्, तेन द्विगुणो द्वितीयम्, त्रिगुणस्तृतीयम् । ६० ।
एष चतुर्थो मार्गः पृथिवीं जेतुम् । ६१ ।

जित्वा च पृथिवीं विभक्तवर्णाश्रमां स्वधर्मेण भुञ्जीत । ६२ ।

उपजापोऽपसर्पश्च वामनं पर्युपासनम् ।
अवमर्दश्च पञ्चैते दुर्गलम्भस्य हेतवः ।। ६३ ।।

इति दुर्गलम्भोपाये त्रयोदशेऽधिकरणे पर्युपासनकर्म अवमर्दश्च चतुर्थोऽध्यायः ।
आदितश्चतुश्चत्वारिंशच्छततमः ।

५

## [ षट्सप्ततिशततमं प्रकरणम् – लब्धप्रशमनम् ]

द्विविधं विजिगीषोः समुत्थानम् – अटव्यादिकम्, एकग्रामादिकं च । १ । त्रिविधश्चास्य लम्भः – नवो, भूतपूर्वः, पित्र्य इति । २ ।

नवमवाप्य लाभं परदोषान् स्वगुणैश्छादयेत्, गुणान् गुणद्वैगुण्येन । ३ । स्वधर्मकर्मानुग्रहपरिहारदानमानकर्मभिश्च प्रकृतिप्रियहितान्यनुवर्तेत । ४ । यथा-संभाषितं च कृत्यपक्षमुपग्राहयेत्, भूयश्च कृतप्रयासम् । ५ । अविश्वास्यो हि

६० दुर्बल किंवा एकटा असलेल्या शेजारच्या राजाला प्रथम जिंकावे, त्याने शक्ती दुप्पट झाली की दुसऱ्या राजाला, तिप्पट झाली की तिसऱ्या राजाला. ६१ पृथ्वी जिंकण्याचा हा चौथा मार्ग.

६२ आणि पृथ्वी जिंकल्यानंतर तिच्यात वर्ण व आश्रम पद्धतीची व्यवस्था लावून स्वतःच्या धर्मानुसार (विजिगीषूने) तिचा उपभोग घ्यावा.

६३ फितुरीस प्रोत्साहन, गुप्त हेरांची योजना, दुर्गाबाहेर काढणे, वेढा देणे आणि हल्ला करणे हे किल्ला सर करण्याचे पाच उपाय आहेत.

### पाचवा अध्याय

### प्रकरण १७६ : जिंकलेल्या मुलखाचे प्रशमन

१ विजिगीषूच्या कारवाईचे दोन प्रकारचे उद्देश असतात – अरण्ये आदी प्रदेश जिंकणे आणि एक शहर वगैरे काबीज करणे. २ आणि त्याला त्यांची प्राप्ती तीन प्रकारे होते – नवीन प्रदेशाची, पूर्वी त्याच्याकडे असलेल्या प्रदेशाची आणि पित्याच्या पश्चात त्याच्या राज्याची.

३ नवीन प्रदेश जिंकल्यावर त्याने शत्रूचे दोष आपल्या गुणांनी झाकून टाकावेत, त्याचे गुण त्याच्यापेक्षा दुप्पट गुणवत्तेने. ४ आणि आपल्या स्वधर्माचे पालन करणे, अनुग्रह करणे, सूट देणे, द्रव्यदान करणे, मानसन्मान करणे या गोष्टींनी प्रजाजनांना प्रिय होईल ते व हितकर असेल ते करीत रहावे. ५ आणि

विसंवादकः स्वेषां परेषां च भवति, प्रकृतिविरुद्धाचारश्च । ६ । तस्मात्समान-शीलवेषभाषाचारतामुपगच्छेत् । ७ । देशदैवतसमाजोत्सवविहारेषु च भक्ति-मनुवर्तेत । ८ ।

देशग्रामजातिसंघमुख्येषु चाभीक्ष्णं सत्रिणः परस्यापचारं दर्शयेयुः, माहाभाग्यं भक्तिं च तेषु स्वामिनः, स्वामिसत्कारं च विद्यमानम् । ९ । उचितैश्चैनान् भोगपरिहाररक्षावेक्षणैर्भुञ्जीत । १० ।

सर्वदेवताश्रमपूजनं च विद्यावाक्यधर्मशूरपुरुषाणां च भूमिद्रव्यदानपरिहारान् कारयेत्, सर्वबन्धनमोक्षणमनुग्रहं दीनानाथव्याधितानां च । ११ । चातुर्मास्येष्वर्ध-मासिकमघातम्, पौर्णमासीषु च चातूरात्रिकम्, राजदेशनक्षत्रेष्वैकरात्रिकम् । १२ । योनिबालवधं पुंस्त्वोपघातं च प्रतिषेधयेत् । १३ । यच्च कोशदण्डो-पघातकमधर्मिष्ठं वा चरित्रं मन्येत तदपनीय धर्म्यव्यवहारं स्थापयेत् । १४ ।

फितूर झालेल्या शत्रूकडील लोकांना कबूल केल्याप्रमाणे इनामे द्यावीत आणि ज्याने त्याच्यासाठी मेहनत घेतली असेल त्याला अधिक द्यावे. ६ कारण, जो आपल्या वचनाला जागत नाही आणि जो प्रजाजनांच्या विरुद्ध आचरण ठेवतो त्याच्यावर त्याचे स्वतःचे लोक व इतर लोक विश्वास ठेवीत नाहीत. ७ म्हणून तेथील प्रजेच्या स्वभाव, वेष, भाषा व आचार या गोष्टींचा त्याने स्वीकार करावा. ८ आणि त्या देशातील देवतांचे उत्सव, सामाजिक उत्सव व समारंभ याप्रसंगी तेथील लोकांसारखाच भक्तिभाव दाखवावा.

९ आणि देशातील, गावातील, जातीतील व संघांतील जे मुख्य मुख्य लोक असतील त्यांना हेरांनी शत्रूची दुष्कृत्ये वारंवार पटवून द्यावीत व (नवीन) राजा फार भाग्यशाली आहे, त्याचा तेथील लोकांवर फार लोभ आहे व त्याला त्यांच्याविषयी आदर आहे असे सांगावे. १० आणि त्यांचे नेहमीचे जे उपभोगाचे हक्क असतील, त्यांना जी सूट व जे संरक्षण मिळत असेल त्यांची जपणूक करून राज्याचा उपभोग घ्यावा.

११ आणि त्याने सर्व देवता व आश्रम यांची पूजा करावयास लावावे, विद्या, वक्तृत्व व धर्म यांत श्रेष्ठ असणाऱ्या पुरुषांना जमिनी व द्रव्य द्यावे आणि करात सूट द्यावी, तुरुंगातून सर्व कैद्यांना सोडून द्यावे आणि जे दीनदुबळे, अनाथ, रोगग्रस्त असतील त्यांना साहाय्य करावे. १२ दर चार महिन्यांमध्ये पंधरा दिवस, दर पौर्णिमेला चार दिवस आणि राजाच्या जन्मनक्षत्राच्या दिवशी व देशाच्या नक्षत्राच्या दिवशी प्राणिवधास बंदी करावी. १३ (सर्व प्राण्यांच्या) स्त्रिया व बालके यांचा वध आणि पुरुषांचे खच्चीकरण यांस बंदी घालावी. १४ आणि जी लोकरीत तिजोरीला किंवा सैन्याला अपायकारक आहे किंवा

चोरप्रकृतीनां म्लेच्छजातीनां च स्थानविपर्यासमनेकस्थं कारयेत्, दुर्गराष्ट्र-दण्डमुख्यानां च । १५ । परोपगृहीतानां च मन्त्रिपुरोहितानां परस्य प्रत्यन्तेष्वनेकस्थं वासं कारयेत् । १६ । अपकारसमर्थाननुक्षियतो वा भर्तृविनाशमुपांशुदण्डेन प्रशमयेत् । १७ । स्वदेशीयान् वा परेण वाऽपरुद्धानपवाहितस्थानेषु स्थापयेत् । १८ ।

यश्च तत्कुलीनः प्रत्यादेयमादातुं शक्तः, प्रत्यन्ताटवीस्थो वा प्रबाधितुमभिजातः, तस्मै विगुणां भूमिं प्रयच्छेत्, गुणवत्याश्चतुर्भागं वा कोशदण्डदानमवस्थाप्य, यदुपकुर्वाणः पौरजानपदान् कोपयेत् । १९ । कुपितैस्तैरेनं घातयेत् । २० ।

प्रकृतिभिरुपक्रुष्टमपनयेत्, औपघातिके वा देशे निवेशयेत् । इति । २१ ।

भूतपूर्वे येन दोषेणापवृत्तस्तं प्रकृतिदोषं छादयेत्, येन च गुणेनोपावृत्तस्तं तीव्रीकुर्यात् । इति । २२ ।

धर्माला अनुसरून नाही असे त्याला वाटेल ती बंद करून धर्माला अनुसरून असलेला व्यवहार प्रस्थापित करावा.

१५ चोऱ्या करणारे आणि म्लेच्छ जातीचे लोक ह्यांना त्यांच्या ठिकाणावरून हलवून दुसरीकडे निरनिराळ्या ठिकाणी रहावयास लावावे, तसेच दुर्ग, राष्ट्र व सैन्य यांच्यावरील मुख्य अधिकाऱ्यांच्या बदल्या कराव्यात. १६ आणि शत्रूच्या पक्षाचे ते मंत्री व पुरोहित असतील त्यांना शत्रूच्या देशाच्या सीमेवर निरनिराळ्या ठिकाणी रहावयास लावावे. १७ त्यांच्यापैकी जे अपाय करण्यास समर्थ असतील अथवा आपल्या (पूर्वीच्या) धन्याच्या नाशाबद्दल शोक करीत बसले असतील त्यांचा गुप्त वधाने निकाल लावावा. १८ आणि त्यांच्या स्थानावरून दूर केलेल्या अधिकाऱ्यांच्या जागी स्वदेशातील लोकांची अथवा शत्रूच्या मर्जीतून उतरले असलेल्या लोकांची नेमणूक करावी.

१९ आणि जर शत्रूच्या घराण्यातील त्याचा वारसदार म्हणविणारा कोणी पुरुष सहज परत घेता येण्यासारखा प्रदेश घेण्यास समर्थ असेल अथवा सरहद्दीवरील अरण्यात असलेला कोणी सरदार उपद्रव देण्यास समर्थ असेल तर त्याला निरुपयोगी जमीन किंवा त्याच्या एकचतुर्थांशाइतकी चांगली जमीन, तिजोरी व सैन्य ह्यांची मदत दिली पाहिजे ह्या अटीवर द्यावी, जी मदत देण्याच्या प्रयत्नात तो पौर व जानपद यांच्यात प्रक्षोभ उत्पन्न करील. २० ते प्रक्षुब्ध झाले म्हणजे त्यांच्यामार्फत त्याचा घात करावा.

२१ ज्या अधिकाऱ्याच्या विरुद्ध प्रजाजन ओरड करीत असतील त्याला काढून टाकावे किंवा धोकादायक प्रदेशात नेमावे.

२२ पूर्वीचा आपला देश परत मिळविल्यावर ज्या प्रकृतीच्या दोषामुळे त्याला तो सोडून जावे लागले होते तो दोष नाहीसा करावा आणि ज्या गुणामुळे परत येणे शक्य झाले तो अधिक दृढ करावा.

पित्र्ये पितुर्दोषांश्छादयेत्, गुणांश्च प्रकाशयेत् । इति । २३ ।

चरित्रमकृतं धर्म्यं कृतं चान्यैः प्रवर्तयेत् ।
प्रवर्तयेन्न चाधर्म्यं कृतं चान्यैर्निवर्तयेत् ।। २४ ।।

इति दुर्गलम्भोपाये त्रयोदशेऽधिकरणे लब्धप्रशमनम् पञ्चमोऽध्यायः ।
आदितः पञ्चचत्वारिंशच्छततमः ।

एतावता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य दुर्गलम्भोपायः त्रयोदशमधिकरणं समाप्तम् ।

२३ वडिलापासून मिळालेल्या राज्यात पित्याच्या दोषांवर पांघरूण घालावे आणि त्याच्या गुणांचा बोलबाला करावा.

२४ धर्माला धरून असलेली रीत, पूर्वी आचरणात नसली तरी सुरू करावी, आणि इतरांनी सुरू केलेली चालू ठेवावी. तसेच धर्माला अनुसरून नसलेले काही सुरू करू नये आणि इतरांनी सुरू केलेले बंद करावे.

## तेरावे अधिकरण समाप्त

# औपनिषदिकम्--चतुर्दशमधिकरणम्

१

## [ सप्तसप्ततिशततमं प्रकरणम् – परबलघातप्रयोगः ]

चातुर्वर्ण्यरक्षार्थमौपनिषदिकमधर्मिष्ठेषु प्रयुञ्जीत । १ ।

कालकूटादिर्विषवर्गः श्रद्धेयदेशवेषशिल्पभाषाभिजनापदेशैः कुब्जवामनकिरातमूकबधिरजडान्धच्छद्मभिर्म्लेच्छजातीयैरभिप्रेतैः स्त्रीभिः पुंभिश्च परशरीरोपभोगेष्ववधातव्यः । २ ।

राजक्रीडाभाण्डनिधानद्रव्योपभोगेषु गूढाः शस्त्रनिधानं कुर्युः, सत्त्राजीविनश्च रात्रिचारिणोऽग्निजीविनश्चाग्निनिधानम् । ३ ।

चित्रभेककौण्डिन्यकक्रकणपञ्चकुष्ठशतपदीचूर्णमुच्चिदिङ्गकम्बलीशतकन्देध्मकृकलासचूर्णं गृहगोलिकान्धाहिकक्रकण्टकपूतिकीटगोमारिकाचूर्णं भल्लातकावल्गुजरसयुक्तं सद्यःप्राणहरम्, एतेषां वा धूमः । ४ ।

## चौदावे अधिकरण – गूढ प्रयोगांविषयी

### पहिला अध्याय

### प्रकरण १७७ : शत्रुसेनेचा नाश करण्याचे प्रयोग

१ चार वर्णांचे रक्षण करण्याच्या हेतूने अधार्मिक लोकांवर गूढ उपायांचा प्रयोग करावा.

२ देश, वेष, कला, भाषा आणि जन्म यांच्या संबंधात कोणालाही शंका येणार नाही असे वागणारे, कुबडे, खुजे, किरात, मुके, बहिरे, वेडे आणि आंधळे यांचे सोंग आणणारे, म्लेच्छ जातींतील विश्वासू स्त्री व पुरुष यांनी कालकूट आदी निरनिराळी विषे शत्रूने अंगावर धारण करावयाच्या (वस्त्रालंकारादी) वस्तूंत ठेवून द्यावीत.

३ राजाच्या खेळात वापरावयाच्या वस्तूंमध्ये आणि कोठारांतून त्याच्या उपयोगासाठी आणावयाच्या पदार्थांमध्ये गूढ पुरुषांनी शस्त्रे ठेवून द्यावीत, आणि रात्री हिंडणाऱ्या सत्री हेरांनी व आपल्या धंद्यात अग्नीचा उपयोग करणाऱ्यांनी आग लावून द्यावी.

४ चित्रभेक (ठिपके असलेला बेडूक), कौंडिन्यक, क्रकण, पंचकुष्ठ व शतपदी (गोम) यांचे चूर्ण, उच्चिदिंग, कंबली, शतकंद, इध्म व कृकलास

कीटो वाऽन्यतमस्तप्त: कृष्णसर्पप्रियङ्गुभि: ।
शोषयेदेष संयोग: सद्य:प्राणहरो मत: ।। ५ ।।

धामार्गवयातुधानमूलं भल्लातकपुष्पचूर्णयुक्तम् आर्धमासिक: । ६ ।

व्याघातकमूलं भल्लातकपुष्पचूर्णयुक्तं कीटयोगो मासिक: । ७ ।

कलामात्रं पुरुषाणां, द्विगुणं खराश्वानां, चतुर्गुणं हस्त्युष्ट्राणाम् । ८ ।

शतकर्दमोच्चिदिङ्गकरवीरकटुतुम्बीमत्स्यधूमो मदनकोद्रवपलालेन हस्तिकर्णपलाशपलालेन वा प्रवातानुवाते प्रणीतो यावच्चरति तावन्मारयति । ९ ।

पूतिकीटमत्स्यकटुतुम्बीशतकर्दमेध्मेन्द्रगोपचूर्णं पूतिकीटक्षुद्रारालाहेमविदारीचूर्णं वा बस्तशृङ्गखुरचूर्णयुक्तमन्धीकरो धूम: । १० । पूतिकरञ्जपत्रहरिताल-

(सरडा) यांचे चूर्ण, गृहगोलिका (पाल), अंधाहिक, ऋकंटक, पूतिकीट (घाण येणारा किडा), आणि गोमारिका यांचे चूर्ण भल्लातक (बिब्बा) आणि अवल्गुज यांच्या रसात मिसळले असता तात्काल प्राण हरण करते, किंवा ह्या चूर्णांचा धूर (तात्काल प्राण हरण करतो).

५ किंवा ह्यांच्यापैकी एखादा कीटक कृष्णसर्प व प्रियंगु यांच्या समवेत तापवून सुकवावा. हे मिश्रण तात्काल प्राण हरण करते असे मानतात.

६ धामार्गव व यातुधान यांच्या मुळचा भल्लातकाच्या फुलांच्या चूर्णात मिसळल्या असता ते मिश्रण पंधरा दिवसांत मृत्यू घडवून आणते.

७ व्याघातकाची मुळी भल्लातकाच्या फुलांच्या चूर्णाने युक्त करून (वरील) किडयांच्या चूर्णाबरोबर मिश्र केली की ते मिश्रण एक महिन्यात मृत्यू घडवून आणते.

८ याचे प्रमाण मनुष्यांना एक कला, गाढव व घोडे यांना दुप्पट, हत्ती व उंट यांना चौपट.

९ शतकर्दम, उच्चिदिंग, करवीर, कटुतुंबी (कडु भोपळा) व मासे यांचा धूर मदन व कोद्रव यांच्या पाचोळयाने अथवा हस्तिकर्ण व पळस यांच्या शुष्क पाल्याने वारा वहात असलेल्या दिशेला पसरविला असता जेथपर्यंत तो पसरतो तेथपर्यंत सर्व प्राण्यांना मारक होतो.

१० पूतिकीट, मासे, कडू भोपळा, शतकर्दम, इध्म आणि इंद्रगोप यांचे चूर्ण किंवा पूतिकीट, क्षुद्रा, अराला आणि हेमविदारी यांचे चूर्ण बोकडाची शिंगे व खुरे यांच्या चूर्णाबरोबर मिसळले तर त्या मिश्रणाच्या धुराने प्राणी आंधळे होतात. ११ पूतिकरंजाची पाने, हरताळ, मनशीळ, गुंजा आणि रक्त कार्पासाचा

मनःशिलागुञ्जारक्तकार्पासपलालान्यास्फोटकाचगोशकृद्रसपिष्टमन्धीकरो धूमः । ११ । सर्पनिर्मोकं गोऽश्वपुरीषमन्धाहिकशिरश्चान्धीकरो धूमः । १२ ।

पारावतप्लवकक्रव्यादानां हस्तिनरवराहाणां च मूत्रपुरीषं कासीसहिङ्गु-यवतुषकणतण्डुलाः कार्पासकुटजकोशातकीनां च बीजानि गोमूत्रिकाभाण्डी-मूलं निम्बशिग्रुफणिर्जकाक्षीवपीलुकभङ्गः सर्पशफरीचर्म हस्तिनखशृङ्गचूर्णमि-त्येष धूमो मदनकोद्रवपलालेन हस्तिकर्णपलाशपलालेन वा प्रणीतः प्रत्येकशो यावच्चरति तावन्मारयति । १३ ।

कालीकुष्ठनडशतावरीमूलं सर्पप्रचलाककृकणपञ्चकुष्ठचूर्णं वा धूमः पूर्व-कल्पेनार्द्रशुष्कपलालेन वा प्रणीतः संग्रामावतरणावस्कन्दनसंकुलेषु कृतनेजनो-दकाक्षिप्रतीकारैः प्रणीतः सर्वप्राणिनां नेत्रघ्नः । १४ । शारिकाकपोतबकबला-कालेण्डमर्काक्षिपीलुकस्नुहिक्षीरपिष्टमन्धीकरणमञ्जनम् उदकदूषणं च । १५ ।

पाचोळा हे आस्फोट, कांच व गाईच्या शेणाचा रस यांवरोबर घोटले असता त्या मिश्रणाचा धूर (प्राण्याला) आंधळा करतो. १२ सापाची कात, गाईचे शेण, घोड्याची लीद आणि अंधाहिकाचे डोके ह्या मिश्रणाचा धूर (प्राण्याला) आंधळा करतो.

१३ पारवा, बेडूक व मांसाहारी प्राणी यांची तसेच हत्ती, मनुष्य व डुक्कर यांची विष्ठा व मूत्र, कासीस, हिंग, जवाचे तूस, कण्या व दाणे, कापूस, कुडा व कोशातकी यांच्या बिया, गोमूत्रिका व भांडी यांच्या मुळ्या, कडुनिंब, शिग्रु (शेवगा) फणिर्जक, अक्षीव आणि पीलुक यांचे तुकडे, साप व शफरी माशाचे कातडे (आणि) हत्तीचे नख व सुळा यांचे चूर्ण – ह्या मिश्रणाचा धूर मदन व कोद्रव यांच्या पाचोळ्याने अथवा हस्तिकर्ण व पलाश यांच्या पाचोळ्याने वाऱ्यावरोबर पसरविला असता जेथपर्यंत तो पसरतो तेथपर्यंत हरएक प्राण्याला मारक होतो.

१४ काली, कुष्ठ, नड आणि शतावरी यांची मुळे अथवा सर्प, प्रचलाक, कृकण आणि पंचकुष्ठ यांचे चूर्ण, ह्याचा धूर वरील पद्धतीने ओल्या अथवा सुक्या पाचोळ्याने पसरविला तर – स्वतःच्या डोळ्यात अगोदर नेजनोदक घातलेल्या मनुष्यांनी शत्रुसैन्य रणात उतरत असता अथवा हल्ल्याची दंगल चालू असता पसरविला तर – सर्व प्राण्यांच्या नेत्रांना अंधत्व आणतो. १५ सारिका, कबूतर, बगळा आणि बलाका याची विष्ठा अर्क, अक्षि, पीलुक आणि स्नुहि यांच्या चिकात घोटली असता अंधत्व आणणारे अंजन तयार होते; त्याने पाणीसुद्धा दूषित होते.

**यवकशालिमूलमदनफलजातीपत्रनरमूत्रयोगः प्लक्षविदारीमूलयुक्तो मूकोदुम्बरमदनकोद्रवक्वाथयुक्तो हस्तिकर्णपलाशक्वाथयुक्तो वा मदनयोगः । १६ । शृङ्गिगौतमवृक्षकण्टकारमयूरपदीयोगो गुञ्जालाङ्गलीविषमूलिकेङ्गुदीयोगः करवीराक्षिपीलुकार्कमृगमारणीयोगो मदनकोद्रवक्वाथयुक्तो हस्तिकर्णपलाशक्वाथयुक्तो वा मदनयोगः । १७ । समस्ता वा यवसेन्धनोदकदूषणाः । १८ ।**

**कृतकण्डलकृकलासगृहगोलिकान्धाहिकधूमो नेत्रवधमुन्मादं च करोति । १९ । कृकलासगृहगोलिकायोगः कुष्ठकरः । २० । स एव चित्रभेकान्त्रमधुयुक्तः प्रमेहमापादयति, मनुष्यलोहितयुक्तः शोषम् । २१ ।**

**दूषीविषं मदनकोद्रवचूर्णमपजिह्विकायोगः । २२ ।**

**मातृवाहकाञ्जलिकारप्रचलाकभेकाक्षिपीलुकयोगो विषूचिकाकरः । २३ ।**

**पञ्चकुष्ठककौण्डिन्यकराजवृक्षपुष्पमधुयोगो ज्वरकरः । २४ ।**

**भासनकुलजिह्वाग्रन्थिकायोगः खरीक्षीरपिष्टो मूकबधिरकरो मासार्धमासिकः । २५ ।**

१६ जव आणि शालि यांच्या मुळ्या, मदनफळ, जायपत्री आणि मनुष्याचे मूत्र यांचे मिश्रण, प्लक्ष व विदारी यांच्या मुळांनी युक्त, मूक, उदुंबर, मदन व कोद्रव यांच्या काढ्यात अथवा हस्तिकर्ण व पलाश यांच्या काढ्यात मिसळले असता ते शुद्ध हरपण्यास लावते. १७ शृंगि, गौतमवृक्ष, कंटकार आणि मयूरपदी यांचे मिश्रण, गुंजा, लांगली, विषमूलिका आणि इंगुदी यांचे मिश्रण, करवीर, अक्षि, पीलुक, अर्क व मृगमारणी यांचे मिश्रण, मदन व कोद्रव यांच्या काढ्यात अथवा हस्तिकर्ण व पलाश यांच्या काढ्यात मिसळले असता ते शुद्ध हरपविणारे मिश्रण होते. १८ अथवा ही सर्व मिश्रणे गवत, लाकूडफाटा आणि पाणी यांना दूषित करतात.

१९ कृतकंडल, कृकलास, गृहगोलिका आणि अंधाहिक यांचा धूर दृष्टी नष्ट करतो आणि उन्माद उत्पन्न करतो. २० कृकलास व गृहगोलिका यांचे मिश्रण कुष्ठ उत्पन्न करतो. २१ हेच मिश्रण त्यात चित्रभेकाचे आतडे व मध मिसळल्यास प्रमेह उत्पन्न करते, मनुष्याचे रक्त मिसळल्यास क्षयरोग उत्पन्न करते.

२२ दूषीविष, मदन आणि कोद्रव यांचे चूर्ण, ह्या मिश्रणाने जीभ लुळी पडते.

२३ मातृवाहक, अंजलिकार, प्रचलाक, भेक, अक्षि आणि पीलुक यांचे मिश्रण विषूचिका (कॉलरा) उत्पन्न करते.

२४ पंचकुष्ठ, कौडिन्यक, राजवृक्षाचे फूल व मध यांचे मिश्रण ताप आणते.

२५ भास व नकुल (यांचे मांस), जिव्हा आणि ग्रंथिका यांचे मिश्रण गाढवीच्या दुधात खलून दिले असता मनुष्य महिन्यात किंवा पंधरा दिवसांत मुका व बहिरा होतो.

कलामात्रं पुरुषाणामिति समानं पूर्वेण । २६ । भङ्गक्वाथोपनयनमौषधानाम्, चूर्णं प्राणभृताम्, सर्वेषां वा क्वाथोपनयनम्, एवं वीर्यवत्तरं भवति । २७ । इति योगसंपत् । २८ ।

शाल्मलीविदारीधान्यसिद्धो मूलवत्सनाभसंयुक्तश्चुच्छुन्दरीशोणितप्रलेपेन दिग्धो बाणो यं विध्यति स विद्धोऽन्यान् दश पुरुषान् दशति, ते दष्टा दशान्यान् दशन्ति पुरुषान् । २९ । भल्लातकयातुधानावानुधामार्गवबाणानां पुष्पैरेलकाक्षिगुग्गुलुहालाहलानां च कषायं बस्तनरशोणितयुक्तं दंशयोगः । ३० । ततोऽर्धधरणिको योगः सक्तुपिण्याकाभ्यामुदके प्रणीतो धनुःशतायाममुदकाशयं दूषयति । ३१ । मत्स्यपरम्परा ह्येतेन दष्टाऽभिमृष्टा वा विषीभवति, यश्चैतदुदकं पिबति स्पृशति वा । ३२ ।

रक्तश्वेतसर्षपैर्गोधा त्रिपक्षमुष्ट्रिकायां भूमौ निखातायां निहिता वध्येनोद्धृता यावत्पश्यति तावन्मारयति, कृष्णसर्पो वा । ३३ ।

२६ मनुष्यांसाठी प्रमाण एक कला इत्यादी सर्व पूर्वीप्रमाणेच. २७ वनस्पतींच्या बाबतीत त्यांच्या चूर्णाचा काढा द्यावा, प्राण्यांच्या संबंधात त्यांचे चूर्ण द्यावे, अथवा सर्वांच्या बाबतीत काढा करून द्यावा, त्यायोगे ती अधिक परिणामकारक होतात. २८ हे झाले मिश्रणांचे उत्कृष्ट गुण.

२९ शाल्मली आणि विदारी यांच्या बियांत सिद्ध केलेला, मूल व वत्सनाभ यांचे मिश्रण लावलेला आणि चिचुंद्रीच्या रक्ताचा लेप लावलेला बाण ज्या मनुष्याला विद्ध करतो तो दुसऱ्या दहा मनुष्यांना चावतो, आणि ते चावले गेलेले इतर दहा मनुष्यांना चावतात (आणि त्या सर्वांना विषाची बाधा होते). ३० भल्लातक, यातुधान, अवानु, धामार्गव आणि बाण यांच्या पुष्पांसहित एलक, अक्षि, गुग्गुळ आणि हालाहल यांचा काढा बोकड व पुरुष यांच्या रक्तात मिसळला असता चावावयास लावणारे मिश्रण तयार होते. ३१ अर्धा धरण वजनाचे हे मिश्रण सातूचे पीठ व पेंड यांच्याबरोबर पाण्यात टाकले असता शंभर योजने विस्तृत असलेला जलाशय दूषित करते. ३२ कारण, ह्या पाण्याने चावले गेलेले अथवा स्पर्शिलेले माशांचे थवे विषारी होतात, तसेच जो कोणी हे पाणी पितो अथवा त्याला स्पर्श करतो तोसुद्धा विषारी होतो.

३३ तांबडचा व पांढऱ्या मोहऱ्यांसह घोरपड मडक्यात घालून तीन पंधरवडेपर्यंत जमिनीत पुरून ठेवून वधाची शिक्षा झालेल्या मनुष्याकडून बाहेर काढली असता ती जितक्या प्राण्यांवर दृष्टी टाकते तितके मृत्युमुखी पडतात; कृष्णसर्पही असेच घडवून आणतो.

विद्युत्प्रदग्धोऽङ्गारो ज्वालो वा विद्युत्प्रदग्धैः काष्ठैर्गृहीतश्चानुवासितः कृत्तिकासु भरणीषु वा रौद्रेण कर्मणाऽभिहुतोऽग्निः प्रणीतश्च निष्प्रतीकारो दहति । ३४ ।

कर्मारादग्निमाहृत्य क्षौद्रेण जुहुयात्पृथक् ।
सुरया शौण्डिकादग्निं मार्गतोऽग्निं घृतेन च ।। ३५ ।।
माल्येन चैकपत्न्यग्निं पुंश्चल्यग्निं च सर्षपैः ।
दध्ना च सूतिकास्वग्निमाहिताग्निं च तण्डुलैः ।। ३६ ।।
चण्डालाग्निं च मांसेन चिताग्निं मानुषेण च ।
समस्तान् बस्तवसया मानुषेण ध्रुवेण च ।। ३७ ।।
जुहुयादग्निमन्त्रेण राजवृक्षस्य दारुभिः ।
एष निष्प्रतिकारोऽग्निर्द्विषतां नेत्रमोहनः ।। ३८ ।।

अदिते नमस्ते, अनुमते नमस्ते, सरस्वति नमस्ते, देव सवितर्नमस्ते । ३९ । अग्नये स्वाहा, सोमाय स्वाहा, भूः स्वाहा, भुवः स्वाहा । ४० ।

इत्यौपनिषदिके चतुर्दशेऽधिकरणे परबलघातप्रयोगः प्रथमोऽध्यायः ।
आदितः षट्चत्वारिंशच्छततमः ।

३४ विजेने जळालेला कोळसा किंवा अग्नि विजेने जळालेल्या लाकडांनी पेटवून आणि सारखा पेटत ठेवून कृत्तिका नक्षत्रावर अथवा भरणी नक्षत्रावर त्यात रुद्र देवतेसाठी विधिपूर्वक होम केला असता त्या अग्नीने आग लावली तर ती विझविता येत नाही.

३५–३८ लोहाराकडून अग्नी आणून त्यात मधाचा स्वतंत्रपणे होम करावा; दारूच्या दुकानदाराकडून अग्नी आणून त्यात मद्याचा होम करावा; रस्त्यावरील अग्नीत तुपाचा; पतिव्रतेच्या घरातील अग्नीत फुलांचा; छिनाल स्त्रीच्या घरातील अग्नीत मोहऱ्यांचा; बाळंत झालेल्या स्त्रीच्या घरातील अग्नीत दह्याचा; आहिताग्नीच्या घरातील अग्नीत तांदुळाचा; चंडालाकडील अग्नीत मांसाचा; चितेतील अग्नीत मनुष्यमांसाचा; (याप्रमाणे स्वतंत्रपणे होम केल्यावर) सर्व अग्नी एकत्र करून त्यात बोकडाच्या चरबीचा आणि मनुष्याच्या ध्रुवाचा राजवृक्षाच्या लाकडांसह, अग्निमंत्राचे उच्चारण करून, होम करावा. हा अग्नी विझविला जात नाही आणि तो शत्रूंच्या नेत्रांना भुरळ पाडतो.

३९ हे अदिती, तुला नमस्कार असो; हे अनुमती, तुला नमस्कार असो; हे सरस्वती, तुला नमस्कार असो; हे सविता देवा, तुला नमस्कार असो. ४० अग्नीला स्वाहा, सोमाला स्वाहा, भूः स्वाहा, भुवः स्वाहा.

२

**[ अष्टसप्ततिशततमं प्रकरणम् – प्रलम्भनम्, तत्र अद्भुतोत्पादनम् ]**

**शिरीषोदुम्बरशमीचूर्णं सर्पिषा संहृत्यार्धमासिकः क्षुद्योगः । १ । कशेरुकोत्पलकन्देक्षुमूलबिसदूर्वाक्षीरघृतमण्डसिद्धो मासिकः । २ । माषयवकुलत्थदर्भमूलचूर्णं वा क्षीरघृताभ्याम्, वल्लीक्षीरघृतं वा समसिद्धं, सालपृश्निपर्णीमूलकल्कं पयसा पीत्वा, पयो वा तत्सिद्धं मधुघृताभ्यामशित्वा मासमुपवसति । ३ ।**

**श्वेतबस्तमूत्रे सप्तरात्रोषितैः सिद्धार्थकैः सिद्धं तैलं कटुकालाबौ मासार्धमासस्थितं चतुष्पदद्विपदानां विरूपकरणम् । ४ । तक्रयवभक्षस्य सप्तरात्रादूर्ध्वं श्वेतगर्दभस्य लेण्डयवैः सिद्धं गौरसर्षपतैलं विरूपकरणम् । ५ । एतयोरन्यतरस्य मूत्रलेण्डरससिद्धं सिद्धार्थकतैलमर्कतूलपतङ्गचूर्णप्रतीवापं श्वेतीकरणम् । ६ । श्वेतकुक्कुटाजगरलेण्डयोगः श्वेतीकरणम् । ७ । श्वेतबस्तमूत्रे श्वेतसर्षपाः**

## दुसरा अध्याय

## प्रकरण १७८ : गूढ प्रयोगांनी भुरळ पाडणे : (१) चमत्कार करून दाखविणे

१ शिरीष, उदुंबर आणि शमी यांचे चूर्ण तुपाबरोबर मिसळून घेतल्यास पंधरा दिवसपर्यंत भूक लागत नाही. २ कशेरुक व उत्पल यांचे कंद, उसाचे मूळ, बिसतंतू, दुर्वा, दूध, तूप आणि मलई यांनी सिद्ध केलेले मिश्रण घेतल्यास एक महिना भूक लागत नाही. ३ उडीद, जव, कुळीथ व दर्भाच्या मुळ्या यांचे चूर्ण दूध व तूप यांच्याबरोबर (घेतल्यास) अथवा वल्लीचा रस व तूप समभाग उकळवून सिद्ध केलेले (घेतल्यास), अथवा साल आणि पृश्निपर्णी यांच्या मुळ्यांच्या लगद्याबरोबर दूध प्याल्यास, अथवा दुधाबरोबर तो लगदा उकळवून मध व तूप यांच्यावरोबर घेतल्यास एक महिनाभर उपाशी रहाता येते.

४ पांढऱ्या बोकडाच्या मूत्रात सात रात्री ठेवलेल्या मोहऱ्यांचे काढलेले तेल कडू भोपळ्यात दीड महिना ठेवले असता चार पायांच्या व दोन पायांच्या प्राण्यांचे रूप पालटून टाकते. ५ सात दिवस ताकात भिजविलेले जव खाणाऱ्या पांढऱ्या गाढवाच्या लिदीतील जवांनी सिद्ध केलेले पांढऱ्या मोहऱ्यांचे तेल विरूप करण्याचा उपाय आहे. ६ ह्या दोघांपैकी कोणत्याही एकाच्या मूत्र व लेंडयांच्या रसात सिद्ध केलेले मोहरीचे तेल, त्यात अर्क, तूल व पतंग यांचे चूर्ण मिसळले असता, रंग पांढरा करते. ७ पांढरा कोंबडा व अजगर यांच्या विष्ठेचे मिश्रण (अंगाचा) रंग पांढरा करते. ८ पांढऱ्या बोकडाच्या मूत्रात सात रात्री भिजत ठेवलेल्या पांढऱ्या मोहऱ्या, ताक, अर्कवृक्षाचा चीक, मीठ आणि धान्य यांचे

सप्तरात्रोषितास्तक्रमर्कक्षीरलवणं धान्यं च पक्षस्थितो योगः श्वेतीकरणम् । ८ । कटुकालाबौ वल्लीगते गतमर्धमासस्थितं गौरसर्षपपिष्टं रोम्णां श्वेतीकरणम् । ९ ।

अलोजुनेति यः कीटः श्वेता च गृहगोलिका ।
एतेन पिष्टेनाभ्यक्ताः केशाः स्युः शङ्खपाण्डराः ।। १० ।।

गोमयेन तिन्दुकारिष्टकल्केन वा मर्दिताङ्गस्य भल्लातकरसानुलिप्तस्य मासिकः कुष्ठयोगः । ११ । कृष्णसर्पमुखे गृहगोलिकामुखे वा सप्तरात्रोषिता गुञ्जाः कुष्ठयोगः । १२ । शुकपित्ताण्डरसाभ्यङ्गः कुष्ठयोगः । १३ । कुष्ठस्य प्रियालकल्ककषायः प्रतीकारः । १४ ।

कुक्कुटकोशातकीशतावरीमूलयुक्तमाहारयमाणो मासेन गौरो भवति । १५ ।
वटकषायस्नातः सहचरकल्कदिग्धः कृष्णो भवति । १६ ।
शकुनकङ्गुतैलयुक्ता हरितालमनःशिलाः श्यामीकरणम् । १७ ।
खद्योतचूर्णं सर्षपतैलयुक्तं रात्रौ ज्वलति । १८ ।

मिश्रण एक पंधरवडा ठेवले असता ते (शरीराचा) रंग पांढरा करते. ९ वेलीवर असलेल्या कडू भोपळ्यात ठेवून पंधरा दिवस राहू दिलेले पांढऱ्या मोहऱ्यांचे पीठ केस पांढरे करून टाकते.

१० अलोजुन नावाचा किडा आणि पांढरी पाल हे एकत्र खलून केसांना चोपडले तर ते शंखासारखे पांढरे होतील.

११ गाईच्या शेणाने अथवा तिंदुक आणि अरिष्ट यांच्या लगद्याने शरीराला मर्दन करून वर बिब्ब्याच्या रसाचा लेप केला तर एक महिन्यात कुष्ठरोग होतो. १२ कृष्णसर्पाच्या मुखात अथवा पालीच्या मुखात सात रात्री राहिलेल्या गुंजा कुष्ठरोग उत्पन्न करतात. १३ पोपटाचे पित्त व त्याच्या अंड्यातील बलक सर्व अंगाला चोपडले असता कुष्ठरोग होतो. १४ प्रियाल वृक्षाच्या गराचा काढा कुष्ठ बरे करण्याचा उपाय आहे.

१५ कुक्कुट, कोशातकी आणि शतावरी यांच्या मुळ्यांनी युक्त आहार घेणारा मनुष्य एक महिन्याने गोरा होतो.

१६ वडाच्या काढ्याने स्नान करून सहचराचा गर अंगास चोपडला तर मनुष्य काळा होतो.

१७ शकुन व कंगु यांच्या तेलात मिसळलेले हरताळ व मनशीळ शरीर श्यामवर्ण करतात.

१८ मोहरीच्या तेलात मिसळलेले काजव्यांचे चूर्ण रात्री अग्नीचा भास उत्पन्न करते.

खद्योतगण्डूपदचूर्णं समुद्रजन्तूनां भृङ्गकपालानां खदिरकर्णिकाराणां पुष्पचूर्णं वा शकुनकङ्गुतैलयुक्तं तेजनचूर्णम् । १९ ।

पारिभद्रकत्वङ्मषी मण्डूकवसया युक्ता गात्रप्रज्वालनमग्निना । २० । पारिभद्रकत्वक्तिलकल्कप्रदिग्धं शरीरमग्निना ज्वलति । २१ ।

पीलुत्वङ्मषीमयः पिण्डो हस्ते ज्वलति । २२ । मण्डूकवसादिग्धोऽग्निना ज्वलति । २३ । तेन प्रदिग्धमङ्गं कुशाम्रफलतैलसिक्तं समुद्रमण्डूकीफेनकसर्जरसचूर्णयुक्तं वा ज्वलति । २४ । मण्डूककुलीरादीनां वसया समभागं तैलं सिद्धमभ्यङ्गं गात्राणामग्निप्रज्वालनम् । २५ । वेणुमूलशैवललिप्तमङ्गं मण्डूकवसादिग्धमग्निना ज्वलति । २६ ।

पारिभद्रकप्रतिबलावञ्जुलवज्रकदलीमूलकल्केन मण्डूकवसासिद्धेन तैलेनाभ्यक्तपादोऽङ्गारेषु गच्छति । २७ ।

उपोदका प्रतिबला वञ्जुलः पारिभद्रकः ।
एतेषां मूलकल्केन मण्डूकवसया सह ।। २८ ।।

१९ काजवे आणि गंडूपद यांचे चूर्ण, अथवा समुद्रजन्तू, भृंगकपाल, खदिर व कर्णिकार ह्यांच्या फुलांचे चूर्ण, शकुन व कंगु यांच्या तेलात मिसळले असता (पदार्थ) चकाकावयास लावणारे चूर्ण बनते.

२० पारिभद्रकाच्या सालीची काजळी बेडकाच्या चरबीत मिसळली (व अंगास चोपडली) तर शरीर अग्नीने पेटले असल्याचा भास उत्पन्न करते. २१ पारिभद्रकाची साल व तीळ यांचा कल्क शरीरास चोपडला असता ते अग्नीने पेटते.

२२ पीलूच्या सालीच्या काजळीचा गोळा हातात जळतो. २३ त्याला बेडकाच्या चरबीचा लेप केला तर तो अग्नीने पेटतो. २४ ते अंगाला चोपडले असता अथवा समुद्रमंडूकी, समुद्रफेन व सर्जरस यांच्या चूर्णाने मिश्रित कुशाम्राच्या फळाचे तेल अंगावर शिंपडले असता शरीर अग्नीने पेट घेते. २५ बेडूक, खेकडा आदींच्या चरबीसह समभाग सिद्ध केलेले तेल सर्व अंगाला चोपडले तर अवयव प्रज्वलित होतात. २६ वेणूच्या मुळ्या आणि शेवाळे यांचा अंगाला लेप करून बेडकाची चरबी चोपडली म्हणजे शरीर अग्नीने पेटते.

२७ पारिभद्रक, प्रतिबला, वंजुल आणि वज्रकदली यांच्या मुळ्यांचा कल्क आणि बेडकाची चरबी यांच्यासह (उकळून) सिद्ध केलेले तेल पायांना चोपडून मनुष्य निखाऱ्यावरून चालू शकतो.

२८–२९ उपोदका, प्रतिबला, वंजुल आणि पारिभद्रक यांच्या मुळ्यांचा कल्क (वाटून केलेला गोळा) आणि बेडकाची चरबी यांच्यासह (उकळून)

साधयेत्तैलमेतेन पादावभ्यज्य निर्मलौ ।
अङ्गाररराशौ विचरेद्यथा कुसुमसंचये ।। २९ ।।

हंसक्रौञ्चमयूराणामन्येषां वा महाशकुनीनामुदकप्लवानां पुच्छेषु बद्धा नलदीपिका रात्रावुल्कादर्शनम् । ३० ।

वैद्युतं भस्माग्निशमनम् । ३१ ।

स्त्रीपुष्पपायिता माषा व्रजकुलीमूलं मण्डूकवसामिश्रं चुल्लयां दीप्तायामपाचनम् । ३२ । चुल्लीशोधनं प्रतीकारः । ३३ ।

पीलुमयो मणिरग्निगर्भः सुवर्चलामूलग्रन्थिः सूत्रग्रन्थिर्वा पिचुपरिवेष्टितो मुखादग्निधूमोत्सर्गः । ३४ ।

कुशाम्रफलतैलसिक्तोऽग्निर्वर्षप्रवातेषु ज्वलति । ३५ । समुद्रफेनकस्तैलयुक्तोऽम्भसि प्लवमानो ज्वलति । ३६ । प्लवमानानामस्थिषु कल्माषवेणुना निर्मथितोऽग्निर्नोदकेन शाम्यति, उदकेन ज्वलति । ३७ ।

तेल सिद्ध करावे, स्वच्छ केलेल्या पायांना ते तेल लावून मनुष्य फुलांच्या ढिगावरून चालत जावे त्याप्रमाणे पेटलेल्या कोळशांच्या राशीवरून चालत जाऊ शकेल.

३० हंस, क्रौंच व मोर किंवा दुसरे मोठे पाण्यावर तरंगणारे पक्षी यांच्या शेपटांस बोरूचे पेटविलेले दिवे बांधले असता रात्री उल्कापात होत असल्याचे दृश्य दिसते.

३१ विजेने जळालेल्या वृक्षाची राख अग्नी विझवून टाकते.

३२ स्त्रीच्या ऋतुस्रावात भिजविलेले उडीद व बेडकाच्या चरबीत मिसळलेले व्रजकुलीचे मूळ, चूल पेटलेली असली तरी, अन्न शिजण्यास प्रतिबंध करतात. ३३ (ते पदार्थ काढून टाकून) चूल शुद्ध करणे हा त्यावर उपाय.

३४ पीलूच्या लाकडाचा बनविलेला (पोकळ) चेंडू, आत अग्नी असलेला, कापसाने वेष्टिलेली सुवर्चलेच्या मुळाची गाठ अथवा दोऱ्याची गाठ (चेंडूच्या तोंडाशी असलेली), (हा चेंडू तोंडात धरला असता) मुखातून अग्नी व धूर बाहेर सोडता येतो.

३५ कुशाम्राच्या फळाच्या तेलाने शिंपडलेला अग्नी पावसात व झंझावातात जळत रहातो (विझत नाही). ३६ तेलात बुडविलेला समुद्रफेन पाण्यावर तरंगत जळत रहातो. ३७ पाण्यात पोहणाऱ्या पक्ष्यांच्या हाडांतून ठिपक्याठिपक्याच्या वेळूने मंथन करून काढलेला अग्नी पाण्याने विझत नाही, उलट पाण्याने अधिक पेटतो.

शस्त्रहतस्य शूलप्रोतस्य वा पुरुषस्य वामपार्श्वपर्शुकास्थिषु कल्माषवेणुना निर्मथितोऽग्निः स्त्रियाः पुरुषस्य वाऽस्थिषु मनुष्यपर्शुकया निर्मथितोऽग्निर्यत्र त्रिरपसव्यं गच्छति न चात्रान्योऽग्निर्ज्वलति । ३८ ।

चुच्छुन्दरी खञ्जरीटः खारकीटश्च पिष्यते ।
अश्वमूत्रेण संसृष्टा निगलानां तु भञ्जनम् ।। ३९ ।।

अयस्कान्तो वा पाषाणः कुलीरदर्दुरखारकीटवसाप्रदेहेन द्विगुणः । ४० ।

नारकगर्भः कङ्कभासपार्श्वोत्पलोदकपिष्टश्चतुष्पदद्विपदानां पादलेपः । ४१ । उलूकगृध्रवसाभ्यामुष्ट्रचर्मोपानहावभ्यज्य वटपत्रैः प्रतिच्छाद्य पञ्चाशद्योजनान्यश्रान्तो गच्छति । ४२ । श्येनकङ्ककाकगृध्रहंसक्रौञ्चवीचीरल्लानां मज्जानो रेतांसि वा योजनशताय, सिंहव्याघ्रद्वीपिकाकोलूकानां मज्जानो रेतांसि वा । ४३ । सार्ववर्णिकानि गर्भपतनान्युष्ट्रिकायामभिषूय श्मशाने प्रेतशिशून् वा तत्समुत्थितं मेदो योजनशताय । ४४ ।

३८ शस्त्राने ठार केलेल्या अथवा सुळावर चढविलेल्या पुरुषाच्या डाव्या बाजूच्या बरगडीच्या हाडांतून ठिपक्याठिपक्याच्या वेळूने मंथन करून काढलेला अग्नी किंवा स्त्रीच्या अथवा पुरुषाच्या हाडांतून मनुष्याच्या बरगडीने मंथन करून काढलेला अग्नी ज्या ठिकाणी तीन वेळा डावीकडून उजवीकडे प्रदक्षिणेने नेला असेल त्या ठिकाणी दुसरा अग्नी पेट घेत नाही.

३९ चिचुंद्री, खंजरीट आणि खारकीट यांचे पीठ करतात; घोड्याच्या मूत्रात ते मिसळले असता साखळदंड तोडून टाकते.

४० किंवा अयस्कांत मणी, खेकडा, बेडूक व खारकीट यांच्या चरबीच्या लेपाने दुप्पट वीर्यवान केला तर (तो साखळदंड तोडून टाकतो).

४१ वासराच्या गर्भावरील वार, कंक व भास ह्या पक्ष्यांच्या बाजूचे भाग, उत्पल व पाणी यांच्याबरोबर दळली असता चतुष्पद व द्विपद यांच्या पायांना लावण्याचा लेप तयार होतो, (मग कितीही चालले तरी थकवा वाटत नाही). ४२ उंटाच्या कातड्याच्या जोड्यांना घुबड व गिधाड यांची चरबी चोपडून आणि वर वडाची पाने बांधून ते घातले असता मनुष्य न दमता पन्नास योजने चालू शकतो. ४३ श्येन, कंक, कावळा, गिधाड, हंस, क्रौंच आणि वीचीरल्ल यांच्या मज्जा किंवा रेत याच्या लेपाने शंभर योजने चालू शकतो किंवा सिंह वाघ, चित्ता, कावळा व घुबड यांच्या मज्जा अथवा रेत याच्या लेपाने (शंभर योजने चालतो). ४४ गर्भपात होऊन पडलेले सर्व वर्णांचे गर्भ मातीच्या भांड्यात मुरवून अथवा स्मशानात अर्भकांची प्रेते मुरवून त्यापासून निघणारी चरबी (न दमता) शंभर योजने चालण्यास उपयुक्त होते.

अनिष्टैरद्भुतोत्पातैः परस्योद्वेगमाचरेत् ।
आराज्यायेति निर्वादः समानः कोप उच्यते ।। ४५ ।।

इत्यौपनिषदिके चतुर्दशेऽधिकरणे प्रलम्भने अद्भुतोत्पादनं द्वितीयोऽध्यायः ।
आदितः सप्तचत्वारिंशच्छततमः ।

३

[ अष्टसप्ततिशततमं प्रकरणम् – प्रलम्भनम्, तत्र भैषज्यमन्त्रयोगः ]

**मार्जारोष्ट्रवृकवराहश्वाविद्वागुलीनप्तृकाकोलूकानामन्येषां वा निशाचराणां सत्त्वानामेकस्य द्वयोर्बहूनां वा दक्षिणानि वामानि चाक्षीणि गृहीत्वा द्विधा चूर्णं कारयेत् । १ । ततो दक्षिणं वामेन वामं दक्षिणेन समभ्यज्य रात्रौ तमसि च पश्यति । २ ।**

**एकाम्लकं वराहाक्षि खद्योतः कालशारिवा ।**
**एतेनाभ्यक्तनयनो रात्रौ रूपाणि पश्यति ।। ३ ।।**

**त्रिरात्रोपोषितः पुष्येण शस्त्रहतस्य शूलप्रोतस्य वा पुंसः शिरःकपाले मृत्तिकायां यवानावास्याविक्षीरेण सेचयेत् । ४ । ततो यवविरूढमालामाबध्य नष्टच्छायारूपश्चरति । ५ ।**

४५ हे अनिष्ट चमत्कार व उत्पात उत्पन्न करून शत्रूला घाबरवून सोडावे. राज्य बळकट करण्यासाठी असल्यामुळे प्रजेच्या प्रक्षोभाच्या समयी यांचा असाच उपयोग करणे निंद्य नाही.

## तिसरा अध्याय

## प्रकरण १७८ (पुढे चालू) : (२) औषधी व मंत्र यांचे प्रयोग

१ मांजर, उंट, लांडगा, डुक्कर, साळू, वटवाघूळ, नप्तृ, कावळा, घुबड किंवा इतर रात्री संचार करणाऱ्या एक, दोन किंवा अधिक प्राण्यांचे उजवे आणि डावे डोळे घेऊन त्यांची दोन निरनिराळी चूर्णे करावीत. २ नंतर डाव्या डोळ्यांच्या चूर्णाने उजव्या डोळ्यात आणि उजव्या डोळ्यांच्या चूर्णाने डाव्या डोळ्यात अंजन केल्यास मनुष्य रात्री आणि अंधारात पाहू शकतो.

३ एक अम्लक, डुकराचा डोळा, काजवा आणि कालशारिवा, ह्या मिश्रणाचे अंजन डोळ्यात घातले असता मनुष्य रात्री पदार्थ पाहू शकतो.

४ तीन दिवस उपास करून पुष्य नक्षत्रावर शस्त्राने ठार केलेल्या अथवा सुळावर चढविलेल्या पुरुषाच्या डोक्याच्या कवटीत जव मातीत पेरून त्यावर मेंढीचे दूध शिंपडावे. ५ नंतर उगवलेल्या जवांच्या रोपांची माळ गळ्यात घातल्यास मनुष्य कोणास न दिसता व आपली छायाही न दिसेल अशा रीतीने हिंडू शकतो.

**त्रिरात्रोपोषितः पुष्येण श्वमार्जारोलूकवागुलीनां दक्षिणानि वामानि चाक्षीणि द्विधा चूर्णं कारयेत् । ६ । ततो यथास्वमभ्यक्ताक्षो नष्टच्छायारूपश्चरति । ७ ।**

**त्रिरात्रोपोषितः पुष्येण पुरुषघातिनः काण्डकस्य शलाकामञ्जनीं च कारयेत् । ८ । ततोऽन्यतमेनाक्षिचूर्णेनाभ्यक्ताक्षो नष्टच्छायारूपश्चरति । ९ ।**

**त्रिरात्रोपोषितः पुष्येण कालायसीमञ्जनीं शलाकां च कारयेत् । १० । ततो निशाचराणां सत्त्वानामन्यतमस्य शिरःकपालमञ्जनेन पूरयित्वा मृतायाः स्त्रिया योनौ प्रवेश्य दाहयेत् । ११ । तदञ्जनं पुष्येणोद्धृत्य तस्यामञ्जन्यां निदध्यात् । १२ । तेनाभ्यक्ताक्षो नष्टच्छायारूपश्चरति । १३ ।**

**यत्र ब्राह्मणमाहिताग्निं दग्धं दह्यमानं वा पश्येत् तत्र त्रिरात्रोपोषितः पुष्येण स्वयंमृतस्य वाससा प्रसेवं कृत्वा चिताभस्मना पूरयित्वा तमाबध्य नष्टच्छायारूपश्चरति । १४ ।**

६ तीन दिवस उपास करून पुष्य नक्षत्रावर कुत्रा, मांजर, घुबड व वटवाघूळ यांच्या उजव्या आणि डाव्या डोळ्यांची दोन निरनिराळी चूर्णे करावीत ७ नंतर ज्या त्या डोळ्यांचे चूर्ण ज्या त्या डोळ्यात घातल्यास मनुष्याची छाया नष्ट होऊन तो अदृश्य रूपात हिंडू शकतो.

८ तीन दिवस उपास करून पुष्य नक्षत्रावर मनुष्याचा खून करणाऱ्याच्या मांडीच्या हाडापासून सळई व अंजन ठेवण्याची डबी करावी. ९ नंतर वरीलपैकी कोणत्याही एका प्राण्याच्या नेत्रचूर्णाचे डोळ्यात अंजन घातले असता छाया नष्ट होऊन मनुष्य अदृश्य रूपात हिंडू शकतो.

१० तीन दिवस उपास करून पुष्य नक्षत्रावर लोखंडाची अंजन ठेवण्याची डबी व सळई करावी. ११ नंतर रात्री संचार करणाऱ्या कोणत्याही एका प्राण्याच्या डोक्याच्या कवटीत अंजन भरून ती मेलेल्या स्त्रीच्या योनीत ठेवून जाळावी. १२ (कवटीतील) ते अंजन पुष्य नक्षत्रावर बाहेर काढून त्या (लोखंडी) डबीत ठेवावे. १३ ते अंजन डोळ्यात घातले असता छाया नष्ट होऊन मनुष्य अदृश्य रूपात हिंडू शकतो.

१४ जेथे आहिताग्नी ब्राह्मणाचे प्रेत जळलेले अथवा जळत असलेले दिसेल तेथे, तीन दिवस उपास करून पुष्य नक्षत्रावर, स्वाभाविक मृत्यू आलेल्या मनुष्याच्या अंगावरील कापडाची पिशवी करून तीत (ब्राह्मणाच्या) चितेतील राख भरावी, ती पिशवी गळयात बांधली असता छाया नष्ट होऊन मनुष्य अदृश्य रूपात हिंडू शकतो.

ब्राह्मणस्य प्रेतकार्ये यो गौर्मार्यते तस्यास्थिमज्जचूर्णपूर्णाऽहिभस्त्रा पशूनामन्तर्धानम् । १५ ।

सर्पदष्टस्य भस्मना पूर्णा प्रचलाकभस्त्रा मृगाणामन्तर्धानम् । १६ ।

उलूकवागुलीपुच्छपुरीषजान्वस्थिचूर्णपूर्णाऽहिभस्त्रा पक्षिणामन्तर्धानम् । १७ । इत्यष्टावन्तर्धानयोगाः । १८ ।

'बलिं वैरोचनं वन्दे शतमायं च शम्बरम् ।
भण्डीरपाकं नरकं निकुम्भं कुम्भमेव च ।। १९ ।।
देवलं नारदं वन्दे वन्दे सावर्णिगालवम् ।
एतेषामनुयोगेन कृतं ते स्वापनं महत् ।। २० ।।
यथा स्वपन्त्यजगराः स्वपन्त्यपि चमूखलाः ।
तथा स्वपन्तु पुरुषा ये च ग्रामे कुतूहलाः ।। २१ ।।
भण्डकानां सहस्रेण रथनेमिशतेन च ।
इमं गृहं प्रवेक्ष्यामि तूष्णीमासन्तु भाण्डकाः ।। २२ ।।
नमस्कृत्वा च मनवे बद्ध्वा शुनकफेलकाः ।
ये देवा देवलोकेषु मानुषेषु च ब्राह्मणाः ।। २३ ।।

१५ ब्राह्मणाच्या प्रेतकार्यात जो बैल मारला जातो त्याची हाडे व मज्जा यांच्या चूर्णाने भरलेली सापाच्या कातडचाची पिशवी गळयात बांधल्यास पशू अदृश्य होतात.

१६ सर्पदंशाने मेलेल्या मनुष्याच्या प्रेताची राख भरलेली प्रचलाकाच्या कातडचाची पिशवी हरिणांना अदृश्य करते.

१७ घुबड आणि वटवाघूळ यांचे शेपूट, विष्ठा व गुडघ्याचे हाड यांच्या चूर्णाने भरलेली सर्पाच्या कातडचाची पिशवी पक्ष्यांना अदृश्य करते. १८ असे हे आठ अदृश्य होण्याचे प्रयोग आहेत.

१९–२० "मी विरोचनपुत्र बलीला वंदन करतो आणि शंभर माया निर्माण करणाऱ्या शंबराला वंदन करतो. भंडीरपाक, नरक, निकुंभ आणि कुंभ ह्यालासुद्धा (वंदन करतो). मी देवल, नारद यांना वंदन करतो, सावर्णि गालवाला वंदन करतो. ह्यांचे स्मरण करून तुला गाढ निद्रेत टाकले आहे.

२१ ज्याप्रमाणे अजगर झोपी जातात आणि चमूखलसुद्धा झोपी जातात त्याप्रमाणे गावात जे पुरुष कुतूहलयुक्त असतील ते झोपी जावोत.

२२ हजार भांडी घेऊन आणि शंभर रथांच्या धावांसह मी ह्या घरात प्रवेश करणार आहे. भांडचांचा आवाज न होवो.

२३–२४ आणि मनूला नमस्कार करून, कुत्र्यांची तोंडे बांधून, देवलोकात जे देव आहेत व मनुष्यांमध्ये ब्राह्मण आहेत, जे विद्येत पारंगत सिद्ध व कैलास-

अध्ययनपारगाः सिद्धा ये च कैलासतापसाः ।
एतेभ्यः सर्वसिद्धेभ्यः कृतं ते स्वापनं महत् ।। २४ ।।
अतिगच्छति च मय्यपगच्छन्तु संहताः ।। २५ ।।
अलिते, वलिते, मनवे स्वाहा ।। २६ ।।'

एतस्य प्रयोगः । २७ । त्रिरात्रोपोषितः कृष्णचतुर्दश्यां पुष्ययोगिन्यां श्वपाकीहस्ताद्बिलखावलेखनं क्रीणीयात् । २८ । तन्माषैः सह कण्डोलिकायां कृत्वाऽसंकीर्ण आदहने निखानयेत् । २९ । द्वितीयस्यां चतुर्दश्यामुद्धृत्य कुमार्या पेषयित्वा गुलिकाः कारयेत् । ३० । तत एकां गुलिकामभिमन्त्रयित्वा यत्रैतेन मन्त्रेण क्षिपति तत्सर्वं प्रस्वापयति । ३१ ।

एतेनैव कल्पेन श्वाविधः शल्यकं त्रिकालं त्रिश्वेतमसंकीर्ण आदहने निखानयेत् । ३२ । द्वितीयस्यां चतुर्दश्यामुद्धृत्यादहनभस्मना सह यत्रैतेन मन्त्रेण क्षिपति तत्सर्वं प्रस्वापयति । ३३ ।

'सुवर्णपुष्पीं ब्रह्माणीं ब्रह्माणं च कुशध्वजम् ।
सर्वाश्च देवता वन्दे वन्दे सर्वांश्च तापसान् ।। ३४ ।।

पर्वतावर तापस आहेत त्या सर्व सिद्धांना नमस्कार करून तुला गाढ निद्रेत टाकले आहे.

२५ आणि मी पलीकडे जात असता ते सर्व मिळून निघून जावोत.

२६ हे अलिते, हे वलिते, मनूला स्वाहा."

२७ ह्या मंत्राचा प्रयोग पुढीलप्रमाणे. २८ तीन दिवस उपास करून (चंद्राचा) पुष्य नक्षत्राशी योग असणाऱ्या कृष्णचतुर्दशीच्या दिवशी श्वपाक स्त्रीकडून बिळे करणाऱ्या प्राण्यांनी उकरलेली माती विकत घ्यावी. २९ उडदांसह ती एका करंडीत ठेवून गर्दी नसलेल्या स्मशानातील जागेत पुरून ठेवावी. ३० नंतरच्या चतुर्दशीला बाहेर काढून कुमारिकेकडून कुटून घेऊन त्याच्या गोळ्या कराव्यात. ३१ नंतर एक गोळी वरील मंत्राने अभिमंत्रित करून ज्या ठिकाणी फेकली जाते तेथील सर्व प्राण्यांना झोपेत बुडवून टाकते.

३२ ह्याच प्रकारच्या विधीने साळूच्या पाठीवरचे तीन काळ्या व तीन पांढऱ्या रेषा असलेले पीस गर्दी नसलेल्या स्मशानातील जागेत पुरावे. ३३ नंतरच्या चतुर्दशीला बाहेर काढून चितेतील राखेसह ते पीस वरील मंत्राने अभिमंत्रित करून जेथे फेकले जाते तेथील सर्व प्राण्यांना गाढ झोप लागते.

३४ "सोन्याची फुले असलेल्या ब्रह्माणीला आणि कुशाचा ध्वज असलेल्या ब्रह्माला आणि सर्व देवतांना मी वंदन करतो आणि सर्व तापसांना वंदन करतो.

वशं मे ब्राह्मणा यान्तु भूमिपालाश्च क्षत्रियाः ।
वशं वैश्याश्च शूद्राश्च वशतां यान्तु मे सदा ।। ३५ ।।

स्वाहा । अमिले किमिले वयुचारे प्रयोगे फक्के वयुह्वे विहाले दन्तकटके स्वाहा । ३६ ।

सुखं स्वपन्तु शुनका ये च ग्रामे कुतूहलाः ।
श्वाविधः शल्यकं चैतत्त्रिश्वेतं ब्रह्मनिर्मितम् ।। ३७ ।।
प्रसुप्ताः सर्वसिद्धा हि एतत्ते स्वापनं कृतम् ।
यावद्ग्रामस्य सीमान्तः सूर्यस्योद्गमनादिति ।। ३८ ।।
स्वाहा । ३९ ।'

**एतस्य प्रयोगः । ४० । श्वाविधः शल्यकानि त्रिश्वेतानि, सप्तरात्रोपोषितः कृष्णचतुर्दश्यां खादिराभिः समिधाभिरग्निमेतेन मन्त्रेणाष्टशतसंपातं कृत्वा मधुघृताभ्यामभिजुहुयात् । ४१ । तत एकमेतेन मन्त्रेण ग्रामद्वारि गृहद्वारि वा यत्र निखन्यते तत्सर्वं प्रस्वापयति । ४२ ।**

'बलिं वैरोचनं वन्दे शतमायं च शम्बरम् ।
निकुम्भं नरकं कुम्भं तन्तुकच्छं महासुरम् ।। ४३ ।।

३५ ब्राह्मण मला वश होवोत आणि भूमीचे रक्षण करणारे क्षत्रिय वश होवोत; वैश्य आणि शूद्र नेहमी मला वश असोत.

३६ स्वाहा. अमिले, किमिले, वयुचारे, प्रयोगे, फक्के, वयुव्हे, विहाले, दंतकटके, स्वाहा.

३७ कुत्रे आणि गावात जे कुतूहलयुक्त असतील ते गाढ झोपी जावोत. तीन ठिकाणी पांढरे असलेले हे साळूच्या पाठीवरचे पीस ब्रह्मदेवाने निर्माण केले आहे.

३८ सर्व यशस्वी माणसे झोपली आहेत, तुला गाढ निद्रेत, गावाच्या शिवेपर्यंत आणि सूर्योदय होईपर्यंत टाकले आहे.

३९ स्वाहा."

४० ह्याचा प्रयोग असा : ४१ पांढऱ्या तीन रेषा असलेली साळूची पिसे (घ्यावीत); सात दिवस उपास करून कृष्ण चतुर्दशीच्या दिवशी एकशेआठ खदिराच्या समिधांचा मध आणि तूप यांसह वरील मंत्राने अग्नीत होम करावा. ४२ नंतर एक पीस ह्या मंत्राने ज्या गावाच्या वेशीत अथवा घराच्या दारात पुरले जाते तेथील सर्व लोक गाढ झोपी जातात.

४३–४४ "विरोचनपुत्र बलीला आणि शंभर माया निर्माण करणाऱ्या शंवराला मी वंदन करतो. निकुंभ, नरक, कुंभ, महान असुर तंतुकच्छ, अर्मालव

अर्मालवं प्रमीलं च मण्डोलूकं घटोबलम् ।
कृष्णकंसोपचारं च पौलोमीं च यशस्विनीम् ।। ४४ ।।

अभिमन्त्रयित्वा गृह्णामि सिद्धचर्थं शवशारिकाम् ।
जयतु जयति च नमः शलकभूतेभ्यः स्वाहा ।। ४५ ।।

सुखं स्वपन्तु शुनका ये च ग्रामे कुतूहलाः ।
सुखं स्वपन्तु सिद्धार्था यमर्थं मार्गयामहे ।
यावदस्तमयादुदयो यावदर्थं फलं मम ।। ४६ ।।

इति स्वाहा । ४७ । '

एतस्य प्रयोगः । ४८ । चतुर्भक्तोपवासी कृष्णचतुर्दश्यामसंकीर्ण आदहने बलिं कृत्वैतेन मन्त्रेण शवशारिकां गृहीत्वा पौत्रीपोट्टलिकं बध्नीयात् । ४९ । तन्मध्ये श्वाविधः शल्यकेन विद्ध्वा यत्रैतेन मन्त्रेण निखन्यते तत्सर्वं प्रस्वापयति । ५० ।

' उपैमि शरणं चाग्निं दैवतानि दिशो दश ।
अपयान्तु च सर्वाणि वशतां यान्तु मे सदा । ५१ ।

स्वाहा । ५२ । '

आणि प्रमील, मंडोलूक, घटोबल, कृष्ण व कंस यांचे सेवेकरी आणि यशस्वी पौलोमी (ह्या सर्वांना मी वंदन करतो).

४५ सिद्धी मिळविण्यासाठी मी ही मृत शारिका अभिमंत्रून घेतो. तिचा जय होवो आणि जय होतोच. शल्यकांतील जीवांना नमस्कार असो. स्वाहा.

४६ कुत्रे आणि गावात जे कुतूहलयुक्त असतील ते गाढ झोपी जावोत. ज्यांना यश मिळाले आहे ते, जे आम्ही मिळवू इच्छितो ते (प्राप्त होईपर्यंत) सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत, मला हवे असलेले फल मिळेपर्यंत, झोपी जावोत.

४७ स्वाहा."

४८ ह्याचा प्रयोग पुढीलप्रमाणे : ४९ जेवणाच्या चार वेळांना (दोन दिवस) उपास करून कृष्णचतुर्दशीच्या दिवशी गर्दी नसलेल्या स्मशानातील जागी बली अर्पण करून ह्या मंत्राने मृत शारिका घेऊन तिला डुकराच्या चामड्याच्या थैलीत बांधावी. ५० तिच्यात साळूचे पीस टोचून ती थैली ज्या ठिकाणी पुरली जाते तेथील सर्व लोक गाढ झोपी जातात.

५१ "मी अग्नीला आणि दहा दिशांच्या देवतांना शरण जातो. सर्वजण येथून निघून जावोत आणि ते नेहमी मला वश होवोत.

५२ स्वाहा."

एतस्य प्रयोगः । ५३ । त्रिरात्रोपोषितः पुष्येण शर्करा एकविंशतिसंपातं कृत्वा मधुघृताभ्यामभिजुहुयात् । ५४ । ततो गन्धमाल्येन पूजयित्वा निखानयेत् । ५५ । द्वितीयेन पुष्येणोद्धृत्यैकां शर्करामभिमन्त्रयित्वा कपाटमाहन्यात् । ५६ । अभ्यन्तरं चतसृणां शर्कराणां द्वारमपाव्रियते । ५७ ।

चतुर्भक्तोपवासी कृष्णचतुर्दश्यां भग्नस्य पुरुषस्यास्थ्ना ऋषभं कारयेत्, अभिमन्त्रयेच्चैतेन । ५८ । द्विगोयुक्तं गोयानमाहृतं भवति । ५९ । ततः परमाकाशे विक्रामति । ६० । रविसगन्धः परिघमति सर्वं पृणाति । ६१ ।

'चण्डालीकुम्भीत्तम्बकटुकसारौघः सनारीभगोसि । स्वाहा' । ६२ । तालोद्घाटनं प्रस्वापनं च । ६३ ।

त्रिरात्रोपोषितः पुष्येण शस्त्रहतस्य शूलप्रोतस्य वा पुंसः शिरःकपाले मृत्तिकायां तुवरीरावास्योदकेन सेचयेत् । ६४ । जातानां पुष्येणैव गृहीत्वा रज्जुकां वर्तयेत् । ६५ । ततः सज्यानां धनुषां यन्त्राणां च पुरस्ताच्छेदनं ज्याच्छेदनं करोति । ६६ ।

५३ ह्या मंत्राचा प्रयोग : ५४ तीन दिवस उपास करून पुष्य नक्षत्रावर एकवीस वाळूचे खडे जमवून मध व तूप यांचा (अग्नीत) होम करावा. ५५ नंतर गंधपुष्पांनी पूजा करून ते खडे पुरून ठेवावेत. ५६ नंतरच्या पुष्य नक्षत्रावर ते बाहेर काढून एकेक खडा ह्या मंत्राने अभिमंत्रित करून दरवाजावर मारावा. ५७ चार खडे मारून होण्याच्या आत तो दरवाजा उघडतो.

५८ जेवणाच्या चार वेळांना (दोन दिवस) उपास करून कृष्णचतुर्दशीच्या दिवशी मोडून तुकडे पडलेल्या मनुष्याच्या हाडापासून बैलाची मूर्ती बनवावी आणि ती ह्या मंत्राने अभिमंत्रित करावी. ५९ दोन बैल जोडलेली बैलगाडी उपस्थित होते. ६० त्यानंतर तो आकाशात संचार करतो. ६१ सूर्यासारखा दरवाजाच्या अडसराच्या पलीकडे तो सर्वत्र शिरू शकतो (?)

६२ "(हे अडसरा,) तुझ्यात चंडाल स्त्रीच्या रांजणाला टेकू देणाऱ्या लाकडाचे बळ आहे (?) आणि तुला स्त्रीयोनी उपलब्ध होते. स्वाहा." ६३ हा मंत्र दाराची कुलपे उघडतो आणि माणसांना गाढ झोपी जावयास लावतो.

६४ तीन दिवस उपास करून पुष्य नक्षत्रावर शस्त्राने ठार मारलेल्या अथवा सुळी दिलेल्या पुरुषाच्या डोक्याच्या कवटीत मातीत तुरी पेरून त्यांना पाणी घालावे. ६५ त्या उगवल्यावर पुष्य नक्षत्रावरच उपटून त्यांची दोरी वळावी. ६६ नंतर दोरी चढविलेल्या धनुष्यांच्या अथवा यंत्रांच्या समोर ती दोरी कापली असता त्यांच्या दोऱ्या तुटून पडतात.

**उदकाहिभस्त्रामुच्छ्वासमृत्तिकया स्त्रियाः पुरुषस्य वा पूरयेत्, नासिकाबन्धनं मुखग्रहश्च । ६७ ।**

**वराहभस्त्रामुच्छ्वासमृत्तिकया पूरयित्वा मर्कटस्नायुनावबध्नीयात्, आनाहकारणम् । ६८ ।**

**कृष्णचतुर्दश्यां शस्त्रहताया गोः कपिलायाः पित्तेन राजवृक्षमयीममित्रप्रतिमामञ्ज्यात्, अन्धीकरणम् । ६९ ।**

**चतुर्भक्तोपवासी कृष्णचतुर्दश्यां बलिं कृत्वा शूलप्रोतस्य पुरुषस्यास्थ्ना कीलकान् कारयेत् । ७० । एतेषामेकः पुरीषे मूत्रे वा निखात आनाहं करोति, पदेऽस्यासने वा निखातः शोषेण मारयति, आपणे क्षेत्रे गृहे वा वृत्तिच्छेदं करोति । ७१ ।**

**एतेनैव कल्पेन विद्युद्दग्धस्य वृक्षस्य कीलका व्याख्याताः । ७२ ।**

**पुनर्नवमवाचीनं निम्बः काममधुश्च यः ।**
**कपिरोम मनुष्यास्थि बद्ध्वा मृतकवाससा ॥ ७३ ॥**

६७ स्त्रीने अथवा पुरुषाने ज्या मातीवर श्वास सोडला आहे ती माती पाण्यातील सापाच्या कातडयाच्या पिशवीत भरावी; त्यायोगे नाक बंद होते आणि तोंडाचे व्यापार थंड पडतात.

६८ डुकराच्या चामडयाच्या पिशवीत श्वास सोडलेली माती भरून तिचे तोंड माकडाच्या स्नायूने बंद करावे; त्यामुळे लघवी व शौचास होण्याचे बंद होते.

६९ कृष्णचतुर्दशीच्या दिवशी शस्त्राने मारलेल्या कपिल वर्णाच्या गाईचे पित्त राजवृक्षाच्या लाकडापासून बनविलेल्या शत्रूच्या प्रतिमेच्या डोळ्यांस अंजन म्हणून लावावे; त्यायोगे तो आंधळा होतो.

७० चार जेवणांच्या वेळी उपास करून कृष्णचतुर्दशीच्या दिवशी बली अर्पण करून सुळावर चढविलेल्या पुरुषाच्या हाडापासून खिळे बनवावेत. ७१ त्यांच्यापैकी एक ज्याच्या विष्ठेत अथवा मूत्रात ठोकला जातो त्याचे मलमूत्र बंद होते, त्याच्या उमटलेल्या पावलावर अथवा बसण्याच्या जागेवर ठोकला असता तो झिजत जाऊन मरण पावतो, त्याच्या दुकानात, शेतात अथवा घरात पुरला असता त्याच्या उपजीविकेचे साधन नष्ट होते.

७२ ह्याच विधीने विजेने जळालेल्या झाडापासून बनविलेल्या पाचरींचा असाच उपयोग करता येतो.

७३–७४ "अवाचीन (खाली वाकलेले ?) पुनर्नव, निंब आणि काममधु, वानराचे केस व मनुष्याचे हाड (हे सर्व) प्रेताच्या अंगावरील वस्त्रात बांधून ज्याच्या घरात पुरले जातात अथवा ज्याचे उमटलेले पाऊल पाहून तेथे पुरले

निखन्यते गृहे यस्य दृष्ट्वा वा यत्पदं नयेत् ।
सपुत्रदारः सधनस्त्रीन् पक्षान्नातिवर्तते ।। ७४ ।।
पुनर्नवमवाचीनं निम्बः काममधुश्च यः ।
स्वयंगुप्ता मनुष्यास्थि पदे यस्य निखन्यते ।। ७५ ।।
द्वारे गृहस्य सेनाया ग्रामस्य नगरस्य वा ।
सपुत्रदारः सधनस्त्रीन् पक्षान्नातिवर्तते ।। ७६ ।।
अजमर्कटरोमाणि मार्जारनकुलस्य च ।
ब्राह्मणानां श्वपाकानां काकोलूकस्य चाहरेत् ।
एतेन विष्ठाऽवक्षुण्णा सद्य उत्सादकारिका ।। ७७ ।।
प्रेतनिर्मालिका किण्वं रोमाणि नकुलस्य च ।
वृश्चिकाल्यहिकृत्तिश्च पदे यस्य निखन्यते ।
भवत्यपुरुषः सद्यो यावत्तन्नापनीयते ।। ७८ ।।

त्रिरात्रोपोषितः पुष्येण शस्त्रहतस्य शूलप्रोतस्य वा पुंसः शिरःकपाले मृत्तिकायां गुञ्जा आवास्योदकेन सेचयेत् ।७९। जातानाममावास्यायां पौर्णमास्यां वा पुष्ययोगिन्यां गुञ्जवल्लीर्ग्राहयित्वा मण्डलिकानि कारयेत् ।८०। तेष्वन्नपानभाजनानि न्यस्तानि न क्षीयन्ते ।८१।

जातात तो त्याची बायकामुले व संपत्ती यांसह तीन पंधरवडयांच्या पुढे जिवंत रहात नाही.

७५–७६ अवाचीन पुनर्नव, निंब आणि काममधु, स्वयंगुप्ता व मनुष्याचे हाड ज्याच्या पावलाच्या ठिकाणी पुरले जातात, अथवा ज्या घराच्या, सैन्याच्या, गावाच्या अथवा शहराच्या दरवाजात (पुरले जातात) तो बायकामुले व संपत्ती यांसह तीन पंधरवडयांच्या पुढे जिवंत रहात नाही.

७७ बोकड व माकड यांचे केस, मांजर व मुंगूस यांचे (केस), ब्राह्मणांचे, श्वपाकांचे आणि कावळा व घुबड यांचे (केस) जमवावेत. हे ज्याच्या विष्ठेत कुटले जातात त्याचा तात्काळ नाश होतो.

७८ प्रेतावरील निर्माल्य, मद्यबीज आणि मुंगुसाचे केस, विंचू, भुंगा व सापाचे कातडे ज्याच्या पावलामध्ये पुरले जातात त्याचे पुरुषत्व तात्काळ नष्ट होते आणि जोपर्यंत ते दूर केले जात नाही तोपर्यंत तो नपुंसकच रहातो.

७९ तीन दिवस उपास करून पुष्य नक्षत्रावर शस्त्राने ठार केलेल्या अथवा सुळावर चढविलेल्या पुरुषाच्या डोक्याच्या कवटीत मातीत गुंजा पेरून वर पाणी घालावे. ८० उगवल्यानंतर पुष्य नक्षत्राचा योग असणाऱ्या अमावास्येला अथवा पौर्णिमेला गुंजेच्या वेली घेऊन त्यांच्या चुंबळी करून घ्याव्यात. ८१ त्या चुंबळींवर ठेवलेली अन्नपाण्याची भांडी कधी रिकामी होत नाहीत.

रात्रिप्रेक्षायां प्रवृत्तायां प्रदीपाग्निषु मृतधेनोः स्तनानुत्कृत्य दाहयेत् ।८२। दग्धान् वृषमूत्रेण पेषयित्वा नवकुम्भमन्तर्लेपयेत् ।८३। तं ग्राममपसव्यं परिणीय यत्तत्र न्यस्तं नवनीतमेषां तत्सर्वमागच्छति ।८४।

कृष्णचतुर्दश्यां पुष्ययोगिन्यां शुनो लग्नकस्य योनौ कालायसीं मुद्रिकां प्रेषयेत् ।८५। तां स्वयं पतितां गृह्णीयात् ।८६। तया वृक्षफलान्याकारितान्यागच्छन्ति ।८७।

मन्त्रभैषज्यसंयुक्ता योगा मायाकृताश्च ये ।
उपहन्यादमित्रांस्तैः स्वजनं चाभिपालयेत् ॥८८॥

इत्यौपनिषदिके चतुर्दशेऽधिकरणे प्रलम्भने भैषज्यमन्त्रयोगः तृतीयोऽध्यायः ।
आदितः अष्टचत्वारिंशच्छततमः ।

४

## [ एकोनाशीतिशततमं प्रकरणम् – स्वबलोपघातप्रतीकारः ]

स्वपक्षे परप्रयुक्तानां दूषीविषगराणां प्रतीकारः ।१।

८२ रात्रीचा नाटचप्रयोग सुरू झाला असता मेलेल्या गाईची कास कापून दिव्यांच्या अग्नीत ती जाळावी. ८३ जळाल्यावर ती बैलाच्या मुतात खलून त्याचा मातीच्या नवीन घागरीला आतून लेप करावा. ८४ ती घागर गावाच्या सभोवार डावीकडून उजवीकडे नेली असता जेवढे त्या गावातील लोकांचे लोणी असेल तेवढे सर्व तिच्यात येऊन पडते.

८५ पुष्यनक्षत्राचा योग असलेल्या कृष्ण चतुर्दशीच्या दिवशी माजास आलेल्या कुत्रीच्या गुह्येंद्रियात एक लोखंडी मुद्रेची आंगठी घालून ठेवावी. ८६ ती आपोआप बाहेर पडली म्हणजे घ्यावी. ८७ तिच्या साहाय्याने बोलावण्यात आलेली वृक्षांची फळे आपण होऊन येतात.

८८ मंत्र व औषधे यांनी केले जाणारे प्रयोग आणि भ्रम उत्पन्न करणारे जादूचे प्रयोग यांनी शत्रूंचा घात करावा आणि आपल्या लोकांचे रक्षण करावे.

## चौथा अध्याय

### प्रकरण १७९ : आपल्या सैन्याच्या नाशाचा प्रतिकार

१ आपल्या लोकांवर शत्रूने केलेल्या दूषीविष व इतर विषांच्या प्रयोगावर उपाययोजना पुढीलप्रमाणे :

श्लेष्मातककपित्थदन्तिदन्तशठगोजिशिरीषपाटलीबलास्योनागपुनर्नवाश्वेत-वारणक्वाथयुक्तं चन्दनसालावृकीलोहितयुक्तं नेजनोदकं राजोपभोग्यानां गुह्यप्रक्षालनं स्त्रीणाम्, सेनायाश्च विषप्रतीकारः । २ ।

पृषतनकुलनीलकण्ठगोधापित्तयुक्तं महीराजीचूर्णं सिन्दुवारितवरणवारुणी-तण्डुलीयकशतपर्वाग्रपिण्डीतकयोगो मदनदोषहरः । ३ ।

सृगालविन्नामदर्नासिन्दुवारितवरणवारणवल्लीमूलकषायाणामन्यतमस्य सम-स्तानां वा क्षीरयुक्तं पानं मदनदोषहरम् । ४ ।

कैडर्यपूतितिलतैलमुन्मादहरं नस्तःकर्म । ५ ।

प्रियङ्गुनक्तमालयोगः कुष्ठहरः । ६ ।

कुष्ठलोध्रयोगः पाकशोषघ्नः । ७ ।

कटफलद्रवन्तीविलङ्गचूर्णं नस्तःकर्म शिरोरोगहरम् । ८ ।

२ श्लेष्मातक, कपित्थ, दंति, दंतशठ, गोजि, शिरीष, पाटली, बला, स्योनाग, पुनर्नवा आणि श्वेतवारण यांच्या काढ्याने आणि चंदन व सालावृकीचे रक्त यांनी युक्त धुण्यासाठी वापरावयाचे पाणी राजाच्या उपभोगासाठी असलेल्या स्त्रियांची गुह्येंद्रिये धुण्यासाठी वापरावे, आणि सैन्याच्या विषप्रयोगावर उपाय म्हणून वापरावे.

३ ठिपक्याठिपक्याचे हरीण, मुंगूस, मोर व घोरपड यांच्या पित्तात मिसळलेले महीराजीचे चूर्ण आणि सिंदुवारित, वरण, वारुणी, तंडुलीयक, शतपर्वाचा (वेळूचा) अग्रभाग आणि पिंडीतक यांचे मिश्रण मदनरसाचे होणारे परिणाम दूर करतात.

४ सृगालविन्ना, मदन, सिंदुवारित, वरण, वारण आणि वल्ली ह्यांच्यापैकी कोणत्याही एकाच्या अथवा सर्वांच्या मुळांच्या काढ्याचे दुधावरोबर पान केल्यास मदनरसाचे परिणाम दूर होतात.

५ कैडर्य, पूति व तीळ यांचे तेल नाकात घातले असता उन्माद (वेड) दूर होतो.

६ प्रियंगु आणि नक्तमाल यांचे मिश्रण कुष्ठरोग दूर करते.

७ कुष्ठ व लोध्र यांचे मिश्रण जरा व क्षयरोग दूर करते.

८ कटफल, द्रवंती आणि विलंग यांचे चूर्ण नाकातून ओढले असता डोकेदुखी दूर करते.

**प्रियङ्गुमञ्जिष्ठातगरलाक्षारसमधुकहरिद्राक्षौद्रयोगो रज्जूदकविषप्रहार-पतननिःसंज्ञानां पुनःप्रत्यानयनाय । ९ ।**

**मनुष्याणामक्षमात्रम्, गवाश्वानां द्विगुणम्, चतुर्गुणं हस्त्युष्ट्राणाम् । १० ।**

**रुक्मगर्भश्चैषां मणिः सर्वविषहरः । ११ ।**

**जीवन्तीश्वेतामुष्ककपुष्पवन्दाकानामक्षीवे जातस्याश्वत्थस्य मणिः सर्वविषहरः । १२ ।**

**तूर्याणां तैः प्रलिप्तानां शब्दो विषविनाशनः ।**
**लिप्तध्वजं पताकां वा दृष्ट्वा भवति निर्विषः ।। १३ ।।**

**एतैः कृत्वा प्रतीकारं स्वसैन्यानामथात्मनः ।**
**अमित्रेषु प्रयुञ्जीत विषधूमाम्बुदूषणान् ।। १४ ।।**

**इत्यौपनिषदिके चतुर्दशेऽधिकरणे स्वबलोपघातप्रतीकारः चतुर्थोऽध्यायः ।**
**आदितः एकोनपञ्चाशच्छततमः ।**

**एतावता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य औपनिषदकम् चतुर्दशमधिकरणं समाप्तम् ।।**

९ प्रियंगु, मंजिष्ठा, तगर, लाक्षारस, ज्येष्ठीमध, हळद आणि मध यांचे मिश्रण दोरीच्या गळफासामुळे, पाण्यात बुडाल्यामुळे, विषप्रयोगामुळे, प्रहारामुळे अथवा पडल्यामुळे बेशुद्ध झालेल्यांना पुन्हा शुद्धीवर आणण्याच्या कामी उपयोगी पडते.

१० मनुष्यांना देण्याचे प्रमाण एक अक्ष, गाई-बैल व घोडे यांना त्याच्या दुप्पट, हत्ती व उंट यांना चौपट.

११ आणि सोने आत घातलेली ह्या (प्रियंगु वगैरे) औषधांची गोळी सर्व प्रकारच्या विषावर उतारा म्हणून उपयोगी पडते.

१२ जीवंती, श्वेता, मुष्कक आणि पुष्पवंदाका तसेच ओलसर जमिनीत उगवलेला अश्वत्थ यांच्या चूर्णापासून बनविलेला मणी सर्व प्रकारच्या विषांवर उतारा म्हणून उपयोगी पडतो.

१३ त्या औषधांचा लेप केलेल्या वाद्यांचा ध्वनी विषाचे परिणाम नष्ट करतो. त्यांचा लेप केलेला ध्वज अथवा पताका पाहिल्यावर मनुष्याचे विष उतरते.

१४ या उपायांनी आपल्या सैन्यांच्या आणि स्वतःच्या संरक्षणाची व्यवस्था करून शत्रूंच्या विरुद्ध विषारी धूर व पाणी दूषित करणे यांचे प्रयोग करावेत.

चौदावे अधिकरण समाप्त

वि (वाय)— ३१७-४३-अ

# तन्त्रयुक्तिः – पञ्चदशमधिकरणम्

१

[अशीतिशततमं प्रकरणम् – तन्त्रयुक्तयः]

मनुष्याणां वृत्तिरर्थः, मनुष्यवती भूमिरित्यर्थः । १ । तस्याः पृथिव्या लाभपालनोपायः शास्त्रमर्थशास्त्रमिति । २ ।

तद्द्वात्रिंशद्युक्तियुक्तम् – अधिकरणम्, विधानम्, योगः, पदार्थः, हेत्वर्थः, उद्देशः, निर्देशः, उपदेशः, अपदेशः, अतिदेशः, प्रदेशः, उपमानम्, अर्थापत्तिः, संशयः, प्रसङ्गः, विपर्ययः, वाक्यशेषः, अनुमतम्, व्याख्यानम्, निर्वचनम्, निदर्शनम्, अपवर्गः, स्वसंज्ञा, पूर्वपक्षः, उत्तरपक्षः, एकान्तः, अनागतावेक्षणम्, अतिक्रान्तावेक्षणम्, नियोगः, विकल्पः, समुच्चयः, ऊह्यम् इति । ३ ।

## पंधरावे अधिकरण – शास्त्रीय विवेचनाची पद्धत

### पहिला अध्याय

### प्रकरण १८० : शास्त्राच्या विवेचनाच्या पद्धती

१ अर्थ म्हणजे मनुष्यांच्या उपजीविकेचे साधन, म्हणजेच मनुष्यांची वस्ती असलेला भूप्रदेश. २ त्या पृथ्वीचा लाभ व तिचे पालन यांसंबंधी उपाय सांगणारे शास्त्र ते अर्थशास्त्र.

३ त्याच्या विवेचनात पुढील बत्तीस प्रकारांचा उपयोग केला आहे :– (१) अधिकरण, (२) विधान, (३) योग, (४) पदार्थ, (५) हेत्वर्थ, (६) उद्देश, (७) निर्देश, (८) उपदेश, (९) अपदेश, (१०) अतिदेश, (११) प्रदेश, (१२) उपमान, (१३) अर्थापत्ति, (१४) संशय, (१५) प्रसंग, (१६) विपर्यय, (१७) वाक्यशेष, (१८) अनुमत, (१९) व्याख्यान, (२०) निर्वचन, (२१) निदर्शन, (२२) अपवर्ग, (२३) स्वसंज्ञा, (२४) पूर्वपक्ष, (२५) उत्तरपक्ष, (२६) एकान्त, (२७) अनागतावेक्षण, (२८) अतिक्रान्तावेक्षण, (२९) नियोग, (३०) विकल्प, (३१) समुच्चय आणि (३२) उह्य.

**यमर्थमधिकृत्योच्यते तदधिकरणम् ।४। 'पृथिव्या लाभे पालने च यावन्त्यर्थशास्त्राणि पूर्वाचार्यैः प्रस्थापितानि प्रायशस्तानि संहृत्यैकमिदमर्थशास्त्रं कृतम्' (१.१.१) इति।५।**

**शास्त्रस्य प्रकरणानुपूर्वी विधानम् ।६। 'विद्यासमुद्देशः, वृद्धसंयोगः, इन्द्रियजयः, अमात्योत्पत्तिः' (१.१.३) इत्येवमादिकमिति ।७।**

**वाक्ययोजना योगः ।८। 'चतुर्वर्णाश्रमो लोकः' (१.४.१६) इति।९।**

**पदावधिकः पदार्थः ।१०। मूलहर इति पदम् ।११। 'यः पितृपैतामहमर्थमन्यायेन भक्षयति स मूलहरः' (२.९.२१) इत्यर्थः ।१२।**

**हेतुरर्थसाधको हेत्वर्थः ।१३। 'अर्थमूलौ हि धर्मकामौ' (१.७.७) इति ।१४।**

**समासवाक्यमुद्देशः ।१५। 'विद्याविनयहेतुरिन्द्रियजयः' (१.६.१) इति ।१६।**

४ ज्या विषयासंबंधी सांगितले जाते तो विषय म्हणजे अधिकरण. ५ उदाहरणार्थ, "पृथ्वीच्या लाभाच्या आणि पालनाच्या विषयांसंबंधी जेवढी अर्थशास्त्रे पूर्वीच्या आचार्यांनी प्रस्थापित केली आहेत ती बहुतेक सर्व एकत्रित करून हे एक अर्थशास्त्र रचले आहे." (१.१.१)

६ शास्त्रातील प्रकरणांचा क्रमवार निर्देश म्हणजे विधान. ७ उदाहरणार्थ, "विद्यांचा क्रमवार निर्देश, वृद्धांचा सहवास, इंद्रियांचा निग्रह, अमात्यांची नेमणूक" इत्यादी. (१.१.३)

८ (शब्दांमधील परस्परसंबंध प्रस्थापित करून) वाक्याची योजना करणे म्हणजे योग. ९ उदाहरणार्थ, चार वर्णांचे आणि चार आश्रमांत असणारे लोक." (१.४.१६)

१० शब्दात मर्यादित होणारा तो पदार्थ (शब्दाचा अर्थ). ११ उदाहरणार्थ, 'मूलहर' हा शब्द. १२ "पित्यापासून आणि पितामहापासून आलेली संपत्ती जो अन्याय्य मार्गाने उधळून टाकतो तो मूलहर" (२.९.२१) हा त्या शब्दाचा अर्थ.

१३ एखादी गोष्ट सिद्ध करणारा जो हेतु (कारण) तो हेत्वर्थ. १४ उदाहरणार्थ, "कारण, धर्म व काम (सिद्ध होणे) अर्थावर अवलंबून आहे." (१.७.७)

१५ एखाद्या गोष्टीचे थोडक्यात प्रतिपादन करणे म्हणजे उद्देश. १६ उदाहरणार्थ. "विद्यांमध्ये पारंगत होणे हे इंद्रियजयास कारणीभूत होते." (१.६.१)

**व्यासवाक्यं निर्देशः । १७ । 'कर्णत्वगक्षिजिह्वाघ्राणेन्द्रियाणां शब्दस्पर्शरूपरसगन्धेष्वविप्रतिपत्तिरिन्द्रियजयः' (१.६.२) इति । १८ ।**

**एवं वर्तितव्यमित्युपदेशः । १९ । 'धर्मार्थाविरोधेन कामं सेवेत, न निःसुखः स्यात्' (१.७.३) इति । २० ।**

**एवमसावाहेत्यपदेशः । २१ । 'मन्त्रिपरिषदं द्वादशामात्यान् कुर्वीतेति मानवाः । षोडशेति बार्हस्पत्याः । विंशतिमित्यौशनसाः । यथासामर्थ्यमिति कौटिल्यः' (१.१५.४७–५०) इति । २२ ।**

**उक्तेन साधनमतिदेशः । २३ । 'दत्तस्याप्रदानमृणादानेन व्याख्यातम्' (३.१६.१) इति । २४ ।**

**वक्तव्येन साधनं प्रदेशः । २५ । 'सामदानभेददण्डैर्वा, यथाऽऽपत्सु व्याख्यास्यामः' (७.१४.११) इति । २६ ।**

**दृष्टेनादृष्टस्य साधनमुपमानम् । २७ । 'निवृत्तपरिहारान् पितेवानुगृह्णीयात्' (२.१.१८) इति । २८ ।**

१७ विस्तारपूर्वक प्रतिपादन करणे म्हणजे निर्देश. १८ उदाहरणार्थ, "कर्णेंद्रिय, त्वगिंद्रिय, चक्षुरिंद्रिय, रसनेंद्रिय आणि घ्राणेंद्रिय यांचा शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध ह्या विषयांच्या ठिकाणी चुकीच्या प्रवृत्तीचा अभाव म्हणजे इंद्रियजय." (१.६.२)

१९ याप्रमाणे वागावे असे सांगणे म्हणजे उपदेश. २० उदाहरणार्थ, "धर्म व अर्थ यांना विरोध न होईल अशा रीतीने कामाचे सेवन करावे, सुखाचा सर्वस्वी त्याग करू नये." (१.७.३)

२१ अमका अमका असे म्हणतो हे सांगणे म्हणजे अपदेश. २२ उदाहरणार्थ, "मंत्रिपरिषद बारा अमात्यांची करावी असे मानवांचे म्हणणे आहे, सोळा अमात्यांची असे बार्हस्पत्यांचे म्हणणे आहे, वीस अमात्यांची असे औशनसांचे म्हणणे आहे, आपल्या सामर्थ्यानुसार असे कौटिल्याचे मत आहे." (१.१५.४७–५०)

२३ (पूर्वी) सांगितलेल्यावरून नंतरची गोष्ट प्रस्थापित करणे म्हणजे अतिदेश. २४ उदाहरणार्थ, "कर्ज परत न करण्यासंबंधीचे नियम कबूल केलेले दान न देण्याच्या संबंधातही लागू होतात." (३.१६.१)

२५ जे पुढे सांगितले जाणार आहे त्यावरून प्रस्थापित करणे म्हणजे प्रदेश. २६ उदाहरणार्थ, "अथवा आम्ही पुढे आपत्तींवरील प्रकरणात सांगणार आहोत त्याप्रमाणे साम, दान, भेद व दंड या उपायांनी." (७.१४.११)

२७ ज्ञात वस्तूवरून अज्ञाताचा बोध करून देणे म्हणजे उपमान. २८ उदाहरणार्थ, "ज्यांची करातील सूट बंद झाली असेल त्यांच्यावर पित्याप्रमाणे अनुग्रह करावा." (२.१.१८)

**यदनुक्तमर्थादापद्यते साऽर्थापत्तिः । २९ । 'लोकयात्राविद्राजानमात्मद्रव्य-प्रकृतिसंपन्नं प्रियहितद्वारेणाश्रयेत' (५.४.१)। ३०। 'नाप्रियहितद्वारेणाश्रयेत' इत्यर्थादापन्नं भवतीति । ३१ ।**

**उभयतोहेतुमानर्थः संशयः । ३२ । 'क्षीणलुब्धप्रकृतिमपचरितप्रकृतिं वा' (७.५.१२) इति । ३३ ।**

**प्रकरणान्तरेण समानोऽर्थः प्रसङ्गः । ३४ । 'कृषिकर्मप्रविष्टायां भूमौ – इति समानं पूर्वेण' (१.११.१०) इति । ३५ ।**

**प्रतिलोमेन साधनं विपर्ययः । ३६ । 'विपरीतमतुष्टस्य' (१.१६.१२) इति । ३७ ।**

**येन वाक्यं समाप्यते स वाक्यशेषः । ३८ । 'छिन्नपक्षस्येव राज्ञश्चेष्टानाशश्च' (८.१.९) इति । ३९ । तत्र 'शकुनेः' इति वाक्यशेषः । ४० ।**

**परवाक्यमप्रतिषिद्धमनुमतम् । ४१ । 'पक्षावुरस्यं प्रतिग्रह इत्यौशनसो व्यूह-विभागः' (१०.६.१) इति । ४२ ।**

२९ जे सांगितले नसताही अर्थापासून निष्पन्न होते ती अर्थापत्ति. ३० उदाहरणार्थ, "लोकव्यवहार जाणणाऱ्या मनुष्याने आत्मगुणांनी व द्रव्य-प्रकृतींच्या गुणांनी संपन्न अशा राजाच्या आश्रयास त्याला प्रिय असणाऱ्या व त्याचे हित पहाणाऱ्या मनुष्यामार्फत जावे." (५.४.१) ३१ त्याला अप्रिय असणाऱ्या व अहित करणाऱ्या मनुष्यामार्फत आश्रयास जाऊ नये असे त्या अर्थापासून निष्पन्न होते.

३२ दोन्ही बाजूला कारणे असलेली गोष्ट म्हणजे संशय. ३३ उदाहरणार्थ, "ज्याची प्रजा क्षीण व लब्ध आहे अशा राजावर (स्वारी करावी) की ज्याची प्रजा बंडखोर झाली आहे त्याच्यावर ?" (७.५.१२)

३४ दुसऱ्या प्रकरणासारखीच असलेली गोष्ट म्हणजे प्रसंग. ३५ उदाहरणार्थ, "शेतीच्या कामासाठी दिलेल्या जमिनीवर – इत्यादी पूर्वीसारखेच." (१.११.१०)

३६ विरुद्ध गोष्टीने प्रस्थापित करणे म्हणजे विपर्यय. ३७ उदाहरणार्थ, "याच्या उलट असंतुष्ट राजाची (चिन्हे)." (१.१६.१२)

३८ ज्या शब्दांनी वाक्याचा अर्थ पूर्ण होतो तो वाक्यशेष. ३९ उदाहरणार्थ, "आणि पंख तुटलेल्याप्रमाणे राजाची हालचाल बंद होते." (८.१.९) ४० त्या टिकाणी 'पक्ष्याच्या' हा वाक्यशेष आहे.

४१ निषेध न केलेले दुसऱ्याचे वचन ते अनुमत. ४२ उदाहरणार्थ, "दोन पक्ष, एक उरस्य आणि प्रतिग्रह ही औशनसांची व्यूहाची विभागणी." (१०.६.१)

**अतिशयवर्णना व्याख्यानम् ।४३। 'विशेषतश्च संघानां संघधर्मिणां च राजकुलानां द्यूतनिमित्तो भेदस्तन्निमित्तो विनाश इत्यसत्प्रग्रहः पापिष्ठतमो व्यसनानां तन्त्रदौर्बल्यात्' (८ . ३ . ६४) इति ।४४।**

**गुणतः शब्दनिष्पत्तिर्निर्वचनम् ।४५। 'व्यस्यत्येनं श्रेयस इति व्यसनम्' (८ . १ . ४) इति ।४६।**

**दृष्टान्तो दृष्टान्तयुक्तो निदर्शनम् ।४७। 'विगृहीतो हि ज्यायसा हस्तिना पादयुद्धमिवाभ्युपैति' (७ . ३ . ३) इति ।४८।**

**अभिप्लुतव्यपकर्षणमपवर्गः ।४९। 'नित्यमासन्नमरिबलं वासयेद् अन्यत्राभ्यन्तरकोपशङ्कायाः' (९ . २ . ६) इति ।५०।**

**परैरसमितः शब्दः स्वसंज्ञा ।५१। 'प्रथमा प्रकृतिः, तस्य भूम्यनन्तरा द्वितीया, भूम्येकान्तरा तृतीया' (६ . २ . १३–१५) इति ।५२।**

**प्रतिषेद्धव्यं वाक्यं पूर्वपक्षः ।५३। 'स्वाम्यमात्यव्यसनयोरमात्यव्यसनं गरीयः' (८ . १ . ७) इति ।५४।**

४३ एखाद्या वैशिष्ट्याचे वर्णन करून सांगणे म्हणजे व्याख्यान. ४४ उदाहरणार्थ, "आणि विशेषतः संघांमध्ये आणि संघासारखे असलेल्या राजकुलांमध्ये द्यूतामुळे फाटाफूट होते व त्यामुळे विनाश ओढवतो, म्हणून दुर्जनांना जवळ करावयास लावणारे हे व्यसन, राज्यकारभार शिथिल करून टाकीत असल्याकारणाने, सर्व व्यसनांत अत्यंत वाईट." (८.३.६४)

४५ त्याच्या अवयवांच्या द्वारा शब्दाची व्युत्पत्ती सांगणे म्हणजे निर्वचन. ४६ उदाहरणार्थ, "ते मनुष्याला त्याच्या श्रेयापासून दूर ढकलून देते म्हणून त्याला व्यसन म्हणतात." (८.१.४)

४७ उदाहरण देऊन एखादी गोष्ट स्पष्ट करणे म्हणजे निदर्शन. ४८ उदाहरणार्थ, "कारण, अधिक बलवान राजाबरोबर विग्रह करणारा जणू काही हत्तीबरोबर पायी युद्ध करावयास जातो." (७.३.३)

४९ अधिक व्याप्तीच्या विधानातून काही अंश वगळणे म्हणजे अपवर्ग (अपवाद). ५० उदाहरणार्थ, "शत्रुसैन्याचा तळ नेहमी आपल्या सन्निध ठेवावा, आभ्यंतर कोपाचा धोका असेल ती वेळ खेरीज करून." (९.२.६)

५१ इतरांनी संमती न दिलेला शब्द तो स्वसंज्ञा. ५२ उदाहरणार्थ, "पहिली प्रकृती, त्याच्या भूमीला लागून असलेली ती दुसरी, एक भूमी सोडून पलीकडे असलेली ती तिसरी." (६.२.१३–१५ ?)

५३ खंडन करावयाचे असलेले वचन तो पूर्वपक्ष. ५४ उदाहरणार्थ, "स्वामी आणि अमात्य यांच्यावरील संकटांपैकी अमात्यावरील संकट अधिक गंभीर स्वरूपाचे." (८.१.७)

**तस्य निर्णयनवाक्यमुत्तरपक्षः ।५५। 'तदायत्तत्वात्, तत्कूटस्थानीयो हि स्वामी' (८.१.१७–१८) इति ।५६।**

**सर्वत्रायत्तमेकान्तः ।५७। 'तस्मादुत्थानमात्मनः कुर्वीत' (१.१९.५) इति ।५८।**

**पश्चादेवं विहितमित्यनागतावेक्षणम् ।५९। 'तुलाप्रतिमानं पौतवाध्यक्षे वक्ष्यामः' (२.१३.२८) इति ।६०।**

**पुरस्तादेवं विहितमित्यतिक्रान्तावेक्षणम् ।६१। 'अमात्यसंपदुक्ता पुरस्तात्' (६.१.७) इति ।६२।**

**एवं नान्यथेति नियोगः ।६३। 'तस्माद्धर्म्यमर्थ्यं चास्योपदिशेत्, नाधर्म्यमनर्थ्यं च' (१.१७.३३) इति ।६४।**

**अनेन वाऽनेन वेति विकल्पः ।६५। 'दुहितरो वा धर्मिष्ठेषु विवाहेषु जाताः' (३.५.१०) इति ।६६।**

५५ त्याचा निर्णय देणारे वचन म्हणजे उत्तरपक्ष. ५६ उदाहरणार्थ, "राजावर अवलंबून असल्याकारणाने; कारण, राजा हा त्याच्या शिर:स्थानी आहे." (८.१.१७–१८)

५७ जे सर्व ठिकाणी लागू होते तो एकान्त (सार्वत्रिक व सार्वकालिक नियम). ५८ उदाहरणार्थ, "म्हणून स्वत: उद्यमशील असले पाहिजे." (१.१९.५)

५९ पुढे याप्रमाणे सांगितले आहे असे विधान म्हणजे अनागतावेक्षण (जे आलेले नसून येणार आहे त्याकडे दृष्टिक्षेप). ६० उदाहरणार्थ, "वजने आणि मापे आम्ही पौतवाध्यक्षावरील प्रकरणात समजावून सांगणार आहोत." (२.१३.२८)

६१ मागे असे सांगितले आहे हे विधान अतिक्रांतावेक्षण (होऊन गेलेल्या गोष्टीकडे दृष्टिक्षेप). ६२ उदाहरणार्थ, "अमात्याचे गुण पूर्वी सांगितले आहेत." (६.१.७)

६३ ह्याच प्रकारे, दुसऱ्या प्रकारे नाही, हा नियोग. ६४ उदाहरणार्थ, "म्हणून त्याला धर्माला अनुसरून असणारा व अर्थसिद्धी करून देणारा असा उपदेश करावा, धर्माला सोडून असलेला व अनर्थकारक असा करू नये." (१.१७.३३)

६५ ह्याप्रकारे किंवा ह्या (दुसऱ्या) प्रकारे, हा विकल्प. ६६ उदाहरणार्थ, "किंवा धार्मिक विवाहापासून झालेल्या मुली (वारस होत)." (३.५.१०)

**अनेन चानेन चेति समुच्चयः । ६७ । 'स्वयंजातः पितुर्बन्धूनां च दायादः' (३ . ७ . १३) इति । ६८ ।**

**अनुक्तकरणमूह्यम् । ६९ । 'यथा च दाता प्रतिग्रहीता च नोपहतौ स्यातां तथाऽनुशयं कुशलाः कल्पयेयुः' (३ . १६ . ५) इति । ७० ।**

**एवं शास्त्रमिदं युक्तमेताभिस्तन्त्रयुक्तिभिः ।**
**अवाप्तौ पालने चोक्तं लोकस्यास्य परस्य च ।। ७१ ।।**
**धर्ममर्थं च कामं च प्रवर्तयति पाति च ।**
**अधर्मानर्थविद्वेषानिदं शास्त्रं निहन्ति च ।। ७२ ।।**
**येन शास्त्रं च शस्त्रं च नन्दराजगता च भूः ।**
**अमर्षेणोद्धृतान्याशु तेन शास्त्रमिदं कृतम् ।। ७३ ।।**

**इति तन्त्रयुक्तौ पञ्चदशेऽधिकरणे तन्त्रयुक्तयः प्रथमोऽध्यायः । आदितः पञ्चाशच्छततमः ।**
**एतावता कौटिलीयस्यार्थशास्त्रस्य तन्त्रयुक्तिः पञ्चदशमधिकरणं समाप्तम् ।।**

**(दृष्ट्वा विप्रतिपत्तिं बहुधा शास्त्रेषु भाष्यकाराणाम् ।**
**स्वयमेव विष्णुगुप्तश्चकार सूत्रं च भाष्यं च ।। )**

**समाप्तमिदं कौटिलीयमर्थशास्त्रम् ।।**

६७ ह्याप्रकारे आणि ह्या (दुसऱ्या) प्रकारे, हा समुच्चय. ६८ उदाहरणार्थ, "स्वतःपासून उत्पन्न झालेला (पुत्र) पित्याचा आणि बांधवांचा वारसदार होतो." (३.७.१३)

६९ जे सांगितलेले नसते ते करणे म्हणजे ऊह्य (समजावयाची असलेली गोष्ट). ७० उदाहरणार्थ, "जेणेकरून देणारा व घेणारा ह्या दोघांचेही नुकसान होणार नाही अशा रीतीने तज्ज्ञांनी परत घेण्यास परवानगी द्यावी." (३.१६.५)

७१ याप्रमाणे ह्या (बत्तीस) विवेचनपद्धतींनी समृद्ध झालेले हे शास्त्र ह्या लोकाच्या व परलोकाच्या प्राप्तीसाठी व पालनासाठी प्रस्तुत केले आहे.

७२ हे शास्त्र, धर्म, अर्थ आणि काम ह्यांना प्रवृत्त करते आणि त्यांचे पालन करते, आणि अधर्म, अनर्थ व द्वेष यांचा नाश करते.

७३ ज्याने शास्त्र आणि शस्त्र आणि नंद राजाच्या ताब्यात असलेली भूमी ह्या गोष्टींचा रागाच्या भरात झटकन उद्धार केला त्याने हे शास्त्र रचले.

पंधरावे अधिकरण समाप्त

(शास्त्रांवरील भाष्यकार पुष्कळ प्रकारच्या चुका करीत असलेले पाहून विष्णुगुप्ताने स्वतःच सूत्र आणि भाष्य दोहोंची रचना केली).

**कौटिलीय अर्थशास्त्र समाप्त**

# टीपा

## १

पहिल्या अधिकरणाचा विषय विनय हा आहे. विनय म्हणजे विद्येच्या उपासनेने व विद्यावंतांच्या सहवासाने आलेली सुसंस्कृतता. राज्यकारभार चांगल्या रीतीने करता यावा यासाठी राजा असा सुसंस्कृत असणे आवश्यक मानले आहे. म्हणून विनयाचा विचार प्रथम केला आहे. त्याचबरोबर ह्या अधिकरणात मंत्री, पुरोहित आणि इतर अधिकारी यांच्या नेमणुकीचा विचार केला असून शेवटी राजाने आपल्या स्वतःच्या संरक्षणाची खबरदारी कशी घ्यावी यासंबंधी मार्गदर्शन केले आहे.

## १.१

पहिल्या अध्यायात प्रकरणे व अधिकरणे यांची यादी म्हणजेच ग्रंथाची अनुक्रमणिका दिली आहे.

**ॐ नमः शुक्रबृहस्पतिभ्याम् :** शुक्र आणि बृहस्पती हे अनुक्रमे असुरांचे व सुरांचे गुरू अथवा पुरोहित. ते दोघे ह्या राजनीतिशास्त्राचे प्रवर्तक म्हणून मानले जातात. अश्वघोषाने बुद्धचरितात म्हटले आहे –

यद्राजशास्त्रं भृगुरङ्गिरा वा न चक्रतुर्वंशकरावृषी तौ ।
तयोः सुतौ तौ च ससर्जतुस्तत्कालेन शुक्रश्च बृहस्पतिश्च ।। (१.४६)

तेव्हा राजशास्त्रावरील प्रस्तुत ग्रंथात प्रारंभीच्या मंगलात ह्या दोघांना नमन केले जावे हे उचितच आहे.

१ **पृथिव्या लाभे पालने च :** यात अर्थशास्त्राच्या उद्दिष्टाचा निर्देश आहे. अर्थशास्त्राचे हे उद्दिष्ट कसे काय ते शेवटच्या अधिकरणात १५.१.१–२ येथे स्पष्ट केले आहे. **पूर्वाचार्यैः** भारद्वाजादी अनेक प्राचीन आचार्यांची मते ग्रंथात जागजागी उद्धृत केलेली आढळतात. **प्रायशस्तानि संहृत्य :** याचा अर्थ हा ग्रंथ मुख्यतः ह्या विषयावरील प्राचीन ग्रंथांवर आधारित आहे. तो स्वतंत्र असल्याचा त्याचा दावा नाही.

२ **अधिकरण :** विवेचनासाठी जो विषय घेतला जातो तो अधिकरण अशी त्याची व्याख्या १५.१.४ मध्ये केली आहे. असे एकंदर पंधरा मुख्य विषय अथवा अधिकरणे आहेत. **प्रकरण** म्हणजे अधिकरणातील पोटविषय.

१८ **सपञ्चाशदध्यायशतम् :** अध्याय व प्रकरण ह्यांच्या परस्परसंबंधाचे थोडे विवेचन उपोद्घातात केले आहे. **षट् श्लोकसहस्राणि :** मुख्यतः गद्यात असलेल्या ग्रंथात सहा हजार श्लोक असल्याच्या ह्या विधानाचीही चर्चा उपोद्घातात केली आहे. हे लक्षात घेतले पाहिजे की मल्याळी भाषेतील जुन्या टीकेत (भा) हे सूत्र व पुढील श्लोक – ज्यात कौटिल्याच्या कर्तृत्वाचा निर्देश आहे – यावर टीका नाही. ते दोन्ही मूळ नसण्याची शक्यता आहे.

१९ **कौटिल्येन :** काही हस्तलिखितांत **कौटल्येन** असे रूप आढळते. तसेच पुढेही.

## १.२

२ **मानवाः :** हा निर्देश मनुस्मृतीचा नाही. त्या स्मृतीत (७.४३) चारही विद्यांचे अध्ययन आवश्यक मानले आहे. मानव हे अर्थशास्त्राच्याच एका शाखेचे नाव.

१० **सांख्यं योगो लोकायतं च :** ही तीन दर्शने म्हणजे **आन्वीक्षिकी** असे स्पष्ट म्हटले असल्यामुळे त्या शब्दाचा न्यायशास्त्र असा अर्थ करणे (भा) बरोबर नाही. पुढील सूत्रात

'हेतुभिरन्वीक्षमाणा' अशी ह्या शब्दाची फोड केली असली तरी त्यात हेतूंचा म्हणजे तर्कांचा केवळ साधन म्हणून निर्देश आहे. शिवाय, त्या सूत्रात व नंतरच्या श्लोकात आन्वीक्षिकीचे केलेले वर्णन सांख्य, योग यांसारख्या दर्शनांनाच लागू पडण्यासारखे आहे, तर्कशास्त्राला नाही. नंतरच्या काली मात्र आन्वीक्षिकी म्हणजे न्यायशास्त्र हा अर्थ रूढ झाला. दर्शनांमध्ये लोकायत, सांख्य व योग ही सर्वांत प्राचीन असे मानतात.

**११ नयापनयौ :** पुढे ६.२.६–११ मध्ये ह्या शब्दांच्या अर्थाचे स्पष्टीकरण केले आहे.

१२ गौतमाच्या न्यायसूत्रांवरील वात्स्यायनकृत भाष्यात (१.१.१ वर) हा श्लोक थोडया फरकाने उद्धृत झाला आहे. तेथे चौथा चरण 'विद्योद्देशे प्रकीर्तिता' असा आहे. प्रस्तुत ग्रंथातील ह्या प्रकरणाचे नाव विद्यासमुद्देश आहे हे लक्षात घेतले म्हणजे वात्स्यायनाने हा श्लोक येथून उद्धृत केला आहे हे स्पष्ट होते. अर्थात त्याने हे वर्णन न्यायशास्त्राच्या संबंधात असल्याचे मानले आहे.

१.३

**५ स्वधर्मो इ० :** हे सर्व विवरण धर्मशास्त्राला अनुसरूनच आहे.

**१३ सर्वेषाम् :** सर्व वर्णांना व आश्रमांना समान असलेल्या धर्मांचा निर्देश मनुस्मृतीत (६.९१–९३) व इतरत्रही आढळतो.

**१५ संकरात् :** कर्मसंकर (व्यवसायांची उलटापालट) व वर्णसंकर यांमुळे.

१.४

**१ वार्त्ता :** 'वृत्ति' म्हणजे उपजीविका ह्या शब्दापासून हा शब्द निष्पन्न झाला आहे. उपजीविका प्राप्त करण्याच्या सर्व साधनांचा त्याने बोध होतो.

**३ योगक्षेम :** योग म्हणजे अप्राप्त वस्तूची प्राप्ती आणि क्षेम म्हणजे ती सतत टिकून रहाणे. तेव्हा योगक्षेम म्हणजे समृद्धी व सुरक्षितता. ४ हे सूत्र पुढील दोन सूत्रांत निर्दिष्ट झालेल्या प्राचीन आचार्यांच्या मतात समाविष्ट करावे (मे). परंतु कौटिल्याचा ह्या सूत्रातील विधानावर आक्षेप असलेला दिसत नाही. त्याचा आक्षेप नेहमी 'उद्यतदंड' असावे या गोष्टीला आहे.

**८ उद्वेजनीय :** म्हणजे दुसऱ्यांमध्ये स्वतःविषयी भीती उत्पन्न करणारा.

१.५

४ रघुवंश ३.२९ वर टीका करताना मल्लिनाथाने हे वचन कौटिल्याचे म्हणून उद्धृत केले आहे. **५ शुश्रूषा-इ० :** पुढे ६.१.४ मध्ये ह्यांचा प्रज्ञेचे अथवा बद्धीचे गुण म्हणून निर्देश केला आहे. तेथे 'अभिनिवेश' असे नामच वापरले आहे. येथील 'अभिनिविष्ट' हे पद 'अभिनिवेशयुक्त' या अर्थी समजता येईल.

**७ चौलकर्म :** मुलाचे प्रथम केस कापण्याचा संस्कार जन्मापासून पहिल्या किंवा तिसऱ्या वर्षी होतो. ९ **आ षोडशाद्वर्षात्** म्हणजे वयाचे सोळावे वर्ष पूर्ण होईपर्यंत. पुढे ३.३.१ मध्ये पुरुष सोळा वर्षांचा झाला म्हणजे तो वयात येतो असे म्हटले आहे ; प्रस्तुत वचन त्याचाच अनुवाद करणारे आहे. **१० गोदान** संस्काराला केशान्त असेही नाव आहे.

**१४ इतिवृत्त** 'रामायण, भारत इत्यादी' (ज). **आख्यायिका** 'दिव्य, मनुष्य आदींचे चरित' (भा). **उदाहरण** 'तन्त्राख्यायिका इत्यादी' (ज). मुख्य हस्तलिखितांत **अर्थशास्त्रम्** हा शब्द नाही. आणि ते योग्य आहे. किंबहुना, मागच्या सूत्रातील **इतिहास** शब्दाचे असे

स्पष्टीकरण करण्याची आवश्यकता नव्हती. आणि सामान्यतः पुराणे, धर्मशास्त्र व अर्थशास्त्र यांचा इतिहासात अंतर्भाव होत नाही. हे सूत्र मागाहून घातले गेले असल्याची शक्यता आहे.

१.६

१ **विद्याविनयहेतुः** : हा बहुव्रीहि समास आहे (ज, मे) असे समजणे अधिक चांगले. तत्पुरुष समास मानून **भा, श्री** यांत व्याख्या केली आहे. २ **अविप्रतिपत्तिः** विप्रतिपत्ति म्हणजे चुकीची अथवा अयोग्य प्रवृत्ती, आसक्ती इत्यादी. अविप्रतिपत्ति म्हणजे तिचा अभाव, योग्य रीतीने सेवन, अनासक्ती इत्यादी.

५ **दाण्डक्य** : रामायणातील वर्णनानुसार दंड नावाच्या राजाने पुरोहित उशनसाची कन्या अरजा हिचा विनयभंग केला, म्हणून पुरोहिताच्या शापाने त्याचा राज्यासहित उच्छेद झाला व राज्याच्या ठिकाणी दंडकारण्य अस्तित्वात आले (७.८०–८१). ६ **जनमेजय** : यज्ञातील ऋत्विजांनी आपल्या राणीशी समागम केला आहे असा संशय घेऊन जनमेजयाने त्यांना चाबकाने मारले. वास्तविक ते काम इंद्राचे होते (ज). **तालजङ्घ** हा शर्यातीचा वंशज एवढेच महाभारतावरून कळते. ७ **ऐल** म्हणजे इला व बुध यांचा पुत्र पुरूरवस्. **अत्याहारय्** म्हणजे प्रमाणाबाहेर द्रव्य उकळणे, लुबाडणे. **अजबिन्दु**बद्दल काही माहिती उपलब्ध नाही. ९ **दम्भोद्भव** : हा नर व नारायण यांच्याशी लढू पहात होता, पण त्यांनी त्याला मूठभर गवताने हतवीर्य करून ताळ्यावर आणले (महाभारत ५.९४). कार्तवीर्य **अर्जुन** व जमदग्नि आणि परशुराम यांची कथा प्रसिद्ध आहे. १० **हर्ष** म्हणजे उत्तेजित होऊन खोडकर अथवा खेळकर वृत्ती. **वातापि** आणि इल्वल हे दोघे राक्षस बंधू. जादूने वातापीला बोकड बनवून इल्वल त्याचे मांस ब्राम्हणांना श्राद्धात देई. त्यांनी खाल्यावर तो त्याला हाक मारी व तो ब्राम्हणांचे पोट फाडून बाहेर येई. अगस्त्य ऋषीवर जेव्हा हा प्रयोग केला तेव्हा त्याने वातापीला जठरातच पचवून नष्ट केले. **द्वैपायनम्** : महाभारतातील वर्णनानुसार वृष्णींनी अथवा यादवांनी नारदाची कुचेष्टा केली होती, द्वैपायनाची नाही.

१२ **जामदग्न्य** म्हणजे परशुराम. त्याने पृथ्वीचा चिरकाल उपभोग घेतला असल्याचे प्रसिद्ध नाही. एकवीस वेळा पृथ्वी जिंकून त्याने तिचे ब्राम्हणांना–विशेषतः कश्यपाला–दान केले अशी प्रसिद्धी आहे.

१.७

२ **अनर्थ्य** 'नट, नर्तक, गायन आदी अनर्थकारक गोष्टी करणारे लोक' (ज).

६ **अर्थ एव प्रधान** : हे कौटिल्याचे स्वतःचे मत म्हणून मांडले आहे. अशी शक्यता आहे की सूत्र ३ आणि ४–५ यांत मांडलेली मते पूर्वीच्या काही आचार्यांची आहेत.

८ **मर्यादां स्थापयेत** : म्हणजे त्यांचा उपदेश ही आचरणाची मर्यादा मानून तिचे उल्लंघन करू नये. **छायानालिकाप्रतोदेन** : छाया आणि नालिका ही वेळ मोजण्याची साधने. त्यांचे वर्णन पुढे अध्याय २.२० मध्ये केले आहे. प्रतोद म्हणजे अंकुश. हत्ती चुकीच्या मार्गाने जात असल्यास अंकुशाने त्याला सरळ मार्गावर आणता येते. तद्वत राजा प्रमाद करीत असल्यास त्याला त्यावेळी करावयाचे असलेल्या कामाची आठवण करून देऊन प्रमादापासून परावृत्त करावे.

९ हा श्लोक पुढील अध्यायाच्या प्रारंभी आहे (भा). तेथे त्याचे औचित्य आहे यात शंका नाही. प्रस्तुत अध्यायाच्या विषयाशी तो संबद्ध नाही.

१.८

१ **भारद्वाज** म्हणजे द्रोणाचार्य असे म्हटले जाते. पण ते बरोबर दिसत नाही. भीष्माप्रमाणे द्रोण राजनीतीचा उपदेशक असल्याचे प्रसिद्ध नाही. महाभारतात राजशास्त्रप्रणेत्यांपैकी एक म्हणून भारद्वाजाचा निर्देश आहे आणि एके ठिकाणी कणिङ्क भारद्वाजाची शिकवण मांडली

आहे. कणिकनीति म्हणून ती ओळखली जाते. प्रस्तुत ग्रंथात ५.५.११ या ठिकाणीसुद्धा कणिङ्क भारद्वाज नावाच्या मंत्र्याचा निर्देश आहे. त्याचाच ह्या व इतर ठिकाणी निर्देश अभिप्रेत असण्याचा संभव आहे.

३ **विशालाक्ष** म्हणजे शिव. महाभारतात म्हटले आहे की ब्रह्मदेवाने एक लक्ष अध्याय असलेल्या ग्रंथाची रचना केल्यावर शंकराने तो दहा हजार अध्यायांत संक्षिप्त केला व त्याला "वैशालाक्ष शास्त्र" असे नाव पडले.

११ **पिशुन** म्हणजे नारद असे म्हटले जाते. सभापर्वातील कच्चिदध्यायात (२.५) नारदाने युधिष्ठिराला विचारलेले प्रश्न राजनीतिविषयक आहेत. तथापि तो ह्या शास्त्राचा प्रणेता असा निर्देश कोठे नाही. पुढे ५.५.११ मध्ये निर्देशिलेल्या पिशुन नावाच्या मंत्र्याने ह्या शास्त्रावर लिहिले असण्याची शक्यता आहे.

१४ **कौणपदन्त** (शब्दशः 'पिशाचासारखे दात असलेला'): ही भीष्माची संज्ञा आहे. गंगेच्या शापामुळे शंतनु पूतिदन्त झाला म्हणजे त्याच्या दातांची घाण येऊ लागली होती (नी). कुणपदन्त म्हणजे पूतिदन्त शंतनु, त्याचा पुत्र कौणपदन्त (ज). १६ **अवदान** म्हणजे शुद्ध आचरण आणि **अपदान** म्हणजे अपराध, गुन्हा हे दोन भिन्न अर्थाचे शब्द आहेत. १७ **सगन्ध** म्हणजे एकाच वर्गातील, सजातीय (शब्दशः 'सारखाच वास असलेले'). १८ शाकुन्तलात 'सर्वः सगन्धेषु विश्वसिति (अंक ५)' असे वचन आहे.

२० **वातव्याधि** म्हणजे उद्धव. त्याचा ह्या शास्त्राशी संबंध असल्याचे कोठे प्रसिद्ध नाही. २१ **अव-ग्रह** ताब्यात घेणे, कह्यात ठेवणे इत्यादी.

२४ **बाहुदन्तीपुत्र** म्हणजे इंद्र. महाभारतात म्हटले आहे की इंद्राने वैशालाक्ष शास्त्राचा पाच हजार अध्यायांत आणखी संक्षेप केला व त्याला 'बाहुदन्तक' असे नाव पडले.

२७ **सर्वमुपपन्नम्** : याचा अर्थ असा दिसतो की वरील निरनिराळ्या मतांत सत्याचा अंश आहे, आणि त्यात शिफारस केलेल्या विविध प्रकारच्या माणसांची त्यांना अनुरूप अशा कामावर नेमणूक करावयास हरकत नाही.

२९ **सर्व एवैते** वरील सहाध्यायी वगैरे.

## १.९

४ **राजवृत्ति** म्हणजे राजाच्या दृष्टीने होणारे राज्यकारभाराचे विविध स्वरूप.

९ **उदितोदित :** ह्यातील द्विरुक्तीचा उद्देश कुल व शील यांच्या उच्चतेवर जोर देणे असा आहे. 'ज्या कुलात चार पिढ्या काही दोषास्पद घडले नाही असे' (भा). **दैवे :** उल्कापात आदी दैवी घटनांचा अर्थ सांगणारे शास्त्र. **निमित्ते :** पक्ष्यांचे उड्डाण वगैरेचा अर्थ लावणारे शास्त्र.

११ **एधित, अभिमन्त्रित** आणि **शस्त्रित** (शस्त्र म्हणजे स्तुतिपर मंत्र) यांत यागातील अग्नीच्या उपासनेचे सूचन आहे.

## १.१०

३ **तत्कुलीन** म्हणजे राजाच्या कुलातील आपलाच खरोखर राज्यावर हक्क आहे असे सांगणारा पुरुष. **अपरुद्ध** म्हणजे राजाची गैरमर्जी झालेला राजपुत्र. अशा राजपुत्राविषयी विचार पुढे अध्याय १.१८ मध्ये केला आहे. **एकप्रग्रह** म्हणजे ज्याच्या हातात राज्याचा सर्व कारभार आहे असा प्रधान अमात्य. सूत्र ५.६.२८ वरून हा अर्थ स्पष्ट आहे. **सामन्त** म्हणजे शेजारच्या राज्याचा स्वामी. कोठे कोठे मांडलिक असा याचा अर्थ होतो. **आटविक** म्हणजे जंगलातील एखाद्या रानटी टोळीचा मुख्य. **औपपादिक** म्हणजे एकाएकी बलाढ्य बनलेला राजकुलाबाहेरील पुरुष. ४ **धर्मोपधा :** यात अधिकाऱ्याच्या धार्मिकतेची कसोटी लागते. राजा अधार्मिक आहे हे त्याला मान्य नसते.

५ **असत्प्रग्रह** म्हणजे दुर्जनांना आसरा देणे. ६ **अर्थोपधा** : द्रव्याची लालूच असते म्हणून हे नाव.

९ **प्रहवण** 'प्रहूयन्तेऽस्मिन् स्वजनमित्राणीति प्रहवणम् उद्वाहादिरुत्सवः' (ज); 'प्रीति-भोजन' (भा). ११ **कापटिकः** : पुढे १.११.२ मध्ये ह्या गुप्त हेराचे वर्णन आहे. १२ **भयोपधा** : अमात्याला वाटणाऱ्या भीतीवरून हे नाव दिले आहे.

१३ **धर्मस्थीय** : अधिकरण ३. **कण्टकशोधन** : अधिकरण ४. **समाहर्तृ** : २.६. **संनिधातृ** : २.५.

१७ **कौटिल्यदर्शनम्** : दर्शन म्हणजे मत. तत्वज्ञानविषयक शास्त्र असा त्याचा अर्थ अभिप्रेत नाही. २० **बाह्यमधिष्ठानम्** : राजाच्या ऐवजी दुसऱ्या कोणाची योजना करून वर वर्णन केल्याप्रमाणे परीक्षा घेणे कसे शक्य आहे ते स्पष्ट नाही. कामोपधेत मात्र राणीऐवजी दुसऱ्या एखाद्या स्त्रीची योजना समजण्यासारखी आहे.

**१.११**

२ **कार्पटिक** : 'कपटेन चरति इति' (ज, नी). **छात्र** : 'शरीरमात्रपरिच्छदः' (भा); 'कपालिकामात्रपरिच्छदः' (नी); ह्याने भिकाऱ्याचा वेष सूचित होतो. हा शब्द छद् म्हणजे झाकणे, गुप्त राखणे ह्या धातूपासून आला आहे. ३ **प्रत्यादिश्** : 'कळविणे'.

१३ **मुण्डजटिल** : 'शाक्य, आजीवक इत्यादी हे मुंड, पाशुपत वगैरे जटाधारी' (नी). १५ **समिद्धयोग** : 'पूर्ण मनोरथयोग' (भा). 'समिद्ध हे समृद्धचे प्राकृतीकरण असावे' (मे). नंतरच्या सामेधिक व समेधा ह्या शब्दांतील एध् धातूशी समानार्थक ऋध् धातूने युक्त रूपच संभाव्य असल्याकारणाने ही सूचना ग्राह्य वाटते. १७ **अङ्गविद्यया** : 'प्रश्न विचारणाऱ्याच्या शरीराला स्पर्श करून त्या स्पर्शावरून उत्तर देण्याची विद्या म्हणजे अंगविद्या' (नी). १९ **राजभाग्यम्** : 'अस्य राज्ञः सकाशात् तव भाग्यं लक्ष्मीर्भविष्यति' (नी).

२१ **ये च इ०** : कापटिकादी गूढपुरुषांच्या संबंधात हे विधान केले आहे. पुढील श्लोकावरून हे स्पष्ट आहे. २२ **संस्थाः** : 'सम्यग् एकस्मिन् स्थाने स्थिताः' (नी).

**१.१२**

१ **ये चाप्यसंबन्धिनोऽवश्यभर्तव्याः** : 'च आप्यसंबन्धिनः' याप्रमाणे संधी सोडविला आहे. आप्य म्हणजे माता व पिता यांच्या कुलांतील नातेवाईक आणि संबंधी म्हणजे राण्या व इतर स्त्रिया यांच्यामुळे झालेले नातेवाईक. या सर्वांच्या पोषणाची जबाबदारी राजाची. भा ज ह्या टीकांत 'चास्य संबन्धिनः' असा पाठ स्वीकारला आहे. 'अस्य' म्हणजे राज्ञः. **लक्षणम्** म्हणजे सामुद्रिक शास्त्र. **अङ्गविद्या** : वर सूत्र १.११.१७ वरील टीप पहावी. **जम्भकविद्या** : 'अदृश्य होणे इत्यादी जादूच्या प्रयोगांची विद्या' (भा). **मायागतम्** : म्हणजे भुरळ पाडणारे इंद्रजाल. **अन्तरचक्रम्** : 'कोल्हेकुई वगैरे जनावरांच्या आवाजांचा अर्थ सांगणारे शास्त्र' (ज). **संसर्गविद्या** : म्हणजे गीतनृत्यादी विद्या 'संसृज्यन्ते जना यस्यां सा संसर्गविद्या गीतनृत्यादिका' (नी). **सत्त्रिन्** हा शब्द सत्त्र शब्दापासून निष्पन्न झाला आहे आणि सत्त्र म्हणजे दुसऱ्यावर अचानक हल्ला करण्यासाठी लपून राहण्याची जागा, वेळ अथवा संधी. पुढे १०.३.२४ मध्ये अशा सत्त्रांची यादी दिली आहे. सत्त्री हेराचे काम गैरसावध माणसावर एक प्रकारचा हल्ला करण्यासारखे आहे.

५ **मुण्डा वृषल्यः** : प्रस्तुत ग्रंथात वृषल शब्द वेदबाह्य पंथांच्या अनुयायांना लावला आहे. त्या पंथांतील भिक्षुणी मुंडन करीत. काही टीकाकार समजतात त्याप्रमाणें मुण्डा आणि वृषली ह्या भिन्न नाहीत.

६ **मन्त्रिपुरोहित- इ०** : पुढे श्लोक २० मध्ये निर्देशिलेल्या अठरा तीर्थांची अथवा महा-मात्रांची म्हणजे मोठमोठ्या अधिकाऱ्यांची ही यादी आहे. **प्रशास्तृ** १०.१.१७ मध्ये निर्दिष्ट

आहे. **पौरव्यावहारिक :** ह्या नावाचा महामात्र अन्यत्र फक्त पगारांच्या यादीत (५.३.७ मध्ये) निर्दिष्ट आहे. तो म्हणजे नागरिक अशी शक्यता आहे; 'धर्मस्थ'(ज). **मन्त्रिपरिषद-ध्यक्ष :** अठरा ह्या संख्येचे उल्लंघन होऊ नये यासाठी हा एकच महामात्र आहे असे समजावे लागते. पण मंत्रिपरिषदेच्या अध्यक्षाचा अन्यत्र निर्देश नाही. **दण्डपाल :** ह्या महामात्राचाही अन्यत्र निर्देश नाही. पगारांच्या यादीत त्याच्याऐवजी राष्ट्रपालाचा निर्देश आहे (५.३.७). **भक्तितः :** भक्ति म्हणजे स्वामिभक्ती असाच अर्थ संभाव्य आहे.

९ '**सूद** म्हणजे आचारी, **आरालिक** म्हणजे वाढपी' (भा). **वाग्जीवन** म्हणजे 'कथक इत्यादी' (ज). **कुशीलव :** सामान्यतः नटनर्तकादींना ही संज्ञा लावतात. येथे त्यांचा स्वतंत्र निर्देश आहे, तेव्हा कुशीलव म्हणजे भाट समजावे.

१७ **असंपातिनः :** संपात म्हणजे एकत्र येणे, गर्दी करणे. त्यावरून 'असंपातिनः' म्हणजे एकत्र न येता स्वतंत्रपणे काम करणारे, परस्परांशी ओळख न दाखविणारे.

१९ **तद्विधैः :** उदाहरणार्थ, उभयवेतन हेर वैद्याच्या वेषात असल्यास त्याच वेषातील हेराने त्याच्यावर नजर ठेवावी.

२० **शत्रौ च** इ० : राजमंडलातील ह्या राजांचे वर्णन पुढे अध्याय ६.२ मध्ये केले आहे.

२५ ह्या श्लोकातील कल्पना अशी आहे की ज्यांच्या राजनिष्ठेविषयी मुळीच शंका नाही अशा अधिकाऱ्यांना ते क्रोध, लोभ आदीमुळे संभाव्य फितूर आहेत असा देखावा निर्माण करून सरहद्दीवर नेमावे. शत्रू त्यांना फितूर करण्याचा प्रयत्न करू लागल्यास त्याचीच गुपिते त्या अधिकाऱ्यांना कळण्याचा संभव आहे.

१.१३

२ **पूग :** 'पूगाः श्रेणीगणाः तन्तुवायादीनाम् (विणकर आदींच्या श्रेणी) '(नी). ५ **मनुं वैवस्वतं** इ० : महाभारत १२.६७.२०--३२ येथे मनूला पहिला राजा केल्याचे वर्णन आहे. ८ भाषांतर **नी** टीकेला अनुसरून केले आहे. 'अदण्डकराः' नंतर 'प्रजाः' आणि 'अयोग-क्षेमावहाश्च' नंतर 'राजानः' हे शब्द अध्याहृत धरले आहेत. १३ **क्षुद्रक** 'सामान्य लोक' आणि प्रधान (सूत्र २६) असा प्रजाजनांत फरक केला आहे.

१५ **ये चास्य** इ० : यात प्रधान म्हणजे मुख्य मुख्य अधिकाऱ्यांचा निर्देश आहे. **कुपितम् :** कुप् म्हणजे बंड करून उठणे व कोप म्हणजे बंड हे अर्थ या ग्रंथात अभिप्रेत आहेत.

१.१४

२ **वल्लभापरुद्धः :** एखाद्या राजवल्लभाच्या कारस्थानामुळे ज्याच्यावर राजाची गैरमर्जी झाली आहे असा. **प्रवासित** म्हणजे हद्दपार केलेले किंवा ठार मारलेले. दोन्ही अर्थ संभाव्य आहेत.

३ **स्वयमुपहतः :** 'स्वतःच्या दुष्कृत्यामुळे राजाच्या कार्याचे नुकसान झाले म्हणून हतबुद्ध झालेला' (ज). **विप्रकृतः :** 'ज्याच्यावर गुन्ह्याचा आरोप केला गेला आहे असा' (ज).

५ **नीचैरुपहितः :** 'नीचैः' हे क्रियाविशेषण समजता येईल. 'नीच' हे नाम समजल्यास 'खालच्या लोकांबरोबरचा दर्जा दिलेला' असा अर्थ होईल.

११ **पण** म्हणजे तहात अथवा करारात घातलेली अट.

१.१५

८ **इङ्गित** म्हणजे नेहमीच्यापेक्षा निराळे वागणे (अन्यथावृत्ति). **इङ्ग्** म्हणजे हालचाल करणे. ९ **आकृतिग्रहणम्** म्हणजे चेहऱ्यावर निराळे भाव (राग आल्याची मुद्रा, पांढराफटक होणे इत्यादी) दाखविणे.

**१३ अयोगक्षेमकरो राज्ञः** : 'यथा ध्रुवदेव्या कृतो रामगुप्तशरीरस्य' (नी).

**१९ प्रत्यक्ष-** इ० : वर सूत्र १.९.४ पहावे.

**३८ तत्** म्हणजे दबावाखाली रहाणे व विनाशाप्रत जाणे. **३९** वाक्यातील कर्ता मागच्या सूत्रातील 'तत्' हे सूत्र मूळ नसण्याची शक्यता आहे. कोणातरी टीकाकाराचे हे वाक्य दिसते.

**४१ यथासामर्थ्यम्** : 'मन्त्रे सामर्थ्यं शास्त्रचक्षुष्मत्ता निरतिशया प्रज्ञा लोकव्यवहारकौशलं च' (नी).

**४७ मानवाः** ह्या मताचाही मनुस्मृतीत मागमूस नाही. **५० यथासामर्थ्यम्** म्हणजे राज्याच्या सामर्थ्याच्या अनुरोधाने.

### १.१६

**१ उद्धृतः** : उद् + वृ निवड करणे, पसंत करणे.

**२ अमात्यसंपद्** : वर १.९.१ मध्ये वर्णिल्याप्रमाणे.

**१० अधिष्ठान** म्हणजे राजाचे निवासस्थान व त्यातील दरबाराची जागा.

**१९ परेषु** इ० : याचा अर्थ असा की आपला स्वामी अथवा आपण स्वतः फार बलवान आहोत असे मानून एखादे साहस करू नये.

**३४ समाधिमोक्षः** 'ओलीस ठेवलेल्या राजपुत्राची सुटका करून घेणे.' हे एका प्रकरणाचे नाव आहे (अध्याय ७.१७).

**३५ रक्ष्** म्हणजे त्यांच्यावर नजर ठेवणे, त्यांच्या संबंधात खबरदारी घेणे.

### १.१७

**६ अजातस्नेहे पितरि** : ही सति सप्तमी आहे. पित्याच्या मनात त्यांच्याविषयी प्रेम उत्पन्न होण्याच्या अगोदरच असा अर्थ.

**१० तमेवाङ्कं कुर्यात्** : अङ्कं कृ म्हणजे ताब्यात घेणे, अंकित करून घेणे. 'तम्' म्हणजे 'पितरम्'. त्याची 'पराक्रमम्' अशी व्याख्या करता येईल. पण ती विशेष समाधानकारक नाही.

**१२ औरभ्रम्** : एडक्याला रिंगणाच्या काठाशी नेले असता तो दुसऱ्या एडक्याला टक्कर देण्यासाठी रिंगणाच्या मध्याकडे चाल करून येतो तद्वत्.

**१९ अदितिकौशिकवत्** : 'अदिति शब्दाने तिचे पुत्र काल आदी देव समजावयाचे आहेत. आणि कौशिक म्हणजे आहितुण्डिक (गारुडी)' (नी). पण गारुडी ध्वजाच्या आधारे मागणी करीत नाहीत. अदितिकौशिक शब्दात एकच कल्पना – एक प्रकारच्या भिक्षेकऱ्यांचा पंथ – अभिप्रेत दिसते.

**२५ कौमारभृत्य** : मुलांच्या रोगांची चिकित्सा करणारा खास वैद्य. गर्भाचे संवर्धन व स्त्रीची प्रसूती यांतही तो निष्णात असे.

**२९ आंभीयाः** : ह्या अर्थशास्त्रशाखेविषयी काही माहिती उपलब्ध नाही.

**३१ नवं द्रव्यम्** : उदाहरणार्थ, मातीचे नवीन भांडे.

**३९ अनुप्रविश्य** : म्हणजे त्याच्या बेतात सामील झाल्यासारखे दाखवून त्याचा विश्वास संपादन करून. प्र + अर्थ् म्हणजे हल्ला करणे.

**४२ गर्भः पण्यं डिम्बो वा** : 'गर्भ म्हणजे गर्भासारखा, जेथील लोक त्याला पुत्रासारखा अथवा जावयासारखा मानून त्याच्यावरील प्रेमाने राजाच्या विरुद्ध उठाव करणार नाहीत.

पण्यासारखा म्हणजे जेथील लोक त्याला विकून त्या पैशाने स्वतःचे बळ वाढविणार नाहीत. डिम्ब म्हणजे क्षोभ, विद्रोह; जेथे त्याच्या आश्रयाने लोक उपद्रव करणार नाहीत. '(ज).

४६ **आहार्यबुद्धिः** 'आचार्यादिभिः प्रतिक्षणम् आहार्या बुद्धिर्यस्य '(नी). 'आहार्य' म्हणजे दुसरीकडून वळवून आणावी लागत असलेली.

५३ **राजव्यसन :** राजाविषयीच्या संकटांचा विचार अध्याय ८.२ मध्ये केला आहे. हा 'कुलसंघ' अकराव्या अधिकरणातील संघांहून भिन्न, पण त्यांसारखाच आहे.

## १.१८

८ **सुवर्णपाक** 'सुवर्णस्य वर्णोत्कर्षार्थं पाकः' (ज). **मणिराग :** स्फटिकस्य जात्यन्तरगुणाधानार्थं रञ्जनम् (स्फटिकावर रंग चढवून इतर रत्नांसारखे बनविणे) ' (ज). ९ **मदनरस :** ज्याने शुद्ध हरपते असे पेय. १२ **मां भर्तुम् :** 'भर्तुम्' याचा थोडा निराळा अर्थ करावा लागतो. भृ म्हणजे धारण करणे यावरून आधार देणे, उपयुक्त होणे, सेवा करणे असे अर्थ निष्पन्न होतात.

१३ **मुख्यपुत्र- :** 'मुख्य अधिकाऱ्यांचे पुत्र त्याचे सवंगडी असण्याचा संभव असल्यामुळे ते त्याची समजूत घालू शकतील' (ज). **प्रतिपाद्य :** 'कबूल करून घेऊन'. 'यौवराज्य अथवा राज्य देण्याचे कबूल करून' (भा, नी).

१६ 'सांत्वन करावे तो बुद्धिमान असेल तर, बंधनात टाकावे तो आहार्यबुद्धी असेल तर आणि वध करावा तो दुर्बुद्धी असेल तर' (नी).

## १.१९

६ **नालिकाभिः** एक नालिका चोवीस मिनिटांची असते. नालिकेचे वर्णन पुढे २.२०.३४-३५ मध्ये केले आहे. ७ **पौरुष** म्हणजे छायायंत्रावरील शंकूची लांबी. २.२०.१० प्रमाणे ती बारा अंगुले (सुमारे नऊ इंच) असते.

२८ **कोष** म्हणजे बंड हा अर्थ अभिप्रेत आहे.

३१ शाकुन्तलाच्या पाचव्या अंकात ह्या नियमाचे पालन झालेले दाखविले आहे.

## १.२०

**निशान्त** (नि+शम् पासून) म्हणजे राजाचे निवासस्थान, राजवाडा.

१ **अन्तःपुरम्** हा शब्द आणि निशान्त समानार्थी आहेत. 'अन्तःपुरं राजवासकम्' (ज). अन्तःपुर म्हणजे केवळ जनानखाना नाही.

२ **कोशगृहविधानेन :** कोशगृह कसे बांधावे ते पुढे २.५. २-३ मध्ये सांगितले आहे. **चैत्य-काष्ठदेवता** + इ० : तळघरातून भुयारी मार्गाने देवळात बाहेर पडण्याच्या जागेवर देवतेची लाकडी मूर्ती ठेवून भुयारी मार्गाचे तोंड झाकले जाते. तळघरातून त्या मार्गाने पळून येणाऱ्या मनुष्याला ती मूर्ती सहज बाजूला सारून देवळातून गुपचुपपणे निसटून जाता येईल. **प्रासाद** हा तळघराच्या वर बांधलेला मजला. ३ **सहाध्यायि-** 'त्याच्याप्रमाणेच राजनीतिशास्त्राचे अध्ययन केलेले दुसरे राजे' (भा, ज). नेहमीचा राजाबरोबर शिक्षण घेतलेले हा अर्थही संभाव्य आहे.

४ **मानुषेणाग्निना :** हा अग्नी कसा उत्पन्न करावा ते पुढे १४.२.३८ मध्ये सांगितले आहे. **अपसव्यम्** 'प्रदक्षिणेच्या उलट' (भा, श्री), 'प्रादक्षिण्येन' (ज), 'प्रदक्षिणेन परिगतम् नीराजितम्' (नी).

१५-१६ बाणाच्या हर्षचरितात ह्या आख्यायिकांचे निर्देश आढळतात. तेथे व इतरत्रही ह्या राजांची व त्यांच्या राण्यांची नावे दिली आहेत.

**१८ कुहक** 'मायायोगविद् (इंद्रजालविद्या जाणणारा)' (नी).

**२० रूपाजीवा** म्हणजे वेश्या. आपल्या रूपावर म्हणजे सौंदर्यावर उपजीविकेसाठी अवलंबून असणारी स्त्री असा मूळ अर्थ. रूप (रूपक) म्हणजे नाटकाचा प्रकार, त्याने उपजीविका करणारी नटी असाही मूळ अर्थ संभाव्य आहे. **२१ मातापितृव्यञ्जनाः** म्हणजे अंतःपुरातील नोकरांचे आईबाप अशी बतावणी करणारे हेर 'अन्तश्चराणां कृतकमातापितरः राजप्रणिहिताः' (नी). **अभ्यागारिक** म्हणजे अतःपुरातील सेवक.

## १.२१

**१ धन्विभिः** च्या जागी 'बन्दिभिः असा **ज** मध्ये पाठ आहे. तो संभाव्य असला तरी 'च' अव्ययाच्या अभावी स्वीकार्य नाही. २ सोमदेवाने नीतिवाक्यामृतात (§२४) हे वचन 'अत एवोक्तं नयविद्भिः' असे म्हणून उद्धृत केले आहे.

**७ क्लिष्ट** 'हस्तमृदित' (नी). **क्वाथ** 'अग्नीवरून काढल्यावरही खदखदत रहाणे' (नी). **तन्तुरोमपक्ष्मशातनम्** : कापूस, लोकर व केस हे झडून जाणे. **राग** म्हणजे रंग आणि **वर्ण** म्हणजे जात. **प्रभाव** : काही मण्यांना विशिष्ट शक्ती असतात असे प्रसिद्ध आहे.

**९ जाङ्गुली** म्हणजे विष उतरविण्याची विद्या. 'ही विद्या बौद्ध लोकांत प्रसिद्ध आहे' (नी).

**१४ स्नानानुलेपन** इ० : निरनिराळ्या टीकांत निरनिराळे अर्थ दिले आहेत. प्रस्तुत भाषांतरात स्नानानुलेपन, प्रघर्षचूर्ण, वास आणि स्नानीय असे चार पदार्थ निर्दिष्ट असल्याचे मानले आहे.

## २

दुसरे अधिकरण अध्यक्षांच्या (म्हणजे निरनिराळ्या खात्यांच्या प्रमुखांच्या) कार्याविषयी आहे. राज्यकारभाराविषयीची संपूर्ण माहिती यात आढळते. फक्त न्यायदान, कंटकांचा बंदोबस्त हे विषय तीन व चार या स्वतंत्र अधिकरणांत चर्चिले आहेत.

## २.१

**१ भूतपूर्वम्** : पूर्वी वस्ती असलेले पण दुष्काळ वगैरेमुळे ओसाड झालेले. **अपवाहन** : लालूच दाखवून अथवा जबरीने परदेशांतून माणसे आणता येतील. रघुवंश १५.२९ वर मल्लिनाथाने हे वचन कौटिल्याचे म्हणून उद्धृत केले आहे.

**२ क्रोश** म्हणजे गोरुत. २.२०.२५ मध्ये गोरुताचा निर्देश आहे, क्रोशाचा नाही. 'रात्र संपल्यावर गायीचे हंबरणे अथवा ओरडणे जितके अंतर व्यापते ते गोरुत अथवा क्रोश' (नी).

**३ भृष्टि** 'रेती वगैरे असलेली जागा' (नी). **गृष्टि** 'लहान टेकडी' (भा) असा पाठभेद आहे. **क्षीरवृक्ष** : वड, पिंपळ आदी.

**७ अभिरूपदायादकानि** म्हणजे दान घेणाऱ्याइतकेच कर्तृत्व असलेल्यांनाच त्यांचे वारसदार होता येईल.

**११ ग्रामभृतक** 'न्हावी वगैरे' (चा). 'कुंभार, लोहार वगैरे' (नी). म्हणजे हे बलुतेदारांसारखे. पण ५.३.२३ अनुसार त्यांना सरकारकडून पगार मिळावा असे अपेक्षित आहे.

**२६ अनाथ** हे बाल, वृद्ध इत्यादींचे विशेषण 'बालादीनामन्तःपतितोऽप्यनाथशब्दो विशेषणम्, अन्यथा अतिप्रसङ्गः स्यात्' (नी).

**२९ स्त्रियं च** : 'अनिवृत्तरजस्क अशी स्त्री अभिप्रेत आहे' (नी). **३० लुप्तव्यायामः** 'बाह्याभ्यन्तरशक्तिविकलः' (चा), 'प्रजननशक्त्यभावात्' (नी).

३२ नी टीकेत म्हटले आहे की ही बंधने वसाहत स्थापन करतानाच लागू होतात. मागाहून ती राजाच्या परवानगीने शिथिल होतात (अयं निवेशविषयो नियमः, आगन्तवस्तु पाषण्डादयो राज्ञानुज्ञाताः प्रविशन्ति).

२.२

**भूमिच्छिद्र** म्हणजे लागवडीस योग्य नसलेली जमीन. प्राचीन दानपत्रांत हा शब्द वापरण्यात आला आहे. 'छिद्र' शब्दाच्या अनुरोधाने त्या जमिनीचे अपिधान (झाकणे) असे म्हटले आहे.

१ **विवीत** म्हणजे गुरांसाठी चरण्याची जागा. 'वी खादनेऽत्र द्रष्टव्यः' (नी).

३ '**गुल्माः** करमर्दकादयः (करवंदे वगैरे), **गुच्छाः** बदरामलकादयः (बोरे, आवळे इत्यादींची झाडे)' (नी). **मार्गयुकः** मृगांची इच्छा करणारे ते 'मृगयु', त्यांच्या मृगयेच्या कार्यात उपयुक्त ते मार्गयुक (चा). ४ हे मृगवन प्राणिसंग्रहालयासारखे आहे.

५ **अटवी :** म्हणजे अटवीमध्ये रहाणाऱ्या लोकांना 'आटविकान्' (नी).

७ **नी** टीकेत पार्वत, नादेय वगैरे हत्तींचे वर्णन करणारे श्लोक उद्धृत केले आहेत. **नागवनाध्यक्ष** हा २.३१ मधील हस्त्यध्यक्षाहून भिन्न आहे.

११ **एकचर** म्हणजे स्वतः कळप सोडून गेलेला आणि **निर्यूथ** म्हणजे कळपातून घालवून दिलेला.

१२ **अनीकस्थ** म्हणजे हत्तींना शिकवून तयार करणारे.

**१५-१६ नी** टीकेत ह्या हस्तिवनांच्या चतुःसीमा सांगणारे श्लोक उद्धृत केले आहेत. त्या अनुसार उत्कल, दक्षिण समुद्र, सह्य आणि कलिंग यांच्यामध्ये असलेले कालिंगक वन; विदिशा, नर्मदा, ब्रह्मवर्धन आणि पारियात्र यांच्यामध्ये आंगरेयक वन; लौहित्य, प्रयाग, गंगा, आणि हिमवत् यांच्यामध्ये प्राच्यवन; मेकला, त्रिपुरी, दशार्ण आणि उन्मत्तगंगा यांच्यामध्ये चेदिकरूषक वन; दशार्ण, महागिरी, विंध्य आणि वेत्रवती यांच्यामध्ये दाशार्णक वन; अवंती, नर्मदा, द्वारका आणि अर्बुद यांच्यामध्ये सौराष्ट्रक वन; कुरुक्षेत्र, कालिकाकानन, सिंधु व हिमवत् यांच्यामध्ये पांचनद वन. आपरांत वनाचे वर्णन करणारा श्लोक आढळत नाही.

२.३

१ **सांपरायिक :** संपराय म्हणजे युद्ध, त्यासाठी सज्ज. **निम्न** म्हणजे पाणी (नी). **खञ्जन** म्हणजे दलदलीचा प्रदेश. ह्या सूत्रातील हे सर्व दुर्ग दैवकृत म्हणजे निसर्गानेच केलेले आहेत. मनुष्यांनी त्यांचा दुर्गप्रमाणे उपयोग करावयाचा इतकेच.

३ **सरस्** नैसर्गिक आणि **तटाक** कृत्रिम असे दोन प्रकारचे **ह्रद**.

४ **दण्ड** म्हणजे धनुस्, चार अरत्नि अथवा चार हात (२.२०.१८). सर्वांत रुंद खंदक तटाजवळ आणि पुढे उतरत्या क्रमाने (नी).

५ **ऊर्ध्वचयम्** 'वल्मीकनिकरसंस्थानम्' (चा) म्हणजे वर कमी रुंद होत जाणारा.

६ **वास्तुच्छिद्र** म्हणजे सपाट नसल्यामुळे घरबांधणीस अयोग्य असलेली जागा.

७ **तालमूलम्** म्हणजे बुडाशी रुंद आणि वर अरुंद (भा). **मुरजकैः कपिशीर्षकैः** च : 'मुरजक वरच्या बाजूला सपाट असतात आणि कपिशीर्षक अश्वत्थाच्या पानाच्या आकाराचे असतात. त्या दोहोंच्या आडून योद्धे लढू शकतात' (चा).

१० **अवक्षेपसोपान** म्हणजे खाली सोडता येण्यासारखी शिडी असा अर्थ असावा. **नी** टीकेप्रमाणे हा पक्का बांधलेला जिना आतल्या बाजूस प्राकाराच्या पायथ्यापर्यंत जातो. **११ सहर्म्यद्वितला** म्हणजे दोन मजले असलेली, त्यापैकी वरचा खोलीवजा व खालचा भिंतीशिवाय, फक्त खांब असलेला. **१२ इन्द्रकोश :** फळ्यांना अनेक छिद्रे असल्यामुळे हे नाव दिले आहे (नी). **१३ पार्श्व** म्हणजे बाहेरच्या बाजूला (नी). **देवपथ** हा प्राकाराच्या बाहेरच्या बाजूच्या

पायथ्याचे रक्षण करण्यासाठी मजबूत लाकडांनी बनविलेला, तीर सोडण्यासाठी भोके असलेला असा असतो (नी). १४ **चर्या** म्हणजे देवपथापासून प्रधावनिकेपर्यंत तटावरून उतरण्याचे सुरक्षित मार्ग आणि **प्रधावनिका** म्हणजे पायथ्यापासून पुढे जाणारा सुरक्षित मार्ग. **निष्किरद्वार** हे प्राकाराच्या बाजूस देवपथाच्या खाली प्रधावनिकेत येण्यासाठी केलेले असते. वेढा देणाऱ्याने याचा केलेला उपयोग १३.४.१२ मध्ये निर्देशिला आहे.

१६ **मेण्ढकम्** 'अन्तर्बहिश्च बाहू प्रसार्य मेषशृंगवन्मार्गाभिमुखौ' (चा) म्हणजे आतल्या बाजूस एक पाय पसरलेला, बाहेरच्या बाजूस दुसरा पाय पसरलेला आणि मध्ये मेंढ्याचे शृंगयुक्त तोंड अशा आकृती समोरासमोर दरवाजाच्या वरच्या बाजूस कराव्यात. **अध्यर्धदण्डम्** ही प्राकारापासून पुढे आलेल्या मेंढकांची लांबी. दोन्ही बाजूंच्या मेंढकांना मिळून तीन दंड लागतील. मधल्या पाच दंड मोकळ्या जागेतून हे तीन वजा केल्यास दरवाजाच्या कवाडांसाठी दोन दंड अथवा आठ हात जागा उरते. उभय मेण्ढकशृङ्गचतुष्टयमध्येऽष्टहस्तं द्वारमार्गावकाशं मुक्त्वा' (नी). **प्रतोली** हे येथील दरवाजाचे नाव (चा). प्रतोलीप्रमाणे येथे तळमजल्यात फक्त खांब असतात, भिंती नसतात. तळमजल्यात पुढे वर्णिलेल्या अनेक गोष्टी असतात. ह्या तळमजल्याच्या छतात सहा तुळया (तुला) असतात.

१९ **शाला** सर्वांत आतल्या बाजूस शस्त्रे ठेवण्यासाठी (नी), त्याच्यापुढे **वापी** आणि त्याच्यापुढे **सीमागृह. नी** टीकेप्रमाणे वापी म्हणजे आत येणाऱ्या शत्रुसैनिकांवर वरून मारा करण्यासाठी छिद्र, सीमागृहात शत्रूला थोपवून धरण्यासाठी युद्धाची जागा. २० समोरासमोरचे दोन मंच रक्षकांसाठी. **आणी** म्हणजे दोन लहान दरवाजे (वापीच्या दोन्ही बाजूला) वरच्या मजल्यावर जाण्यासाठी. **हर्म्य** ' रक्षकांना झोपण्यासाठी धवलगृह' (नी). ते नक्की कुठे ते स्पष्ट नाही. २१ **स्थूणाबंध :** ' हे पहिल्या मजल्याचे वर्णन आहे' (नी). २२ **सोपान :** ह्या जिन्यात प्रवेश करण्यासाठी वरील आणिद्वारे असावीत. २३ **तोरणशिर :** 'दरवाजाच्या वरती वारा येण्यासाठी व शरसंधान करण्यासाठी मोकळी जागा' (नी). २६ 'इंद्रजिताने इंद्रावर असा खिळा ठोकला होता म्हणून हे नाव' (नी).

३१-३२ : वरील प्रतोलीद्वाराहून भिन्न प्रकारच्या गोपुर, पुष्करिणीद्वार, कुमारीपुर आणि मुंडकद्वार अशी चार नावे असलेल्या दरवाजांचे येथे संक्षिप्त वर्णन आहे.

३३ **कुल्याः** जमिनीत खणलेले चर. हे अर्थात आतील बाजूस असणार.

३४-३५ **मुसुण्ढी** 'गदादि' (नी), 'कीलबहुलो वर्तुलः काष्ठविशेषः' (चा). **शतघ्नी** 'कीलसहस्राचितः स्थूलपरिघः' (चा). **उष्ट्रग्रीवी** यात शत्रूंवर वरून ओतण्यासाठी कढत तेल ठेवतात (नी).

ह्या अध्यायातील बराचसा तपशील स्पष्ट नाही.

**२.४**

२ **युक्तोदक :** युक्त हे उदकाचे विशेषण, चांगले पिण्याचे पाणी. **भ्रम** म्हणजे नगरातील पाणी बाहेर वाहून नेण्यासाठी गटारे. **छन्नपथ** म्हणजे भुयारी मार्ग.

४ **संयानीय** म्हणजे समुद्र किनाऱ्यावरील बंदर. संयान म्हणजे अनेक जहाजांचा समुद्रातून होणारा एकत्र प्रवास.

६ **प्रवीर** 'अत्यंत सुपीक' (भा). ७ **वास्तुहृदयादुत्तरे नवभागे :** नी टीकेत म्हटले आहे त्याप्रमाणे परमशायिक पद्धतीचे (९×९) एक्क्याऐंशी विभाग कल्पिले तरच याचा अर्थ लावता येतो. वास्तुहृदय म्हणजे अगदी मध्यभागी असलेला एक्क्यायशीवा विभाग. त्याच्या उत्तरेला असलेल्या एक-नवमांश भागात अंतःपुर असावे असा अर्थ. नगराच्या संपूर्ण क्षेत्राचा एक-नवमांश भाग राजवाडा व त्याच्या अनुषंगाने असणाऱ्या इतर इमारती यांनी व्यापावयाचा आहे.

८, १०, १२ आणि १४ ह्या चार सूत्रांतील जागा अंतःपुरासाठी राखून ठेवलेल्या एक-नवमांश भागात असाव्यात आणि ९, ११, १३ व १५ ह्या सूत्रांतील वास्तू त्याच्या बाहेरील आठ-नवमांश भागात असाव्यात असे अभिप्रेत आहे.

१६ **वास्तुच्छिद्र** म्हणजे घरे बांधावयास योग्य नसलेली जागा. **अनुसाल** म्हणजे तटाला लागून. **प्रपणि** म्हणजे परदेशातून येणारे व्यापारी. **निकाय** म्हणजे समूह, संघ. त्यांच्यासाठी तंबू, राहुट्या यांसारख्या तात्पुरत्या सोयी अभिप्रेत दिसतात.

३२ **बाहिरिक** म्हणजे एक ठिकाणी वस्ती न करणाऱ्या भटक्या जमातींच्या टोळ्या.

२.५

१ बंधनागारात राखण करावयाची माणसे असतात, म्हणून ते सुद्धा संनिधात्याच्या सर्वोपरि अमलाखाली ठेवले आहे.

२ **भूमिसमं त्रितलम्** म्हणजे तळघरच तीनमजली असावे. **भा** टीकेत समत्रितलं असा पाठ घेऊन दोन मजले तळघरात व तिसरा जमिनीच्या पृष्ठभागावर अशी व्याख्या केली आहे. **कुट्टिम** म्हणजे फरशी केलेले. **देश, स्थान** आणि **तल** ह्या शब्दांनी तीन मजल्यांचा निर्देश केला आहे असे दिसते. ३ **उभयतोनिषेधम्** म्हणजे दोन बाजूच्या भिंतींत दारे नसलेले. ४ **निधि** म्हणजे जमिनीत पुरून ठेवलेले द्रव्य. **अभित्यक्त** म्हणजे वधाची शिक्षा झालेले गुन्हेगार. त्यांच्याकडून काम करून घेतल्यावर त्यांचा वध केला म्हणजे त्यांनी केलेले काम गुप्त रहाते.

८ **तज्जात** 'तदभिज्ञ इत्यर्थः' (चा).

२० **चित्रो घातः** चित्रवधाचे प्रकार अध्याय ४.११ त सांगितले आहेत. हे सूत्र ४.९.७ येथे पुनरुक्त झाले आहे.

२.६

२ **द्वारबाहिरिकादेयम्** : द्वारादेयाचा निर्देश २.२२.८ मध्ये केला आहे. बाहिरिक म्हणजे भटक्या जमाती. त्यांचा निर्देश मागे २.४.३२ मध्ये आला आहे.

१० **व्याजी** : वजने व मापे यांनी माल देताना कमी मोजला जाण्याचा संभव असतो, त्याची भरपाई करण्यासाठी थोडासा अधिक माल वर टाकतात (उदाहरणार्थ दुधाची वर टाकलेली धार), ती व्याजी. तिचे पाच टक्के हे प्रमाण ठरविलेले आहे, (२.१२.२६, ३०). **परिघ** 'आतरद्रव्य' (भा), 'वेशीवर घ्यावयाचा कर' (मे), 'एखाद्या उत्पादनाचा हक्क सरकार-चाच असता त्याच्या उत्कृष्टतेची हमी देण्यासाठी केलेली आकारणी' (ब्रे).

१२ तारखांच्या नोंदी हिशोब ठेवण्यासाठी. **वर्षा- इ०** : वर्षा म्हणजे वर्षा व शरद हे दोन ऋतू, हेमन्त म्हणजे हेमन्त व शिशिर आणि ग्रीष्म म्हणजे वसन्त व ग्रीष्म. **तृतीयसप्तमाः** म्हणजे भाद्रपद, कार्तिक याप्रमाणे एक महिन्याआड, त्यातील पहिले म्हणजे कृष्ण पक्ष (कारण, महिने पूर्णिमान्त आहेत).

२० **पार्श्वम्** म्हणजे अगोदर कल्पना नसलेले, केलेल्या कामाचे मिळणारे अधिक उत्पन्न. २१ **विक्षेप** म्हणजे सैन्याचे विसर्जन. खर्चात बचत होण्याचे हे एक कारण. दुसरे **व्याधितान्तरारम्भ** म्हणजे रोगराईमुळे काम अर्धवट राहिल्याकारणाने खर्च न होणे. 'आरम्भ' च्या अगोदर 'विसृष्ट', 'परित्यक्त' यासारखा शब्द असता तर अर्थ सुगम झाला असता. २२ **उपजा** म्हणजे मूलतः जनावरांत नैसर्गिकरीत्या होणारी वाढ.

२३ **लाभ** हा नोकरांना वगैरे होणारा. सरकारचा तो खर्च. **नित्य** म्हणजे रोजच्या रोज होणारा खर्च आणि **लाभ** ठराविक मुदतीनंतर करावयाचा खर्च.

२.७

१ **अक्ष** म्हणजे मोजण्याचे एक साधन, गणना करण्यासाठी वापरावयाचे, मण्यासारखे. म्हणून **अक्षपटल** म्हणजे हिशोब करण्याची, विशेषत: ते तपासण्याची जागा. त्यात सरकारची कागदपत्रे राखून ठेवण्याची सोयही अभिप्रेत आहे. किंबहुना ह्या सूत्रात त्याचाच निर्देश आहे.

२ **प्रयाम** म्हणजे विस्तार, वाढ. **प्रतिवर्णक** म्हणजे मालाची प्रत ठरविण्याचा निकष, त्यावरून प्रत. **संस्थान** म्हणजे 'राजशासन' (चा). **औत्पातिकप्रतीकार** 'भूकंपासारख्या आपत्तींचे निवारण' (भा.).

३ **उपस्थानम्** : 'येऊन हिशोब हजर करण्यासाठी ठरवून दिलेली वेळ' (भा).

४ **सामुदयिकेषु** : 'समुदयप्रयोजनेषु आयस्थानेषु' (चा). 'कर्मसु' हे नाम अध्याहृत धरावयाचे. समुदय म्हणजे उत्पन्न, त्यावरून हे विशेषण बनले आहे. **अवक्लृप्तिक** त्या कामाला योग्य आहे असे ठरविण्यात आलेला.

९ 'कुर्यात्' हे क्रियापद मागच्या सूत्रावरून.

११ **मानवाः** ह्या मताचाही मनुस्मृतीत मागमूस नाही.

१७. दोन प्रकारचे अधिकारी–हिशोब ठेवून त्याच्या वह्या घेऊन येणारे आणि मिळालेले उत्पन्न प्रत्यक्ष घेऊन येणारे कामावरील अधिकारी–अभिप्रेत आहेत. **अन्तरपर्णे** म्हणजे हिशोबाच्या वहीच्या आतील पानावर. २० **तमेव प्रति स्यात्** म्हणजे अधिक आणलेले उत्पन्न त्या अधिकाऱ्याला मिळावे.

२६ **अहोरूप** म्हणजे रोजचे ठेवलेले हिशोब. वर्षअखेरपर्यंतचे ते आले नसतील तर ते आणण्यासाठी एक महिन्याची मुदत द्यावी. हिशोबाबरोबरच प्रत्यक्ष उत्पन्न येत असल्यामुळे त्याचा भरणा करण्यासाठी सुद्धा एक महिन्याची मुदत मिळते. २८ जर उत्पन्नापैकी थोडा भागच भरणा करावयाचा बाकी असेल तर पाच दिवस वाट पहावी. २९ **अवेक्षेत** : हिशोब व उत्पन्न वेळेवर का आले नाहीत ते शोधून काढण्यासाठी ही चौकशी.

३१ **अनुवृत्ति** म्हणजे मागच्या कालखंडातील जमा पुढील कालखंडात वसूल होणे. ३२ **विधातृक** हा मे भाषांतरात स्वीकारलेला पाठ आहे. विल्हेवाट लावणारा, नेऊन देणारा, स्वाधीन करून देणारा असा अर्थ. भा टीकेत 'निधातृक' पाठ आहे. कोठारात ठेवणारा असा त्याचा अर्थ. ३३ **अनुवर्तन** म्हणजे 'अनुवृत्ति'च.

२.८

२१ **संक्षेपः विक्षेपः** काही वेळेला माल एके ठिकाणी आणूनच त्याची विक्री करावयाची असते व काही वेळेला अनेक ठिकाणी पाठवून त्याची विक्री करावयाची असते. २.१६.१ पहावे. **समागम** म्हणजे आगम, उत्पन्नाचे उद्गमस्थान. **कार्मिक**– हा मुळातील 'धार्मिक–'च्या जागी सुचविलेला पाठ आहे. टीकाकारांनी 'धार्मिकविषम' म्हणजे पुरोहित व त्याची माणसे यांनी केलेला अपहार असा अर्थ केला आहे. तो संभाव्य नाही. ह्या अपराधाच्या पुढे व मागे कामावरील अधिकाऱ्यांनी केलेल्या अपहारांचा निर्देश आहे. हा अपहारही त्याच जातीचा समजणे उचित.

२६ **परोक्तः** म्हणजे जो दावा हरतो तो. ३.१.१९ पहावे. २७ **वैषम्ये** म्हणजे काही आरोप कबूल केले व इतर नाकबूल केले तर.

२९ '**अवस्थः** प्रतिभूः' (प्र).

२.९

**उपयुक्त** म्हणजे वस्तुतः हाताखालचा अधिकारी. परंतु अध्यायात युक्त म्हणजे मुख्य अधिकाऱ्यांचाच निर्देश आहे. त्यात उपयुक्त शब्द एकदाही आलेला नाही.

४ **करण** म्हणजे साधन (चा), खाते (प्र). दोन्ही अर्थ संभाव्य आहेत. **प्रक्षेप** म्हणजे एखाद्या कार्यासाठी गुंतवलेली रक्कम.

१४ **अज्ञानादिभिः** मागे २.७.१० मध्ये निर्देशिलेल्या आठ दोषांमुळे. **यथागुणम्** म्हणजे अज्ञानामुळे एकपट, आळसामुळे दुप्पट इत्यादी. प्र टीकेनुसार पहिल्या खेपेस एकपट, दुसऱ्या खेपेस दुप्पट याप्रमाणे. तो अर्थही संभाव्य आहे.

२४ **सः** म्हणजे 'कदर्यः' (चा). 'तिघेही' (प्र). पण पहिल्या दोघांच्या बाबतीत जप्त करायला मालमत्ताच नसते.

२६ **अनुप्रविश्य :** मागे १.१७.३९ पहावे.

२८ **उत्तराध्यक्षाः** सैन्यातील माणसे रक्षक म्हणून नेमावयास सांगितले आहे.

## २.१०

३ **समय** म्हणजे लेखनाच्या संबंधातील संकेत अथवा निरनिराळ्या लोकांच्या चालीरीती (प्र).

९ **उदाहरण** शास्त्रातील व **दृष्टान्त** सामान्य व्यवहारातील (भा).

१३ **विषष्टिः :** २२ स्वर (५ ऱ्हस्व, ८ दीर्घ आणि ९ प्लुत), २५ व्यंजने (पाच वर्गातील) ४ अंतस्थ (य्, र्, ल्, व्), ४ ऊष्मवर्ण (श्, ष्, स्, ह्), अनुस्वार, विसर्ग, जिह्वामूलीय, उपध्मानीय आणि ४ यम (वर्गातील अनुनासिकांच्या पूर्वी इतर चार वर्णांचे होणारे द्वित्व). १५ **तच्चतुर्विधम् :** हे यास्काच्या निरुक्तानुसार (१.१.८) आहे. २१ **वर्ग** म्हणजे समास. पहिल्या शब्दाला जोडून दुसरे एक ते तीन शब्द असावेत, म्हणजे समास दोन ते चार शब्दांचा असावा.

२२ **वाचिकमस्य :** मुद्राराक्षसातील पाचव्या अंकातल्याप्रमाणे 'तोंडी मजकूर हे पत्र घेऊन येणाऱ्याकडून कळेल' असा अर्थ येथे अभिप्रेत नाही. अमक्याच्या सांगण्याप्रमाणे लिहिले आहे असा याचा अर्थ.

३९ ही दोन प्रकारची पत्रे दरबारातील अधिकाऱ्यांनी बाहेरगावच्या अधिकाऱ्यांना पाठविलेली आहेत.

४१ सूत्र ३८ मधील परिदानलेखाला येथे उपग्रहलेख म्हटले आहे.

४६ **पथिकार्थम्** 'दूतासाठी' (चा). इतरही पथिक समजण्यास हरकत नाही. **ईश्वरान् :** 'दुर्गपाल, अंतपाल इत्यादी' (भा). मांडलिक राजेही समजता येतील.

५८ **कालपत्रकम्** 'अर्धवट लिहिलेल्या पत्रावर दुसरे लिहिलेले असणे किंवा मूळचेच पत्र काळे असणे' (प्र). ६२ **वर्ग :** वर सूत्र २१ पहावे. प्रस्तुत ठिकाणी प्र टीकेत वर्ग म्हणजे यति (वाचताना किंचित् विराम करण्याची जागा) असा अर्थ केला आहे.

६३ **कौटिल्येन :** याचा अर्थ असा की ह्याच्या अगोदरच्या ग्रंथांत ह्या विषयीचे प्रकरण नव्हते (प्र).

## २.११

२ **पाण्ड्यकवाट** म्हणजे पांड्य देशातील मलयकोटि पर्वत (भा, प्र). **पाशिका** नदी 'पांड्य देशात' (चा), 'पाटलिपुत्राजवळ' (भा, प्र). **कुला** नदी 'लंकेत मयूरग्रामाजवळ (भा, प्र). '**चूर्णी** नदी केरळात मुरची गावाजवळ' (भा, प्र), '**चूर्णा** नदी केरळाजवळ' (चा). **कर्दमा** नदी 'पारसीकात' (प्र), 'चीनदेशात' (भा), 'उत्तरापथात' (चा). **स्रोतसी** 'बर्बरदेशाच्या किनाऱ्यावर' (भा, प्र). **ह्रद** 'बर्बराच्या किनाऱ्याजवळ समुद्रात श्रीघण्ट नावाचा डोह (प्र). ३ **प्रकीर्णक** हत्तीचे गंडस्थळ, नागफणा इत्यादी.

६ शीर्षक 'मध्ये एक मोठा मोती व त्याच्या दोन्ही बाजूला सारख्या आकारचे अनेक लहान मोती असलेला' (भा, प्र). उपशीर्षक 'मोठ्या मोत्याच्या दोन्हीकडे एक एक लहान मोती याप्रमाणे मालिका' (भा). प्रकाण्डक 'मोठ्या मोत्याच्या दोन्हीकडे दोन दोन लहान मोती यांची मालिका (भा). अवघाटक मध्ये मोठा मोती व दोन्हीकडे क्रमाने लहान लहान होत जाणारे मोती (भा, प्र.). तरलप्रतिबन्ध सारख्या आकाराच्या मोत्यांची माळ (भा). ७ हे सर्व हार देवतांसाठी आहेत (चा).

२३ हेममणि 'सोन्याचे मणी' (भा. प्र), 'सोने आणि रत्ने' (चा, मे).

२८ कौट 'कूट पर्वतावरील' (भा, चा), 'मलय व समुद्र यांच्या मध्ये असलेल्या कोटि-पासून' (प्र). मालेयक 'कर्णीवन म्हणूनही ओळखला जाणारा मलयाचा एक भाग माला त्यापासून, (प्र). पारसमुद्रक 'लंकेतील रोहण पर्वतावरील' (भा, प्र, चा).

४२ आलकन्दक: पाठभेद आलत्सान्द्रक, आलसान्द्रक असे आहेत. सर्व पाठांचा अर्थ बर्बरदेशाजवळचे ठिकाण असा टीकाकारानी केला आहे. यात अलेक्झांड्रियाचा निर्देश आहे असे मानले गेले आहे. वैर्वणिक 'विवर्ण, यवनद्वीपाजवळ' (प्र).

४३ ह्या सूत्रापासून सार (भारी किंमतीच्या) वस्तूंचे वर्णन सुरू होते.

६१ तैलपर्णिक एक प्रकारचे सुगंधी द्रव्य. सर्व उद्‌गमस्थाने कामरूपातील.

६६ भद्रश्रिय म्हणजे 'कापूर अथवा तक्कोल अथवा श्रीवासक अथवा रक्तचंदन' (प्र).

६८ कुष्ठ ही एक औषधी वनस्पती.

७३ ह्या सूत्रापासून अध्यायाच्या अंतापर्यंत फल्गु (हलक्या) वस्तूंचे वर्णन आहे.

७६ अष्टाङ्गुलायामम् म्हणजे सहा इंच लांब. ही अगदीच लहान प्राण्यांची चामडी. 'हिमालयातील उंदरांची' (चा).

७७ दुहिलितिका 'केसाळ' (भा, प्र), 'पालीच्या आकाराचे' (चा).

८७ कोठमण्डल 'तांबडी वर्तुळे' (भा).

## २.१२

१ शुल्बशास्त्र 'जमिनीतील धातूंच्या शिरांचे शास्त्र किंवा तांब्याचे रुप्यात अथवा सोन्यात परिवर्तन करावयाचे शास्त्र' (भा, प्र), 'भूमिपरीक्षाशास्त्र' (चा).

३ वेध्वार: 'सुवर्णस्य कर्तार:' (चा).

५ प्रतीवापार्था: 'तांबे अथवा रुपे उकळत असता त्यात ह्या धातूचे चूर्ण टाकावयाचे असते. त्यामुळे त्या धातूंचे सोन्यात रूपांतर होते (भा, चा, प्र).

८ मूढगर्भा: म्हणजे ज्यांच्यामधील धातूचे अस्तित्व स्पष्ट नसते. मूत्र 'माणसांचे किंवा हत्ती, घोडा, बैल, गाढव व बोकड यांचे' क्षार 'कदली, अपामार्ग इत्यादींची राख.'

१० किण्व म्हणजे मद्य तयार करण्यासाठी आवश्यक आम्ल पदार्थ. २.२५.२६ पहावे.

१६ वैकृन्तक 'वैकृतधातु: अच्छलोहस्य धातुरित्यर्थ:, वैकृततो हि वारकुशले चीनदेशे पापम् (वायम्?) उत्पद्यते' (चा). ह्या टीकेवरूनही हा धातू कोणता ते स्पष्ट होत नाही. पोलादाचा प्रकार असण्याची शक्यता आहे. उत्पन्न करणाऱ्या प्रदेशावरून नाव पडलेले दिसते.

२३ आरकूट, कंस व ताल हे तांब्यात शिसे अथवा जस्त निरनिराळ्या प्रमाणात मिसळले असता तयार होतात.

२४: चा टीकेत म्हटले आहे की तांब्याच्या नाण्यांना सुद्धा पण, अर्धपण इत्यादी संज्ञा आहेत आणि दंडाच्या रकमा तांब्याच्या नाण्यात समजावयाच्या आहेत. पण हे बरोबर नाही.

अनेक ठिकाणी पण इत्यादीबरोबर माषक वगैरे तांब्याच्या नाण्यांचाही निर्देश आहे. २.१९.३६, २.२८.२१, ४.९.४ इ० पहावे. माषक आणि पण दोहोंचे वजन एक कर्ष अथवा सुवर्ण.

**२८ रूप** म्हणजे पारीक्षिक, तपासणीबद्दल आकारणी. **३० पञ्चकं...रूपिकं च** एवढा अंश २९ व्या सूत्राच्या अंती घेणे अधिक समुचित होईल.

**३६ द्वादशविधम्** 'हे अध्याहृत समुदयम् चे विशेषण' (टी). 'धातुम् चे विशेषण' (मे). बारा धातू म्हणजे सूत्र २३ मधले अकरा आणि बारावा मणिधातु (सूत्र १७).

२.१३

**२ सौवर्णिकाचे** काम पुढच्या अध्यायात वर्णिले आहे.

**१४ उद्गतचूलिकम्** 'वर कळीसारखा आकार असणारे' (भा)

**१६ वस्तुतः काकणी** हे एका तांब्याच्या नाण्याचे नाव (२.१२.२४). प्रस्तुत ठिकाणी ते एक प्रकारचे वजन (माषक वजनाच्या ¼ व सुवर्ण वजनाच्या एक-चौसष्टांश इतके) मानले आहे. काकणी नाण्याचे वजन ¼ कर्ष अथवा सुवर्णाइतके. तसेच (वजन) माषक हे सुवर्णाच्या एकसोळांश, पण (नाणे) माषक एक सुवर्ण (कर्ष) वजनाचे. सुवर्ण म्हणजे सोने, पण ते एका वजनाचेही (कर्ष) नाव आहे. हे सर्व गोंधळात पाडणारे आहे. **चतुः** म्हणजे चार माषक अथवा सोळा काकणी (वजन).

**३८ काच** : 'रत्न, मोती, वज्र अथवा पोवळे' (चा).

**४१** भाषांतर **प्र** टीकेला अनुसरून केले आहे. या टीकेत 'रत्नाचा एक-पंचमांश भाग तळाशी पक्का करावा व एक दशांश भाग सोन्याच्या पाकळ्यांत बसवावा' अशा तऱ्हेचा अर्थ केलेला दिसतो. **४३ पृषत** म्हणजे सोन्याचे मणी. **परिभाण्ड** म्हणजे बाजू पक्क्या करण्यासाठी पाकळ्या वगैरे. 'कमळाच्या आकाराचे अथवा स्वस्तिकाकृति' (भा). ह्या टीकेत रत्नाचेच जडावकाम येथेही समजण्यात आले आहे.

**४६ वालुकाहिंगुलुक** 'हिंगुळाचे चूर्ण व वाळू' (भा).

**४७ सैन्धविकया** 'सौराष्ट्र देशातील मातीने' (टी). 'सिंधू प्रदेशातील हे अधिक संभाव्य दिसते. **४८ तीक्ष्ण** म्हणजे लोखंड. **पीतचूर्णितम्** 'प्रताप्य उदकोषितं ततश्चूर्णितम्' (चा).

**४९ तार** म्हणजे दागिने तयार करण्यासाठी वापरावयाचे रुपे. **अस्थितुत्थे** इ० : भाषांतर टीकाकारांना अनुसरून केले आहे. परंतु अस्थि, सीस हे रुप्याशी मिसळून नेहमीच्या मुशीत तापवावयाचे असा अर्थही संभाव्य आहे.

**५१ द्वात्रिंशद्भाग** 'बत्तीस भाग' (टी). एक-बत्तिसांश भाग असा अर्थ संभाव्य आहे.

२.१४

**४ तद्द्विगुण** : म्हणजे तीन-चतुर्थांश वेतनाच्या दुप्पट.

**८ तप्त** म्हणजे तपनीय, दागिन्यांसाठी वापरावयाचे सोने. **कलधौतक** म्हणजे दागिन्यांसाठी वापरावयाचे रुपे.

**११** मजुरी कमी देण्यासाठी गिऱ्हाईक असे करण्याची शक्यता असते. **१३ अनपसारः** ते सोने चोरलेले असण्याचा संभव असल्यामुळे प्रदेष्टयांमार्फत चौकशी आवश्यक होते. हे सूत्र व मागील सूत्रातील 'सापसारश्चेत्' हे करविणाऱ्या गिऱ्हाइकाला अधिक लागू होण्यासारखे आहेत. **१४ पण** म्हणजे हाताची पाचही बोटे.

**२६ पेटक** म्हणजे आत हलका धातू बाहेरून दिसणार नाही अशा रीतीने बसविणे.

४० काच म्हणजे, प्रस्तुत ठिकाणी, हलका पदार्थ. ४२ पिङ्क म्हणजे हीन पदार्थ भारी पदार्थाच्या आत बसविणे. पेटकामध्ये आतील हीन भाग सुटया स्वरूपाचा असतो, तर पिंकामध्ये तो आत चिकटून एकरूप झालेला असतो.

४५ पिटका म्हणजे आत असलेला पेटकासारखा भाग. ४८ कुरुविन्द 'एक प्रकारचा दगड' (टी).

५२ विरूप हीन धातूच्या मिश्रणामुळे ज्याचे रूप पालटले आहे असे.

५३ चेल्लं बोल्लनम् ही प्राकृत रूपे आहेत. काच म्हणजे, प्रस्तुत ठिकाणी, सोने लपविण्याची साधने.

५५ अत्ययं यथोद्दिष्टम् : या किंवा मागच्या अध्यायात दंड सांगितलेलेच नाहीत. ४.१.२६–४३ मधील दंड समजणे शक्य आहे.

२.१५

३ उत्सङ्ग 'पुत्रजन्मासारख्या समारंभाच्या वेळी मिळालेला नजराणा' (प्र). पार्श्व 'ठरलेल्याहून अधिक आकारणी' (भा). २.६.२० पहावे. राष्ट्र येथील राष्ट्र २.६.३ मधील राष्ट्राहून बऱ्याच अंशांनी भिन्न आहे. हे कोष्ठागाराच्या दृष्टीतून. ते समुदयाच्या दृष्टीतून.

८ औद्रचाक्रिकेषु 'औद्रा हि पुटिका यन्त्रेण पीडयन्ति, चाक्रिकास्तु चतुर्षु पार्श्वेषु चाल्यमानेन चक्रेण' (चा). पहिल्यातील यंत्र हाताने फिरविले जात असावे. दुसरा प्रकार म्हणजे एक प्रकारची घाणी असावी. संहनिका : या शब्दाची सिंहतिका, सिंहनिका अशीही रूपे आढळतात. पैशाच्या स्वरूपात कर न देता त्याऐवजी आपल्या व्यवसायानुरूप सरकारचे काम करून देणे असा त्याचा पारिभाषिक अर्थ.

१० : २.६.२१ वरून पुनरुक्त झालेले सूत्र.

११ तुलामानान्तरम् : निरनिराळ्या वजनांचा आणि मापांचा निर्देश २.१९.२२, २९ मध्ये केला आहे. त्यांतील फरकाचा फायदा सरकारी कोठारांनाच होतो.

१७ शुक्त म्हणजे शिरका. त्याचे सहा प्रकार निर्दिष्ट आहेत.

३३ पुलाक : अर्धवट शिजविलेले धान्य, जनावरांसाठी.

४२ कलभ, व्याल इत्यादींने फक्त हत्तीच समजावयाचे नसून इतरही जनावरे उपलक्षणाने समजावयाची आहेत (ब्रे).

६२ कुट्टकयंत्र 'पादक्रमणीयम् उष्ट्रग्रीवाकारम्' (चा). रोचकयन्त्र 'हस्तभ्रमणीयम्' (चा), 'पेषणयन्त्रम्' (प्र). पत्रक 'चक्रगेरिका' (प्र), 'पंखा' (मे).

६३ शलाकाप्रतिग्राहक : शलाका म्हणजे गणना करण्यासाठी वापरावयाच्या कांड्या. म्हणून ह्या सबंध शब्दाचा हिशोब ठेवणारा असा अर्थ.

६४ मूतः मव् बांधणे ह्या धातूपासून, गवताची विणलेली चटई अथवा करंडी असा अर्थ.

२.१६

७ अजस्रपण्य 'ज्यांना नेहमी मागणी असते अशा वस्तू' (टी), 'विक्रीच्या वेळेस ज्या ताज्या असणे आवश्यक आहेत अशा' (ब्रे), दूध, भाज्या वगैरे.

१२ आयति म्हणजे मूलतः उत्पन्न, संदर्भानुसार नफा असा अर्थ. त्या शब्दाचा 'भविष्यकाल' असाही अर्थ आहे.

१४ पण्याधिष्ठातारः हे मालाची विक्री करणारे सरकारी नोकर.

१८ **अर्घ** म्हणजे विक्रीची किमत आणि **मूल्य** म्हणजे मूळ किंमत. **वर्तनी** ही परदेशातील अंतपालाला रस्त्यावरील सुरक्षिततेसाठी द्यावयाची. **आतिवाहिक** रक्षणासाठी रक्षक बरोबर घेतल्यास त्यांच्यावर होणारा खर्च. **भाग** परदेशातील सरकार आयात मालाचा हिस्सा घेते. उदाहरणार्थ मिठाचा एक-षष्ठांश भाग (२.१२.२९); सर्व मालावर शुल्क अथवा जकात द्यावी लागतेच (अध्याय २.२२).

२.१७

३ **देयम्** 'झाडे तोडणाऱ्यांना द्यावयाची मजुरी' (भा). परंतु झाड तोडून नेण्यासाठी सरकारला द्यावयाची आकारणी असा अर्थ अधिक संभाव्य वाटतो.

५ कंसांत दिलेले अर्थ टीकाकारांना अनुसरून आहेत.

१४ धातू वस्तुतः आकराध्यक्षाने खाणीतून काढावयाचे. असे दिसते की कुप्याध्यक्ष हा जंगलात प्रत्यक्ष रहात नसून शहरातील कुप्यगृहात जंगलातून येणारा माल साठवून घेणारा व त्याची तेथे व्यवस्था पहाणारा अध्यक्ष.

२.१८

५ या व पुढील सूत्रांत कंसांत दिलेले अर्थ टीकाकारांना अनुसरून आहेत. क्वचित दोन टीकाकारांनी निरनिराळे अर्थ केलेले आढळतात.

७ **हुलमुखानि** म्हणजे अणकुचीदार टोक असलेले.

१३ **विषाण** म्हणजे शिंग आणि सुळा असे दोन्ही अर्थ आहेत.

१६ **कङ्कट** हे सूत्राध्यक्षाने बनवावयाचे आहे (२.२३.१०). ते रजईसारखे असावे. १७ **आवरणानि :** ही दोन प्रकारची निर्दिष्ट आहेत, शिरस्त्राणापासून नागोदरिकापर्यंत लढवय्यांच्या निरनिराळ्या अवयवांचे रक्षण करणारी आणि पेटीपासून बलाहकान्तपर्यंत तटबंदीवर वगैरे उभारलेली व आडोशासारखा उपयोग केली जाणारी. त्यांपैकी चर्म (ढाल) हे हातात धरावयाचे.

२० **उद्दयम्** 'नफा'. नेहमीचा शब्द 'उदय' आहे. छंदात बसविण्यासाठी उद्दय हा अपरिचित शब्द वापरलेला दिसतो.

२.१९

**पौतव :** पू म्हणजे शुद्ध करणे ह्या धातूपासून पोतु म्हणजे शुद्धी., त्यापासून पौतव म्हणजे शुद्धीचे कार्य, बरोबर असलेले प्रमाण ठरविण्याचे कार्य.

२ ह्या सूत्रात सुवर्ण शब्द सोने या अर्थी वापरला आहे, पण पुढील सूत्रात ते एका वजनाचे नाव म्हणून निर्दिष्ट केले आहे. तसेच येथे माषक हे एका (एक-सोळांश कर्ष) वजनाचे नाव आहे, पण अन्यत्र ते एक कर्ष वजन असलेल्या तांब्याच्या नाण्याचे नाव आहे (२.१२.२४). हे गोंधळ उत्पन्न करणारे आहे. २.१३.१६ पहावे.

५-६ : चार कर्ष म्हणजे एक पल (सूत्र ४) आणि दहा धरण म्हणजेही एक पल (सूत्र २०). हे पल भिन्न नाहीत असे समजले तर पाच रुप्यमाषकाचे वजन दोन सुवर्णमाषकाइतके भरेल, म्हणजे रुप्याचा माषक (वजनात) सोन्याच्या माषकाच्या दोन-पंचमांशाइतका असे ठरेल.

११ ६,१४,२२. . . .७२ अंगुले इतकी लांबी व १,२,३. . १० पल इतके लोखंडाचे वजन. ह्या दांड्या बऱ्याच बारीक होतील. **यन्त्रमुभयतः शिक्यं वा :** यंत्र म्हणजे पुढील सूत्रांत वर्णिल्याप्रमाणे स्टीलयार्ड जातीची तराजू असावी. दोन्ही बाजूला पारडी असलेली तराजू प्रसिद्ध आहे. ह्या दहा तूला सूक्ष्म वजन करण्यासाठी अभिप्रेत दिसतात.

**१२ समवृत्ता** (सगळीकडे सारखी गोल असलेली) हे ह्या तराजूचे नाव दिसते. **१३ मंडल :** हा गोळा दांडीच्या एका टोकात पक्का करावयाचा. मग ती दांडी दोरीने वर उचलून ज्या ठिकाणी ती समतोल राहील त्या ठिकाणी शून्याची खूण करावयाची. तेथपासून पुढे शंभर पलापर्यंतच्या खुणा करावयाच्या. दुसऱ्या टोकाला वजन करावयाची वस्तू टांगून दांडी वर उचलली असता ज्या खुणेवर समतोल साधेल ते त्या वस्तूचे वजन. हा तराजू म्हणजे स्टीलयार्ड (Steelyard) चा एक प्रकार आहे. **१६ अक्ष** म्हणजे ५,१०,१५,२० असे आकडे. **नान्वी** म्हणजे स्वस्तिकाचे चिन्ह. **पिनद्ध** मूलत: 'बांधलेले' पण येथे 'कोरलेले' असा अर्थ अपेक्षित आहे.

**२१ आयमानी :** ही आणि समवृत्ता एकच असे दिसते. २२ ही निरनिराळी वजने (आणि मापेही) प्रत्यक्षात गोंधळ उत्पन्न करण्याचा संभव आहे.

**२४ प्रयाम:** 'वाढ, वृद्धी'. ही वाढ म्हणजे व्याजी अशी शक्यता आहे.

**२५ पववती** म्हणजे स्टीलयार्डच्या स्वरूपाची. **मयूरपदाधिष्ठिता :** दोन खांबांवर एक आडवी तुळई बसवून त्या तुळईला ही तुला खाली काटकोनात टांगावयाची.

२.२०

**१३-२० :** लांबी मोजण्यासाठी दिलेली ही निरनिराळी मापे सुद्धा गोंधळ उत्पन्न करण्याची शक्यता आहे. **१८** चार हात लांब **नालिकेचा** कोणत्या कामासाठी उपयोग होत असावा ते स्पष्ट नाही.

**३५ :** सोन्याच्या तारेचा उपयोग फक्त घटिकापात्राच्या छिद्राचा व्यास ठरविण्यासाठी. प्रत्यक्ष वेळ मोजण्याच्या कामी तिचा काही उपयोग नाही.

**५१-५३ : बलमास** वगैरेचे कंसात दिलेले अर्थ टीकाकारांना अनुसरून आहेत.

२.२१

**५ घटिकास्थान** म्हणजे एक प्रकारची वखार असा अर्थ दिसतो. घटिका म्हणजे नालिका हा अर्थ संभाव्य नाही.

**१५ आनुग्राहिक** म्हणजे ज्यांच्यापासून देशावर अनुग्रह होणार आहे असे, लाभदायक वस्तू. २.२२.८ पहावे.

**१७ पथिकोत्पथिका: :** कंसातील अर्थ टीकाकारांना अनुसरून आहेत.

**२०-२१ : निर्वाहयत:** आणि **अपहरत:** यावरून ही सूत्रे निर्यातीसंबंधी आहेत असे दिसते. पुढील सूत्र निश्चितच निर्यातीसंबंधी आहे. निर्यातीवरही शुल्क आहेच.

२.२२

**१ आतिथ्यम्** म्हणजे परदेशातून आयात होणारा माल.

**४ षड्भागम् :** याचा अर्थ ही जकात मालाच्या स्वरूपात घ्यावयाची आहे. हे व यापुढील तीन सूत्रे राज्यातल्या राज्यात शहरातून जनपदात जाणाऱ्या आणि जनपदातून शहरात येणाऱ्या मालाच्या संबंधात आहेत असे दिसते. **५ कृतकर्म- इ० :** कारागिराशी करावयाच्या कराराचा हा नेहमीचा मसुदा आहे. २.१८.१ पहावे. **६-७ :** ह्या वस्तूंच्या संबंधात सुद्धा जकात मालाच्या रूपात घ्यावयाची आहे.

**८ द्वारादेयम्** म्हणजे वेशीवर घ्यावयाची. ही एक-पंचमांश म्हणजे 'नेहमीच्या जकातीच्या एक-पंचमांशाइतकीच घ्यावी' (प्र), 'नेहमीची जकात, शिवाय तिच्या एक-पंचमांश अधिक' (चा). ज्या अर्थी आनुग्राहिकाचा निर्देश आहे त्याअर्थी प्र टीकेतील अर्थ अधिक ग्राह्य वाटतो. **आनुग्राहिक :** २.२१.१५ पहावे. जकातीत सूट अभिप्रेत आहे.

९ ह्या सूत्रातील निर्बंधाचा उद्देश कोणत्याही मालावरील जकात चुकविली जाऊ नये हा आहे. शिवाय सर्व किमती सरकार ठरवीत असल्यामुळे त्यासाठी माल बाजारात येणे आवश्यक आहे. **१४ सीतात्ययः** सरकारी शेतमालावर जकात नसल्यामुळे निर्बंधभंगाबद्दल नाममात्र दंड सांगितला आहे. यातील विकणारा हा सरकारी नोकरच असतो.

२.२३

**२ प्रव्रजिता :** घर सोडून जाऊन स्वतंत्रपणे रहाणारी स्त्री. संन्यासिनी हा अर्थ संदर्भात बसण्यासारखा नाही.

**७ कृतकर्माः-** इ० २.१८.१, २.२२.५ इत्यादी पहावे.

**११ प्रोषिता विधवा** हा 'प्रोषितविधवा' वरून दुरुस्त केलेला पाठ आहे. प्रोषिता म्हणजे प्रोषितभर्तृका समजता येईल किंवा वरील प्रव्रजिताशी समानार्थक मानता येईल.

**१५ अङ्गुष्ठसंदंश** 'उजव्या हाताचा संपूर्ण आंगठा आणि मधल्या बोटाचे टोक' (भा, प्र)· **चा** टीकेत 'अङ्गुष्ठाभ्यां संदंशम्' असे आहे. त्यातील बोटाचा निर्देश गहाळ झालेला दिसतो· **भक्षिता-** ही कर्तरि (कर्मणि नाही) अर्थाची विशेषणे समजावीत.

२.२४

**१ शुल्ब** 'जमिनीत पाणी कोठे लागेल ते जाणणे' (भा, चा).

**३ मेदक** 'करंड्या तयार करणारे' (भा), 'जंगली व उपद्रवकारक जनावरे पकडणारी एक जात' (मे).

**५** पाऊस मोजण्याचे भांडे गोल अथवा चौरस असेल त्याप्रमाणे एक द्रोण पाऊस म्हणजे अदमासे दोन अथवा दीड इंच. **वर्षप्रमाणम्** 'पीक उत्तम येण्यासाठी आवश्यक असलेला पाऊस (टी). **अश्मक** 'महाराष्ट्र' (प्र). **अपरान्त** 'कोङ्कणविषय' (प्र). **हैमन्य** 'जेथे खूप बर्फ पडून शेती शक्य होते असा प्रदेश, हिमालयानजीक' (भा). **कालतः** नंतर 'अमितम्' समजावयाचे.

**७ गर्भाधान** 'मार्गशीर्षात दव, पौषात बर्फ, माघात वारा, फाल्गुनात ढग, चैत्रात वारा आणि पाऊस आणि वैशाखात वारा व विजा यांसह पाऊस; शिवाय वैशाख कृष्णपक्षाच्या पहिल्या चार-गर्भाधानाच्या-दिवशी पाऊस' (टी). **चार** 'आषाढाच्या (कृष्ण) पंचमीपासून त्रयोदशीपर्यंतच्या नऊ दिवसांत शुक्राचे भ्रमण (टी).

**१० करीषान्** 'गोवऱ्या सुकतील इतका वेळपावेतो पावसात खंड' (भा).

**१६ स्ववीर्योपजीविनः** यांना बियाणे, नांगर, बैल वगैरे सरकारने पुरवायचे. **१७ अनवसित** म्हणजे शून्यनिवेशाच्या वेळी प्रथमच लागवडीखाली येणारी जमीन. अध्याय ७.११ (अनवसितसंधि) पहावा. **यथेष्टम्** यात सूट देणे अभिप्रेत आहे. **कृच्छ्** हे संकट राज्यावरचे, अर्थकृच्छ् (५.२.१). ह्यावेळेस अधिक घेणे अपेक्षित आहे.

**१८ उदकभाग :** पाणीपट्टी म्हणून इतका भाग धान्य अधिक द्यावयाचे.

**२२ हरणी :** तलावाचा ओलसर तळ (पाणी नसलेला) (भा, प्र). **लव** लू कापणे यापासून.

**३२ प्राकार** म्हणजे तट अथवा भिंत. धान्य कोठारांत नेण्यापूर्वी ते खळ्याच्या बाजूलाच बांधलेल्या खोपटात ठेवावयाचे अशी कल्पना दिसते. प्राकार ह्या खोपटाच्या भिंती. 'समुच्छ्रितान् प्राकारान्' या अर्थी 'प्राकाराणां समुच्छ्रायान्' असा प्रयोग केला आहे. **वलभीः** गवताने झाकलेली छपरे.

२.२५

२ सरकारी एकाधिकाराच्या उल्लंघनासाठी सहाशे पण दंडाचा निर्देश २.१२.३१, २.२२.१० येथेही आहे.

३ **असंपात** म्हणजे एकत्र न जमणे, साठा न होणे.

६ **अन्यत्र** कारण, गुत्त्यातच पकडले तर, भीतीमुळे इतर गिऱ्हाइके येण्याचे बंद होईल (श्री).

११ **शयनासन:** म्हणजे येथे रहाण्याची सोय असणे सुद्धा अपेक्षित दिसते. दारू पिऊन बेहोश झालेल्यांसाठी शयन अशी कल्पनाही शक्य आहे.

१८ **जातिसंभार:** प्रसन्नासाठी मसाला सूत्र २७ मध्ये निर्दिष्ट केल्याप्रमाणे. २५ **तस्य स्वदेशो व्याख्यानम्:** ही वाक्यरचना जरा चमत्कारिक आहे. 'तस्य स्वदेशादुद्भूतं नाम' अशा तऱ्हेचा अर्थ अभिप्रेत आहे.

२६ **मोरटादीनाम्:** सूत्र ३३ मधल्या पहिल्या समासात निर्दिष्ट झालेले पदार्थ.

२८ **कटशर्करा** एक प्रकारची वनस्पती असावी. जाळून केलेल्या तिच्या चूर्णाचा निर्देश सूत्र ३३ मध्ये आहे.

२.२६

१ **अभयवन:** २.२.४ मध्ये निर्दिष्ट केलेल्या वनाचा हा निर्देश आहे.

५ **मङ्गल्या:** 'श्यामभारद्वाजादी' (भा.)

१२ **परिशूनम्** ही मे टीपेला अनुसरून केलेली दुरुस्ती आहे. मूळ पाठ **परिसूनम्** आहे. त्याचा 'कसाईखान्याच्या बाहेर' असा अर्थ केला आहे. पण मांस कसाईखान्यातच विकले पाहिजे असा प्रत्यक्ष नियम दिलेला नाही. शिवाय, पुढील शब्दांप्रमाणे हा शब्द सुद्धा मांसाच्या वर्णनपरच संभाव्य आहे.

२.२७

१ **सहस्रेण:** हे हजार पण कपडेलत्ते, अलंकार, घरसजावट इत्यादीसाठी आहेत.

३ यावरून प्र टीकेत असा निष्कर्ष काढला आहे की गणिकेचा मुलगा तिच्या मालमत्तेचा वारस होत नाही.

४ छत्र आणि भृङ्गार यांचे धारण ही कनिष्ठ सेवा, व्यजन व शिबिका ही मध्यम सेवा आणि पीठिका व रथ यांवरील ही उत्तम सेवा असा अर्थ दिसतो. परंतु तिन्ही प्रकारच्या सेवेबद्दल एक हजार पणच बिदागी ठरवली आहे. ही बिदागी वर्षासाठी असावी.

८ **गणिकादासी**: गणिकेची दासी, वेश्याकर्म करणारी. ९ **अवरुद्धा** म्हणजे अवरुद्ध स्त्री असा अर्थ येथे अभिप्रेत नाही. सव्वापण हे महिन्याचे वेतन आहे (२.२४.२८). हे जेवणखाणाव्यतिरिक्त.

१२ **वाक्पारुष्ये** इत्यादी हे गणिकेने गिऱ्हाइकांचे केलेले अपराध. **पणोऽर्धपणश्च** हा अधिक दंड वैद्य व त्याचे औषध यांसाठी वसूल करावयाचा अशी शक्यता आहे.

१७ **रूपदासी** ही गणिकादासी अथवा सामान्य वेश्या असावी. वेश्येला अन्यत्र रूपाजीवा अशी संज्ञा आहे.

१८ हा नियम केवळ गणिकाविषयक अपराधांनाच लागू नाही, इतरत्रही लागू होणारा आहे.

२५ **सौभिक** 'जादूगार किंवा छायानाटच करणारा' (टी) **स्त्रीव्यवहारिणाम्** हे अगोदरच्या समासाचे विशेषण आहे. 'च' अव्ययाच्या अभावी त्याने भिन्न मनुष्यांचा बोध होतो असे समजणे कठीण आहे.

२८ **राजमंडल** म्हणजे सहाव्या अधिकरणातील राजमंडल समजणे कठीण दिसते. राजाच्या खाजगी तिजोरीतून ह्या शिक्षकांची सोय केली जाण्याची अधिक शक्यता आहे.

२.२८

८ **मूढ** हे 'वात' चे विशेषण (मे) समजता येईल. परंतु वाट चुकलेली या अर्थी ते नावेचे स्वतंत्र विशेषण समजणे अधिक चांगले.

१२ **अमित्रविषयातिगाः** 'शत्रूच्या देशाकडे जाणाऱ्या' (टी), 'शत्रूच्या देशातून आलेल्या' (मे).

२० **उद्भाण्डीकृतम् :** 'मोठ्या भाराखाली वाकलेला' (प्र), 'डोक्यावर मोठा भार घेऊन तोंड लपविणारा' (भा). असे दिसते की याच्यापुढील 'महाभाण्डेन मूर्ध्नि भारेणावच्छादयन्तम्' हे शब्द एखाद्या टीकेतून ग्रंथात घुसले आहेत. ते 'उद्भाण्डीकृतम्' ची केवळ व्याख्या करणारे आहेत. **अलक्ष्यव्याधितम् :** तरीचे भाडे चुकविण्यासाठी आजाराचे सोंग केले असण्याची शक्यता असते.

२२ **भार** म्हणजे वीस तुला (२.१९.१९).

२५ **आतिवाहिकं वर्तनीम् :** या ठिकाणी अंतपाल नसल्यामुळे तर चालविणाऱ्या अधिकाऱ्यानेच हे कर व्यापाऱ्यांकडून वसूल करावयाचे.

२७ **कार्मिकः** म्हणजे प्रत्यक्ष तर चालविणारा कामगार. त्याने **प्रत्यय** म्हणजे स्वतःच्या सचोटीविषयी खात्री पटवून द्यावी, जमा केलेली रक्कम सर्व आणून देईल अशी हमी द्यावी. मूळच्या 'कार्मिकप्रत्ययं' वरून 'कार्मिकः प्रत्ययं' हा दुरुस्त करून घेतलेला पाठ आहे.

२.२९

२ **पिण्डारक** 'म्हैस राखणारा'. यात मूळ 'पेड्डा' म्हणजे म्हैस हा देशी शब्द आहे. पिण्डारक म्हणजेच पेंढारी असे मानतात.

४ **पष्ठौही :** शतपथब्राह्मणात 'प्रथमगर्भा' असे याचे स्पष्टीकरण केले आहे. 'वळूची कामना करण्याइतक्या वयात आलेली कालवड' (टी).

६ **तज्जातिकं भागम्** 'त्यांना पाळावयाच्या मेहनतीच्या अनुरोधाने ८ वारकांचा $\frac{1}{2}$ अथवा $\frac{1}{3}$ अथवा $\frac{1}{4}$ भाग' (भा).

८ **वृषा उक्षाणः** 'सांड' (मे), 'सांड आणि म्हातारे बैल (टी).

१८ **पणितं रूपम्** म्हणजे ठरलेले अथवा कबूल केलेले एक जनावर. **भा** टीकेत 'पणिक रूपम्' असा पाठ आहे. दर जनावारामागे एक पण बक्षीस असा त्याचा अर्थ.

२८ **कूर्चिकाम्** 'पाणी काढून घट्ट केलेले दही' (भा).

३० **पादिकं रूपम् :** दर जनावरामागे पाव पण. हा एक प्रकारचा विक्रीकर दिसतो.

३१ **एककालम् :** 'संध्याकाळी' (टी). ३४ **युगपिङ्गन :** जू मानेवर ठेवून गाडीला जुंपणे.

३९ **वर्ण** 'रंग' (टी). जात, प्रकार (धेनु, जरद्‌गु इ.) असा अर्थही संभाव्य आहे.

४३ **मांस** 'फळांचा गीर' (मे). **प्रतिपानम्** 'भूक वाढविण्यासाठी पेय' (श्री).

२.३०

१ **पण्यागारिक** 'भेट म्हणून आलेले'. पण्यागार म्हणजे भेट ह्या अर्थासाठी सूत्रे ७.१५.२०, ९.६.२८,२९ पहावीत.

३ **मासलाभम्** '२.२०.५२ प्रमाणे हा महिना पस्तीस दिवसांचा' (प्र).

**१८ मांस :** २.२९.४३ पहावे.

**२६ प्रतिस्वाद :** स्वत: प्रथम चाखून पहाणे. १.२१.१०, ५.१.३१ पहावे.

३२ ह्या व पुढील सूत्रांतील गतींचे कंसांत दिलेले अर्थ मुख्यत: **प्र** टीकेप्रमाणे आहेत. **भा** टीका या ठिकाणी बऱ्याच भागावर उपलब्ध नाही. **प्र** टीकेतील अर्थ निश्चित बोध करून देतात असे नाही. काही गतींचे पाठही अनिश्चित आहेत.

**३४ षोडशमार्गो वा** 'वा अव्यय च अव्ययाच्या अर्थी वापरले आहे' (टी). पण असे समजण्याची आवश्यकता दिसत नाही. **३५ क्लिष्ट** गतीवर **प्र** टीका 'विवहनविस्रब्धगतिः' अशी आहे. वर स्वारी असता कष्टाने चालणारा असा अर्थ दिसतो.

**४९ तेन** म्हणजे ४५-४८ ह्या सूत्रांमधील नियम लागू होतात.

## २.३१

**२ कुमारीसंग्रहाम्** 'बांधावयाच्या खांबावर बांधणे सुलभ व्हावे म्हणून ठेवलेली तुळई' (टी). तिचा कसा उपयोग होत असावा ते स्पष्ट नाही. **४ शय्याम्** हत्तींची संख्या जास्त झाल्यास ही तात्पुरती आसऱ्याची जागा तयार करून ठेवणे अभिप्रेत आहेसे दिसते. **अर्धापाश्रयाम्** 'हत्तीच्या उंचीपेक्षा पाच हात अधिक उंचीवर छत असलेली '(भा), 'एका बाजूला अर्धी म्हणजे साडेचार हात उंच असलेली' (प्र), 'हत्तीच्या अर्ध्या उंचीवर कठडा असलेली' (मे).

**१० विक्क** 'आईचे दूध पीत असणारे पिल्लू' (टी). **मोढ** 'हत्तिणीप्रमाणे लहान सुळे असलेला (टी.) **मक्कण** सुळे नसलेला. हे तिन्ही शब्द देशी दिसतात.

**१४ अराल** म्हणजे मदावस्थेत असलेला हत्ती. **अत्यराल** म्हणजे ती अवस्था संपल्यानंतरच्या स्थितीतील.

**१७ शोभा : भा** टीकेप्रमाणे हत्ती मोठ्या आजारातून बरा होत जाताना त्याचे रूप अशा सात प्रकारांनी बदलत जाते. **श्री** टीकेप्रमाणे जन्मापासून हत्तीची वाढ होत जाताना त्याचे रूप याप्रमाणे क्रमश: पालटत जाते. हा अर्थ अधिक संभाव्य वाटतो. पहिली व शेवटची ह्या दोन शोभा ह्या अर्थाला अनुकूल आहेत. **समतल्पतला :** तल्पला असा मूळ पाठ असावा. कारण, 'तल्पल' म्हणजे हत्तीच्या पाठीचा कणा असा अर्थ आहे.

## २.३२

**२ यूथगतः** 'शिकविलेल्या हत्तीणींच्या बरोबर जाण्याची सवय केली जात आहे असा' (टी). **३ विक्ककर्म** म्हणजे पिल्लाला देतात तसा आहार (दूध, हिरवा चारा इत्यादी) देणे (भा).

४ कंसांतील हे अर्थही टीकाकारांना अनुसरून दिले आहेत. **५ यूथकर्म :** 'तो नदीकाठचा, पर्वतावरील इत्यादी ज्या प्रकारच्या कळपातून आला असेल त्या प्रकाराला अनुरूप असे काम त्याला देणे' (टी).

**६ धोरण** 'सर्व काम एकाच बाजूने करणारा' (टी). २.३०.३२ प्रमाणे धोरण म्हणजे दुडक्या गतीने चालणारा असा अर्थही संभाव्य आहे. **७ शारदकर्म** 'चार प्रकारचे – स्थूल झाला असेल त्याला बारीक करणे, बारीक झालेल्यास स्थूल करणे, अपचन दूर करणे आणि स्वास्थ्य टिकविणे' (भा). प्रकृती सांभाळणे असा एकंदर अर्थ.

८–९ ह्या सूत्रांतील पाठ बदलून घेतले आहेत. मुळातील पाठ 'एकक्रियापथस्तस्योपविचार आयम्यैकरक्षः कर्मशङ्कितो. . . . .विनिश्चयश्च' असा आहे. नेहमीप्रमाणे उपविचाराच्या वर्णनात शेवटी कर्म असणे आवश्यक मानले आहे.

**१२ पारायण** 'हत्तीवर चढताना आधारासाठी दोर' (भा). **उत्तर** 'दुसरा कमरेचा पट्टा, दुसरी गळ्यातील साखळी' (भा).

**१६ आरोहक** हा हस्तिशास्त्र शिकलेला महामात्र, **आधोरण** हा शास्त्र न शिकलेला पण प्रत्यक्ष माहिती असलेला, **हस्तिपक** हा हत्तीची सेवा करणारा' (भा). **औपचारिक** 'अलंकार वगैरेनी सजविणारा' (टी).

## २.३३

**३ पुरुष :** हा शब्द २.२०.१० मधील 'पौरुष' ह्या अर्थी वापरलेला दिसतो. 'दहा वितस्ती उंच आणि बारा वितस्ती लांब' (प्र). वितस्ति व पौरुष यांचे माप एकच. ४ ह्या सर्व रथांच्या रुंदीत फरक होणार नाही. रुंदीचा निर्देश केलेला नाही.

## २.३४

२ याचा अर्थ राज्यातील प्रत्येक व्यक्तीजवळ परवाना असणे आवश्यक आहे. नगरात सुद्धा मुद्रा बाळगण्याचा निर्देश आहे (२.३६.३८). ४ **तिरोजनपद** म्हणजे परदेशी मनुष्य.

**६ ग्रामान्तरेषु** ही मुळातील 'भयान्तरेषु' ची ४.१३.९ च्या अनुरोधाने केलेली दुरुस्ती आहे. 'भयान्तरेषु' ची समाधानकारक व्याख्या करता येण्यासारखी नाही.

## २.३५

**३ सीम्नां क्षेत्राणां च :** या शब्दांचा पुढील 'मर्यादारण्यपथि–' शी अन्वय लावणे कठीण आहे'. ते 'मूळ नाहीत' (मे). ५ **चरित्र** म्हणजे परंपरेने चालत आलेले कुलधर्म. **आजीव** म्हणजे उपजीविकेच्या साधनांनी होणारी प्राप्ती, उत्पन्न.

**७ कार्यकरणम् :** प्रदेष्टयांचे मुख्य कार्य कंटकशोधनाचे (चौथे अधिकरण). **बलिप्रग्रहम् :** सामान्यतः कराचा भरणा स्वतः करावयाचा असतो. तो जर योग्य वेळी झाला नाही तर प्रदेष्टयांमार्फत त्याची वसुली करावयाची.

**९ जङ्घाग्रम्** म्हणजे व्यक्तींची संख्या.

**१२ कर्मसु च :** या शब्दांचा अन्वय लागण्यासारखा नाही. ते मूळ नसावेत.

## २.३६

**३ जङ्घाग्रम् :** २.३५.९ पहावे.

**५ स्वप्रत्ययाः** ज्यांची स्वतःची खात्री पटली आहे असे, आणि म्हणून (ते तपस्वी वगैरे शत्रूचे हेर निघाल्यास) ज्यांना जबाबदार धरले जाईल असे. ७ **स्वकरण** म्हणजे स्वतःच्या मालकीचा पुरावा. ३.१.१५, ३.१६.१७ इत्यादी पहावे.

**१३ पथिकोत्पथिकाः** २.२१.१७ पहावे. **उद्भाण्डीकृतम् :** २.२८.२० पहावे.

**२२ राजपरिग्रह** म्हणजे कोशगृह, कुप्यगृह, कोष्ठागार, पण्यगृह व आयुधागार (भा).

**३५ अक्षणताडनम्** 'क्षणः अनुज्ञातः कालः, अक्षणो निषिद्धः' (प्र). 'ताडनं दण्डः' (प्र). **प्रथम**– इ० : सहा सहा नालिकांचे तीन याम अभिप्रेत आहेत हे स्पष्ट आहे. नेहमी समजण्यात येत असलेला तीन तासांचा याम समजून अर्थ करणे अयोग्य आहे. ३६ **पूर्वापदाने :** अपदान म्हणजे गुन्हा हा शब्द अवदान म्हणजे विशुद्ध वर्तणूक ह्या शब्दाहून भिन्न आहे. ३९ **विपरीत-वेषाः** म्हणजे पुरुषांच्या वेषातील स्त्रिया अथवा स्त्रियांच्या वेषातील पुरुष.

**४३ श्रमच्छन्नपथ :** २.४.२ पहावे.

**४५ समयानुबद्धाः** कैदेतून सुटका होण्यासाठी जी रक्कम भरावी लागेल ती आपण पुढे देऊन टाकू असा कैद्यांनी ज्यांच्याशी करार केला आहे ते असा अर्थ; किंवा कैद होण्यापूर्वी

कैद्याला ज्यांनी पैसे भरून त्याची सुटका करण्याचे अभिवचन दिले होते ते असा अर्थ. हा दुसरा अर्थ अभिप्रेत दिसतो.

३

तिसऱ्या अधिकरणात न्यायाधिशांच्या कर्तव्यासंबंधी विवेचन आहे. त्या निमित्ताने यात संपूर्ण प्राचीन कायद्याचे विवरण केले आहे. न्यायाधिशाची धर्मस्थ ही संज्ञा अन्यत्र दिलेली आढळत नाही. फक्त मनुस्मृति, ८.८७ येथे अगदी जाता जाता तिचा निर्देश केलेला आढळतो. न्यायाधिशाला नंतर प्राड्विवाक हे नाव दिले आहे.

३.१

**१ त्रयोऽमात्या :** हे शब्द अगोदरच्या 'त्रयः' चे विशेष वर्णन करणारे आहेत असे समजावे (मे). 'प्रत्येक ठिकाणी तीन असावेत हे स्पष्ट करण्यासाठी त्रयः ची द्विरुक्ती केली आहे' (चा). 'तीन धर्मस्थ आणि तीन अमात्य' (भा). 'च' च्या अभावी हा अर्थ ग्राह्य नाही. **व्यावहारिक** म्हणजे विवाह, कर्ज, ठेवी इत्यादी व्यवहारासंबंधी.

**६ परोक्षेणाधिकर्ण :** 'जी वस्तू गहाण ठेवावयाची (घर, शेत वगैरे) ती प्रत्यक्ष उपस्थित नसताही कर्जाचा केलेला व्यवहार' (भा, चा). 'साधिकर्ण-' असे अपेक्षित आहे. **७ निक्षेप :** ३.१२.३३.५१ पहावे. **उपनिधि :** ३.१२.१–७ पहावे. **८ साहस :** अध्याय ३.१७ पहावा. **१० गूढाजीविषु :** ह्यांचा निर्देश अध्याय ४.४ मध्ये केला आहे. त्यांत भ्रष्ट धर्मस्थांचाही समावेश आहे (४.४.६–७). **११ मिथःसमवाये :** उदाहरणार्थ, गांधर्व विवाहात. **१२ अप्राप्तव्यवहार** 'सोळा वर्षांच्या आतील' **अतीतव्यवहार** 'सत्तर वर्षांच्या वरील' (भा). **१३ अवगृहीत** 'दुसऱ्याच्या दबावाखाली असलेला'.

**१५ वर्गे** 'जातीत' (भा, चा). व्यवसायानुरूप कर्षक, वैदेहक असे वर्गही समजता येतील. **स्वकरण** म्हणजे स्वतःचा हक्क, अधिकार. **देश** 'साक्षिदार' (भा, चा). **१६ करण** म्हणजे पुरावा असा सामान्य अर्थ आहे (४.८.१३). येथे पुराव्यानिशी असलेला व्यवहार असा अर्थ अभिप्रेत आहे. **आवेश :** ३.१२.१८ पहावे. **आधि :** ३.१२.१०–१६ पहावे.

**१७ करण** म्हणजे ज्या व्यवहाराबद्दल कज्जा उपस्थित झाला आहे तो (विवाह, दायविभाग आदी) व्यवहार असा अर्थ करता येण्यासारखा आहे. परंतु पुढे ऋणाचा निर्देश आहे. (प्रामुख्याने दावे ऋणासंबंधी असावेत). करण म्हणजे खाते, कचेरी असा अर्थ संभाव्य आहे. पुरावा या अर्थी करणाचा इतका अगोदर निर्देश केला जाण्याची शक्यता कमी आहे. **श्री** टीकेत करण म्हणजे पंचांगातील बव, बालव आदी अकरा करणे असा अर्थ केला आहे. तो असंभाव्य आहे. **अवस्थ** म्हणजे जामीन, दंडाची रक्कम सरकारला मिळालीच पाहिजे यासाठी.

**१९ परोक्त** (परा + उक्त) म्हणजे ज्याच्या विरुद्ध निकाल दिला गेला आहे असा. **२१ स्वयंवादिन्** म्हणजे स्वतः होऊन कबूल होणारा. हे मुख्यतः प्रतिवादीला लागू आहे.

३४ स्वीकारलेला पाठ व त्याचे भाषांतर मे भाषांतराला अनुसरून आहे. 'साक्षिणः' असा शब्द समासाच्या बाहेर असता तर अधिक बरे झाले असते.

३७ हे सूत्र मूळ नसण्याची शक्यता आहे. रक्षोघ्न मंत्रांच्या रक्षणाची आवश्यकता कोणाला व का ते मुळीच स्पष्ट नाही. आणि आधि देण्याची सवलत असता ब्राह्मणाचा अपवाद करण्याचे कारण दिसत नाही.

**३९ पश्चिमः पूर्वबाधकः** म्हणजे क्रमशः नंतरचा अगोदरच्यापेक्षा अधिक बलवान (चा), फक्त शेवटचा पहिल्या तिहींपेक्षा बलवत्तर (भा).

४१–४२ : हे श्लोक अस्थानी आहेत. त्यांनी संदर्भाचा भंग होतो.

४३ **संस्था** म्हणजे वर उल्लेखिलेले 'चरित्र', आणि **न्याय** म्हणजे तेथील 'राजशासन'.

३.२

१२ **द्वितीयं शुल्कम्** : 'प्रीतिदान' (भा), 'पतिगृही जाताना मिळालेले' (श्री).

२६ **पतिदायम्** : दाय म्हणजे वारसाहक्काने मिळालेले धन. पण पत्नीचा वारसदारांत (३.५.९–१२) निर्देश नाही. तेव्हा दाय म्हणजे 'दत्त' असे अभिप्रेत असणे शक्य आहे.'

३८ **अप्रजायमानाम्** : 'एकदा मूल झाल्यानंतर जिला पुन्हा गर्भ रहात नाही अशी' (भा). गर्भपातामुळे मूल होत नसेल ती अशा अर्थाचीही शक्यता आहे.

४४ **तीर्थगूहनागमने** : हे दोन अपराध पत्नीचे (टी), पतीचे (मे). पहिला पत्नीचा व दुसरा पतीचा अशीही शक्यता आहे.

४८ **नीचत्वं प्रस्थितः** : कोणत्या कारणामुळे मनुष्य अधोगतीला जातो ते सांगितलेले नाही. दुर्वर्तनी असा सामान्य अर्थ शक्य आहे. **त्याज्यः** ह्याने घटस्फोटाचा बोध होत नाही. नवऱ्यापासून विभक्त होण्याची कल्पना आहे.

३.३

३ **भा** टीकेतील व्याख्या पुढीलप्रमाणे आहे – 'जेव्हा कुटुंबाचे पोषण एखादी स्त्री करीत असेल (भर्मण्या) आणि तिने अमुक वेळात अमुक इतकाच खर्च केला पाहिजे असे तिच्यावर बंधन नसेल (अनिर्दिष्टकाला) तर तिला घर चालविण्यासाठी कुटुंबातील माणसांच्या प्रमाणात धान्य वगैरे दिले पाहिजे'. ही कल्पना विलक्षण आहे. ४ **भा** टीकेतील व्याख्या अशी – 'जर त्या स्त्रीने धान्यादीच्या पुरवठ्याच्या संबंधात अदालतीत दावा केला व त्यात ती हरली तर तिने पुरवठ्याच्या एकपंचमांश अथवा एकदशांश भाग दंड (बन्ध) द्यावा. ही कल्पना त्याहून विलक्षण आहे. **बन्ध** म्हणजे हप्ता असा अर्थ करता येण्यासारखा आहे. 'जामीन' (मे).

१०–११ **भा** टीकेत 'प्रसिद्धमदोषाया ईर्ष्याया' असा पाठ असून अर्थ पुढीलप्रमाणे केला आहे – 'स्त्री पतिव्रता असेल (अदोषाया) आणि नवऱ्याच्या बाहेरख्याली वर्तनामुळे तिला मत्सर वाटायला लागला असेल तर तिने सूत्र ७ प्रमाणे त्याला सद्वर्तन शिकवावे किंवा सूत्र ८ प्रमाणे ताडन करावे. याचे उल्लंघन केल्यास ठरलेले दंड (अर्धे नाही) करावेत.' ११ **द्वार** म्हणजे प्रसंग.

१३ **अन्वाधि** 'स्त्रीधनाचा विश्वस्त' (भा). सामान्यपणे पालक असा अर्थ करण्यास हरकत नाही. १४ **लिङ्ग** म्हणजे द्वेष करीत असल्याची चिन्हे. **अपहार** म्हणजे नाकारणे. **सवर्णापसर्पोपगमे** : 'सवर्ण स्त्रीशी अपसर्पामार्फत (गुप्तपणे धाडलेल्या दूतीमार्फत) संपर्क प्रस्थापित केला तर' असा अर्थ असण्याची शक्यता आहे. 'मिथ्यावादी' पुल्लिंगी असल्यामुळे हे अपराध पुरुषाचे असे समजले पाहिजेत.

१७–१८ : स्त्रीचा अपराध नसता तिला काही मिळू नये व तिचा अपराध असताही तिला सर्व काही मिळावे हे विचित्र वाटते. अशी शक्यता आहे की ह्या दोन सूत्रांत 'अस्यै' व 'नास्यै' यांची अदलाबदल झाली आहे. असाही संभव आहे की 'पुरुषविप्रकारात्' म्हणजे 'नवऱ्याचा अपराध केल्यानंतर' असा अर्थ आहे व तसाच 'स्त्रीविप्रकारात्' चा 'पत्नीचा अपराध केल्यानंतर' असा.

३.४

९ **सुखावस्थ** 'ज्याने विवाह जुळवून आणला होता तो' (भा). सुखाची हमी देणारा असा मूलभूत अर्थ. **अन्वाधि** : ३.३.१३ पहावे. १२ **एतद्** म्हणजे साध्वी, स्त्रिया फसविणार नाहीत हे.

२१ व्यन्तरे ' मध्येच '. " हा ' अटव्यन्तरे 'चा अट गहाळ होऊन अवशिष्ट राहिलेला भाग असावा " (मे).

३० कुटुंबाच्या संपत्तीतून सुखावस्थ तिचे पालनपोषण करतात हे स्पष्ट आहे.

३५ : यावरून असा निष्कर्ष निघतो की धर्मविवाहांच्या संबंधात पत्नी कुमारी असेल तर तिला दुसरे लग्न करता येईल. त्यासाठी तिला न्यायाधिशांची परवानगी घ्यावी लागेल.

३७ : दीर्घप्रवासात पतीच्या परत येण्याची मुदत ठरलेली नसते.

४२ **संग्रहात्ययम् :** व्यभिचाराबद्दल ४.१२.३३ मध्ये सांगितलेली शिक्षा.

## ३.५

१ **स्थितपितृमातृकाः**. हा शब्द एखाद्या टीकेतून ग्रंथात घुसलेला दिसतो. तो अनावश्यक आहे.

५ : हे सपिंड होत.

१० : नवव्या सूत्रातील द्रव्य व ह्या सूत्रातील रिक्थ यांतील फरक स्पष्ट नाही. कदाचित नववे सूत्र संसृष्टींबद्दल (विभक्त झाल्यावर पुन्हा एकत्र रहाणाऱ्यांविषयी) असावे, आणि हे सूत्र प्रथम विभागणीसंबंधी असावे.

१३ : म्हणजे मृत झालेल्या भावाच्या पुत्रांनी त्यांच्या पित्याच्या वाटचाला जेवढा हिस्सा (तो जिवंत असता तर) आला असता तेवढाच आपसात वाटून घ्यावयाचा आहे. त्यांना चुलत्यांच्या बरोबरीने हिस्सा मिळणार नाही.

१५ हा अविभक्त कुटुंबातील कर्त्याचा निर्देश आहे. 'अर्थग्राहिणम्' नंतर 'अपि' अध्याहृत धरावे.

२६ **विभागं कारयेत् :** याचा कर्ता ' धर्मस्थः ' अभिप्रेत असावा.

३३ ह्या नियोगासाठी ३.४.३८–४० मधील क्रम अपेक्षित असावा. ३.७.६ पहावे.

## ३.६

५ **औशनसो विभागः** ' ह्याचा निषेध केलेला नसल्यामुळे ही पद्धती ग्रंथकाराला मान्य आहे ' (भा). पण पुढील सूत्रांत दुसरी पद्धती निर्दिष्ट आहे. आणि सामान्यतः शेवटचे मत ते ग्रंथकाराचे असे मानतात.

८ **अदायाद्या भगिन्यः** भाऊ असतील तर बहिणी वारस होत नाहीत. ३.५.१० पहावे.

१३ संस्कारयुक्त विवाह झालेल्या पत्नीचा पुत्र ज्येष्ठ, मग त्याचे वय काहीही असो. तसेच लग्नाच्या वेळी अक्षतयोनि असलेल्या पत्नीचा पुत्र ज्येष्ठ.

१९-२० ह्या सूत्रांत वाटणीच्या भिन्न प्रकाराचा निर्देश आहे. प्राचीन आचार्यांनीच अशी भिन्न मते मांडली होतीं हे उघड आहे.

२४ **तद् धनम्** म्हणजे ते दोन भाग.

## ३.७

३ **विद्यमानमुभयम्** 'ज्याअर्थी क्षेत्र व बीज दोन्ही आवश्यक असतात त्याअर्थी अपत्य उभयतांचे' (भा). हा अर्थ येथे अभिप्रेत नाही.

१३ **पितुर्बन्धूनां च :** मूळच्या 'पितृबन्धूनां च' ऐवजी हा मे भाषांतराला अनुसरून स्वीकारलेला पाठ आवश्यक आहे. १५ **तत्** 'म्हणजे स्वयंजात' (भा). तत् म्हणजे परजात असे समजणेही शक्य आहे. तसे समजल्यास दत्तक पुत्राचे अधिकार फार कमी होतील.

२९ हे सूत्र मूळचे नसावे. 'विशेषः' चा नीट अन्वय लागत नाही. 'ब्रह्मक्षत्र' हा शब्दही संशयास्पद आहे. पौराणिक मागध प्रसिद्ध नाही.

३६ मुळात 'च' नंतर 'स्वधर्मं स्थापयेत्' हे शब्द अधिक आहेत. ते गाळले आहेत. त्यांसाठी 'राजा' हा कर्ता असे समजावे लागते. परंतु 'विवाहः' प्रमाणे त्याच्यापुढील दोन शब्दही प्रथमा विभक्तीत आहेत, तेव्हा दुसरा कर्ता समजता येण्यासारखा नाही. पुढील सूत्र ३८ संशयास्पद आहे. ते उपपन्न आहे हे दाखविण्यासाठी हे दोन शब्द ह्या सूत्रात घुसडले आहेत.

३.८

**३ सेतु** म्हणजे घराच्या आवाराला घातलेले कुंपण. **कर्ण** म्हणजे त्याचे कोपरे, त्यांत लोखंडी तारा खिळ्यांनी (कीलायस) पक्क्या केलेल्या असाव्यात. **५ देशबन्ध** म्हणजे आवाराला घातलेले कुंपण.

**१५ खण्डफुल्लार्थम् असंपातम्** 'झालेल्या मोडतोडीची दुरुस्ती करण्यासाठी आणि लोकांना सहज आतबाहेर जाता येणार नाही असा' (भा). **१७ अवसित** म्हणजे बांधून तयार झालेले व आत रहावयास माणसे असलेले.

**१९ वानलटी** म्हणजे पडवी, ओटा, 'गृहवरण्डक' (भा).

३.९

**३-४** 'हा लिलाव अदालतीच्या आदेशानुसार होतो' (मे). पण असे समजण्याचे काही कारण नाही. स्थावराची सर्व विक्री लिलावाने व्हावी असेच अभिप्रेत आहे. आयात झालेला परदेशातील मालही असाच लिलावाने विकावयाचा असतो (२.२१.७–९).

**१६ बहवः इ०** : विकल्प 'शुचयः' आणि 'अनुमताः (उभय पक्षांना मान्य)' यांत आहे, 'बहवः' हे उभयतांना समान.

१६ 'सीमन्' म्हणजे दोन गावांमधील हद्द, 'मर्यादा' म्हणजे शेत वगैरे इतर स्थावरांमधील हद्द.

२४ हे मालमत्तेच्या होणाऱ्या नुकसानीच्या संबंधात केलेले विधान आहे.

२६ हे सूत्र मूळ नसण्याचा संभव आहे. तो एखाद्या टीकेतील अंश असावा.

**३५ खातप्रावृत्तिम्**– इ० : हा समास –तटाकम् येथे तोडून –तटाकोदकम् असे अभिप्रेत असल्याचे समजले म्हणजे अर्थ स्पष्ट होण्यास मदत होते.

३.१०

३ 'हा नियम फक्त धर्मसेतूंच्या बाबतीतच लागू आहे' (भा).

**६ अतिकर्षणे** म्हणजे रस्त्यांवर अतिक्रमण करून त्यांची रुंदी कमी केल्यास. मूळ पाठ 'अतिकर्शने' असा असण्याचा संभव आहे.

**८ दोषोपनिपात** इ० : ३.१५. २–४ पहावे.

**१९ अभिगमेन** ही मूळच्या 'अधिगमेन' ची केलेली दुरुस्ती आहे. 'व्याख्यातः' ने ४.१३. ३–४ चाच निर्देश अभिप्रेत असणे शक्य आहे. आणि तेथे 'अभिगमन' असे रूप आहे. शिवाय, 'अधिगम' चा अर्थही संदर्भात जुळण्यासारखा नाही.

**२० उपसाल** म्हणजे लहानसा तट, कुंपण.

**२१ विवीतम् आलवनेन** असा संधी सोडवला आहे. ' 'गवत कापणारे' असा वाक्याचा कर्ता. त्यांनी गवत कापून नेऊन त्यावर आपली उपजीविका करावयाची. ह्या हक्कासाठी ते

विवीताध्यक्षाला ठराविक रक्कम देतात असे समजले पाहिजे. गवत त्यांचे असल्यामुळे पुढील सूत्रांत निर्दिष्ट केलेली आकारणी त्यांनी घ्यावयाची आहे (**गृह्णीयुः**). २४ **उक्षाणो गोवृषाः** येथे फक्त 'सांड, वळू' हा अर्थ अधिक समर्पक. 'म्हातारे बैल आणि सांड' (भा). २.२९.८ पहावे.

४२ **उपहन्तृ** 'मृत्यू घडवून आणणारे' (भा). भयंकर जखमी करणारे असा अर्थही संभाव्य आहे.

४४ **भा** टीकेत ह्या सूत्राची व्याख्या नाही. ते मूळ नसण्याची शक्यता आहे.

४५ **अनपाकर्म** म्हणजे पालन न करणे.

## ३.११

**ऋणादान** म्हणजे शब्दशः 'कर्ज परत न करणे (ऋणस्थ अदानम्)' किंवा 'कर्ज घेणे (ऋणस्य आदानम्)' असे दोन्ही अर्थ संभवतात.

५ **प्रक्षेप** म्हणजे पैशाच्या रूपात दिलेले कर्ज, एखाद्या व्यापारात गुंतविलेली रक्कम. **संनिधानसन्ना** म्हणजे साठ्याच्या स्वरूपात बाजूला काढून ठेवलेले. **स्तम्भ-** म्हणजे मूलतः ताठा. त्याच्या जोरावर व्याज न देणे. ८.४.३० पहावे.

८ **तुच्छ** जे दिलेलेच नव्हते ते. नंतरच्या 'अभूत' ने हा अर्थ दृढ होतो. **प्रदाता** म्हणजे कर्ज घेतले होते अशी साक्ष देऊन मदत करणारा.

२२ **अग्राह्य** ह्याचा नेहमीचा अर्थ 'ज्याला अटक करता येत नाही असा' हा आहे. परंतु पुढील सूत्रात 'ग्रह्' म्हणजे (कर्जाबद्दल) जबाबदार धरणे, ते (दावा करून) फेडावयास लावणे असे अर्थ अभिप्रेत आहेत.

२६ विकल्प 'शुचयः' आणि 'अनुमताः' यांत आहे, 'प्रात्ययिकाः' उभयत्र समान आहे.

२९ **स्ववर्गेभ्यः** उदाहरणार्थ, कर्षकांच्या बाबतीत कर्षक इत्यादी.

४५ **मानवाः** मनुस्मृतीत अशा तऱ्हेचा काही नियम नाही.

## ३.१२

१ **ऋणेन** म्हणजे मुख्यतः ३.११.११-२४ यांतील नियम ठेव परत करण्याच्या संबंधात लागू होतील.

२ मुळात असलेला -बाधे यानंतरचा 'वा किंचिदमोक्षममाणे कुप्यमनिर्हार्यवर्जमेकदेशमुक्तद्रव्ये वा' एवढा अंश गाळला आहे. ह्या अंशाच्या दोन्ही बाजचे समास परस्परांशी संबद्ध आहेत. त्यांना अलग करता येण्यासारखे नाही. हा अंश एखाद्या टीकेतून आला असावा.

१६ **बन्ध** म्हणजे येथे (एकदशांश किंवा) एकपंचमांश रकमेइतका दंड. १७ **शेषमुपनिधिना व्याख्यातम्** : सूत्र २-७ मधील नियमांप्रमाणे.

३७ **करण** म्हणजे मुख्यतः साक्षिदार.

४६ **अक्षण** : २.३६.३५ पहावे.

## ३.१३

१ **उबरदासवर्जम्** : म्हणजे सज्ञान न झालेल्या बालकास, त्याचे पोषण करणे शक्य नसल्यास, त्याचे पोषण केले जावे म्हणून विकण्यास अथवा गहाण ठेवण्यास हरकत नाही.

७ हे सूत्र गहाण ठेवलेल्या माणसासंबंधी असावे, कारण मागचे व पुढचे दोन्ही सूत्रे त्याच्याविषयीच आहेत, दासाविषयी नाहीत. म्हणून ह्या सूत्राचा अर्थ 'गहाण ठेवलेल्या मनुष्याचे आर्यत्व नष्ट करून त्याला दास करणाऱ्याला' अशा प्रकारचा अभिप्रेत असावा. दासाला नसलेले काही हक्क आहितकाला असतात.

९ परिचारिकेपेक्षा उपचारिका ही अधिक निकटवर्ती सेविका. १० **उपचारकस्य** हा शब्द पुल्लिंगी असल्यामुळे **भा** टीकेत दासीचा पती असा त्याचा अर्थ करून तो तिचे पोषण करतो व त्याच पगारावर तिच्या मालकाची चाकरी करतो; त्यांना मूल झाल्यावर त्याने सोडून जावयास हरकत नाही अशी व्याख्या केली आहे. पण ती अभिप्रेत असेलसे वाटत नाही. ह्या वचनाने स्त्री उपचारिका समजण्यास हरकत नाही.

२६ **आसन्नाः** हे एक प्रकारचे मुकादम असावेत. २८ येथील वेतन खाजगी नोकरांसाठी आहे, २.२४.२८ मधले सरकारी नोकरीत असलेल्यांसाठी.

३.१४

१० **-पातनेन :** '-पातने' असे सप्तम्यन्त रूप अपेक्षित आहे.

१२ **संघ** म्हणजे कामगारांचा संघ हे उघड आहे. कामाविषयी करार संघाशी करावयाचा, व्यक्तिशः कामगारांशी नाही. संघाने मग कामगाराची निवड करून त्याला कामावर पाठवावयाचे. १३ **आधिः** म्हणजे कामावर पाठविलेला संघाचा सभासद. तो तात्पुरता गहाण ठेवल्यासारखा असतो, म्हणून ही संज्ञा. **सप्तरात्रम् :** मालकाशी एकाच कामगाराचा घनिष्ठ संबंध प्रस्थापित होऊ नये असा यात उद्देश. १७ संघाने काढून घेतलेल्या कामगाराला होणारा दंड संघ भरून देईल असे समजण्यास हरकत नाही.

३२ : हे सूत्र मूळ नसावे. त्यातील 'हि' ने मागील सूत्रातील विधान करण्याचे कारण सागणारे हे सूत्र आहे असे निर्दिष्ट होते. परंतु तसे काही त्यात नाही. उलट, त्यात एक निराळेच विधान आहे. ३३ हे सूत्र अनावश्यक आहे. तेही मूळ नसण्याचा संभव आहे. **भा** टीकेत त्याची व्याख्या नाही.

३.१५

४ **आर्तकृतम्** 'संकटात असलेल्या माणसाने केलेले' याचा अर्थ एखाद्याकडून बळजबरीने करून घेतलेले असा असावा.

१२ **सिद्धमुपावर्तनम्** म्हणजे तो विवाह रद्द होईल, तो बेकायदेशीर ठरेल.

३.१६

१ **ऋणादानेन व्याख्यातः :** वस्तुतः अध्याय ३.११ मधील एखाददुसराच नियम लागू पडण्यासारखा आहे.

७ **राज्ञाम् :** बहुवचनाने राजाच्या कुटुंबातील इतर व्यक्तीही समाविष्ट असण्याची शक्यता आहे.

१३ **आचारक्रमम् :** 'आचारक्रयम्' असा पाठ अधिक सुगम होईल, कारण लगेच 'विक्रेतारम्' चा निर्देश आहे. १४ **मूल्यम् :** हे विकत घेणाऱ्याला मिळावे.

१७ **नाष्टिकश्च :** नाष्टिक म्हणजे ज्याची वस्तू हरवली आहे तो, तिचा मालक.

२१ **शुल्कस्थाने :** हे सूत्र २.२१.५ मधील घटिकास्थान असावे. २४ **पञ्चकं शतम् :** हा नियमच सर्वत्र लागू आहे असे मानले तर एका मनुष्याची किंमत शंभर पण, घोड्याची ऐंशी पण, गाई-म्हशीची चाळीस पण, लहान जनावराची पाच पण असा निष्कर्ष काढता येईल.

२७ **स्वयंग्राहेण :** ८.१.४४ पहावे.

३० **उपेक्षेत :** 'उपेक्ष्येत' असा कर्मणि प्रयोगात पाठ अधिक सुगम झाला असता.

३२ **राज्ञामसंनिधौ** हा राज्यात उलथापालथ होत असल्याचा निर्देश आहे. **विवसन्तो :** 'निवसन्तो' असा पाठ अपेक्षित आहे.

३७ हे सूत्र अस्थानी आहे. त्याची जागा अध्याय ३.५ मध्ये आहे. **क्रमेण :** वानप्रस्थाचा वारसदार आचार्य अथवा शिष्य, यतीचा धर्मभ्राता आणि ब्रह्मचाऱ्याचा समानतीर्थ्य असा अर्थ अभिप्रेत दिसतो.

३८ **महाकच्छ** म्हणजे समुद्र अथवा वरुण आणि 'वर्धन' म्हणजे पूजा असा अर्थ असावा. **भा** टीकेत 'पाण्यात रहाणे' असा अर्थ केला आहे. कच्छ म्हणजे कृच्छ्रव्रत (श्री, मे), आणि वर्धन म्हणजे चांद्रायणकृच्छ्रातील आहार वाढवीत जाण्याचे व्रत (मे).

## ३.१७

१ **अन्वय** म्हणजे मालकाची उपस्थिती.

३ **मानवाः** मनुस्मृतीत अशा प्रकारचा नियम कोठेच नाही.

## ३.१८

१ **उपवाद** म्हणजे हिणवणे, हेटाळणी करणे, कुचेष्टा करणे, बदनामी असे अर्थ आहेत. **कुत्सन** म्हणजे गंभीर स्वरूपाच्या दोषावरून कुचेष्टा, निंदा, नालस्ती इत्यादी करणे.

७ **त्रिपणोत्तराः** अंत्यजाला वर्णक्रमाने १२, ९, ६ व ३, शूद्राला ९, ६ व ३ इत्यादी. द्विपणा धराः ब्राह्मणाला वर्णक्रमाने ८, ६, ४ व २; क्षत्रियाला ६, ४ व २ इत्यादी.

८ **प्राज्जूणक :** **भा** टीकेत 'प्राग्घूणक' असा पाठ असून 'चंडालांचे राज्य' अशी त्याची व्याख्या आहे.

## ३.१९

६ **अञ्चन** ही मूळच्या 'अञ्जन' ची **मे** भाषांतराला अनुसरून केलेली दुरुस्ती आहे. त्याचा वाकविणे म्हणजे पिरगळणे असा अर्थ आहे.

८-१० : ही सूत्रे निःसंशय प्रक्षिप्त आहेत. 'स्पर्शन' नंतर 'अवगूर्ण'चे विवरण पाहिजे. मध्येच ही 'प्रहत' विषयक सूत्रे क्रमभंग करतात. आणि ह्या ग्रंथात शूद्रांविषयी असा आकस कोठेच दिसून येत नाही. मनु व याज्ञवल्क्य स्मृतींत ह्या प्रक्षेपाचा उगम आहे.

१२ **अन्यत्र दुष्टशोणितात् :** म्हणजे रक्त दूषित असल्यास दुप्पट दंड नाही. १३ **पारञ्चिक** ह्यातही अञ्च् वाकविणे हा धातू आहे, परंतु रूप शुद्ध दिसत नाही.

## ३.२०

२ **गुढाजीविज्ञापनार्थम् :** हा शब्द वस्तुतः सूत्र १ च्या अंती असावयास पाहिजे.

९ ह्या अपराधांबद्दल ४.१०.९ मध्ये अधिक कडक शिक्षा सांगितली आहे.

१२ **द्विगुणः :** सूत्र ९ मधील दंडांच्या दुप्पट असे अभिप्रेत असावे.

१३ **अन्यत्र विद्याशिल्पसमाह्वयात्** म्हणजे विद्या व कला यासंबंधीच्या पैजांवर सरकारचे नियंत्रण नाही. त्या हव्या तशा मारण्यास हरकत नाही.

१४ **प्रकीर्णकम् :** ह्या प्रकरणातील अपराधांची यादी त्यांसाठी करावयाच्या दंडाच्या चढत्या क्रमाने दिली आहे. ह्या अपराधांपैकी बऱ्याच अपराधांचा अगोदरच्या प्रकरणांत समावेश करणे शक्य होते. **याम** म्हणजे रात्रीची वेळ आणि **छाया** म्हणजे दिवसाची वेळ. **समुपवेशसंस्थितीनाम्** म्हणजे एके जागी जमणे व तेथे रहाणे असा अर्थ शक्य आहे. हे सरकारच्या आदेशानुसार असावे. **अनुवेश** म्हणजे आपल्या घराला लागून असलेला शेजारी आणि **प्रतिवेश** म्हणजे त्याच्या पलीकडचा शेजारी (भा).

१५ **क्रीणानस्य :** 'विक्रीणानस्य' अधिक योग्य झाले असते. कारण हा अपराध विकणाऱ्याकडून होणे जास्त संभाव्य आहे.

**१७ वाक्यानुयोग :** ४.८.१–५ पहावे.

**१९ :** ३.१७.१० पहावे.

**२१ तीर्थकर :** एखाद्या धार्मिक संघटनेचा मुख्य असा अर्थ असावा. 'दानशील' (भा).

## ४

कंटक म्हणजे समाजकंटक. त्यांत चोर, दरोडेखोर, खुनी यांच्याबरोबर गिऱ्हाइकांना फसविणारे कारागीर, व्यापारी, लाचखाऊ सरकारी अधिकारी यांचाही समावेश होतो. ह्या गुन्ह्यांचा तपास करण्याचे आणि गुन्हेगारांना शिक्षा करण्याचे काम प्रदेष्टा नावाच्या अधिकाऱ्यांचे. पोलीस व मॅजिस्ट्रेट ह्या दोहोंचे कार्य त्यांनी पार पाडावयाचे आहे. ते समाहर्त्याच्या हाताखाली आहेत हे ४.४.१, ४.५.१३ यांवरुन स्पष्ट आहे.

## ४.१

**१ त्रयोऽमात्याः :** ३.१.१ पहावे.

२ ह्या सूत्राची व्याख्या निरनिराळ्या प्रकारे केली गेली आहे. प्रस्तुत भाषांतरात दोनच प्रकारचे कारागीर–नोकरांकडून काम करविणारे मालक आणि व्यक्तिशः स्वतंत्र धंदा करणारे–मानण्यात आले आहेत. **संनिक्षेप्तारः** हे वस्तुतः गिऱ्हाइकांच्या वर्णनपर आहे. पण येथे ते कारागिरांचे वर्णन करण्यासाठी वापरले आहे. दिलेल्या निक्षेपाचा योग्य संभाळ व वापर करणारे असा त्याचा अर्थ करणे शक्य आहे.

**१८** हे क्रमाने अधिकाधिक शुभ्र होत जाणाऱ्या चार प्रकारच्या पांढऱ्या कपड्यांचे निर्देश आहेत, पुढील सूत्रांत रंगीत कपड्यांचे.

**३० वर्णोत्कर्ष** म्हणजे हलक्या प्रतीच्या सोनेरुप्यावर मुलामा चढविणे. मुळातील 'अपसाराणां' ऐवजी **मे** टीपेत **अपसारणम्** असा पाठ सुचविला आहे, तो स्वीकारला आहे. २.१४.२०–२४ मध्ये अपसारण म्हणजे सोने-चांदी काढून घेण्याच्या प्रकाराचे वर्णन आहे. ते येथे अभिप्रेत असण्याची शक्यता आहे. **३१ :** ४.४.२२ मध्ये 'रागस्य अपहार' हा फार मोठा गुन्हा मानला आहे. तेव्हा येथील **अपचरण** म्हणजे सोने व रुपे मुळीच न वापरता त्यांच्याऐवजी हलका धातूच वापरणे असा अर्थ अभिप्रेत असावा.

**४६ पणान्माषकमुपजीवतः** म्हणजे एखाद्या चलनाला मान्यता देण्यासाठी रूपदर्शकाने दर पणामागे एक माषक याप्रमाणे मागणी केली तर. 'एका पणाच्या नाण्यातून एक माषक चांदी काढून घेतली तर' असा अर्थ करणे शक्य आहे. पण ते नाणे खोटे होईल व त्यासाठी सूत्र ४८ मध्ये जबर शिक्षा सांगितली आहे.

**६१ -अवहासेन** ही मुळातील '-अवभासेन' च्या ऐवजी **मे** टीपेत सुचविलेली दुरुस्ती आहे. थट्टा करणे, मस्करी करणे असा त्याचा अर्थ. **६३ अयःशूलेन** हे लाक्षणिक अर्थाने वापरले आहे. कारण मारण्यासाठी चाबकाचा निर्देश केला आहे.

## ४.२

**३** याचा अर्थ वजनाच्या अथवा मापाच्या एकचारशेअंश इतका फरक पडला तर हरकत नाही. पुढील सूत्रांतही इतकाच फरक निर्दिष्ट होतो.

**१६ हीनमूल्यम्** म्हणजे एक पणाहून कमी किमतीच्या मालाबद्दल.

२० सूत्राच्या प्रारंभीचे शब्द अधिकारशब्द समजल्यास अर्थ सुगम होतो. 'धरक' 'मायक' हे सरकारी कोठारातील नोकर व हे गुन्हे कोठारातच होतात असे समजले पाहिजे (ब्रे). २.१५.६३ पहावे. **२२ समवर्णोपधाने :** त्याच जातीच्या पदार्थाचे मिश्रण केले तरी दंड सांगितला आहे. याचे कारण हे विधान सरकारी कोठारातील मालासंबंधी आहे हे असावे.

२३ वणिक् म्हणजे पण्याध्यक्ष अभिप्रेत आहे. ह्या सूत्रापासून पुढे पण्याध्यक्षाच्या कार्याचा निर्देश आहे. 'उपजीवेयु:' चा कर्ता २.१६.१४–१६ मधील 'पण्याधिष्ठातार:'. ते पण्याध्यक्षाच्या आदेशानुसार विक्री करतात. २४ क्रेतृविक्रेत्रोः 'क्रयविक्रययो:' या अर्थी हा शब्द समजावा लागतो. आदायात् : विक्री करणारांनी जे घ्यावयाचे ते या अर्थी 'आदेय' शब्द अपेक्षित आहे. अशी शक्यता आहे की मूळ पाठ 'आदाय यद्भवति तेन धान्यपण्यनिश्चयाश्च इ०' असा होता.

४.३

अकस्मात येणाऱ्या दैवी आपत्तींचा समावेश कंटकांत केला जावा हे थोडे चमत्कारिकच. प्रजेला उपद्रवकारक कोणतीही गोष्ट म्हणजे कंटक असे अभिप्रेत दिसते. पण ज्याप्रमाणे दुसऱ्या अध्यायातील व्यापाराचे नियंत्रण प्रदेष्टयांनी करावयाचे नाही त्याप्रमाणे येथेही निवारणाची अंतिम जबाबदारी त्यांची नसून समाहर्त्याची असावी असे वाटते. काही बाबतीत तर स्वतः राजाने करावयाच्या उपाययोजनेचा निर्देश आहे.

३ दशकुली. हा भा टीकेतील पाठ आहे. त्या टीकेत असे सूचित केले आहे की दहा कुटुंबांवर देखरेख करणारा अधिकारी जो गोप त्याने या बाबतीत लक्ष द्यावयाचे आहे. हस्तलिखितांतील पाठ 'दशमूली' आहे. त्याने नीटसा अर्थबोध होत नाही.

१२ महाकच्छ 'समुद्र' (भा). ३.१६.३८ पहावे.

१६ स्वदैवत 'हत्तींचे दैवत सुब्रह्मण्य, घोडयांचे अश्विनीकुमार, गाईंचे पशुपति, म्हैशींचे वरुण, गाढवांचे व खेचरांचे वायु आणि शेळयांचे अग्नि' (भा).

१८ कर्शन काही लोकांना परदेशात जावयास सांगून देशातील लोकसंख्या कमी करणे. वमन देशातल्या देशातच एके ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी हलविणे.

४.४

१ समाहर्तृप्रणिधौ : प्रत्यक्षात त्या प्रकरणाला 'समाहर्तप्रचार:' ही संज्ञा आहे.

३ प्रच्छन्दक : स्वतःच्या लहरीप्रमाणे वागणारा, भटक्या.

१९ मदनयोग : याचे वर्णन १४.१.१६-१७ मध्ये आहे.

२२ रागस्यापहर्ता कूटसुवर्णव्यवहारी च : यात दोन निरनिराळया प्रकारच्या गूढाजीवींचा निर्देश आहे. त्यामुळे गूढाजीवींची एकूण संख्या चौदा होते. परंतु पुढील श्लोकात ते तेरा असल्याचे म्हटले आहे. तो श्लोक भिन्न मत प्रदर्शित करणारा आहे असे मानण्यात आले आहे (उदा० शार्फ). ते शक्य आहे.

४.५

७ अभिज्ञानार्थम् : अशी कल्पना दिसते की पुरश्चरण क्रिया करणारे ते माणव असे प्रदेष्टयांना कळून यावे. अशीही शक्यता आहे की हा शब्द पुढील सूत्राच्या प्रारंभी घ्यावयाचा असून त्याचा 'कृतलक्षण'शी अन्वय लावावयाचा आहे. ९ : हे सूत्र १० व्या सूत्रानंतर अधिक उचित. ८ व १० ही सूत्रे परस्परसंबद्ध आहेत.

४.६

२ निष्कुट म्हणजे घराभोवतालची बाग. अभ्यधिगन्तारम् 'कोणी समोरून आला असता पटकन दुसरीकडे जाणारा' (भा). 'लपून छपून जाणारा' असा अर्थही शक्य आहे.

८ आधिप्रच्छन्नम् 'गुप्तपणे गहाण ठेवलेली वस्तू' व सूत्र ११ मधील आहितकम् उघडपणे 'गहाण ठेवलेली वस्तू' यात भेद अभिप्रेत आहे.

**१६ बीजेन :** याचा अर्थ स्पष्ट नाही. त्याचा ' द्वारस्य ' शी अन्वय करावयाचा असल्यामुळे दार मुळापासून उखडणे असा अर्थ शक्य आहे.

४.७

**१ तैलाभ्यक्तम् :** शरीरावरील जखमा, सूज वगैरे स्पष्ट दिसावेत यासाठी.

**४ अवरोपितम् :** ' सुळावर चढविलेला ' (भा). या अर्थासाठी ' आरोपितम् ' अपेक्षित होते. पण दुसरा अर्थ ' तोंडात बोळा कोंबून श्वास कोंडलेला ' (मे) संभाव्य दिसत नाही.

**५ निस्तब्ध :** ' दबले गेलेले, बंद झालेले ' (मे), ' बाहेर आलेले ' (भा).

**१४ अतिलब्ध :** ' पिडलेला, गांजलेला ' (श्री). ' ज्याला खूप प्रमाणात मिळाले आहे असा ' हा मूलभूत अर्थ.

४.८

**२ अपदेश** म्हणजे दुसऱ्याने केलेले विधान. १५.१.२१ पहावे.

**७ चोरेण** हे ' चौर्येण ' या अर्थी वापरले आहे. **अपदिष्टक** म्हणजे ज्याच्याबद्दल (तो चोर आहे असे) विधान केले गेले आहे तो.

**९ रूप** म्हणजे (चोरीस गेलेली) वस्तू. **वैयावृत्यकर** म्हणजे तो सांगेल त्याप्रमाणे करणारे त्याचे सेवक. **१२ उपवास** ' जवळ रहाणे ' ह्या शब्दशः होणाऱ्या अर्थी.

**१४ आमकाशितम् :** ' ज्याने खाल्लेले अन्न पचन झाले नाही असा ' (भा). **१६ अतिसंधा** म्हणजे फसविणे हा धातू मात करणे, वरचढ होणे अशा अर्थी पुष्कळ ठिकाणी वापरला आहे.

**२१ द्वावुपरिनिबन्धौ** ' दोन्ही हात वर बांधणे आणि दोन्ही हात व मस्तक एकत्र बांधणे ' (भा). दोनदा वर टांगणे हा अर्थ अधिक संभाव्य वाटतो. **उदकनालिका :** ' नळीने नाकात मिठाचे पाणी सोडणे ' (भा). **२२ द्वावूरुवेष्टौ :** ' दोन्ही पाय दोराने बांधणे आणि दोन्ही पाय व मस्तक एकत्र बांधणे ' (भा). **द्वौ वृश्चिकबन्धौ :** ' डावा हात व डावा पाय पाठीमागे बांधणे आणि उजवा हात व उजवा पाय पाठीमागे बांधणे ' (भा). दोन्ही हात व दोन्ही पाय पाठीमागे एकत्र बांधणे व असे दोनदा करणे हे अधिक संभाव्य वाटते. **उल्लम्बने द्वे** ' हात बांधून सरळ टांगणे व पाय बांधून उलटे टांगणे (भा). **सूची हस्तस्य :** ' हाताच्या नखांखाली सुई टोचणे ' (भा). **२३ अष्टादशकम् :** ही अठरा संख्या निश्चित करणे कठीण आहे. २१ व २२ दोन्ही सूत्रांत मिळून अठरा प्रकार समजावयाचे हे एवढे निश्चित. पण २२ मधील चौदा कोणते ते मुळीच स्पष्ट नाही.

**२४ खरपट्ट** ' चोरीच्या शास्त्रावरील एका ग्रंथकाराचे नाव ' (श्री). ग्रंथाचे नाव असण्याचीही शक्यता आहे. छळाची आज्ञा देणाऱ्याने तपशील लिहून दिलेला पट्ट अथवा पत्र अशा प्रकारचा अर्थ अभिप्रेत असणे अशक्य नाही.

**२७-२८ : मे** टीपेत ही सूत्रे प्रक्षिप्त मानली आहेत. ह्या अध्यायाच्या विषयाशी (' अनुयोग ', तपास) ही सूत्रे व पुढील श्लोक सुसंगत नाहीत.

४.९

**८ राजपरिग्रह** म्हणजे कोष्ठागार, पण्यगृह वगैरे.

९ चार पणांपासून पुढच्या अपहाराबद्दलसुद्धा मुंडन व विटांच्या तुकड्यांनी हाकून लावणे हा पर्याय अभिप्रेत समजावा (श्री).

**१३ अभिग्रसते** ' गिळून टाकतो ' म्हणजे दमदाटी करून गप्प बसवितो असा अर्थ असावा. **१५ तारित** म्हणजे शेवटापर्यंत पार पाडलेले आणि **अनुशिष्ट** म्हणजे निवाडा देऊन निकालात काढलेले.

१९ निष्क्रय म्हणजे दुसऱ्या प्रकारच्या शिक्षेतून सुटका करून घेण्यासाठी द्यावयाची रक्कम. पुढच्या अध्यायात त्या रकमा निर्दिष्ट केल्या आहेत.

२३ चारयतः 'चाकरी करावयास लावणाऱ्यास' (भा). हिंडण्याफिरण्यास परवानगी देणारा असा अर्थ शक्य आहे.

२७ सुटका करणाऱ्या बाहेरच्या माणसाकरिता ह्या शिक्षा आहेत. तुरुंगातील अधिकाऱ्यांसाठी सूत्र २२ मध्ये सांगितल्या आहेत.

४.१०

१ तीर्थघात 'यात्रा वगैरेच्या प्रसंगी तीर्थाच्या ठिकाणी वस्तू लांबविणारा' (भा). असा याचा अर्थ असावा. संदंश : २.२३.१५ पहावे. ऊर्ध्वकर : वस्तू उचलून घेऊन जाणारा असा याचा अर्थ असावा. भा टीकेत या ठिकाणी 'आंगठा आणि तर्जनी'.

५ बिम्ब म्हणजे प्राणिसंग्रहालयात ठेवलेले असा अर्थ मे टीपेत केला आहे. तो संभाव्य आहे. भा टीकेत ह्या सूत्रावर व्याख्या नाही.

९ काकण्यक्ष- इ० : ३.२०.१० पहावे.

१२ वर्णोत्तमानाम् : हा शब्द प्रक्षिप्त असावा असे मे टीपेत म्हटले आहे. ह्या सूत्राचा अनुवाद करणाऱ्या याज्ञवल्क्य स्मृतीतील श्लोकात (२.३०३) तो नाही.

१३ योगाञ्जनेन : १४.१.१५ मध्ये ह्या विषारी अंजनाचे वर्णन आहे.

१४ विमांसम् : २.२६.१२ मध्ये वर्णिल्याप्रमाणे.

४.११

११ अन्तःपुरप्रधर्षक : अन्तःपुर म्हणजे राजवाडा असा अर्थ असल्यामुळे हा गुन्हा राजकीय स्वरूपाचा आहे, लैंगिक स्वरूपाचा नाही.

१३ अत्वच्छिरःप्रादीपिकम् 'मस्तकाचे कातडे प्रथम सोलून मग मस्तकाला आग लावावी' (भा).

२१ ब्राह्मणमहानसावलेहिनः मे टीपेत हे प्रक्षिप्त मानले आहे. अनुवाद करणाऱ्या याज्ञवल्क्यस्मृतीतसुद्धा याचा निर्देश नाही.

४.१२

४ पितुः अवहीनम् म्हणजे पित्याला मिळावयाचे असलेले शुल्क. ५ प्राकाम्बम् म्हणजे मुख्यतः तिच्याशी लग्न करण्याचा हक्क.

९ ऋतुप्रतिरोधिभिः : 'कर्मभिः' हे नाम अध्याहृत धरावयाचे.

१५-१६ : भा टीकेत ह्या सूत्रांची व्याख्या निराळ्याच प्रकारे केली आहे, 'जिचा विवाह निश्चित झाला आहे (अकुमारी म्हणजे दत्ता) तिला भ्रष्ट केल्यास (भ्रष्ट करणाऱ्याने) चोपन पण दंड आणि नियोजित वराला शुल्क व लग्न जुळविणाऱ्याला (अवस्थाय) खर्चाची रक्कम दिली पाहिजे. तिचा जर नंतर (पश्चात्) दुसऱ्या कोणी स्वीकार केला (कृता) तर दुप्पट दंड दिला पाहिजे.' हा अर्थ स्वीकारणे अति कठीण आहे. अवस्थाय हे अव + स्था धातूचे ल्यबन्त रूप समजणे, त्या शब्दाचा सूत्र १६ च्या प्रारंभी समावेश करणे आणि 'तज्जातम्' (कुमारीभावम् या अर्थी) त्या क्रियापदाचे कर्म समजणे अधिक चांगले. त्याने अर्थ सरळ लागतो.

२८ निष्क्रयानुरूपाम म्हणजे दास्यातून मुक्तता होण्यासाठी भरावयाच्या रकमेची पूर्तता होऊन जी आर्य होऊ घातली आहे अशी पण अद्याप दासी असलेली.

**३० संगृहणीयात् :** याचा अर्थ कडक बंदोबस्तात ठेवावे असा होतो. तिच्या प्रियकराला सुद्धा तसे ठेवावयाचे हे सूत्र ३२ वरून स्पष्ट आहे. **३४ अभिहरतः** मूळ शब्द 'अभिव्याहरतः' (म्हणणारा) असण्याची शक्यता आहे. जारापेक्षा चोराला शिक्षा कमी आहे म्हणून कोणी असे सांगण्याची शक्यता आहे.

**३५ स्त्रीवचनात् :** म्हणजे त्या स्त्रीच्या कबुलीवरून असा अर्थही शक्य आहे.

**३८-४० :** ह्या तीन श्लोकांत आधीच्या दोन गद्य सूत्रांतील (३६-३७) मजकूर शब्दशः पुनरुक्त झाला आहे. फक्त ह्या पद्य अंशात 'न तु राजप्रतापेन प्रमुक्तां स्वजनेन वा' एवढे अधिक आहे. हे श्लोक मूळचे व अगोदरचा गद्य भाग त्यावरून संक्षिप्त केलेला हे संभवनीय आहे.

४.१३

**१ अभक्ष्यम् :** स्मृतिग्रंथांतील अभक्ष्याहून हे भिन्न आहे. ह्या निषिद्धतेचा धार्मिकतेशी काही संबंध नाही.

**८ ग्रामस्वामी :** हा इतरत्र निर्दिष्ट केलेल्या ग्रामिकाहून भिन्न नसावा. **१० चोररज्जुक** म्हणजे जंगलात चोरांना पकडण्यासाठी नेमलेला अधिकारी. २.६.३ पहा.

**२५ प्राप्तव्यवहारो वा याता :** हे शब्द अनावश्यक आहेत. ते एखाद्या टीकेतून आलेले दिसतात.

**३६ प्रव्रजिता :** २.२३.२ प्रमाणे येथेही घर सोडून गेलेली स्त्री हा अर्थ अधिक संभाव्य आहे.

५

ह्या अधिकरणातील गुप्त व्यवहार (योगवृत्त) पहिल्या व अंशतः दुसऱ्या अध्यायात राजाचा आणि शेवटच्या अध्यायात (६ व्या) प्रधान अमात्याचा आहे. अध्याय ४ व ५ मध्ये फारशी गुप्तता नाही आणि अध्याय ३ मध्ये तर मुळीच नाही. **भा** टीकेत म्हटले आहे की योगवृत्त हे नाव फक्त पहिल्या अध्यायालाच उचित आहे. परंतु तो ह्या अधिकरणातील सर्वात महत्वाचा अध्याय असल्यामुळे त्याचे नाव संपूर्ण अधिकरणाला दिले आहे.

५.१

**२ राज्य** म्हणजे राजाचे शासन. ८.२.१ पहावे.

**४ दूष्य** म्हणजे राजाचा द्रोह करणारे व त्याचे राज्य उलथून पाडण्याचे मनसुबे रचीत असलेले.

**१९ संवास्य** (सम् + वस् एकत्र रहाणे ह्या धातूपासून) म्हणजे विश्वास संपादन करून.

**२० आप्य** म्हणजे नातेवाईक, 'आप्त' शी समानार्थक. १.१२.१ पहावे.

**२१ सार्थातिवाह्य** म्हणजे व्यापारी मार्ग. त्यावर व्यापाऱ्यांच्या रक्षणासाठी द्यावयाचे रक्षक व त्यासाठी करावयाची आकारणी हा नेहमीचा अर्थ येथे अभिप्रेत नाही. **प्रत्यादेय :** ९.४.५-६ पहावे.

**३३ कूट** म्हणजे शिंगे मोडलेला बैल. **प्राशन** 'स्मशानात यज्ञाच्या अग्नीत होम करून उरलेले खाणे' (भा). **३४ लोहमुसलैः** अमानुष शक्तींनी घात झाला आहे असे भासविण्यासाठी.

**४७ आवेशनिक** 'घरात येऊन रहाणारा' पाहुणा.

**५३ दण्डोपनतः** 'आपले सैन्य अर्पण करून शरण आलेला' मांडलिक राजा. ७.३.२३-२६ पहावे.

५.२

**२ अदेवमातृकम् :** उत्कृष्ट जनपदाचे हे एक लक्षण आहे. ६.१.८ पहावे. **अंशं याचेत :** हा नेहमीचा एक-षष्ठांश भागरूपी कर नाही हे स्पष्ट आहे. ही लेव्हीच्या स्वरूपाची मागणी आहे. **३ प्रत्यन्तम् :** सरहद्दीवरील लोक लेव्ही देण्यास तयार नसल्यास शत्रूला जाऊन मिळण्याची शक्यता असते.

**१० कटभङ्ग :** हाताने तोडलेले धान्य.

**१६ प्रणय :** म्हणजे विशेष कारणासाठी प्रजाजनांकडे केलेली मागणी. जुनागढ येथील रुद्रदामाच्या शिलालेखात हा शब्द याच अर्थी वापरला आहे.

**१७ पञ्चाशत्कराः** म्हणजे पन्नास पण खास कर देणारे. 'नफ्याचा एक-पन्नासांश भाग कर म्हणून देणारे' (मे). पण येथे नफा अथवा भाग यांचा निर्देश नाही. त्या वस्तूंचा एक-पन्नासांश भाग असेही समजता येणार नाही. मनुस्मृति, ७.१३० प्रमाणे येथे नेहमीच्या कराचा निर्देश नसून प्रणयाचा म्हणजे विशेष प्रसंगी करावयाच्या मागणीचा निर्देश आहे हे लक्षात ठेवले पाहिजे.

**२८ बन्धकीपोषकाः** सूत्र २१ मध्ये हे लोक आपल्या कमाईतून देतात, ह्या सूत्रात ते दुसऱ्यांच्या द्वारा कोशात भर घालतात.

**५७ अर्थकामुकः** ही मुळातील 'इत्थं कामुकः' ची मे टीपेला अनुसरून केलेली दुरुस्ती आहे. सूत्र ५५ मध्ये कामुकत्व मुळीच नाही आणि सूत्र ५६ मध्येही साक्षात कामुकत्व अभिप्रेत नाही.

**६१ एकरूपम् :** हे नाणे खोटे असावे (मे). **६३ गृह्येत :** खोटे नाणे वापरल्याबद्दल अटक होते ही शक्यता आहे. परंतु जादुटोणा वगैरे करणे हा मोठा गुन्हा मानला असल्यामुळे (४.४. १४-१६) त्यासाठी सामुग्री विकत घेतो म्हणूनही अटक होण्याची संभाव्यता आहे.

**६५ संसिद्धम्** हे 'अभित्यक्तम्' चे विशेषण, 'वधाच्या शिक्षेची वेळ आली आहे असा' या अर्थी.

५.३

**१ भृत्यलाभ** म्हणजे नोकरांना मिळावयाचे वेतन. **२ शरीर** म्हणजे 'आयशरीर'. २.६. १-९ पहावे.

**४ अनास्पद्यत्वम् :** 'आस्पद' होणे म्हणजे शत्रूच्या कारवायांना बळी पडणे. १.१३.२१ यातील 'परेषामास्पदभयात्' पहावे.

**८ परिबन्ध** म्हणजे भोवतालची माणसे, परिवार.

**१७ माणवक :** अध्याय ४.५ मध्ये हे दरोडेखोरांसारखे गुन्हेगार म्हणून निर्दिष्ट आहेत. येथे ते सरकारी नोकरीत असल्याचे दिसते.

**२० राजा :** श्रौतसूत्रांनुसार राजा दीर्घकालीन यागात गुंतला असता त्याचे काम अध्वर्यू पहातो. त्या वेळेपुरता तो 'राजा' असतो.

**२३ ग्रामभृतक** 'धोबी, न्हावी इत्यादी' (भा).

**२५ विक्षेप** म्हणजे रजा देणे, कामावरून दूर करणे असा अर्थ.

**३४** याचा अर्थ असा की ज्या खालच्या नोकरांना (सूत्र १७ प्रमाणे) वर्षाचे साठ पण वेतन ठरविले आहे त्यांना रोजचा एक आढक (चार प्रस्थ) एवढा शिधा द्यावा. त्यांच्या वेतनातून ह्या शिध्याची किंमत कापून घ्यावी असे अपेक्षित दिसते. कारण अन्यत्र (उदा० २.२४.२८) जेथे भक्त व वेतन ह्या दोहोंचा निर्देश आहे तेथे भक्त वगळता फक्त सव्वापण मासिक वेतनाचा निर्देश आहे. आणि हे भक्त सर्व सरकारी नोकरांना (मोठ्या पगारदारांना सुद्धा) ह्याच

प्रमाणात द्यावयाचे असे समजणे मुळीच शक्य नाही. मात्र असे समजणे शक्य आहे की इतरांनाही शिधा द्यावयाचा झाला तर तो एक आढकाची जी किंमत असेल तेवढ्या किमतीचाच (हिरण्यानुरूपम्) द्यावा.

३५–४४ आणि ४७ ही सूत्रे ह्या अध्यायात अस्थानी आहेत. ३७, ३९ व ४० ही आयुधागाराध्यक्षावरील अध्यायात (२.१८) समाविष्ट करणे उचित झाले असते.

४३ **यात्राकाले** : याचा अन्वय 'दद्यु:' शी आहे, 'द्विगुणप्रत्यादेयानि 'शी नाही. ४४ **वेतनप्रत्यादानम्** : जी ज्यादा किंमत आकारली होती तिच्या रूपात वेतन परत मिळते.

४६ **-विकल्पः** मूळ पाठ '-कल्पः' असावा. भक्तवेतनासंबंधी नियम असा अर्थ.

५.४

१ आत्मगुणसंपत्तीचे वर्णन ६.१. ३–६ येथे आहे, द्रव्यप्रकृतिसंपत्तीचे ६.१. ८–११ येथे. २ आभिगामिक गुणांची यादी ६.१.३ मध्ये आहे.

४ **समर्थम्** कार्यसिद्धी करून देण्यास समर्थ असे. 'असंबद्ध नसलेले' (भा).

८ **आदिष्टः** ह्याच्या जागी 'आयुक्तः' हा शब्द अपेक्षित आहे. **भा** टीकेतील 'आयुक्तप्रदिष्टायाम्' ह्या पाठावरून 'आयुक्तः प्रदिष्टायाम्' असाच मूळ पाठ होता असे समजण्यास हरकत नाही. **परासनम्** : **भा** टीकेत हा शब्द पुढील सूत्राच्या प्रारंभी असून 'दुसऱ्या कोणासाठी निर्धारित केलेले आसन' याअर्थी त्याचा अन्वय 'न कुर्यात्'शी लावला आहे.

१३ ह्या श्लोकाचा उत्तरार्ध व पुढील श्लोकाचा पूर्वार्ध मिळून झालेला श्लोक दंडीच्या दशकुमारचरितात उद्धृत केला आहे. तसा श्लोक अधिक समर्पक. येथे थोडी उलथापालथ झाली असल्याची शक्यता आहे.

५.५

२ **आभ्यन्तर** म्हणजे नगरामधील गोष्टीविषयी आणि **बाह्य** म्हणजे बाहेरच्या जनपदातील गोष्टीविषयी. ९.५ पहावे.

३ **नैनमनुवर्तेत** ही 'चैवानु-' किंवा 'चैवमनु-' ची केलेली दुरुस्ती आहे. व्यसनाला उत्तेजन द्यावे अशी कल्पना अभिप्रेत असण्याची शक्यता नाही. पुढील सूत्रातील विधानाशी ते विरुद्ध होईल.

९ **प्रतिदोषनिन्दा** : हा शब्द मूळ नसावा. पुढील शब्दातील 'प्रति' नंतर मागील शब्दातील 'दोषनिन्दा' ची पुनरुक्ती होऊन तो बनला आहे.

११ **अयमुच्चैः सिञ्चति** : नेहमी खाली पाणी घालीत असता अकस्मात वर (किंवा वरून) घातले तर काहीतरी कोठेतरी बिघडले आहे व त्याचा ठपका आपल्यावर येईल ह्या भीतीने मंत्री गुपचुप निघून गेला. **कणिङ्को भारद्वाजः** हा मंत्री अन्यत्र अनेक ठिकाणी निर्दिष्ट केलेला आचार्य भारद्वाज असण्याची शक्यता आहे. **तृणम् इति** जेथे गवत असायला नको तेथे ते दिसले तर काही तरी घोटाळा झाला असल्याची शंका येऊन. **शीता शाटी** वस्त्र ओले असणे ही गोष्ट अनपेक्षित होती. **रथाश्वं प्राशंसीत्** : राजाने रथाची स्तुती करणे म्हणजे निघून जाण्याची अप्रत्यक्ष सूचना असा विचार करून. **पिशुन** हा सुद्धा ग्रंथात अन्यत्र निर्देशिलेला आचार्य पिशुन असण्याची शक्यता आहे.

१५ **जीवे** : 'जीव' शब्दाचा ह्या ठिकाणी विशेषणासारखा उपयोग केला आहे.

५.६

१ **राजव्यसनम्** : हे राजाच्या लवकरच होणाऱ्या अथवा झालेल्या मृत्यूच्या स्वरूपाचे संकट आहे.

१० सामन्त 'शेजारचा राजा' हा मांडलीक असण्याचीही शक्यता आहे. सामान्यतः शेजारचा राजा हा शत्रू असतो.

**२४ नैवम् इति भारद्वाजः** : भारद्वाज हा आचार्य कौटिल्याच्या पूर्वी होऊन गेला असता त्याने मागच्या सूत्रांत प्रदर्शित केलेल्या कौटिल्याच्या मतावर आक्षेप घेतल्याचे दाखविले आहे ते कसे ? याचे उत्तर असे असावे की, 'नैवमिति भारद्वाजः' हे शब्द त्याच्या मताला उठाव आणण्यासाठी कौटिल्यानेच वापरले आहेत, 'नैवम्' असे भारद्वाजाने स्वतः म्हटलेले नाही. दुसरे असे उत्तर देता येईल की कौटिल्याचे स्वतःचे असे विधान फक्त सूत्र २३ मध्ये आहे. अगोदरच्या बावीस सूत्रांतील विवरण प्राचीन आचार्यांच्या ग्रंथांतून उद्धृत केलेले आहे आणि 'नैवम्' मधील भारद्वाजाचा आक्षेप त्या प्राचीन आचार्यांच्या मतावर आहे, कौटिल्याच्या (समारोपादाखल केलेल्या) विधानावर नाही.

**४० कन्यायाम्** : एकही राजपुत्र नसेल तेव्हाची ही गोष्ट. **४१ मातुः** म्हणजे ह्या राजकन्येचे. **अल्पसत्त्वम्** : राजकन्येला फूस लावून काही गोंधळ माजवू नये या उद्देशाने असा मनुष्य तिच्या दिमतीला ठेवायचा. **४२ ऋतौ रक्षेत्** : तिला दुसरे अपत्य होऊ नये या उद्देशाने.

**४६ सार** म्हणजे उत्तम प्रतीचे, कर्तबगार. **परिग्रह** म्हणजे अनुयायी, नोकर.

## ६

मण्डलयोनि असे ह्या अधिकरणाचे नाव आहे. त्याचा दोन प्रकारे अर्थ करता येतो. कर्मधारय समासात मंडल (म्हणजे राजमंडल) हेच (षाड्गुण्याचे अथवा परराष्ट्रसंबंधाचे) मूळ याप्रमाणे (भा). किंवा राजमंडलाचे मूळ म्हणजे त्याच्या प्रकृती याप्रमाणे षष्ठी तत्पुरुष समासात.

## ६.१

**३ शक्यसामन्तः** : शक्य म्हणजे दुर्बल असा अर्थ ७.१०.९–१० वरून स्पष्ट आहे.

**६ स्ववग्रहः** म्हणजे ताब्यात ठेवण्यास सोपा. प्रस्तुत संदर्भात दुसऱ्याचे ऐकून घेणारा, मार्गदर्शन करण्यास सुलभ. **दृष्ट** म्हणजे शास्त्रदृष्ट (भा). **संधिविक्रम-** इ० : ह्या समासात परस्परविरुद्ध अर्थ असलेल्या शब्दांच्या तीन जोडया आहेत. प्रत्येक जोडीतील कोणत्या पर्यायाचा अवलंब करावयाचा ते ठरविणे म्हणजे **विभाग** (मे), तो करण्यास समर्थ. **त्याग** म्हणजे देणे व **संयम** म्हणजे राखून ठेवणे, न देणे. **पण** म्हणजे तहाच्या अटी, त्या पाळणे आणि **परच्छिद्र** म्हणजे शत्रूचे मर्मस्थान सापडले असता (तहाला न जुमानता) त्याच्यावर हल्ला करणे.

**८ श्रेणी** म्हणजे व्यापाऱ्यांचे संघ. ते बलवान होऊन प्रजेला तापदायक होण्याचा संभव असतो म्हणून ते जनपदात नकोत. श्रेणी म्हणजे श्रेणीबल असा अर्थही शक्य आहे. ते सैन्य सुद्धा जनपदात उपद्रवकारक होण्याचा संभव असतो.

**११ भृत** म्हणजे भृतबल, पगारी सैन्य. **अविसंवादितः** म्हणजे ज्याच्या अपेक्षा पूर्ण झाल्या आहेत असा. **अद्वैध्यः** स्वतःचे स्वतंत्र असे दुसरे काही उद्दिष्ट नसलेला.

**१३ अगतिः** 'ज्याचा उच्छेद होत असता कोणी मदतीस धावून येत नाही असा' (भा).

१५ 'उक्ताः' चा अन्वय प्रथमार्धाशी लावावयाचा आणि उत्तरार्धातील अवशिष्ट वाक्यात ताः (प्रकृतयः) हा कर्ता व राजसंपदः प्रत्यङ्गभूताः हे विधेय असे समजावयाचे. याचा अर्थ असा की इतर प्रकृती राजाच्या अंगच्या गुणांच्या उत्कृष्टतेवर अवलंबून असतात. 'प्रकृताः' हे 'ताः' चे विशेषण. प्रकृति शब्दातील धातूचे हे **रूप** प्रकृतयः ह्याअर्थी वापरलेले दिसते. प्रकृ म्हणजे कार्यप्रवण होणे, व्यापृत होणे.

**१७ चातुरन्तः** १.६.४ पहावे.

६.२

९ **अय** म्हणजे सुदैव आणि **अनय** म्हणजे दुर्दैव हे अर्थ अप्रसिद्ध आहेत.

२२ **अरिविजिगीषुमध्यानां बहिः प्रकृतिभ्यो बलवत्तरः मे** भाषांतरात बहिःप्रकृति म्हणजे बाह्यप्रकृति असे समजून अर्थ केला आहे. अन्वयाला ते सुगम आहे व बाह्य प्रकृती म्हणजे द्रव्यप्रकृती असे समजणे शक्य आहे. परंतु तशा प्रकारचा निर्देश अन्यत्र कोठे नसल्यामुळे 'बहिः' स्वतंत्रपणेच समजणे अधिक चांगले.

२४ राजमंडलाची ही निराळ्या स्वरूपाची व्यवस्था आहे. ग्रंथात पुढे पहिल्या प्रकारच्या व्यवस्थेचाच उपयोग केला आहे. पार्ष्णिग्राह, आक्रन्द व आसार यांचा अनेक ठिकाणी निर्देश आहे, मध्यम व उदासीन यांच्या मित्राचा क्वचितच, मित्रमित्राचा कोठेच नाही.

२८ **द्वादश** इ० : दोन्ही प्रकारच्या व्यवस्थेला हे लागू आहे.

३६ **आनन्तर्येण** म्हणजे सात प्रकृतींच्या निर्देशात (६.१.१) जी प्रकृती स्वामीच्या अधिक जवळ असेल तिला प्रथम या क्रमाने त्यांना शक्तिसंपन्न करावे.

३८ **बलवान् वा. . . मार्मुच्छिन्द्यात्** यात शत्रूच्या मनातील विचार त्याच्याच शब्दांत निर्दिष्ट झाले आहेत. त्यांतील 'बलवान् राजा' हा विजिगीषू व शत्रू ह्या दोहोंहून भिन्न, विजिगीषूवर चाल करून येण्याचा संभव असलेला, आणि त्यांतील 'शत्रुम्' मध्ये विजिगीषूचा निर्देश अभिप्रेत आहे. **मध्यमलिप्सायाम् :** म्हणजे जेव्हा विजिगीषूला मध्यम राजावर आपले वर्चस्व प्रस्थापित करावयाचे असेल तेव्हा. त्यासाठी त्याला शत्रूच्या साह्याची आवश्यकता पडेल, म्हणून तो बलवान व्हावा अशी इच्छा करण्यास हरकत नाही.

७

**गुण** म्हणजे इतर राष्ट्रांशी संबंध ठेवताना अवलंबावयाचे धोरण. षाड्गुण्य म्हणजे असे सहा प्रकारचे गुण.

७.१

१ **ह्या** विधानामुळे सहाव्या अधिकरणाच्या नावात ('मण्डलमेव योनिः' असा) कर्मधारय समास अभिप्रेत आहेसे वाटेल. परंतु त्या अधिकरणात षाड्गुण्याचा मुळीच निर्देश नसल्यामुळे मंडल हे कशाचे मूळ याचे स्पष्टीकरण त्या अधिकरणात होत नाही.

९ **द्वैधीभाव : मे** टीपेत द्वैधीभाव म्हणजे दुटप्पी वर्तन, एका राजाबरोबर तह करून मग त्याच्यावरच हल्ला करणे असा अर्थ केला आहे. प्रस्तुत ग्रंथात तो अर्थ कोठेही अभिप्रेत असल्याचे दिसत नाही.

३१ **विभाषितम्** 'विशेष असे काही सांगितलेले' (भा), '(व्याकरणातल्या विभाषावरून) वैकल्पिक' (मे). 'ज्याबद्दल वाद आहे ते' असा अर्थही संभाव्य आहे.

७.२

२ **प्रत्यवाय** हे स्वतंत्र, चौथे कारण समजणे चांगले.

६ **सामन्तः** हा शेजारचा शत्रू राजा बलवान होऊन त्याने विजिगीषूवर हल्ला केलेला असतो, म्हणून त्याला कोणाचा तरी आसरा शोधावा लागतो.

१३ **अन्तर्धिः :** ह्याची व्याख्या ७.१३.२५ मध्ये केली आहे. हा राजा दुर्बल असून तो दोन राजांच्या मध्ये असतो. बलवान राजा आक्रमण करून येत असता त्याला तो प्रतिबंध करू शकतो (प्रतिघातो बलवतः). ज्याच्यावर हे आक्रमण संभाव्य असेल त्याचा तो अन्तर्धि (त्याच्या संरक्षणाच्या आघाडीची फळी तो उभी करतो म्हणून). **उभौ वा** हे पुढील सूत्राच्या प्रारंभी **भा** टीकेला अनुसरून घेतले आहे.

**१८ संधिविक्रमहेतुभिः** हा **भा** टीकेतील पाठ आहे. पुढे सातव्या अध्यायात द्वैधीभावाचा अवलंब करताना संधि केव्हा करावा आणि युद्ध केव्हा करावे याचे विस्तृत विवेचन आहे. त्याचा हा निर्देश आहे. हस्तलिखितांतील 'संधिविग्रहक्रम-' ह्या पाठात 'ग्रह' हा अंश चुकीने आला आहे.

**२४ भूयांस्यतिशक्तिमन्ति** ही मुळातील 'भूयांसीति शक्तिमन्ति' ह्या पाठाची **मे** टीपेला अनुसरून केलेली दुरुस्ती आहे. त्या पाठातील 'इति' निरर्थक आहे. कदाचित 'भूयांसि शक्तिमन्ति वा' असाच मूळ पाठ असावा.

२५ पूर्वार्धात 'आश्रयणीयः' हे विधेय अध्याहृत धरावयाचे.

**७.३**

**१३ अपचरित** म्हणजे असंतुष्ट होऊन राजाविरुद्ध कारवाई करण्यास सिद्ध असलेले. **प्रत्यादानभयात् :** जोपर्यंत त्या दोघात संधि आहे तोपर्यंत ते दुर्बल राजाला जाऊन मिळत नाहीत. कारण त्यांचा बलवान राजा स्वारी करून त्यांना पकडून नेईल व शिक्षा करील ही भीती असते. पण दोघात विग्रह असला तर ते उघडपणे दुर्बल राजाकडे जाऊन त्याची बाजू मजबूत करू शकतील.

२४ **भा** टीकेत 'आत्मरक्षण' हे या संधीचे नाव असल्याचे म्हटलेले दिसते.

**२६ मुख्यस्त्रीबन्धनम्** म्हणजे त्याच्या सैन्यातील मुख्य अधिकारी व बलवान राजाच्या राज्यातील स्त्रिया यांच्यात विवाहसंबंध.

**२७ स्कन्धोपनेयः** 'स्कन्ध' हा शब्द शाखा, फांदी या अर्थाचा असून तो द्यावयाच्या खंडणीचा ('अत्यय'चा) हप्ता या अर्थी वापरलेला दिसतो.

**३५ पूर्वा पश्चिमौ :** सप्तमी विभक्ती अपेक्षित आहे.

**७.४**

**१ व्याख्यातम्** हे 'व्याख्यातव्यम्' च्या अर्थी वापरले आहे.

३ म्हणजे हीनबल असता स्थान, समबल असता आसन असा भेद दिसतो.

**५ आसीत** यात स्वतःची शक्ती वृद्धिगत करीत रहाण्याचे प्रयत्न अभिप्रेत आहेत.

**७ नेतरम् :** 'नेतरथा' असा मूळ पाठ असण्याचा संभव आहे. **मित्रं मित्रभावि :** ह्याचे वर्णन पुढे ७.९.४३ मध्ये केले आहे. **प्रतापार्थम्** म्हणजे स्वतःच्या शक्तीचे प्रदर्शन करण्यासाठी. ८ आचार्यांचा हा आक्षेप फक्त शेवटच्या प्रसंगी ('सर्वसंदोहेन' इ०) विग्रह करण्यावर आहे, सर्व प्रसंगी नाही.

१३ **भा** टीकेत म्हटले आहे की विगृह्यासनमध्ये शत्रूच्या कार्यांचा विध्वंस व आपल्या कार्यांची सिद्धी या दोन गोष्टी करावयाच्या असतात, संधायासनमध्ये फक्त आपल्या स्वतःच्या कार्यांची सिद्धी.

**१४ सर्वसन्दोहवर्जम् :** म्हणजे त्या प्रसंगी विगृह्य आसनच करावे.

**१६ आसारम् :** शत्रूच्या दृष्टीने हा त्याचा आक्रन्द व विजिगीषूच्या दृष्टीने अरिमित्र. परंतु आसार ही संज्ञा मदतीला जाणाऱ्या कोणत्याही राजाला लावली जाते.

**१७ एकहार्यम्** म्हणजे मित्राची वगैरे मदत न घेता मिळण्यासारखे. यामुळे मिळालेल्या लाभात कोणी वाटेकरी होण्याचा प्रश्न नसतो.

**१८ संधाय यायात् :** यात निश्चित दुटप्पीपणा व फसवणूक आहे.

२२ द्वितीयार्धात मध्यम मार्गाचा निर्देश असण्याचा संभव आहे.

७.५

**१४ अनुरागे सार्वगुण्यम् :** ही एक प्रकारची म्हण असावी.

**३९ पार्ष्णिग्रहणे :** ही पिछाडी विजिगीषूची. तिच्यावर हल्ला करण्यास समर्थ असलेल्या राजाशी एकजूट करून त्याला स्वारीवर बरोबर नेले म्हणजे पिछाडीवरील हल्ल्याची भीती रहात नाही. ज्याच्यावर स्वारी करावयाची त्याची पिछाडी समजणे शक्य आहे. परंतु त्याचे पार्ष्णिग्रहण करणे म्हणजे विजिगीषूला मदत करणे होय, आणि त्याचा 'यात्रासाहाय्यदाने' मध्ये अंतर्भाव होत असल्यामुळे त्याचा स्वतंत्र निर्देश केला असणे संभवनीय नाही.

**४२ भेदोपग्रहं चोपगन्तुम् :** दुष्ट झालेल्या सामवायिकांमुळे तिथांत जी फूट पडली असती तिचे निवारण त्याचे दमन केल्यास सोपे होते, असा अर्थ अभिप्रेत असावा.

**४६ सत्त्र** म्हणजे गुप्तपणे हल्ला करण्यास योग्य अशी अडचणीची जागा अथवा प्रसंग. १०.३.२४ पहावे.

७.६

**३ वैषम्ये** 'विजिगीषूला अधिक लाभ होऊन तो बलवत्तर झाला तर' (भा). याला सूत्र १२ तील विधानाने दुजोरा मिळतो. अरीला अधिक लाभ झाला तर, असे समजणेही शक्य आहे.

**८ वीवध** म्हणजे धान्य, माणसे वगैरेचा स्वदेशातून होणारा पुरवठा. **अन्यभावदेशीय** म्हणजे ज्या देशातील रहिवाशी परकीयांबद्दल शत्रुत्वाची भावना बाळगून असतात असा देश.

**१४–१५ :** हा अंश मूळ नसावा. प्रस्तुत अध्यायातील विषयांशी तो असंबद्ध आहे. त्यात तहाचा कोठ निर्देश नाही. ७.४.१६ मधील विगृह्य यानाची परिस्थिती त्यात निर्दिष्ट झालेली दिसते.

**२१ दूष्यातिसंधानेन :** आपल्या दूष्य अधिकाऱ्यांना शत्रूशी संधान बांधण्यास प्रोत्साहन देऊन त्या कारस्थानाला शत्रू बळी पडला म्हणजे, शत्रू संधी करण्यास पात्र नाही असे म्हणता येते.

**२८ शत्रुसंहिताद्वा परस्मात् :** शत्रु म्हणजे ह्या जाऊन परत येणाऱ्याचा शत्रू, त्याच्याशी, ज्याच्याकडे तो गेला होता त्या विजिगीषूच्या शत्रूने तह केला म्हणून भीती वाटून तो विजि-गीषूकडे परत येणे शक्य आहे.

**३६ परसंधेयकारणात् :** विजिगीषूला शत्रूशी संधी करणे आवश्यक वाटले तर त्यावेळी ज्याची निष्ठा सिद्ध झाली आहे त्यालासुद्धा शत्रूच्या मागणीवरून त्याच्या स्वाधीन करण्यास हरकत नाही. असा त्याचा बळी देणे म्हणजे त्याचा विक्रय.

**३७ आयत्यर्थम्** म्हणजे भविष्यकाळी आपल्या सुरक्षिततेला बाध येऊ नये ह्या उद्देशाने.

**३९** 'प्लक्षबीजाशः कपोतः' असे प्रथमा विभक्तीत पाहिजे होते. वाक्यातील विधेयाला तोच कर्ता संभाव्य आहे.

**४१ एकत्र त्यागघातौ :** अध्याय १०.३ मध्ये वर्णन केलेल्या कूटयुद्धाच्या कित्येक प्रकारांत माघार घेतल्याची हूल दाखवून परत उलटून जोरदार हल्ला करण्याचा प्रकार आहे. त्याचा हा निर्देश आहे. **त्याग** म्हणजे माघार घेणे.

७.७

१ प्रस्तुत संदर्भात **उपग्रह** म्हणजे मदत घेणे असा अर्थ आहे, मदत करणे असा नाही.

**१६ बलसमेन** ही मुळातील 'समबलेन' ची केलेली दुरुस्ती आवश्यक आहे. 'समबल' हे लाभाचे विशेषण होऊ शकत नाही. त्याचप्रमाणे सूत्र १८ मध्ये 'बलसमात्' अशी दुरुस्ती केली आहे.

२२ **भूयो याचेत :** एकदा त्याच्याकडून सैन्याच्या मोबदल्यात लाभ मिळाल्यावर पुन्हा त्याच्याकडेच आणखी सैन्याच्या मोबदल्यात लाभाची मागणी करावी. २३ **परदण्ड** म्हणजे ज्याला अधिक लाभ देऊन त्याचे सैन्य मिळविले आहे त्याचे ते सैन्य.

७.८

१ **संधिकारणम् :** यातव्य राजाचे राज्य जिंकून ते आपसात वाटून घ्यावे हेच त्या राजांची एकजूट होण्याचे कारण. त्यांच्यातील संधीने ही एकजूट झालेली असते. **आदातुकामः** याचे स्पष्टीकरण सूत्र २–३ मध्ये आहे आणि **विहन्तुकामः** याचे सूत्र ४ मध्ये (न). २ **पणमानः** हा न टीकेतील पाठ 'प्रपणितः' च्या जागी आवश्यक आहे.

५-१० : ही सूत्रे येथे अस्थानी आहेत, त्यांचे स्थान मागील अध्यायात (७.७ मध्ये) आहे. त्यांत लाभाच्या स्वीकार्यास्वीकार्यतेचा विचार आहे. प्रस्तुत अध्यायातील पहिले प्रकरण (यातव्यवृत्तिः) पहिल्या चार सूत्रांतच संपुष्टात येते, आणि दुसरे प्रकरण सूत्र ११ पासून सुरू होते. ६ **अर्थानुबन्धम्** हे 'मित्रोपकारम्' व 'अमित्रोपघातम्' यांचे विशेषण. **कारयितुकामः** याचे 'उपकारम्' हे कर्म अध्याहृत धरावयाचे व 'भूयः' चा त्याच्याशी अन्वय लावावयाचा.

१२ **आरभते :** 'आरभेत' च्या जागी हा पाठ न टीकेतून घेतला आहे. १६ **प्रतिलोमाः** ('प्रतिलोमे' च्या जागी) हा पाठही न टीकेतील आहे.

२७ **प्रहितः** ही मुळातील 'प्रतिहतः' ची केलेली दुरुस्ती आहे. प्रतिहत झालेले सैन्य तो अर्थ व दुसराही काही अर्थ साध्य करू शकेल हे संभाव्य नाही.

३४ हा श्लोक वस्तुतः मागच्या (७.७) अध्यायातील विषयाच्या समारोपादाखल आहे. तथापि, ह्या अध्यायातील दुसऱ्या प्रकरणाचा विषय (मित्राला सैन्याची मदत देणे) त्या विषयाचाच भाग आहे असे समजता येईल.

७.९

४ दोघे निरनिराळ्या राजांना मित्र करू पहातात, दोघेही एकाच राजाला नाही अशी कल्पना आहे. अशा कल्पिलेल्या प्रसंगांच्या आधारेच येथील विवेचन केले आहे. परंतु त्यामुळे विवेचन असंबद्ध झाले आहे असे मुळीच नाही. सूक्ष्म विवेचन करण्यास ही पद्धती उपयुक्त म्हणून तिचा अवलंब केला आहे इतकेच.

२१ **प्रकृष्टभौमम् :** 'ज्याचा देश फार दूर आहे असा'. ७.६.८ पहावे. प्रकृष्ट म्हणजे विस्तृत (मे).

२२ **विक्षिप्तसैन्यम्** म्हणजे ज्याच्या सैन्यातील सैनिकांना रजा देऊन घरी पाठविण्यात आले आहे असा मित्र.

३१ **गतिमत्त्वात् :** हा न टीकेतील पाठ आहे. 'मतिमत्त्वात्' असा हस्तलिखितांत पाठ आहे. द्रव्य आणि मतिमत्त्व यांच्यात काही संबंध नाही.

३७–४९ : हा संपूर्ण अंश मूळ नसून एखाद्या टीकेतून आलेला असण्याचा दाट संभव आहे. मित्राच्या संबंधात वापरलेल्या विशेषणांच्या व्याख्या त्यात दिल्या आहेत. अशा व्याख्यांची मुळीच आवश्यकता नाही. 'तत्रैतद्भवति' ने सुरू होणाऱ्या ७.६. १४–१५ प्रमाणेच हा अंशही संशयास्पद आहे.

३८ : ६.१.१२ मध्ये ह्या सहा गुणांचा निर्देश आलेलाच आहे.

४० : ह्या संज्ञांचे स्पष्टीकरण ७.१६. १०–१५ येथे आहे.

**४३ एकार्थेनाथ संबद्धम् :** ही दुरुस्ती आहे. हस्तलिखितांत 'एकार्थेनार्थसंबन्धम्' आणि न टीकेत 'एकार्थानर्थसंबन्धम्' असे पाठ आहेत. पहिल्यात 'अर्थ' शब्दाची पुनरुक्ती आहे, दुसऱ्यातील 'अनर्थ' संभाव्य नाही. ७.८.२३, ९.२.१७ पहावे.

**४४ : न** टीकेला अनुसरून 'मित्रभावात्' च्या पूर्वी 'असाधारणात्' अध्याहृत धरले आहे आणि 'शत्रुसाधारणात्' नंतर 'मित्रभावात्' अध्याहृत धरले आहे.

**४५ अर्न्तार्धितां गतम् :** 'अर्न्तार्धि' साठी ७.१३.२५ पहावे.

**४६ पूज्यं संबद्धम् :** ही दुरुस्ती आहे. 'पूज्यं संबन्धम्' हा हस्तलिखितातील आणि 'पूज्यसंबन्धम्' असा **न** टीकेतील पाठ आहे.

**४७ प्रकृष्ट**– वर सूत्र २१ पहावे.

**५०–५२ :** हे हिरण्यसंधीबिषयी आहे.

## ७.१०

**१ भूमिम् :** दोघेही तीच भूमी प्राप्त करू इच्छितात असे नाही. ७.९.४ टीप पहावी.

**१६ म्लेच्छाटवीभि :** 'म्लेच्छ' हे 'अटवी' चे विशेषण.

**१८ अभिसारयितुम् :** 'अभि-सृ' म्हणजे मदतीस जाणे. त्याच्या प्रयोजकाचे रूप.

**३० पारयितव्यम् :** ही मुळातील 'पातव्यम्' ची केलेली दुरुस्ती आहे. पातव्यम् म्हणजे 'प्यावे लागते' किंवा 'रक्षण करावे लागते' ह्या दोन्ही अर्थी तो शब्द उपपन्न नाही. पाणी सैन्यानिशी पार करावयाचे ही अडचण समुचितच आहे.

**३७ खातेन शस्त्रेण च :** ह्या दोन्ही गोष्टी त्यांना लागतात ही त्यांच्या दृष्टीने अडचण. युद्धात खंदक खणायला वेळ मिळेलच असे नाही.

## ७.११

**२ प्रत्युपस्थितार्थः** लोकवस्ती वाढून फार दाटी झाली तर काही लोकांना हलविण्यासाठी नवीन वसाहत स्थापण्याची आवश्यकता उत्पन्न होते.

**३ स्थलम्:** 'फक्त पावसाच्या पाण्यावर अवलंबून असलेली' (न). **औदकम्** 'वहाते पाणी असलेल्या नदीने युक्त' (न).

**१०–१७ :** खाणी, वन व व्यापारी मार्ग यांचा येथील निर्देश त्यांनी युक्त असलेल्या प्रदेशाच्या गुणवत्तेच्या दृष्टीने केला आहे. त्यांच्या स्वतःच्या गुणवत्तेचा विचार पुढे ७.१२.६–२८ यांत केला आहे.

**२६ पूर्वमेव क्रेतारं पणेत :** वसाहत करण्यास योग्य असा आपला प्रदेश निर्देशिलेल्या राजांपैकी कोणाला तरी विकावा. त्या प्रयत्नात तो राजा डबघाईला आला की तो प्रदेश पुन्हा सहज हस्तगत करता येईल. जर वसाहत स्थापन झालीच नाही तर त्या प्रदेशाबद्दल मिळालेली किंमत हा निव्वळ फायदा होतोच.

**२७ सगन्ध :** १.८.१६ पहावे. प्रस्तुत ठिकाणी राजावर प्रेम करणारे, त्याच्याशी एकनिष्ठ असणारे, असा अर्थ.

## ७.१२

**११ स्कन्ध** म्हणजे सैन्य. त्यापासून 'स्कंन्धावार' सैन्याचे आवार, छावणी हा शब्द आला आहे.

**२१ संयानपथ** म्हणजे भर समुद्रातून जाणारा मार्ग. त्यात नावा एकेकट्या न जाता अनेक नावा मिळून एकत्र जातात (सम् + या)

२९ **कर्मफले** ही मुळातील 'कर्मपथे' ची दुरुस्ती आहे. वरील अनेक सूत्रांत 'पथ' शब्द आलेला असल्यामुळे त्याची येथे चुकीने पुनरावृत्ती झाली आहे.

७.१३

१ संहत्य म्हणजे दोघांच्याही मनात एकच विचार असता – आपापल्या शत्रूच्या पिछाडीवर हल्ला करावयाचा. दोघांची एकजूट अभिप्रेत नाही. प्रत्यक्षात असा प्रसंग क्वचितच संभाव्य आहे. पण विवेचनासाठी अशी कल्पना करणे सोईचे आहे. ह्या सर्व अध्यायांत विजिगीषू व अरी यांच्यातील स्पर्धा गृहीत धरून विवेचन केले आहे.

४ **सक्तचक्रः** विजय प्राप्त करता न आल्यामुळे ज्याचे सैन्य अडकून पडले आहे असा.

९ **प्रतिनिवृत्तः स्थितेन :** ही **मे** भाषांतराला अनुसरून 'प्रतिनिवृत्तस्थितेन' ची केलेली दुरुस्ती अर्थासाठी आवश्यक आहे.

२५ **श्री** टीकेत 'प्रतिघाते' असा पाठ घेऊन 'बलवान राजाचा हल्ला झाल्यास दुर्गात अथवा अटवीत आश्रय असलेला' असा अर्थ केला आहे आणि अन्तर्धि म्हणजे अंतर्धान पावतो तो अशी व्याख्या केली आहे. परंतु पूर्वार्धातील व्याख्येशी (मध्यस्थः) हे विसंगत आहे.

२७ **उपकुर्वाणः** शत्रू असून पार्ष्णिग्रहण केले नाही हा उपकार. **मित्रभावादुत्क्रान्तम्** मित्र असताही पार्ष्णिग्रहण करणारा.

२९ **मन्त्रयुद्ध :** १२.२. १–७ मध्ये मंत्रयुद्धाचा थोडक्यात निर्देश केला आहे.

३७ पुढील श्लोकांत तीन निरनिराळ्या प्रसंगांची कल्पना केली आहे – (१) शत्रूने मित्रावर हल्ला केला असता विजिगीषू त्याच्या पिछाडीवर हल्ला करून त्याचा पार्ष्णिग्राह होतो (३८). (२) विजिगीषू स्वतः शत्रूवर हल्ला करतो (३९–४०). (३) विजिगीषूवर शत्रूचा हल्ला होतो (४१). ह्या तीन परिस्थितींत पार्ष्णिग्राह, आक्रन्द इत्यादी संज्ञा निरनिराळ्या राजांना लागू होतात. उदाहरणार्थ, ४१ मध्ये मित्र व मित्रमित्र ह्या संज्ञा विजिगीषूच्या दृष्टीने वापरल्या आहेत, तर आक्रन्द व पार्ष्णिग्राह ह्या संज्ञा हल्ला करणाऱ्या शत्रूच्या दृष्टीने अनुक्रमे विजिगीषूचा अरिमित्र व मित्र यांना लावल्या आहेत.

७.१४

१ **द्विगुणा** हिरण्यलाभ व मित्रलाभ असा दुहेरी फायदा. दुप्पट खंडणी (भा) अभिप्रेत असल्याचे दिसत नाही. २ **स्वस्थम्** ही 'स्वस्था' ची केलेली दुरुस्ती आहे. 'व्यसने वा' ला पर्याय 'स्वस्थम्' असाच योग्य आहे. 'स्वस्थाः' हे इतर सामवायिकांच्या वर्णनपर होईल. ते अर्थहीन होईल. ४ हे सूत्र ७.८.४ मधून पुनरुक्त झाले आहे.

१० **कन्यादानयापनाभ्याम्** 'कन्येचे आदान (स्वीकार) व तिचे यापन (पाठवणूक, दान)' (भा). परंतु 'कन्यादान' चा नेहमीचा अर्थ करून (७.१६.६ पहावे) यापन म्हणजे स्वीकार असा अर्थ अधिक संभाव्य आहे. **विश्वास्य** असे ल्यबन्त रूप 'विश्वासयेत्' ह्या क्रियापदाच्या ऐवजी **मे** टीपेला अनुसरून स्वीकारले आहे.

७.१५

२ **तुल्यमन्त्रशक्तीनाम् :** ज्याचा आश्रय घ्यायचा तो अधिक बलवान असून शिवाय मंत्रशक्तिसंपन्न असणे आवश्यक आहे, अन्यथा बलवान राजा मंत्रशक्तीने त्याच्यावर मात करील. असे आश्रय घेण्यालायक अनेक राजे असले तर कोणाला पसंत करावे याचे हे विवेचन आहे.

३ **-संघैः** हा '-संख्यैः' च्या जागी **भा** टीकेतील पाठ आहे. संख्या अनावश्यक आहे. संघ म्हणजे अकराव्या अधिकरणातील संघ असे समजता येईल. ह्या सूत्रात व पुढे सूत्र ५ मध्ये मुळातील 'यावन्न' च्या जागी **यान्न** अशी दुरुस्ती केली आहे. 'यावत्' अर्थहीन आहे.

**१२ औपनिषदिकैः** नंतर 'योगैः' अध्याहृत धरावयाचे. **महाक्षयः- इ० : न** टीकेत म्हटले आहे त्याप्रमाणे ह्या शब्दांत एखाद्या नवीन निमित्ताचा निर्देश नसून तत्पूर्वीच्या 'विरुद्धदेश-इ०' ची व्याख्या आहे. किंबहुना 'न निर्ग्रमिष्यति' येथपर्यंतचा संपूर्ण अंश एखाद्या टीकेतून आला आहे हे उघड आहे.

**१८ विक्रमेण संधिम् :** त्याचा पराक्रम पाहून शत्रू तहास तयार होण्याची शक्यता अभिप्रेत असावी. युद्धात जय मिळवून तह करावा अशी कल्पनाही शक्य आहे. २० भेटीदाखल वस्तू (पण्य) पाठविल्यास त्या भेटीला पण्यागार म्हटले आहे.

**७.१६**

ह्या राजाला 'दण्डोपनामिन्' ही संज्ञा अधिक समर्पक (न). सूत्र ३ मधील 'उपनमयेत्' ने ह्या विधानाला पुष्टी मिळते.

**१ अनुज्ञातसंधिपणोद्वेगकरम्** ही दुरुस्ती आहे. अर्थ असा की दुर्बल राजाने स्वीकारलेल्या (अनुज्ञात) तहाच्या अटींचा (संधिपण) तो आता भंग (उद्वेग) करीत आहे. असाही अर्थ संभाव्य आहे की जरी त्याने तहाच्या अटी मान्य केल्या होत्या तरी तो आता उपद्रव देऊ लागला आहे (अनुज्ञातसंधिपणः अपि उद्वेगकरः). मुळातील पाठ 'अनुज्ञातस्कद्धिरण्योद्वेगकरम्' आहे. त्यासंबंधी **न** टीकेत म्हटले आहे की तो अपपाठ आहे आणि जे त्याचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करतात त्यांची कीव केली पाहिजे. त्या टीकेतील पाठ 'अननुज्ञातसंधिपण्योद्वेगकरम् (तहाच्या अटी न स्वीकारल्यामुळे उपद्रव देणारा)' असा आहे. **अपार्ष्णिरनासारश्च** ही '**शत्रुः**' ची विशेषणे. पार्ष्णि म्हणजे मजबूत पिछाडी, जेथे त्याला आसरा मिळू शकेल, आसार म्हणजे मित्राकडून वगैरे येणारी कुमक. ही दोन्ही ज्याला उपलब्ध नाहीत असा (टी).

**४ नियोग- इ० :** ह्यांचे वर्णन ९.७.७३-७६ येथे केले आहे.

**१६** तीन प्रकारच्या पार्ष्णिग्राहांचा निर्देश आहे. ह्या सूत्रातील विधानांना उद्देशूनच ७.११.३९ मध्ये 'पार्ष्णिग्राहोपग्रह' असे म्हटले आहे. त्यामुळे 'आटविक' वगैरेंना पार्ष्णिग्राहापासून स्वतंत्र मानणे (भा) बरोबर नाही.

**२१ प्रतिविधान** म्हणजे त्यांच्या रहाण्याखाण्याची वगैरे सोय करणे, स्वागत करणे.

**७.१७**

**१ समाधि** म्हणजे ओलीस ठेवलेला मनुष्य. हा शब्द 'आधि' गहाण ठेवलेली वस्तू ह्या शब्दाशी संबद्ध आहे.

**३ प्रतिग्रह** म्हणजे स्वीकार करणे म्हणजेच ओलीस घेणे.

**९ अतिसंधत्ते :** विवेचनाच्या सोयीसाठी येथेही दोन राजांमधील स्पर्धेची कल्पना केली आहे.

**२६ असंमोष** 'स्वतःचे संरक्षण करण्याबाबत दक्ष रहाणे.' (न).

**४१ सुरुङ्गामुखेन वा निशोपहारेण** 'रात्री बली द्यावयाचा आहे असे निमित्त सांगून सर्व नोकरांना जावयास सांगून भुयारी मार्गाने' (न). हा भुयारी मार्ग वरील सूत्र ३३ मधीलच असण्याचा संभव आहे. **४२ वारुण योग** म्हणजे पाण्यात बराच वेळ राहून बुडी मारलेल्या ठिकाणाहून खूप दूर जागी बाहेर येणे असा अर्थ दिसतो. **न** टीकेत १३.१.३-४ मधील प्रयोगाचा निर्देश केला आहे. प्रस्तुत संदर्भात तो जुळण्यासारखा आहेसे वाटत नाही.

**४५ आरक्षिणाम्** असे ह्या सूत्राच्या शेवटी हस्तलिखितात आढळते. **न** व **भा** दोन्ही टीकांत त्याची व्याख्या नाही. आणि ते मूळ असण्याचा फारसा संभव नाही.

**४९ काच- इ० : काच** शब्दाचा कावड असा एक अर्थ आहे. पण **भा** टीकेत 'काचभार' म्हणजे गवत, लाकडे वगैरे नेणारे, 'कुम्भभार' म्हणजे पाणी वाहून नेणारे व 'भाण्डभार'

म्हणजे घोडे वगैरेचा व्यापार करणारे अशी व्याख्या केली आहे. शेवटच्या अंशाची व्याख्या पटण्यासारखी नाही.

५५ **वाट** म्हणजे समूह (भा). ५६ **सत्त्रम्** : १०.२.२४ पहावे.

६१ **शीघ्रपातैः** 'अश्वैः' (न) किंवा 'यानैः' (भा) अध्याहृत धरावयाचे.

७.१८

१ **मध्यमस्य** हा शब्द येथे अस्थानी आहे. ह्या सूत्रात त्याच्या प्रकृतींचा मुळीच निर्देश नाही.

११ **साचिव्यं कुर्यात्** म्हणजे गुप्तपणे त्याला द्रव्य व सैन्य यांची मदत द्यावी.

१५ **अन्यत्र** म्हणजे शत्रूच्या गोटात (न).

२४ **अस्मै साहाय्यं दद्यात्** हे **न** टीकेतून घेतलेले शब्द उघडच आवश्यक आहेत.

२९ **बलवतः प्रतिघातोऽन्तर्धिः प्रतिवेशो वा** : ७.१३.२४-२५ पहावे.

३५ **अर्थयुक्त्या** म्हणजे आपले स्वतःचेच उद्दिष्ट साध्य करण्याचा हेतूने.

४२ **विरज्यति** म्हणजे विजिगीषूबद्दल ज्याच्या मनात अप्रीती उत्पन्न होते. शत्रूवर विजिगीषूने दुसऱ्या बाजूने हल्ला केला नाही हे त्याचे कारण असावे.

८

**व्यसन** शब्द दोन अर्थांत वापरला आहे. सामान्यपणे व्यसन म्हणजे राज्याच्या प्रकृतींवर कोसळणारे संकट, ज्याच्यामुळे त्या प्रकृतीच्या कार्यक्षमतेला बाध येतो. मनुष्यरूप प्रकृतींच्या (विशेषतः राजाच्या) संबंधात व्यसन म्हणजे मद्यपान, द्यूत इत्यादी व्यसने.

८.१

१ **व्यसनयौगपद्ये** : जेव्हा दोन प्रकृतींवर एकाच वेळी संकट कोसळते तेव्हा. त्यांपैकी कोणत्या प्रकृतीवरील संकट अधिक गंभीर व धोकादायक याचा विचार करणे आवश्यक आहे. त्यावरून शत्रूवर स्वारी करावी की नाही ते ठरविता येते. शत्रूच्या प्रकृतीवरील संकट अधिक गंभीर असल्यास स्वारी करावी (**यातव्यम्**), स्वतःचे संकट अधिक गंभीर असल्यास स्वस्थ रहावे (**रक्षितव्यम्**).

२ **अनय, अपनय** : ६.२.६–१२ पहावे. ३ **प्रसङ्ग** म्हणजे मनुष्यरूप प्रकृतीचे एखाद्या व्यसनात आसक्त होणे. **पीडा** : अध्याय ८.४ मध्ये पीडांचे विस्तृत वर्णन आहे.

२१ **स्वाम्यमात्ययोः** नंतर 'अभावः' अध्याहृत धरावयाचे.

३२ ह्यात पाराशरांचे मत अंशतः ग्राह्य मानले आहे.

३४ **जनपद-......-व्यवहारश्च** एवढा अंश **मे** टीपेला अनुसरून पुढील सूत्राच्या अंतावरून ('परेषाम्' नंतर) काढून ह्या सूत्रात आणला आहे. त्या ठिकाणी त्याचा अन्वय लागण्यासारखा नाही. **दण्डबलव्यवहारः** ह्याचा अर्थ सैन्याच्या बळाचा उपयोग एवढा पर्याप्त आहे.

५० ह्यात कौणपदंताचे मत अंशतः ग्राह्य मानले आहे.

५८ **त्वमित्राटविकानभ्यन्तर-** ही 'त्वमित्राटविकाभ्यन्तर-'ची केलेली दुरुस्ती आहे. कारण त्यामुळे 'शीघ्राभियाने'ला द्वितीयान्त कर्म प्राप्त होते. त्या शब्दाचा 'अभ्यन्तरकोपे' शी संबध प्रस्थापित करणे कठीण आहे. आणि पुढील 'च' ने दोन प्रसंग समजणे आवश्यक असल्याचे दिसून येते. ५९ **व्यसनयौगपद्येः** वर सूत्र १ पहावे.

६१ **बहुभावः** इ० : ९.७.४८–४९ वरून असे दिसते की बहुभाव आणि अनुराग हे पुरुषप्रकृतींच्या अवयवांचे विशेष आहेत आणि सार द्रव्यप्रकृतींच्या अवयावांचा विशेष.

**६२ नाविधेयकम्** ही 'नाभिधेयकम्' ची दुरुस्ती आहे. 'अविधेयक' म्हणजे कार्यभाग सिद्ध करू न शकणारे, निरुपयोगी. ह्या अर्थी 'नाविधायकम्' असाही पाठ चालण्यासारखा आहे.

**६३ प्रधानस्य** म्हणजे राजावरील (संकट).

८.२

**१ राजा राज्यम् :** राजा म्हणजेच राज्य असा याचा अर्थ नाही. तसेच राज्य म्हणजे अमात्य वगैरे इतर सहा प्रकृती (न) असाही अर्थ नाही. ह्या अध्यायात त्या प्रकृतींवरील संकटांचा मुळीच निर्देश नाही. राज्य म्हणजे राजाचा कारभार. राजावर येणाऱ्या संकटांमुळे त्याच्या कारभाराचे जे स्वरूप होते (वैराज्य, द्वैराज्य इत्यादी) ते राज्यव्यसन.

**२–३ :** ह्या तीन कोपांचे स्पष्टीकरण ९.३.१२, २० व २२ या सूत्रांत केले आहे.

**५ वैराज्य** जो मूळ तेथील राजा नाही (वि–राज्) त्याचा अंमल. मूळ राजा पराभूत होऊन देशोधडीला लागलेला असतो.

**७ तुल्ययोगक्षेमम्** हे 'परस्परसंघर्षेण' ला उत्तर आहे 'मिथो विरोधासंभवात' (न) आणि **अमात्यावग्रहम्** हे 'अन्योन्यपक्षद्वेषानुरागाभ्याम्' ला उत्तर आहे.

**१६** हा नवीन राजा त्याच देशातील असून त्याने बंडात साथिदार मिळवून बळाच्या जोरावर राज्य बळकावलेले असते. तेव्हा हे संकट वैराज्याहून भिन्न. **१९-२० :** ह्या सूत्रांचा उद्देश असा दिसतो की सर्वत्र व्याधिग्रस्ताचे राज्य श्रेयस्कर व नवीनाचे त्याज्य असे समजू नये. व्याधि कशा स्वरूपाचा आहे व नवीन राजा कोण आहे ह्याचा सुद्धा विचार केला पाहिजे.

**२५** येथे दोन म्हणी उद्धृत केलेल्या दिसतात, उच्चकुलोत्पन्न दुर्बल राजाचे राज्य कुलहीन बलवान राजाच्या राज्यापेक्षा श्रेयस्कर ह्या विधानाच्या समर्थनार्थ. दुर्बलाचे राज्य मुष्टि-वधासारखे व अतिवृष्टीसारखे, तर बलवानाचे राज्य सस्यवधासारखे व अवृष्टीसारखे. हे सूत्र एखाद्या टीकेतून आले असण्याची शक्यता आहे.

**२६ :** वस्तुतः हा श्लोक मागच्या अध्यायाच्या (८-१) अंती पाहिजे होता. त्या अध्यायातील विवेचनाचा यात समारोप आहे. प्रस्तुत अध्यायातील विषयाशी त्याचा संबंध नाही.

८.३

**७ क्षयनिमित्तम्** हा **न** टीकेतील पाठ 'क्षयव्ययनिमित्तम्' ऐवजी पसंत केला आहे. शत्रूच्या बाबतीत क्षय म्हणजे कोश व दंड यांचा ऱ्हास व व्याधीच्या बाबतीत क्षयरोग असा श्लेष आहे. व्ययात तसा श्लिष्ट अर्थ संभाव्य नाही.

**१५ पाटच्चर** 'चोर' ह्याचा न टीकेत 'दारुडा' असा अर्थ केला आहे. **२१ मुहूर्तप्रतीकारोः** न टीकेत 'मुहूर्तप्रीतिकरो' असा पाठ आहे. तोही चांगला आहे.

**२९ परित्याग.** 'ठेवावयास दिलेल्या वस्तूचा नीट सांभाळ न करणे' (न).

**३१ :** हे विधान १.७.७ मध्ये कौटिल्याच्या मताला पुष्टी देण्यासाठी वापरले आहे.

**४१ जयत्सेन** हे नलाच्या भावाचे नाव दिसते. महाभारतानुसार ते पुष्कर होते.

**५६ निशान्तप्रणिधौ :** वातव्याधीच्या मतात हा निर्देश असल्यामुळे त्याच्या ग्रंथात ह्या नावाचे प्रकरण होते असे मानावे वागते. प्रस्तुत ग्रंथात हे प्रकरण अध्याय १.२० मध्ये आहे.

**६४ संघानाम् :** अकराव्या अधिकरणातील. **संघधर्मिणां राजकुलानाम् :** १.१७.५३ मध्ये निर्दिष्ट केलेली राज्यपद्धती

६६ **मूल** म्हणजे वाडवडलापासून मिळालेले (न). २.९.२१ पहावे.

८.४

५ **-व्याधितोपसृष्ट-** हा **श्री** टीकेतील पाठ आहे. हस्तलिखितांत '-व्याधितापसृष्ट-' असे आहे. अपसृष्ट म्हणजे काम सोडून निघून गेलेला हे तितकेसे समर्पक नाही. उपसृष्ट म्हणजे खंगलेला, क्षीण झालेला ('रोगोपसृष्टतनुः'-रघुवंश, ८.९४).

१२ **तदाश्रयत्वात् क्षुद्रकाणाम्** : हे शब्द **न** टीकेत नाहीत आणि ते मूळ नसण्याचा दाट संभव आहे. त्यांत अगोदरच्या विधानाला पुष्टी मिळण्यासारखे काही नाही.

१५ **प्रकृतिपुरुषमुख्य-** : प्रकृतिपुरुष म्हणजे मुख्य अधिकारी आणि त्यांचे मुख्य म्हणजे पुढारी असा अर्थ दिसतो. 'मंत्र्यांमधील मुख्य' असा अर्थ संदर्भात जुळण्यासारखा नाही.

२१ **त्रैकाल्येन** 'भूतकाळी पेरलेल्या धान्याची काळजी घेतली जात नाही, वर्तमानकाळाच्या पेरण्या होत नाहीत व भविष्यकाळासाठी जमिनीची मशागत होत नाही' (न).

२४ **सुभगा** आवडती राणी. याच्या उलट 'दुर्भगा' नावडती (१३.१.१६).

३१ **करणाधिष्ठितः** याचा नेहमीचा अर्थ 'हाताखाली माणसे असलेला' असा आहे (२.५.८, २.११.१ पहावे). तोच येथे समजण्यास हरकत नाही. समाहर्त्यावर दुसरे कोणी अधिकारी असण्याचा संभव नाही.

३६ **पणे पणशतम्** म्हणजे शेकडा दहा हजार नफा. ही अर्थातच अतिशयोक्ती आहे.

३७ **अभिजात** म्हणजे सरदार वगैरे अथवा राजकुलातीलच कोणी व्यक्ती. त्याच्याजवळ सैन्य आहे हे अभिप्रेत आहे. त्याच्याकडची जमीन काढून घेण्यात युद्धाचा धोका (व्यसनाबाध) आहे, एरव्ही तो राजाला सैन्याची मदत करतो (आयुधीयोपकारिणी) ४० **व्यसनाबाध** हे संकट अभिजात बलवान होऊन राज्य बळकावील याचे.

४१ **रात्रिसत्त्व** : १०.३.२४ मधील सत्त्रपैकी रात्र हे एक आहे.

४८ **स्तम्भ** म्हणजे कार्यसिद्धीच्या मार्गात उपस्थित केलेला अडथळा.

८.५

१ : ह्या सूत्रात व पुढे सूत्र ९ मध्ये 'कलत्रगर्हि'च्या ऐवजी **कलत्रगर्भि** असा पाठ मे भाषांतराला अनुसरून स्वीकारला आहे.

७ **यथर्तुयुग्य-** ही **मे** टीपेला अनुसरून 'यथर्तुयोग्ययुग्य-' ची दुरुस्ती आहे. 'यथा' असताना 'योग्य' ची आवश्यकता नाही.

१० **कुपितमूलम्** : 'मूल' म्हणजे मुख्य अधिकारी (न), मौलबल (मे).

११ **सत्त्र** म्हणजे मुख्यतः दुर्ग.

१२ **अतिसंधायारिम्** ही 'अतिसंधाकारम्' अथवा 'अतिसंधातारम् (न)' ची दुरुस्ती आहे. दोन्ही प्रकारच्या संकटात विजिगीषू व अरी एक होऊन स्वारीवर निघाले आहेत. पहिल्या प्रकारात दोघांची सैन्ये स्वतंत्र असतात. त्यात शत्रूला फसविणे शक्य असते. दुसऱ्या प्रकारात दोन्ही सैन्ये एक झालेली (एकाच हुकमतीखाली) असतात.

१५ **आवाहयितुम्** हा **न** टीकेतील पाठ आहे. हस्तलिखितातील अवस्रावयितुम्' चा अर्थ 'घालवून देणे, पळवून लावणे' अनुपपन्न आहे.

१८ **कूट** म्हणजे शिखर, नेतृत्व करणारा सेनापती. 'भिन्न'ने त्याचा मृत्यू अभिप्रेत आहे.

२३ मित्राला त्याच्यावर हल्ला करणाऱ्याला विकून टाकण्याचे दोन प्रकार निर्दिष्ट आहेत. एक, त्या युद्धातून अंग काढून घेणे; यासाठी हल्ला करणाऱ्याने त्याला काही दिलेले असते.

दुसरा प्रकार, आपल्या कार्यासाठी द्वैधीभावाचा अवलंब करून मित्रावर हल्ला करणाऱ्याशी संधी करून आपल्या दुसऱ्या शत्रूबरोबर विग्रह करणे. यातही काही मिळालेले असते. २७ **प्रार्थयित्वा** ह्याचा 'हल्ला करून' असा अर्थ संभाव्य आहे. पण 'अभियातं स्वयम्' (श्लोक २२) यात त्याचा निर्देश अगोदर आलेला आहे.

९

९.१

१८ **उदीचीनम्** म्हणजे उत्तरेकडील. ह्याचा अर्थ दक्षिणोत्तर पसरलेले (असे क्षेत्र). **तिर्यक्** हा **न** टीकेतील पाठ आहे, 'पूर्वसमुद्र व पश्चिमसमुद्र यांच्या मध्ये असलेले' (न). हा पूर्वपश्चिम विस्तार एक हजार योजने असे अभिप्रेत दिसते. दक्षिणोत्तर विस्तारही तितकाच अभिप्रेत असणेही शक्य आहे. पाठभेद 'अतिर्यक्' (सरळ) कमी अर्थवाही आहे.

२७, २९ **निम्न** म्हणजे पाणी असे अनेक ठिकाणी समजणे आवश्यक आहे.

४० **उपोषिष्यन्** : यात उप+उष् जाळणे हा धातू आहे.

५२ **यातव्याः** म्हणजे 'यात्राः'.

९.२

२ **मौल** हा शब्द 'मूल' म्हणजे मूळ राज्य ह्यापासून आला आहे. वाडवडलांपासून राज्यातील सैन्यात नोकरी करणाऱ्या सैनिकांचे कायमचे सैन्य ते मौलबल. **अत्यावाप** म्हणजे दूष्य सैनिकांचे आधिक्य. १०.५.२८ पहावे. **बहुलानुरक्तसंपाते** हा **न** टीकेतील पाठ आहे ('-संपादित' ऐवजी) संपात म्हणजे एकत्र येणे, गोळा होणे.

३ **अल्पावापम्** ही दुरुस्ती आहे. वरील 'अत्यावाप'च्या विरुद्ध अर्थाचा (दूष्य अल्प प्रमाणात असलेले) असा हा शब्द समजता येण्यासारखा आहे. इतर पाठ (अल्पस्वापम्, अल्पसपापम्, अल्पसंपातम्, अल्पसंघातम् किंवा अल्पसंवादम्) समर्पक नाहीत. **प्रसारः** म्हणजे मुख्यतः दाणागोटा मिळविण्यासाठी पाठविलेल्या सैन्याच्या तुकड्या. १०.२.५ पहावे.

४ **श्रेणीबलम्ः** भृतबलामध्ये सैनिक व्यक्तिशः सैन्यात नोकरीवर घेण्यात येतात, तर श्रेणीबलात एखाद्या व्यावसायिकांचे बनलेले सैन्य तसेच्या तसेच राज्याच्या उपयोगास येते. मोबदला मिळतो तो श्रेणीला, व्यक्तींना नाही.

६ **अत्युपचितं. . . . कोपशङ्कायाः** हा अंश चुकीच्या ठिकाणी पडला आहे. तो पुढे सूत्र ११ नंतर समुचित ठिकाणी वाचता येईल. त्यात शत्रुबल केव्हा वापरावे याचा निर्देश नसून त्याला विशेष प्रसंगी (खूप मोठे झाल्यास) कसे वागवावे याचे वर्णन आहे. हा भाग प्रक्षिप्त नाही हे १५.१.५० मध्ये तो उद्धृत झाला आहे यावरून स्पष्ट आहे.

९ **अनेकम्** 'एकाच सेनापतीच्या हुकमतीखाली नसलेले' (न). **अनेकस्थम्** हा **न** टीकेतील पाठ आहे. हस्तलिखितांत 'अनेकजातीयस्थम्' आहे. 'अनेकजातीयम्' किंवा 'अनेकस्थम्' चालेल, पण 'अनेकजातीयस्थम्' चालण्यासारखे नाही.

११ **शत्रुबलम्** ही मुळातील 'शत्रुम्' ची केलेली दुरुस्ती आहे. ती उघडच आवश्यक आहे.

२४ **बहुलसारम्** 'ज्यात पुष्कळ शूर पुरुष आहेत असे' (न).

२६ हाटक 'कुन्तच्या आकाराचा आणि तीन टोके असलेला' (न). २७ **कचग्रहणी** : २.३६.१८ पहावे. २८ **तदेव** 'काहींच्या मते रथप्रतिबल, इतरांच्या मते हस्तिप्रतिबल' (न).

९.३

४ **सहस्रैकीयः** 'हजारात एक' ने भाषांतराला अनुसरून 'पश्चात्कोपे' असे सप्तम्यन्त रूप स्वीकारले आहे.

**१४ निग्रहः** ' वध ' (न). संदर्भात हा अर्थ स्वीकारण्यास हरकत नाही.

**१५ पुत्रम्** युवराजाहून भिन्न पुत्र.

३६ ह्या सूत्रापासून ४१ व्या सूत्रापर्यंत बंडखोरांना मार्गदर्शन केले आहे, त्यांत विजिगीषूला काय करावे ते सांगितले नाही. ३८ **भूयानकृत्य-** ही **मे** भाषांतराला अनुसरून केलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितातील ' भूयात् न कृत्य- ' अर्थहीन आहे. **न** टीकेतील ' भूयान् कृत्य- ' वरून असा निष्कर्ष निघतो की ह्या लोकांना आपल्या बाजूस वळविण्याचे प्रयत्न अजून व्हावयाचे आहेत. पण हे लोक त्याच्यापासून फुटण्याची भीती नाही हा अर्थ अधिक चांगला.

४२ ' **परे** म्हणजे बाह्य आणि **स्वे** म्हणजे आभ्यन्तर ' (न). संदर्भात हा अर्थ संभाव्य आहे.

## ९.४

**३ गुण** म्हणजे आदेयत्व, प्रत्यादेयत्व इत्यादी लाभाचे गुण.

**२३ सामवायिकानामनिर्बन्धगामित्वात् :** एकजूट करून अनेक राजे मोहिमेवर गेले असता एकाला सर्वांपेक्षा अधिक लाभ झाला व त्याला कोणी हरकत घेतली नाही तर तो लाभ पुरोग. ' पुरोग ' म्हणजे सामवायिकांचा पुढारी असा मूळ अर्थ आहे. ९.७.५९ पहावे.

**२५ कारुण्य** म्हणजे लढण्याविषयी अप्रीती आणि **सानुक्रोशता** म्हणजे अपराध्याला क्षमा करण्याची वृत्ती (न). **ह्री** हिच्यामुळे अपराध्याने दयेची याचना केली असता बळाचा वापर करण्यास मनुष्य धजत नाही (न).

**२७ नाधनाः** हा ' साधनाः 'च्या जागी **श्री** टीकेतील पाठ आहे. ' साधनाः ' चा ' साधनवन्तः ' असा अर्थ करावा लागेल आणि तरीही ' यत्नशतैरपि ' याचा त्याच्याशी नीट अन्वय लागणार नाही.

## ९.५

**५ सुव्याजा :** ' व्याज ' म्हणजे कपट असा अर्थ करणेच चांगले.

**१४ बाह्यैः, दूष्यैः** यातील तृतीया पंचमीच्या अर्थी वापरल्या आहेत. **१५ अनुप्रविष्टाः** ह्याचा नेहमीप्रमाणे ' त्यांचा विश्वास संपादन करून ' असा अर्थही संभाव्य आहे.

**३० अभ्यन्तराम् :** म्हणजे ' जिच्यात सूचना करणारे आतील अधिकारी असतात ' (न), ' जिच्यात सूचना करणारे व प्रतिसाद देणारे दोघेही आतले असतात ' (मे).

**३२ पूर्वां पूर्वाम् :** सूत्र ३ मधील क्रमानुसार.

## ९.६

**१ शुद्धा** आपत्ती ' आमिश्रा ' (सूत्र ८) व ' परमिश्रा ' (सूत्र ११) ह्या आपत्तींहून भिन्न आहे. तिच्यात दोघांनी केलेला कट नसतो. एकाकडूनच धोका असतो.

**५ मुख्येषु :** हे पौरांचे व जानपदांचे पुढारी, मुख्य अधिकारी नाहीत.

१० दूष्य नसलेले ते **आलम्बन,** दूष्यांना त्यांचा आधार असतो.

**३० अरिप्रदत्तम्** हा येथे तृतीया तत्पुरुष. सूत्र ३३ मध्ये चतुर्थी तत्पुरुष समजणे अधिक चांगले.

**३८–३९ :** ही दोन सूत्रे अनावश्यक आहेत. ती एखाद्या टीकेतून आली असण्याची शक्यता आहे.

**६७** शत्रूने तह झाल्याचे नाकबूल केले तरी दुसरे कटवाले त्याच्यावर विश्वास ठेवणार नाहीत, कारण विजिगीषूचे दूत भेटी घेऊन त्याच्याकडे वारंवार गेले होते हे त्यांना माहीत असते.

**७२ जातिसंघाः** हे अकराव्या अधिकरणातील संघ नाहीत. जातिनिष्ठा ही राज्यनिष्ठेपेक्षा अधिक प्रभावी हे गृहीत धरून ही सूचना केली आहे.

**७३ वीतंसगिल-** ही 'पीतंसगल-' अथवा 'पीतंसगिल-' याची दुरुस्ती आहे. वीतंस. (विशिष्ट प्रकारचा कपडा) पक्ष्यांमध्ये विश्वास उत्पन्न करण्यासाठी आणि गिल (आमिष) त्यांना आकर्षित करण्यासाठी वापरतात.

९.७

**३ स्वजनविकारः कोपः** ही व्याख्या अनावश्यक आहे. शिवाय, सूत्र १ मधील 'बाह्याः कोपयति' ह्या विधानाच्या संदर्भात समर्पकही नाही. हे सूत्र मूळ नसावे.

९ शत्रू व मित्र यांत ह्या चिथावणीमुळे दुही उत्पन्न होणे हा अर्थ, ती उत्पन्न न होणे हा अर्थाचा अभाव. १० शत्रुबलाला बोलावणे हा अनर्थ, त्याला द्रव्य व मान दिला तर अनर्थ नसणे शक्य असते. ११ भूमी घेणे हा अर्थ, पण तिच्या शेजारी बलवान राजा असल्यास तो अनर्थ. १२ बलवत्तर राजाशी एकजूट हा अनर्थ, पण त्यातून लाभ झाला तर तो अर्थ. **१२ अर्थ-संशयम्** म्हणजे 'अर्थो न वेति' हा पहिला प्रकार.

**१७ अन्तर्** म्हणजे अर्न्तार्धि (न). १८ कोणाला कोश व दंड देणे हा मुळात अनर्थ.

**२३ समन्ततोऽर्था** ही आपत्ती, कारण त्यावेळेस कोणता अर्थ प्रथम निवडावा हे समजत नाही. २५ **तयोः** च्या ऐवजी 'तस्याम्' असा पाठ अधिक समुचित आहे. कारण, समन्ततोऽर्था आपत्तीमध्ये काय करावे ते पुढे ३०–३१ ह्या सूत्रांत सांगितले आहे.

२८ येथेही **तयोः** च्या ऐवजी 'तस्याम्' असा पाठ समुचित. समन्ततोऽनर्थावर उपाययोजना ३३–३६ सूत्रांत सांगितली आहे.

**३४ लघीयस्या :** उदाहरणार्थ, कोश न देता सैन्य द्यावे, दुर्ग न देता कोश द्यावा इत्यादी.

**५२ प्रातिलोम्येन** म्हणजे वृद्धीच्या ऐवजी तात्पुरते स्थान स्वीकारून व स्थानाच्या ऐवजी तात्पुरता क्षय स्वीकारून.

**५९ अपुरोग** म्हणजे मुख्य नसलेला राजा. **अनिर्बन्धगामित्वात्** ही मे टीपेला अनुसरून केलेली दुरुस्ती आहे. मुळात 'अनिबन्धगामित्वात्' आहे. ९.४.२३ पहावे. अर्थ असा दिसतो की मोहिमेच्या मध्यावर व शेवटी अनर्थ व संशय ह्या आपत्ती उद्भवल्या तर त्यांचा फटका त्याला एकट्याला बसणार नसून सर्वांना—मुख्यतः पुरोग अथवा प्रधान राजाला—बसणार, आणि त्यांचे निवारण त्याला एकट्यालाच करावे लागणार नाही. अनर्थ अथवा संशय त्याच्या एकट्याच्याच वाट्याला येण्याचा संभव फार कमी. आणि आलेच तरी इतर सामवायिक त्याच्या मदतीस जातील.

**८१ धर्ममूल** हा षष्ठीतत्पुरुष, बहुव्रीहि नाही.

८२–८४ : वस्तुतः ह्या आपत्ती नसून हे उपनिपात अथवा पीडन होत. त्यांचा विस्तृत विचार अध्याय ४.३ व ८.४ मध्ये केला आहे. येथे त्यांचा निर्देश अस्थानी वाटतो.

१०

१०.१

स्कन्धावार म्हणजे मजबूत तटबंदी केलेली अशी लष्करी छावणी. ज्या वेळेस युद्ध नसेल त्या वेळेस येथे सैन्याचा तळ असतो व जेव्हा मोहिमेवर जावयाचे असते तेव्हा येथूनच कूच करण्यास प्रारंभ होतो.

**१ नायक** हा कूच करताना सैन्याच्या अग्रभागी असतो. १०.२.४ पहावे. **संस्थान** म्हणजे विभाग. न टीकेत जेथे रस्ते मिळतात तो चौक असा पर्यायी अर्थ दिला आहे. तीन उभे व तीन

आडवे अशा सहा रस्त्यांमुळे नऊ चौक होतातच. तथापि, पुढील सूत्रातील ' भाग ' शब्द ह्या ' संस्थान 'चा वाचक असण्याची अधिक शक्यता आहे.

२ **मध्यमस्योत्तरे नवभागे :** ह्याचा अर्थ २.४.७ मधील ' वास्तुहृदयादुत्तरे नवभागे ' प्रमाणेच करणे योग्य आहे. परमशायिक विभागणीच्या केंद्रस्थानी असलेल्या एक-एक्यायशी-अंश चौरसाच्या उत्तरेकडील (सबंध क्षेत्राच्या) एक-नवमांश भागात असा अर्थ.

५ **मेथीप्रतति** ' काटेरी झुडपांचे कुंपण ' (न).

१३ **अष्टादशवर्ग** ' मौलबल इत्यादी सहा प्रकारच्या सैन्यातील प्रत्येकी (१०.६.४५ मधील) पतिक, नायक व सेनापति ' (न). हे विशेष समाधानकारक नाही. सूत्र ६-९ मधील विभागांचा निर्देश अभिप्रेत असणे अशक्य नाही. त्यांची बेरीज अठरा होऊ शकेल (कुप्यायुधागार हे एक आणि मित्रबल, अमित्रबल व अटवीबल हे स्वतंत्रपणे तीन असे समजून).

१७ **रक्षणानि** ' रस्ते सपाट करणे, हिंस्त्र प्राणी नाहीसे करणे इत्यादी ' (न).

१०.२

४-१२ : ह्या सूत्रांमधील काही शब्द इकडचे तिकडे हलवून मुळातील पाठ थोडा दुरुस्त केला आहे. त्यामुळे अन्वय नीट प्रस्थापित होऊन अर्थबोध सुगम होतो.

८ ही व्याख्या हस्तलिखितांत नाही. किंबहुना, सूत्र ५-८ मधील सर्व व्याख्या एखाद्या टीकेमधून आलेल्या दिसतात. त्या अस्थानी व अनावश्यक आहेत.

१७ **अनुदकम्** अनावश्यक आहे. पुढच्या समासात ' उदक ' अन्तर्भूत आहे.

२० **प्रतिग्रह** म्हणजे राखीव सैन्य. १०.५.५८ पहावे.

१०.३

२ **कूटयुद्ध** म्हणजे रणांगणावर लढवावयाचे डावपेच हे पुढील वर्णनावरून स्पष्ट आहे. तसे डावपेच नेहमीच लढविले जातात.

६ **अभिन्नः** हा ' अभिन्नम् ' च्या जागी मे भाषांतरावरून घेतलेला पाठ उघडच आवश्यक आहे.

२० **चर्मकोश** हत्तींच्या पायात काटे घुसू नयेत यासाठी चामड्याची खोळ.

२८–३१ ह्रा अंश प्रक्षिप्त असण्याचा दाट संभव आहे. राजाच्या प्रोत्साहनाची समाप्ती सूत्र २७ च्या अंतीच्या ' इति ' ने दाखविली आहे. तेव्हा त्यात ह्यांचा समावेश होणार नाही. आणि ३२ सूत्राशीही त्याचा संबंध जोडता येणार नाही. कारण त्यात व्यूहसंपद् हे प्रोत्साहनाचे स्वतंत्र निमित्त निर्दिष्ट केले आहे. शिवाय, हा सर्व भाग टीकेच्या स्वरूपाचा आहे. रणांगणावर कोणी ' अपीह श्लोकौ भवतः ' असे एखाद्या टीकेतल्याप्रमाणे म्हणण्याची शक्यता फारच कमी आहे.

४४ **यन्त्रिक** हा ' सत्त्रिक 'च्या ऐवजी न टीकेतील पाठ आहे. ' जामदग्न्य आदी (२.१८ मधील) यंत्रे तयार करणारे ' असा त्याचा अर्थ.

१०.४

३ **समे विषमे** हे शब्द भूमीच्या वर्णनपर समजता येण्यासारखे नाहीत. तिचे ' समा ' असे वर्णन करण्यात आलेले आहे. म्हणून ' अडचणीत नसताना व अडचणीत असताना ' असा ह्या शब्दांचा अर्थ समजला पाहिजे.

१३ **विचय** म्हणजे शोधून काढणे, निवड करणे.

**१४** पहिले 'अवतरण' म्हणजे पाण्यात उतरणे व दुसरे 'अवतरण' म्हणजे उंच जागेवरून खाली येणे.

१०.५

**६ पञ्चारत्नि धनुः :** नेहमीचे धनू अंतर चार अरत्नी आहे. २.२०.११ पहावे.

८ 'पक्ष हे पुढच्या बाजूला बाहेर, कक्ष हे मागच्या बाजूला आत आणि उरस्थ हे मधोमध' (न) उडणाऱ्या पक्ष्याशी साम्य सूचित होते.

**१७ विषमसंख्याने :** उदाहरणार्थ, पक्षांत पाच, कक्षांत तीन, उरस्यात नऊ. ह्याचे असंख्य प्रकार होऊ शकतात. **१९ :** विषमव्यूहाच्या मूळ दहा प्रकृती समव्यूहाच्या मूळ दहा प्रकृतींहून भिन्न नाहीत.

**२२ त्रिभागोनः :** उदाहरणार्थ, मूळ रथ ४५ असतील तर त्यात तीस रथांची भर घालावी. त्यांपैकी वीस पक्ष व कक्ष ह्यांमध्ये (प्रत्येकी पाचपाच) व उरस्यात दहा.

३० रथव्यूहात हत्ती नसतात व हस्तिव्यूहात रथ अभिप्रेत नाहीत. वर वर्णिलेल्या रथव्यूहातील रथाच्या जागी हत्ती ठेवला की हस्तिव्यूह होतो.

**४५ वेगाभिहूलिको** ही **मे** टीपेत सुचविलेली दुरुस्ती आहे. त्याचा 'वेगाने चढाई करणारा अथवा '(शत्रूची) वेगवान चढाई थोपवून धरणारा' असे अर्थ होऊ शकतात. दुसरा अर्थ अधिक संभाव्य आहे. मूळ पाठ 'वेगाभिहूलितः' आहे. 'वेगाने अभिभूत होणारा' असा त्याचा अर्थ संभाव्य आहे. पण हा अर्थ संदर्भाला अनुरूप नाही.

**४७ प्रतिगृह्णीयात्** म्हणजे त्या पहिल्या हल्ल्याच्या मदतीस जाऊन त्याला जोर द्यावा.

**५३ अनुवंशम्** म्हणजे सैन्याच्या फळीच्या अनुरोधाने (अव्ययीभाव). ह्याचा अन्वय 'भग्नरक्षा' शी लावावयाचा.

१०.६

**३ प्रपक्षकक्षोरस्या उभयोः :** औशनसांच्या विभागात कक्षांचा निर्देश नसता दोघांच्याही मते हे तिन्ही मूलभूत व्यूहप्रकारांत असतात असे कसे म्हटले आहे ते स्पष्ट नाही. 'प्रपक्ष' मधील प्र उपसर्गाचा काही विशेष अर्थ असावा असे वाटत नाही. मूळ पाठ 'सपक्ष-' असण्याची शक्यता आहे. **४ तिर्यग्वृत्तिर्दण्डः** दंड नाव असलेला व्यूह तिरकस जावा हे थोडे चमत्कारिक वाटते. कदाचित मूळ पाठ 'अतिर्यग्वृत्तिः' असावा. **५ भोग** म्हणजे नागाचा उभारलेला फणा. त्याचा साप असाही अर्थ आहे. तोच अभिप्रेत दिसतो.

**८ न** टीकेप्रमाणे सूत्र ४–७ मधील व्याख्या उभयतांच्या मतानुसार आहेत, तर येथून पुढे दिल्या जाणाऱ्या व्याख्या बार्हस्पत्यांच्या मतानुसार आहेत. बार्हस्पत्यांनी मूळ चार व्यूहप्रकारांच्या निरनिराळ्या व्याख्या स्वीकारल्या असाव्यात हे विशेष पटण्यासारखे नाही. दोन निरनिराळ्या प्रकारच्या व्याख्या आहेत एवढे मात्र निश्चित. **९ अतिक्रान्त** म्हणजे इतर विभागांच्या मानाने पुढे असलेला. **१० प्रतिक्रान्त** म्हणजे मागे असलेला. ह्या व्यूहांच्या व्याख्यांवरून त्यांचे स्वरूप स्पष्ट होते असे म्हणता येण्यासारखे नाही. कामन्दकाच्या नीतिसारात (अध्याय २०) ह्या व्याख्या उद्धृत केल्या आहेत.

२५ '**सर्पसारी**मध्ये विभाग एकमेकांना लागून असतात, तर **गोमूत्रिका**मध्ये त्यांच्यात थोडे अंतर असते' (न).

**३६ उद्धानकः** हा पाठ कामन्दकात आहे. येथील पाठ 'उद्यानकः' आहे. पण उद्यानाची काही विशिष्ट आकृतीच असते असे नाही. चार कोपरे असलेली चूल असा उद्धानकचा अर्थ समजता येतो

३९–४१ : हे व्यूह वरील चार प्रकृतिव्यूहांशी असंबद्ध दिसतात.

४५ **पतिकः** ही 'पदिकः' ची केलेली दुरुस्ती आहे. ज्या अंगात हत्ती, रथ, घोडे आहेत त्याच्या मुख्याला पदिक ही संज्ञा अनुपपन्न आहे.

४८ **हस्तिभीषणैः** ही 'हस्तिभूषणैः' ची दुरुस्ती आहे. ती उघडच आवश्यक आहे. भूषणांमुळे शत्रूत उद्वेग उत्पन्न होणार नाही.

## ११

संघराज्ये प्राचीन भारतात प्रसिद्ध होती. प्रस्तुत अधिकरणात विजिगीषूने त्यांच्यावर आपले वर्चस्व प्रस्थापित करावे या उद्देशाने त्यांचा विचार केला आहे. तथापि, शेवटी संघांनी विजिगीषूच्या कारवायांविषयी कसे जागरूक रहावे ते सुद्धा त्यांना सांगितलें आहे. काही संघांत एकाहून अधिक मुख्य असत हे उघड आहे.

## ११.१

४ जायस्वाल यांनी म्हटल्याप्रमाणे क्षत्रियश्रेणी हे सामान्य नाम समजून काम्बोज व सुराष्ट्र या दोनच संघांचा प्रस्तुत सूत्रात निर्देश आहे असे मानणे बरोबर नाही. समासातील 'आदयः' च्या स्थानावरून हे स्पष्ट आहे की क्षत्रिय, श्रेणी ही सुद्धा विशेषनामे म्हणजे संघांची नावे आहेत.

६ **संघानाम्** म्हणजे 'संघमुख्यानाम्'. एका संघाला दुसऱ्या संघाविरुद्ध चिथावण्याचा प्रश्न नसून एकाच संघातील मुख्यांमध्ये वितुष्ट आणावयाचे आहे.

१७ : हस्तलिखितांत **भूमौ**च्या अगोदर 'एकदेशे समस्तान्वा निवेश्य' हे शब्द अधिक आहेत. ते गाळले आहेत. सूत्र १८ मधील विधानाशी ते विसंगत आहेत आणि एकाच वाक्यात 'निवेश्य' व 'निवेशयेत्' दोन्ही असण्याची शक्यता नाही.

२५ **सहिरण्याभिज्ञानमुद्राणि हिरण्यभाजनानि च :** यांतील एक 'हिरण्य' शब्द (पहिल्या सामासिक शब्दात) द्विरुक्त झाला आहे. या शब्दसमूहात एकाच पदार्थाचा (हिरण्यभाजनांचा) निर्देश आहे. पहिला शब्द 'हिरण्यभाजनानि' चे विशेषण आहे. शेवटचा 'च' गैरसमजुतीने आला आहे. 'साभिज्ञानमुद्राणि हिरण्यभाजनानि' इतकाच पाठ अर्थाला चांगला.

४२ **अदितिकौशिकस्त्रियः** 'देवतांची चित्रे दाखवून उपजीविका करणाऱ्या आणि गारुडी स्त्रिया' (न). एकच कल्पना अधिक संभाव्य आहे. १.१७.१९ पहावे.

४५ **दूष्यः संघमुख्यमध्ये :** सिद्धवेषातील हा हेर दूष्य असे म्हटले आहे. त्याचा पुढे तीक्ष्ण हेरांकरवी खून होण्याची संभाव्यता आहे. तेव्हा तो अभित्यक्त असण्याचीच शक्यता आहे. मुख्यो ही मे टीपेला अनुसरून 'मुख्यां' ची केलेली दुरुस्ती आहे.

५४ **एकराजः** राजेशाही असलेल्या राज्यातील मुख्य. संघाहून ह्या राज्यपद्धतीची भिन्नता दाखविण्यासाठी हा शब्द वापरला आहे. संघात अनेक 'राजे' असतात.

## १२

**आबलीयसम्** हे 'अबलीयस् (कमी बलवान राजा)' पासून निष्पन्न झालेले रूप आहे. मे टीपेत 'अधिक बलवान होईपर्यंत' असा त्याचा अर्थ केला आहे. ह्या अधिकरणातील बरेचसे विवेचन पूर्वी सातव्या अधिकरणात–विशेषतः अध्याय १४–१७ मध्ये – आलेले आहे. त्यामुळे पुष्कळ पुनरुक्ती आढळते.

## १२.१

७ **कुलैडक** 'कळपापासून सुटून एकटा पडलेला मेंढा' (न). मे टीपेत 'अकुलैडकः' असा पाठ सुचवून त्याचा हाच अर्थ निष्पन्न केला आहे.

२४ **पादोत्तरम्** म्हणजे प्रथम शंभर देऊ केले असतील तर नंतर सवाशे याप्रमाणे दर खेपेस सव्वापटकरून. **अहोरात्रोत्तरम्** 'एक एक दिवसाने वाढवीत' याचा अर्थ स्पष्ट नाही. श्री टीकेत 'करावयाच्या कामाचे दिवस १०' ११, १२ याप्रमाणे वाढवीत' असा अर्थ केला आहे. सैन्य किंवा कोश अर्पण करताना काम करण्याचा प्रश्न अप्रस्तुत आहे. मे भाषांतरात दहा, नऊ आठ याप्रमाणे सैन्य देण्यासाठी मुदत कमीकरीत जाऊन' असा अर्थ केला आहे. तो संदेहमुक्त नाही.

२६ पुरुषसंधीत सैनिक (पदाति) द्यावयाचे असतात, तर (सूत्र २५ मधील) दंडसंधीत हत्ती व घोडे द्यावयाचे असतात असे दिसते.

१२.२

'मंत्रयुद्ध' हे प्रकरण पहिल्या सात सूत्रांतच अंतर्भूत आहे. वस्तुतः त्याचा मागच्या 'दूत कर्म' ह्या प्रकरणातच समावेश होतो. हा अंश मागच्या अध्यायावरून पुढे चालू अशाच स्वरूपाचा आहे.

२१ **भार्याव्यंञ्जना :** असे समजले पाहिजे की एका हेर स्त्रीने शत्रूच्या अधिकाऱ्याशी अगोदरच लग्न केलेले असते. ही योजना फार लांबचा विचार करून केलेली आहे. भार्या म्हणजे केवळ प्रेमिका असे समजता येईलसे वाटत नाही.

१२.३

४ **ये चाप्रवासिताः** हा मे भाषांतराला अनुसरून 'ये च प्रवासिताः' ऐवजी दुरुस्त केलेला पाठ आहे. 'प्रवासित' ठार मारलेला अथवा हद्दपार केलेला यांपैकी कोणत्याही अर्थाने संदर्भात बसण्यासारखा नाही.

१६ **अन्तर्बलम्** म्हणजे राज्याच्या रक्षणासाठी मागे ठेवलेले सैन्य. **अन्तम्** म्हणजे अंतपालाचा दुर्ग.

२१ **सर्वस्वेन तदर्पणम् :** 'सर्वस्वस्य तदर्पणेन' असा अर्थ अभिप्रेत आहे.

१२.४

खरे पाहता ह्या अध्यायात एकच प्रकरण आहे. १६७ वे म्हणून जे स्वतंत्र प्रकरण गणण्यात आले आहे ते सूत्र २० च्या (तीन शब्द असलेल्या )अर्ध्या भागात निकालात काढले आहे.

१ **देशः** म्हणजे मुख्यतः शत्रूचा दुर्ग.

५ **पार्श्वं वा मध्यम् :** हे शब्द मूळ नसण्याचा दाट संभव आहे. त्यांचा विशेष समाधानकारक अर्थ लागण्यासारखा नाही.

७ ही एक दूरवर विचार करून केलेली योजना आहे. शत्रुसैन्यात मुख्य अधिकारी म्हणून परकीयाला ताबडतोब नेमले जाण्याची शक्यता कमी.

२१ **ब्रूयुः** ह्याचा कर्ता सूत्र १९ मध्ये निर्दिष्ट केलेले दुर्बल राजाचे सैनिक. त्यांनी याप्रमाणे घोषित केल्यावर शत्रू मोहिम सोडून राज्याच्या रक्षणासाठी परत जाईल अशी कल्पना.

२३ **स्तम्भवाट** म्हणजे झाडांच्या बुंध्यांनी होणारा कुंपणासारखा आडोसा असा अर्थ असावा. २८ **उदकचरणैः** १३.१.३–५ मध्ये यांचे वर्णन आहे.

१२.५

१ **पूजागम-** ही 'पूज्यागम-' ची केलेली दुरुस्ती आहे. पूजेसाठी येणेच संभाव्य आहे.

९ **अवरोध व उपरोध** (सूत्र १२) दोन्ही रूपे वेढ्याला तोंड देण्यासाठी किल्ल्यात आसरा घेणे या अर्थी वापरली आहेत.

**१८ तोयकुम्भान्** ही 'अतोयकुम्भान्' **ची** दुरुस्ती आहे. पर्यायी 'कांस्यभाण्डानि' मध्ये पाणी अभिप्रेत नाही असे म्हणता येईल. जमिनीच्या आत खणले जात असता वर ठेवलेल्या काशाच्या भांड्यात सूक्ष्म ध्वनिलहरी उद्‌भवतील अशी कल्पना आहे. तेव्हा इतर कुंभांत पाणी ठेवल्यास त्याच्यावर उठणाऱ्या तरंगांनी खणण्याचे कार्य कळू शकेल.

**२६ आवाहयेत्ः** ह्याचा कर्ता सूत्र ११ मधील पुत्र किंवा भ्राता.

**३७ पार्श्वेन म्हणजे** पुढील सूत्रांत वर्णिलेल्या कोणत्याही युक्तीने (श्री).

**४२ कृतोपजापः** याचा अर्थ ज्याच्या 'अधिकाऱ्यांना फितविण्याचे शत्रूने प्रयत्न केले आहेत तो' असा केला पाहिजे. तरच दुर्गातून बाहेर येणारे अधिकारी फितूर झाले आहेत असे त्याला वाटण्याची (दूष्यव्यञ्जनैः) शक्यता आहे. वस्तुतः ते व त्यांच्याबरोबरचे सैन्य राजनिष्ठच असतात. पण ते आपल्याला येऊन मिळणार ह्या कल्पनेने शत्रू गैरसावध असतो.

१३

१३.१

**३ समुद्रवालुकाकोशम्** याचा अर्थ स्पष्ट नाही. समुद्रातील वाळूचा कोश (पिशवी) अथवा वाळूची मुद्रा (मोहोर) केलेली पिशवी यांपैकी कोणताच अर्थ जुळण्यासारखा नाही. हे एका ज्वालाग्राही व पाण्यावर तरंगणाऱ्या पदार्थाचे नाव असावे. १४.२.३६ मध्ये तेल चोपडलेला समुद्रफेन पाण्यावर तरंगतो व पेटलेला दिसतो असे म्हटले आहे. तो अभिप्रेत असणे शक्य आहे. **उदकबस्तिना इ०:** ह्या प्रयोगाचे वर्णनही स्पष्ट नाही. 'उदकबस्ति' म्हणजे जलचर प्राण्याचा बस्ती असा अर्थ शक्य आहे. पण त्याने बोध होण्यास मदत होत नाही.

**१२ तुल्ययोगक्षेमम्ः** 'तुल्य' म्हणजे दूताच्या बरोबरीने असा अर्थ दिसतो. पण आयुधीयांना सुद्धा अमात्यांच्या प्रमाणेच योगक्षेम देऊ करावा हे विचित्र वाटते. वस्तुतः आयुधीयांचा उपजापात काही संबंध नाही. 'आयुधीयानां च' हे शब्द मूळ नसण्याचा दाट संभव आहे.

**१६ कुलैडकेनः** १२.१.७ पहावे. **पीलुविखादनेनः** पीलु वृक्षाचे फळ खाण्यापासून काही लाभ होत नाही, त्याने पोषण तर होत नाहीच, उलट उपद्रव होतो अशी कल्पना अभिप्रेत असावी. **करकयोष्ट्र्याः** श्री टीकेत 'करका' व 'उष्ट्री' ह्या दोन प्रकारच्या कडू वनस्पती असल्याचे म्हटले आहे. ह्यांचे अर्थ निश्चित नाहीत. **ध्रुवापकारिणः** हे अमात्य शत्रूला अपकार करीत रहातात, पण त्यांचे प्रयत्न व्यर्थ होतात. ते विजिगीषूला जाऊन मिळाले तर ते शत्रूला इजा करण्यात यशस्वी होतील, अशा प्रकारचे हे सूचन. मे भाषांतरात 'ध्रुवोपकारिणः' असा पाठ स्वीकारला आहे. 'दक्षान्' पासून यांची भिन्नता स्पष्ट नाही.

१३.२

६ 'बस्तशोणित' हे मुंग्यांना आकर्षित करण्यासाठी व त्यांची रांग वारुळ नेमके ओळखण्यासाठी अशी कल्पना दिसते. अशीही शक्यता आहे की मुंग्यांना वारुळातून घालवून देण्यासाठी बस्तशोणिताचा उपयोग अभिप्रेत आहे. परंतु त्यासाठी 'उपजिह्विकापसारणार्थम्' असा पाठ अपेक्षित आहे.

**११ तेजनाग्नि-ः** हा अग्नी कसा तयार करावा ते १४.२.२०–२५ मध्ये सांगितले आहे.

**२४ अग्निधूमोत्सर्ग-ः** ह्याचे वर्णन १४.२.३४ मध्ये आहे.

**३८ः** हे सूत्र ५.२.४५ मधून येथे पुनरुक्त केले आहे. ह्या ठिकाणी ते अस्थानी आहे.

**४२ दाय-ः** ही 'दायाद-' ची दुरुस्ती आहे. ११.१.४२ पहावे.

४३ **सत्वच्छन्नाः** ही **मे** टीपेला अनुसरून 'सत्त्रिच्छन्नाः' ची केलेली दुरुस्ती उघडच आवश्यक आहे.

१३.३

८ **अवक्षिपेत्** नोकरीवरून काढून टाकावे. १.१०.२ पहावे.

१५ **दण्डबलव्यवहारेण :** ८.१. ३४,३८ पहावे.

१६ **कृत्यपक्ष :** हे शत्रूच्या राज्यातील. त्यांना फितवून नेल्यामुळे तो विजिगीषूला उपद्रव देण्याचा संभव असतो. त्याने तसे केले की त्याच्यावर स्वारी करावयाची. २० **अविषह्य :** मुख्यतः दुर्गात असल्यामुळे हाती न लागणारा.

३४ **परस्परम्** म्हणजे त्यांच्यापैकी एकाकडे, शत्रूकडे किंवा त्याच्या मित्राकडे, ज्याची भूमी देऊ केली आहे त्याच्याकडे.

३८ **स्ववर्गेभ्यः** दुर्गमुख्यांनी शत्रूच्या दुर्गमुख्यांना, राष्ट्रमुख्यांनी राष्ट्रमुख्यांना व सेना-मुख्यांनी सेनामुख्यांना.

४६ **तद्व्यञ्जनाः** म्हणजे कारु, शिल्पी इत्यादींच्या वेषातील आयुधीय.

५१ : हे त्या रानटी टोळचांचा विश्वास संपादन करण्यासाठी करावयाचे. ५२ **अपगच्छेयुः** ह्याचा कर्ता 'अपसर्पाः'. ह्यांनी गोपालक व वैदेहक यांच्याबरोबर विषमिश्रित अन्न त्यांनी तेथे ठेवावयाचे असे ठरविलेले असते. ५३ **चोरान्. . . भारान्** हा पाठ **मे** भाषांतराला अनुसरून 'चोरा. . . . भारा' च्या जागी स्वीकारला आहे. द्वितीया विभक्ती उघडच आवश्यक आहे.

१३.४

१ **कर्शन-:** याचे वर्णन सूत्र ६–७ मध्ये आहे.

३ **अन्यत्रापसरतः** 'जे दुसरीकडे जात असतील त्यांचा अपवाद वगळता'. ह्या लोकांना विजिगीषूच्या अमलाखाली रहावयाचे नाही अशी कल्पना असावी. ४ **संग्रामात्** ही **मे** टीपेला अनुसरून 'संग्रामम्' ची केलेली दुरुस्ती आहे. 'निवेशयेत्' चे हे कर्म असण्याचा संभव नाही. ५ ह्या विधानाचा उद्देश असा की शत्रूच्या प्रजाजनांचा संहार करून व त्याचे जनपद उध्वस्त करून मिळविलेले राज्य काही कामाचे नाही.

९ **-बलकुटिका** ह्या शब्दाचा अर्थ स्पष्ट नाही. (भुयारी मार्गाने दुर्गात प्रवेश करून) सैन्याच्या द्वारा हल्ला करणे असा अर्थ शक्य आहे. **दारं च गुडेन :** हेही विशेष स्पष्ट नाही. 'दार' म्हणजे तटाला पाडलेले खिंडार आणि 'गुड' म्हणजे हत्तीचे चिलखत असे अर्थ आहेत. १२ **निष्किरात्** असा पाठ २.३.१४ ला अनुसरून पसंत केला आहे.

१८ ह्या व पुढील सूत्रांत योजावयास सांगितलेले काही पदार्थ निश्चित कोणते हे सांगता येण्यासारखे नाही.

२५ **पुरा मित्रैः संधत्ते :** मित्रांशी अशी एकजूट होण्याच्या पूर्वीच दुर्गावर हल्ला करावयाचा.

२९ **अपगच्छेत् :** आपले छिद्र उघड करणाऱ्या त्या (मित्र किंवा आसार) राजावर हल्ला करण्याचे सोंग आणून तेथून जावे.

५० अशी कल्पना दिसते की विजिगीषूचे दूष्य व आटविक सैन्य ज्या ठिकाणी असेल त्या ठिकाणी शत्रू लढण्यात गुंतून राहील असे करावे आणि मग बाकीचे सैन्य आत नेऊन किल्ला काबीज करावा. यात असे गृहीत धरलेले दिसते की शत्रूचे सैन्य लढण्यासाठी बाहेर आले आहे. पण त्याने बाहेर का यावे ते स्पष्ट नाही.

५१ **संज्ञा** म्हणजे ध्वज व तूर्य यांनी अगोदर ठरविल्याप्रमाणे करावयाच्या खुणा आणि चिह्न म्हणजे ओळख पटण्यासाठी धारण केलेल्या खुणा.

**५६ गुणातिशयेन :** गुण म्हणजे प्रकृतींची गुणसंपद्. संधि आदि सहा गुण हा अर्थही संभाव्य आहे.

**६० : शक्य** म्हणजे दुर्बल, आणि **एक** म्हणजे मित्र नसलेला.

**६३ :** ही या अधिकरणातील पहिल्या पाच प्रकरणांची नावे आहेत.

१३.५

**१३ योनिबाल :** हे सर्व प्राण्यांच्या संबंधात आहे. मनुष्यांपुरतेच ते मर्यादित आहे असे समजण्याचे कारण नाही. **पुंस्त्व** हे सुद्धा सर्व प्राण्यांचे.

**१९ अभिजात :** ८.४.३७ पहावे.

१४

ह्या अधिकरणात अनेक गूढ उपायांचे वर्णन आहे. त्यात मंत्रतंत्राच्या विधीबरोबर विविध प्रकारच्या सिद्धी मिळविण्याच्या उपायांचाही समावेश आहे.

१४.१

ह्या अध्यायात मनुष्याला मारण्यासाठी, त्याच्यात व्याधी अथवा व्यंग उत्पन्न करण्यासाठी तयार करावयाच्या अनेक औषधी मिश्रणांचा निर्देश आहे. त्यांतील द्रव्यांचा व्यवस्थितपणे बोध होतो असे नाही. किंबहुना, एखादे नाव प्राण्याचे आहे की वनस्पतीचे असाही संदेह उत्पन्न होतो. हे प्रयोग आता करून त्यांची सत्यता अजमावणे अर्थातच अशक्य आहे.

**८ कला :** हे प्रमाण अध्याय २.१९ मध्ये निर्दिष्ट केलेले नाही.

**१४ नेजनोदक-** ही मुळातील 'तेनजनोदक-' ह्या भ्रष्ट पाठाची दुरुस्ती आहे. नेजनोदकाचे वर्णन १४.४.२ मध्ये आहे. **श्री** टीकेत स्वीकारलेला पाठ 'तेजनोदक' संभाव्य नाही.

**२१ शोष** 'सुकून जाणे' म्हणजे क्षयरोग अभिप्रेत असावा.

**२२ अपजिह्विकायोगः** 'जीभ म्हणजे तिचा उपयोग नाहीसे करणारे मिश्रण' असा अर्थ असण्याची शक्यता आहे.

**३५ मार्गतोऽग्नि** ही भीतभीत सुचविलेली दुरुस्ती आहे. मुळात 'भाग योऽग्नि' असा पाठ आहे. **श्री** टीकेत 'भार्ग्यायोग्नि' हा पाठ स्वीकारला आहे. **मे** टीपेत 'भागतोऽग्नि' असा पाठ सुचविला आहे. कोणत्याच पाठापासून समाधानकारक अर्थ निष्पन्न होत नाही. **३७ ध्रुवेण :** याचा अर्थ अनिश्चित आहे. **श्री** टीकेत 'मानुष' म्हणजे मनुष्यमांस व 'ध्रुव' म्हणजे वटवृक्ष असा अर्थ केला आहे. पण मानुष हे ध्रुवाचे विशेषण असावेसे वाटते. **मे** टीपेत 'स्रुवेण (मूत्राने)' असा पाठ सुचविला आहे. ध्रुव म्हणजे मांस असा अर्थ शक्य आहे काय ?

१४.२

**६ एतयोः** म्हणजे श्वेतबस्त व श्वेतगर्दभ यांपैकी. **८ :** ह्या सूत्रानंतर **श्री** टीकेच्या पाठात आणखी दोन श्वेतीकरणाचे योग दिले आहेत.

**२७ :** हे गद्य सूत्र पुढील २८–२९ ह्या श्लोकांवरून बनविलेले दिसते. वज्रकदली म्हणजे त्यांतील उपोदका असावी.

**३८ :** ह्याचाच 'मानुष अग्नि' म्हणून निर्देश केला आहे. १.२०.४ पहावे.

**४१ नारकगर्भः** 'नार' म्हणजे नुकतेच जन्मलेले वासरू असा एक अर्थ आहे. त्याचा गर्भ म्हणजे गर्भावरील आवरण असा अर्थ शक्य आहे.

**४५ आराज्यायेति निर्वाद :** 'आराज्य' असा शब्द समजावा लागतो. त्याचा सर्व बाजूंनी दृढ झालेले राज्य असा अर्थ शक्य आहे. 'निर्वादः' हा शब्दही अप्रसिद्ध आहे. त्याचा 'निर्विवादः' सारखा अर्थ (विवादाचा अभाव) समजणे शक्य आहे. 'कोपे' असे सप्तमीचे रूप अभिप्रेत असल्याचे समजता येते. आणि कोप म्हणजे प्रजेतील प्रक्षोभ, बंड.

१४.३

**८ काण्डक** म्हणजे मांडीचे हाड अथवा दंडाचे हाड.

**१९–२६ :** हा एक प्रस्वापनमंत्र आहे, विशेषतः दरोडेखोरांच्या उपयोगी. २० **अनुयोगेन** म्हणजे त्यांच्याप्रमाणेच प्रयोग करून असा मूळ अर्थ असावा. २१ **चमूखलाः** (सैन्यातील दुष्ट लोक) म्हणजे कोण ते स्पष्ट नाही. २३ **फेलक** म्हणजे पेटारा, करंडी. संदर्भात (कुत्र्याचा) जबडा असा अर्थ शक्य आहे.

**२८ बिलख** म्हणजे बिळ खणणारा प्राणी.

**३४–३९ :** हा दुसरा प्रस्वापनमंत्र आहे. **३६ :** ही स्त्री-पिशाचांची नावे असावीत. **३८ सिद्धाः** हा शब्द सूत्र ४६ मधील 'सिद्धार्थाः'शी समानार्थक असावा.

**४३–४७ :** हा आणखी एक प्रस्वापनमंत्र. ४५ **सिद्धचर्थम्** ही 'सिद्धार्थम्'ची सुचविलेली दुरुस्ती आहे.

**५१–५२ :** हा दारे उघडण्याचा द्वारापोहनमंत्र आहे.

**५८ भग्नस्य** खून होऊन ज्याच्या शरीराचे अवयव छिन्नविच्छिन्न झाले आहेत असा. ६१ येथील हा पाठ भीतभीत सुचविलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितांत 'रविरविः सगन्ध (सगण्ड) परिघाति भणाति' असे आहे. आकाशात संचार करतो म्हणून सूर्याच्या जातीचा (रविसगन्धः) होऊन बंद केलेल्या दरवाजाच्या पलीकडे (परिघम् अति) सर्वत्र व्यापू शकतो (सर्वं पृणाति) असा अर्थ संभाव्य आहे.

**६२ -कुम्भीत्तम्बकटुकसारौघः** हा पाठही तसाच सुचविलेला आहे. मुळात 'कुम्बीत्तम्बकटुकसारीघः' असे आहे. हा मंत्र दरवाजाच्या अडसराला उद्देशून म्हणावयाचा आहे. तो अत्यंत मजबूत आहे असा ह्या विशेषणाचा मथितार्थ. **नारीभग** ज्यातून अडसर पुढे मागे सरकविला जातो ते भोक.

**६८ आनाह** म्हणजे मल व मूत्र ह्यांचा अवरोध.

**७१ पदे** ही मे टीपेत सुचविल्याप्रमाणे 'पादे'च्या जागी केलेली दुरुस्ती आहे.

१४.४

**१० अक्ष** (सोळा माष–श्री) : ह्या प्रमाणाचा अध्याय २.१९ मध्ये निर्देश नाही.

**१२ :** सूत्र १.२०.५ पहावे. हा मणी गळ्यात अथवा मनगटावर धारण करता येईल.

१५

तन्त्र म्हणजे शास्त्र. त्याची मांडणी करताना विवेचन करण्याचे जे विविध वाङ्मयीन प्रकार त्यांना तन्त्रयुक्ति अशी संज्ञा आहे. कोणत्याही शास्त्राच्या विवेचनाच्या ओघात ह्या युक्त्यांचा स्वाभाविकपणे अवलंब केला जातो.

१५.१

**२ पृथिव्या इ०:** सूत्र १.१.१ पहावे.

५ ह्या उदाहरणावरून असे वाटण्याचा संभव आहे की संपूर्ण शास्त्राचा जो विषय तो म्हणजेच अधिकरण. परंतु ह्याची व्याख्या सर्व पंधरा अधिकरणांना लागू होण्यासारखी आहे.

९ उदाहरण म्हणून १.४.१६ हा संपूर्ण श्लोक अभिप्रेत आहे.

४२ : परंतु १०.६ ह्या अध्यायातील विवेचनात बार्हस्पत्यांच्या मताला अनुसरून असणाऱ्या दोन कक्ष ह्या अधिक विभागांचाही निर्देश ठिकठिकाणी केला आहे.

५१–५२ : **स्वसंज्ञा** म्हणजे ह्या शास्त्राची विशिष्ट संज्ञा व **पर** म्हणजे दुसरी शास्त्रे असा अर्थ संभाव्य आहे. अथवा स्व म्हणजे कौटिल्य स्वत: आणि पर म्हणजे ह्या शास्त्राचे दुसरे आचार्य असेही समजता येईल. येथे उद्धृत केलेले उदाहरण मुळात निराळ्या रूपात आढळते. तेथे 'प्रथमा प्रकृतिः' 'द्वितीया', 'तृतीया' हे शब्द नसून 'विजिगीषुः', 'अरिप्रकृतिः' 'मित्रप्रकृतिः' अशा संज्ञा आहेत. ह्या विसंगतीची समाधानकारक उपपत्ती लावणे कठीण आहे. ७.१८. १–२ ह्या सूत्रांमध्ये द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी व षष्ठी ह्या प्रकृतींचा निर्देश आहे.

७३ **येन शास्त्रं च** इ० : हे कौटिल्य अथवा चाणक्य ह्याच्या वर्णनपर आहे. ह्याने नंदवंशाचा उच्छेद करून चंद्रगुप्त मौर्याला राज्यावर बसविले होते हे प्रसिद्ध आहे. त्याने शास्त्राचा उद्धार केला होता याचा अर्थ त्याने राजनीतिशास्त्राचे पुनरुज्जीवन केले असा असावा. शस्त्राचा 'उद्धार' केला याचा अर्थ त्याने शस्त्रग्रहणसुद्धा केले होते असा संभाव्य आहे.

(**सूत्रं च भाष्यं च** : प्रारंभीचा उपोद्घात, पृ. २२ पहावा).

---

येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे - ४११००६.